M-2990

| शिर्षक | ग्रंथकार | विषय | विस्तार (पुर्ण/अपूर्ण) | टिकाकार | आकार | पृष्ठे | लिपी | सामग्री | Lines per page | Letters per line | Condition & age (शके/विकम सवंत) | Additional Particulars / Remark |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जैमिनीअश्वमेध | | धार्मिकग्रंथ | अपूर्ण | - | 4/12 | 328 | मराठी | कागद | 20 | 41 | | |

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ श्रीगोपालकृष्णाय नमः ॥ ॥ ॐ नमो जी कुंजरवदना ॥ सकळ विद्यांचिया अक्षयसदना ॥ नमो अमृतकरभाललोचना[1] ॥ जितमदना गणराया ॥ १ ॥ विघ्नेभकुंभ[2]विदारणपंचानना ॥ सिंदूरमंडितमुखैकरदना ॥ विधिहरिहर[3]पदनलिना ॥ मतिनिधाना विघ्नहरा ॥ २ ॥ तुझें चरणारविंद मकरंद ॥ वर्षो मन्मुखक्षेत्रीं स्वानंद ॥ तेणें वाग्वल्लीमूळकंद ॥ विस्तारा जाईल पुष्पफळें ॥३॥ मग नवरसरसिकजन ॥ रस सेविती स्वर्गे होऊन ॥ जेणें निवतील सकळ सज्जन ॥ ऐसें वरदान मज देईं ॥ ४ ॥ तंव प्रसन्न जाहला गौरीकुमर[5] ॥ माथां ठेविला अभयकर ॥ ह्मणे बोलें कथारससागर[6] ॥ सादर श्रोते देखोनी ॥ ५ ॥ आतां नमूं ती ब्रह्मनंदिनी[7] ॥ वीणामंडित पुस्तकपाणी ॥ मयूरवाहनी हंसगमनी ॥ जी जाड्यकुळवनकुठार[8] ॥ ६ ॥ कुंदेंदुधवलतनुमंडित ॥ फुल्लपुंडरीकासनीं[9] शोभत ॥ कलिकिल्बिषपंक[10] शोषित ॥ प्रतापतरणि प्रकाशे ॥ ७ ॥ ऐशी विधितनया वर्णितां ॥ तिणें अभयकर ठेविला माथां ॥ तियेची होतां प्रसन्नता ॥ वाग्वल्ली सफळ होय ॥ ८ ॥ आतां वंदूं कुळदैवत ॥ जो नामें प्रसिद्ध सिद्धनाथ ॥ ब्रह्मांडकपित्थनगरीं राहत ॥ भक्तमनोरथ पुरवावया ॥ ९ ॥ तयाचा चरणामृतरस ॥ सेवून दोंदिल जाहलें मानस ॥ विषयीं घेऊनियां त्रास ॥ बळें कळिकाळा न मानी ॥ १० ॥ आतां नमूं तो सद्गुरु ॥ जो आत्मज्ञानी अति उदारु ॥ जयातें देखोनी लाजे कल्पतरु ॥ मी कल्पितदाता ह्मणोनी ॥ ११ ॥ तमहरा[11]चें द्यावें उपमान[12] ॥ तरी तें तयासी न साजे जाण ॥ तो बाह्यतमाचें करी हरण ॥ ह्मणोनि हीन उपमेसी ॥ १२ ॥ अंतरीं अज्ञानतम[13] गहन ॥ त्यातें सद्गुरु नाशी जाण ॥ यास प्रचंड बोधकिरण ॥ ऐसियासी उपमा केवीं घेऊं ॥ १३ ॥ जयाचे होतां करुणाकटाक्ष ॥ निर्मूळ होय संसारवृक्ष ॥ यत्न करितां जोडे मोक्ष ॥ द्वैतपक्ष छेदूनी ॥ १४ ॥ स्वपरभेद[14] नसतां तया ॥ परी मी दीन जाणोनि करी दया ॥ अभयकर ती वटछाया ॥ करूनि काया शीतळ करी ॥ १५ ॥ तयाचें लाहोनि[15] वरदान ॥ परम पावलों समाधान ॥ जेणें होय कलिमलदहन ॥ ते कथा निधान[16] बोलवी ॥ १६ ॥ श्रोते व्हावें सावधान ॥ ऐसें ह्मणूं तरी मूर्खपण ॥ संत स्वरूपीं सदा लीन ॥ तयांस ही प्रार्थना केवीं करूं ॥ १७ ॥ उगवोनि शीतळ करी शरीर ॥ तो काय प्रार्थावा अमृतकर[17] ॥ सत्वर करीं तमसंहार ॥ ऐसें दिनकरा न विनविजे ॥ १८ ॥ नासापुटीं सुगंध भरीं ॥ ऐसें काय विनविजे कस्तूरी ॥ तेवीं साधुजन चराचरीं ॥ जगउद्धारीं उदित ॥ १९ ॥ दश मास असे परभृत[18] मौनी ॥ तें मौन सांडी वसंतागमनीं ॥ नातरी उगवतां शर्वरीचा धनी ॥ चंद्रकांतमणी द्रवों लागे ॥ २० ॥ नातरी लोहचुंबक

---

१ ज्याच्या ललाटीं चंद्र आहे असा ( भालचंद्र—गणपति). २ विघ्नरूपी हत्ती. ३ येथें 'विधिहरिहर' यापुढें 'नत' किंवा 'नुत' असा शब्द असल्यास बरें. ४ पक्षी ( भुंगे ). ५ गणपति. ६ कथारूपी रसाचा समुद्र. ७ सरस्वती. ८ अज्ञानरूपी अरण्य तोडणारी कुऱ्हाड. ९ प्रफुल्लित कमलासनावर १० कलियुगसंबंधी पातकरूपी चिखल. ११ सूर्याचें. १२ उपमा. १३ अज्ञानरूपी अंधकार. १४ आपलें आणि दुसऱ्याचें हा भेद. १५ घेऊन, मिळवून. १६ मोठा ठेवा. १७ चंद्र. १८ कोकिळा.

मणी जाण ॥ तो जड लोह करी सचेतन ॥ तैसें तुमचेंही अवधान ॥ मज जडातें बोलवी जें ॥२१॥ तंव श्रोते ह्मणती पुरे स्तुती ॥ तुजवरी आहे अक्षय प्रीती ॥ तरी कथामृत श्रोत्रपात्रीं ॥ वाढोनि तृप्त करीं आह्मां ॥ २२ ॥ मग वक्त्यानें करकमळ जोडूनि ॥ श्रोतयांप्रति विनवणी ॥ ऐका कथा सुरतरंगिणी ॥ जी करित धुणी महापापां ॥ २३ ॥ सकळविद्याचातुर्यखाणी ॥ नारायणावतार व्यासमुनी ॥ तयाचा मुख्य शिष्य जो जैमिनी ॥ असे त्रिभुवनीं विख्यात ॥ २४ ॥ तेणें अश्वमेधकृत कथा ॥ ती महाराष्ट्र भाषेंत वर्णीन आतां ॥ मूळ पदीं ठेवून चित्ता ॥ सांगेन श्रोतयां यथामती ॥ २५ ॥ संस्कृत आणि प्राकृत ॥ विवेकें पाहतां तों एक अर्थ ॥ रत्नवाटींत[1] आणि पर्णपुटकांत ॥ असे गोघृत सारखें ॥ २६ ॥ जैमिनिवाक्य रसायन ॥ समर्थें कनकपात्रीं[2] केलें प्राशन ॥ तेंच दुर्बळें पत्रें करितां पान ॥ सौख्यकारण समान कीं ॥ २७ ॥ आदरें व्याही पाचारून ॥ तया वाढिलीं नाना पक्वान्न ॥ तीं दुर्बळ अन्नार्थी भक्षितां जाण ॥ परि समान तृप्ति उभयतांसी ॥ २८ ॥ संस्कृत अमृतोदककूप परम ॥ तेथें गुण-पात्र[3] नसतां उत्तम ॥ पांथिकतृषार्तांचा श्रम ॥ सर्वथा न जाय कूपदृष्टीं ॥ २९ ॥ प्राकृत मोकळें प्रवाहोदक ॥ येथें गुण-पात्र नलगे आवश्यक ॥ करपात्रें[4] प्राशितां देख ॥ तृषा समूळ वोळवते[5] ॥ ३० ॥ असो आतां हा वाग्विलास ॥ ज्या भाषें वदवील श्रीनिवास ॥ त्या भाषें वदावा कथारस ॥ श्रोतृहृत्तांप[6] हरावया ॥ ३१ ॥ अपार वर्षला बलाहक[7] ॥ परी बिंदुमात्र घेई चातक । तेवीं मी हरिकथाकौतुक ॥ कथीन सम्यक बुद्धिबळें ॥ ३२ ॥ कविवर घेऊन गेले गोडी ॥ परी कांहीं राहिली असे थोडी ॥ ती मी घेऊन मधुर परवडी ॥ सांगेन आवडी तुह्मांप्रती ॥ ३३ ॥ वाळवेमाजी सांडिली शर्करा ॥ ती केवीं प्राप्त होईल कुंजरा[8] ॥ तरी तो पिपीलिकेस[9] होय चारा ॥ तो न्याय जाहला मज प्राप्त ॥ ३४ ॥ आतां होऊन सावधान ॥ ऐका महाभारतआख्यान ॥ त्यामाजी अश्वमेधपर्व निधान ॥ जैमिनि-कवन अमृतोदधि ॥ ३५ ॥ भारतवंशसरितारमण[10] ॥ त्यामाजी जन्मला चंद्र परिक्षितिनंदन ॥ जेणें जैमिनिचंद्रकांत द्रवोन ॥ शीतळ त्रिभुवन तेणें केलें ॥ ३६ ॥ अति विनीत[11] नृपनंदन ॥ होऊन नमित मुनिपदनलिन[12] ॥ धर्में केला अश्वमेध पूर्ण ॥ तें मज कथन सांगावें ॥ ३७ ॥ पडलें सत्कथेचें अवर्षण ॥ तेणें स्वसुखधान्य सुकलें जाण ॥ आतां त्यावरी कथामृत वर्षोन ॥ तें सचेतन[13] पैं करावें ॥ ३८ ॥ जेवीं त्या एकार्णवजीवनीं[14] ॥ क्रीडे हरी मीन होऊनी ॥ तेवीं तूं निगमागमजीवनीं[15] ॥ मत्स्य होऊन पोहसी ॥ ३९ ॥ तंव तो जैमिनि ह्मणे नृपनाथा ॥ तूं भाग्यें जोडलासि गा श्रोता ॥ तुझे अवधानीं उल्हासे सरिता ॥ सुखसागरा मिळों



---

१ द्रोणांत. २ सोन्याच्या भांड्यांत. ३ दोरी आणि पोहऱ्या. ४ ओंजळीनें. ५ नाहींशी होते. ६ श्रोत्यांच्या अंतःकरणांतील ताप. ७ मेघ. ८ हत्तीला. ९ मुंगीला. १० भरतवंश हाच कोणी एक समुद्र. ११ नम्र. १२ ऋषीचें चरणकमळ. १३ जीवंत. १४ प्रलयकालीं समुद्रमय झालेल्या पाण्यांत. १५ वेद व शास्त्रें हेंच कोणी उदक त्यामध्यें.

धांवे ॥ ४० ॥ धेनुकांसेसी क्षीर आहे बरवें ॥ हें तों सर्वांसी असे ठावें ॥ परी तें वत्समुख[1] लागता काढावें ॥ मग तें वाढावें भोक्त्यां तयां ॥ ४१ ॥ महाभारत कामधेनु जाण ॥ दोहक तुझें आहे अवधान ॥ मज वत्समुखें करावें पयःपान ॥ या पंक्तिकरां-समवेत ॥ ४२ ॥ रुक्मिणीवदनारविंदभ्रमर ॥ यादवकुळाचळसौख्यभृंग ॥ ब्रह्मादिकवंद्य श्रीरंग ॥ तो वंदी पदयुग धर्माचें ॥ ४३ ॥ परम पवित्र तो धर्मनंदन ॥ तयाचें मन तें गुरु करून ॥ भीष्मजननी[2] निर्मळपण ॥ शिके आपण त्यापासीं ॥ ४४ ॥ ऐसा तो नृपचूडामणी ॥ तो कां करी अश्वमेधालागुनी ॥ ऐसा संदेह वाटेल तुझ्या मनीं ॥ तरी सावधान श्रवणीं ऐकावें ॥ ४५ ॥ धर्मराज तंव धर्ममूर्ती ॥ स्वधर्में संपादिली राजकीर्ती ॥ नित्य जवळी असतां श्रीकृष्णमूर्ती ॥ पाप त्यापासीं असेना ॥ ४६ ॥ जरी धर्म असता पापमळिण ॥ तरी त्यासी न भेटता नारायण ॥ एके ठायीं तम[3] आणि तपन[4] ॥ नांदतां कोणीं न देखिलें ॥ ४७ ॥ ऐसाचि धर्म पवित्र आणि शुद्ध ॥ भगवत्प्रेमाचा सिंधु अगाध ॥ तरी कां करिता जाहला अश्वमेध ॥ तरी मिष केलें हत्येचें ॥ ४८ ॥ कल्पित कुळदोष हरावया ॥ कीं भगवद्भक्ति प्रगटावया ॥ किंवा सकळ लोक तारावया ॥ धर्में मांडिला अश्वमेध ॥ ४९ ॥ आतां राया सावधान ॥ उघडोनि श्रवणाचे श्रवण ॥ सावध करूनि मनाचें मन ॥ कथा श्रवण करावी ॥ ५० ॥ अवनीं विख्यात नाग-पुरी[5] ॥ तेथें राज्य करी तो नृपकेसरी[6] ॥ तों गोत्रजवधाची चिंता अंतरीं ॥ सर्पिणीरूपें प्रसवली ॥ ५१ ॥ ती नृपानंदविवरीं निघाली ॥ गोत्रजवधपापविषवल्ली ॥ तेणें नृपवरतनू तापली ॥ वर्जिले सकळ त्यानें भोग ॥ ५२ ॥ एकांत राज्यासन नावडे ॥ आणि न पाहे राष्ट्रभोगांकडे ॥ मन भ्रमें जैसें वेडें ॥ वाटे कुडें म्या केलें ॥ ५३ ॥ तंव तो विवेकगारुडी धांवला ॥ तेणें नावेक[7] नृप सावध केला ॥ मग तो विचार पुसों लागला ॥ दुर्योधनप्राणहरातें[8] ॥ ५४ ॥ ह्मणे कीचकबलोदधिकुंभकुमरा[9] ॥ मज कांहीं सांग रे विचारा ॥ गोत्रजवनवैश्वानरा ॥ वाक्यामृतें विझवीं तूं ॥ ५५ ॥ जंव सांगों पाहे भीमसेन ॥ तंव यदृच्छा[10] पातला बादरा-यण[11] ॥ कीं तो तापेंविण सहस्रकिरण ॥ गगनाहून उतरला ॥ ५६ ॥ आगमनिगमांचा कल्पद्रुम ॥ कीं सकळ विद्यावल्लींचा आराम[12] ॥ नातरी अनुभवाचा अक्षय सोम[13] ॥ जिज्ञासु नृपचित्तचकोरा ॥ ५७ ॥ ऐसा तो सत्यवतीनंदन[11] ॥ धर्मरायें आला देखोन ॥ मग वंदोनि तयाचे चरण ॥ यथोक्त पूजन नृपें केलें ॥ ५८ ॥ मग करकमळांतें जोडून ॥ राजा विनवीत द्वैपायन[11] ॥ ह्मणे जेणें ब्रह्म-हत्यादि दोष दारुण ॥ होय निरसन तें सांगें ॥ ५९ ॥ भीष्म आणि गुरु द्रोण ॥ ते माझे होते दिव्य नयन ॥ त्यांविण मी अंध जाहलों पूर्ण ॥ आतां पतन पदोपदीं ॥ ६० ॥ जेथें सदा वेदघोष गर्जत ॥ जेथें याचक होती तृप्त ॥ तें कर्णमंदिर सुंदर देखतां

---

१ वांसराचें तोंड. २ गंगा. ३ अंधकार. ४ सूर्य. ५ हस्तनापुर. ६ नृपश्रेष्ठ. ७ क्षणमात्रांत. ८ भीमाला. ९ कीचकाच्या बलरूपी समुद्राला अगस्तिऋषी-सारख्या भीमा. १० सहजगत्या. ११ व्यास. १२ बाग. १३ चंद्र.

अकस्मात ॥ उठतो उदरांत भडकाग्नी ॥ ६१ ॥ जेथें हर्षाश्रु ती वाहे सरिता ॥ तेथें शोकजीवन वाहे आता ॥ धिक्कार या राज्यास मुनिनाथा ॥ जेथें नाहींत भीष्म कर्ण ॥ ६२ ॥ यदुकुळनलिनदिनेशें[1] ॥ बरवें बोधिलें मतिप्रकाशें ॥ तरी शोकाग्नि जाळी सावकाशें ॥ हृदयमंदिर स्वामिया ॥ ६३ ॥ आतां राज्य करो भीमसेन ॥ मी तरी करीन तीर्थाटण ॥ तथापि मी नव्हें पावन ॥ ऐसें वचन बोलिला ॥ ६४ ॥ तंव तो सत्यवतीनंदन ॥ नृपाप्रती बोले सुवचन ॥ राया तूं निष्पाप असतां पूर्ण ॥ दोषी आपणा ह्मणविसी ॥ ६५ ॥ राया तूं शुद्ध चैतन्यघन ॥ सबाह्य भरलें स्वानंदजीवन ॥ कल्पूनि वधदोषपूर्ण वन ॥ कां तूं वितळों पाहसी ॥ ६६ ॥ मुळीं जन्मलेंच नाहीं ॥ तेथें पापांश कैंचा पाहीं ॥ पापपुण्य भ्रांतीचे ठायीं ॥ भासे पाहीं अज्ञान ॥ ६७ ॥ कां स्वप्नींचें अत्यंत सुकृत[2] ॥ किंवा महापातकांचे पर्वत ॥ ते जागृतीमाजी मिथ्याभूत ॥ तेवीं पापपुण्य आत्म्यासी ॥ ६८ ॥ मरता आणि मारता ॥ हे मूळमायेची कर्तव्यता ॥ तें तूं घेऊन आपल्या माथां ॥ दोषी ह्मणविसी आपणातें ॥ ६९ ॥ तूं मायाभ्रमें भुललासी ॥ मी पाप-पुण्यकर्ता ह्मणविसी ॥ तरी तूं करीं कां अश्वमेधासी ॥ तेणें होसी निष्पाप ॥ ७० ॥ कृष्णानुमतें युद्ध केलें ॥ तंव धर्मराज्य जोडलें ॥ तें तूं टाकीन ह्मणसी तरी बुडविलें ॥ स्वधर्मपुण्यधनातें ॥ ७१ ॥ भिऊं नको धरीं रे धीरा ॥ करीं अश्वमेध क्रतुवरा[3] ॥ साह्य बंधु बळसागरा ॥ आणि कृष्णवीरही यादवेंसीं ॥ ७२ ॥ इहलोकीं करावी कीर्ती ॥ परलोकीं मानवती[4] सुरपंक्ती[5] ॥ जंव शरीरीं आहे दृढ शक्ती ॥ तोंवरी करीं अश्वमेध ॥ ७३ ॥ ऐसें व्यासमुनीचें वचन ॥ ऐकोन बोले नृपनंदन ॥ स्वामी बोलिलेती यथार्थ वचन ॥ परी कैंचें धन मजपासीं ॥ ७४ ॥ जरी प्रजेपासून घेऊं धन ॥ तरी दुर्योधनें त्यांचें केलें पीडण ॥ जरी आणूं नृपकरभारधन ॥ तरी ते युद्धीं निमाले[6] ॥ ७५ ॥ धनाशा धरूनियां मनीं ॥ आतां मी न पीडीं ही मेदिनी ॥ साह्य नृप निमाले समरंगणीं ॥ यास्तव वाटे अघटित ॥ ७६ ॥ पुनरपि बोले पुराणकर्ता[7] ॥ वचन ऐकें पंडुसुता ॥ मरुत्त नामें भूप होता ॥ तेणें याग केले भूमंडळीं ॥ ७७ ॥ ब्राह्मण द्रव्यें तृप्त केले ॥ ते स्वधनांतें सांडून गेले ॥ तें तुवां धन आणून वहिलें ॥ अश्वमेध संपादीं ॥७८॥ हें ऐकून बोले युधिष्ठिर ॥ धन्य तो मरुत्त पार्थिवेश्वर[8] ॥ जेणें धनत्यागी केले धरामर[9] ॥ त्रिभुवनीं कीर्ति मिरविली ॥ ७९ ॥ तें ब्रह्मस्व आणोनियां याग ॥ जरी संपादिला सांग ॥ तरी मज अंतरेल श्रीरंग ॥ हांसेल जग ऐकोनी ॥ ८० ॥ ते विप्र हांसतील मातें ॥ ह्मणतील आमुचें धन देतो आह्मांतें ॥ थोर पुण्य जोडलें धर्मातें ॥ ऐसें बोलतील क्षणक्षणां ॥ ८१ ॥ तरी ब्रह्मस्वांएवढें[10] कालकूट[11] ॥ नाहीं त्रैलोक्यामाजी वरिष्ठ ॥ जें मूळवंशाचा भरी घोट ॥ तें विष मारी एकातें ॥ ८२ ॥ तोंवरीच गर्जे कालकूट ॥ जों देखिला नाहीं नीळकंठ ॥ ब्रह्मस्वविषाग्नि करी कूट ॥ ऐसा त्रिलोकीं देव नसे ॥ ८३ ॥ मी सर्वथा नाणीं ब्राह्मणधन ॥ निंद्यपणें न

१ कृष्णानें. २ पुण्य. ३ श्रेष्ठयज्ञ. ४ संतुष्ट होतात. ५ देवसमुदाय. ६ मेले. ७ व्यास. ८ महाराज. ९ ब्राह्मण. १० ब्राह्मणांच्या धनाएवढें. ११ ह्या नांवाचें विष.

करीं यागाचरण ॥ जाहली गोत्रजवधाची लज्जा दारुण ॥ त्याहून लज्जा ब्रह्मस्वाची ॥ ८४ ॥ तंव बोले कृष्णद्वैपायन[1] ॥ धन्य राया तुझें निर्मळ मन ॥ तरी धर्मशास्त्रींचें वचन ॥ ऐकें सावधान नृपेंद्रा ॥ ८५ ॥ जेव्हां क्षितिविबुधीं[2] त्यागिलें धन ॥ तेव्हांच ते ब्रह्मस्वा मुकले जाण ॥ तें धन आणितां तुजला जाण ॥ अल्पही दूषण असेना ॥ ८६ ॥ भृगुपतीनें[3] धरा निःक्षत्रिय केली ॥ तेणें यागीं विप्रांसी दान दिधली ॥ तयांपासोनि दैत्यीं हरिली ॥ तरीती कां भोगिती नृप आतां ॥ ८७ ॥ ह्मणोनि ऐकें नृपनंदना ॥ तें युक्त धन आणोनि सदना ॥ करीं सुखें स्वधर्महवना ॥ चित्तीं अनुमाना न आणावें ॥ ८८ ॥ तंव मुनीस पुसे नृपनंदन[4] ॥ किती संख्या असावे ब्राह्मण ॥ किती संख्या द्यावी दक्षिणा धन ॥ आणि अश्वलक्षण तें कैसें ॥ ८९ ॥ तयासी ह्मणे मुनिनायक ॥ वीस सहस्र द्विज असावे आवश्यक ॥ दक्षिणाधनातें ऐक ॥ सावधान होऊनियां ॥ ९० ॥ गज रथ हय एक एक ॥ गो सहस्र द्याव्या पृथक ॥ रत्नें प्रस्थ[5]भार एक एक कनक ॥ ऐसी दक्षिणा प्रारंभीं ॥ ९१ ॥ कुंदेंदु[6]धवलवर्ण ॥ पीतपुच्छ आणि श्यामकर्ण ॥ सर्वत्र ज्याचें अकुंठित गमन ॥ ऐसें हयलक्षण अवधारीं ॥ ९२ ॥ चैत्री पौर्णिमेसी सोडावा ॥ वर्षपर्यंत तो रक्षावा ॥ स्वयें असिपत्रव्रतनेम धरावा ॥ आणि वर्जावे भोगमात्र ॥ ९३ ॥ पत्नीसहित करावें शयन ॥ परी करावें सर्व इंद्रियदमन[7] ॥ जोंवरी होय अश्वगमन ॥ तोंवरी हें व्रत करावें ॥ ९४ ॥ जेथें अश्व करील मळमूत्र ॥ तेथें दान द्यावें गोसहस्र ॥ हवनहि करोनियां पवित्र ॥ धनें विप्र तोषवावे ॥ ९५ ॥ आणि अश्वाचें पूजन करावें ॥ भाळीं कनकपत्र[8] बांधावें ॥ स्वनामांकित तें करावें ॥ लेखन उत्तम प्रौढीचें ॥ ९६ ॥ जो बलाढ्य असेल पार्थिव[9] ॥ तेणें धरावा हयपुंगव[10] ॥ धरिलिया जावोनि बळगर्व ॥ हरोनि अश्व सोडवावा ॥ ९७ ॥ अमरनाथें केले यज्ञशत ॥ परि तें व्रत जाहलें विपरीत ॥ ह्मणोनि होतो विघ्नाभिभूत[11] ॥ वारंवार राजेंद्रा ॥ ९८ ॥ जरी व्रतसहित होय अश्वमेध ॥ तरी पुण्य जोडेल अगाध ॥ परी ऐसा कैंचा वीर प्रसिद्ध ॥ जो मनोभवातें संहारी ॥ ९९ ॥ विधिहरिहरांची[12] सुरकुंडी ॥ अनंगें[13] पंच कुसुमशरेंचि पाडी ॥ तेथें मानव ते काय बापुडीं ॥ केला देशधडी अमरनाथ ॥ १०० ॥ ऐसी मनोभवाची[13] करणी ॥ अवाच्य न बोलवे ती वाणी ॥ तयातें जिंकी ऐसा त्रिभुवनीं ॥ वीर विरळा जन्मला ॥ १ ॥ सुरनदीनंदना[14]वांचोन ॥ कोणें जिंकिला हा मदन ॥ किंवा तारकारी[15] शुक हनुमान ॥ ते रतिरमणातें[13] मर्दिती ॥ २ ॥ जरी अनंगविजयाची शक्ती ॥ तुझ्या देहीं असेल नृपती ॥ तरी तूं व्रत युक्त करीं निश्चिती ॥ ऐसा मुनिपति बोलिला ॥ ३ ॥ तंव धर्म ह्मणे गा भीमसेना ॥ तुवां ऐकिलें व्यासवचना ॥ सर्वथा याग नव्हे जाणा ॥ अश्व साधना अलभ्य ॥ ४ ॥ धर्म ह्मणे जी व्यासमुनी ॥ मी पडिलों परम संक-

---

१ व्यास. २ ब्राह्मणांनीं. ३ परशुरामानें. ४ धर्म. ५ एक शेर. ६ कुंदपुष्प किंवा चंद्राप्रमाणें शुभ्र. ७ इंद्रियनिग्रह. ८ सुवर्णपत्रिका. ९ राजा. १० अश्वश्रेष्ठ. ११ विघ्नयुक्त. १२ ब्रह्मा, विष्णु आणि महादेव यांची. १३ मदन. १४ भीष्मावांचून. १५ कार्तिकस्वामी.

टवनीं ॥ जवळी नाहीं चक्रपाणी ॥ सर्व संकटीं रक्षिता ॥ ५ ॥ तंव भीम बोले महाबळी ॥ राया केवीं बोलिलासी ही बोली ॥ जवळी असतां वनमाळी ॥ पडिली भ्रांति देहलोभें ॥ ६ ॥ शेष सोडील भूमंडळ ॥ कीं आकाश जनमस्तकीं पडेल ॥ कीं शीतज्वरें अग्नि पीडेल ॥ परी धर्मावेगळा नव्हे हरी ॥ ७ ॥ करितां हरिपादांबुजस्मरण ॥ अष्टही सिद्धि ओळंगती जाण ॥ तो समीप असतां रमारमण ॥ काय न्यून संपदेसी ॥ ८ ॥ हृदयीं नसतां श्रीअनंत ॥ वृथा याग केले जी अनंत ॥ यागावांचून तुज पुनीत ॥ करील जाण स्मृतिमात्रें ॥ ९ ॥ आह्मी बंधु साह्य असतां ॥ कां कुरुपुंगवा करसी चिंता ॥ कळिकाळाचिया माथां ॥ हाणों लाथा निजबळें ॥ ११० ॥ कुंतीजठरविशाळउदरीं ॥ तयामाजी जन्मलों नरकेसरी ॥ ते रिपुगज विदारून करीं ॥ घेतील सुकीर्तिमौक्तिकांतें ॥ ११ ॥ आतां पितामहास पुसें वचन ॥ कोठें आहे तें अश्वरत्न ॥ तें ठायीं पडतां याग पूर्ण ॥ सिद्धी पावला जाणावें ॥ १२ ॥ ऐसी ऐकोनि भीमवाणी ॥ हृदयीं संतोषला व्यासमुनी ॥ ह्मणे भलाभला रे गदापाणी ॥ बरा चक्रपाणी जाणसी ॥ १३ ॥ येथूनि शतग्राम निर्धारीं ॥ आहे भद्रावती नाम नगरी ॥ तेथें यौवनाश्व राजा राज्य करी ॥ त्याचे मंदिरीं श्यामकर्ण आहे ॥ १४ ॥ तो दश अक्षौहिणींसहवर्तमान ॥ करीत तुरंगाचें संरक्षण ॥ तेथें वाऱ्यासी नाहीं गमन ॥ केवीं कवण मानवाचा ॥ १५ ॥ जैसा रक्षित प्राणी प्राण ॥ किंवा योगी रक्षिती ज्ञानधन ॥ नातरी पतिव्रता भ्रतारचरण ॥ मनोमंदिरीं न विसंबे ॥ १६ ॥ जैसा कृपण रक्षी धनातें ॥ तैसा नृप तो अश्वरत्नातें ॥ तो अलभ्य असे तुह्मांतें ॥ ऐकोनि वचनातें भीम हंसे ॥ १७ ॥ भीमसेन ह्मणे रे नृपनाथा ॥ आतां सोडीं ही सकळ चिंता ॥ हृदयीं धरून सिंधुजाकांता ॥ अश्व तत्वतां आणीन ॥ १८ ॥ आतां पुढें वीर तिघे जाण ॥ जातील भद्रावतीलागून ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अति रसाळ अवधारा ॥ १९ ॥ जैमिनिवाक्य जलधर ॥ वर्षेल कथामृतसार ॥ तें भरावें श्रोत्रपात्रीं सादर ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयांतें ॥ १२० ॥ ॥ इति श्रीमन्महाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ शुभं भवतु ॥ ॥ अध्याय ॥ १ ॥ ॥ ओव्या ॥ १२० ॥ ॥

१ श्रीकृष्ण. २ पुरुषसिंह. ३ सत्कीर्तिरूप मोत्यांला. ४ चारशें कोश. ५ एक अक्षौहिणी ह्मणजे १०९३५० पायदळ, ६५६१० घोडेस्वार, २१८७० रथ आणि २१८७० हत्ती. ६ पाड. ७ कृष्णाला. ८ खरोखर.

श्रीगणेशाय नमः ॥ तंव मुनिकुळचक्रचूडामणी ॥ जनमेजयाप्रति ह्मणे जैमिनी ॥ ऐकें राया पूर्वजकरणी ॥ जी त्रिभुवनीं विख्यात ॥ १ ॥ धर्मास ह्मणे भीमसेन ॥ मी बळेंचि तो अश्व आणीन ॥ हृदयीं असतां रमारमण ॥ काय असाध्य हरिदासा ॥ २ ॥ सकळ सैन्य असो तुजपासीं ॥ मी एकला जाईन भद्रावतीसी ॥ जिंकोनियां यौवनाश्वासी ॥ बळें अश्वासी आणीन ॥ ३ ॥ जरी मी न आणीं श्यामकर्ण ॥ तरी ऐक माझा दारुण पण ॥ जे मातृपितृहत्यारी जन ॥ तें पातक घडो मजलागीं ॥ ४ ॥ एककूपोदकग्राम जाण ॥ जेथें वेदाध्ययन ना शिवपूजन ॥ तेथें वसती जे ब्राह्मण ॥ त्यांचें पातक मज घडो ॥ ५ ॥ तंव धर्म ह्मणे [1]प्रभंजनसुता ॥ तो यौवनाश्व बलाढ्य तत्वतां ॥ तेथें एकाएकीं तूं जातां ॥ वाटे चिंता मजलागीं ॥ ६ ॥ तों [2]शैल्यारिअग्रजाप्रति वचन ॥ बोले [3]दशशतकरात्मजनंदन ॥ मी असतां एकाकी प्रयाण ॥ तुज न शोभे स्वामिया ॥ ७ ॥ जेवीं [4]अवनिजावदनाब्जभृंगें ॥ नेला [5]शेषावतार संगें ॥ तेवीं मज न्यावें जी अनुरागें ॥ निजविश्रामाकारणें ॥ ८ ॥ तंव गदापाणि ह्मणे कर्णसुता ॥ आह्मीं रणीं वधिला तुझा पिता ॥ तैंपासोनि तुज अवलोकितां ॥ परम लज्जा वाटतसे ॥ ९ ॥ जो रणीं दानीं परम शूर ॥ त्याचा केला आह्मी संहार ॥ तयाचा सुकुमार तूं कुमर ॥ दुर्धर संग्रामा केवीं नेऊं ॥ १० ॥ जेवीं अरुणविकासित [6]कल्हार ॥ ऐसें तुझें मुख आणि कर ॥ तें पर्वतभेदक वज्रप्रहार ॥ योग्य होईल सोसावया ॥ ११ ॥ तंव बोले [3]राधेयकुमर ॥ तुह्मीं त्यासी केला परम उपकार ॥ शोषूनियां पापसागर ॥ दिलें मंदिर मुक्तीचें ॥ १२ ॥ सदा द्वेष करी धर्माचा ॥ आणि भृत्य जाहला दुर्योधनाचा ॥ जरी दानशूर जाहला साचा ॥ परी कृष्णविन्मुख दान निष्फळ ॥ १३ ॥ दान दिधलें कनकाचळ ॥ कीं आटविलें सिंधुजळ ॥ परी [7]चित्तांबुजीं नसतां गोपाळ ॥ सर्वही विफळ तयाचें ॥ १४ ॥ द्रुपदरायाची नंदिनी ॥ त्रिभुवनजनकाची भगिनी ॥ ती आणोनि सभास्थानीं ॥ करवी नग्न परहस्तें ॥ १५ ॥ विराटाचें केलें गोग्रहण ॥ कृष्णासी चिंतिलें बंधन ॥ त्याचे आज्ञेंकरूनि वर्ते आपण ॥ दुर्योधन दुरात्मा ॥ १६ ॥ ऐसा पापोदधि भरला ॥ भाग्यें पार्थकुंभसुत भेटला ॥ क्षण न लगतांचि तो प्राशिला ॥ वेगीं नेला निजपदा ॥ १७ ॥ कांहीं त्याची न करावी खंती ॥ तो उपकार मी मानितों चित्तीं ॥ चंचळ जीवित्व हरोनि निश्चितीं ॥ निजसदनाप्रति तो गेला ॥ १८ ॥ हिरोनि घेतला काचमणी ॥ हातीं दिधला चिंतामणी ॥ [9]कनकतरु उपडोनि आंगणीं ॥ लाविला बळें [10]सुरतरू ॥ १९ ॥ जो करीत होता कांजी प्राशन ॥ त्यातें करविलें [11]सुधारसपान ॥ तो अपकार कीं उपकार पूर्ण ॥ तूंचि मनीं विचारीं ॥ २० ॥ अपकीर्ति कांहीं असे उरली ॥ ती मी हरीन युद्धकाळीं ॥ कांहीं पुत्रपणाची [12]ओजें भली ॥ केली पाहिजे स्वामिया ॥ २१ ॥ ऐसें

---

१ भीमा. २ शल्यारि–धर्म आहे अग्रज ज्याचा अशा ( भीमास ). ३ वृषकेतु. ४ रामानें. ५ लक्ष्मण. ६ कमळ. ७ अंतःकरणरूप कमलांत. ८ कृष्णाची. ९ धोत्र्याचें झाड. १० कल्पवृक्ष. ११ अमृतप्राशन. १२ रीत.

जै० अ० ॥ १ ॥

ऐकोनियां वचन ॥ मनीं संतोषला भीमसेन ॥ आवडीं देऊनियां आलिंगन ॥ करी चुंबन मुखाचें ॥ २२ ॥ प्रसन्न पाहे वदनेंदु ॥ भीमासी जाहला परम आल्हादु ॥ भारें दाटला सौख्यसिंधु ॥ भला भला ह्मणतसे ॥ २३ ॥ ऐकोनि धर्म टाकी अश्रुपात ॥ ह्मणे बाळपणीं काय बोले वाक्यार्थ ॥ यासी सर्वदा श्रीअनंत ॥ रक्षो माझा प्राण हा ॥ २४ ॥ भीम ह्मणे रांधेयनंदना ॥ चाल समागमें बळगहना ॥ पुरवूं धर्माची वासना ॥ अश्वरत्न आणोनी ॥ २५ ॥ बकारि बोले पुत्रनंदना ॥ तुवां रक्षावें धर्मसदना ॥ आणि सेवावें अर्जुना ॥ नगररक्षण करावें ॥ २६ ॥ मेघवर्ण ह्मणे जनकजनका ॥ वीरभूषणा कुरुकुळटिळका ॥ कां उपेक्षिलें मज बाळका ॥ सर्वें न्यावें स्वामिया ॥ २७ ॥ घेटीं[2] जन्मला जो अगस्ती ॥ तेणें सर्व गिळिला सरितापती[3] ॥ तरी तो कुंभगुण नव्हे महामती ॥ रेतगुण जाणावा ॥ २८ ॥ तेवीं हीन माझी जन्मभूमी ॥ परी बीज असे समर्थ तुह्मी ॥ यास्तव मीही पराक्रम संग्रामीं ॥ करीन वंशासारिखा ॥ २९ ॥ मी होईन अश्वहर्ता ॥ कर्णकुमर संग्रामकर्ता ॥ तूं होय गा कौतुक पाहता ॥ आह्मां उभयतां बाळकांचें ॥ ३० ॥ वायुनंदन ह्मणे मेघवर्णा ॥ तुज पाहतां येतसे करुणा ॥ तुझ्या पित्याचे उपकार नाना ॥ काय ह्मणोनी आठविजे ॥ ३१ ॥ कष्टत होतों वनांतरीं ॥ तेव्हां साह्य जाहला परोपरी ॥ शेवटीं ख्याती करूनि समरीं ॥ प्राण वेंचिला धर्मकाजीं ॥ ३२ ॥ मग बोले राक्षसकुळनायक ॥ तव वीर्योद्भव माझा जनक ॥ तेणें केलें जें कौतुक ॥ मज सर्वथा नाठवे ॥ ३३ ॥ जेवीं पंचाननाचे बाळें ॥ जरी विदारिलीं गजकुंभस्थळें ॥ तरी त्याचें काय नवल जाहलें ॥ तयाचें कर्म तें स्वाभाविक ॥ ३४ ॥ अल्पही अग्निस्फुलिंग[4] जाण ॥ तरी तो जाळी अपार तृण ॥ तयाचें आश्चर्य न मानिती जन ॥ स्वाभाविक गुण तो त्याचा ॥ ३५ ॥ जरी शृगालांचा[5] कुमर ॥ बळें मारी मत्त कुंजर[6] ॥ तयाचें परी आश्चर्य थोर ॥ चतुर लोकीं मानावें ॥ ३६ ॥ तोंपावेतों हीन थिल्लरजळ[7] ॥ जों तें मिळालें नाहीं जाह्नवीजळ[8] ॥ तें पावलिया तत्काळ ॥ त्रिदश[9] मौळीं[10] वंदिती ॥ ३७ ॥ लोह स्पर्शतां परिसाचें आंग ॥ तेव्हांच लोहत्वाचा फिटे पांगें[11] ॥ तेवीं होतांचि सत्संग ॥ नुरेच दुर्जनत्व ते ठायीं ॥ ३८ ॥ तेवीं आमची हीन जाती ॥ परी समर्थें अंगीकारिली निश्चितीं ॥ ह्मणोनि त्रिभुवनीं जाहली कीर्ती ॥ तुमचे वीर्यप्रतापें ॥ ३९ ॥ ऐसी पुत्रपुत्राची[12] बोली ॥ श्रवणद्वारें हृदयीं भरली ॥ तों बळद्रुमें वाढी घेतली ॥ पल्लव फुटले लसलसित ॥ ४० ॥ तिघीं जावें हा निश्चय केला ॥ तंव धर्म ह्मणे वृकोदराला ॥ व्यास उद्योग करितो गमनाला ॥ तरी त्यासी मार्गस्थ पैं कीजे ॥ ४१ ॥ धर्में केलें चरणक्षालन ॥ यथोक्त भावें केलें पूजन ॥ देऊनि रायासी आशीर्वचन ॥ गेला बादरायण[13] स्वस्थानीं ॥ ४२ ॥ द्वैपायनें[13] गेलियावरी ॥ धर्मनंदन

अ० २ ॥ १ ॥

---

१ वृषकेतो. २ घागरींत. ३ समुद्र. ४ विस्तवाची ठिणगी. ५ कोल्ह्याचा. ६ हत्ती. ७ डबक्याचें पाणी. ८ गंगाजळ. ९ देव. १० मस्तकीं. ११ हीनत्व ( लोहपणा ). १२ मेघवर्णाची. १३ व्यास.

चिंता करी ॥ याग साध्य नव्हे मज निर्धारीं ॥ कैसा झालों संकल्पबद्ध कीं ॥ ४३ ॥ सर्व संकटीं आह्मांसी तारी ॥ तो तों द्वार केमाजी मुरारी ॥ तयावीण हा याग निर्धारीं ॥ कैसा सिद्धी पावेल ॥ ४४ ॥ मग स्मरे यादवकुळकेसरी ॥ जो भक्तजनकाज-कैवारी ॥ धांव धांव गा श्रीहरी ॥ ये अवसरीं यदुराया ॥ ४५ ॥ जेवीं कौरवसागरीं तुझी भगिनी ॥ बुडत होती द्रुपदनंदिनी ॥ स्मरणमात्रें शीघ्र धांवोनी ॥ वस्त्रदानें तारिली ॥ ४६ ॥ तेवीं कौरववधदोषसागरीं ॥ बुडत आहें सपरिवारीं ॥ शीघ्र येऊनि काढीं बाहेरी ॥ करालंबन[1] देउनी ॥ ४७ ॥ ऐसा धर्ममुखयंत्रींचा शब्दगोळ ॥ तेणें लक्ष विंधिलें हरिकर्णबीळ ॥ तत्काळ उठोनियां गोपाळ ॥ कलत्रशयनादि टाकिलें ॥ ४८ ॥ तंव घाबरी झाली आदिशक्ती ॥ ह्मणे ही कोठें चालिली आदिमूर्ती ॥ कोण भक्त पडिला चिंतावर्ती ॥ त्याचे स्तुतिस्तोत्रें ओढिला ॥ ४९ ॥ त्वरें चरणचाली वनमाळी ॥ तंव चंद्ररमणी[2] तारुण्य पावली ॥ सत्वर येऊनि मूर्ति सांवळी ॥ उभी ठेली महाद्वारीं ॥ ५० ॥ द्वारीं उभा ठाकोनि गोपाळ ॥ स्वयें बोधित केला द्वारपाळ ॥ ह्मणे त्वरें जाणवीं भूपाळ ॥ द्वारीं उभा कृष्ण असे ॥ ५१ ॥ भक्तकार्या धांवोनि आला ॥ ही तों अवघी अवतारलीला ॥ येणें जाणें नाहीं व्यापकाला ॥ जेथिंचा तेथें प्रगटतो ॥ ५२ ॥ जेवीं गगन सर्वत्र असे ॥ कीं वायु सर्वत्रगत होऊनि वसे ॥ तेवीं सर्वात्मा चराचरीं असे ॥ येणें जाणें त्या नाहीं ॥ ५३ ॥ तरी भक्तकाजा धांवोनि आला ॥ ही दाखविली अवतारलीला ॥ सद्भक्तमहिमा वाढ-विला ॥ जगदुद्धारालागोनी ॥ ५४ ॥ जे अनेक योगयाग साधिती ॥ तयांसी भेट न होय कल्पांतीं ॥ तो द्वारपाळें देखिला एकांतीं ॥ जाहला चित्तीं स्वानंद ॥ ५५ ॥ नेणवे भाग्य द्वारपाळाचें ॥ जें रूप देखिलें श्रीहरीचें ॥ सार्थक जाहलें जन्माचें ॥ जन्ममरणांचें भय गेलें ॥ ५६ ॥ पीतांबरधारी चतुर्भुज ॥ मेघश्याम दीर्घनेत्रांबुज ॥ कर्णीं कुंडलांचें फांके तेज ॥ कोटी दिवाकर लोपती ॥ ५७ ॥ सुहास्य सुनासिक विशाळ भाळ ॥ आपाद रुळे वैजयंतीमाळ ॥ कंठीं कौस्तुभाचा झळाळ ॥ शोभे वक्षस्थळीं द्विजपद[3] ॥ ५८ ॥ चरणीं धांवतां श्रीनिवास ॥ पोटीं न मावती श्वासोच्छ्वास ॥ मंदता आली नेत्रकमळांस ॥ अपूर्ण निद्रा ह्मण-वोनी ॥ ५९ ॥ तंव जोडूनियां करकमळें ॥ हरिपदांबुजें नमिलीं द्वारपाळें ॥ ह्मणे कोटी जन्मांचें सार्थक जाहलें ॥ देखिलें पदयुग स्वामीचें ॥ ६० ॥ द्वारपाळ ह्मणे जी मुरारी ॥ वेगें प्रवेशावें धर्ममंदिरीं ॥ तो तुझेच चिंतनागारीं ॥ सर्वदा असे स्वामिया ॥ ६१ ॥ वेळावेळ धर्ममंदिरीं ॥ तुज नाहीं जी मुरारी ॥ दर्शन देऊन झडकरी ॥ मनोरथ करीं पूर्ण त्याचा ॥ ६२ ॥ विश्वासघातकी परम खळ ॥ भक्षिती परनिंदाविष्ठाफळ ॥ कुकर्मी परदाररतशीळ ॥ तेथें प्रवेश नसे तुझा ॥ ६३ ॥ हा तंव अति धर्मशीळ ॥ तुझ्या चरणारविंदाचा[5] परिमळ ॥ सेवून असे सर्वकाळ ॥ ह्मणोनि सत्वर भेटावें ॥ ६४ ॥ मग तयासी ह्मणे श्रीपती ॥ समर्थीं

१ हाताचा आधार. २ रात्र. ३ श्रीवत्सलांच्छन. ४ कृष्णा. ५ चरणकमलाचा.

पहावा नरपती ॥ ऐसी आहे राजनीती ॥ ह्मणोनि सत्वर जाणवीं ॥ ६५ ॥ रूपद्वय शोभे नृपवर ॥ एक भीम एक मनोहर ॥ जेवीं सिंधुजळीं जळचरें थोर ॥ आणि रत्नें सुंदर दिसती पैं ॥ ६६ ॥ नातरी उष्णकाळींचा तपन ॥ सेवितां सर्वांग करी दहन ॥ तोचि शीतकाळीं सेवितां जाण ॥ होय सुखकर शरीरासी ॥ ६७ ॥ तेवीं समयीं सेवावा नरपती ॥ ऐसी तंव आहे राजनीती ॥ त्यां नृपासी ह्मणावें श्रीपती ॥ आज्ञा इच्छितो प्रवेशार्थ ॥ ६८ ॥ मग धांवोनि गेला प्रतीहारक ॥ त्वरें विनविला कुरुनायक ॥ ह्मणे द्वारीं उभा यदुनायक ॥ आज्ञा इच्छितो स्वामीची ॥ ६९ ॥ धर्म ह्मणे अनुजाला ॥ हा काय अमृतवचन बोलिला ॥ मध्यरात्रीं देवराय पातला ॥ आमचें दुःख हरावया ॥ ७० ॥ सत्वर उठा अवघे आतां ॥ भावें भेटूं त्या प्राणनाथा ॥ तंव पांचही धांवले त्वरितां ॥ जीवीं अच्युता मिळावया ॥ ७१ ॥ तंव तेज फांकलेंसे महाद्वारीं ॥ तेणें प्रकाशिली सर्व नगरी ॥ दीपिका होत्या जयांचे करीं ॥ लोपोनि गेल्या त्या सर्व ॥ ७२ ॥ धांव घेऊन इंदिरारमण ॥ साष्टांगें नमिला कुंतीनंदन ॥ प्रेमें दिधलें आलिंगन ॥ देवभक्तपण मुराले ॥ ७३ ॥ वेदाध्ययनीं नातुडे ॥ योगयागतपीं न सांपडे ॥ दानीं व्रतीं जपीं जो नातुडे ॥ तो नृपभुजांतरीं सांपडला ॥ ७४ ॥ धांवोनि भीमें दिधलें आलिंगन ॥ पार्थें नमिले देवचरण ॥ नकुळसहदेवें केलें नमन ॥ दिधलें क्षेम प्रीतीनें ॥ ७५ ॥ जेथें पांचांचा रहिवास ॥ तेथें न राहेच श्रीनिवास ॥ हें तों आश्चर्य वाटे चित्तास ॥ पांचांमाजी हरि क्रीडे ॥ ७६ ॥ कृष्ण घेऊनि आले पांचहीजण ॥ तों कुंती द्रौपदी आली धांवोन ॥ वंदोनि कुंतीस दिधलें आलिंगन ॥ द्रौपदीनें हरि वंदिला ॥ ७७ ॥ सिंहासनीं बैसवूनि मूर्ती ॥ भावें षोडशोपचारें पूजिती ॥ आपादमस्तकादि मूर्ति अवलोकिती ॥ आश्चर्य करिती ते काळीं ॥ ७८ ॥ द्रुपदात्मजा ह्मणे धरणीपती ॥ मध्यरात्रीं आला श्रीपती ॥ ह्मणोनि आश्चर्य करितां चित्तीं ॥ तरी हेंच काय नवल याचें ॥ ७९ ॥ दुष्ट क्रोधावतार मुनी ॥ छळणासी पाठविला जी वनीं ॥ तेव्हां म्यां चिंतिला चक्रपाणी ॥ धांवोनि लज्जा रक्षिली ॥ ८० ॥ एकवस्त्रा आणि ऋतुमती ॥ दुष्टें आणिली सभेप्रती ॥ वस्त्रें हरविलीं कौरवें अपकीर्ती ॥ तंव म्यां श्रीपति चिंतिला ॥ ८१ ॥ स्मरणमात्रें घातली उडी ॥ देव नेसविता जाहला लुगडीं ॥ लाजसमुद्राचे पैलथडी ॥ मज पाठविली दयाळें ॥ ८२ ॥ तरी प्राणपति तुझें जन्मार्जित ॥ नेणवे ब्रह्मादिकां किंचित ॥ स्मरतांचि पावतो हा अनंत ॥ सर्व संकट हरावया ॥ ८३ ॥ धर्म ह्मणे जी यदुराया ॥ मी चिंतित असें तुझिया पायां ॥ गोत्रवधाग्नि जाळितो काया ॥ तो भलत्या उपायानें निवविजे ॥ ८४ ॥ व्यासें तो अश्वमेध सांगितला ॥ भीममतें संकल्प केला ॥ परी तो असाध्य मज वाटला ॥ मग मीं चिंतिलें तुज देवा ॥ ८५ ॥ तूं सर्वांचें अंतरंग जाणसी ॥ स्मरतांच वेगें पावसी ॥ आतां कळेल तें हृषीकेशी ॥ करीं सत्वर स्वामिया ॥ ८६ ॥ ह्मणोनि केलें

१ सूर्य. २ श्रीकृष्ण. ३ भीमाला. ४ कृष्ण. ५ धर्म. ६ नाहींसें झालें. ७ हातीं लागत नाहीं. ८ दुर्वास.

दंडवत ॥ धर्म श्रीकृष्णाचे चरण न्याहाळित ॥ तंव तो हरि सर्वज्ञनाथ ॥ बोले किंचित विनोदें ॥ ८७ ॥ भीम विनोदवचनीं दक्ष ॥ ह्मणोनि ठेवी त्यावरी कटाक्ष ॥ विनोदें गर्भभक्तामरवृक्ष ॥ काय बोले धर्मातें ॥ ८८ ॥ धर्मा तुवां भीम केला प्रधान ॥ तरी याग सिद्धि पावलाचि जाण ॥ मी निश्चिंत जाहलों येथून ॥ माझा भार घेतला भीमें ॥ ८९ ॥ शास्त्रींचा आहे ऐसा प्रकार ॥ त्या पुरुषांचा नायकावा विचार ॥ ते कोण ह्मणसी तरी सविस्तर ॥ सांगेन सर्व ऐकावें ॥ ९० ॥ जो खादाड आणि स्थूलोदर ॥ जो अवर्णस्त्रियेचा करी स्वीकार ॥ जो श्वशुरगृहीं राहे निरंतर ॥ तयाचा विचार नायकावा ॥ ९१ ॥ आणि जो रमतसे कुयोनीं ॥ जो कामिनीजित असेल मेदिनीं ॥ तयाची नायकावी वाणी ॥ ऐकिल्या हानी रोकडी ॥ ९२ ॥ भीम सांगतो तुज बुद्धी ॥ तूंही वर्तसी तैसाच त्रिशुद्धी ॥ तरी याग पावलाच सिद्धी ॥ येथें संदेह तो काय ॥ ९३ ॥ भीम जाणतो काय जरासंध ॥ येणें हेडिंबबकांसीं करावें युद्ध ॥ भूतळीं राजे आहेत प्रसिद्ध ॥ अगाध बळसमुद्रींचे ॥ ९४ ॥ ऐकतां पंचाननाचें गर्जन ॥ अति मदोन्मत्त गज पळे उठोन ॥ तीच गति पावेल भीमसेन ॥ अपार नृपसैन्य देखतांचि ॥ ९५ ॥ दुर्योधनसैन्य हें सरोवर ॥ क्लेशें तरला हा वृकोदर ॥ त्या बळें तरेन ह्मणे नृपसागर ॥ जेवीं उंच फळातें वामन ॥ ९६ ॥ यौवनाश्वराजा काळासमान ॥ तयासी जिंकोनि आणावा श्यामकर्ण ॥ तो सोडावा प्रदक्षिणेलागून ॥ या सप्तद्वीपावरी ॥ ९७ ॥ तो सर्वत्र करील गमन ॥ तयासी जो धरील बलवान ॥ त्यासी युद्धीं जिंकोन ॥ अश्व बळें सोडवावा ॥ ९८ ॥ दीक्षित यजमानें बरवें ॥ असिपत्रव्रत हें करावें ॥ जरी कामांकुर उद्भवे स्वभावें ॥ तरी छेदावें स्वशिरातें ॥ ९९ ॥ सीतावरें हयमेध आरंभिला ॥ अश्व प्रदक्षिणेलागीं सोडिला ॥ सवें हनुमंत तो पाठविला ॥ अश्वरक्षणालागोनी ॥ १०० ॥ लवांकुशें अश्व धरूनि नेला ॥ हनुमंतही बंदीं घातला ॥ शेवटीं परम श्रमें सोडविला ॥ जाऊनि रामचंद्रें यजमानें ॥ १ ॥ आतां तरी अपार नृपती ॥ बलाढ्य आहेत या क्षितीं ॥ जे कळिकाळातें जिंकिती ॥ तेथें भीम किती बापुडें ॥ २ ॥ जे भक्तिजळाचे सागर ॥ प्रतापें जिंकिती दिनकर ॥ उदारपणें जिंकिती जलधर ॥ जे कां निर्मळ मनाचे ॥ ३ ॥ ऐसिया रायांतें जिंकावें ॥ मग श्यामकर्णातें सोडवावें ॥ मग यागकर्म करावें ॥ तेणें हरावी गोत्रहत्या ॥ ४ ॥ ऐसें अवघें असाध्य विचारितां ॥ मज तों बरवें न दिसे आतां ॥ तुज काय ह्मणावें नृपनाथा ॥ या भीमवचना भुललासी ॥ ५ ॥ असाच विचार न करितां अर्जुन ॥ जयद्रथवधीं घातला पण ॥ तैं मज संकट पडलें दारुण ॥ तो कपटविद्येनें मारिला ॥ ६ ॥ तोचि विचार आतां घडला ॥ बळें नेणोनि संकल्प करविला ॥ धर्मराय संकटीं घातला ॥ आपण राहिला उगाची ॥ ७ ॥ जेवीं अप्रौढ कर्णधार ॥ नौका चालवी नेणोनि पूर ॥ मग जळीं बुडतां सकळ नर ॥ चित्तीं कासावीस होतसे ॥ ८ ॥

---

१ येथें 'विनोदगर्भ' असें एक पद घेतल्यास बरा अर्थ लागेल. २ कृष्ण. ३ ठेंगणा. ४ पृथ्वीवर. ५ मेघ. ६ नावाडी.

वरें जें आलें ईश्वराच्या चित्ता ॥ तें कोण निवारूं शके आतां ॥ ललाटीं लिहितो जें विधाता[1] ॥ तें सर्वथा न चुकेची ॥ ९ ॥ ऐसें [2]रमावदनेंदुचकोरें ॥ स्नेहविनोदें बोलिलीं उत्तरें ॥ हें परिसोनि भीम चतुरें ॥ काय प्रत्युत्तर वदेल ॥ ११० ॥ धान्यांकुर सुकतां सृष्टीं ॥ जेवीं [3]कृषीवल इच्छी जलवृष्टी ॥ तेवीं भीमवचनाची पुष्टी ॥ स्वयें जगजेठी वांच्छित ॥ ११ ॥ तें पुढले प्रसंगीं निरूपण ॥ रसाळ आहे अमृतासमान ॥ तेंचि ऐकावें सावधान ॥ श्रीधर ह्मणे श्रोतयां ॥ १२ ॥ जैमिनिअश्वमेधकथामृत ॥ जीवित्व घेऊनि अमर करीत ॥ जन्ममरणातें निरसित ॥ ही प्रचीत[4] श्रीधरासी असे ॥ ११३ ॥ ॥ इति श्रीमन्महाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते द्वितीयोध्यायः ॥ २ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणस्तु ॥ ॥ शुभं भवतु ॥ ॥ अध्याय ॥ २ ॥ ॥ ओव्या ॥ ११३ ॥ ॥

१ ब्रह्मदेव. २ कृष्णानें. ३ शेतकरी. ४ अनुभव.

श्रीगणेशाय नमः ॥ [1]रमाजनकवलयांकितधरेश ॥ जो जनमेजय गुणाधीश ॥ नमूनियां जैमिनीचे चरणांस ॥ काय प्रश्न करीतसे ॥ १ ॥ ह्मणे क्षिति[2]सुरकुळटिळका ॥ हरिकथामृतबला[3]हका ॥ माझ्या कर्णयुगुलचातका ॥ वचनामृतें तृप्त करीं ॥ २ ॥ हरिकथामृतरसनिर्मलांतर ॥ माझा प्रपितामह वायुकुमर ॥ रमावल्लभाप्रति उत्तर ॥ काय बोलिला तें सांग ॥ ३ ॥ जैमिनि ह्मणे जनमेजया ॥ ऐक राया गुणनिलया ॥ पूर्वजकथाजह्नुतनया ॥ ने हृदयालया कर्णविवरें ॥ ४ ॥ मग देवाप्रति बोले भीमसेन ॥ आपुले गुण माझ्या मुखेंकरून ॥ ऐकावे सकळ ह्मणोन ॥ रायाप्रति वचन बोलिलासी ॥ ५ ॥ माझ्या मुखें लागती गोड ॥ आन बोलती धरून भीड ॥ तरी मी भाट होऊनि घडघड ॥ निःशंक बोलेन तुजपुढें ॥ ६ ॥ जे जे गुण वदलासी पाहीं ॥ ते सर्वही दिसती तुझे ठायीं ॥ तें ऐकावया लवलाही ॥ सावध होईं माधवा ॥ ७ ॥ अंतरीं करितां विचार ॥ तुजहून खादाड नसे थोर ॥ क्षुधाकाळीं अवघें चराचर ॥ खाऊन उपवासी ह्मणविसी ॥ ८ ॥ ब्रह्मादिक करून तृणवत ॥ क्षण न लागतां दाढेसी रगडित ॥ शेवटीं आपणातेंही भक्षित ॥ अभिनव खादाड देखिलासे ॥ ९ ॥ देवा तुजहूनि स्थूलोदर ॥ त्रिभुवनीं नाहींच निर्धार ॥ जेवीं कुंजरोदरीं पडे तीळचूर ॥ तेवीं ब्रह्मांडकोटी तव उदरीं ॥ १० ॥ एवढें पोट तुझें अपरिमित ॥ माय देवकी कैशानीं भरित ॥ हें मज कौतुक वाटे अद्भुत ॥ ऐकोनि अनंत हांसतसे ॥ ११ ॥ पाहतां गुणलावण्याची खाणी ॥ अनुकूल असतां सती रुक्मिणी ॥ तुवां परिणिली [4]ऋक्षनंदिनी ॥ ऐसा अवगुणी तूं एक ॥ १२ ॥ एकांतीं रमतां तयेसीं ॥ जरी तुज भय वाटेल हृषीकेशी ॥ तें भय परिहरावयासी ॥ स्मरे मानसीं धर्मराया ॥ १३ ॥ जगविख्यात तुझा श्वशुर ॥ नामें प्रसिद्ध क्षीरसागर ॥ तेथें वास तुझा निरंतर ॥ गृहजामात जाहलासी ॥ १४ ॥ बलाढ्य आपणातें ह्मणविसी ॥ संकटीं त्यातें सोडविसी ॥ [5]कुंभोद्भव आला ग्रासावयासी ॥ तेव्हां कां त्यासी न मारिलें ॥ १५ ॥ तुजसारिखा स्त्रीजित ॥ मज न दिसे ब्रह्मांडांत ॥ भामावचनें आणिला पारिजात ॥ वडील[6] बंधू जिंकोनी ॥ १६ ॥ न धरसी लौकिकलाज ॥ थोरपणाचें करिसी राज्य ॥ देवा काय ह्मणावें तुज ॥ बोलतां लाज मज वाटे ॥ १७ ॥ तूं पूर्वीं जाहलासी वामन ॥ ह्मणोनि वक्र बोलिलासी वचन ॥ बळिद्वारीं याचकवृत्ती करून ॥ बहु संभाषण शिकलासी ॥ १८ ॥ अन्य योनींमाजी तूंचि रमसी ॥ मत्स्य कच्छ वराह होसी ॥ शेवटीं शुष्ककाष्ठीं गुरगुरसी ॥ नरनारसिंह होउनी ॥ १९ ॥ तुजसारिखा नसे निर्दय ॥ स्वहस्तें मारिली निजमा[7]य ॥ एकवीस वेळां मारिले क्षत्रिय ॥ ऐसा निर्दय कोण कृष्णा ॥ २० ॥ मायबाप सांडून सेविसी वन ॥ सीते सीते ह्मणोनि करिसी रुदन ॥ शेवटीं वानरां गेलासी शरण ॥ ऐसें थोरपण पैं तुझें ॥ २१ ॥ गोकुळीं जाहलासी गोपबाळ ॥ स्वानंदें चारिसी गोमेळ ॥ भक्षिसी गोपाळांचें अन्न सकळ ॥ ऐसा अप्रमाण तूं हरी ॥ २२ ॥ तुवां धरूनि रूप-

---

१ समुद्रानें वेष्टित अशा पृथ्वीचा पति. २ ब्राह्मणश्रेष्ठा. ३ हरिकथामृताचा वर्षाव करणाऱ्या मेघा. ४ जांबवती. ५ अगस्तिऋषि. ६ इंद्र. ७ रेणुका.

मोहिनी ॥ मनीं मोहिली असुरश्रेणी ॥ शेवटीं विरोचनाची स्त्री होउनी ॥ गृहाचार त्या केला ॥ २३ ॥ ऐसे तुझे गुणागुण ॥ घेतां लाजला सहस्रवदन ॥ तेथें मी काय अल्प एकवदन ॥ समर्थ होईन वदावया ॥ २४ ॥ ऐसे ऐकावे आपुले गुण ॥ ह्मणोनि बोलिलासी मज पाहून ॥ आन बोलती भीड धरून॥मी निःशंक दास तुझा॥२५॥ तुझा ऐकतां बुद्धिविचार॥ निर्मूळ होय सर्व संसार ॥ सर्व कामाचा होय संहार ॥ ह्मणोनि कोणी न ऐकती ॥ २६ ॥ जेणें जातीकुळावेगळें व्हावें ॥ तेणें तुझें वचन ऐकावें ॥ शेवटीं आपणही मुकावें ॥ ऐसें करावें कां स्वामिया ॥ २७ ॥ भीष्में ऐकिलें तुझें वचन ॥ तयाचें झालें निसंतान ॥ ध्रुवें करितां तुझें चिंतन ॥ तो ठेविला नेऊन अंतरिक्ष ॥ २८ ॥ नारदें तुज धरितां पोटीं ॥ तुवां तयासी लाविली लंगोटी ॥ ऐशा तुझ्या सांगतां गोष्टी ॥ अपार जगजेठी सांगवेना ॥ २९ ॥ धर्में भय हरावया चिंतिलासी ॥ येऊन तुवां विशेष केलें त्यासी ॥ विवेक त्याचे भेडसाविसी ॥ करिशी नाश कर्मांचा ॥ ३० ॥ मी जाहलों धर्मप्रधान ॥ हें कृष्णा तुझेंच महिमान ॥ म्यांच संकल्प करविला जाण ॥ तुझे चरण स्मरोनियां ॥ ३१ ॥ तुझें करिती जे स्मरण ॥ तयां सर्व विघ्नें होती निर्विघ्न ॥ आणि तुझेनि तुटे जन्ममरण ॥ ऐसें वेदपुराणें बोलती ॥ ३२ ॥ आह्मी जिवलग दास जाण ॥ आणि सखे बोलती सर्व जन ॥ ऐशातें चिंतिल्या जरी नव्हे पूर्ण ॥ तरी श्रुति पुराणें बुडालीं कीं ॥ ३३ ॥ आमुचें चिंतिलें जरी न होईल ॥ तरी सत्य कोण मानील श्रुतीचे बोल ॥ ऐसें ऐकतां तमालनील ॥ हांसे खदखदां स्वानंदें ॥ ३४ ॥ तुझ्या नामाचें धरूनि बळ ॥ सगळाचि मुखीं घालीन काळ ॥ तुवां सांगितले जे नृपाळ ॥ त्या मशकांतें कोण गणी ॥ ३५ ॥ ही धरा घालीन पालथी ॥ पाताळ टाकीन व्योमपंथीं ॥ अभिमानवस्त्राची बुंथी ॥ काढून टाकीन सर्वांची ॥ ३६ ॥ मी बळें अश्वमेध करवीन ॥ धर्मास अवभृथस्नान घालीन ॥ तुझ्या वचनासी उणीव आणीन ॥ तेव्हां तुज देईन स्मरणातें ॥ ३७ ॥ तूं माझे अंतर्गृहीं जाण ॥ निश्चित राहें येथून ॥ नामसाह्य देईं मजलागून ॥ तेणें होती सकळ सिद्धी ॥३८॥ तुझें लटिकें करावें महिमान ॥ हें आमचे वंशीं आहे जाण॥ आयुध न धरीं हा तुझा पण ॥ भीष्में केला लटिका तो ॥ ३९ ॥ तयाचा नातू मी महाहट्टी ॥ आणि तुझा दास जी जगजेठी ॥ तुज लटिकें करावयाची हातवटी ॥ मज बरवी सांपडली ॥ ४० ॥ ऐसें जंव जंव बोले भीमसेन ॥ तंव तंव उल्हासे जनार्दन ॥ जैसा देखतां निशारमण ॥ उचंबळे महोदधी ॥ ४१ ॥ अनंत ब्रह्मांडांच्या कोटी ॥ उदरीं वसतां न होय दाटी ॥ भीमवचनानंद त्या पोटीं ॥ न माय हर्ष उचंबळला ॥ ४२ ॥ देवें धांवोनियां भीमसेना ॥ अनंत हस्तें देत आलिंगना ॥ प्रेमाश्रूंचिया जीवना ॥ त्या भक्तनिधाना न्हाणिलें ॥ ४३ ॥ देवाची आवडी कैसी ॥ चुंबूं पाहे भीममुखासी ॥ हें जन्मस्थान शब्दसुधेसी ॥ तें अमृतपान करूं इच्छी ॥ ४४ ॥ ऐसा देवभक्तांचा सोहळा ॥



---

१ राक्षससमुदाय. २ वेद. ३ श्रीकृष्ण. ४ आकाशमार्गे. ५ प्रावरण. ६ चंद्र.

यातें कोण वर्णील भूपाळा ॥ उसळती प्रेमतरंगमाळा ॥ देवभक्तपण तेथें नाहीं ॥ ४५ ॥ देव ह्मणे भीमा सावधान ॥ यज्ञ होईल निर्विघ्न जाण ॥ आतां तूं शीघ्र करीं प्रयाण ॥ अश्वरत्नाकारणें ॥ ४६ ॥ तंव भीम ह्मणे देवाधिदेवा ॥ ऐसा कांहीं बोल बोलावा ॥ धर्मराज सुखी करावा ॥ अभयदान देऊनियां ॥ ४७ ॥ ऐसें चिंतीत होता धर्मनंदन ॥ कृष्ण येवोनि काम करील पूर्ण ॥ तुवां तरी शीघ्र येऊन ॥ घातलें दारुण भय पोटीं ॥ ४८ ॥ बहुत काळ तृषाक्रांत चातक ॥ होता ऊर्ध्व करूनियां मुख ॥ तों भाग्यें पातला बलाहक[१] ॥ तो मुखीं खदिरांगार वर्षला ॥ ४९ ॥ पंकीं निमग्न जाहलिया गाय ॥ ती आपुल्या धन्याची वाट पाहे ॥ तंव तो येऊनि बुडवूं पाहे ॥ तिणें कवणासी सांगावें ॥ ५० ॥ पुरीं वाहवतां प्राणियासी ॥ तो धांवत्यांसी काढा ह्मणे तीरस्थांसी ॥ त्यांहीं येऊन बुडवितां त्यासी ॥ त्याणें कोणा पाचारावें ॥ ५१ ॥ स्वकर्मे जो पांगुळ नर ॥ कष्टें वेंघलों पर्वतशिखर ॥ त्यासी ढकलोनि देतां सत्वर ॥ मग तयाचा उपाय कायसा ॥ ५२ ॥ तेवीं तूं आमुची आधारभूमी ॥ तुवां उपेक्षितां केवीं वांचूं आह्मी ॥ ऐसें ऐकतां जैल-धिजास्वामी ॥ प्रेमें धर्मासी बोलत ॥ ५३ ॥ धर्मासी ह्मणे यदुनंदन ॥ पापक्षालनार्थ करिसी यज्ञ ॥ तें पाप माझ्या करीं अर्पून ॥ निष्पाप होवोनि सुखी असा ॥ ५४ ॥ तंव भीम ह्मणे अनंतातें ॥ तूं काय ठकविसी रायातें ॥ परी हा असे सावध चित्तें ॥ तेथें ठकविणें न चाले ॥ ५५ ॥ तुझे करीं जें अर्पावें ॥ तें अनंतगुणें पावावें ॥ हें कार्य धर्मासी नाहीं ठावें ॥ कैसा अर्पील तव हस्तीं ॥ ५६ ॥ तरी सांग अश्वमेधसंपादन ॥ तयाचें प्राप्त जें होईल पुण्य ॥ तें तुझिया करीं समर्पून ॥ धर्मराज सुखी होईल ॥ ५७ ॥ धर्मास नाहीं सुकृतफळाशा ॥ हें तूं जाणसी हृषीकेशा ॥ त्वत्प्रीत्यर्थ हा याग रमेशा ॥ ऐसा निश्चय धर्माचा ॥ ५८ ॥ देव प्रसन्नसा जाणोन ॥ धर्म पावला समाधान ॥ मग समारंभेंकरून भोजन ॥ सुखशयन करीत देव ॥ ५९ ॥ प्रातःकाळीं उठोन जाण ॥ भीम कर्णनंदन मेघवर्ण ॥ कुंती आणि यदुनंदन ॥ करिती वंदन अनुक्रमें ॥ ६० ॥ कुंती सिद्धमोदक भीमास देत ॥ घेऊन अर्जुनासी असे बोलत ॥ विजय अश्व घेऊनि क्षेमवंत ॥ आलों ऐसें जाणावें ॥ ६१ ॥ केशव दिसतो सुप्रसन्न ॥ संतुष्ट असे माझें मन ॥ साह्य दोघे हर्षायमान ॥ हेंचि लक्षण सिद्धीचें ॥ ६२ ॥ तुवां करावें धर्मपाळण ॥ आणि करावें द्विजरक्षण ॥ वासुदेवप्रसादेंकरून ॥ घेऊन येईन अश्वातें ॥ ६३ ॥ जेवीं नारायणाचें करितां स्मरण ॥ पळती महापापें दारुण ॥ तेवीं रिपुदळातें भंगून ॥ येणें शीघ्र होईल जाणावें ॥ ६४ ॥ ऐसें बोलोन तिघेजण ॥ शीघ्र करिते झाले प्रयाण ॥ पुढें पर्वतशिखरीं उभे राहून ॥ भद्रावती अवलोकिती ॥ ६५ ॥ भोंवतें शतसहस्र कानन ॥ असती सरोवरीं कमळें पूर्ण ॥ गुंजारव करिती भ्रमरगण ॥ स्वानंदें मयूर नाचती ॥ ६६ ॥ होमधूम्रें न दिसे गगन ॥ मार्ग न दिसे यूपेंकरून ॥ वेदशास्त्रशब्दें पूर्ण ॥ बधिर कर्ण जनांचे ॥ ६७ ॥ प्रासाद सौधें गृह गोपुरें ॥

१ श्यामकर्णासाठीं. २ वर. ३ मेघ. ४ निखारे. ५ चढला. ६ लक्ष्मीपति (श्रीकृष्णानें). ७ शत्रूच्या सैन्यास. ८ गमन. ९ यज्ञस्तंभानें. १० मोठमोठे बंगले.

नेणों हिमालयाचीं शिखरें ॥ मठ देवालयें मनोहरें ॥ उंचपणें जिंकिती आकाशा ॥ ६८ ॥ अभेद दुर्गप्राकारं ॥ खंदक दिसे नेणों सागर ॥ शस्त्रास्त्रयंत्रें अपार ॥ स्थळोस्थळीं शोभती ॥ ६९ ॥ तों पुढें चालिला भीमसेन ॥ देखता जाला रम्य वन ॥ नाना द्रुम लता परिपूर्ण ॥ विविध पक्षी कूजती ॥ ७० ॥ कर्पूरकर्दळी असती सुफळ ॥ भारें लवोनि स्पर्शती भूतळ ॥ जैसा लवे सज्जनांचा मौळ ॥ गुणधनवैभवेंकरूनी ॥ ७१ ॥ कुसुमद्रुम रसाळ नारिकेळ ॥ फळें झाले असती व्याकुळ ॥ खर्जूर तमाल फणस सुढाळ ॥ फळें पुष्पें शोभती ॥ ७२ ॥ नाना पुष्पांचिया जाती ॥ जाई जुई आणि मालती ॥ केतकी मोगरे शेवंती ॥ पाटली सुगंध साचार ॥७३॥ पुंन्नाग बकुल आणि चंपक ॥ नागकेशर चंदन अशोक ॥ कर्दळी कुंद पारिजातक ॥ ऐसे पुष्पवृक्ष शोभती ॥ ७४ ॥ वट अश्वत्थ आणि पलाश ॥ धात्री तुलसी बेल बहुवस ॥ अर्जुन अगस्तीतरू राजस ॥ ऐसे अपार शोभती ॥ ७५ ॥ भोंवतीं जळयंत्रें फिरती ॥ तेथून जळपाट चालती ॥ वृक्षवल्ली धान्य भिजविती ॥ ऊर्ध्व उडती जळयंत्रें ॥ ७६ ॥ सहस्रपत्रादि कमळवन ॥ तेथें शब्द करिती विहंगमगण ॥ देखतां विश्रांती पावती नयन ॥ ऐसें वन देखिलें ॥ ७७ ॥ ऐसें तें सुंदर वन ॥ वृषकेतासी दावी भीमसेन ॥ नगरी पाहोनि समाधान ॥ तिघेजण पावले ॥ ७८ ॥ तों आणिक एक कांसार देखिलें ॥ नाना कमळीं शोभलें ॥ जें कनकस्फटिकें असे केलें ॥ विस्तीर्ण सागराऐसें तें ॥ ७९ ॥ जेथें कनकरत्नरौप्यशिळा ॥ तेथें वास हंसादि खगकुळा ॥ स्वाद शीतळ सुगंध जळा ॥ सकळ जन प्राशिती ॥ ८० ॥ तंव भीम ह्मणे कर्णपुत्रासी ॥ दिनकर येतां माध्यान्हासी ॥ येथेंचि येईल जळपानासी ॥ जो महावीरीं रक्षिला ॥ ८१ ॥ जैसा कृपण रक्षी धन ॥ तैसे वीर रक्षिती श्यामकर्ण ॥ याचि पर्वताग्रीं गुप्त असोन ॥ अश्वहरण करावें ॥ ८२ ॥ जळपानासी आलिया श्यामकर्ण ॥ संग्राम करावयासी जाईन ॥ तुह्मी प्रतिष्ठेसीं असा सावधान ॥ ऐशा विचारें कार्यसिद्धी ॥ ८३ ॥ ऐसा विचार करून पूर्ण ॥ तिघे पर्वतीं गुप्त राहोन ॥ पुढें जळपाना येईल श्यामकर्ण ॥ तयातें हरण करितील ते ॥ ८४ ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अति सुरस अमृताहून ॥ तेंचि ऐकावें सावधान ॥ भवबंधन हरावया ॥ ८५ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेधकथा ॥ मुनि सांगे परीक्षितिसुता ॥ तीव्र भावें ऐका एकाग्रचित्ता ॥ श्रीधर विनवी श्रोतयां ॥ ८६ ॥ इति श्रीमन्महाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते श्रीकृष्णभीमसंवादे त्रिवर्गभद्रावतीआगमनं नाम तृतीयोध्यायः ॥ ३ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

॥ ॥ अध्याय ॥ ३ ॥ ॥ ओव्या ॥ ८६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

१ किल्ल्यांचे तट. २ वृक्ष. ३ मस्तक. ४ डंडीण, अथवा सुरंगीचें झाड. ५ पक्षिसमुदाय. ६ तळें. ७ कथानक. ८ जनमेजयाला.

श्रीगणेशाय नमः ॥  ॥ वंदोनियां मुनिचरण ॥ मग काय बोले सर्पदेहन[1] ॥ कैसें केलें अश्वहरण ॥ तें कृपा करूनी सांगिजे॥ १ ॥ जैमिनि ह्मणे परीक्षितिसुता ॥ तूं तरी परम विचक्षण श्रोता ॥ तुझी देखोनी सादरता ॥ उल्हास चित्ता होतसे ॥ २ ॥ आतां होऊनि सावधान ॥ ऐकें राया अश्वहरण ॥ जन्ममरणाचें निरसन ॥ श्रवणमात्रें होईल ॥ ३ ॥ वृकोदराप्रति कर्णनंदन ॥ वाक्य बोले अमृतासमान ॥ दश अक्षौहिणी यौवनाश्वाचें सैन्य ॥ बादरायणें सांगितलें ॥ ४ ॥ त्यांतून कांहीं अश्वरक्षणा ॥ आतां नृप पाठवील जाणा ॥ त्यांहीं देखतां तुझिया चरणा ॥ वाताहात होतील ॥ ५ ॥ जेवीं देखतां गंगातट ॥ पळती पातकांचे थाट ॥ नातरी देखतां नीळकंठ ॥ शमे काळकूट आपणची ॥ ६ ॥ तोंवरी प्राणिया भवबंधन[2] ॥ जोंवरी न करी वस्तुविचारण[3] ॥ तोंवरी न सुटे जन्ममरण ॥ जों वासुदेवभजन केलें नसे ॥ ७ ॥ तोंवरी पितरां अधःपतन ॥ जोंवरी पुत्र न करी गयेस पिंडदान ॥ तोंवरी परचक्र असे दारुण ॥ जोंवरी भीमसेन न देखिला ॥ ८ ॥ तंव तो भीमातें अतुलबळी[4] ॥ दाखवीत अपार गजावळी ॥ जी मदोदकें असे द्रवली ॥ असे वेष्टिली अलिकुलें[5] ॥ ९ ॥ मागें आणिक येती ॥ पुढें कळप अपार धांवती ॥ कनकवस्त्राभरणें शोभती ॥ शीघ्र येती जळपाना ॥ १० ॥ एक करिती जळपान ॥ एक करिती जळावघ्राण ॥ बृंहितशब्दें[6] अवघें गगन ॥ आणि ते धरणी दणाणित ॥ ११ ॥ माहुत धुती कुंजरांचें अंग ॥ जेणें निघती शुंडादंडराग ॥ तेणें रंगले जळतरंग ॥ चित्रविचित्र दिसती पैं ॥ १२॥ निर्दालन होतां गजकुंभ ॥ तेथोन पळाले भ्रमरकदंब ॥ भंगला इष्टपणाचा स्तंभ ॥ कैचें सौहृद[7] मलिनासी[8] ॥ १३ ॥ कैसे मीन जळीं तळपती ॥ जैसी खळा झालिया धनप्राप्ती ॥ हंस मधुपां कमळरस देती ॥ साधु चित्तीं समरस ॥ १४ ॥ समूळ उपडोनियां कमळिणी ॥ गज शोभविती कर्णश्रेणी ॥ जैसी क्रीडाकाळीं निजकामिनी ॥ कामिक जन शोभविती ॥ १५ ॥ कैसे गज शोभती मदोन्मत्त ॥ नेणों काय जळीं निघाले पर्वत ॥ महात वृक्षापरी शोभत ॥ केश दिसती तृणापरी ॥ १६ ॥ पुनः नगरीकडे पाहे बळी ॥ तों अकस्मात निघाली धुळी ॥ भीमाप्रती बोले तयेवेळीं ॥ बहुधा सैन्य निघालें ॥ १७ ॥ तंव तो देखिला उंच ध्वज ॥ तयावरी शोभे गृध्रराज ॥ ह्मणे हाचि होईल नृपराज ॥ अश्वपती यौवनाश्व कीं ॥ १८ ॥ तों आणिक एक ध्वज देखिला ॥ त्यावरी कुश असे रेखिला ॥ ह्मणे हाही वीर असेल भला ॥ माथा तुकविला वृषकेतें ॥ १९ ॥ नाना वाद्यें हो वाजती ॥ तेणें दणाणित असे क्षिती[9] ॥ प्रतिशब्द गगनीं उमटती ॥ चामरें छत्रें अपार ॥ २० ॥ नाना शस्त्रें हो झळकती ॥ तेजें सौदामिनी[10] लाजविती ॥ रथीं पताका फडकती ॥ जेवीं रसनीं[11] काळाच्या ॥ २१ ॥ तों निघाल्या अश्वरत्नांच्या हारी ॥ दाखविती गती नानापरी ॥ उष्ट्री

---

१ जनमेजय. २ संसारबंधन. ३ आत्मानात्मविचार. ४ महाबळी. ५ भ्रमरांच्या समुदायानें. ६ हत्तींच्या ओरडण्यानें. ७ सख्य. ८ दुर्जनास. ९ पृथ्वी. १० विजा. ११ जिभा.

नाकुळी हंसी मयूरी ॥ पांचवी नीरी बोलिजे ॥ २२ ॥ ऐसिया हयांच्या पांच गती ॥ हयशिक्षक पुढें दाविती ॥ रूपें गुणें लाजविती ॥ सागरोद्भव हयातें ॥ २३ ॥ एक अतिवेगें धांवती ॥ दिसे मुखांतून पद्धती ॥ जेवीं निघती संहितापदगती ॥ नाना विप्रांपासोनी ॥ २४ ॥ एक रक्त पीत श्वेत धवळ ॥ एक नीळ कर्पूर पाटळ ॥ एक चित्रबिंदु गौर सबळ ॥ नाना वर्ण शोभती ॥ २५ ॥ नाना परींचे हयवर ॥ गमन करिती मंडळाकार ॥ त्या गतीतें अद्यापी समीर ॥ वाहाटुळीमिषें शिकतसे ॥ २६ ॥ ऐशिया अश्वजाती त्या अपार ॥ वेगें पावल्या सरोवर ॥ आकंठ मग्न होऊनि नीर ॥ प्राशिती सादर घटघटां ॥ २७ ॥ रविसुतात्मजासी[2] ह्मणे भीमसेन ॥ आह्मी ज्यालागीं आलों धांवून ॥ तो तंव न दिसे श्यामकर्ण ॥ अवघे सौम्य पाहिले ॥ २८ ॥ काय तो मंदिरींच असेल बांधिला ॥ तेथेंचि नेऊन पाजितील जळा ॥ तरी आमचा श्रम व्यर्थ गेला ॥ ऐसें आतां मज वाटे ॥ २९ ॥ हरीवांचूनि[3] धर्मभवन ॥ केवीं आह्मांसी प्राप्त जाण ॥ जेवीं अपुत्रिकासी स्वर्गलोकगमन ॥ सत्पुत्रावांचूनि घडेना ॥ ३० ॥ जेवीं ब्रह्मचर्यावांचूनि काम ॥ अदांतासी वश न घडे हा नेम ॥ जेवीं स्त्रीजितासी बुद्धिसंगम ॥ स्नेहावांचूनि घडेना ॥ ३१ ॥ कीं प्रधानांवांचूनि राज्यभार ॥ नृपतीचा नव्हे जी स्थिर ॥ कीं पुण्यावांचूनि यश नर ॥ केवीं पावेल सांग पां ॥ ३२ ॥ भक्तीवांचूनियां मुक्ती ॥ नरें न पाविजे कल्पांतीं ॥ शंकराराधनावीण संपत्ती ॥ कदाकाळीं न पाविजे ॥ ३३ ॥ तेवीं या श्यामकर्णावांचून ॥ आह्मांसी प्राप्त नव्हे धर्मसदन ॥ ऐसें बोलतां पवननंदन ॥ तंव तो श्यामकर्ण देखिला ॥ ३४ ॥ दरिद्रें देखिलें निधान ॥ नातरी भक्तें देखिले श्रीहरिचरण ॥ किंवा पतिव्रता देखे भ्रतारचरण ॥ तेवीं आनंद भीमातें ॥ ३५ ॥ अश्व गज रथ पदाती[4] ॥ मिळोनि प्राणापरी त्या रक्षिती ॥ छत्र चामरें व्यजनें शोभती ॥ आणि झळकती रविपर्णें[5] ॥ ३६ ॥ कनकवस्त्रें कनकाभरणें ॥ भोंवतीं क्षुद्रघंटांचीं आवरणें ॥ चर्चिला असे दिव्यचंदनें ॥ माथां अवतंस मुक्तांचा[6] ॥ ३७ ॥ आंगीं कुंकुमाभरण श्रीकरचिह्न ॥ मुक्ताहार विराजमान ॥ कंठीं पुष्पहार चरणीं भूषण ॥ गर्जत असती स्वानंदें ॥ ३८ ॥ मुखीं रत्नखचित योक्त्र[7] असे ॥ दोहों भागीं भृत्यीं धरिलासे ॥ चालतांही नृत्य करितसे ॥ जें देवांगनांसी दुर्लभ ॥ ३९ ॥ नेणों काय अंतरिक्ष चालत ॥ भूमीस पाय तो न लावित ॥ ह्मणे व्यभिचारिणी नृपभुक्त ॥ इयेसी पदस्पर्श न करावा ॥ ४० ॥ चालतां तुकवीतसे मान ॥ नेणों पाचारितो मेघवर्णालागून ॥ ह्मणे मज जाईं घेऊन ॥ धर्मसदन पाहावया ॥ ४१ ॥ हो हो शब्दें हो गर्जती ॥ पुढें नाना धूपांतें जाळिती ॥ नाना वाद्यें पुढें वाजती ॥ वीर गर्जती स्वानंदें ॥ ४२ ॥ ऐसा श्यामकर्ण तो देखिला ॥ तों मेघवर्ण सरसावला ॥ दृढ कटिबंधन करिता झाला ॥ ऐसा देखिला भीमसेनें ॥ ४३ ॥ पितामहें तयासी पुसिलें ॥ ह्मणे पुत्रपुत्रा हें काय आरंभिलें ॥ येरू ह्मणे श्यामकर्णातें देखिलें ॥ आतां राहिलें

१ चाबुकस्वार. २ वृषकेतूस. ३ श्यामकर्णावांचून. ४ पायदळ. ५ तुरा. ६ मोत्यांचा. ७ दोरी ( लगाम ).

केवीं जाय ॥ ४४ ॥ सपुत्र यौवनाश्वेंसीं श्यामकर्ण ॥ शीघ्र आणीन जीत धरून ॥ तरीच रे तयाचा नंदन ॥ नाहीं तरी कृमी सोमवंशीं ॥ ४५ ॥ जेवीं समुद्रांतून कद्रुसुत ॥ मुखीं धरूनि जाय विनतासुत ॥ तैसा सैन्यसागरांतून मी त्वरित ॥ श्यामकर्णातें आणीन ॥ ४६ ॥ जेवीं करूनि दधिमंथन ॥ नवनीत काढिती तेथून ॥ तेवीं सकळ सैन्यातें मंथून ॥ आणीन आतां श्यामकर्णातें ॥ ४७ ॥ ऐसें बोलून उडे तत्काळ ॥ वेगें भरला गगनमंडळ ॥ मग तेथें राक्षसी मायाजाळ ॥ योजिता झाला मतियोगें ॥ ४८ ॥ तंव तेथें पडिला अंधकार ॥ तेणें तो न दिसे दिनकर ॥ त्रिभुवनीं झाला हाहाकार ॥ धीर न धरिती कोणीही ॥ ४९ ॥ आकाशीं निघाली मेघपंक्ती ॥ तयामाजी विद्युल्लता तळपती ॥ नाना शब्द उठती ॥ आपण गर्जे सिंहनादें ॥ ५० ॥ जनीं वर्तला हाहाकार ॥ कोणी कोणास नेदी धीर ॥ देवविमानांचा झाला चूर ॥ धरणीवरी पडताती ॥ ५१ ॥ धांवत गेले देवदूत ॥ तिहीं जाणविला अमरेंनाथ ॥ ह्मणती मायावी आला दैत्यनाथ ॥ तेणें आकांत मांडिला ॥ ५२ ॥ कां हो तुह्मांसी पडली भ्रांती ॥ अद्भुत याची बळशक्ती ॥ तो आतां घेईल अमरावती ॥ ऐकतां सुरपैती कोपला ॥ ५३ ॥ सावध होऊन अमरनाथ ॥ तेणें पाठविला चतुर दूत ॥ तो येऊनियां त्वरित ॥ पुसे नमन करूनियां ॥ ५४ ॥ तूं कोण कोठील कोण वंश ॥ पाहतां दिससी महापुरुष ॥ कवण कार्याचा उद्देश ॥ धरूनि येथें आलासी ॥ ५५ ॥ भयें घाबरा झाला सुरपती ॥ ह्मणोनी पाठविलें मजप्रती ॥ तुह्मीं सांगावी आपुली स्थिती ॥ जेणें विबुधपती संतोषे ॥ ५६ ॥ येरू ह्मणे अजातशत्रु धर्मनंदन ॥ जयासी वंदित इंदिरारमण ॥ तयाचा अनुज भीमसेन ॥ जो नवनागसहस्रबळी ॥ ५७ ॥ जो कौरवसागरकुंभसुत ॥ जो राक्षसाचळांस वज्रपात ॥ जो कराकरीं कुंभ विदारित ॥ जयातें कळिकाळ कांपती ॥ ५८ ॥ सोमवंशी पांडव विख्यात ॥ जो हस्तनापुरीचें राज्य करीत ॥ घटोत्कच भीमसेनाचा सुत ॥ तत्पुत्र मी मेघवर्ण ॥ ५९ ॥ धर्मैं मांडिला अश्वमेधयज्ञ ॥ त्यालागीं पाहिजे श्यामकर्ण ॥ मी आलों असें धांवोन ॥ अश्व हरण करावया ॥ ६० ॥ तो कां वृथा भियाला अधिक ॥ आह्मी तयासारिखे नसों रंक ॥ इंद्रपदाची त्याची भीक ॥ कोण इच्छी तियेतें ॥ ६१ ॥ मत्पूर्वजस्वामी चक्रपाणी ॥ चतुर्दश भुवनांचा असे धनी ॥ त्याच्या प्रसादें धर्मभुवनीं ॥ ये लोटांगणीं इंद्रपद ॥ ६२ ॥ जें मनुजें वमिलें मिष्टान्न ॥ त्यातें न वांछी पामर जन ॥ तयांतें आदरें भक्षी श्वान ॥ तेवीं इंद्रभुवन जाणावें ॥ ६३ ॥ भक्तिबळें मातले हरिसेवक ॥ कळिकाळासी जयांचा धाक ॥ तो श्वानाचा ओकिला ओक ॥ तैसा सत्यलोक मानिती ॥ ६४ ॥ नसे चतुर्दश भुवनांची परवा ॥ तेथें इंद्रपदाचा कोण केवा ॥ कां रे वृथा भय पावतो मैघवा ॥ माझ्या पांडवांपासोनी ॥ ६५ ॥ अँस्थिखंडातें चघळी श्वान ॥ मार्गीं देखतां महाजन ॥ त्यांची शंका धरी आपण ॥ नेतील माझें अस्थिखंड ॥ ६६ ॥ इंद्रपद हें अस्थिखंड जाण ॥

---

१ सर्प. २ गरुड. ३ सूर्य. ४ इंद्र. ५ धर्मराज. ६ पाड, गणना. ७ हाडाला.

तेथें श्वानातुल्य शचीरमण ॥ तयातें न पाहाती थुंकोन ॥ भक्तिनिधान पांडव ते ॥ ६७ ॥ ऐसें निंदिलें इंद्रपद ॥ श्वानातुल्य इंद्र केला निषिद्ध ॥ ऐकोनि दूतें मानिला खेद ॥ त्याचा मी दूत अतिनिंद्य ॥ ६८ ॥ ऐकोनि धांवत गेला दूत ॥ तेणें सांगितला सर्व वृत्तांत ॥ मग संतोषोनि त्रिदशनाथ ॥ निघे कौतुक पाहावया ॥ ६९ ॥ अंबर दाटलेंसे विमानीं ॥ तंव इकडे काय केलें मेघवर्णें ॥ अस्त्रातें सोड्डनियां तेणें ॥ मोहन घातलें सैन्यातें ॥ ७० ॥ दृष्टीं लक्षूनियां श्यामकर्ण ॥ उडी टाकीतसे मेघवर्ण ॥ पृष्ठीसीं अश्वातें बांधून ॥ भरला गगनपोकळीं ॥ ७१ ॥ तों सेनेंत झाला आकांत ॥ गेला गेला श्यामकर्ण ह्मणत ॥ धांवा धांवा धरा तो तस्कर[2]नाथ ॥ जेणें अपराध हा केला ॥ ७२ ॥ ह्मणोनि शस्त्रास्त्रें सोडिती ॥ आपण आपणातें मारिती ॥ तों अवचित देखिला व्योमपंथीं ॥ अश्वासहित जातसे ॥ ७३ ॥ आजा[3]नुबाहू तमालनीळ ॥ मुगुट कुंडलें देती झळाळ ॥ केयूरादि दिसे सोज्ज्वळ ॥ ह्मणती हा तो महापुरुष ॥ ७४ ॥ मारा मारा धरा धरा ॥ ह्मणोनि वीर धांवती सैरावरा ॥ आश्चर्य वाटलें सुरवरां ॥ करिती त्यावरी पुष्पवृष्टी ॥ ७५ ॥ इंद्र ह्मणे धन्य धर्मराय ॥ जयातें ऐसा नातू असे साह्य ॥ तयासी उणें असे काय ॥ या त्रिभुवनामाझारीं ॥ ७६ ॥ अश्व चालविला गगनपंथीं ॥ तंव दूत सांगों गेले रायाप्रती ॥ ह्मणती अश्व नेला जी नृपती ॥ कां तूं निश्चिती बैसलासी ॥ ७७ ॥ ऐसें ऐकतांचि वचन ॥ होता झाला क्रोधायमान ॥ ह्मणे कोणें रे नेला श्यामकर्ण ॥ कोणें मरण इच्छिलें ॥ ७८ ॥ काळसैन्याची करिती होळी ॥ ऐसे वीर पाचारिले महाबळी ॥ शीघ्र येऊनि तयाजवळी ॥ ह्मणती आज्ञा काय स्वामी ॥ ७९ ॥ नृप ह्मणे बैसा रथावरी ॥ शस्त्रास्त्रें घ्या जी करीं ॥ हरितस्[4]कर धरा रे झडकरी ॥ चारी वाटा रोधूनियां ॥ ८० ॥ आजपर्यंत पाळल्याचें ॥ आतां सार्थक करा त्याचें ॥ जो दर्शन करवील हरीचें ॥ तोचि माझा प्राणसखा ॥ ८१ ॥ ऐशी ऐकतां नृपवाणी ॥ तंव सैन्य चालिलें एक अक्षौहिणी ॥ शस्त्रास्त्रें शक्ती चापपाणी ॥ जे काळवदनीं हात घालिती ॥ ८२ ॥ शोधीत चालिले दश दिशा ॥ तंव दृष्टी गेली आकाशा ॥ नयनीं पाहिला वीर कैसा ॥ जो त्रिभुवनासी असाध्य ॥ ८३ ॥ तयासी सर्व वीर बोलती ॥ सोडीं सोडीं हरी दुर्मती ॥ कां आमुचिया हातीं ॥ जाऊं पाहासी यमधामा ॥ ८४ ॥ येरू ह्मणे कां श्रमतां ॥ कां रे यमसदना जाऊं पाहतां ॥ करचपेटेंची मारीन समस्तां ॥ परि हरी सर्वथा न सोडीं मी ॥ ८५ ॥ सागरोदरीं पडलिया मुक्ताफळा ॥ जरी काढील आंधळा ॥ तरी हा हरी तुह्मांला ॥ प्राप्त होईल निर्धारें ॥ ८६ ॥ काळवदनीं पडलिया जीवित्व ॥ जरी पुनः होईल हस्तगत ॥ तरीच हा हरी तुह्मांस प्राप्त ॥ होईल ऐसें जाणावें ॥ ८७ ॥ ऐसा लागतां वचनबाण ॥ वीर झाले क्रोधायमान ॥ सोड्डनियां अगणित बाण ॥ रोधिती मार्ग तयाचा ॥ ८८ ॥ तंव मेघवर्णें काय केलें ॥ पृष्ठीसीं अश्वातें दृढ बांधिलें ॥ तयांचें बाणजाळ होतें जें आलें ॥ तें करतळें चूर्ण केलें पैं ॥ ८९ ॥

---

१ आकाश. २ मुख्य चोर. ३ गुडघ्यांपर्यंत ज्याचे हात आहेत असा. ४ श्यामकर्ण नेणारा चोर. ५ घोड्याचें.

आणि आणिल्या पर्वतशिळा ॥ तया सैन्यावरी टाकिल्या ॥ तेणें त्यांचा निःपात झाला ॥ मग चालिला गगनमार्गें ॥ ९० ॥ तों
दुरून पाहे कर्णनंदन ॥ अश्व घेऊनि देखिला मेघवर्ण ॥ परम हर्षायमान होऊन ॥ सांगे आपण भीमातें ॥ ९१ ॥ पैल परदळमेघ-
प्रभंजन ॥ सहअश्व येतो जी मेघवर्ण ॥ धन्य धन्य याचा पराक्रम गहन ॥ कर्म अद्भुत पैं केलें ॥ ९२ ॥ दोघे स्वानंदातें पावले ॥
हर्षें सिंहनादें गर्जले ॥ भला भला ऐसें बोलिले ॥ माथा तुकविती स्वानंदें ॥ ९३ ॥ तों अनंत सैन्य पडिलें ॥ तें वर्तमान रायासी
विदित झालें ॥ मग नृपें सेवकांतें पुशिलें ॥ कितीक आहे परचक्र ॥ ९४ ॥ सेवक ह्मणती रायासी ॥ सांगतां लाज वाटते आह्मांसी ॥
परी रायें पुशिलें भृत्यांसी[2] ॥ त्यांनीं यथार्थ सांगावें ॥ ९५ ॥ एकें हय नेला गगनमंडळा ॥ एकें रणीं आक्रांत मांडिला ॥ एक दुरी
उभा ठेला ॥ असे वीर तिघेजण ॥ ९६ ॥ तंव नृप ह्मणे ते नव्हती नर ॥ ते तिघे असती सुरवर ॥ तरी युद्धयज्ञानें अमर[3] ॥ तृप्त
करीन निर्धारें ॥ ९७ ॥ नातरी तें अग्नित्रय मूर्तिमंत ॥ कीं ते त्रय देव असती निश्चित ॥ नातरी लोकत्रयनाथ ॥ आले अश्व
हरावया ॥ ९८ ॥ ह्मणोनि घाव निशाणीं दिधला ॥ काळ क्षोभला तैसा कोपला ॥ सहपरिवारेंसीं निघाला ॥ वेगें आला रणभूमीं
॥ ९९ ॥ तंव तो दिनकरात्मजनंदन[1] ॥ प्रार्थिता झाला वायुनंदन ॥ आज्ञा द्यावी मजलागोन ॥ रणकंदन करावया ॥ १०० ॥ पुत्र-
पुत्रें संग्राम केला ॥ निजपुत्र अनसुट राहिला ॥ आतां माझा युद्धसोहळा ॥ दुरून पाहें स्वामिया ॥ १ ॥ इंद्रजित वधावयाला-
गून ॥ रामआज्ञा घेऊनि जाय लक्ष्मण ॥ तेवीं तो चालिला कर्णनंदन ॥ जिंकावया यौवनाश्वा ॥ २ ॥ मग पितृव्यचरण नम-
स्कारी ॥ धनुष्यबाण घेतले करीं ॥ तेथूनि चालिला झडकरी ॥ पदचाली रणरंगा ॥ ३ ॥ जेवीं पिपीलिकांच्या[4] हारी ॥ तेवीं सैन्य लोटलें
तयावरी ॥ वायूसी प्रवेशावया भीतरीं ॥ ठावही नाहीं निःशेष ॥ ४ ॥ अनेक वाजती रणतुरें ॥ शस्त्रास्त्रें झळकती अपारें ॥ छत्र
ध्वज पताका चामरें ॥ झांकोळलें[5] नभ दिसेना ॥ ५ ॥ वर्षती बाणांचा पूर ॥ तेणें पडिला अंधकार ॥ कोठें न दिसे दिनकर ॥
ह्मणोनि रविनातू उठावला ॥ ६ ॥ जेवीं देखूनि त्रिपुरासुर ॥ तयावरी धांवे रतिपतिहर[6] ॥ तेवीं सहस्रकरात्मजकुमर ॥ चालिला
संहार करावया ॥ ७ ॥ माहेश्वरी मांडूनि ठाणँ[7] ॥ अंतरीं स्मरोनियां हरिचरण ॥ धनुष्यासी चढवूनियां गुण ॥ शरसंधान मांडिलें
॥ ८ ॥ धनुष्य करूनि मंडळाकार ॥ मारूं लागला तीव्र शर ॥ तेणें मांडिला संहार ॥ यौवनाश्वसैन्याचा ॥ ९ ॥ बाण सोडोनि
तेजाळ ॥ तोडिलें परसैन्याचें शरजाळ ॥ निर्मळ करूनियां नभमंडळ ॥ पितामहातें वंदिलें ॥ ११० ॥ मज देखतां माझा पितृज-
नक ॥ शत्रुबाणीं झांकिला निःशंक ॥ तरी रणमंडळींचें माझें कौतुक ॥ कवण पाहिल या हेतू ॥ ११ ॥ बाण सुटताती सणसणा ॥
शस्त्रें वाजती खणखणा ॥ वीर पडिले दणदणा ॥ भारें शेष फणा लववीत ॥ १२ ॥ पडिले पायदळांचे भार ॥ केला अश्वस्वारांचा

---

१ वृषकेतू. २ सेवकांला. ३ देव. ४ मुंग्यांच्या. ५ आच्छादित झालें. ६ महादेव. ७ बैठक.

संहार ॥ सोडोनि अर्धचंद्राकार शर ॥ गजदळभार मारिला ॥ १३ ॥ मुगुटकुंडलांचिया झळाळी ॥ तांबूलचर्वणांचिया परिमळीं ॥ ऐसी वीरांचिये मुखकमळीं ॥ वाहिली लाखोली भूलिंगा ॥ १४ ॥ मदनांकुशें खुडिजेत कैल्हारें ॥ तेवीं छेदूनी शिरें शरें नरवरें ॥ कुंतल अलिकुळहास्यकेशरें ॥ ऐसीं समर्पित भूलिंगा ॥ १५ ॥ ऐसा अतिशय करूनि थोर ॥ त्यावरी सैन्य लोटलें अपार ॥ नेणों धांवले ते गिरिवर ॥ अमरनाथ जिंकावया ॥ १६ ॥ मग मनीं विचार करी सविता ॥ माघारें न सरें वृषकेता ॥ जरी धांवल्या पतंगसरिता ॥ पाहातां न खुंटे प्रळयाग्नी ॥ १७ ॥ अवघे लोटले अतिरथी ॥ वर्षती शर तोमर शक्ती ॥ तेणें लोपला तो गैभस्ती ॥ अंधकार पडियेला ॥ १८ ॥ वीर धांवले उल्हासें ॥ घ्या घ्या ह्मणती रोषावेशें ॥ तों भय मानिलें दिनेशें ॥ काय कैसें होईल ॥ १९ ॥ किंवा जिंकावया कुंभसंभव ॥ नेणों धांविन्नला तो जळांर्णव ॥ नातरी सरूनियां वैरभाव ॥ तमसमुदाय उठावला ॥ १२० ॥ गगन व्यापिलेंसे बाणें ॥ पळविती देव विमानें ॥ तें देखोनी पँवननंदनें ॥ समरंगण ठाकिलें ॥ २१ ॥ भीम क्रोधानळें व्यापिला ॥ गदा घेऊनियां धांवला ॥ तो कर्णसुतें अवलोकिला ॥ काय बोलिला तें ऐका ॥ २२ ॥ स्वामी तुह्मीं मज अतिप्रीतीं ॥ पूर्वीं दिधली सेनायुवती ॥ तिचा अभिलाष धरितां चित्तीं ॥ तुह्मां दिनपती हांसेल ॥ २३ ॥ वीरमुखकमळें साजिरीं ॥ चंदन चर्चिलें सर्व शरीरीं ॥ उठले गजकुंभस्तन उरावरी ॥ तेथें शरनखक्षत करीन जी ॥ २४ ॥ मजवरी तिचा अनुराग ॥ आतांचि खवळला युद्धानंग ॥ आनंदें देतसे अंगसंग ॥ तरी तुह्मीं सवेग परतावें ॥ २५ ॥ ही देखोनि श्वशुरचरणांला ॥ लज्जा पावेल वेल्हाळा ॥ ध्वजपल्लवें झांकून मुखकमळा ॥ विन्मुख मज होईल ॥ २६ ॥ दोघांसी विघडावयाप्रती ॥ ही तुमची नव्हे वडिलनीती ॥ मजवरी तीची अति प्रीती ॥ समान वयातें पाहूनि ॥ २७ ॥ कळवळ्याचा करी अनुराग ॥ घर्मांबुवर्ण होतां युक्त आंग ॥ स्वयें घालील पवनतरंग ॥ ध्वजपल्लवेंकरूनियां ॥ २८ ॥ इजपासून होईल यशनंदन ॥ तो मी तुमचे पदीं समर्पीन ॥ ऐसें ऐकोन वायुनंदन ॥ काय वचन बोलिला ॥ २९ ॥ तूं जाणूनियां स्त्रीजित ॥ ह्मणोन मी आलों धांवत ॥ परी तूं विवेकी बुद्धिवंत ॥ नाहीं झालासी तये आधीन ॥ १३० ॥ जरी सुनेसी न दंडी श्वशुर ॥ तरी ती सोडील मर्यादामंदिर ॥ इकडे तिकडे धांवे सैर ॥ तो शब्द लागे वडिलांतें ॥ ३१ ॥ ऐसें बोलोन भीम फिरला ॥ पुढें कर्णनंदन धांवला ॥ पुनः तेणें संग्राम केला ॥ तेणें मानवला सुरपती ॥ ३२ ॥ रणीं थोर हाहाकार झाला ॥ धाकें दळभार तो पळाला ॥ तें देखोनि यौवनाश्व धांविन्नला ॥ रागें पावला रणभूमीं ॥ ३३ ॥ भयंकर देखोनि रणमेदिनी ॥ तेथें वाहे शोणिततंरंगिणी ॥ वीरमुखकमळांच्या श्रेणी ॥ वाहूनि जाती अतिवेगें ॥ ३४ ॥ तेथें शक्तिभुजंगम धांवती ॥ ढाला कूर्मरूपें पोहती ॥ मार्गणमीन ते तळपती ॥ वाहाती काष्ठें अस्थींचीं ॥ ३५ ॥ गजदेह पडिले सगट ॥ तेंचि

---

१ मदनरूप अंकुशानें. २ कमळें. ३ सूर्य. ४ अगस्ति मुनि. ५ समुद्र. ६ आंधारसमूह. ७ भीमानें. ८ इंद्र. ९ युद्धभूमि. १० रक्ताची नदी. ११ बाण हेच कोणी मासे.

तेथें प्रचंड बेट ॥ केश शेवाळ अति लांबट ॥ पाय देतां निसरती ॥ ३६ ॥ तीरीं शोभती शोणितपंकें ॥ तेथें रुतती रथांचीं चाकें ॥ हय धांवून येताती तवकें ॥ कुंठित तेथें ते होती ॥ ३७ ॥ ऐसी देखोनि रणमेदिनी ॥ संतोषला तो नृप मनीं ॥ ह्मणे धन्य धन्य ती जननी ॥ ऐसिया वीरातें प्रसवली ॥ ३८ ॥ तो वीर पाहावा ह्मणोनी ॥ धांविन्नला तो नृपचूडामणी ॥ तयासी दुरोनि देखतां नयनीं ॥ येरू सर्वांगीं निवाला ॥ ३९ ॥ राव जवळी गेला लवलाहें ॥ तंव निर्भय पुढें उभा राहे ॥ तयासी नृप पुसे काय ॥ तें सावधान अवधारा ॥ १४० ॥ तूं कवण कवणाचा वंश ॥ कवण नाम कवण देश ॥ हें मज सांगावें सावकाश ॥ कां नाश केला सेनेचा ॥ ४१ ॥ येरू ह्मणे जाण कश्यपवंश ॥ पितामह तरी दिनेश ॥ दानोदकें रिक्त केला सरितेश[१] ॥ तो जनक जाण पैं माझा ॥ ४२ ॥ जे त्रिभुवनीं दातृत्वें चक्रवर्ती ॥ तिघे विश्वतोमुखें ऐकजेती ॥ मत्पिता कल्पतरू आणि श्रीपती ॥ चतुर्थ उदार असेना ॥ ४३ ॥ जेणें द्रुपदात्मजा सभास्थाना ॥ आणोनि विटंबविली जाणा ॥ पांडवांची न धरीच गणना ॥ श्रीकृष्णचरणा न लक्षी ॥ ४४ ॥ दुर्योधनाचा मित्र होऊन ॥ पांडवद्वेष करीत जाण ॥ अर्जुनासी जीवदान देऊन ॥ निजसदनासी तो गेला ॥ ४५ ॥ तो कर्ण माझा जनक ॥ वृषकेत नाम माझें ऐक ॥ श्यामकर्ण पाहिजे आवश्यक ॥ धर्मयज्ञाकारणें ॥ ४६ ॥ यौवनाश्व ह्मणे कर्णसुता ॥ मी रथारूढ आहें आतां ॥ भूमिस्थासीं युद्ध करितां ॥ नीतीमध्यें हीन पडे ॥ ४७ ॥ आणि तूं तरी एकला असती ॥ युद्ध करितां भागलासी ॥ तरी मी देतों घे रथासी ॥ त्यावरी बैसोनी युद्ध करीं ॥ ४८ ॥ तंव तो रायासी ह्मणे कर्णसुत ॥ मी सर्वथा न घेईं तुझा रथ ॥ रथ घेतल्यावरी युद्धाची मात ॥ सर्वथा जाण राहिली ॥ ४९ ॥ मी तरी दानशूराचा नंदन ॥ तुझें केवीं घडे रथदान ॥ मी भूमिस्थची करीन रणकंदन ॥ होईं सिद्ध युद्धासी ॥ १५० ॥ सन्निध होऊनि दोघेजण ॥ युद्ध करितील दारुण ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अति रसाळ अवधारा ॥ ५१ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रवणें होय अंतर शुद्ध ॥ पातकें जातील अगाध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयांतें ॥ १५२ ॥ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते हयहरणं नाम चतुर्थोध्यायः ॥ ४ ॥ अध्याय ॥ ४ ॥ ॥ ओव्या ॥ १५२ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ शुभं भवतु ॥ ॥ ॥ ॥ ॥

---

१ अति क्रोधानें. २ समुद्र. ३ सर्व लोकांच्या तोंडीं. ४ पुत्र.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे नृपनाथा ॥ पुढें वर्तली कैसी कथा ॥ एकाग्र करूनियां चित्ता ॥ ऐक आतां गुणज्ञा ॥ १ ॥ कर्णात्मजासी ह्मणे नृपवर ॥ आधीं तूं मजवरी करीं प्रहार ॥ मी तरी तुजवरी न टाकीं शर ॥ बाळ बळहीन ह्मणोनि ॥ २ ॥ वृषकेत ह्मणे नृपनाथा ॥ तूं बहु पुत्रांचा असशी पिता ॥ वृद्ध झालासी तूं आतां ॥ ह्मणोनि बळहीन झालासी ॥ ३ ॥ तुज नाहीं रे कृष्णदर्शन ॥ ह्मणोनि ससी बलहीन ॥ मी तों अत्यंत असें तरुण ॥ श्रीकृष्णदर्शनें बलाढ्य ॥ ४ ॥ पूर्वपुण्याचेनि कौतुकें ॥ कृष्णदर्शनाचेनि भातुकें ॥ त्या सुखाचेनि बळ निकें ॥ माझें शरीर अजेय ॥ ५ ॥ तूं तरी केवळ कामासक्त ॥ पुत्रोत्पादनीं परमासक्त ॥ विषयसंगीं लोलुप्त ॥ ह्मणोनि होसी मज वश्य ॥ ६ ॥ ऐसें ऐकतां हो वचन ॥ नृपें सोडिले दश बाण ॥ येरें सोडूनि तीन मार्गण ॥ केलें खंडन त्रिधा त्यांचें ॥ ७ ॥ आणिक तीन शर सोडिले ॥ ते नृपहृदयामाजी भरले ॥ रक्त सावकाश पियाले ॥ मग ते पावले पतनातें ॥ ८ ॥ जे लटिके साक्षी देती ॥ जे कां कुडे कपट करिती ॥ त्यांचे पूर्वज पतन पावती ॥ तैसे बाण पडिले ते ॥ ९ ॥ नातरी कष्टें साधून साधन ॥ साधक पावती स्वर्गभुवन ॥ ते पुण्यक्षयें पावती पतन ॥ तैसे बाण पडिले ते ॥ १० ॥ मग एक चंद्राकार बाण ॥ वृषकेतूनें सोडिला जाण ॥ तेणें ध्वज आतपँत्र चाँमर व्यँजन ॥ धनुष्य सँहगुण छेदिलें ॥ ११ ॥ एक आरोपाचा वाग्बाण ॥ सर्व छेदी प्रीतीचे गुण ॥ तेवीं राधेयात्मजें बाण लावून ॥ एकदांची सर्व छेदिले ॥ १२ ॥ सवेंचि रायें गुण धनुष्या लावून ॥ तयावरी साठी टाकिले बाण ॥ ते तयाचें हृदय भेदून ॥ रक्तपान करिते झाले ॥ १३ ॥ जेवीं सहस्रकराचे किरण ॥ शोषीत धरणीगत जीवन ॥ तैसें वृषकेतूचें हृदय भेदून ॥ रक्त शोषून चालिले ॥ १४ ॥ बहुत बाणीं विंधिला ॥ बहुत वीरांहीं वेष्टिला ॥ परी नाहीं भियाला ॥ केला धनुष्याचा टणत्कार ॥ १५ ॥ महाभूतीं वेष्टिला हनुमंत ॥ तरी तो होईल काय भयभीत ॥ नातरी भय न धरीच शुँचिष्मंत ॥ तेवीं कर्णात्मज निर्भय तो ॥ १६ ॥ सत्वर एक बाणातें टाकिलें ॥ सारथ्याचें शिर छेदिलें ॥ पडतांच आकाशीं उडविलें ॥ व्याकुळ केलें रायातें ॥ १७ ॥ राजा पडला रणांगणीं ॥ सकळ सैन्यांत उठली ध्वनी ॥ शरीं झांकला तो दिनमणी ॥ सैन्य पळों लागलें ॥ १८ ॥ मग त्या कर्णात्मजें काय केलें ॥ त्यावरी दहनास्त्र टाकिलें ॥ तें जाळीत असे चालिलें ॥ सकळ सैन्य ते काळीं ॥ १९ ॥ तें देखोनियां नृपवरें ॥ वरुणास्त्र टाकिलें त्वरें ॥ अग्नि विझवोनि सत्वरें ॥ शीतळ केलें निजसैन्य ॥ २० ॥ मग बाँळें रविसुँताचे ॥ अस्त्र सोडिलें पवनाचें ॥ मंडळ उडविलें मेघांचें ॥ झडपीतसे सकळ दळा ॥ २१ ॥ तंव चित्त दुखवलें नृपाचें ॥ तेणें अस्त्र टाकिलें पर्वताचें ॥ शिळावृष्टी करोनि वृषकेतूचें ॥ शरीर केलें शतचूर्ण ॥ २२ ॥ तंव दृष्टीस न दिसे कर्णनंदन ॥ तों क्रोधें खवळला भीमसेन ॥ वेगें धांविन्नला गदा घेऊन ॥ सोडवावया निजपुत्रा ॥ २३ ॥ शरवृष्टी सोडिली नृपवरें ॥

१ अजिंक्य. २ अति लोभी. ३ बाण. ४ छत्र, अबदागीर. ५ चवऱ्या. ६ पंखे. ७ दोरीसहित. ८ सूर्याचे. ९ शुद्धाचरणी. १० अग्न्यस्त्र. ११ कर्णाचे पुत्रानें.

ती क्षण न लगतां वारिली वृकोदरें ॥ तंव सावध होऊनियां कर्णकुमरें ॥ वज्रें छेदिले ते पर्वत ॥ २४ ॥ तों यौवनाश्वें कौतुक केलें ॥ बाणें वज्रास्त्र भंगिलें ॥ तीक्ष्ण बाणें हृदय भेदिलें ॥ पडिला वीर धरणीशीं ॥ २५ ॥ तों भीम धांवोनि लवलाहें ॥ स्नेहें पुत्राकडे पाहे ॥ तंव तो निचेष्टित पडिलाहे ॥ जेवीं पुतळा काष्ठाचा ॥ २६ ॥ मोह झळंबला भीमासी ॥ ह्मणे मुख कैसें दावूं धर्मासी ॥ काय सांगूं माते कुंतीसी ॥ या वृषकेतूची सुवार्ता ॥ २७ ॥ लागतां इंद्रजिताचा शक्तिघात ॥ निचेष्टित पडे सुमित्रासुत ॥ तें देखोनि अवनिजाकांत ॥ खेद करीत जयापरी ॥२८॥ कीं महाघातबाणीं पडतां स्वामीतें ॥ जेवीं मोह सुटे मदनारीतें ॥ तेवीं वृषकेत पाहोनि बकारीतें ॥ नावेक मोहें झळंबला ॥ २९ ॥ तंव भीम असे क्रोधें खवळला ॥ जेवीं वनीं दावाग्नि पेटला ॥ तेवीं गजांवरी लोटला ॥ चूर्ण करीत अश्वांतें ॥३०॥ भीम वेगेंसीं धांवत ॥ ऊरुद्वयाचा पवन सुटत ॥ तेणें सैन्य गगनीं असे उडत ॥ वातचक्रीं पडियेलें ॥३१॥ हय रथ आणि पदाती ॥ वातचक्रीं गरगरां फिरती ॥ केश मुखावरी लोळती ॥ ऊर्ध्वचरण अधोमुख ॥ ३२ ॥ हरिकथा न ऐकतां श्रवणीं ॥ जेवीं जग फिरे जन्ममरणीं ॥ तेवीं फिरे सकळ वाहिनी ॥ वायुचक्रीं गगनांत ॥ ३३ ॥ राजपुत्र लोंबूं लागला ॥ वस्त्रालंकारांविरहित झाला ॥ अधोवदन होऊन ठेला ॥ वमूं लागला रक्तातें ॥ ३४ ॥ नर हय गज छेदिले ॥ त्यांपासून रक्तपूर सुटले ॥ तेणें प्रेतदेह वाहून गेले ॥ शुद्ध केली रणभूमी ॥ ३५ ॥ ऐसा थोर आकांत वर्तला ॥ तंव तो सुवेग धांविन्नला ॥ तेणें भीम तो पाचारिला ॥ काय बोलिला तयाशीं ॥ ३६ ॥ मी यौवनाश्वाचा ज्येष्ठ सुत ॥ सवेग नामें निश्चित ॥ मजसीं तूं युद्ध करीं निभ्रांत ॥ कैसा जाशील येथुनी ॥ ३७ ॥ ऐसें बोलोनि उडी वेगें ॥ रथाखालीं टाकिली सुवेगें ॥ गदा घेवोनी अति रागें ॥ भीमवक्षस्थळीं ताडिली ॥ ३८ ॥ भीमें साहोनि ती गदा ॥ केला सुवेग वीराचा चेंदा ॥ ते दोघे पावले युद्धमदा ॥ क्रोधें मारिती परस्परें ॥ ३९ ॥ तंव भीमें सुवेग धरिला ॥ चरणीं धरोनि शतवार फिरविला ॥ वेगें नभमंडळांतरीं भिरकाविला ॥ मग आपटिला भूमीसी ॥ ४० ॥ हात घांसितां धरणीसी ॥ तों हातींचा निष्टला सुवेग वेगेंसीं ॥ चरणीं धरूनि वायुपुत्रासी ॥ त्याची घांसी भूवरी पृष्ठी ॥ ४१ ॥ तंव भीमें मत्त कुंजर उचलिला ॥ तो वेगें सुवेगावरी टाकिला ॥ येतां तो गज चरणीं धरिला ॥ फिरोनि टाकिला तयावरी ॥४२॥ मुष्टिघातें करतळप्रहारें ॥ ते मार करिती परस्परें ॥ त्या घायांचे अति निकरें ॥ दोघे पडले मूर्च्छित ॥ ४३ ॥ तंव तो कर्णपुत्र सावध झाला ॥ पन्नगास्त्रें राजा पीडिला ॥ यौवनाश्वही सावध झाला ॥ तेणें सोडिलें गरुडास्त्र ॥ ४४ ॥ आणिक राजा अति वेग करी ॥ पिशाच अस्त्र टाकी तयावरी ॥ कर्णकुमारें जाणोनि अति सत्वरी ॥ वैष्णवास्त्र सोडिलें ॥ ४५ ॥ तें वैष्णवास्त्र अतिदारुण ॥ तेजें व्यापिलें त्रिभुवन ॥ तयाचें करावया निर्रसन ॥ रायें सोडिलें ब्रह्मास्त्र ॥ ४६ ॥ त्या ब्रह्मास्त्राच्या तेजेंकरून ॥ वैष्णवास्त्र

१ प्राप्त झाला. २ राम. ३ कार्तिकस्वामीला. ४ शंकराला. ५ क्षणमात्र. ६ सेना. ७ हत्ती. ८ नाश.

झालें लीन ॥ ऐसें वृषकेतूनें जाणोन ॥ मग मोकलिलें पाशुपत ॥ ४७ ॥ पाशुपतास्त्रतेजेंकरून ॥ ब्रह्मास्त्र गेलें लपोन ॥ सवेग मोहनास्त्रातें सोडून ॥ मोहित केलें यौवनाश्वा ॥ ४८ ॥ त्या मोहनास्त्राच्या प्रभावें ॥ यौवनाश्व विस्मित झाला जीवें ॥ तों समीप जाऊनि कर्णोद्भवें ॥ अवलोकिलें रायातें ॥ ४९ ॥ मग वस्त्राचा व्यजन[1] करोनी ॥ वायू घालीत चंद्रवदनी ॥ ह्मणे जें पुण्य झालें कृष्णाराधनीं ॥ तेणें पुण्यें हा वांचो ॥ ५० ॥ माझी युद्धतृष्णा नसे पुरली ॥ यासी कां दीर्घ मूर्च्छना आली ॥ धांव पाव गा वनमाळी ॥ राजया करीं सप्राण ॥ ५१ ॥ हा सुशब्द कर्णीं पडला ॥ तों राजा सत्वर सावध झाला ॥ उठोनि पाहे तंव जवळा ॥ सेवा जाणवीत वृषकेतू ॥ ५२ ॥ मग संतुष्ट झाला धरारमण[2] ॥ स्नेहें वृषकेतूस दिधलें आलिंगन ॥ प्रेमयुक्त सजळ करी नयन ॥ काय वचन बोलिला ॥ ५३ ॥ तूं तरी दानशूराचा नंदन[3] ॥ हा प्रत्यय[4] आला मजलागून ॥ आपलें अपार पुण्य वेंचून ॥ प्राणदान मज दिधलें ॥ ५४ ॥ आतां तुजसीं करूं झुंज ॥ तरी मजएवढा नाहीं निर्लज्ज ॥ आणि कृतघ्नता येईल मज ॥ निंद्य होईन जगामाजी ॥ ५५ ॥ जीवित्व आणि राज्य आपुलें ॥ हें म्यां तुज समर्पिलें ॥ आतां ऊठ चाल जाऊं वहिलें ॥ जेथें सुवेग आणि भीमसेन ॥ ५६ ॥ आतां सुवेग आणि भीमसेन ॥ यौवनाश्व आणि कर्णनंदन[5] ॥ चौघे पावोनि समाधान ॥ भद्रावतीसी जातील ॥ ५७ ॥ तेथें समरसें[6] होतील सकळ वीर ॥ आणि पावतील धर्मनगर[7] ॥ तो पुढिले प्रसंगीं रससागर ॥ अगाध आहे धरणीशा[8] ॥ ५८ ॥ जैमिनिहयमेधकथा[9] ॥ श्रवणें हरी भंवरोगव्यथा[10] ॥ ती एकाग्रचित्तें ऐकावी आतां ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ५९ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते पंचमोध्यायः ॥ ५ ॥ ॥ अध्याय ॥ ५ ॥ ॥ ओव्या ॥ ५९ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ शुभं भवतु ॥

---

१ पंखा. २ पृथ्वीपति राजा ( यौवनाश्व ). ३ पुत्र. ४ अनुभव. ५ वृषकेतू. ६ एकचित्त. ७ हस्तिनापुर. ८ जनमेजया. ९ अश्वमेधवर्णन. १० संसारसंबंधी दुःख.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे नृपनाथा ॥ ऐकें स्वपूर्वजांची कथा ॥ जी नेतां श्रवणपंथा ॥ भवव्यथा दूर करी ॥ १ ॥ भानुसुतात्मज आणि नरपती ॥ शोधीत चालिले रणक्षिती ॥ तों ते सावध होऊनियां पाहाती ॥ सुवेग आणि भीमसेन ॥ २ ॥ तों भीमास ह्मणे धरारमण ॥ सहपुत्र मी तुज आलों शरण ॥ आता युद्ध न करावें संपूर्ण ॥ कृपा करून स्वामिया ॥ ३ ॥ भीम यौवनाश्व दोघे भेटले ॥ क्षेम देतांच सुखी झाले ॥ सुवेग वृषकेतू देते झाले ॥ क्षेमालिंगन परस्परें ॥ ४ ॥ तंव घेऊनियां श्यामकर्ण ॥ पुढें उभा ठेला मेघवर्ण ॥ तयासी देऊन आलिंगन ॥ परम समाधान पावले ॥ ५ ॥ आधीं करून भीमस्तुती ॥ तयासी सांगे कर्णात्मजाची ख्याती ॥ ह्मणे वीर ऐसा त्रिजगतीं ॥ नाहीं दुजा देखिला ॥ ६ ॥ हा प्राणदाता झाला मज ॥ यासीं पुनः करूं झुंज ॥ तरी परम होईल मज लाज ॥ या त्रैलोक्यामाझारी ॥ ७ ॥ अन्न वस्त्र विद्या धन ॥ पोषण पालन व्रतबंधन ॥ इतुकें करून जो करील लग्न ॥ त्यासी पीडी तो महापापी ॥ ८ ॥ जेणें वीर मानून तृणासमान ॥ बळें घेऊन गेला श्यामकर्ण ॥ तो हा वीर कवणाचा नंदन ॥ कृपा करून मज सांगिजे ॥ ९ ॥ भीम ह्मणे प्रतापैदिनकर ॥ घटोत्कच नामें माझा कुमर ॥ तयाचा पुत्र हा सुकुमार ॥ मेघवर्ण नाम याचें ॥ १० ॥ राजा ह्मणे धन्य संतती ॥ जयाची त्रिभुवनीं असे ख्याती ॥ ज्याचा सखा कमळापती ॥ त्याचें आश्चर्य हें काय ॥ ११ ॥ भीमा तुझिया चरणप्रसादें ॥ मी पाहीन हरिपादारविंदें ॥ जीं पाहतांच पापवृंदें ॥ भस्म होती क्षणमात्रें ॥ १२ ॥ वित्त आणि दळभार ॥ कृष्णार्पण केलीं साचारें ॥ धर्मकार्जीं आपुलें शरीर ॥ अश्वरक्षणीं समर्पिलें ॥ १३ ॥ अयुत संख्या शुभ्र कुंजर ॥ उरला सात अक्षौहिणी दळभार ॥ हा धर्मकार्जीं केला तत्पर ॥ हयरक्षण करावया ॥ १४ ॥ गोक्षीरधवल कुंजरावरी ॥ दोघे बैसोनि ते सुखावसरीं ॥ सुवेग कर्णनंदन निर्धारीं ॥ अन्य गजावरी बैसती ॥ १५ ॥ पर्वतप्राय गज नीलवर्ण ॥ त्यावरी बैसला मेघवर्ण ॥ अवघे पावोनि समाधान ॥ कुंजरावरी बैसले ॥ १६ ॥ पुढें पाठविले सेवकजन ॥ नगर शृंगारा ह्मणोन ॥ दिव्य चंदनोदकें सिंचन ॥ राजमार्गीं करावें ॥ १७ ॥ गुढिया तोरणें ध्वज पताका ॥ नगरीं उभवाव्या अनेका ॥ दूर्वाक्षता घेऊन कन्यका ॥ राजमार्गीं उभ्या कीजे ॥ १८ ॥ प्रभावतीहून सुरूप ॥ रुक्मपात्रीं घेऊन पंचदीप ॥ ओवाळावया कुरुकुळदीप ॥ शीघ्र येऊंद्या स्त्रियांसी ॥ १९ ॥ ऐसी आज्ञा करून सेवकां ॥ आपण हळू हळू चालिले देखा ॥ सर्वही पावोन हरिखा ॥ नगरामाजी प्रवेशले ॥ २० ॥ चहूंकडे लावोनियां दृष्टी ॥ अपूर्व पाहाती नगरसृष्टी ॥ कन्या सारिती कनकपुष्पवृष्टी ॥ पांडवांवरी संतोषें ॥ २१ ॥ तंव ती प्रभावती परम सुखें ॥ आली ओवाळावया वीरमुखें ॥ निरांजन करूनियां हरिखें ॥ काय स्वमुखें बोलिली ॥ २२ ॥ माझें गत झालें होतें मंगळसूत्र ॥ त्याचें दृढ केलें जेणें सूत्र ॥ तो विजयी हो कां कर्णपुत्र ॥ सौभाग्य केलें अक्षयी ॥ २३ ॥ पर-

१ वृषकेतु. २ प्रतापाचा केवळ सूर्य. ३ कृष्णाचीं चरणकमलें. ४ पापांचा समूह. ५ खरोखर. ६ सुवर्णपात्रामध्यें. ७ करितात. ८ सोन्याच्या फुलांचा वर्षाव.

मानंदें पांचही जण ॥ सत्वर पावले राजभवन ॥ करूनियां दिव्य भोजन ॥ मग सुखशयनीं पहुडले ॥ २४ ॥ मग उठोनियां प्रातः-काळीं ॥ नित्यनेमक्रिया सारिली ॥ सुवेग पाचारूनियां जवळी ॥ आज्ञा करीत नृप त्यातें ॥ २५ ॥ डांगोरा पिटावा नगरांत ॥ जाणें आहे धर्मनगरासी[1] त्वरित ॥ घेऊनियां स्त्री पुत्र वित्त ॥ हरिदर्शनासी निघावें ॥ २६ ॥ नगराबाहेर विनकं[2] उभा ॥ शीघ्र करावा सहस्रखंबा ॥ जो उंचपणें लाजवी नभा ॥ तेथें शोभा करावी ॥ २७ ॥ आणि सांगावें प्रभावतीसी ॥ वेगें निघावें धर्मनग-रासी ॥ तुवां सिद्ध व्हावें सहस्र स्त्रियांसीं ॥ वस्त्रें अळंकार घेऊनियां ॥ २८ ॥ द्रौपदी सुभद्रा महासती ॥ रुक्मिणी आदि श्रीप-तीच्या युवती ॥ गौरवाव्या यथायुक्ती ॥ परम प्रीतींकरूनियां ॥ २९ ॥ आणि विनवावें वृद्ध जननीसी ॥ तुवां यावें धर्मनगरासी॥ नेत्रीं पाहूनियां हृषीकेशी ॥ सार्थक करीं जन्माचें ॥ ३० ॥ तंव तो सुवेग गेला धांवोनी ॥ ह्मणे नृपें पाठविलें पितृजननी ॥ त्यांही धर्मनगराप्रती येवोनी ॥ कृष्णदर्शन करावें ॥ ३१ ॥ तेथें कृष्णा आणि भागीरथी ॥ द्रौपदी रुक्मिणी महा सती ॥ जेथें अनेक ऋषिवरांच्या पंक्ती ॥ तेथें तुवां चलावें ॥ ३२ ॥ वृद्धा ह्मणे रे पुत्रपुत्रा ॥ हीं काय मात आली तुझिया वक्त्रा ॥ मी सर्वथा न येईं धर्मसत्रा ॥ कां रे वृथा करितां वित्तक्षय ॥ ३३ ॥ कैंचा धर्म कैंचा हरी ॥ कैंची कृष्णा कैंची गंगा निर्धारीं ॥ मी वृद्ध झालें या संसारीं ॥ परी दृष्ट[3] श्रुत[4] मज नाहीं ॥ ३४ ॥ तुह्मांस हीं कां आठवली दुर्बुद्धी ॥ कैंचा कृष्ण कैंची यागसिद्धी ॥ घरीं राहूनि करा धर्मवृद्धी ॥ मी तों सर्वथा न येईं तेथें ॥ ३५ ॥ हास्यवदनें सुवेग चालिला ॥ येवोनि तो जनक बोधिला ॥ ह्मणे सर्व सिद्ध कृष्ण-दर्शनाला ॥ स्वामिजननीवांचोनी ॥ ३६ ॥ तों राजा स्वयें उठोनि गेला ॥ वंदूनियां जननीला ॥ माते ऐक माझिया बोला ॥ धर्मनगरासी चलावें ॥ ३७ ॥ होईल भागीरथीचें स्नान ॥ आणि घडेल श्रीकृष्णदर्शन ॥ तेणें हरेल संसारशीण ॥ परम सुखातें पावशी ॥ ३८ ॥ कुंती द्रौपदी आणि रुक्मिणी ॥ सत्यभामा आदि कृष्णरमणी[5] ॥ जयांचे दर्शनें दोषश्रेणी[6] ॥ जळोनि जातील तात्काळ ॥ ३९ ॥ आणि व्यासादिक ते सप्त ऋषी ॥ जयांच्या दर्शनें जळती दोष ॥ श्रवणीं पडतील वेदघोष ॥ तेणें पावन तूं होसी ॥ ४० ॥ पुढें प्राप्त झालिया निधान[7] ॥ अभागी चाले झांकून नयन ॥ चरणें हाणीतलें निधान ॥ तेवीं माते कां करिसी ॥ ४१ ॥ पाहें यज्ञाचें कौतुक ॥ करीं या नरदेहाचें सार्थक ॥ माझा पुत्रपणाचा हरिख ॥ लोकांमध्यें करावा ॥ ४२ ॥ ऐसें ऐकूनि पुत्रवचन ॥ वृद्धा झाली क्रोधायमान ॥ ह्मणे पुत्रा तुझें मूर्खपण ॥ आज संपूर्ण मज कळलें ॥ ४३ ॥ माता ह्मणे माझें वचन ॥ ऐक रे पुत्रा सावधान ॥ कैंचा धर्म कैंचा कृष्ण ॥ यागादि सर्व लटिकें जाणावें ॥ ४४ ॥ कनकवृक्ष ह्मणती धोत्रयासी ॥ शमी सुवर्ण ह्मणती दसऱ्यासी ॥ नातरी जळभ्रांती होय कांचभूमीसी ॥ तेवीं मिथ्या यागादिक ॥ ४५ ॥ मी सर्वथा न येईं येथुनी ॥ माझ्या सुना

१ हस्तिनापुराला. २ तंबू. ३ पाहिलेलें. ४ ऐकिलेलें. ५ कृष्णाच्या स्त्रिया. ६ पापसमुदाय. ७ ठेवा.

ह्या डांकिणी ॥ माझें वित्त नेतील चोरूनी ॥ मग मी धर्माचें काय घेऊं ॥ ४६ ॥ गोधूमक्षेत्र असे पिकलें ॥ त्याचें सेवक करितील वाटोळें ॥ दधि दुग्ध नवनीत असे सांचलें ॥ तें भक्षितील गोपाळ ॥ ४७ ॥ परम दुष्टा माझिया दासी ॥ त्या विकितील चोरूनि धान्यासी ॥ तृणकाष्ठांचिया रासी ॥ निःशेष जाळितील पैं त्यांतें ॥ ४८ ॥ कणगिची काढितील लिंपण ॥ गूळ शर्करा खातील संपूर्ण ॥ मी सर्वांसी आहें दंडन ॥ ह्मणोनि सर्वही वांचलें ॥ ४९ ॥ दृढ पात्रें घरचीं काढिती ॥ लोकांसी जाळावया सर्व देती ॥ उंच वस्त्रें लेवोनि फाडिती ॥ मग मी काय घेऊं कृष्णाचें ॥ ५० ॥ मज तों नलगे कृष्णदर्शन ॥ मग धर्माचें काय प्रयोजन ॥ मज नलगे यागहवन ॥ संसार गोड मज वाटे ॥ ५१ ॥ संसाराहूनि अन्य सुख ॥ कांहीं पुत्रा नाहीं देख ॥ आहे ह्मणती ते परम मूर्ख ॥ पूर्ण अभागी ते जाण ॥ ५२ ॥ परमार्थ तो केवळ शूळ ॥ त्यावरी पडावया कां उतावेळ ॥ संसार मिष्टान्नाचा केवळ ॥ कां रे मुखांतून काढिसी ॥ ५३ ॥ स्वर्ग तो गगनकल्हा़र[2] ॥ परमार्थ तो गंधर्वनगर[3] ॥ हरिभक्ती जाण तें मृगनीर[4] ॥ एक संसार खरा असे ॥ ५४ ॥ मी तों सर्वथा नयें तेथें ॥ जरी तूं वडिलपण मानिसील मातें ॥ माझें वचन प्रमाण तूतें ॥ तरी तुवां सर्वथा न जावें ॥ ५५ ॥ मी जीवंत आहें जोंवरी ॥ तोंवरी वित्त न वेंचावें तिळभरी ॥ मी मेलिया मग भलतें करीं ॥ हें माझेनि दृष्टीं न देखवे ॥ ५६ ॥ ऐसीं दुष्ट वचनें ऐकोनी ॥ राजा ह्मणे हे पापिणी ॥ तरी इसी न्यावें बांधोनी ॥ कृष्णदर्शनें तारावया ॥ ५७ ॥ धर्माविषयीं करितां शिक्षण ॥ कीं विद्येविषयीं करितां ताडण ॥ कीं भजनार्थ करितां निर्भर्त्सन ॥ सर्वथा दूषण असेना ॥ ५८ ॥ क्रोध फार आला यौवनाश्वा ॥ बळें बांधिली ती जरोद्भवा ॥ डोळीमाजी घातली तेधवां ॥ कृष्णदर्शनें तारावया ॥ ५९ ॥ अमंगळ जननीचें वचन ॥ नृपें भीमासी केलें श्रवण ॥ ह्मणोन चालविली बांधून ॥ तेव्हां ती रुदन करीतसे ॥ ६० ॥ पंच रात्री राहून तेथें ॥ मग आरंभिलें प्रयाणातें ॥ स्त्री पुत्र स्वजन सैन्य वित्तातें ॥ घेऊन चालिला यौवनाश्व ॥ ६१ ॥ एकशतविंशति ग्रामें ॥ मार्गीं लागलीं अनुक्रमें ॥ मग रायासी विनविलें भीमें ॥ मी पुढें जाईन द्यावी आज्ञा ॥ ६२ ॥ तुमची सेवा करील कर्णसुत ॥ मी पुढें जाईन जी त्वरित ॥ स्वामी आले ह्मणोनि मात ॥ जाणवीन धर्मराया ॥ ६३ ॥ ऐसें विनवोन त्या राया ॥ भीम चालिला लवलाह्या ॥ वेगें पावोनि निजालया ॥ धर्मरायातें वंदिलें ॥ ६४ ॥ ह्मणे राया तुझा चरणप्रताप ॥ तेणें आह्मी तिघे सुखरूप ॥ अश्व घेऊनि यौवनाश्व नृप ॥ आला दर्शना स्वकुटुंबें ॥ ६५ ॥ रणीं कर्णात्मजें नृप तोषविला ॥ स्वपुण्यें मरतां वांचविला ॥ ऐसा पराक्रम नाहीं केला ॥ भूमंडळीं कवणेंही ॥ ६६ ॥ परम पराक्रमी मेघवर्ण ॥ सर्व सैन्य मानिलेंचि तृण ॥ घेऊन आला जी श्यामकर्ण ॥ युद्ध दारुण करूनियां ॥ ६७ ॥ द्रौपदीदर्शनाचिया लोभा ॥ प्रभावती यौवनाश्ववल्लभा ॥ आली असे दिव्यप्रभा ॥ सहस्र नारीं-

---

१ घास. २ आकाशफूल. ३ क्षणभंगुर. ४ मृगजल.

समवेत ॥ ६८ ॥ तंव देखिले श्रीकृष्णचरण ॥ तयासी घातलें लोटांगण ॥ ह्मणे तुझे चरणप्रतापें करून ॥ मी कार्य साधूनि आलों ॥ ६९ ॥ मग अर्जुना दिधलें आलिंगन ॥ नकुळ सहदेवां भेटे आपण ॥ तंव भीमसेनाची अंगवण ॥ कृष्ण धर्म पाहाती ॥ ७० ॥ कृष्ण ह्मणे माझिया प्राणा ॥ फार श्रमलासी भीमसेना ॥ येरू ह्मणे करितां नामस्मरणा ॥ क्लेश कवणा होतील ॥ ७१ ॥ अमृतसेवनीं जाय मरण ॥ कीं गंगास्नानें पापप्रक्षाळण ॥ होय सर्व क्लेशां निरसन ॥ भावें हरिस्मरण केलिया ॥ ७२ ॥ तंव तो बोले कुरुकुळदीप ॥ यौवनाश्व आला समीप ॥ सम्मुख जाऊनियां तो भूप ॥ महोत्साहें आणावा ॥ ७३ ॥ सर्व हो मिळून आतां ॥ गौरवें आणितील नृपनाथा ॥ ती पुढिले प्रसंगीं कथा ॥ पीयूषसरिता पैं आहे ॥ ७४ ॥ जैमिनिअश्वमेध कथा ती जनीं ॥ मोहभुजंगामृतसंजीवनी ॥ ती सावध ऐकावी श्रवणीं ॥ विनवी श्रीधर श्रोतयां ॥ ७५ ॥ ॥ इति श्रीमन्महाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते षष्ठोध्यायः ॥ ६ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणस्तु ॥ ॥ शुभं भवतु ॥ ॥ अध्याय ॥ ६ ॥ ॥ ओव्या ॥ ७५ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ व्यासचरणारविंदभ्रमर ॥ बोले जैमिनिमुनीश्वर ॥ राया पूर्वजकथामृतसागर ॥ ऐक सादर होउनी ॥ १ ॥ समीप यौवनाश्व आला धांवोन ॥ धर्म बोले भीमासी वचन ॥ शीघ्र द्रौपदीप्रति जाऊन ॥ हें सर्व कथन करावें ॥ २ ॥ वचन ऐकूनि भीम चालिला ॥ शीघ्र द्रौपदीभवन पावला ॥ देखोनि वल्लभेनें वंदिला ॥ बैसविला तया वरासनीं ॥ ३ ॥ दोनी करकमळांतें जोडून ॥ प्राणवल्लभासी बोले आपण ॥ स्वपुत्र पौत्र श्यामकर्ण ॥ घेऊन क्षेम आलां कीं ॥ ४ ॥ वल्लभांग पाहे हाटकांगी ॥ तंव देखे शस्त्रक्षतें सर्वांगीं ॥ परम संतोषली ती अंतरंगीं ॥ मी वीरपत्नी ह्मणोनी ॥ ५ ॥ विद्यातपोमय जे जे पती ॥ ते देखोनि सुखावे विप्रयुवती ॥ संग्राम करी जो वीरख्याती ॥ तो क्षत्रियेसी पती मान्य ॥ ६ ॥ स्वपती देखोनियां सधन ॥ वैश्यस्त्रियेसी हर्ष गहन ॥ वर्णत्रयाचा सेवक जाण ॥ तो पती मान्य शूद्रस्त्रिये ॥ ७ ॥ भीम ह्मणे त्रिभुवनीं दुर्लभ ॥ तें धर्मप्रसादें होय सुलभ ॥ विशेषें शिरीं असतां पद्मनाभ ॥ काय उणें मृगनेत्रे ॥ ८ ॥ परी एक असे मनांत चिंता ॥ ती केवीं परिहरेल आतां ॥ तंव काय ह्मणे गुणसरिता ॥ सांगा वल्लभा झडकरी ॥ ९ ॥ जीची पाहून स्वरूपस्थिति ॥ रंभा लाजोन नये जगतीं ॥ ती यौवनाश्वरायाची प्रभावती ॥ दर्शना आली पैं तुझ्या ॥ १० ॥ जयेची वरांगभूषणश्रेणी[2] ॥ तेजें लोपलासे दिनमणी ॥ जी चातुर्यरत्नांची खाणी ॥ रूपें सांग करी अनंगा ॥ ११ ॥ ती रत्नाकराची स्वामिनी ॥ फुल्लपंकेरुहदलनयनी[3] ॥ ती माने ऐशी वेषकरणी ॥ त्वां मदनकळिके करावी ॥ १२ ॥ नयनीं जी दशशतपत्र ॥ संगें नारी दहा सहस्र ॥ दृष्टिबाणें दशशतनेत्र ॥ विंधूनि पाडिती मृगापरी ॥१३॥ कोठें गेला रमारमण ॥ तयावांचून कैंचें तुज मंडन ॥ ऐसें वल्लभाचें ऐकून वचन ॥ हास्य करी मृगनेत्रा ॥ १४ ॥ एकावांचून रमावल्लभा ॥ प्रिये तुज सर्वथा नये शोभा ॥ सन्निध असतां पद्मनाभा ॥ येत शोभा अनिर्वाच्य ॥ १५ ॥ ऐसें पतीचें वचन ॥ मृगशावाक्षी ऐकोन ॥ सस्मित करूनियां वदन ॥ काय वचन बोलत ॥ १६ ॥ जगदात्मा तो श्रीहरी ॥ त्यावीण शोभा कैंची चराचरीं ॥ जयाचे कृपेनें सौंदर्यलहरी ॥ होय मनोरम जयातें ॥ १७ ॥ अनंग सांग जयाचे पोटीं ॥ तो बंधू असतां जगजेठी ॥ सकळ सौंदर्याची सृष्टी ॥ लोटांगणीं ये पायां ॥ १८ ॥ धर्मप्रसादें प्राप्त संपत्ती ॥ तिनें आपणातें सभाग्य ह्मणती ॥ तो साक्षात् असतां मज धर्मराज पती ॥ काय संपत्तीस मग उणें ॥ १९ ॥ द्रुपदरायाची नंदिनी ॥ पांच वीरमुकुटांची कामिनी ॥ विशेषें श्रीनिवासाची भगिनी ॥ काय शोभेसी न्यूनता ॥ २० ॥ अंतर्गृहीं असे जगज्जीवन ॥ तो धर्मातें न जाय सोडून ॥ तयावांचून आमुचें मंडण ॥ नाहीं स्वामी देहासी ॥ २१ ॥ तप्तचामीकरगौरवर्ण ॥ रत्नखचित मंडित कर्ण ॥ बोलोन भक्तिगर्भ मधुर वचन ॥ वायुनंदना सुखी केलें ॥ २२ ॥ आणिक करूं जरी विनोदस्थिती ॥ तरी जवळी आला तो नरपती ॥ सुवेष करून शीघ्रगती ॥ वस्त्राभरणेंसीं त्वां

१ सोन्याप्रमाणें जिची अंगकांति आहे अशी. २ डोकींतील अनेक अलंकार. ३ कमलपत्रनयना. ४ हरिणबालकाप्रमाणें पाणीदार आहेत डोळे जिचे अशी.

यावें ॥ २३ ॥ यापरी बोलून गेला भीमसेन ॥ शीघ्र पावला सभास्थान ॥ कृष्णधर्मादि मिळून ॥ सामोरे चालिले यौवनाश्वा ॥ २४ ॥ रत्नखचित शिबिका आणिली ॥ तयेमाजी द्रौपदी बसविली ॥ सुंदर सहस्र दासींनीं वेष्टिली ॥ चालिले पुढें यंत्रधार ॥ २५ ॥ जियेची पाहतां शरीरशोभा ॥ लाजें प्राण त्यजूं पाहे रंभा ॥ मनोभवाचिया धैर्यस्तंभा ॥ भंगता होय ते काळीं ॥ २६ ॥ पंचप्राणांसह देवकीनंदन ॥ सैन्य अवतारसहस्र घेऊन ॥ शीघ्र चालिला तेथून ॥ भक्तवरासी भेटावया ॥ २७ ॥ छत्र ध्वज पताका शोभती ॥ नाना वाद्यें वाजती ॥ महोत्साहें शीघ्रगती ॥ बाह्य प्रदेशीं पातले ॥ २८ ॥ धन्य भाग्य यौवनाश्वाचें ॥ भेटीस चालिलें ध्येय मुनींचें ॥ धर्मही इच्छी दर्शन त्याचें ॥ परम प्रीतीकरूनियां ॥२९॥ येरीकडे तो अवनीपती ॥ सैन्य सिद्ध करून निगुती ॥ छत्र ध्वज पताका शोभती ॥ अनेक वाजती महावाद्यें ॥ ३० ॥ पुढें करूनियां श्यामकर्ण ॥ तयामागें कर्णनंदन ॥ तयामागें सकल सैन्य ॥ सहकुटुंबेंसीं आपण उभा असे ॥ ३१ ॥ धर्मैं यौवनाश्व तो देखिला ॥ वेगें कुंजरांवरून उतरला ॥ तंव तो यौवनाश्वें वंदिला ॥ धर्मैं आलिंगिला प्रीतीनें ॥ ३२ ॥ धर्म ह्मणे महाराजा ॥ तूं पांचवा बंधु आलासी माझा ॥ आतां भेटें अधोक्षजा ॥ योगेश्वरां दुर्लभ जो ॥ ३३ ॥ रायें देखिला श्रीरमण ॥ प्रेमें घातलें लोटांगण ॥ देवें दिधलें आलिंगन ॥ भक्तवत्सल ह्मणोनी ॥ ३४ ॥ ह्मणे धन्य हरी हा श्यामकर्ण ॥ याचे प्राणासी केलें रक्षण ॥ ह्मणून भीम कर्णनंदन ॥ माझे भवनासी हे आले ॥ ३५ ॥ या भीमसेनाचे चरणप्रसादें ॥ म्यां देखिलीं हरिपादारविंदें ॥ देखतांचि माझीं पापवृंदें ॥ पळती दिगंतराबाहेरी ॥ ३६ ॥ धन्य वृषकेतू कर्णनंदन ॥ याचा पराक्रम अतिगहन ॥ मज दिधलें प्राणदान ॥ निजपुण्य वेंचूनी ॥ ३७ ॥ तंव तो सुवेगें देव देखिला ॥ प्रेमें चरणीं माथा ठेविला ॥ माधवें उठवूनि आलिंगिला ॥ परम भक्त ह्मणोनी ॥ ३८ ॥ मग सुवेग ह्मणे हृषीकेशी ॥ आतां न सोडीं मी चरणांसी ॥ जें दुर्लभ योगेश्वरांसी ॥ तें हृदयाकाशीं धरीन मी ॥३९॥ आतां कृष्णप्रीतीकारणें ॥ धर्मकाजीं प्राण वेंचणें ॥ शीघ्र श्यामकर्णातें सोडणें ॥ पृथ्वीप्रदक्षिणेलागोनी ॥ ४० ॥ मग बोले यौवनाश्व आपण ॥ कोठें तो वैष्णवाग्रज अर्जुन ॥ जेणें शरीं सेतू बांधून ॥ पैजीं हनुमंत जिंकिला ॥ ४१ ॥ जेणें शॅरसोपानें अद्भुत ॥ आणिला स्वर्गींचा ऐरावत ॥ सकुटुंब आणिला उमाकांत ॥ जननीव्रताकारणें ॥ ४२ ॥ जेणें जिंकिला तो मॅदनदहन ॥ तो मज भेटवा सुॅभद्रारमण ॥ तंव तोही आलासे धांवोन ॥ क्षेमालिंगन पैं दिधलें ॥ ४३ ॥ नकुळ सहदेवही आले ॥ तेही यौवनाश्वातें भेटले ॥ सुवेगें सर्वांसी दिधलें ॥ क्षेमालिंगन प्रीतीनें ॥ ४४ ॥ मग द्रुपदराजाची बाळी ॥ प्रभावतीसी वेगें भेटली ॥ वस्त्रें अलंकार देती झाली ॥ परम प्रीतीं परस्परें ॥ ४५ ॥ तो देवभक्तांचा सोहळा ॥ नेणों ब्रह्मानंद गोठला ॥ ब्रह्मादिकां न कळे लीला ॥ तें मी काय वर्णूं प्राकृत ॥ ४६ ॥ ऐसे प्रेमें सकल भेटले ॥ महो-



१ पालखी. २ राजा यौवनाश्व. ३ हत्तीवरून. ४ बाणांच्या शिडीनें. ५ शंकर. ६ अर्जुन.

त्साहें नगर प्रवेशले ॥ सभास्थानासी पावले ॥ करिते झाले सुखगोष्टी ॥ ४७ ॥ श्रीकृष्णासमवेत भक्तजन ॥ स्वानंदें सकळीं करूनि भोजन ॥ करिते झाले सुखशयन ॥ यथास्थानीं सर्वही ॥ ४८ ॥ ऐसे तीन मास ते क्रमिले ॥ देव मनीं संतोषले ॥ मग आज्ञा पुसते झाले ॥ धर्मनृपवरातें ॥ ४९ ॥ श्रीहरी ह्मणे अनुरागें ॥ चैत्री पौर्णिमा गेलिया मागें ॥ पुढें एकादश मास उरले सांगें ॥ यज्ञारंभ करावया ॥ ५० ॥ तरी मज आतां आज्ञा द्यावी ॥ मी द्वारका पाहीन बरवी ॥ उग्रसेनादि आधवीं ॥ पाहीन ऐसें वाटतें ॥ ५१ ॥ तूं यौवनाश्वासहवर्तमान ॥ यत्नें पाळीं श्यामकर्ण ॥ आह्मी घेऊन आमंत्रण ॥ चालिलों असों यज्ञाचें ॥ ५२ ॥ ऐसें ऐकून कृष्णवचन ॥ क्षेशें आज्ञा दिधली जाण ॥ मी बोलावूं पाठवीन भीमसेन ॥ तरी शीघ्र यावें कुटुंबेंसीं ॥ ५३ ॥ धर्मा तुझें म्यां पाचारणें ॥ आदरें घेऊन जरी येणें ॥ तरी धन्य धन्य माझें जिणें ॥ येणें महत्वा काय चढलों ॥ ५४ ॥ तुझिया दास्यत्वाकारणें ॥ सगुण स्वरूप म्यां धरणें ॥ तें दास्यत्व जरी न करणें ॥ तें व्यर्थ जिणें हें माझें ॥ ५५ ॥ कौशिकवना पाठवीं मूळ ॥ परजातियाचें पवित्र होय कुळ ॥ तरी मी कृतकृत्य व्हावया सकळ ॥ कुटुंब आणीन सेवेसी ॥ ५६ ॥ बरवें ह्मणोनि देव गेला ॥ धर्म फिरूनि नगरा आला ॥ मग वेदव्यासासी पुसता झाला ॥ धर्मलक्षण ते काळीं ॥ ५७ ॥ आतां पुसलिया धर्माचें लक्षण ॥ सर्व सांगेल बादरायण ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अमृतासमान पैं आहे ॥ ५८ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रवणें शुद्ध पुण्य घडे अगाध ॥ आणि हरी दोष प्रसिद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ५९ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥ अध्याय ॥ ७ ॥ ओव्या ॥ ५९ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥ ॥ ॥ ॥

---

१ प्रीतीनें.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जनमेजय ह्मणे जैमिनी ॥ धन्य धन्य ही तुझी वाणी ॥ केवळ ती नवरसांची तटिनी[1] ॥ ऐकतां चित्ता समाधान ॥ १ ॥ सकळजनहृदयनिवासी ॥ तो द्वारकेसी गेला हृषीकेशी ॥ धर्में धर्म पुशिले व्यासासी ॥ कोणकोण ते मज सांगा ॥ २ ॥ मुनि ह्मणे नृपचूडामणी ॥ कुरुकुळपद्मदिनमणी ॥ तुझें अवधान संजीवनी ॥ मज जडातें चेतवी ॥ ३ ॥ रोहिणीरमणाचे[2] किरण ॥ लागतां चंद्रकांत द्रवे जाण ॥ नातरी परभृतांचें[3] मौन ॥ वसंतागमनीं फिटतसे ॥ ४ ॥ नातरी दिनमणी देखोन ॥ सूर्यकांतांतून पडे हुताशन[4] ॥ तेवीं श्रोता झालिया सावधान ॥ निरसे जडत्व वक्त्याचें ॥ ५ ॥ तरी आतां होय सावधान ॥ तूं ऐकें स्वधर्मनिरूपण ॥ जें धर्माप्रति केलें कथन ॥ दया करून श्रीव्यासें ॥ ६ ॥ धर्म ह्मणे मुनिभूषणा ॥ सांगें स्वामी स्वधर्मकथना ॥ जेणें दुर्घट संसारयातना ॥ लंघून स्वपदा जाइजे ॥ ७ ॥ तो स्वधर्म केलिया निश्चितीं ॥ या लोकीं होय परम कीर्ती ॥ परलोकीं होय सुखप्राप्ती ॥ तेंचि मजप्रती सांगावें ॥ ८ ॥ तंव तो द्वैपायन[5] असे ह्मणत ॥ धर्म तंव असती अनंत ॥ त्यांमाजी तुज किंचित ॥ सांगेन प्राकृत तो ऐकें ॥ ९ ॥ हरिवदनापासून झाला वर्ण ॥ तो श्रेष्ठ जाणावा ब्राह्मण ॥ तयाचें जें कां स्वधर्माचरण ॥ ऐक संक्षेपें सांगतों ॥ १० ॥ श्रुति स्मृति शास्त्रार्थ जाण ॥ तेणें करावें स्वधर्माचरण ॥ ब्रह्मचर्यव्रत करावें दारुण ॥ सद्गुरुचरण सेवावे ॥ ११ ॥ यथोक्त करावा नित्यनेम ॥ विवेकें दमवावा इंद्रियग्राम[6] ॥ विषयवासनेवरी उपरम ॥ असों द्यावें वैराग्य ॥ १२ ॥ वमनप्राय तें परधन ॥ पररमणी मातेसमान ॥ परनिंदा पैशुन्य जाण ॥ प्राण गेलिया न वदावें ॥ १३ ॥ जाणोन करावा सुप्रतिग्रह ॥ दुर्वचनीं न धरावा आग्रह ॥ सर्व भूतांचा न करावा द्रोह ॥ कोणासीं विग्रहँ[7] न करावा ॥ १४ ॥ नित्य करावे पंचमहायज्ञ ॥ भावें करावें तीर्थाटन ॥ सर्वत्रीं असावें सावधान ॥ कुटुंबरक्षण करावें ॥ १५ ॥ स्वधर्माचा उत्तम धर्म ॥ हृदयीं धरावा पुरुषोत्तम ॥ तेणें पाविजे सकळ काम ॥ हा स्वधर्म जाण ब्राह्मणांचा ॥ १६ ॥ आतां हरिर्भुजोद्भव[8] जो वर्ण ॥ त्याचेंही ऐक स्वधर्माचरण ॥ धर्मेंचि करावें प्रजापाळण ॥ षडंश धन पैं घ्यावें ॥ १७ ॥ स्वधर्में करावें युद्ध दारुण ॥ करावें शरणागतांचें रक्षण ॥ आणि करावें वेदाध्ययन ॥ युद्धीं पलायन न करावें ॥ १८ ॥ अश्वमेधादि यज्ञ करावे ॥ नित्य पंचमहायज्ञ करावे ॥ सर्व ब्राह्मण प्रतिपाळावे ॥ दीन अनाथादिक ॥ १९ ॥ यथापराधें करावा दंड ॥ उच्छेदोनि न्यावें पाखंड ॥ प्रताप करावा प्रचंड ॥ वितंडवाद तो न करावा ॥ २० ॥ धर्में करावें धेरापाळण[9] ॥ करावें सैन्यकोशरक्षण ॥ कांहीं न करावें पापाचरण ॥ हा स्वधर्म पूर्ण क्षत्रियांचा ॥ २१ ॥ हरिऊरूपासूनि जन्मला ॥ तो वैश्यवर्ण बोलिला ॥ त्याचा स्वधर्म असे कथिला ॥ तो ऐक आतां धर्मराया ॥ २२ ॥ वैश्यें करावें पशुरक्षण ॥ कृषी[10] करावी धर्मेंकरून ॥ आणि करावें वाणिज्यपण ॥ असत्य वचन न बोलावें ॥ २३ ॥ न्यायें सदा द्यावें धन ॥ कुशीद घ्यावें पाहोन ॥

---

१ नदी. २ चंद्राचे. ३ कोकिळांचें. ४ अग्नि. ५ व्यास. ६ इंद्रियाचा समुदाय. ७ भांडण. ८ विष्णूच्या बाहूंपासून उत्पन्न झालेला. ९ पृथ्वीचें पाळण. १० शेती.

सर्व वस्तूंचे विक्रय जाण ॥ यथान्यायें करावे ॥ २४ ॥ वापी कूप तडाग आराम ॥ आणि विप्रांसी द्यावें धाम ॥ दमवावा इंद्रिय-ग्राम ॥ निंदा कुकर्म न करावें ॥ २५ ॥ सर्व धर्मांचा धर्म परम ॥ हृदयीं असावा पुरुषोत्तम ॥ तेणें तो होय पूर्णकाम ॥ हा जाण स्वधर्म वैश्यांचा ॥ २६ ॥ आतां हरिचरणापासून ॥ झाला तो वर्ण शूद्र जाण ॥ त्याचें ऐक स्वधर्माचरण ॥ मी सांगतों जाण राजेंद्रा ॥ २७ ॥ तीन वर्णांचें करावें सेवन ॥ आणि त्यानें करावें शिवभजन ॥ करावें स्वमर्यादापाळण ॥ इंद्रियदमन करावें ॥ २८ ॥ कृष्यादि काम करावें ॥ न्यायें द्रव्य संपादावें ॥ स्वधर्मव्रत रक्षावें ॥ तीर्थादिगमन जाण पां ॥ २९ ॥ स्वधर्म तोचि धर्म श्रेष्ठ ॥ भावें भजावा नीलकंठ ॥ सेवावें विप्रपदपीठ ॥ हा धर्म नीट शूद्रांचा ॥ ३० ॥ साधारण धर्म चहूंवर्णांचा ॥ संक्षेपें सांगेन तुज साचा ॥ ऐक ह्मणे सुत सत्यवतीचा ॥ कुंतीनंदन धर्मातें ॥ ३१ ॥ स्वधर्मसदन न पाडावें ॥ भूतदयावसन[1] न फेडावें ॥ आणि विवेकवन न तोडावें ॥ कुबुद्धिकुठारेंकरूनि ॥ ३२ ॥ अहा मदिरापान न करावें ॥ श्लाघ्यता श्वान न पाळावें ॥ सन्मानवृक्षावरी न चढावें ॥ पतन होईल ह्मणोनि ॥ ३३ ॥ स्वधर्मे राज्यमार्गी वागावें ॥ निजरूपसदनीं जागावें ॥ निंदाकुकर्मसंगें न लागावें ॥ असाध्य वाक्य सेवोनी ॥ ३४ ॥ हरिकथामृतपान करावें ॥ क्रोधमातंगासी न शिवावें ॥ दुष्टेंद्रियगोकुळ रक्षावें ॥ विषयव्याघ्रापासुनी ॥ ३५ ॥ ब्रह्मस्वकाळकूट न सेवावें ॥ ममतानदींत न पोहावें ॥ अज्ञानभृंगीपानें[2] न डोलावें ॥ भाविकसभेमाझारी ॥ ३६ ॥ निगमागम आराम रक्षावा ॥ त्यामाजी संसार विचारावा ॥ जेवीं राजहंस निजस्वभावा ॥ क्षीरनीरातें निवडी ॥ ३७ ॥ स्वस्वरूपामृतपान सेवावें ॥ जन्ममरणातें हरावें ॥ जंव होय देहपात स्वभावें ॥ तंववरी ऐसें करावेंची ॥ ३८ ॥ आतां स्त्रियांचें स्वधर्मलक्षण ॥ तुज संक्षेपें सांगेन जाण ॥ तेंचि ऐकावें सावधान ॥ ह्मणे नंदन पराशराचा ॥ ३९ ॥ सर्व स्त्रियांचें स्वधर्माचरण ॥ भावें करावें पतीचें सेवन ॥ तें न करितां तयांसी पतन ॥ होय पूर्ण रौरव[3] ॥ ४० ॥ पाद पडतां फणिफणावरी[4] ॥ जेवीं भय संचरे अंतरीं ॥ तेवीं भय वाटे जातां बाहेरी ॥ ती ओळखावी कुलवधू ॥ ४१ ॥ पतिसेवेवांचून अन्य ॥ जयेसी नावडे धर्माचरण ॥ तदनुज्ञें करी तीर्थव्रतदान ॥ तीच जाणावी कुलवधू ॥ ४२ ॥ भ्रतारविरहें अति दुःखित ॥ तदागमनीं हर्षयुक्त ॥ प्रेमें सेवी पतिवचनामृत ॥ तीच जाणावी कुलवधू ॥ ४३ ॥ जेवीं छाया शरीरसंगें ॥ तेवीं भ्रतारसेवेसी जागे ॥ भ्रतारवचनें सद्गदित मागें ॥ तीच जाणावी कुलवधू ॥ ४४ ॥ श्वशुर आणि भावे दीर ॥ सासू नणंदा जावा समग्र ॥ तयांचे वचनीं जी सादर ॥ तीच जाणिजे कुलवधू ॥ ४५ ॥ जीची तालू आणि रसना ॥ कृष्णवर्ण असे जाणा ॥ पदांगुळें न लागती भूमिस्थाना ॥ ती व्यभिचारिणी जाणावी ॥ ४६ ॥ निःशंक करी सुस्वर गायन ॥ लटिकाचि खाजवीतसे कर्ण ॥ तैसेंचि कटीकंडूयनें[5] ॥ ती व्यभिचारिणी जाणावी ॥ ४७ ॥ परपुरुष

१ प्राणिमात्रावर दया हेंच कोणी वस्त्र त्याला. २ अज्ञानरूप भांगेच्या पिण्यानें. ३ नरकवास. ४ सर्पाच्या फडेवर. ५ कमर खाजवणें.

देखोन हास्यवदन ॥ तयापुढें करी बाळाचें चुंबन ॥ परत परतोनी पाहे वदन ॥ ती व्यभिचारिणी जाणावी ॥ ४८॥ धावत खेळत करी गमन ॥ पुरुषदर्शनें लाजे मिथ्या जाण ॥ आवडे कंचुकी नीलवर्ण ॥ ती व्यभिचारिणी जाणावी ॥ ४९ ॥ कार्य नसतां परगृहास जाणें ॥ कामें पुरुषा अवलोकणें ॥ हंसत हंसत करी भाषणें ॥ ती व्यभिचारिणी जाणावी ॥ ५० ॥ माळीण बुरडीण नापिती[1] ॥ नर्तकी कुंटणी आणि दूती ॥ यांची आवडे जयेसी संगती ॥ ती व्यभिचारिणी जाणावी ॥ ५१ ॥ सैरंध्रीपति विवर्जितसूतिका ॥ जोगिणी वैद्यकी आणि भृत्यका ॥ तयांची संगती करितां देखा ॥ ती व्यभिचारिणी जाणिजे ॥५२॥ नृत्य गायन कामशास्त्रकथा ॥ यावांचून नावडे सर्वथा ॥ पति देखतां क्रोध ये चित्ता ॥ ती व्यभिचारिणी जाणावी ॥ ५३ ॥ नारायणरूप निजरमणं[2] ॥ तयातें दिधलें सोडून ॥ कामालागीं सेवी गुरुचरण ॥ ती व्यभिचारिणी जाणावी ॥ ५४ ॥ आतां असो तें दुर्लक्षण ॥ याचें काय आहे प्रयोजन ॥ जाणोनि त्यागावें संपूर्ण ॥ साक्षेपें जाण सांगावें ॥ ५५ ॥ विधवा झाली जी नारी ॥ तियेचा स्वधर्म तो अवधारीं ॥ तिणें कुंतळ[3] न ठेवावे शिरीं ॥ वलय कंचुकी[4] न धरावी ॥ ५६ ॥ जरी केश ठेवील मस्तकीं ॥ तरी केशसंख्यायुगें पचे नरकीं ॥ तांबूलचर्वण करितां मुखीं ॥ पडे नरकीं रक्ताचे ॥ ५७ ॥ तिनें पर्यंकशयन[5] न करावें ॥ द्विवार भोजन वर्जावें ॥ सदा मलिन वस्त्र नेसावें ॥ ध्यावें निर्मळ भोजनार्थ ॥ ५८ ॥ जरी तिनें भंग केला ॥ तरी भ्रतारासह नरकीं वास तयेला ॥ ह्मणोन रक्षावें तियेला ॥ विश्वास न धरावा स्त्रियेचा ॥ ५९ ॥ भ्रताररूपी श्रीनारायण ॥ तयाचें करावें पूजन ॥ आणि करावें देहशोषण ॥ तीर्थयात्रागमनादी ॥ ६० ॥ स्वधर्मच्युत[6] होती चारी वर्ण ॥ तरी तें पातक रायासी जाण ॥ ह्मणोनि नृपें रक्षावे वर्ण ॥ ईश्वरआज्ञेंकरूनियां ॥ ६१ ॥ दुष्ट घातकी पिशुनं[7] ॥ द्यूतकर्ता नास्तिक खळ जाण ॥ हे रायानें समीप न ठेवावे पूर्ण ॥ असतां सुख प्रजेस कैंचें ॥ ६२ ॥ भुजगमुखीं काळकूट असे ॥ तेंचि वृश्चिकपुच्छाग्रीं वसे ॥ खळजनांचे सर्वांगीं असतसे ॥ ह्मणूनि सर्वथा दवडावे ॥ ६३ ॥ खळसर्पाचा वध विपरीत ॥ खळ अन्य कर्णीं दंश करित ॥ अन्य प्राणें होय मुक्त ॥ सर्पदंशें तोचि मरे ॥ ६४ ॥ परी सर्पविष उतरावया जाण ॥ धन्वंतरी आहे विचक्षण ॥ खळविष हरावयालागून ॥ वैद्य त्रिभुवनीं असेना ॥ ६५ ॥ जे न चिंतिती हरिचरण ॥ जे न पूजिती गौरीरमण ॥ जे न मानिती विप्रवचन ॥ ते तूं समीप न ठेवावे ॥ ६६ ॥ आहे निंद्य चांडाळयाती ॥ परी नित्य चिंती रमापती ॥ तो देवातुल्य ऐसें बोलती ॥ सर्वत्र साधू राजेंद्रा ॥ ६७ ॥ यालागीं रे धर्मनंदना ॥ बरवें करीं रे धर्मरक्षणा ॥ अष्टांश पावती पुण्यांशचरणा ॥ निरिच्छित पाप तैसेंची ॥ ६८ ॥ कोणें धर्में होईल लक्ष्मी स्थिर ॥ हाचि प्रश्न करील युधिष्ठिर ॥ तें पुढिले प्रसंगीं कथासार ॥ अति मधुर पैं[8] असे ॥ ६९ ॥ जैमिनिअश्वमेधकथेचा काढा ॥ वारंवार ध्यावा धडपुढा ॥ येणें जाईल भवरोग गाढा ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ७० ॥ ॥ इति श्रीमहाभारते आश्व० अष्टमोध्यायः ॥ ८ ॥ ॥

१ न्हावीण. २ स्वपति. ३ केश. ४ चोळी. ५ पलंगावर निजणें. ६ आपल्या धर्मापासून भ्रष्ट. ७ चहाडखोर. ८ हुशार, कुशल.


अध्याय ९.
श्रीव्यास.
भीम.
धर्म.
भीम.
दासी.
अष्टनायका.
श्रीकृष्ण भोजनास बसले आहेत.

श्रीगणेशाय नमः ॥  ॥ कुंतीजठरोदधिनिशारमण ॥ व्यासमुनीप्रति करी प्रश्न ॥ तो जनमेजयासी सावधान ॥ ऐक ह्मणे जैमिनी ॥ १ ॥ व्यासास ह्मणे धर्मनंदन ॥ सदा स्थिर लक्ष्मीनारायण ॥ गृहीं होती ज्या धर्मेंकरून ॥ तें कृपा करून मज सांगें ॥ २ ॥ तंव व्यास ह्मणे धर्मराया ॥ गृहीं लक्ष्मीनारायण स्थिरावया ॥ तुज मी सांगतसें उपाया ॥ तें सावधान ऐकावें ॥ ३ ॥ जेथें शौचाचार सत्य वचन ॥ जेथें सदा करिती शुभचिंतन ॥ स्त्री करी जेथें पतिसेवन ॥ त्या घरीं लक्ष्मी स्थिरावे ॥ ४ ॥ पुत्र सेविती मातापितरां ॥ कनिष्ठ सेविती ज्येष्ठ सहोदरां ॥ जेथें काम वश करी नरां ॥ त्यां घरीं लक्ष्मी स्थिरावे ॥ ५ ॥ जेथें नसे लटकी साक्षी ॥ जेथें भोजन न घडे असाक्षी ॥ जेथें कृतघ्नता नसे साधुपक्षी ॥ त्या घरीं लक्ष्मी स्थिरावे ॥ ६ ॥ जेथें वित्त असतां नव्हे शठपण ॥ जेथें स्वल्पही नसे भ्रांतिवचन ॥ जेथें श्राद्धक्रिया होती जाण ॥ त्या घरीं लक्ष्मी स्थिरावे ॥ ७ ॥ जेथें भुक्तिमुक्ति होय कर्म ॥ जेथें वचन बोलती अमृतोपम ॥ शूरत्व करोनि न बोलती पराक्रम ॥ त्या घरीं लक्ष्मी स्थिरावे ॥ ८ ॥ स्वयें प्राप्त झालिया पररमणी ॥ तीतें मानी जो स्वजननी ॥ वापी कूपादिकारक जनीं ॥ त्या घरीं लक्ष्मी स्थिरावे ॥ ९ ॥ देवालयें विप्रमंदिरें ॥ करिती आराम आणि सरोवरें ॥ जेथें तीर्थयात्रा आदरें ॥ त्या घरीं लक्ष्मी स्थिरावे ॥ १० ॥ जेथें नसे पैशुन्य आणि निंदा ॥ जेथें असे व्रत तप दान सदा ॥ जेथें कलह नसे कदा ॥ त्या घरीं लक्ष्मी स्थिरावे ॥ ११ ॥ जे दुष्ट आणि दुर्जन ॥ वृषलीपति आणि पिशुन ॥ त्यांतें लक्ष्मी आणि नारायण ॥ कदा काळीं शिवेना ॥ १२ ॥ जो लवणादिरसविक्रय करी ॥ जो वस्त्र हेमाची चोरी करी ॥ जो संपूर्ण द्यूतक्रिया करी ॥ लक्ष्मी त्या घरीं न राहे ॥ १३ ॥ द्यूतक्रियेचा अवगुण ॥ तुवां शरीरीं अनुभविला जाण ॥ त्रयोदश वर्षे वनवास पूर्ण ॥ याच योगें तुज घडला ॥ १४ ॥ बहुतांनीं तुज निवारिलें ॥ परी तुवां कवणाचें नाहीं ऐकिलें ॥ तेव्हांच मज समजलें ॥ क्षय मांडला कौरवांचा ॥ १५ ॥ नळासारिखा पुण्यश्लोक ॥ तो द्यूतव्यसनीं पावला शोक ॥ झाला ऋतुपर्ण रायाचा सेवक ॥ स्त्रीपुत्रवियोगें दुःखित ॥ १६ ॥ यालागीं वडिलांचें वचन ऐकावें ॥ द्यूत सर्वथा न खेळावें ॥ खेळतां पण न घालावें ॥ राज्य स्त्री आणि धनाचे ॥ १७ ॥ जेथें श्रोत्री तापसियां अपमान ॥ जेथें मृगया आणि मदिरापान ॥ जेथें साधुनिंदा घडे जाण ॥ तेथें लक्ष्मी न राहे ॥ १८ ॥ जेथें पुस्तकांचें होय हरण ॥ जेथें पुष्प फळ हरतील तृण ॥ तये घरीं लक्ष्मीनारायण ॥ सर्वथाही वसेना ॥ १९ ॥ दिव्य हरिकथामृतरसायन ॥ न सेविती काय जयाचे श्रवण ॥ जेथें न पडे द्विजचरणजीवन ॥ तेथें लक्ष्मीनारायण न राहे ॥ २० ॥ आतां असो ही आडकथा ॥ यज्ञारंभ जवळी आला तत्वतां ॥ बोलावूं पाठविजे अच्युता ॥ त्यावांचोनि याग हा न घडेचि ॥ २१ ॥ ऐसें ऐकून व्यासवचन ॥ परम संतोषला धरारमण ॥ शीघ्र पाचारोनियां भीमसेन ॥ काय त्याप्रति बोलत ॥ २२ ॥ झडकरी जावें

१ कुंतीच्या उदररूप क्षीरसमुद्राचा चंद्र ( धर्म ). २ कृपणता. ३ उपभोग. ४ शूद्रस्त्रीशीं गमन करणारा. ५ सोन्याची. ६ वेदवेत्ता ब्राह्मण. ७ शिकार.

द्वारकेप्रती ॥ भावें विनवावा श्रीपती ॥ यज्ञसमय आला शीघ्रगती ॥ तरी त्वां सहकुटुंबें पैं यावें ॥ २३ ॥ ऐसें ऐकोनि नृपवचन ॥ सत्वर चालिला पृथानंदन ॥ शीघ्र पावोन द्वारकापट्टण ॥ श्रीकृष्णभवन पावला ॥ २४ ॥ जंव मंदिरीं प्रवेशला वायुनंदन ॥ तंव देव करीत होते भोजन ॥ बंधुवर्गासमवेत जाण ॥ परमानंदें बैसला ॥ २५ ॥ सविस्तर वर्णूं भोजनकथा ॥ तरी बहुत विस्तार होईल ग्रंथा ॥ संक्षेपेंकरूनियां आतां ॥ किंचितार्था सांगेन ॥ २६ ॥ बरवा सारोन नित्यनेम ॥ सद्भावें पूजोनि द्विजोत्तम ॥ भोजनीं बैसला मेघश्याम ॥ गृहस्थाश्रम संपादी ॥ २७ ॥ रत्नखचित मांडिलीं ताटें ॥ तळीं तिवई ठेविलीसे नेटें ॥ माजी ओदन ओगराळें स्पष्टें ॥ जेवीं कळ्या मोगऱ्याच्या ॥ २८ ॥ भोंवत्या पायसांच्या हारी ॥ नेणों चंद्रकांत धुतला हारी ॥ माजी शर्करा अति साजिरी ॥ अमृतेंकरातें लाजवी ॥ २९ ॥ भोंवत्या पंक्ती अनेका ॥ नाना वाढिल्या असती शाका ॥ ज्या रुची देती रमानायका ॥ ज्या मर्दिल्या निंबुरसें ॥ ३० ॥ चक्राकार अति वर्तुळ ॥ चंद्रबिंबाऐशा तेजाळ ॥ ऐशिया पोळियांचे कवळ ॥ मुखीं गोपाळ घालितसे ॥ ३१ ॥ अति दीर्घ सूक्ष्म वर्तुळ जाण ॥ साकरमांडे अमृतासमान ॥ जे तप्तक्षीरामाजी झाले लीन ॥ ग्रासमात्र ते होती ॥ ३२ ॥ अनरसे फेण्या गुरवळ्या ॥ सांज्या पुऱ्या क्षीरघाऱ्या ॥ दुग्धशर्करेंत घोळिल्या ॥ ज्या वाढिल्या देवकीनें ॥ ३३ ॥ स्नेहकढईमाजी दिव्य जाहले ॥ अनुतापाग्नीनें जे पचले ॥ मग अनुरागदशेस जे आले ॥ ऐसे वटकें नवविध ॥ ३४ ॥ एक कथिकेमाजी भिजविले ॥ एक दह्यामाजी भिजविले ॥ एक दुग्धामाजी शिरविले ॥ एक भिजविले चिंचरसें ॥ ३५ ॥ ऐसे नानाविध ते वटक ॥ त्यांचा ग्रास घेत रमानायक ॥ लवण मिरची हिंग सम्यक ॥ रुची देत भिन्नभिन्न ॥ ३६ ॥ सगर्भ शुभ्र खाज्या करंज्या ॥ पूर्णगर्भ त्या लवरिया ॥ सघृत शर्करायुक्त लुचया ॥ ज्या यदुराया आवडती ॥ ३७ ॥ मधुवर्णा आणि सुवासित ॥ रत्नवाटीमाजी घातलें घृत ॥ जें भोजनीं प्रधान ह्मणवित ॥ तेंच अनंत जेवितसे ॥ ३८ ॥ सांडगे पापड कोशिंबिरी ॥ सभोंवत्या त्यांचिया हारी ॥ लवणशाका परोपरी ॥ शिखरिणी त्या अनेका ॥ ३९ ॥ सद्यस्तक्राची कथिका ॥ कढोनि जाहली समरसिका ॥ जीचा मुखीं घेतां भुरका ॥ रुची यदुराया देतसे ॥ ४० ॥ लाडू मोदक अपार ॥ पीत वैरान्न अति सुंदर ॥ जेवितां जयातें दामोदर ॥ परम सुखातें पावतसे ॥ ४१ ॥ द्राक्ष आणि पक्क आम्रफळें ॥ तैशींच सोलींव कर्दळीफळें ॥ ऐशीं नानापरींचीं फळें ॥ मुखीं गोपाळें घालिजेती ॥ ४२ ॥ शुभ्र साय आणि दधि दुग्ध ॥ त्यामाजी नवनीतगोळ विशद ॥ आनंदें जेवीतसे गोविंद ॥ बाळअभ्यास पैं त्याचा ॥ ४३ ॥ रत्नखचित तार्टस्यंदन ॥ त्यावरी बैसला भूपओदन ॥ तप्तकनकवर्ण वरान्न ॥ शिरीं आंतपत्र साजिरें ॥ ४४ ॥ शाका सेवकपंक्ती शोभत ॥ बरवा प्रधान तें घृत ॥ कथिका वाद्य शोभत ॥ चामरें करपल्लवांचीं ॥ ४५ ॥ ऐशिया परिवारें शृंगारिला ॥ ओदनभूपती

१ भीमसेन. २ भात. ३ चंद्राला. ४ वडे. ५ नऊ प्रकारचे. ६ कढीमध्यें. ७ वरण. ८ ताटरूपी रथ. ९ राजा भात. १० अबदागीर. ११ भात.

तो निघाला ॥ तेणें जठराग्नि संहारिला ॥ घडी न लागतां निजबळें ॥ ४६ ॥ मुखीं घेतां जयाचें नाम ॥ भवभय जाऊन होय विश्राम ॥ ऐसा सर्वात्मा पूर्णकाम ॥ गृहस्थाश्रमरीती संपादी ॥ ४७ ॥ ऐसें भोजन करितां यदुनायका ॥ सभोंवत्या असती अष्टनायिका ॥ चामरें व्यजनें ढाळिती कौतुका ॥ विनोद करिती राजसा ॥ ४८ ॥ त्या श्रीनिवासाचिया चिच्छक्ती ॥ कोण वर्णील स्वरूपस्थिती ॥ ज्यांच्या कोटिशः सुरयुवती ॥ सौंदर्यपणा न येती पैं ॥ ४९ ॥ त्यांमाजी सत्यभामा वेल्हाळा ॥ घालोनि पारिजातपुष्पमाळा ॥ विनोद करी तमाळनीळा ॥ तें सावधान ऐकावें ॥ ५० ॥ सत्यभामा ह्मणे हो रुक्मिणी ॥ आतां बरवे जेवूं शिकले चक्रपाणी ॥ धर्मराजप्रसंगेंकरूनी ॥ चातुर्यपण हे शिकले ॥ ५१ ॥ बाळपणीं भोजन घरचें ॥ तक्रभाकर आणि लोणचें ॥ तें काय स्मरतील साचें ॥ दिव्यान्न हें भक्षितां ॥ ५२ ॥ उत्तम पाहोन कालिंदीथडी ॥ तेथें पसरोनियां घोंगडी ॥ सभोंवते मिळवूनि गोपगडी ॥ भक्षिती परवडी शिदोऱ्या ॥ ५३ ॥ गायी वळावया गोपां धाडित ॥ मागें तयांच्या शिदोऱ्या सोडित ॥ शेवटीं उच्छिष्टें आपण भक्षित ॥ तें काय चित्तीं आठवेल ॥ ५४ ॥ खातखात गाती आणि नाचती ॥ वाहाणा पाईंच्या न काढिती ॥ गोपपृष्ठीवरी वेंघती ॥ तें काय आतां आठवेल ॥ ५५ ॥ मुखेंच करिती जलप्राशन ॥ सभाग्यासी मृन्मय भाजन ॥ नाहीं तरी करटियुगीं पुसोन ॥ तैसेचि धांवती गाईमागें ॥ ५६ ॥ गळां वनगुंजांचे हार ॥ शिरीं मयूरपिच्छांचे भार ॥ काठी कांबळी खांदां धरणीविहार ॥ हें तों वैभव पूर्वीचें ॥ ५७ ॥ आतां छत्रचामरें शोभती ॥ चतुरंगसेना असे ग्रंथीं ॥ नाना मिष्टान्नें दिव्य युवती ॥ हा तो प्रताप धर्माचा ॥ ५८ ॥ उग्रगंधा अरूप गौळणी ॥ नाटजातीच्या हस्तिणी ॥ तयांसी लुब्ध हे चक्रपाणी ॥ ही बाळपणींची खलीला ॥ ५९ ॥ तंव ती वाक्य वदे रुक्मिणी ॥ हे तों मुळींचेचि अवगुणी ॥ मी देववचन ऐकोनि श्रवणीं ॥ उगीच चरणीं भाळलें ॥ ६० ॥ सांगणें पूर्ण आलें अनुभवास ॥ बरवा केला कर्मनाश ॥ निर्मळ केलें संसारास ॥ वाटे त्रास विषयाचा ॥ ६१ ॥ मायबापांची आस तुटली ॥ प्रपंचसुखसरिता आटली ॥ जन्ममरणलता समूळ उपडली ॥ हा वनमाळी पाहातांची ॥ ६२ ॥ याच्या संगें ऐसें केलें ॥ पहिलें जीवपणही नेलें ॥ पुढें काय होईल तें न कसे ॥ ऐसें बोले रुक्मिणी ॥ ६३ ॥ सर्वांचें मनोगत असें ॥ कांहीं उत्तर द्यावें यदुकुळहंसें ॥ परी कांहीं न बोलिजे इंदिरेशें ॥ जननी समीप ह्मणूनी ॥ ६४ ॥ तंव ती बोले कृष्णजननी ॥ काय बोलतां गे निर्लज्ज होउनी ॥ माझा बळिवंत गे चक्रपाणी ॥ जेवूं द्या गे सावकाश ॥ ६५ ॥ हा तुमचे गोष्टीस लुब्धतो ॥ मुखींचा ग्रास मुखींच राहतो ॥ वक्रदृष्टी तुह्मांकडे पाहतो ॥ पात्राकडे नसे दृष्टी ॥ ६६ ॥ मी तों याची जननी खरी ॥ म्यां वाहिला नव मास उदरीं ॥ मीच याचें काम करीन निर्धारीं ॥ तुह्मी मंदिरीं उग्याच असा ॥ ६७ ॥ आतां मी पावलें रुक्मिणीवाक्यास ॥ हा पुढें

१ पंखे. २ सुंदर. ३ श्रीकृष्ण. ४ पृथ्वीवर सर्वत्र भटकणें. ५ संसाररूप सुखाची नदी.

येणार उदरास ॥ तेंच बंधन झालें आह्मांस[१] ॥ गमनागमन खुंटलें ॥ ६८ ॥ विषयवनीं होतों भ्रमत ॥ स्वकर्मफलें असों भक्षित ॥ तंव यमनियमशृंखला[२] अकस्मात ॥ घालोनि ठेविलें एकांतीं ॥ ६९ ॥ याचें पुत्रपणाचें कौतुक ॥ समूळ नेलें विषयसुख ॥ शेवटीं जीवींच हरील निःशंक ॥ ऐसें मजला गमताहे ॥ ७० ॥ यासी कैंचीं गे मातापिता ॥ कैंचा बंधू कैंची वनिता ॥ अवघीं लटकीं मिळवोनि सर्वथा ॥ झाला आतां गृहस्थाश्रमी ॥ ७१ ॥ तंव सत्यभामा ह्मणे आत्याबाई ॥ तुह्मांसी तरी ह्मणावें काई ॥ तुह्मी कां ह्मणवितां याची आई ॥ केवीं उदरीं धरिलें हो ॥ ७२ ॥ अनंत ब्रह्मांडें ज्याचे उदरीं ॥ तो केवीं धरिजेल गर्भागारीं ॥ याची साक्ष तों चराचरीं ॥ सज्जन कोणी न देती ॥ ७३ ॥ तुह्मीं यासी धरिलें उदरीं ॥ कोणीं देखिलें नाहीं चराचरीं ॥ मीं तों नित्य धरिलें उरावरी ॥ परी कर्मनाश कैं करतील ॥ ७४ ॥ सर्वां मिळून धरिला गोवर्धनगिरी ॥ याचें नांव झालें चराचरीं ॥ मी यासी धरिलें कुचाग्रावरी ॥ रतिसमयीं अवधारा ॥ ७५ ॥ पुण्य यश नाम होतें ये जनीं ॥ तें पुण्य अर्पिलें याचे चरणीं ॥ आतां नामरूपादि कहाणी ॥ काढूं नये सर्वथा ॥ ७६ ॥ ऐसें ऐकोन प्रियवचन ॥ कांहीं विस्मित वदनें बोलावें जाण ॥ तंव द्वारीं उभा ठेला भीमसेन ॥ जाणोनि देव संतोषला ॥ ७७ ॥ सैरंध्रीस नेत्रसंकेत केला ॥ तिणें द्वारीं भीम उभा केला ॥ स्वामी बैसले भोजनाला ॥ भरले पायीं कां जातां ॥ ७८ ॥ आतांचि देव बैसले भोजनीं ॥ तुह्मी तों आलेत दुरोनी ॥ दृष्टी होईल अन्नालागुनी ॥ मग ते तैसेच उठतील ॥ ७९ ॥ भक्तवत्सलें कृपाळें ॥ ऐसें कां केलें गोपाळें ॥ तरी तें राया ऐक वहिलें ॥ सावध चित्तें होऊनियां ॥ ८० ॥ भीम विनोदवचनें बोळ ॥ सप्रेमभक्तिरसकल्लोळ ॥ तेणें मज परमानंद होईल ॥ ह्मणोनि द्वारीं उभा केला ॥ ८१ ॥ ती पुढिलिये प्रसंगीं निरूपणकथा ॥ कैवल्यभक्तिरससुरसरिता ॥ तिचा वायु लागतां अवचिता ॥ नाश भवदुरिता होतसे ॥ ८२ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ श्रवणें होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ८३ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते नवमोध्यायः ॥ ९ ॥ अध्याय ॥ ९ ॥ ओव्या ॥ ८३ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥ ॥ ॥

१ येणें जाणें. २ अष्टांगयोगरूप सांखळी.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे रे भारता ॥ आतां ऐक लीलाविनोदकथा ॥ जी परम प्रिय असे भगवंता ॥ भीममुखाबुजें-करूनी ॥ १ ॥ तंव तो भीम ह्मणे श्रीकृष्णासी ॥ तूं बरवा आलपोटी[1] कळलासी ॥ मी अतीत उभा असतां द्वारासी ॥ भोजन सावकाश करिसी तूं ॥ २ ॥ लोकां सांगसी धर्मनीती ॥ समयीं अन्न द्यावें अतिथीप्रती ॥ तें तूं न करिसी श्रीपती ॥ तूं जाणसी कीं परबोध ॥ ३ ॥ दाता कृपाळू आपणास ह्मणवित ॥ आणि एकला भोजन असे करित ॥ कोठें गेली देवकी आत ॥ कीं निज-भुवना पाठविली ॥ ४ ॥ कीं दुर्भिक्ष पडलें द्वारकानगरीं ॥ कीं अवर्षण पडलें बहुकाळवरी ॥ तरी चल कृष्णा सहपरिवारीं ॥ धर्म-नगरीं वांचावया ॥ ५ ॥ कोठें गेल्या राजदुहिता ॥ माझ्या भगिनी गुणसरिता ॥ कीं घरचार आला त्यांचिया माथां ॥ ह्मणोनि स्वार्था प्रकटल्या ॥ ६ ॥ ऐकोन देव होय हास्यवदन ॥ मग फेणिका पापड करी चूर्ण ॥ चटचट शब्दसहवर्तमान ॥ लाघवी कृष्ण वाजवी ॥ ७ ॥ तंव देव श्रीवैकुंठपीठ ॥ थोर करूनियां कंठ ॥ दुग्ध प्राशन करी घटघट ॥ भीमें ऐकावें ह्मणोनी ॥ ८ ॥ तंव भीमसेन ह्मणे स्पष्ट ॥ कोण याचा राजस कंठ ॥ काय अंगुष्ठें विंधून केला नीट ॥ किंवा मुसळें करोनियां ॥ ९ ॥ जरी आतां मज भेटेल सूतिका[2] ॥ तरी तिची मी छेदीन नासिका ॥ ऐसें ऐकतां रमानायका ॥ परम हास्य पैं आलें ॥ १० ॥ कीं कंठीं अडकला वटक ॥ कीं रोधिलासे लडुक[3] ॥ तरी मुष्टिघातें पाडीन तया देख ॥ किंवा गदाघातें करोनियां ॥ ११ ॥ धिक् माझा कुतर्क निष्फळ ॥ जो मुखीं सगळा टाकील भूगोळ ॥ त्या मुखीं अडकेल अन्नकवळ ॥ हें तों मूर्खपण पैं माझें ॥ १२ ॥ तया साधनीं अभ्यासी ॥ देवा झणीं भक्षिसी कुटुंबासी ॥ मी अतिथि उभा असें द्वारासी ॥ झणीं मातें भक्षिसी तूं ॥ १३ ॥ जरी मज एकला जाणोनि भक्षिसी ॥ तरी मुख केवीं दाविशी कुंतीसी ॥ आणि धर्माप्रति काय बोलसी ॥ म्यां भीम भक्षिला ह्मणोनियां ॥ १४ ॥ जरी मज तूं भक्षिसी श्रीपती ॥ तरी मी तुज सुख न देईं अंतीं ॥ मज तंव नाहीं अधोगती ॥ मस्तक फोडून निघेन ॥ १५ ॥ जो धर्मराजें पाळिला ॥ तो श्रीकृष्णें असे भक्षिला ॥ हें विदित होईल जरी सुभद्रेला ॥ ती राक्षस तुज मानील ॥ १६ ॥ पति माझा ह्मणोनि राक्षस ॥ रुमणीसी होईल त्रास ॥ मग त्यागील निजभवनास ॥ मग तूं राहासील एकला कीं ॥ १७ ॥ सर्व भक्षोन पुनः सृजसी ॥ या आश्चर्यीं जरी मज भक्षिसी ॥ तरी मी तुज प्रार्थितों हृषीकेशी ॥ पुनः मातें सृजूं नको ॥ १८ ॥ जेणें तुझा ऐसें ह्मणविलें ॥ तुझिया स्वपदातें देखिलें ॥ त्यातें जरी पुनः सृजिलें ॥ तरी थोर अपयश तुझ्या माथां ॥ १९ ॥ हें परम तुज अनुचित श्रीपती ॥ मी निकटद्वारीं उभा अतिथी ॥ सावकाश करिसी भोजनस्थिती ॥ सांगसी नीति जनांतें ॥ २० ॥ ऐसें ऐकोन भीमवचन ॥ संतो-षोनि बोले रमारमण ॥ भीमा येईं झडकरून[4] ॥ म्यां देखिलें नाहीं तूतें ॥ २१ ॥ देव ह्मणे हात जोडून ॥ अपराध क्षमा करावा

---

१ आपलपोट्या. २ सुईण. ३ लाडू. ४ त्वरीत. ५ रचिसी.

पूर्ण ॥ मजसहवर्तमान करीं भोजन ॥ कनकपात्रीं अत्यादरें ॥ २२ ॥ आधीं तृप्त होऊन आपण ॥ आतां ह्मणसी करीं भोजन ॥ ऐसाच तुझा स्नेह पूर्ण ॥ कळों आला मज आतां ॥ २३ ॥ तुझे तृप्तीनें जग तृप्त ॥ ही सत्य देवा असे मात ॥ शाखा[1]पत्र भक्षून केलें तृप्त ॥ द्वैतवनीं दुर्वासा ॥ २४ ॥ मग घालोनी कुंतीची आण ॥ देवें बैसविला करीं धरून ॥ स्वानंदें करिती भोजन ॥ नाना गोष्टी सांगती ॥ २५ ॥ भीम ह्मणे देवा तुझें शेष ॥ ब्रह्मादिकां दुर्लभ विशेष ॥ तेंच मी लाधलों निःशेष ॥ धन्य भाग्य पैं माझें ॥ २६ ॥ देव ह्मणे भीमाप्रती ॥ जैसी भक्ती विनोदस्तुती ॥ मज अंतरीं होतसे तृप्ती ॥ तैसी नव्हे सुधा[2]पानें ॥ २७ ॥ गृह धन आणि सुत कलत्र[3] ॥ इष्ट बंधू गोत्र मित्र ॥ माझे कोणी नव्हती प्रीतिपात्र ॥ जैसे पांडुपुत्र मजलागीं ॥ २८ ॥ मग कस्तूरीटिळक रेखिला ललाटीं ॥ देवें भीमासी दिधली चंदनउटी ॥ पुष्पमाळा घालोनियां कंठीं ॥ भीमेंही जगजेठी गौरविला ॥ २९ ॥ ऐसें संपादूनियां भोजन ॥ मग कर्पूरविडे घेती दोघेजण ॥ सभास्थानीं बैसोनियां जाण ॥ आज्ञा कृष्ण करीत सर्वांतें ॥ ३० ॥ सांब अनिरुद्ध प्रद्युम्ना ॥ पाचारिला तो कृतवर्मा ॥ तुह्मीं जावोनियां संगमा ॥ भेरीवादन करावें ॥ ३१ ॥ आणि सांगावें नगरलोकांसी ॥ घेऊन वित्त वस्त्र भूषणांसी ॥ शीघ्र चलावें धर्मनगरासी ॥ अश्वमेध पाहावया ॥ ३२ ॥ देवकीआदि सकळ जननी ॥ रुक्मिणी सत्यभामादि सर्व कामिनी ॥ वित्त वस्त्रें अळंकार घेऊनी ॥ शीघ्र धर्मनगरासी निघावें ॥ ३३ ॥ वसुदेवासह मुसळ[4]पाणी ॥ सावध राखितील ही राजधानी ॥ दोघां विरहित सर्व जनीं ॥ शीघ्र गंतव्य करावें ॥ ३४ ॥ सर्व भांडारींचें घ्यावें वित्त ॥ शकट[5] उष्ट्रें[6] भरावीं त्वरित ॥ अश्व गज वृषभ रथ ॥ सर्व संपत्ती भरावी ॥ ३५ ॥ जेथें मी असेन श्रीनिवास ॥ तेथें क्षणएक स्थिरता नसावी दरिद्रास ॥ ऐशी जगदीशें कृतवर्म्यास ॥ आज्ञा दिधली संतोषें ॥ ३६ ॥ धांवत कृतवर्मा गेला ॥ शीघ्र दुंदुभी वाजवूं लागला ॥ नगरीं डांगोरा पिटिला ॥ सत्वर निघाला धर्मयज्ञा ॥ ३७ ॥ वेदशास्त्रीं अतिप्रवीण ॥ वेदांतधर्मशास्त्रीं अतिनिपुण ॥ सुबुद्धी यागक्रियापरायण ॥ कृतज्ञ आणि विवेकी ॥ ३८ ॥ ऐसे ब्राह्मण चालिले समग्र ॥ सवें घेऊन स्त्रीपुत्र आणि पौत्र ॥ ह्मणती धन्य होतील कीं नेत्र ॥ धर्मसत्र[7] पाहतांची ॥ ३९ ॥ चाटी[9] आणि सराफ सोनार ॥ तेली तांबोळी आणि कांसार ॥ तंतुवायक[8] रंगकार शस्त्रकार ॥ सर्वही सत्वर चालिले ॥ ४० ॥ भाट वेताळ बंदीजन ॥ भांड नटवे कुलालगण ॥ चर्मक बुरुड भित्तिकारजन ॥ निज शस्त्रास्त्रीं चालिले ॥ ४१ ॥ माळी चित्रकार आणि गारुडी ॥ वैद्यशास्त्री गायकपरवडी ॥ नाना जातींचिया प्रौढी ॥ ते लवडसवडी चालिले ॥ ४२ ॥ दासी दास वेश्याजन ॥ सर्व वस्त्रें अळंकार घेऊन ॥ इंद्रजाळ आणि वंशारोहण ॥ करित तेही चालिले ॥ ४३ ॥ एक चालिला जगज्जीवन ॥ त्यामागें निघाले सर्व नगरजन ॥ मार्गीं परम दाटी झाली जाण ॥ चतुरंग सैन्य थोकलें ॥ ४४ ॥ गोक्षीरइंदुधवल हय ॥ सकळ गुणांचें आलय ॥ त्यावरी बैसोनि यदुराय ॥





---

१ भाजीचें पान. २ अमृताचें प्राशन करून. ३ स्त्री. ४ बळराम. ५ गाडे. ६ उंटें. ७ धर्माचा यज्ञ. ८ कापडाचें दुकान घालून उदीम करणारे. ९ कोष्टी.

उत्तम वेषें चालिला ॥ ४५ ॥ छत्र ध्वज पताका शोभती ॥ नाना वाद्यें हो वाजती ॥ लोक आनंदें गर्जती ॥ अंबरीं उठती प्रतिध्वनी ॥ ४६ ॥ ऐसे चालिले अपार लोक ॥ अपार चतुरंग कैटक ॥ भीमसेनासह यदुनायक ॥ सर्वांचे नमस्कार घेतसे ॥ ४७ ॥ सैन्य जें निघालें अपार ॥ तेणें धुळी भरून न दिसे दिनकर ॥ तेथेंच झालीसे दुपार ॥ निघतां द्वारकेबाहेरी ॥४८॥ तंव ती कुंटिणी बैसली वृषभावरी ॥ तेणें उष्ट्र देखिला शेजारीं ॥ वृषभ बुजतां पडली धरणीवरी ॥ त्या वृषभासहित ॥ ४९ ॥ देखोनि हंसती सकळ जन ॥ ह्मणती स्वकर्मे पावली पतन ॥ तंव तो धांवोनि आला जनार्दन ॥ कोण पडिलें ह्मणोनी ॥ ५० ॥ तंव ती उठोनि झडकरी ॥ आपणचि बैसली वृषभावरी ॥ पतितपावन देखतां हरी ॥ पुनः वृषभ स्थिरावला ॥ ५१ ॥ तुह्मासी न कळे याचें महिमान ॥ हा सद्यःपतितोद्धारण ॥ मज अनुभव आला जाण ॥ ऐसें ऐकोनि देव हंसतसे ॥ ५२ ॥ तंव ती धीट माळाकारी ॥ दापित बोलिली श्रीहरी ॥ कां चालिलास रे दुपारीं ॥ माझा नाश करावया ॥ ५३ ॥ तुजकारणें केल्या सुमनमाळा ॥ त्या उष्णें सुकती गोपाळा ॥ त्या तुज घालितां रे दयाळा ॥ तेणें घननीळा शोभसी ॥ ५४ ॥ सुवर्ण वस्तूंचा संभार ॥ सुखें घेऊन जाती नर ॥ परि माझा होतसे नाश थोर ॥ या उष्णें सुमनांचा ॥५५॥ तापत्रयाचा ऊष्मा गहन ॥ तेणें म्लान होतसे माझें सुमन ॥ तरी तें तुझे पदीं समर्पून ॥ येथून जाईन निजधामा ॥ ५६ ॥ आतां माझें घेईं सुमन ॥ मज देईं तूं मुक्तिधन ॥ सुखसदनासी जाईन ॥ पुढें आगमन सोसेना ॥ ५७ ॥ तयेसी ह्मणे तो यदुराय ॥ तूं करीं कां धर्माचा आश्रय ॥ मग मुक्तिधनासी उणें काय ॥ ह्मणोनि द्रव्यें गौरविली ॥ ५८ ॥ तंव पुढें जातां तैलकारी ॥ तिणें उभा केला श्रीहरी ॥ ह्मणे कां करितोसी दुर्बळमारी ॥ जनसैन्यें करोनियां ॥५९ ॥ मार्गीं सेना दाटली घनदाट ॥ माझे फुटतील स्नेहाचे घट ॥ तुवां प्रकाश करूनि दावावी वाट ॥ मग स्नेहसंगें चालवीन ॥ ६० ॥ तुजसी जेणें लाविला स्नेह ॥ तयासी पुनः अप्राप्त देह ॥ याविषयीं धरीती संदेह ॥ ते परम मूर्ख जाणावे ॥ ६१ ॥ माझें द्रव्य तें सुगंध स्नेह ॥ तेणें शोभवीं आपुला देह ॥ आणि हरावा माझा मोह ॥ कृपा करून स्वामिया ॥ ६२ ॥ ऐसें ऐकोनि श्रीनिवास ॥ धांवोनि मार्गीं करी प्रकाश ॥ आतां सुखें चालवीं स्नेहास ॥ मार्गीं अवकाश पैं केला ॥ ६३ ॥ ऐसें मार्गीं कौतुक देखून ॥ हास्यवदन तो भीमसेन ॥ जनार्दनाप्रति सुवचन ॥ काय बोलेल अवधारा ॥ ६४ ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अति सुरस अमृतासमान ॥ कर्णद्वारें हृदयभुवन ॥ पावेल तेव्हां परम सुख ॥ ६५ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ६६ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते दशमोध्यायः ॥ १० ॥ अ० ॥ १० ॥ ओव्या ॥ ६६ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

१ आकाशामध्यें. २ सैन्य. ३ फुलांच्या माळा. ४ तेलाच्या. ५ घागरी.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ भरतवंशकल्पद्रुमा[1] ॥ जनमेजया पुण्यधामा ॥ ऐकें कथा अमृतोपमा ॥ परम प्रीतींकरूनियां ॥ १ ॥ तंव अनिलतनय[2] ह्मणे कृष्णा ॥ परमाश्चर्य वाटलें मना ॥ तें म्यां सांगावें कवणा ॥ तुजवांचून स्वामिया ॥ २ ॥ नापिती बुरुडी आणि तेलिणी ॥ दुष्ट कुंटणी आणि माळिणी ॥ ऐशा करूनियां मैत्रिणी ॥ मनीं न लाजसी तूं कृष्णा ॥ ३ ॥ या सर्व तुज श्रीपती ॥ जैशा जाणती पूर्ण चित्तीं ॥ तैशा न जाणती स्वपती ॥ पति जवळी असतांही ॥ ४ ॥ सस्मित होऊनि अच्युत ॥ भीमातें बोले रमाकांत ॥ तें ऐकावें सावचित्त ॥ जैमिनि ह्मणे राजया ॥ ५ ॥ वातात्मजासी ह्मणे यदुनंदन ॥ जरी तुज असेल आंगवण ॥ यांतून एक स्त्रीरत्न ॥ तुवां घ्यावें स्वेच्छेनें ॥ ६ ॥ तों एकीतें ह्मणे वनमाळी ॥ दंतहीन तूं दिससी भली ॥ या भीमातें माळ घालीं ॥ परम बळी हा असे ॥ ७ ॥ तंव भीम ह्मणे यदुनंदना ॥ कृष्णीं रत झाल्या ज्या अंगना ॥ तयांसी अन्य पुरुषाची वासना ॥ कदापीही घडेना ॥ ८ ॥ जरी मजला ही वरील ॥ तरी शीघ्र यमालया[3] जाईल ॥ माझी प्रिया राक्षसी भक्षिल ॥ ह्मणोनि तुझी तुज असो ॥ ९ ॥ ज्या कृष्णरूपीं रत झाल्या ॥ त्या देहभावातें विसरल्या ॥ तदाकारें तन्मय झाल्या ॥ मग द्वेष करिती कवणाचा ॥ १० ॥ ज्या कृष्णसंगतीं कामिनी ॥ त्यांशीं सापत्नद्वेष[4] नाहीं मनीं ॥ जांबवती आदि रुक्मिणी ॥ कृष्णासवें क्रीडती ॥ ११ ॥ तंव देवें भीमासी आज्ञापिलें ॥ जें स्थान भ्रष्ट पाहसी वहिलें ॥ तें तुवां पाहिजे रक्षिलें ॥ आणि आणावें मजपाशीं ॥ १२ ॥ तंव ती उष्ट्राव-रोनि पडली सूतिका[5] ॥ ती ह्मणे यदुकुलतिलका ॥ माझा उद्धार करीं रे बाळका ॥ कृपा करोनि ये काळीं ॥ १३ ॥ वसुदेव आदि-करून ॥ तयांशीं मी सूतिका जाण ॥ तुवांच माझें वदन ॥ जन्मकाळीं न पाहिलें ॥ १४ ॥ तुझें करितां वर्णस्मरण ॥ निवारिसी भक्तांचें जन्ममरण ॥ त्या तुज जन्मागारीं शयन ॥ मूर्ख जन ते मानिती ॥ १५ ॥ तूं अजन्मा कैसा जन्मसी ॥ तं सकळ सृष्टीतें सृजसी ॥ तैसें पुनरपि हृषीकेशी ॥ मातें आतां सृजूं नको ॥ १६ ॥ तंव तो वसुदेव आला जवळी ॥ वृकोदरासी ह्मणे वनमाळी ॥ ईस उचलोनि उष्ट्रावरी घालीं ॥ वडील पाहाताती मजकडे ॥ १७ ॥ ती भीमें उचलून उष्ट्रावरी घातली ॥ मग दोघे जोडोनियां करक-मळीं ॥ वसुदेवचरणीं ठेवून मौळी[6] ॥ काय विनविती पैं दोघे ॥ १८ ॥ आतां द्यावें आज्ञावचन ॥ पाहूं धर्मरायाचे चरण ॥ आणि पाहूं अश्वमेधयज्ञ ॥ होईल सार्थक जन्माचें ॥ १९ ॥ तंव वसुदेव ह्मणे मुरारी[7] ॥ मज टाकून जासी रे भवसागरीं ॥ धन्य ती देवकी नारी ॥ तयेसी सर्वे नेतोसी ॥ २० ॥ हें संसारवन अतिविशाळ ॥ जेथें पेटला आहे वडवानळ ॥ तयामाजी मी पडलों पांगुळ ॥ स्मरणामृतें करीं शीतळ मातें ॥ २१ ॥ तरी शीघ्र असो पुनरागमन ॥ आणि ऐक माझें वचन ॥ विप्रांसी द्यावें तुवां धन ॥ धर्म-वचन ऐकावें ॥ २२ ॥ जे स्वरूपमंदिरीं जागती ॥ जे अहंताश्वाना न शिवती ॥ अज्ञानमक्षिका न भक्षिती ॥ ज्ञानमिष्टान्न भक्षि-

---

१ भरताच्या वंशांतील कल्पवृक्षा. २ भीम. ३ यमाच्या घरीं. ४ सवतीमत्सर. ५ सुईण. ६ मस्तक. ७ कृष्णा.

तांही ॥ २३ ॥ जे वेदविद्येचे सागर ॥ जे षट्शास्त्रांचे वैरागर ॥ जे परनिंदावनकुठार ॥ ऐसे विप्र न्यावे सर्वे ॥ २४ जे धर्मयुद्धाच्या ठायीं कुशळ ॥ जे वदान्य आणि सुशीळ ॥ जे धनधान्यें प्रबळ ॥ ऐसे क्षत्रिय सर्वे न्यावे ॥ २५ ॥ जे वृथा करिती अभिमान ॥ जे झाले स्त्रियेआधीन ॥ जे वृथा करिती वल्गन ॥ आत्मस्तवन जे करिती ॥ २६ ॥ जे परतापीं अतितत्पर ॥ जे वृद्ध असतां कामातुर ॥ श्वशुरगृहवासीक नर ॥ जामातवित्तें वांचती जे ॥ २७ ॥ जे अपुत्रिकाचें घेती धन ॥ जे सदा द्यूतीं परायण ॥ जे अविचारकर्में करून ॥ वृद्धा नारी जे इच्छिती ॥ २८ ॥ जे अत्यंत कामें मोहिती ॥ जे ऋतुकाळीं भार्या टाकिती ॥ जे स्त्रीसंगें भोजन करिती ॥ जे न चिंतिती जगन्नाथा ॥ २९ ॥ जे कुयोनीमाजी रमती ॥ पडिले जे व्यभिचारपंथीं ॥ जे रणीं स्वामीस टाकून पळती ॥ जे वंचन करिती भृत्यांचें ॥ ३० ॥ जे व्रतस्थ नारी अभिलाषिती ॥ जे द्रव्य असोन दान न देती ॥ जे दरिद्री असोन तप न करिती ॥ आणि जे करिती महापापें ॥ ३१ ॥ ऐसे जे नर आणि नारी ॥ समागमें नेऊं नको मुरारी ॥ व्यर्थ द्रव्याचा क्षय न करीं ॥ आणि अपकीर्ति त्यासंगें ॥ ३२ ॥ ऐसें पितृवचन ऐकोन ॥ बरवें ह्मणोन वंदिले चरण ॥ मज स्वामिआज्ञा प्रमाण ॥ जेवीं वेदवचन विप्रांसी ॥ ३३ ॥ तंव भीम ह्मणे यदुकुळदीपा ॥ पुण्यवंतावरी करिसी कृपा ॥ हें नवल नव्हेचि बापा ॥ पातक्यावरी कृपा करीं ॥ ३४ ॥ तूं मित्रशत्रूंसी समानें ॥ विषम मनें तुवां न इच्छिणें ॥ जैशीं अमृतकरकिरणें ॥ मंगळामंगळीं पडताती ॥ ३५ ॥ पाळक छेदक दोनी पक्ष ॥ त्यांसी छाया सम दे वृक्ष ॥ तेवीं जगाचा कल्पवृक्ष ॥ केवीं विषमता धरिसी ॥ ३६ ॥ गाळीं पडलिया इक्षुदंड ॥ जेवीं समान देत रसखंड ॥ तेवीं उभय पक्षीं गोड ॥ त्वां असावें स्वामिया ॥ ३७ ॥ जरी गृहीं लाविला दीप ॥ तो तस्करा गृहस्था समरूप ॥ तेवीं त्रैलोक्याचा दीप ॥ तूंचि असशी श्रीहरी ॥ ३८ ॥ गोब्राह्मणांची तृषा हरीन ॥ व्याघ्रादिकां विषरूपें मारीन ॥ ऐसें न चिंतीच जीवन ॥ तेवीं जगजीवन तूं जगा ॥ ३९ ॥ पुण्यवंता तारावें ॥ आणि पातकिया मारावें ॥ हे विषमता तुज न संभवे ॥ सकळ तारावे जडजीव ॥ ४० ॥ ऐसें भीमाचें वचन ॥ ऐकोन धन्य ह्मणती जन ॥ परम चतुर वायुनंदन ॥ वचनामृतें निवविलें ॥ ४१ ॥ वसुदेवें कृष्णातें आलिंगून ॥ ह्मणे पुत्रा जासी मज टाकून ॥ विरहदुःखें करी रुदन ॥ आतां प्राण न राहाती ॥ ४२ ॥ मागें रामविरहें विह्वळ ॥ दशरथें टाकिलें जेवीं शरीर ॥ तैसा मजही आला काळ ॥ केवीं वांचेन मी आतां ॥ ४३ ॥ रमावर ह्मणे जी ताता ॥ तुवां खेद न करावा सर्वथा ॥ मी पाहून धर्मनृपनाथा ॥ शीघ्र आतां येईन ॥ ४४ ॥ ऐसें बोलोन श्रीधर ॥ पुढें चालिला सत्वर ॥ तंव एक देखिलें सरोवर ॥ अति विशाळ सिंधु जैसा ॥ ४५ ॥ मधुर सुगंध शीतळ नीर ॥ नाना कमळें अपार ॥ नाना क्रीडती द्विजवर ॥ रुंजती भ्रमर पैं तेथें ॥ ४६ ॥ पुढें जातां चक्रपाणी ॥ देखिली दिव्य पद्मिनी ॥ जवळी पाचारून रुक्मिणी ॥ तयेलागीं

१ खाणी. २ दाते. ३ सेवकांचें. ४ चंद्राचीं किरणें. ५ ऊंस. ६ पक्षिश्रेष्ठ.

दावित ॥ ४७ ॥ कृष्ण ह्मणे वो रुक्मिणी ॥ कोमळगात्रे पद्मनयनी ॥ शरत्कालइंदुवदनी[1] ॥ पाहें सादर पद्मिनीतें ॥ ४८ ॥ दिनकर नाथें ते भोगिली ॥ आणि कुंजरीं मराळीं[2] सेविली ॥ परी कामवासना तृप्त नसे झाली ॥ आतां पहुडली मधुपेंसीं[3] ॥ ४९ ॥ नाथविरहें होतसे म्लान ॥ तदागमनें होतसे हर्षायमान ॥ मध्यें मधुपेंसीं करी शयन ॥ जळो दुष्ट मन स्त्रियांचें ॥ ५० ॥ मी सहस्रकराची-कामिनी ॥ हा विचार न करी पद्मिनी ॥ क्रीडा करी मधुप घेउनी ॥ अघटित करणी स्त्रियांची ॥५१॥ सुमनमाळेचिये परी ॥ कुपित सर्पिणी धरवेल करीं ॥ परी कोण्याही मंत्रें न आवरे ॥ चित्तवृत्ती स्त्रियांची ॥ ५२ ॥ एक बोलती एक करिती ॥ पुण्य सांगोन पाप आचरती ॥ स्वपति सांडून परनर चित्तीं ॥ अखंड भोगिती संतोषें ॥ ५३ ॥ सौदामिनी करीं धरवेल ॥ आणि पारद[4] करीं स्थिर होईल ॥ परी स्त्रियांचें मन अति चंचळ ॥ कोण्या उपायें न धरवे ॥५४॥ आणि ही पंकापासून झाली ॥ ह्मणोन दुष्टबुद्धी धरिली ॥ जन्मभूमी असे चांगली ॥ तरी निघती उत्तमांकुर ॥५५॥ जो विश्वास धरील वनितेचा[5] ॥ त्याएवढा मूर्ख नव्हे साचा ॥ ऐसा शब्द प्राणेशाचा ॥ ऐकोनी बोले रुक्मिणी ॥ ५६ ॥ ह्मणे वृष्णिकुलावतंसा ॥ योगिजनमानसराजहंसा ॥ कंसबळवनविध्वंसा ॥ ऐकें पद्मिनीचा विचार ॥ ५७ ॥ पद्मिनीसारिखी पतिव्रता ॥ त्रिभुवनीं नाहीं पाहतां ॥ हरि स्वामीवांचून तत्वतां[6] ॥ कांहींच नेणे मानसीं ॥ ५८ ॥ नाथ करी पृथ्वीचें गमन ॥ देखोन ही होतसे म्लान ॥ पुनः पूर्वस्पर्शीं रमण ॥ ह्मणोनि होतसे हर्षित ॥ ५९ ॥ कुंजर आणि मराळ ॥ हे तंव इचे जाणा बाळ ॥ पति समीप असतां यांसी वेळ ॥ क्रमितां दूषण असेना ॥ ६० ॥ तों सीतनायकेचें धर्माचरण ॥ विदेशा गेला असतां रमण ॥ स्तनबाळ संगें घेऊन ॥ करावें शयन निजसंगें ॥ ६१ ॥ पतिविरहाग्नीकरून ॥ ही पद्मिनी दग्ध झाली जाण ॥ तिच्या अंगसंगें करून ॥ कृष्ण झाले ते बाळ ॥ ६२ ॥ जरी हे कृष्णवर्ण झाले ॥ तरी जीवापासून असती सुटले ॥ जे कृष्णरूपास पावले ॥ ते न राहतीच संसारीं ॥ ६३ ॥ लागतां पतिविरहज्वाळा ॥ ही केवीं वांचली ह्मणशी दयाळा ॥ हृदयीं पतिचरणामृत जिव्हाळा ॥ स्पर्शें तयाच्या वांचली ॥ ६४ ॥ इचें शुद्ध जन्ममूळ[7] ॥ स्मरतां पाप होय निर्मूळ ॥ तें वर्णितां हरे पापमूळ ॥ तेंचि ऐकावें स्वामिया ॥ ६५ ॥ देवें त्रिविक्रम अवतार धरिला ॥ पदाग्रें ब्रह्मकटाह[8] फोडिला ॥ तेथोनि निघालिया गंगाजळा ॥ तेणें हरिपदरज क्षाळिलें ॥ ६६ ॥ त्या पंकापासून जन्मली ॥ ह्मणोन ही पतिव्रता भली ॥ शुद्ध ह्मणोन चंद्रमौळी ॥ ईस शिरीं धरीतसे ॥ ६७ ॥ पूर्वीं हरिपदें क्षीण झाली धरा ॥ ह्मणोन ती रजस्वला अवधारा ॥ तीमाजी हरिपदागत नीरा ॥ पात झाला स्वानंदें ॥ ६८ ॥ तें आदिकारण पंकाचें ॥ त्या पंकामाजी जन्मणें इचें ॥ ऐकतां मन पात्र होय हर्षाचें ॥ आणि पापाचें क्षाळण ॥ ६९ ॥ बहुत स्त्रिया तुह्मांलागोनी ॥ ह्मणोनि तुह्मी न लक्षा मजलागुनी ॥ परी मी लक्षितें तुम्हांलागोनी ॥ तैसीच पद्मिणी त्या हरीतें ॥ ७० ॥ ह्मणोन धन्य ही पद्मिणी ॥ पतिव्रतांमाजी

---

१ शरत्कालींच्या चंद्राप्रमाणें शोभायमान मुख आहे जिचें अशी. २ हंसांनीं. ३ भुंग्यांशीं. ४ पारा. ५ स्त्रीचा. ६ खरोखर. ७ तान्हें मूल. ८ ब्रह्मांडगोळ.

शिरोमणी ॥ अन्यथा इची करणी ॥ तुह्मांस भासली कां सांगा ॥७१॥ ऐसें रुक्मिणीचें वचन ॥ ऐकोनि पावला समाधान ॥ तिसीं देऊं धांवे आलिंगन ॥ परी जन देखोन शंकला ॥७२॥ तया सरोवराचिया पाळी ॥ रात्री क्रमीत वनमाळी ॥ मग उठोनि प्रातःकाळीं ॥ चालिला पुढें सैन्येंसीं ॥ ७३ ॥ श्रीहरी आला ऐसें जाणुनी ॥ गोपाळ आले धांवोनी ॥ वनगुंजादि वेष करुनी ॥ आले श्रीकृष्ण पाहावया ॥ ७४ ॥ नंदयशोदेचा पुत्र ॥ हा बाळपणींचा आमुचा मित्र ॥ आतां आह्मांस पद्मनेत्र ॥ काय ओळखेल भाग्याचा ॥७५॥ जवळी येतां गोपाळमेळा ॥ कृष्ण अश्वावरून उतरला ॥ आनंदें सर्वांसी भेटला ॥ करिती गोष्टी परस्परें ॥ ७६ ॥ गोप ह्मणती कान्हया ॥ हें भाग्य तुला आलें कोठूनियां ॥ आह्मी लागतसों तुझिया पायां ॥ सांग सखया झडकरी ॥ ७७ ॥ गजाश्वरथ आणिले कोठूनी ॥ नाना वस्त्र आणि लेणीं ॥ कंठींचा हा तेजाळ मणी ॥ तुवां कोठूनि आणिला ॥ ७८ ॥ तव हृदयीं काय उमटलें ॥ हें पाऊल असे उगवलें ॥ तंव दुजा ह्मणे मज कळलें ॥ श्रीवत्सलांछन द्विजांघ्री ॥ ७९ ॥ कोणी दाविती काठी कांबळी ॥ कोणी दाविती पांवा मुरली ॥ ऐशा परी तो वनमाळी[2] ॥ सर्व गोपाळीं वेष्टिला ॥ ८० ॥ कोणी वाजविती मुरली ॥ कोणी पुढें घालिती हुंबळी ॥ कोणी आरंभिती चेंडुफळी ॥ कोणी वाजविती मुखवाद्य[3] ॥ ८१ ॥ ह्मणती कृष्णा आमुच्या गायी ॥ पाहा कैशा ठेविल्या ठायीं ॥ महाव्याघ्रमुखीं होत्या पाहीं ॥ आह्मीं सोडविल्या तव बळें ॥ ८२ ॥ अहंसर्पें होती डकली ॥ विषयविषें अति तापली ॥ तरी तुझें नाम घेतां रे वांचली ॥ निर्विषय झाली ती ॥ ८३ ॥ एक मुखीं घालिती दहिंभात ॥ एक मुखीं कवळिती नवनीत ॥ एक भाकरी तुकडे देत ॥ ते भक्षित अच्युत स्वानंदें ॥ ८४ ॥ पुढें चाले गोवळमेळा ॥ त्या छंदें हरी नाचों लागला ॥ ऐसा देखोन सुखसोहळा ॥ हांसे खदखदां भीमसेन ॥ ८५ ॥ दूर ठेवून थोरपण ॥ सकल जनांची लज्जा सोडून ॥ स्वानंदें नाचे जगजीवन ॥ निजगोपाळांसमवेत ॥ ८६ ॥ गोपांसीं नाचतां वनमाळी ॥ लीलाविग्रहाची[4] स्मृति उडाली ॥ नादब्रह्मीं वृत्ति बुडाली ॥ पाहों ठेली तयाची ॥ ८७ ॥ ऐसा भक्तवत्सल शार्ङ्गपाणी ॥ गोपांसवें क्रीडोनी ॥ वस्त्रालंकारें तोषवूनी ॥ निजस्थळा त्यां पाठविलें ॥ ८८ ॥ पुढें चालिला चक्रपाणी ॥ तों धांवत आल्या गौळणी ॥ ह्मणती हा बाळपणींचा धणी ॥ आतां आह्मांसी न पाहे ॥ ८९ ॥ एक करित होती गृहसंमार्जन ॥ तशीच आली धांवोन ॥ शरीर माखलें रजेंकरून ॥ तें भान तिजला नसेची ॥ ९० ॥ तियेसी बोले दुजी उत्तर ॥ माखलें कां गे न दिसे तुज शरीर ॥ लज्जा सांडोनि समग्र ॥ धांवसी रमावर पाहावया ॥ ९१ ॥ निर्मळ करूनियां शरीर ॥ मग पाहावा दामोदर ॥ तुज हंसतील कीं नारीनर ॥ कां हो जनलाज न धरिसी ॥ ९२ ॥ एक ह्मणे वारंवार धुतले रज ॥ तरी ते न जाती उरले सहज ॥ तूं कां सांगसी गे मज ॥ देह प्रक्षाळीं ह्मणोनी ॥ ९३ ॥ चित्तीं रज जडलें अपार ॥ वरी वरी केलें निर्मळ शरीर ॥ तरी काय दामोदर ॥



१ विष्णूच्या छातीवरील चिन्ह. २ श्रीकृष्ण. ३ शीळ. ४ लीलेनें धारण केलेल्या देहाची.

प्राप्त होईल निर्धारें ॥ ९४॥ पाहोनियां जळ पुष्कळ ॥ पीठ अथवा बरवी शिळ ॥ तेथें जाऊन वस्त्र निर्मळ ॥ करिती स्वच्छ धुवोनी ॥ ९५ ॥ कृष्णदर्शनामृतजळ ॥ तत्पदपीठ तेंचि शिळ ॥ तेथें देह हा करीन निर्मळ ॥ पुनः मळ न लागे ॥ ९६ ॥ ऐशा नानापरीच्या गौळणी ॥ केवळ भावार्थजळतरंगिणी ॥ धांवूनि मिळाल्या कृष्णदर्शनीं ॥ देहभाव विसरल्या ॥ ९७ ॥ त्या ओंवाळिती मनमोहना ॥ वारंवार लागती चरणा ॥ आतां कां नोळखसी नंदनंदना ॥ आह्मांलागीं समर्था ॥ ९८ ॥ तंव बोले चापपाणी ॥ तुह्मी बाळपणींच्या सांगातिणी ॥ उपकार तुमचा मजलागुनी ॥ जो झाला तो न बोलवे ॥ ९९ ॥ स्वप्नीं न जाणे क्षीराब्धिनंदिनी ॥ तें सुख दिधलें कुंजवनीं ॥ तुमचा विसर क्षणैक मनीं ॥ मजलागोनी पडेना ॥ १०० ॥ हातीं देती दध्योदन[१]कवळ ॥ मुखीं घालिती नवनीत[२]गोळ ॥ आनंदें भक्षी गोपाळ ॥ भक्तवत्सल ह्मणोनी ॥ १ ॥ कृष्णासंगें सुखावल्या मनीं ॥ कृष्णरूप जडलेंसे मनीं ॥ देवें वस्त्रालंकार देउनी ॥ प्रीतीनें सर्व बोळविल्या ॥ २ ॥ ऐसा जातां जातां यदुवीर ॥ शीघ्र पावला यमुनातीर ॥ तेथें सैन्य करोनियां स्थिर ॥ विनैक[३] आपुला दिधला ॥३॥ देवें पाचारून सुहृज्जन ॥ तयांप्रति बोले जनार्दन ॥ पुढें मी एकला करितों गमन ॥ परी तें नीतिवचन ऐकावें ॥ ४ ॥ देवकी यशोदा रोहिणी ॥ तयांप्रति बोले चक्रपाणी ॥ तुह्मीं सेवावी वसुदेवभगिनी ॥ अर्जुनजननी सर्वदा ॥५॥ अनुसूया आणि अरुंधती ॥ धन्य ऋषिभार्या महासती॥ तुह्मीं सेवाव्या निश्चितीं ॥ धर्मीं दृष्टी देउनी॥६॥ प्रद्युम्नादि[४] सर्व नंदन ॥ ऐका माझें आज्ञावचन ॥ तुह्मीं सेवावा धर्मनंदन ॥ परम विनीत[५] होऊनियां ॥ ७ ॥ बहुत पवित्र धर्मनगर ॥ तेथें मिळाले लोक अपार ॥ क्षत्रियकुळींचे मान्य नर॥ यज्ञोत्सवा पातले ॥ ८ ॥ सर्वांचें करावें समाधान ॥ आणिक करावें पूजन ॥ तेथें न धरावा अभिमान ॥ श्रीकृष्णात्मज वीर ह्मणोनी ॥९॥ तोंवरी वीरांची बळवार्ता ॥ जोंवरी न देखिलें वीरपार्था ॥ तोंवरी खद्योताची[६] अहंता॥ जों दिनकर न देखिला ॥ ११० ॥ तोंवरी पातकें ह्मणती आह्मी ॥ जों सिंहस्थीं न देखिली गौतमी[७] ॥ तैसे तोंवरी तुह्मी पराक्रमी ॥ जों अर्जुन नयनीं न देखिला ॥ ११ ॥ तुह्मीं देखिलें नाहीं पट्टण ॥सहवास परम कठिण ॥ लीलाक्रीडेचें आचरण ॥ तेथें सर्व सोडावें ॥ १२ ॥ रुक्मिणी आदि तुमच्या माता ॥ त्यांहीं सेवावी द्रुपदसुता ॥ माझ्या पंचप्राणांची लता ॥ ती भगिनी आमुची ॥ १३ ॥ घेऊन करीं कनकपात्र ॥ त्यांत पंच दीप करून एकत्र ॥ ओंवाळा धर्मराज पवित्र ॥ यागकाळीं स्वानंदें ॥ १४ ॥ अयुत सर्वे घेऊन युवती ॥ सावध सेवा द्रौपतीसती ॥ तिच्या संगें पुण्यप्राप्ती ॥ तुह्मांस होईल अगाध ॥ १५ ॥ मी एकला करितों पुढें गमन ॥ पूजावया धर्मनंदन ॥ तुह्मीं सर्वीं यावें मागून ॥ या भीमासांगातें ॥ १६ ॥ ऐसें बोलून यदुनायक ॥ सर्वे घेऊन सेवक ॥ पुढें जातां द्विज याज्ञिक ॥ भेटले तयांतें नमस्कारी ॥१७॥ विप्रीं करून आशीर्वचन ॥ ह्मणती धन्य आजिचा दिन॥ धन्य धर्मराय गुणनिधान ॥

१ दहिंभाताचा घांस. २ लोण्याचा गोळा. ३ तंबू. ४ मदन वगैरे. ५ नम्र. ६ काजव्याची. ७ गोदावरी.

ज्याच्या घरीं श्रीहरी ॥ १८ ॥ धर्मरायें केलें यज्ञाचरण ॥ ह्याचे योगें देखिले तुझे चरण ॥ परोपकारी पांडुनंदन ॥ यदुनंदन दाविला ॥ ॥ १९ ॥ धूम्रांध झाली आमुची दृष्टी ॥ ह्मणोनि मूर्ति न दिसे गोमटी ॥ सेवा करितों पावकाची नेहटी ॥ परी तोही नेणे स्वामीतें ॥ १२० ॥ पयःप्राशनीं करितो विष ॥ ऐसा द्विजिव्हाचा वेष ॥ मग हा सप्तजिव्हेचा विशेष ॥ महिमा कोण वर्णील ॥ २१ ॥ ज्याचा मार्ग असे मलिन ॥ तो दाखवील हरिपद तल्लीन ॥ विप्राचा स्वधर्म ह्मणून ॥ त्याची सेवा करितसों ॥ २२ ॥ ह्मणती अपराध नसे त्याचा ॥ आह्मीच काम धरितों कर्मफळाचा ॥ तेणें कृष्णपदारविंदाचा ॥ मकरंद आह्मां दुर्लभ ॥ २३ ॥ कर्म करीत नाहीं ब्रह्मार्पण ॥ मनीं धरिती विषयाभिलाषण ॥ तयांसी तो इंदिरारमण ॥ कल्पांतींही न भेटे ॥ २४ ॥ तंव एक ह्मणे ब्राह्मण ॥ आह्मी कर्म करूं ब्रह्मार्पण ॥ न लगे आह्मां स्वर्गभुवन ॥ जें देतसे अधःपाता ॥ २५ ॥ ऐसें विप्रवचन मुकुंद ॥ स्वयें ऐकोन मुकुंद ॥ त्यांचें वंदोन चरणारविंद ॥ बहु आशीर्वाद घेतसे ॥ २६ ॥ पुढें चालतां नारायण ॥ भेटले संन्याशांचे गण ॥ तयांस नमी जगज्जीवन ॥ करद्वय जोडूनियां ॥ २७ ॥ संन्यासी ह्मणती देवासी ॥ तूंचि नारायण हृषीकेशी ॥ आपणातें तूं नमिसी ॥ ओंकारासी व्यापूनियां ॥ २८ ॥ जेथें कुंठित झाल्या श्रुतिस्मृती ॥ चौरी[2] वाचाही परतती ॥ तो तूं साक्षात् श्रीपती ॥ वेदवंद्य देखिला ॥ २९ ॥ तयांसी ह्मणे श्रीनिवास[3] ॥ तुह्मीं केला कर्मफलन्यास[4] ॥ ती कृष्णता विष्णुशरीरास ॥ तुह्मीं विश्वरूपास प्रगटविलें ॥ १३० ॥ तुह्मीं तों सदा निःसंग ॥ कर्मापासूनि सत्याग ॥ तथापि तुमचा आमुचा संग ॥ सदा असो धर्मपुरीं ॥ ३१ ॥ तेथून महानगर प्रवेशतां जाण ॥ तों पुढें देखिले वेश्यागण ॥ तिहीं देखिला मनमोहन ॥ कामजनक जगत्पिता ॥ ३२ ॥ त्यांमाजी एक असे ह्मणत ॥ धरा धरा गे श्रीकृष्णनाथ ॥ हा दाता कामी जाणि भाग्यवंत ॥ हा स्त्रीलंपट सदांचा ॥ ३३ ॥ तंव दुजी एक असे ह्मणत ॥ हा केवीं धरावा गे नित्यमुक्त ॥ तो षोडशसहस्र स्त्रियांतें भोगित ॥ तेवीं युक्त बहु पुत्रीं ॥ ३४ ॥ हा तंव वृद्ध असे सांप्रत ॥ पुराणपुरुष ऐसें ह्मणवित ॥ हा निष्काम सदांचा संत ॥ गृहिणीप्रयोजन कासया ॥ ३५ ॥ जळीं प्रतिबिंबला सविता ॥ तो जेवीं धरितां नये हाता ॥ तेवीं तुह्मीं आह्मीं समस्ता ॥ सर्वथा अच्युत न धरवे ॥ ३६ ॥ जरी समूळीं सोडाल कामासी ॥ तरीच हा सांपडेल तुह्मांसी ॥ नाहीं तरी हृषीकेशी ॥ कदा तुह्मांस न धरवे ॥ ३७ ॥ वृद्ध असो वा तरुण ॥ सकाम अथवा निष्काम ॥ त्याच्या गृहिणी मुख्य कारण ॥ परमार्थदान देईल ॥ ३८ ॥ जेणें वक्र कुब्जा ते भोगिली ॥ तो काय सांडील ही स्त्रीमंडळी ॥ ऐसें ऐकोनि वनमाळी ॥ हांसत पुढें चालिला ॥ ३९ ॥ तंव पुढें देखिले बंदिजन ॥ त्यांहीं मांडिलें कृष्णस्तवन ॥ या सत्पुरुषाचें वर्णन ॥ न करवे जाण राया तें ॥ १४० ॥ नाभींत जन्मला विधाता ॥ तो झाला सकळ सृष्टिकर्ता ॥ याचा कोणीं देखिलासे पिता ॥ याच्या वृत्ता



१ फुलांतील रस. २ परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी ह्या चार वाचा. ३ श्रीकृष्ण. ४ कर्माचे फळाचा त्याग.

वर्णावें ॥ ४१ ॥ आजि हा देखिला श्रीहरी ॥ आमुचें दैन्य गेलें दुरी ॥ अहंमती रोग भारी ॥ तो नामऔषधानें वारिला ॥ ४२ ॥ ह्मणोनि याचें नाम ध्यावें ॥ आणि या एकांतेंच वर्णावें ॥ नरदेहाचें सार्थक करावें ॥ त्याच्या स्पर्शनेंकरूनी ॥ ४३ ॥ ऐसें ऐकतां कृष्ण संतोषला ॥ आत्मकंठींची मुक्तमाळा ॥ काढोनि घातलीसे गळां ॥ बंदिजनांचे श्रीकृष्णें ॥ ४४ ॥ आतां होईल कृष्णदर्शन ॥ अनुशाल्व करील अश्वहरण ॥ तेंचि पुढें निरूपण पूर्ण ॥ अमृतासमान गोड असे ॥ ४५ ॥ इति श्रीजैमिनिकृत अश्वमेध ॥ कृष्ण-कीर्तनामृत अगाध ॥ श्रवणेंच होईल चित्तशुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १४६ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते एकादशोध्यायः ॥ ११ ॥ अध्याय ॥ ११ ॥ ओव्या ॥ १४६ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥ ॥ ॥

# अध्याय १२.



श्रीकृष्ण. पांडव.
कुंती.
सुभद्रा
द्रौपदी.
स्त्रिया
द्रौपदी.
रुक्मिणी सत्यभामादि कृष्णास्त्रिया.
यादव पांडव सैन्य
अनुशाल्व श्यामकर्ण घेऊन उडून जात आहे

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ करकमळातें जोडूनी ॥ जनमेजय ह्मणे जैमिनी ॥ पुढें कथा सुरतरंगिणी ॥ कैसी चालली ती सांग ॥१॥ तयासी ह्मणे महाऋषी ॥ ऐक राया दृढ मानसीं ॥ नगरीं प्रवेशोनि हृषीकेशी ॥ पुढें जातसे अतिशीघ्र ॥ २ ॥ पुढें भेटले श्रोत्रिय ब्राह्मण ॥ कृष्णें तयांसी करून नमन ॥ तयांचें घेऊन आशीर्वचन ॥ पुढें चालला सत्वर ॥ ३ ॥ तों पुढें नृत्य करिती नर्तकी ॥ तें नृत्य माधव विलोकी ॥ तो परमात्मा कौतुकी ॥ उभा ठेला नावेक ॥ ४ ॥ नर्तकी कृष्णाप्रति बोले वचन ॥ जन हे हांसती मजकारण ॥ तरी या नृत्याचें न कळे महिमान ॥ मूर्ख जन हे श्रीकृष्णा ॥ ५ ॥ ज्या नर्तनें परम संतोषी ॥ अंतरीं होतसे हृषीकेशी ॥ त्या भ्रमणनर्तना जो द्वेषी ॥ तोच दोषी श्रीकृष्णा ॥ ६ ॥ तीर्थयात्रेचें भ्रमण ॥ दुजें प्रदक्षिणेचें पूर्ण ॥ तयासी ह्मणों नये भ्रमण ॥ जन्ममरण जें चुकवी ॥ ७ ॥ तव हस्तीं सुदर्शनचक्र ॥ भ्रमण करीत चक्राकार ॥ माझें कौतुक पाहतां थोर ॥ चतुश्चक्रें फिरतें ॥८॥ तूं एक हालविसी भूगोळ ॥ तरी मी बत्तीस खेळवितें गोळ ॥ तूं तंव असती अचळ ॥ मी अति चंचळ असें देवा ॥ ९ ॥ तियेचें ऐकोनियां वचन ॥ हरि करी हास्यवदन ॥ देऊन वस्त्रालंकारदान ॥ त्वरें राजगृहा आला ॥ १० ॥ तों सन्मुख देखिला विदुर ॥ जो कृष्णाचें प्रियपात्र ॥ तेणें कृष्णासी केला नमस्कार ॥ आलिंगनीं सुखावला ॥ ११ ॥ तयाचें करून करग्रहण ॥ कृष्ण पावला सभास्थान ॥ वंदून धृतराष्ट्राकारण ॥ क्षेमालिंगन दिधलें ॥ १२ ॥ तों धर्में धांवोन धरिले चरण ॥ सप्रेम दिधलें आलिंगन ॥ आनंद झाला दोघांकारण ॥ तो न वर्णवे वर्णितां ॥ १३ ॥ तों धांवून आला अर्जुन ॥ तेणें धरिले कृष्णचरण ॥ देवें तयासी आलिंगून ॥ परम सुख पावला ॥ १४ ॥ नकुल सहदेवादि सर्व ॥ तिहीं वंदिला रमाधव ॥ आलिंगनें सुखी सर्व ॥ परम संतोष पावले ॥ १५ ॥ कृष्णें नमस्कारिली कुंती ॥ क्षेम देतसे परम प्रीतीं ॥ सुभद्रा आणि द्रौपदी सती ॥ वंदिताती परस्परें ॥१६॥ मग धर्म ह्मणे यदुपुंगवा ॥ क्षेमरूप तूं कीं माधवा ॥ घेवोन परिवार आघवा ॥ आलास कीं यागार्थ ॥ १७ ॥ नृपास ह्मणे शेषशयन ॥ मी सर्वस्वें तव आधीन ॥ जेणें होय तव कल्याण ॥ तेंचि करणें धर्मज्ञा ॥ १८ ॥ जनीं तपत असतां तपन ॥ दृष्टींत कैंचें तमिस्रावरण ॥ तेवीं तुझें असतां कृपावलोकन ॥ कैंचें असुख मजलागीं ॥ १९ ॥ मजलागीं जो पुसलासी भाव ॥ तरी नगरीं ठेवूनि राम वसुदेव ॥ त्यांवेगळे सर्व यादव ॥ घेऊन आलों यज्ञासी ॥ २० ॥ देवकी आदि सर्व माता ॥ घेऊन आलों नृपनाथा ॥ रुक्मिणी आणि सर्व कांता ॥ आल्या असती सेवेसी ॥ २१ ॥ प्रद्युम्नादि सर्व नंदन ॥ तेही आले असती जाण ॥ ज्या योग्य जें सेवन ॥ तें स्वीकारार्थ पातले ॥ २२ ॥ ऐसे सकळ आले असती ॥ श्रीहरि बोलिला धर्माप्रती ॥ धर्म तोषला परम चित्तीं ॥ अर्जुनाप्रती अनुवादे ॥ २३ ॥ समीप पातले यादववीर ॥ सिद्ध करावा आपुला दळभार ॥ आनंदें जाऊन समोर ॥ तयांलागीं आणावें ॥ २४ ॥ ऐसें ऐकतांचि वचन ॥ सिद्ध करून सकळ सैन्य ॥ सांगून पाठविलें द्रौपदीलागून ॥ त्वांही जावें सामोरें ॥ २५ ॥ तों कृष्ण अंतःपुरांत गेला ॥ द्रौपदीलागीं बोले

वहिला ॥ उत्तम प्रगटीं स्वरूपाला ॥ जेणें लाजती बंधुजाया ॥ २६ ॥ सत्यभामा अति गर्विष्ठ ॥ आत्मरूपापुढें सकळ कनिष्ठ ॥ मानून आपण सर्वांवरिष्ठ ॥ ऐसें मनीं तिचे सर्वदा ॥ २७ ॥ तरी त्यां प्रगटवावा रूपरंग ॥ जेणें तियेचा होय गर्वभंग ॥ ऐसें बोलतां श्रीरंग ॥ काय वाक्य बोलिली ॥ २८ ॥ कुरूपता आणि सुरूपता ॥ हेंही करणें तुझीच सत्ता ॥ तो तूं साह्य मज असतां ॥ काय उणें स्वरूपासी ॥ २९ ॥ तंव देवें आपुले हस्तें ॥ मंडित केलें द्रौपदीतें ॥ पाहातां त्या स्वरूपातें ॥ मदनकोटी लाजती ॥ ३० ॥ तंव सन्निध करून दळभार ॥ सिद्ध झाले अर्जुनादि वीर ॥ आणि द्रौपदी सुकुमार ॥ निघे बाहेर तेधवां ॥ ३१ ॥ रत्नशिबिका आणिली ॥ तीमाजी द्रौपदी बैसविली ॥ सहस्र दासींनीं वेष्टिली ॥ रूपें जिंकती त्या रंभा ॥ ३२ ॥ कितीएक दासी चामरें घेउनी ॥ वारिताती नितंबिनी ॥ अश्वारूढ वेत्रपाणी ॥ मार्ग करिती प्रशस्त ॥ ३३ ॥ या प्रकारें द्रौपदी सती ॥ त्या विधीनें सुभद्रासती ॥ वेत्रधर्ते मार्ग करिती ॥ कनकदंड घेउनी ॥ ३४ ॥ सर्वे घेऊन अपार सेना ॥ चालतां जी मार्ग दिसेना ॥ वाद्यें वाजती नाना ॥ छत्र ध्वज पताका शोभती ॥ ३५ ॥ भाट मागध बंदीजन[1] ॥ स्तुतिवाक्यें करिती गर्जन ॥ वाखाणिती धर्मनंदन ॥ परम आल्हादें-करूनी ॥ ३६ ॥ पुढें देखिला दळभार ॥ नेणों लोटले गिरिवर ॥ झाला वाद्यांचा गजर ॥ वीर गर्जती आनंदें ॥ ३७ ॥ दोनीं सैन्यांचा झाला गजर ॥ नादें कोंदलें अंबर ॥ तळीं दडपला फणिवर ॥ दळभारेंकरूनी ॥ ३८ ॥ एक एक शिबिकेप्रती ॥ शत शत दासी रंभाकृती ॥ चामरें व्यजनें ढाळिती ॥ सेवा करिती यथोचित ॥ ३९ ॥ नेणों धरेवरी चंद्रमंडळ ॥ छत्रमिषें पीत केलें सकळ ॥ कळ-समुखें भृगु गुरु केवळ ॥ आले वाटत धरेवरी ॥ ४० ॥ उसळती क्षीराब्धीचे कल्लोळ ॥ तैसीं चामरें शुभ्र धवळ ॥ बधिर झालें मेघ-मंडळ ॥ स्तवन ऐकतां मागधमुखें ॥ ४१ ॥ ऐशा सोळा सहस्र वनिता ॥ कोण करील त्यांची गणिता ॥ विश्वकुटुंबी जगत्पिता[2] ॥ त्यासी न्यूनता कासयाची ॥ ४२ ॥ जैसे पूर्व पश्चिम सागर ॥ भेटावया आले सादर ॥ तैसा यादवपांडवभार[3] ॥ एक झाला स्वानंदें ॥ ४३ ॥ देवकी धर्में देखिली ॥ गजावरून उतरला तळीं ॥ वंदून प्रेमें आलिंगिली ॥ तैसीच यशोदा रोहिणी ॥ ४४ ॥ कुंती देवकी यशोदा रोहिणी ॥ आनंदें भेटल्या चौघीजणी ॥ परस्परें वस्त्रभूषणीं ॥ गौरविती स्वानंदें ॥ ४५ ॥ तंव द्रौपदी आणि प्रभावती[4] ॥ वंदन देवकीतें करिती ॥ वस्त्रें अळंकार घालिती ॥ परस्परें एकमेकी ॥ ४६ ॥ सत्यभामा आणि रुक्मिणी ॥ द्रौपदी भेटे त्यां जाउनी ॥ वस्त्राभरणें गौरवुनी ॥ कुशल वृत्त पुसती ॥ ४७ ॥ ऐशा परस्परें झाल्या भेटी ॥ आनंदाच्या लोटल्या कोटी ॥ हातीं घेऊन रत्नकाठी ॥ सेवक वारिती जनांतें ॥ ४८ ॥ तों यौवनाश्व तेथें आला ॥ देवकीचे चरणीं लागला ॥ तैसाच रुक्मिणी आदि वनितांला ॥ नमस्कारित सुभावें ॥ ४९ ॥ तैसेच प्रद्युम्नादि कृष्णपुत्र ॥ त्यांहीं वंदिला युधिष्ठिर ॥ क्षेम देवोनि समग्र ॥ शिबिराप्रति चालिले ॥ ५० ॥ वितानें[5] दिधलीं अपार ॥ उंचपणें भेदिती गग-

१ स्तुतिपाठक. २ श्रीकृष्ण. ३ सैन्य. ४ यौवनाश्व राजाची राणी. ५ छत्रें.

नोदर ॥ गवाक्षद्वारें मनोहर ॥ कनकवस्त्रें निर्मिलीं ॥५१॥ मणिमंडित भूषणें ॥ धर्में दिधलीं सकळांकारणें ॥ गात्रें चर्चिलीं सुगंधचंदनें ॥ कर्पूरविडे दिधले ॥ ५२ ॥ मणिमंडित वस्त्रें भूषणें ॥ परस्परें देवोनि सन्मानें ॥ गात्रें चर्चिलीं दिव्य चंदनें ॥ कर्पूरविडे घेवोनी ॥५३॥ यादवपांडव मिळोनी ॥ तेथें बैसले सभास्थानीं ॥ द्रौपदी आदि सर्व कामिनी ॥ विनकामाजी बैसल्या ॥ ५४ ॥ कीं गगनमंडळीं दिव्य तारका ॥ किंवा सरोवरीं पद्मिनी देखा ॥ तेवीं त्या यदुपांडवनायिका ॥ विनकामाजी शोभती ॥ ५५ ॥ अपार नभमार्गे चालतां ॥ परम श्रमित झाला सविता ॥ ह्मणोन काय विनकमाथां ॥ विश्रांति पावला वाटतसे ॥ ५६ ॥ नातरी आपलें दिव्य तेज ॥ विनककळशीं शोभलें सहज ॥ तें मागावया काय ग्रहराज ॥ आला तेथें वाटतसे ॥ ५७ ॥ सर्व मिळून कृष्णरमणी ॥ परस्परें पुसती क्षेमवाणी ॥ तयांमाजी सत्राजितनंदिनी ॥ विनोदवाणी बोलतसे ॥ ५८ ॥ भामा ह्मणे द्रुपदनंदिनी ॥ तुह्मांस पुसावयाची आर्त मनीं ॥ तें तुह्मी सांगा सत्यवचनीं ॥ असत्य वाणी सोडूनी ॥ ५९ ॥ पंच धव वीरभूषण ॥ तयांसी कैसें वशीकरण ॥ मज माझा एक रमण ॥ कांहीं केल्या वश्य नव्हे ॥ ६० ॥ आपण पांचही आवरून ॥ आमचेंही नेत असां निधान ॥ तरी पांचांतें शयनीं वंचून ॥ हृदयीं कैसा धरितां हो ॥ ६१ ॥ ऐसी अभिनव तुमची करणी ॥ अपूर्व वाटे अंतःकरणीं ॥ बहुत दिवस होतें माझे मनीं ॥ तुह्मांस पुसावी ही गोष्ट ॥ ६२ ॥ ऐसी करोनियां करणी ॥ लज्जा न वाटे अंतःकरणीं ॥ धन्य तुह्मी त्रिभुवनीं ॥ निर्भयपणें वागतां ॥ ६३ ॥ ऐसें ऐकोन भामावचन ॥ द्रौपदी झाली विस्मितमन ॥ सत्यभामेसी प्रतिवचन ॥ देती झाली तात्काळ ॥ ६४ ॥ तुमचें कुटिल अंतःकरण ॥ तेणें वश न होय जगज्जीवन ॥ जेथें विषय अहंकार दारुण ॥ तेथें नारायण असेना ॥ ६५ ॥ वश करावें श्रीकृष्णनिधान ॥ तें तुह्मांपासीं नसे विधान ॥ सदा असंतुष्ट मन ॥ सर्व अहंकारें मंडित ॥ ६६ ॥ करून निष्ठुर भाषण ॥ क्षणक्षणां करितां अपमान ॥ तें दुःख सांगावयाकारण ॥ भगिनीप्रति धांवत ॥ ६७ ॥ आधीं जिंकावे सहा सबळ ॥ पग उच्छेदावे पांच अमंगळ ॥ मग सहजचि हातीं तमालनीळ ॥ मनोमंदिरीं प्रवेशे ॥ ६८ ॥ कौरवसभासागरजीवनीं ॥ बुडत होती लज्जाधरणी ॥ तें कृष्णवराहें गुप्त येउनी ॥ वस्त्रदंष्ट्रेनें काढिली ॥ ६९ ॥ माझी लज्जा भवगजेंद्र ॥ ओढीत होता दुःशासननक्र ॥ स्मरतांच धांवला यादवेंद्र ॥ तो वस्त्रचक्रें सोडविला ॥ ७० ॥ माझी लज्जा तपनतनया ॥ तेथें दुःशासन कालिया ॥ चरणतळीं रगडोनियां ॥ शुद्ध केली वस्त्रदानें ॥ ७१ ॥ करून तुमची प्रतारणा ॥ अनंत वस्त्रें पुरवी बंधुराणा ॥ तुमचे हस्तीं एक जाणा ॥ कार्पासकंचुकी न देववे ॥ ७२ ॥ पारिजातक पुष्पेंसीं वेष्टिला ॥ नारदास दान पति दिधला ॥ तोही मागुता फिरोन घेतला ॥ ही लाज कैसी न वाटे ॥ ७३ ॥ विप्रालागीं दान देणें ॥ आणि त्यापासून फिरून घेणें ॥ हें तों परम लाजिरवाणें ॥ साजे जिणें तुह्मांसी ॥ ७४ ॥ नारदबुद्धीनें सोडिला ॥ आत्माराम

१ खिडक्या. २ राजसभेच्या मागें पडद्याचे आंतील स्त्रिया बसण्याच्या जाग्यांत.

हातास आला ॥ तो फिरोन तुह्मांस दिधला ॥ लाभ काय झाला त्यामुळें ॥ ७५ ॥ हें आपुलें निंद्य कारण ॥ जवळी ठेविलें झांकून ॥ दुजयाचें काढितां उकरून ॥ पवित्र वाणी करावया ॥ ७६ ॥ ऐसी द्रौपदीची मात ॥ ऐकून भामा झाली कुंठित ॥ हास्यवदनें मग बोलत ॥ श्यामकर्ण पाहेन मी ॥ ७७ ॥ तयाचें घ्यावें दर्शन ॥ आणि करावें पूजन ॥ ऐसें ह्मणोनियां वचन ॥ सांगून पाठविलें कृष्णासी ॥ ७८ ॥ तंव श्रीकृष्ण ह्मणे धर्मनंदना ॥ आहे देवकीची वासना ॥ सर्व स्नुषांसहित श्यामकर्णा ॥ पाहावया आज्ञापीं ॥ ७९ ॥ ऐसें ऐकतां युधिष्ठिर ॥ सिद्ध करवी दळभार ॥ यादव पांडव समग्र ॥ सिद्ध झाले शस्त्रास्त्रीं ॥ ८० ॥ दों भागीं केला दळभार ॥ मधून चालविला अश्ववर ॥ नेणों काय लावण्यसागर ॥ तेथेंचि आटिला विधीनें ॥ ८१ ॥ आला जाणोन श्यामकर्ण ॥ कृष्णकांता धांवल्या संपूर्ण ॥ विनकगवाक्ष उघडून ॥ सादर पाहती अश्वातें ॥ ८२ ॥ तो अति सूक्ष्म नृत्य करितसे ॥ स्वरूपसागर हेलावत असे ॥ नानारत्नीं मंडित दिसे ॥ पाहून स्त्रिया विस्मित होती ॥ ८३ ॥ ह्मणती विधीचें तप फळलें ॥ कीं नयनांचें सौख्य फांकलें ॥ नातरी सौभाग्य दाटलें ॥ अश्वरूपेंकरूनी ॥ ८४ ॥ ह्मणती धन्य धन्य श्यामकर्ण ॥ सर्व अश्वांमाजी रत्न ॥ ज्यासी पाहातां नयन ॥ समाधान पावले ॥ ८५ ॥ ऐसे सकळ आनंदले ॥ तंव तेथें अपूर्व वर्तलें ॥ तें पाहिजे ऐकिलें ॥ सावध चित्तें श्रोतेजनीं ॥ ८६ ॥ स्रक्चंदनादि विषयसरिता ॥ सेवितां तृप्ति नये चित्ता ॥ तों अकस्मात काळचक्र माथां ॥ पडे तैसें जाहलें ॥ ८७ ॥ धर्मनगरीं पाहून हरी ॥ दैत्य संतोषला अंतरीं ॥ श्यामकर्ण धरावया सत्वरी ॥ अनुशाल्व पातला ॥ ८८ ॥ तया संधींत धांवला ॥ अनुशाल्व तेथें आला ॥ सर्वांदेखतां श्यामकर्णाला ॥ हरून गेला निजबळें ॥ ८९ ॥ पृष्ठीं बांधून श्यामकर्ण ॥ अनुशाल्व गेला उडोन ॥ शीघ्र निजदळांत जाऊन ॥ सिद्ध झाला संग्रामा ॥ ९० ॥ सुसार नामा तयाचा प्रधान ॥ त्यासी अनुशाल्व बोले वचन ॥ तुह्मीं असावें सावधान ॥ सैन्य सिद्ध करूनी ॥ ९१ ॥ जेणें माझा मारिला भाव ॥ तो धर्मनगरीं रमाधव ॥ पुत्रपौत्र सकळ यादव ॥ घेऊन आला यागासी ॥ ९२ ॥ आतां तुह्मीं ऐसें करावें ॥ गृध्रव्यूह सैन्य रचावें ॥ गृध्रास देखून स्वभावें ॥ गरुड नये त्या स्थळीं ॥ ९३ ॥ दुरून देखे अंत्यज ॥ पुढें न येई याज्ञिक द्विज ॥ किंवा देखतां दोषपुंज ॥ सर्वथा नये पुण्यात्मा ॥ ९४ ॥ आणि ऐका सकळ वीर ॥ सर्वांनीं मन करावें स्थिर ॥ बळेंच धरावा यदुवीर ॥ तरीच सार्थक जन्माचें ॥ ९५ ॥ अश्व गज आणि रथ ॥ त्यांकडे सर्वथा न घालावें चित्त ॥ केवळ धरावा यदुनाथ ॥ जो माझे बंधूचा घातकर्ता ॥ ९६ ॥ ज्यावरून हरि तो गेला ॥ जेणें पाहून सोडिला ॥ त्याच्या करीन शिरश्छेदाला ॥ यामाजी संशय असेना ॥ ९७ ॥ जेणें निजबळें हरि धरिला ॥ धरून माझे हातीं दिधला ॥ मी पूजीन हो तयाला ॥ प्राणाहून पलीकडे ॥ ९८ ॥ जेणें त्यागून सर्वस्वातें ॥ बरवें धरिलें हरीतें ॥ तो जें मागेल मातें ॥ मी तें त्यातें देईन ॥ ९९ ॥ जेणें अनृत अपराध केला असेल ॥ आणि राजद्रव्य भक्षिलें असेल ॥ तो जरी या हरीतें धरील ॥ तरी सर्व क्षमा

करीन ॥ १०० ॥ बंधु मित्र अथवा पुत्र ॥ ज्ञाती सुहृत् आणि कलत्र ॥ जो झाला वासुदेवाविरहित ॥ तो दंडीन शत्रूपरी ॥ १ ॥ तयाचा सखा अर्जुन ॥ त्यासी आणावें धरून ॥ मग दोघें आनंदेंकरून ॥ रक्षितील सदन पैं माझें ॥ २ ॥ भीमसेनादि सर्व पांडव ॥ प्रद्युम्नादि सर्व यादव ॥ हे अवघे जिंकोनि माधव ॥ केवळ सर्वी जिंकावा ॥ ३ ॥ दाता आणि याचिता ॥ विन्मुख सन्मुखही सर्वथा ॥ अशस्त्रा शस्त्रही तत्वतां ॥ सारथी आणि विरथी हा ॥ ४ ॥ हा शस्त्रेंकरून न तोडवे ॥ हा अग्नीकरून न जाळवे ॥ हा उदकानें न बुडवे ॥ न शोषवे वायुचेनी ॥ ५ ॥ याचे ग्रहणाचा उपाय ॥ एक जाणे तो गांगेय ॥ तेणें वसविलें स्वर्गालय ॥ आतां कवणा पुसावें ॥ ६ ॥ याची धरावयाची युक्ती ॥ पुसों जाऊं कवणाप्रती ॥ बळी जाणे महामती ॥ तरी तो राहिला पाताळीं ॥ ७ ॥ किंचित जाणतो बिभीषण ॥ ध्रुव बरवें जाणे ग्रहण ॥ प्रल्हाद जाणतो परिपूर्ण ॥ परी तो दूर राहिला ॥ ८ ॥ नारद धरूं जाणतो म्हणती ॥ परी तो पडला भ्रमणमती ॥ सोड्डनियां याची संगती ॥ पुनः धरितो वारंवार ॥ ९ ॥ आतां न पुसतां कोणासी ॥ मीच धरीन केशवासी ॥ ऐसा दृढ निश्चयेंसीं ॥ सिद्ध झाला अनुशाल्व ॥ ११० ॥ सिद्ध झालें चतुरंग सैन्य ॥ शस्त्रें झळकती दारुण ॥ अनेक वाद्यें गहन ॥ शब्द नभीं दुमदुमिले ॥ ११ ॥ कोठें गोविंद कोणे स्थळीं पार्थ ॥ ऐसे वीर मुखें गर्जत ॥ वस्त्रअळंकारें मंडित ॥ ध्वज-पताका फडकती ॥ १२ ॥ बरवा रक्षिला श्यामकर्ण ॥ गृध्रव्यूह रचिला जाण ॥ सर्वी धरावा जनार्दन ॥ म्हणोनि सिद्ध जाहले ॥ १३ ॥ यावरी दोघांचें सैन्य मिळोन ॥ युद्ध होईल दारुण ॥ तेंचि पुढें निरूपण ॥ अति रसाळ अवधारा ॥ १४ ॥ इति श्रीअश्व-मेधकथाजैमिनी ॥ मोहभुजंगनाशिनी ॥ ही कथा भवतारिणी ॥ म्हणे श्रीधर श्रोतयां ॥ ११५ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमि-निकृते अनुशाल्वेनाश्वहरणं नाम द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥ अध्याय ॥ १२ ॥ ओव्या ॥ ११५ ॥ ॥ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ फणिकुळहवनकर नृपें ॥ प्रश्न केला कुरुकुळदीपें ॥ अश्व नेलिया मदनबापें ॥ काय केलें तें सांग ॥ १ ॥ तयासीं करावया समर ॥ कोण पाठविला जी वीर ॥ तेंच सांगावें सविस्तर ॥ कृपा करून स्वामिया ॥ २ ॥ तंव व्यासदयासागर-चंद्रमा ॥ मुनिवर जैमिनिनामा ॥ ह्मणे ऐक सावध नृपोत्तमा ॥ बोले धर्मा गरुडध्वज ॥ ३ ॥ तुह्मांसी करूनियां तृण ॥ अनुशाल्वें नेला श्यामकर्ण ॥ लज्जा झाली जी दारुण ॥ सर्वांनीं तो देखतां ॥ ४ ॥ आतां तुह्मीं व्हावें रथस्थ ॥ सात्यकी वीरादि समस्त ॥ घेऊन उभें राहावें जी येथ ॥ युद्धकौतुक पाहावया ॥ ५ ॥ मी प्रद्युम्न आणि पार्थ ॥ भीमसेन आणि वृषकेत ॥ युद्धासी जातों त्वरित ॥ सकळ सेना घेउनी ॥ ६ ॥ देवें दारुक पाचारिला ॥ तो रथ घेऊन शीघ्र आला ॥ त्यावरी श्रीकृष्ण आरूढला ॥ शंख वाजविला उभय करें ॥ ७ ॥ मग इंदिराकरधर ॥ जो स्मरणेंच निवारी संसार ॥ तो कौतुक श्रीवर ॥ काय करी ते काळीं ॥ ८ ॥ देवें विडा हातीं घेतला ॥ ह्मणे जो पुरुषार्थी असेल भला ॥ जो धरून आणील अनुशाल्वाला ॥ तेणें विडा उचलावा ॥ ९ ॥ जेणें अनुशाल्वासी जिंकावें ॥ आणि श्यामकर्णातें सोडवावें ॥ ऐसें जया पुरुषत्व बरवें ॥ तेणेंच विडा उचलावा ॥ १० ॥ तंव ते वीर झाले अधोवदन ॥ लज्जेनें करिती धरावलोकन ॥ ह्मणती अनुशाल्व दारुण ॥ घेईल प्राण सकळांचे ॥ ११ ॥ तो केवळ असे महा-काळ ॥ तो जिंकील सर्वही दळ ॥ आमचा करील कवळ ॥ पुढें जातां क्षणार्धें ॥ १२ ॥ वारंवार बोले वनमाळी ॥ परी कोणी न घेच त्या वेळीं ॥ मुहूर्त एक करकमळीं ॥ विडा राहिला हरीचे ॥ १३ ॥ तों प्रद्युम्न वीर उठिला ॥ ह्मणे विडा द्यावा जी मजला ॥ मारूनियां अनुशाल्वाला ॥ श्यामकर्ण आणितों ॥ १४ ॥ ऐसें बोलून घेतला विडा ॥ रथीं बैसला वीर गाढा ॥ शस्त्रास्त्रीं मंडित निधडा ॥ रथीं घडघडां ध्वनि उमटे ॥ १५ ॥ वर्णें जिंकिती ऐरावत ॥ असे अश्व योजिले श्वेत ॥ पुढें चालिला जी वीर त्वरित ॥ अनुशाल्वातें जिंकावया ॥ १६ ॥ तों दुजा विडा घेतला ॥ कृष्ण ह्मणे वीरां सकळां ॥ जो वीर दृढ असे वहिला ॥ तेणेंच उच-लावा वीटक ॥ १७ ॥ प्रद्युम्नाचें साह्य करावें ॥ अनुशाल्वातें जिंकावें ॥ ऐसें शौर्य मिळवावें ॥ वीरजन्मा आलिया ॥ १८ ॥ तों उठिला कर्णकुमर ॥ तेणें विड्याला पसरिला कर ॥ ह्मणे साह्य करीन निर्धार ॥ आणि जिंकीन अनुशाल्वा ॥ १९ ॥ तयालागीं जिंकोन ॥ बळें आणीन श्यामकर्ण ॥ तव चरणारविंदीं अर्पीन ॥ तरीच नंदन कर्णाचा ॥ २० ॥ जरी मी न आणीन श्यामकर्ण ॥ तरी पण माझा ऐका दारुण ॥ शूद्र करी ब्राह्मणीगमन ॥ तें पातक मज माथां ॥ २१ ॥ नातरी ऋतुस्नात नारी ॥ तयेप्रति जो गमन करी ॥ तें पातक मम शिरीं ॥ जरी अश्व न आणीं ॥ २२ ॥ ऐसें वृषकेतु बोलिला ॥ कृष्णकरींचा विडा घेतला ॥ कृष्णासी वंदून ते वेळां ॥ मग बैसला रथावरी ॥ २३ ॥ धर्मासी करून वंदन ॥ पुढें प्रेरिला स्यंदन ॥ परमानंदें कर्णनंदन ॥ चालिला कंदन करावया ॥ २४ ॥ पुढें चालिला कृष्णकुमर ॥ तेणें देखिला तो दळभार ॥ धनुष्यासी केला टणत्कार ॥ युद्धा अनुशाल्व पाचारिला

॥ २५ ॥ प्रद्युम्न अनुशाल्वातें बोलिला ॥ तुवां पराक्रम फार दाविला ॥ श्यामकर्ण चोरून आणिला ॥ आतां राखीं आपणातें ॥ २६ ॥ तीक्ष्ण बाणांचिया धारीं ॥ तुझीं करीन कांडोरीं ॥ विघडून टाकीन धरेवरी ॥ सर्व भूतांकारणें ॥ २७ ॥ रविकरें धरा तप्त बहुत ॥ ती तव रुधिरें करीन शांत ॥ ऐसें बोलतां मन्मथ ॥ अनुशाल्व हांसे खदखदां ॥ २८ ॥ त्याप्रति अनुशाल्व ते वेळां ॥ काय बोलता जाहला ॥ तूं पुरुषार्थी असती भला ॥ हें काय आह्मां ठावें नसे ॥ २९ ॥ भुजंगभूषणभाळानळें ॥ तव शरीर पूर्वी जाळिलें ॥ तें विझवावया वहिलें ॥ कृष्णसागरीं बुडालासी ॥ ३० ॥ तुझे कुसुमाचे बाण ॥ ते संख्या गणी कोण ॥ मज मेरूसी कण ॥ तेवीं पुरुषार्थ तुझा रे ॥ ३१ ॥ वरी तूळ पुष्पसंभार ॥ पडतां मेरु नव्हे चूर ॥ कीं जंबूकशब्दें पळे कुंजर ॥ तरीच सामर्थ्य तुझें मजपुढें ॥ ३२ ॥ जेथें असती स्त्रिया तरुणी ॥ आणि जेथें अविवेकी प्राणी ॥ जेथें तपस्वी मुनियांच्या श्रेणी ॥ तेथें तुझा पराक्रम ॥ ३३ ॥ स्त्रीपुरुष असती एकांतीं ॥ तेथेंच तुझी परम ख्याती ॥ ती आजी सांडूनियां चित्तीं ॥ कां रे मरण वांछिलें ॥ ३४ ॥ व्यासपुत्रें तुज दिधला त्रास ॥ देखोन पळसी वायुपुत्रास ॥ मनीं आठवीं गांगेयास ॥ टाकिसी श्वास अतिदुःखें ॥ ३५ ॥ ऐसें ऐकतां वचन ॥ प्रद्युम्नें सोडिले पंचबाण ॥ अर्धमार्गी त्यांचें खंडन ॥ एकाच बाणें पैं केलें ॥ ३६ ॥ आणि एक सोडून बाण ॥ हृदयीं भेदितां तो मदन ॥ उडोन गेला जेथें श्रीकृष्ण ॥ करीत भ्रमण त्या स्थळासी ॥ ३७ ॥ जेवीं लागतां घात करतळाचा ॥ नभीं उडे झेला पुष्पांचा ॥ तेवीं अनुशाल्वें उडविला साचा ॥ कृष्णपुत्र ते काळीं ॥ ३८ ॥ उडविला देखोन निजनंदन ॥ क्रोधयुक्त झाला कृष्ण ॥ घेऊन सावध केला मदन ॥ क्रोधें पाहे तयाकडे ॥ ३९ ॥ ह्मणे उठीं रे सत्वर ॥ तें नव्हे हें द्वारकापुर ॥ जेथें क्रीडसी निरंतर ॥ हें तों नगर धर्माचें ॥ ४० ॥ या सकळ वीरांदेखतां ॥ तुज उडविलें निर्बळ सुता ॥ आतां मुख दाखवावया मागुता ॥ कैसा तूं रे न लाजसी ॥ ४१ ॥ तुज प्रसवली रुक्मिणी ॥ शंबरें नेलें चोरूनी ॥ तेव्हांच तुझी जीवित्वहानी ॥ कां न केली तयांनीं ॥ ४२ ॥ आतां जाईं वनासी ॥ भक्षीं कंदमूळफळांसी ॥ तुज निंदितील तापसी ॥ निजशत्रु जाणूनी ॥ ४३ ॥ सिंहीस झाला जंबुक ॥ कीं गरुडजननी प्रसवली मशक ॥ कीं वीरपत्नीसी झाला भेक ॥ तेवीं वाटे मजलागीं ॥ ४४ ॥ अरे निर्बळ कुमरा ॥ तुवां जावें बाण-नगरा ॥ तेथें असे तुझा सोयरा ॥ उदरपोषण करील तो ॥ ४५ ॥ तेथें आहेत परम विख्यात ॥ दृढ मनाचे शिवभक्त ॥ ते तुझा करितील घात ॥ आपुला शत्रु जाणोनी ॥ ४६ ॥ मी प्रद्युम्नप्रतापेंकरूनी ॥ निर्भय असेन या त्रिभुवनीं ॥ ऐसी आशा होती जी मनीं ॥ ती भंगिली रे कुपुत्रा ॥ ४७ ॥ पुनः हाणूं धांवे चरण ॥ तों धांवोनि धरी भीमसेन ॥ ह्मणे कोण तुमचें शाहाणपण ॥ कां चरणप्रहार मारीतसां ॥ ४८ ॥ हा काय भयें रण सोडून आला ॥ बाणघातें असे उडाला ॥ मूर्च्छायमान पडिला ॥ नाहीं भियाला रणासी ॥ ४९ ॥ तुह्मी तों बलाढ्य गहन ॥ कधींही केलें नसेल पलायन ॥ पाठी लागतां काळयवन ॥ मुचकुंद झाला प्राणदाता

॥ ५० ॥ तूं परदुःख न जाणसी ॥ जन्ममरणा नातळसी ॥ आनंदविग्रही हृषीकेशी ॥ न जाणसी दुःखजातें ॥ ५१ ॥ ऐसें स्वयें असोन ॥ पुत्रासी करिसी शब्दतांडण ॥ तूं अविचार करिसी पूर्ण ॥ तें थोरपण शोभतसे ॥ ५२ ॥ निजात्मजजीवीं होता अभिमान ॥ त्याचें देवें केलें निरसन ॥ बळाभिमान भीमसेन ॥ त्याचेंही हरण करावें ॥ ५३ ॥ हें कळावया जनांलागोन ॥ देवें मांडिलें विंदान ॥ ह्मणोनि जाणत्यांनीं अभिमान ॥ अल्पही मनीं न धरावा ॥ ५४ ॥ यदुनंदन ह्मणे ऐक भीमा ॥ म्यां याचा अपराध केला क्षमा ॥ आतां तुवां जावें संग्रामा ॥ अनुशाल्वासी जिंकावया ॥ ५५ ॥ बरवें ह्मणोन भीमसेन ॥ त्वरित निघाला गदा घेऊन ॥ पदेंच धांवत करी गमन ॥ वेगें परदळ आटोपिलें ॥ ५६ ॥ मनीं स्मरूनि गोविंदा ॥ बळें मारीतसे गदा ॥ चालिला करीत वीरचेंदा ॥ परदळींचे अपार ॥ ५७ ॥ गजें गजातें मारी ॥ रथें रथाचा चूर करी ॥ अश्वें अश्वां संहारी ॥ स्वारांसमवेत तेधवां ॥ ५८ ॥ कुंजर धरोनियां पुच्छीं ॥ बळें भोवंडून झोंकी आकाशीं ॥ दंतीं धरून एकासी ॥ धरणीवरी आपटित ॥ ५९ ॥ चरणीं धरून एकासी ॥ बळानें धरणीवरी घांसी ॥ करनखें विदारून कुंभस्थळासी ॥ मुक्तें काढित बाहेरी ॥ ६० ॥ मारीत चालिला कडाडी ॥ चरणें गजमस्तक फोडी ॥ जैशा मृन्मय पात्रांच्या उतरडी ॥ फोडितां क्लेश न पाविजे ॥ ६१ ॥ ऐसा केला गजसंहार ॥ सर्व रथांचा केला चूर ॥ अश्वदळाचा सागर ॥ शोषीत तेव्हां क्षणमात्रें ॥ ६२ ॥ सैन्य पळालें दशदिशां ॥ ह्मणती त्राहें त्राहें जगदीशा ॥ भीमें आकांत मांडिला कैसा ॥ पळतां उमासा घेऊं नेदी ॥ ६३ ॥ शोणितनदी वाहात ॥ तेणें प्रेतें चालिलीं वाहात ॥ रक्तमांसाचा पंक बहुत ॥ तेथें रथचक्रें गुंतती ॥ ६४ ॥ जैं प्रळयकाळीं त्रिपुरारी ॥ सर्व भूतांचा संहार करी ॥ तैसा भीम सैन्यांतरीं ॥ गदाघातें मारितसे ॥ ६५ ॥ भीमें केला निःपात ॥ सैन्य दशदिशां पळत ॥ हें काय ह्मणे वृषकेत ॥ तों भीमातें मागें देखिलें ॥ ६६ ॥ वृषकेतु ह्मणे वातनंदना ॥ हें कां आलें तुमचे मना ॥ बाळमुखींचा कवळ स्ववदना ॥ कैसा घालूं इच्छिसी ॥ ६७ ॥ अनंत युद्धांचीं फळें ॥ तुवां भक्षिलीं चिरकाळें ॥ तरी पीडिलें क्षुधानळें ॥ तृप्ति नव्हे सर्वथा ॥ ६८ ॥ पुत्रमुखींचें युद्धफळ ॥ पिता केवीं घेतसे कवळ ॥ हें ऐकतां लोक सकळ ॥ हांसतील तुह्मांतें ॥ ६९ ॥ पुत्रास युद्धफळ द्यावें ॥ कीं त्याचेंच घेऊन आपण खावें ॥ हें वडिलीं विचारावें ॥ सूक्ष्मबुद्धी करूनियां ॥ ७० ॥ भीम ह्मणे ऐक सुता ॥ फळीं जरी असेल कठिणता ॥ तरी पित्यानें पिळून रस तत्वतां ॥ बाळवदनीं घालावा ॥ ७१ ॥ काळरूपी तमाळनीळ ॥ तो सर्वांचें चालवी बळाबळ ॥ हें विसरोनियां गर्वाचळ ॥ शिखरीं वेंघे भीम तेव्हां ॥ ७२ ॥ ऐसें बोलतां भीमसेन ॥ तों अनुशाल्वें मारिला बाण ॥ तेणेंकरून भीमसेन ॥ कृष्णापासीं धाडिला ॥ ७३ ॥ देखूनियां वातनंदन ॥ सस्मित ह्मणे जगज्जीवन ॥ कोठें गेलें रे तव बळ गहन ॥ नव्हे हिडिंब भीमा हा ॥ ७४ ॥ तों देवें धरिला अभिमान ॥ त्याचें करावया हनन ॥ स्वयें केलें विंदान ॥ अभिनव लीला तयाची ॥ ७५ ॥ जनास कळावें ह्मणोन ॥ सक्रोध झाला जनार्दन ॥

रथारूढ होऊन ॥ पवनगती निघाला ॥ ७६ ॥ कृष्णें पांचजन्य वाजविला ॥ दारुकें रथ प्रेरिला ॥ तों गरुड येऊन बैसला ॥ ध्वज-स्तंभीं तात्काळ ॥ ७७ ॥ देव आले धांवत ॥ सैन्य दृष्टीनें न्याहाळीत ॥ तों युद्ध करित वृषकेत ॥ बहुत आनंदले श्रीकृष्ण ॥ ७८ ॥ अनुशाल्वें कृष्ण देखिला ॥ मनामाजी संतोषला ॥ कृष्णावरी धांविन्नला ॥ काय बोलिला तेधवां ॥ ७९ ॥ त्वां माझा बंधू मारिला ॥ तेव्हां मी सन्निध नव्हतों गोपाळा ॥ तव सुत आणि भीम उडविला ॥ बाणघातें पाहिलें कीं ॥ ८० ॥ तुजसन्मुख दोघेजण ॥ कैसें केलें तयांचें पतन ॥ तूं सन्निध असतां व्हावें पतन ॥ तरी वेदवाणी असत्य ॥ ८१ ॥ त्याच पंचबाणेंकरून ॥ कोठें करिसील पलायन ॥ परी एक असे तुजला स्थान ॥ साधूंचें मन अभेद ॥ ८२ ॥ तेथें कवणाचा न चाले लाग ॥ जेथें कामक्रोधांचा होय भंग ॥ तयांचा तूं करिसी संग ॥ मम बाणेंकरूनियां ॥ ८३ ॥ मी अत्यंत तरुण ॥ तूं तंव पुरुष पुराण ॥ तुज मजसीं समान ॥ सर्वथा नव्हे यदुराया ॥ ८४ ॥ ऐसें बोलून वचन ॥ सोडून दिधले पांच बाण ॥ चहूंनीं चारी हय जाण ॥ एक लागला दारुका ॥ ८५ ॥ तयाचें अतुल बळ देखिलें ॥ मग यादवें मनीं विचारिलें ॥ येथें युद्ध करितां नव्हे भलें ॥ ह्मणोन झाला अदृश्य ॥ ८६ ॥ आणिक करावें जंव संधान ॥ तंव अदृश्य झाला जनार्दन ॥ चहूंकडे पाहे जाण ॥ तंव तो दृष्टी पडेना ॥ ८७ ॥ जेवीं नर झालिया अदृष्टहीन ॥ ठेविल्या ठायीं न सांपडे धन ॥ ना दृष्टीस अंधत्वेंकरून ॥ निकट पदार्थ कळेना ॥ ८८ ॥ ह्मणे आधीं देऊन दर्शन ॥ अदृश्य कां झाला जनार्दन ॥ जरी यासी पातक झालें कारण ॥ तरी ये जन्मीं नसे केलें ॥ ८९ ॥ किंवा माझिये नगरीं ॥ शूद्र ब्राह्मणीसीं गमन करी ॥ कीं कन्याधन घेऊन संसारीं ॥ श्रेष्ठ आपण मानिलें ॥ ९० ॥ कीं कोणीं कन्याविक्रय केला ॥ कीं रजस्व-लेचा विवाह मांडिला ॥ कीं भांडारगृहीं असेल पडिला ॥ अपुत्रिकांचा रजःकण ॥ ९१ ॥ कीं पतिव्रतेसी दिवागमन ॥ कोणें केलें असेल जाण ॥ कीं ऋतुस्नात भार्या जाणून ॥ संग करी पापात्मा ॥ ९२ ॥ इतुक्या पापांचा अंश ॥ सत्य पाहून धराधीश ॥ त्या पापानेंच काय हृषीकेश ॥ अदृश्य झाला मजलागीं ॥ ९३ ॥ जो मजला करवील दर्शन ॥ त्यासी देईन सुकृत धन ॥ परी मजला नारायण ॥ पुनः सत्वर भेटवावा ॥ ९४ ॥ अनुतापें अनुशाल्व बोलतां ॥ दर्शन दिधलें नृपनाथा ॥ निबिड घनमंडळ निवडतां ॥ दृष्टीस पडे दिनमणी ॥ ९५ ॥ होतां सद्गुरुप्रसाद ॥ पळोन जाय अज्ञानवृंद ॥ मग सहज प्रगटे परमानंद ॥ तैसें झालें तयासी ॥ ९६ ॥ संतोष झाला तयाचे चित्ता ॥ ह्मणे शरसंधान करीं रे आतां ॥ मग तीन बाणीं झाला विंधिता ॥ अनुशाल्वातें श्रीकृष्ण ॥ ९७ ॥ राव पाहून समाधान ॥ एक सोडूनियां मार्गण ॥ तीन शरांचें मध्येंच खंडण ॥ करूनियां टाकिलें ॥ ९८ ॥ मग बोले दैत्योत्तमा ॥ पाहा माझिया पराक्रमा ॥ तीनही व्यर्थ गेले पुरुषोत्तमा ॥ एकाच बाणेंकरूनी ॥ ९९ ॥ तरी माझा एक बाणशृंग ॥ छेदावयास नव्हसी चांग ॥ आतां दृढ करून निजांग ॥ साहें बाण माझा हा ॥ १०० ॥ ह्मणोन सोडिला निर्वाण बाण ॥ तेणें हरि-

हृदय भेदिलें जाण ॥ काय संतुष्ट होऊन नारायण ॥ मूर्च्छा येऊन पडियेला ॥ १ ॥ अनुशाल्व तेणें संतुष्ट ॥ पडला देखून वैकुंठ-पीठ ॥ रथ दारुकें काढूनियां नीट ॥ आला जेथें धर्मराज ॥ २ ॥ कृष्ण देखून मूर्च्छायमान ॥ हाहाकार झालासे दारुण ॥ पांडव-यादवांचें सैन्य ॥ पळों लागलें चहूंकडे ॥ ३ ॥ रणीं पिता पडिला देखून ॥ पुत्र सहजेंचि करी पलायन ॥ तयासी जनक बोले वचन ॥ कां रे पलायन करितोस ॥ ४ ॥ तंव तयासी बोले नंदन ॥ माझा प्राण वांचलिया जाण ॥ पुढें तुझें करीन गयावर्जन ॥ परम प्रीतींकरूनी ॥ ५ ॥ जेथें पित्याचें वर्तमान ऐसें ॥ तेथें इतरांस कोण पुसे ॥ सकळ वीर पळाले ऐसे ॥ अनुशाल्वभयेंकरूनी ॥ ६ ॥ कृष्ण पडतां मूर्च्छायमान ॥ हाहाकार झाला दारुण ॥ तों रुक्मिणी भामा आदिकरून ॥ कृष्णकांता धांवल्या ॥ ७ ॥ विव्हळ देखोन गोपाळा ॥ दारुकें विनकामाजी आणिला ॥ भामा हंसून तमाळनीळा ॥ प्रगट वाक्य बोलत ॥ ८ ॥ परम संतोषें मंडित ॥ प्रद्युम्न देखूनियां मूर्च्छित ॥ दुर्वाक्यें करूनी बहुत ॥ तयालागीं निर्भर्त्सिलें ॥ ९ ॥ आतां आपण रथीं बैसोन ॥ आलेत मूर्च्छना पावोन ॥ अनुशाल्वभयें पलायन ॥ केवीं केलें समर्थें ॥ ११० ॥ जें समर्थें केलें तें बरवें ॥ तरी सत्वर उठावें यदुपुंगवें ॥ पळल्या सैन्या अभय द्यावें ॥ रक्षण करावें सैन्याचें ॥ ११ ॥ शस्त्रें न छेदिती स्वामीतें ॥ अग्नी समर्थ नव्हे जाळावयातें ॥ ऐसें असोनि देवकीसुतें ॥ कां ही दशा अवलंबिली ॥ १२ ॥ आतां त्या दैत्यवधालागून ॥ मी चंडिका होऊनियां जाईन ॥ ऐसें ऐकतां भामावचन ॥ यदुनंदन हांसला ॥ १३ ॥ मजहून माझे निजभक्त ॥ समरंगणीं अत्यंत सक्त ॥ हें जनांसी कळावया भगवंत ॥ अभिनव लीला करीत ऐसी ॥ १४ ॥ आतां पुढें कर्णनंदन ॥ अनुशाल्वा आणील धरून ॥ तें पुढले प्रसंगीं निरूपण ॥ अति रसाळ ऐकावें ॥ १५ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ माधवचरित्र असे अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ११६ ॥
इति श्रीमहाभारते आश्वमेधिके अनुशाल्वकृष्णादिसंग्रामे त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥ अध्याय ॥ १३ ॥ ओव्या ॥ ११६ ॥ ॥


अध्याय १४.
सैन्य.
अनुशाल्वास वृषकेतानें धरून श्री कृष्णाजवळ आणलें.
वृषकेत धर्माजवळ श्यामकर्ण घेऊन आला आहे
श्री कृष्ण
श्यामकर्ण रक्षणास अर्जुन ससैन्य जात आहे.
प्र. स्त्री.
प्रवीर.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जनमेजय ह्मणे जैमिनी ॥ धन्य धन्य तुझी वाणी ॥ केवळ ब्रह्मसुखाची खाणी ॥ उघडे श्रवणीं ऐकतां ॥१॥ जेवीं करितां अमृतपान ॥ कदा संतृप्त नव्हे मन ॥ तेवीं तुमचे वचनामृतेंकरून ॥ कर्णतृषा हरेना ॥ २ ॥ तरी ते तृषा हरावी ॥ कथाजाह्नवी चालवावी ॥ ऐकोनि वक्ता संतोषे जेवीं ॥ झाला कथनीं सावधान ॥ ३ ॥ आतां होऊनि सावधान ॥ राया करीं कथामृतपान ॥ तेणें भवरोग दारुण ॥ जाईल जाण क्षणमात्रें ॥ ४ ॥ भामावचन सतेज शर ॥ तेणें खोचलें हरिजिव्हारें ॥ रथीं बैसोन साचार ॥ पुनः चालिले युद्धासी ॥ ५ ॥ अपार बळसागर ॥ रणरंगधीर कर्णकुमर[2] ॥ आला पाहोनि श्रीधर ॥ अनुशाल्वातें पाचारिलें ॥ ६ ॥ उभा रे उभा दैत्यनाथा ॥ साहें साहें मम बाण आतां ॥ मग सप्त बाणें झाला विंधिता ॥ तया अनुशाल्वातें ॥ ७ ॥ तेव्हां सक्रोध अनुशाल्व होत ॥ दश बाणीं विंधिला कर्णसुत ॥ तेणें दिनकरा जिंकित ॥ ते मारक विषाहुनी ॥८॥ ते अनुशाल्वाचे बाण ॥ करूनियां मांसभोजन ॥ पानार्थ भोगावतीजीवन ॥ ह्मणोनि भूमि विदारिती ॥९॥ चार बाणें चारी अश्व वधून ॥ एके शरें सारथी वधिला जाण ॥ ऐसा वृषकेतु विरथ होतां पूर्ण ॥ तों नवल परम वर्तलें ॥ १० ॥ सूतात्मज देखोनि विरथ ॥ भयें व्याकुळ झाला दिननाथ ॥ मग सिद्ध करून विजयरथ ॥ पाठवी तात्काळ तयापासीं ॥ ११ ॥ दिनकरसारथी विनतासुत[3] ॥ तेणें आणिला दिव्य रथ ॥ त्या रथावरी बैसोन कर्णसुत ॥ पुनः युद्धास मिसळला ॥ १२ ॥ सक्रोध धांवोनि कर्णसुत ॥ अनुशाल्व धरिला अकस्मात ॥ बळें भूमीवरी आपटित ॥ तेणें मूर्च्छित तो झाला ॥ १३ ॥ सवेंचि जाऊनि तो उचलिला ॥ कृष्णाजवळी आणिला ॥ संतोष झाला तमाळनीळा ॥ काय वचन बोलत ॥ १४ ॥ वृषकेतु ह्मणे यदुवीरा ॥ पहावें या अश्वतस्करा ॥ तव प्रसादें इंदिरावरा ॥ प्रतिज्ञा झाली सत्य माझी ॥ १५ ॥ हंसोन जलधिजामांत ॥ कर्णात्मजासी आलिंगन देत ॥ ह्मणे तुजवांचून हा वीरनाथ ॥ अजिंक्य सर्वांस संग्रामीं ॥१६॥ भला भला रे वीरराजा ॥ तूं तरी प्राणप्रिय माझा ॥ तव प्रतापें हृदयांबुजा ॥ प्रफुल्लता होतसे ॥ १७ ॥ तंव सावध झाला अनुशाल्व ॥ तों पुढें पाहे रमाधव[4] ॥ देखोन स्वरूपवैभव ॥ परमानंदें डोलतसे ॥ १८ ॥ सप्रेम धांवोनि कृष्णनाथा ॥ चरणांबुजीं ठेविला माथा ॥ मग आलिंगिलें कर्णसुता ॥ ह्मणे तारिलें तुवां मज ॥ १९ ॥ तूं वैरी नव्हसी परम मित्र ॥ तुवां भेटविला कमलनेत्र ॥ धन्य माझे झाले नेत्र ॥ रमापति पाहातां ॥ २० ॥ जेणें मारिला माझा पूर्वज ॥ तोच हा देखिला गरुडध्वज ॥ वैर गेलें सर्व आज ॥ परम मित्रत्व पावलों ॥ २१ ॥ आधीं वैर मग मित्रता ॥ कोठें देखिली नाहीं कर्णसुता ॥ परी महदाश्रयाची श्रेष्ठता ॥ निर्वैरपणें नांदवी ॥ २२ ॥ पाहा पाहा शिवशरीरीं ॥ कंठीं विष अमृत शिरीं ॥ वैरभाव सोडून निर्धारीं ॥ परमानंदें नांदती ॥ २३ ॥ नातरी वीरचक्रचूडामणी ॥ शयनीं असे महाफणी ॥ पुढें गरुड कर जोडुनी ॥ निर्वैरपणें वर्तती ॥ २४ ॥ दातयांमध्यें वरिष्ठ ॥ त्या कर्णाचा

१ कृष्णाचें अंतःकरण. २ वृषकेतु. ३ अरुण. ४ श्रीकृष्ण.

तूं सुत श्रेष्ठ ॥ तुवां दिधला वैकुंठपीठ ॥ मम मानस भागवया ॥ २५ ॥ वृषकेतु ह्मणे ऐक ताता ॥ हरिपदांबुज पावलिया तत्वता ॥ वाचेसी मौन पडावें सर्वथा ॥ तूं तरी आतां बोलसी ॥ २६ ॥ तोंवरी नद नदी हें नाम ॥ जोवरी देखिलें नाहीं उदधिधाम ॥ तोंवरी सकळ विद्येचा श्रम ॥ जोंवरी सर्वोत्तम न देखिला ॥ २७ ॥ जळमय झालिया एकसरें ॥ मग जग हें कोठें उरे ॥ तेवीं पावलिया हरिपद सारें ॥ मग वाण न उरे कीं सर्वथा ॥ २८ ॥ तोंवरीच नाना नगविलास ॥ जोंवरी देखिलें नाहीं सुखास ॥ तोंवरीच माया-पडळ जनांस ॥ जों ज्ञान नाहीं प्रगटलें ॥ २९ ॥ जेथें योगेश्वरांची कुंठित वाणी ॥ जेथें मौन पावला सहस्रफणी ॥ तेथें तुझी किती रे वाणी ॥ हरिस्तवन करावया ॥ ३० ॥ अनुशाल्व बोले रम्य वचन ॥ परम भक्तवत्सल तूं भगवान ॥ माझ्या मार्गणांसी देऊन मान ॥ लटकीच मूर्च्छा पावलासी ॥ ३१ ॥ अज्ञान देखून ध्रुव बाळक ॥ तयासी दिधला अक्षय लोक ॥ तैसा मीही अज्ञान सेवक ॥ देवें संनिध ठेवावा ॥ ३२ ॥ ज्याच्या स्मरणमात्रें मानव ॥ साक्षात् होताती माधव ॥ जयाचें देखतां रूपवैभव ॥ काय देव तो न देई हो ॥ ३३ ॥ मत्स्यादि अवतार घेऊन ॥ आपुले रक्षिले भक्तजन ॥ आणि केलें दुष्टनिर्दलन ॥ निजबळेंकरूनियां ॥ ३४ ॥ भक्तांचीं संकटें हरितो कैसीं ॥ रात्रीं येऊन द्वैतवनासी ॥ भक्षून शाकपत्रासी ॥ दुर्वासासी तृप्त केलें ॥ ३५ ॥ ऐसा भक्तांचा कैवारी ॥ तो हा देखिला म्यां समीप हरी ॥ धन्य मी झालों चराचरीं ॥ मातृजठरीं जन्मोनियां ॥ ३६ ॥ आजि सुकृततरु फळला ॥ जन्ममरणसिंधु आटला ॥ पापाचळ समूळ खचला ॥ हरिचरणँकुलिशें ॥ ३७ ॥ जेवीं निम्न भूमीचें उदक ॥ तें आवरितां नावरे देख ॥ तेवीं हरिस्तवन करितां दैत्यना-यक ॥ वारितां उगा न राहे ॥ ३८ ॥ मग धर्माप्रति जाऊन ॥ दैत्येंद्रें केलें नमन ॥ धर्म ह्मणे आह्मी पांचजण ॥ तैसा तूं बंधू साहावा ॥ ३९ ॥ तुवां साह्य करावें आमुचें ॥ आणि रक्षण करावें अश्वाचें ॥ नित्य चिंतन माधवाचें ॥ करावें साचें बंधुपणें ॥ ४० ॥ अनु-शाल्व बोले वचन ॥ दोनी भुजा शरीर प्राण ॥ हे आह्मीं केलें धर्मार्पण ॥ धर्मकार्यालागुनी ॥ ४१ ॥ तों येरीकडे कर्णनंदन ॥ सकळ सैन्यातें जिंकोन ॥ आणूनियां श्यामकर्ण ॥ धर्महातीं दिधला ॥ ४२ ॥ वंदितांच धर्मचरणा ॥ रायें दिधलें आलिंगना ॥ ह्मणे भला भला कर्णनंदना ॥ पराक्रम अद्भुत तुवां केला ॥ ४३ ॥ तव विक्रम देखून डोळां ॥ परम संतोष झाला ॥ अनुशाल्व बंधु जोडला ॥ तव पराक्रमेंकरूनी ॥ ४४ ॥ भीम आणि हरिनंदन ॥ येऊनियां करिती वंदन ॥ तयां देऊन आलिंगन ॥ धर्मरायें तोषविले ॥ ४५ ॥ मग पुढें करून श्यामकर्ण ॥ सकळ करित नगरप्रवेशन ॥ आनंदें उत्साह करून ॥ सभास्थान पावले ॥ ४६ ॥ जे जे आले नृपगण ॥ तयांसी धर्में दिधलें भोजन ॥ वस्त्रालंकारचंदन ॥ तांबूलदानें तोषविलें ॥ ४७ ॥ देवकी आदि कृष्णमाता ॥ रुक्मिणी आदि सर्व वनिता ॥ अरुंधती आदि ऋषिकांता ॥ द्रुपददुहिता गौरवित ॥ ४८ ॥ ऐसे परस्परें करूनि आदर ॥ देती तांबूल अलंकार ॥ पर-



१ कृष्णाचें चरणकमल. २ समुद्र. ३ शेष. ४ बाणांस. ५ पुण्याचा वृक्ष. ६ पापपर्वत. ७ कृष्णाचे पाय हेंच कोणी एक वज्र त्यानें. ८ खोल, उतरत्या.

मोत्साहें नारीनर ॥ चित्तीं संतोष पावले ॥ ४९ ॥ द्वारकेहून आलिया कृष्ण ॥ ऐसे क्रमिले विंशति दिन ॥ यज्ञारंभ करावयाकारण ॥ चैत्री पौर्णिमा पाहिली ॥ ५० ॥ धर्म होऊन दीक्षित ॥ धरिलें असिपत्रव्रत ॥ द्रौपदीसहित आचरित ॥ मनीं आनंद न समाये ॥ ५१ ॥ करूनियां द्विजपूजन ॥ देवोन गजाश्वरथ दान ॥ मग करिती श्यामकर्णाचें पूजन ॥ गीतवाद्यवेदघोषें ॥ ५२ ॥ कनकपत्र दिव्य रेखिलें ॥ तें अश्वललाटीं बांधिलें ॥ कुंकुमचंदनें चर्चिलें ॥ सुपुष्पमाळा घातल्या ॥ ५३ ॥ नाना परिमळेंसी धूपदीपित ॥ केलें वस्त्रालंकारमंडित ॥ दोहीं बाहीं चामरें शोभत ॥ ऐसा अश्व गौरविला ॥ ५४ ॥ अश्वरक्षणीं योजिला फाल्गुन[1] ॥ झाला सुस्नात शुद्धवसन ॥ दुर्वा चंपकमाळा गुंफोन ॥ अर्जुनकंठीं घातल्या ॥ ५५ ॥ मस्तकीं कोटीर झळकत ॥ छत्र चामरें सुशोभित ॥ गांडीव धनुष्यें कर मंडित ॥ ऐसा पार्थ शोभला ॥ ५६ ॥ तयास ह्मणे धर्मनंदन ॥ पार्था रक्षीं हा श्यामकर्ण ॥ वासुदेवप्रसादें तुज जाण ॥ निर्विघ्न असो सर्वदा ॥ ५७ ॥ मार्गीं अखंड असो कल्याण ॥ धर्मयुद्धें जिंकीं नृपगण ॥ मातृपितृहीन नृपनंदन ॥ युद्धीं न वधीं धनंजया ॥ ५८ ॥ सकळ सिद्धींचें कारण ॥ हेच जाण श्रीकृष्णचरण ॥ मॅनोमंदिरीं[2] संरक्षण ॥ जय पावे सर्वत्र ॥ ५९ ॥ करून धरणीची प्रदक्षिणा ॥ शीघ्रच असो पुनरागमना ॥ सर्वदा न विसंबें श्रीकृष्णा ॥ जो कां विघ्नें निवारिता ॥ ६० ॥ बरवें ह्मणोन अर्जुन ॥ वंदिले धर्मश्रीकृष्णचरण ॥ नमस्कारून भीमसेन ॥ दिधलें क्षेम इतरांसी ॥ ६१ ॥ कुंती देवकी अरुंधती ॥ गांधारी रुक्मिणी आदि युवती ॥ सर्वांसी नमून एकचित्तीं ॥ काय प्रतिअनुवादे[3] ॥ ६२ ॥ धर्मरायें अश्वरक्षणा ॥ मज आज्ञा दिधली जाणा ॥ तरी तुह्मीं देऊन आशीर्वचना ॥ मज विजयी करावें ॥ ६३ ॥ मग कुंतीनें देऊन आलिंगन ॥ पार्थाप्रति बोले वचन ॥ सर्वें दिधले वीर कोण ॥ ते मजलागीं निवेदीं ॥ ६४ ॥ बोले तेव्हां फाल्गुन[4] ॥ श्रीकृष्णाचा ज्येष्ठ नंदन ॥ महावीर प्रद्युम्न ॥ सेनेसहित दिधला ॥ ६५ ॥ पिता आपुलें सर्व धन ॥ पुत्रा हातीं करी अर्पण ॥ तैसें कृष्णें केलें जाण ॥ पुत्रसेना दिधली ॥ ६६ ॥ तोच आमुचा संरक्षक ॥ कर्ता हर्ता तोच देख ॥ यज्ञ त्याचाच निःशंक ॥ भोक्ता नाहीं अन्य कीं ॥ ६७ ॥ आणिक योजोनियां अनंतें ॥ कर्णात्मज दिधला सांगातें ॥ न राहवूनियां मातें त्यातें ॥ पराक्रमी तो दिधला ॥ ६८ ॥ सपुत्रेंसी यौवनाश्व ॥ तैसाच वीर अनुशाल्व ॥ सुप्रसन्न रमाधव ॥ आपणा चिंता कायसी ॥ ६९ ॥ कुंती ह्मणे पुत्रा पार्था ॥ प्राणापरी रक्षावें वृषकेता ॥ त्यावीण जरी येसी परता ॥ तरी मी प्राण न ठेवीं ॥ ७० ॥ जाईं पुत्रा करीं अश्वपाळण ॥ तुज सर्वस्वें रक्षील नारायण ॥ ऐसें बोलूनियां वचन ॥ बाष्पलोचन[5] करी पृथा ॥ ७१ ॥ बरवें बोले वीर पार्थ ॥ वारंवार नमी कृष्णनाथ ॥ त्याचे आज्ञेनें त्वरित ॥ रथारूढ तो झाला ॥ ७२ ॥ नाना वाद्यें वाजती ॥ होमधूम्र असे धुमती ॥ कन्या अक्षतावर्षाव करिती ॥ सर्व जन देती आशी-

---

१ अर्जुन. २ मनरूप मंदिरांत. ३ बोले. ४ अर्जुन. ५ डोळ्यांत आंसवें आणणें.

र्वाद पैं ॥ ७३ ॥ तंव झाले दोन प्रहर ॥ मग सोडिला श्यामकर्ण सत्वर ॥ तयासी संकेत करी रमावर ॥ दक्षिण दिशेसी चलावें ॥ ७४ ॥ मग तो दिनकरतनयनंदन ॥ धर्मकृष्णादिकांसी नमोन ॥ रथावरी बैसोन गमन ॥ पार्थासवें करितसे ॥ ७५ ॥ त्याची स्त्री भद्रावती ॥ तीतें पाचारी त्वरितगती ॥ ह्मणे त्वां भावें सेवावी कुंती ॥ रुक्मिणी आदिसर्व स्त्रिया ॥ ७६ ॥ करितां ज्येष्ठसेवन ॥ तेणें देह होतसे पावन ॥ मग संतुष्ट होऊन नारायण ॥ आत्मसदनीं नांदवितो ॥ ७७ ॥ ह्मणोनि वृद्धांचें करावें सेवन ॥ आणि असों द्यावें आमुचें स्मरण ॥ ऐसें ऐकोन वचन ॥ काय भद्रावती बोलत ॥ ७८ ॥ ह्मणे वीरचक्रचूडामणी ॥ माझा मनोभृंग स्वामिचरणीं ॥ परम लुब्ध तो अन्य सुमनीं ॥ सर्वथा न बैसे स्वामिया ॥ ७९ ॥ मग कर जोडूनियां युवती ॥ काय बोलतसे भद्रावती ॥ सावध होऊनियां प्राणपति ॥ माझी विनंती ऐकावी ॥ ८० ॥ युद्ध करावें जी सन्मुख ॥ कदापि रणीं न व्हावें विमुख ॥ तेणेंच मज परम हरिख ॥ सत्य जाण स्वामिया ॥ ८१ ॥ जरी किंचित् विमुख झालेती रणीं ॥ तैं वार्ता येईल तेथुनी ॥ ती पडलिया माझे श्रवणीं ॥ परम लज्जा होईल ॥ ८२ ॥ मग विमुखपणाची वार्ता ॥ मजपुढें काढील हरिकांता ॥ ती ऐकतां प्राणनाथा ॥ शरीर कदा न ठेवीं ॥ ८३ ॥ ह्मणोनि असावें सावधान ॥ करावें अश्वसंरक्षण ॥ युद्ध करावें दारुण ॥ जेणें सकळ धन्य ह्मणती ॥ ८४ ॥ मग सस्मित बोले कर्णनंदन ॥ जरी युद्धासी आलें त्रिभुवन ॥ तरी मद्वाणें भंगलें ऐसें वचन ॥ तूंच ऐकसी शुभानने ॥ ८५ ॥ मी तों कर्णपुत्र महा सबळ ॥ युद्धसमयीं काढीन पळ ॥ तरी वासुदेवमाहात्म्य निष्फळ ॥ गेलें ऐसें जाणावें ॥ ८६ ॥ जरी मोक्ष नव्हे काशीतर्पणें ॥ पितर मुक्त न होती गयापिंडदानें ॥ जरी पाप न जाय वेण्यास्नानें ॥ तरीच पलायन मज घडे ॥ ८७ ॥ जरी हा खचोन पडेल भूगोळ ॥ जरी पितामह होईल शीतळ ॥ जरी पवन होईल पांगुळ ॥ तरीच पलायन मज घडे ॥ ८८ ॥ ऐसें बोलोनियां वचन ॥ शीघ्र निघाला तेथून ॥ रथारूढ कर्णनंदन ॥ अर्जुनामागें विराजे ॥ ८९ ॥ मग बोळवून अर्जुन ॥ श्रीकांत आणि भीमसेन ॥ सर्वही आले फिरोन ॥ हस्तिनापुरा प्रवेशती ॥ ९० ॥ पुढें जातसे श्यामकर्ण ॥ मागें जातसे सकळ सैन्य ॥ नेणों मंगळजननीस प्रावरण ॥ झालें वाटे सैन्याचें ॥ ९१ ॥ सकळ वाद्यांचा गजर ॥ तेणें ध्वनित झालें अंबर ॥ बधिर झाले दिग्गज सकळ ॥ तळीं डळमळी नागेश ॥ ९२ ॥ सांडूनियां पुरुषप्रयत्न ॥ धाकें पळाले सकळ सपत्न ॥ फिरत फिरत तें अश्वरत्न ॥ माहिष्मतीतें पावलें ॥ ९३ ॥ ते नगरीची अद्भुत रचना ॥ पाहातां परम हर्ष होय मना ॥ दुर्गप्राकारें गगना ॥ टेंकण दिधलें वाटतसे ॥ ९४ ॥ सभोंवतीं नाना उद्यानें ॥ जीं संतुष्ट जळपूर्णे ॥ नित्योत्सवें जनांचीं मनें ॥ सदा संतुष्ट असती ॥ ९५ ॥ चारी वर्ण स्वधर्मरत ॥ वेदघोषें नगर गर्जत ॥ नाना देवाल्यें मंडित ॥ समुद्रतुल्य सरोवरें ॥ ९६ ॥ नीळध्वज तेथिंचा नृपती ॥ नेणों अवनीं ये सुरपती ॥ जयाची भूमंडळीं कीर्ती ॥ विस्तारली



१ वृषकेतु. २ मन हाच कोणी भ्रमर. ३ वारा. ४ पृथ्वीस. ५ आच्छादन. ६ आकाश. ७ शत्रु. ८ किल्ल्याच्या तटानें.

सर्वमुखें ॥ ९७ ॥ शिवापासून भियाला मदन ॥ तो काय तेथें राहिला लपून ॥ राहे घेऊन अभय पूर्ण ॥ लावण्यधन देऊनियां ॥ ९८ ॥ तयाचा तनय प्रवीर ॥ नामें प्रसिद्ध महावीर ॥ सवें घेऊन अंगनाभार ॥ वनीं क्रीडा करितसे ॥ ९९ ॥ प्रफुल्लपंकेरुहन-यना ॥ शरत्पूर्णतारेशवदना ॥ निजस्वरूपें रतिरमणा ॥ ज्या जिंकिती सुहास्या ॥ १०० ॥ तयांमाजी मुख्य विलासिनी ॥ मदनमं-जरी नामें तरुणी ॥ जीतें देखतां विद्वन्मनीं ॥ कंदर्पबाधा होतसे ॥ १ ॥ तयेचें रूप अति सुंदर ॥ मदनवधूगर्वाचळशिखर ॥ समूळ करावया चूर ॥ नेणों वज्र गमताहे ॥ २ ॥ कीं ती लावण्यसुधावापिका ॥ कीं चातुर्यकासारमराळिका ॥ नातरी कामवनकल्पल-तिका ॥ अंगनारूपें जन्मली ॥ ३ ॥ तयेसी ह्मणे प्रवीर ॥ सुमनें अति मनोहर ॥ मग करून तयांचे हार ॥ कंठीं घालीं वराननें ॥ ४ ॥ ऐकोनि पतीची वाणी ॥ सत्वर चालिली हंसगमनी ॥ पुष्पें घेत तंव लोचनीं ॥ अवचित देखिला श्यामकर्ण ॥ ५ ॥ सावध पाहून यज्ञहयाला ॥ परम संतोष झाला तिजला ॥ धांवोनि सांगे प्राणपतीला ॥ ह्मणे अपूर्व अश्व आला असे ॥ ६ ॥ नेणों कवणाचा जी तुरंग ॥ दुग्धासारिखें धवल अंग ॥ कंठीं धरिला ताम्र सुरंग ॥ पुच्छ पीत जयाचें ॥ ७ ॥ श्यामकर्ण आणावा धरून ॥ ह्मणती कोणाचें हें हयरत्न ॥ भाळीं कनकपत्र लिहून ॥ बांधिलेंसे तयाचे ॥ ८ ॥ नाना रत्नमाळामंडित ॥ चंदनकुंकुमें चर्चित ॥ नारीकरप-ल्लवेंकरून शोभत ॥ निरुपम अश्व पहा ॥ ९ ॥ कीं तें विधिचातुर्यवन फुललें ॥ कीं भूमंडळीं शशिमंडळ उदेलें ॥ नातरी जननयन-चकोर वेधले ॥ अश्वरूपीं स्वामिया ॥ ११० ॥ माझिया वचनें प्राणनाथा ॥ तुह्मीं तुरंग धरावा आतां ॥ बरवें ह्मणोनि त्वरितां ॥ प्रवीर वीर चालिला ॥ ११ ॥ देखोनि प्रवीर आनंदला ॥ धावून अश्व केशीं धरिला ॥ कनकपत्र वाचिता झाला ॥ परम आवडीं-करूनी ॥ १२ ॥ युधिष्ठिरें मांडिलासे याग ॥ त्यानिमित्त सोडिला तुरंग ॥ पार्थ रक्षणीं असे सांग ॥ जयासी श्रीरंग साह्यकारी ॥ १३ ॥ जो नृप असेल बलाढ्य पूर्ण ॥ तेणेंच धरावा श्यामकर्ण ॥ त्यासी युद्ध करून अर्जुन ॥ सोडवील निजबळें ॥ १४ ॥ ऐसें पत्र वाचितां ॥ संतोष झाला प्रवीरचित्ता ॥ मग श्यामकर्ण धरून त्वरितां ॥ झाला पाठविता नगरांत ॥ १५ ॥ नगर प्रवेशोन स्त्रीगण ॥ धनंजया मानूनि तृण ॥ चतुरंग सैन्य सिद्ध करून ॥ संग्रामासी उभा ठेला ॥ १६ ॥ आतां दोनी सैन्यें मिळोन ॥ युद्ध करितील दारुण ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अति सुंदर परिसावें ॥ १७ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ श्रवण करितां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ११८ ॥ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते नीलध्वजपुत्रकृ-तश्यामकर्णहरणं नाम चतुर्दशोध्यायः ॥ १४ ॥ ॥ अध्याय ॥ ॥ १४ ॥ ॥ ओव्या ॥ ॥ ॥ ११८ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

१ कमलाप्रमाणें डोळे आहेत ज्यांचे अशा. २ शरत्काळींच्या पूर्णचंद्राप्रमाणें ज्यांचीं मुखें आहेत अशा. ३ घोडा.


अध्याय १५.
प्रवीर अर्जुन सैन्याचें युद्ध.
नीलध्वज सैन्य.
अर्जुनाचें सैन्य
अग्नि अर्जुनाचें सैन्य जाळीत आहे.
सैन्य
अर्जुन
नीलध्वज अर्जुनास श्यामकर्ण आणून देत आहे.
नीलध्वज स्त्री ज्वाला.
गंगा
नौका.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जनमेजय ह्मणे जैमिनी ॥ परम धन्य तुझी वाणी ॥ अनंत गुणरत्नांची खाणी ॥ पदोपदीं जी प्रसवतसे ॥ १ ॥ पुढें येऊन फाल्गुन[1] ॥ युद्धें सोडविला श्यामकर्ण ॥ तें कथामृतरसपान ॥ कर्णपात्रें करावें ॥ २ ॥ जैमिनि ह्मणे नृपनाथा ॥ तूं तंव पूर्ण कैलानिधि[2] श्रोता ॥ मद्वचनसोमकांत द्रवतां ॥ कां जी आळस धरियेला ॥ ३ ॥ काननीं प्रगटतां ऋतु वसंत ॥ केवीं मौन धरील पैरभृत[3] ॥ नातरी गगनीं येतां जीमूतें[4] ॥ मयूर न बैसे कदापी ॥ ४ ॥ तेवीं राया तुझें अवधान ॥ मज महाहर्षें बोलवी जाण ॥ आतां होऊनि सावधान ॥ कथानुसंधान ऐकावें ॥ ५ ॥ मग यौवनाश्व अनुशाल्व पार्थ ॥ पुढें चालिले अश्व शोधित ॥ सर्वांपुढें तो वृषकेत ॥ निजसैन्येंसीं धांवतसे ॥ ६ ॥ मग तो प्रवीर वीर प्रसिद्ध ॥ उभा सैन्य करूनि सिद्ध ॥ जो शस्त्रास्त्रीं मंडित अगाध ॥ भार्गवांची[5] अपर प्रतिमा ॥ ७ ॥ तो प्रवीर ह्मणे कर्णकुमरा ॥ काय पाहातोसी रे घाबरा ॥ श्यामकर्ण तों म्यां नगरा ॥ पाठविलासे धरूनी ॥ ८ ॥ जरी बलाढ्य असेल पार्थ ॥ युद्धाचें असेल सामर्थ्य ॥ तरी युद्ध करावें त्वरित ॥ श्यामकर्ण सोडवावया ॥ ९ ॥ जेवीं कां निजात्मज्ञान ॥ तयाचें हरण करी अभिमान ॥ बोधें त्यातें जिंकिलें पाहिजे जाण ॥ तेवीं मातें जिंकावें ॥ १० ॥ तूं आधीं मजसीं करीं समर ॥ मग तो येईल धनुर्धर ॥ ऐसें बोलोनि पांच शर ॥ कर्णात्मजावरी सोडिले ॥ ११ ॥ चहूं शरें चारी अश्व वधिले ॥ एकें सारथियातें मारिलें ॥ देखोनि कर्णात्मजें काय केलें ॥ तेंचि सावध परिसावें ॥ १२ ॥ मग दुजे रथीं बैसोन ॥ कर्णात्मजें सोडिले चार बाण ॥ तेणें नीलवर्ण श्यामकर्ण ॥ चारी त्याचे मारिले ॥ १३ ॥ तंव प्रवीरें नळिकबाण सोडिला ॥ तो वृषकेतांतरीं भरला ॥ तेणें तो मूर्च्छागत पडिला ॥ ध्वजस्तंभीं टेंकुनी ॥ १४ ॥ मग अनुशाल्ववीर धांवला ॥ तो प्रवीरें बाणीं विंधिला ॥ अनुशाल्व क्रोधा चढला ॥ अमित बाण वर्षतसे ॥ १५ ॥ बाण वर्षला अपार ॥ आच्छादिला तेणें प्रवीर ॥ सैन्यांत झाला हाहाकार ॥ प्रवीर पडला ह्मणोनि ॥ १६ ॥ तें नीलध्वजा झालें श्रुत ॥ तोही धांवला तेव्हां त्वरित ॥ तीन अक्षौहिणी चमूँसमवेत[6] ॥ सवें जामात पावला त्याचा ॥ १७ ॥ राजा देखत आत्मँजातें[7] ॥ अनुशाल्वें कोंडिला असे त्यातें ॥ बाणजाळीं न दिसे निरुतें ॥ जेवीं मेघमंडळीं रविबिंब ॥ १८ ॥ मग नीळध्वज कोपला ॥ धनुष्याचा गुँण[8] चढविला ॥ दश बाणें विंधूं लागला ॥ वीरांप्रति प्रत्येक ॥ १९ ॥ ऐसें देखोनि पार्थवीर ॥ नीळध्वजातें बोले उत्तर ॥ उभा राहें रे मजसमोर ॥ कोठें जाशील या समयीं ॥ २० ॥ पार्थें सोडिले पांच सायकें[9] ॥ ते मध्येंच तोडिले तात्काळिक ॥ अर्जुनें संधान केलें आणिक ॥ तेही तेणें तोडिले ॥ २१ ॥ मग अर्जुनें काय केलें ॥ अनंत बाणजाळ घातलें ॥ तेणें अंबॅर[10] आच्छादिलें ॥ न दिसे तेणें दिनमणी ॥ २२ ॥ गजाश्व आणि सारथी ॥ सर्व सैन्येंसीं महारथी ॥ अवघियां आच्छादिलें शरबुंथीं ॥ धनुर्धरें अर्जुनें ॥ २३ ॥ पडिला बाणांधकार ॥ न दिसे नीळध्वज प्रवीर ॥ तेव्हां झाला हाहाकार ॥ राजा पडिला ह्मणोनी ॥ २४ ॥

१ अर्जुन. २ चंद्र. ३ कोकिळ. ४ मेघ. ५ परशुरामाची. ६ सैन्यासहवर्तमान. ७ स्वपुत्राला. ८ दोरी. ९ बाण. १० आकाश.

तंव माहिष्मतीनायक ॥ सावध होऊनियां देख ॥ पार्थसैन्यांत सोडिला पावक[1] ॥ जो जामात आपला ॥ २५ ॥ तो पावक पेटला ॥ पार्थसैन्य जाळूं लागला ॥ आकाश कवळोनियां ज्वाळा ॥ धूम्रें वेष्टिल्या दिशा दाही ॥ २६ ॥ रथाश्व कुंजर जळती ॥ धांवता पदाती दग्ध होती ॥ शस्त्रें हातींचीं टाकिती ॥ तप्त झालीं ह्मणोनियां ॥ २७ ॥ धनुष्यें कवचें जळालीं ॥ रण सांडोनि कटकें[2] पळालीं ॥ अश्व टाकून राऊत ते वेळीं ॥ पळती तेव्हां निःशंक ॥ २८ ॥ छत्र ध्वजादि चामरें ॥ व्यजनें[3] पताका मनोहरें ॥ सर्वही जाळिलीं वैश्वानरें ॥ क्रोधें संतप्त होऊनियां ॥ २९ ॥ प्राप्त झालिया प्रळयकाळ ॥ त्रिभुवन दग्ध करी अनळ ॥ तेवीं पार्थसैन्य ते वेळ ॥ भस्म करीत चालिला ॥ ३० ॥ चहूंकडे चेतला पावक ॥ देखोनि भांबावला कुरुनायक[4] ॥ गुणीं लावोनियां सायक ॥ वरुणास्त्रातें सोडिलें ॥ ३१ ॥ आकाशीं दाटलासे घन ॥ घडघडां शब्द करीत दारुण ॥ वर्षों लागलें जीवन[5] ॥ धारा जैशा गजशुंडा ॥ ३२ ॥ मध्यें विद्युल्लता झळकती ॥ जीमूत[6] अतिबळें वर्षती ॥ तरी तो अग्नि न होय शांति ॥ मग सुभद्रापति चिंतावला ॥ ३३ ॥ तों अग्नि झाला तरुण ॥ जाळीत उठिला दारुण ॥ याचें कैसें होईल शमन ॥ ह्मणोनि अर्जुन विचारी ॥ ३४ ॥ मग वंदन करून करी स्तवना ॥ जय जय सप्तकरँ-रसना ॥ चतुःश्रृंगा प्रसन्नवदना ॥ मेषवाहना तुज नमो ॥ ३५ ॥ द्विशीर्ष आणि त्रिचरण ॥ तूं तरी मुख्य देवतांचें वदन ॥ तूंचि घेतां अवदान ॥ सकळ सुरांतें पावे ॥ ३६ ॥ संतोषानें युधिष्ठिर ॥ तुजनिमित्त करितो अर्ध्वर ॥ तूंच करितोसी सैन्यसंहार ॥ तरी याग सिद्धी केवीं पावे ॥ ३७ ॥ तुज दिधलें म्यां वन खांडव ॥ तोच मी सत्य पांडव ॥ तुवां मज दिधलें गांडीव ॥ आतां निष्टुर कां होसी ॥ ३८ ॥ रोगाचें करावया निरसन ॥ विप्रवेषें आलासी शरण ॥ शरीर तुझें निरोगी केलें जाण ॥ आतां शत्रुत्व कां करिसी ॥ ३९ ॥ तूं तरी सर्वभक्षक ॥ सप्तजिह्वा हें काय कौतुक ॥ परी ऐसें न करिती साधु लोक ॥ तूं तों यज्ञेश ह्मणविसी ॥ ४० ॥ जेवीं पूर्वदिनांशपुरुषच्छाया ॥ आधीं गुरुत्व मग पावे क्षया ॥ ऐसी दुर्जनमैत्री उत्तरार्धच्छाया ॥ तैसी मैत्री साधूंची ॥ ४१ ॥ मूळापासून अवधारी ॥ जैसी इक्षुदंडकांडोरी ॥ रसहीन तैसी दुर्जनमैत्री ॥ सज्जनमैत्री आद्यंतीं ॥ ४२ ॥ हय नेला सैन्य जाळिलें ॥ तुजला अति तारुण्य आलें ॥ ऐसें नसावें वहिलें ॥ साह्य व्हावें यज्ञासी ॥ ४३ ॥ तंव जनमेजय ह्मणे जैमिनी ॥ एक संदेह माझे मनीं ॥ संतोषें सर्व तो निरसोनी ॥ मग पुढील कथा सांगावी ॥ ४४ ॥ गृहजामात पाप उत्कट ॥ हा तो जाणतसे हव्यवाट ॥ उत्तम होऊ-नियां कनिष्ठ ॥ कर्म केवीं आचरला ॥ ४५ ॥ जामात कैसा झाला पावक ॥ हें मज वाटतें कौतुक ॥ तरी ही कथा सम्यक ॥ कृपा करूनी सांगावी ॥ ४६ ॥ जैमिनि ह्मणे ऐक भूपाळा ॥ नीलध्वजाची भार्या ज्वाळा ॥ तयेसी कन्या झाली मंगळा ॥ स्वाहा नामें राजस ॥ ४७ ॥ ती नीलध्वजाची नंदिनी ॥ स्वरूपलावण्याची खाणी ॥ उपमा द्यावया त्रिभुवनीं ॥ अन्य नारी असेना ॥ ४८ ॥

१ अग्नि. २ सैन्यें. ३ पंखे. ४ अर्जुन. ५ पाणी. ६ मेघ. ७ हे अग्ने. ८ यज्ञ. ९ अग्नि.

जियेची देखोनि मध्यरचना ॥ लाजोनि पंचानन भरला राना ॥ नेत्रकमळें देखोनि नयना ॥ कमळें बुडालीं उदकीं ॥४९॥ जियेचे देखतां नयन ॥ लाजोनि कानना गेले हरिण ॥ आस्यें[१] जिंकिला अमृतकिरण[२] ॥ शुकनासिका साजिरी ॥ ५० ॥ कनकचंपकदामगौरी ॥ प्रवाळ जिंकी बिंबाधरी ॥ कंबुकंठी अति गोजिरी ॥ अलिकुल चुंबनीं जिंकिलें ॥ ५१ ॥ जियेची देखोनि स्वरूपरेखा ॥ लज्जा झाली रतिनायका ॥ स्वदेह जाळी शिवाक्षपावका[३] ॥ अनंग झाला तेथोनी ॥ ५२ ॥ कोकिळा जिंकिल्या मधुरस्वरानें ॥ राजहंस जिंकिले गमनें ॥ इंदुमंडळ जिंकिलें वदनें ॥ ऐशी लावण्यपेटिका ती ॥ ५३ ॥ ऐसी देखोनियां दुहिता ॥ पित्यासी प्रवर्तली चिंता ॥ इच्या स्वरूपायोग्य वर पाहतां ॥ मज या त्रिभुवनीं दिसेना ॥ ५४ ॥ मग जनक ह्मणे वो नंदिनी ॥ हा चित्रपट पाहावा नयनीं ॥ जे सुंदर पुरुष त्रिभुवनीं ॥ ते यावरी रेखिले ॥ ५५ ॥ पाहोनियां ह्मणे रे जनका ॥ मज मानव वर न माने निकां[४] ॥ तुह्मीं पाहोनियां सुरलोका[५] ॥ मज वर मेळविजे ॥ ५६ ॥ भूपति ह्मणे वो तनये ॥ जरी मानव वर कामा नये ॥ तरी अमरनाथ वर आहे ॥ वरीं त्यातें राजसुते ॥ ५७ ॥ ऐरावतावरी बैससी ॥ अमृतपान नित्य करिसी ॥ कल्पतरुवनीं क्रीडसी ॥ नित्य पाहासी रंभानृत्य ॥ ५८ ॥ होसी सर्व देवांची स्वामिनी ॥ लेसी चींतामणींची लेणीं ॥ उर्वशीऐशा नाचणी ॥ गृहांगणीं नाचती ॥ ५९ ॥ जयाचे घरीं सर्व संपत्ती ॥ सर्व देव जयातें सेविती ॥ तोचि वरीं अमरपती ॥ सुख भोगिसी अपार ॥६०॥ तो वासव[६] असे स्त्रीकामुक ॥ पाचारितां येईल सम्यक ॥ तत्संगें अपार कौतुक ॥ पाहासी नेत्रीं राजबाळे ॥ ६१ ॥ तंव नंदिनी ह्मणे जी जनका ॥ हा कां वदलेत शब्द फिका ॥ तो तरी पातकतरुवाटिका[७] ॥ मजलागीं न माने ॥ ६२ ॥ तो परोदर्यातें[८] न साहे ॥ तपोधनांचा द्वेष वाहे ॥ सदा असंतुष्ट मनें पाहे ॥ आणि न साहे परभाग्या ॥ ६३ ॥ ब्रह्मनंदिनी गौतमनारी ॥ कपटें भोगी दुराचारी ॥ तो दोष भगें सर्व शरीरीं ॥ पडलीं पाहें नेत्राकृती ॥ ६४ ॥ त्रिभुवनजनक सौख्यसिंधु ॥ भक्तवत्सल अनाथबंधु ॥ तो हरि मानी कनिष्ठ बंधु ॥ परम अपराध हा त्याचा ॥ ६५ ॥ ज्यापासून इंद्रपद ॥ तो कनिष्ठ केला गोविंद ॥ ऐसा पापिष्ठ मोहकंद ॥ परम कृतघ्न वर्जित तो ॥६६॥ भामेनिमित्त पारिजात ॥ मागों पाठवी श्रीभगवंत ॥ तदर्थ युद्ध केलें प्राणांत ॥ मग बळें नेला हरीनें ॥ ६७ ॥ गोकुळीं असतां श्रीहरी ॥ तो गोवर्धनाची पूजा करी ॥ तें वैर धरून वृष्टी करी ॥ सप्त दिन प्राणांत ॥ ६८ ॥ ऐसा कृतघ्न तो शचीरमण ॥ परम सुखाब्धिकुंभनंदन ॥ तया कौशिकाचें वदन ॥ न पाहें सर्वथा मी ताता ॥ ६९ ॥ मानव न वरायाचें कारण ॥ तुज मी सांगतें ऐक सावधान ॥ निजपतित्यागें अन्यासीं शयन ॥ करितां पतन कुळवंता ॥७०॥ वर मेलिया अथवा जिता ॥ जी परसंगें निजे वनिता ॥ ती तीव्र महानरकव्यथा ॥ आकल्प जाणा पावेल ॥ ७१ ॥ आदि मानव पति भोगून ॥ अंतीं अवश्य पावावें मरण ॥ मग अग्नि-

१ मुखानें. २ चंद्र. ३ महादेवाच्या डोळ्यांतीळ अग्नींत. ४ निश्चयानें. ५ देवलोकीं. ६ इंद्र. ७ पापरूप झाडांचें वन. ८ दुसऱ्याच्या उत्कर्षाला.

पुरुषासीं करावें शयन ॥ तोही जाण व्यभिचार ॥ ७२ ॥ ह्मणोनि नृपकुळतिलका ॥ मजला समर्पी त्या पावका ॥ निर्दोष होईन उभय लोका ॥ येथें संशय न धरावा ॥ ७३ ॥ तंव तीस ह्मणे धरापती ॥ जरी तो येऊन मजला प्रार्थी ॥ तरी त्यासी समर्पीन सुमुहूर्तीं ॥ सत्य जाण निर्धारें ॥ ७४ ॥ ऐकोनि हांसती सर्व अबला¹ ॥ तो काय तुज वर मानवला ॥ अमरनाथ श्रेष्ठ वहिला ॥ तयालागीं टाकुनी ॥ ७५ ॥ सर्वभक्षक मलिनमार्ग ॥ सप्त जिह्वा चतुःश्रृंग ॥ धूम्रमुख विरूपांग ॥ कृतघ्न जाळी सर्वांतें ॥ ७६ ॥ आणि तो असे मेषवाहन ॥ स्पर्श करितां जाळी वन ॥ तयासह एकांत गमन ॥ कैसें करिसी राजसे ॥ ७७ ॥ हें तों आश्चर्य गे राजसुते ॥ यथार्थ जाणोनि रूपवंते ॥ तेथें स्त्रियांनीं रमावें निरुतें ॥ तुझें हें सर्व आश्चर्य ॥ ७८ ॥ ऐकोनियां ऐसिया बोला ॥ क्रोध नोपजेचि स्वाहेला ॥ उंच नीच स्थान जह्नुबाळा ॥ परी पवित्रता न सोडी ॥ ७९ ॥ घांसितां होय सुगंध चंदन ॥ कीं तावितां सतेज होय सुवर्ण ॥ कीं गाळितां इक्षुदंड सुरसपण ॥ सर्वथा न सोडी प्राणातें ॥ ८० ॥ तेवीं नानापरी निर्भर्त्सितां ॥ सक्रोध नव्हे राजदुहिता ॥ चित्ता करूनि एकाग्रता ॥ हिरण्यरेता आठवी ॥ ८१ ॥ मग द्विजांसी बोले स्वाहा वचन ॥ कोणें उपायें वर होय ज्वलन ॥ तें मज सांगावें आचरण ॥ मनोभावें करीन मी ॥ ८२ ॥ विप्र ह्मणती ऐक वचन ॥ सुस्नात शुद्ध प्रावरण ॥ असोनि अग्निप्रतिष्ठापन ॥ करीं पूजन सुभावें ॥ ८३ ॥ केशर कस्तूरी शुद्ध चंदन ॥ कर्पूर अगरू आदि चूर्ण करून ॥ तीळ पायसें³ आज्येंकरून हवन ॥ यथाविधि जाण मंत्रोक्त ॥ ८४ ॥ ऐसें केलिया व्रताचरण ॥ प्रसन्न होईल तो ज्वलन⁴ ॥ ऐसें ऐकतां द्विजवचन ॥ व्रत करीतसे सद्भावें ॥ ८५ ॥ ऐसें करितां व्रताचरण ॥ संतुष्ट झाला मेषवाहन⁶ ॥ मग विप्रवेषातें धरून ॥ राजापासीं कन्या मागों आला ॥ ८६ ॥ नृपें करूनि त्याचें वंदन ॥ अर्घ्यादि पूजा करून ॥ मग पुसिलें आगमन ॥ तों द्विज बोले मी कन्यार्थी⁷ ॥ ८७ ॥ माझें शांडिल्य गोत्रीं जनन ॥ संपूर्ण असे वेदाध्ययन ॥ तरी मज द्यावें कन्यादान ॥ वेदोक्तमंत्रें नृपाळा ॥ ८८ ॥ तयासी बोले नृपवर ॥ माझी कन्या तों उपवर ॥ जयेनें आव्हानिला वैश्वानर⁹ ॥ प्रीतिव्रत ती करीतसे ॥ ८९ ॥ रायासी बोले ब्राह्मण ॥ मीच स्वरूपें हुताशन ॥ स्वाहाव्रतभावेंकरून ॥ आलों तीतें वरावया ॥ ९० ॥ ऐकोनि हांसती सभाजन ॥ राया होईं तूं सावधान ॥ हा कन्याभिलाषी ब्राह्मण ॥ नव्हे हुताशन लटिका हा ॥ ९१ ॥ प्रधानासी आज्ञा द्यावी ॥ याची परीक्षा करवावी ॥ मग स्वाहा यासी द्यावी ॥ ऐसें आह्मां गमतसे ॥ ९२ ॥ मग त्यासी बोले प्रधान ॥ आह्मीं कैसा जाणावा हुताशन ॥ तूं आपुले स्वरूपगुण ॥ प्रगट करून दाखवावे ॥ ९३ ॥ मग तया विप्रमुखांतून ॥ ज्वाळा निघाल्या दारुण ॥ तेणें प्रधानवस्त्रांचें दहन ॥ झालें केशांसमवेत ॥ ९४ ॥ अधिक प्रधान जळों लागला ॥ तों हाहाकार थोर झाला ॥ तों नृपें स्तविला ते वेळां ॥ तेणें झाला तो शांत ॥ ९५ ॥

१ अग्नीला. २ स्त्रिया. ३ इंद्र. ४ क्षीर. ५ तुपानें. ६ अग्नि. ७ कन्येची इच्छा करणारा. ८ बोलाविला. ९ अग्नि.

तेथें प्रवर्तली विनोदवाणी ॥ तों नीळध्वजाची वहिनी ॥ ती रायाप्रति बोले वचनीं ॥ बरवी परीक्षा घ्यावी याची ॥ ९६ ॥ हा ब्राह्मण कपटी केवळ ॥ जाणतो कीं इंद्रजाळ ॥ परीक्षा घेऊन प्रांजळ ॥ कन्या द्यावी मग यासी ॥ ९७ ॥ राजा ह्मणे अगे वहिनी ॥ तुह्मींच यासी न्यावें अंतरसदनीं ॥ बरी परीक्षा घेऊनी ॥ प्रचीत आणा मानसीं ॥ ९८ ॥ तयेनें गृहांत नेला ब्राह्मण ॥ मज दावा हो रूपगुण ॥ तंव तो धडाडिला हुताशन ॥ सुंदर मंदिर भस्म केलें ॥ ९९ ॥ तिचें परिधानवस्त्र परम ॥ तें क्षणामाजी केलें भस्म ॥ नग्न धांवे ह्मणे कर्म ॥ कैसें माझें उदेलें ॥ १०० ॥ राजा ह्मणे कां वहिनी ॥ बरवी परीक्षा घेतली कीं सदनीं ॥ प्रचीत आणिली कीं नाहीं मनीं ॥ किंवा आणिक राहिली असे ॥ १ ॥ ती धरणीपतीसी[1] ह्मणत ॥ राया कैंचा आणिला जामात ॥ तेणें केला माझा घात ॥ तो तुह्मांतें काय सांगों ॥ २ ॥ हा अग्नीसा कळला मनीं ॥ नृप तयातें बोले वाणी ॥ जरी न जाल माझें घर सोडूनी ॥ तरी मी कन्या देईन ॥ ३ ॥ येथें येतील जे रिपुगण[2] ॥ त्यांचें तुवां करावें दहन ॥ तंव रायासी बोले प्रधान ॥ हें कां अकार्य करितोसी ॥ ४ ॥ घरीं ठेवितां जामात ॥ हा नित्य करील आकांत ॥ कृतोपकाराचा[3] घात ॥ जामातस्वभाव ऐसा कीं ॥५॥ तेजस्वी महा हुताशन ॥ कदापि घरीं न ठेवावा जाण ॥ संगें पत्नी घेऊन ॥ जाऊ आपल्या नगरासी ॥ ६ ॥ नीळध्वज सचिवां ह्मणत ॥ तोंवरी तयाचें तेज बहुत ॥ जों झाला नाहीं जामात ॥ झालिया तेज मग कैंचें ॥ ७ ॥ सकळ विद्या चातुर्यखाणी ॥ जेवीं याचकवृत्ती करी हानी ॥ दक्षिणदिशेप्रति जातां तरणी[4] ॥ होय हानी तेजाची ॥ ८ ॥ मी बळीसी करीन याचन ॥ चिंतितांच देव झाला वामन ॥ त्याहून थोर असे जी कवण ॥ लघुत्व पावे मग तो ॥ ९ ॥ मरणापरीस गृहजामातपण ॥ सर्वार्थीं[5] असे हीन ॥ तें पावतांचि हुताशन ॥ निस्तेज आपण होईल ॥ ११० ॥ मग उत्तम मुहूर्त पाहोन ॥ रायें त्यास दिधलें कन्यादान ॥ तेणें धरिलें नृपसदन ॥ कांतालोभेंकरूनियां ॥ ११ ॥ तरी तो हा वह्नि जामात ॥ जो पार्थाचें सैन्य जाळित ॥ पुढील कथेचा वृत्तांत ॥ ऐक आतां राजया ॥ १२ ॥ धनंजयाचें स्तवन ॥ ऐकून शांत नव्हे हुताशन ॥ तंव क्रोधें बोले पृथानंदन ॥ कृतघ्न दुर्जन सत्य हा ॥ १३ ॥ गृहजामातभावें याची बुद्धी ॥ नासोनि गेली त्रिशुद्धी ॥ मित्रपणाची शुद्धी ॥ यासी कांहीं असेना ॥ १४ ॥ अग्निसारिखा झाला ऐसा ॥ मग मानवांची काय कथा ॥ अर्जुन ह्मणे हृषीकेशा ॥ जन्मोजन्मीं ऐसें नसो ॥ १५ ॥ सकळ देवतांचें वक्र[6] ॥ ह्मणोनि म्यां याचें केलें स्तोत्र ॥ परी खळजनांसी स्तुतिस्तोत्र ॥ सर्वथा गोड न लागे ॥ १६ ॥ फणिदाढेचा मणी काढवेल ॥ स्वहस्तें दुस्तर सिंधु तरवेल ॥ कुपित फणी[7] मस्तकीं धरवेल ॥ परी दुर्जनचित्त बोधवेना ॥ १७ ॥ वाळू गाळितां स्नेह[8] सांपडेल ॥ प्राशितां मृगांबु[9] तृषा जाईल ॥ फिरतां शशविषाण[10] मिळेल ॥ परी दुर्जनचित्त बोधवेना ॥ १८ ॥ गोक्षीरें धुतां बहुकाळ ॥ काय काक होईल धवळ ॥

---

१ राजाला. २ शत्रूंचे समुदाय. ३ केलेल्या उपकाराचा. ४ सूर्य. ५ खरोखर. ६ मुख. ७ सर्प. ८ तेल. ९ मृगजळ. १० सशाचें शिंग.

मृगमद भूमीस उगवेल ॥ परी सुगंध नव्हे पलांडू ॥ १९ ॥ तापून मारितां लोह घन ॥ नम्र होय तें निवतां कठिण ॥ तेवीं दुर्जना न माने स्तवन ॥ यासी ताडितांचि बरवें असे ॥ १२० ॥ पयःपान करोनि विशेष ॥ जैसा द्विजिह्व वमी विष ॥ हा तो सप्तजिह्व निःशेष ॥ याचें कापट्य कळेना ॥ २१ ॥ खराप्रति लीन होण ॥ हेंचि तो आधीं मूर्खपण ॥ ऐसें बोलोनि अर्जुन ॥ नारायणास्त्र योजिलें ॥ २२ ॥ नारायणास्त्र योजितांचि पार्थ ॥ त्वरें अग्नि झालासे शांत ॥ अर्जुनापासीं येऊन त्वरित ॥ निज वृत्तांत सांगितला ॥ २३ ॥ मज संतोष व्हावया यथार्थ ॥ अश्वमेध करितो हा पार्थ ॥ परी निष्पाप करावया समर्थ ॥ श्रीकृष्णावांचोनि नसेचि ॥२४॥ योग याग तप दानीं ॥ व्रत यात्रादि करणीं ॥ एका श्रीहरीवांचोनी ॥ समर्थ न होती तारावया ॥ २५ ॥ तुह्मांसी सखा असतां कृष्णदेव ॥ तेथें नसेचि ईश्वरभाव ॥ ह्मणोनि अश्वमेधाची हाव ॥ धरितां कौतुक मज वाटे ॥ २६ ॥ पार्था ऐक माझें उत्तर ॥ प्राप्त होतां क्षीरसागर ॥ केवीं आवडे अजाक्षीर ॥ हें तों अपूर्व मज वाटे ॥ २७ ॥ प्रतापें चेतवी चराचर ॥ तो उगवलासे दिनकर ॥ खद्योतासी करितां आदर ॥ तेवीं अपूर्व मज वाटे ॥२८॥ कल्पिल्याहून देई उदंड ॥ घरींच कल्पतरूचें झाड ॥ तें अव्हेरून आवडे एरंड ॥ हें तों आश्चर्य मज वाटे ॥ २९ ॥ प्रत्यक्ष प्रसन्न असतां भवानी ॥ मायामूळपीठनिवासिनी ॥ ती टाकून पूजी जंखिणी ॥ हें तों अपूर्व मज वाटे ॥ १३० ॥ चिंतामणी पाहून दृष्टीं ॥ मोहें घेतलासे मुष्टी ॥ तो टाकून आवडे गारगोटी ॥ हें तों आश्चर्य मज वाटे ॥ ३१ ॥ तेवीं जवळी असतां आत्माराम ॥ तुह्मीं मांडिलासे अश्वमेध भ्रम ॥ न कळे पूर्वकर्माचें वर्म ॥ तुह्मां ऐशियां हा भ्रम कां ॥ ३२ ॥ तुह्मीं असावें जी येथें ॥ मी जाऊन बोधितों रायातें ॥ श्यामकर्णासहित तुह्मांतें ॥ शरण तयातें करीन ॥ ३३ ॥ नृपें मज सेनेवरी धाडिलें योजून ॥ आपण गेला सदनाकारण ॥ तरी तो तुह्मांस येईल शरण ॥ ऐसा उपाय करितों जी ॥ ३४ ॥ ऐसें बोलून हव्यवाट ॥ नगरांत चालिला घडघडाट ॥ तों रायें देखून जामात वरिष्ठ ॥ काय प्रश्न बोलिला ॥ ३५ ॥ धन्य धन्य जामाता ॥ बरें पीडिलें तुह्मीं पार्था ॥ नेणोनि माझ्या पुरुषार्था ॥ वृथा कां आलेति येथें ॥ ३६ ॥ अवघें दग्ध झालें सैन्य ॥ आह्मीं हरिला श्यामकर्ण ॥ आतां काय जय घेऊन ॥ ईभनगरा जाईल ॥ ३७ ॥ जामात ह्मणे श्वशुरासी ॥ तूं कां वृथा भुललासी ॥ तूं नेणसी त्या पार्थासी ॥ जो त्रिभुवनासी अजिंक्य ॥ ३८ ॥ जेणें जिंकिला शचीनाथ ॥ तैसाच जिंकिला कैलासनाथ ॥ तूं जिंकिला ह्मणसी पार्थ ॥ परम आश्चर्य मज वाटे ॥ ३९ ॥ लागोनि मशकचरणप्रहार ॥ केवीं कनकाचळाचा होईल चूर ॥ तैसा पार्थ धनुर्धर ॥ तुवां जिंकिला संग्रामीं ॥ १४० ॥ नातरी लागलिया पिपासा ॥ बाळ प्राशील जरी नदीशा ॥ खद्योततेजें दिनेशा ॥ म्लानता जरी येईल ॥ ४१ ॥ प्रळयानळाची ज्वाळा ॥ पिपीलिका धरील मुखकमळा ॥ तरीच तूं सुभद्रापतीला ॥ जिंकिशील रणांगणीं ॥ ४२ ॥ जेणें

१ कस्तूरी. २ ओकतो. ३ शेळीचें दूध. ४ सूर्य. ५ मुठीमध्यें. ६ हस्तिनापुरास. ७ मुंगी.

मज दिधलें खांडव ॥ तोचि हा प्रत्यक्ष पांडव ॥ ग्यां कृतघ्नें सोडिला मित्रभाव ॥ गृहजामातपातकें ॥ ४३ ॥ आतां राया सावध होई ॥ तूं यासी शरण जाई ॥ श्यामकर्ण नेऊन देई ॥ धणीवरी पाहें श्रीकृष्णा ॥ ४४ ॥ ऐसें बोलतां जामात ॥ रायें मानिलें परम हित ॥ तो ज्वाळाकांतेसी जाऊन पुसत ॥ देऊं काय श्यामकर्ण ॥ ४५ ॥ येरी ह्मणे जी प्राणनाथा ॥ अपार सैन्य जवळी असतां ॥ काय भय धरिलें चित्ता ॥ जिंका पार्था जाउनी ॥ ४६ ॥ जवळी असतां वीरकोटी ॥ कासया भय धरिलें पोटीं ॥ काय करील तो किरीटी ॥ जो जामातें[१] मर्दिला ॥ ४७ ॥ वैरमूळ ती कामिनी ॥ रायें तिचें वचन ऐकोनी ॥ पुनरपि आला युद्धालागोनी ॥ धनुष्या गुण चढविला ॥ ४८ ॥ शरवर्षाव करीत साचा ॥ पाहोनि हंता[४] कर्णाचा ॥ पराक्रम दावीत युद्धाचा ॥ सर्व वीरांलागोनी ॥ ४९ ॥ तो माहिष्मतीनायक ॥ वीरवीरांप्रति प्रत्येक ॥ मारीत बाणांचें दशक ॥ करीत कौतुक ते समयीं ॥ १५० ॥ तें जाणवलेंसे पार्था ॥ जिंकावया मग नृपनाथा ॥ पार्थ ह्मणे सैन्यघाता ॥ येणें मांडिलें माझिया ॥ ५१ ॥ चार बाण पार्थें सोडिले ॥ चारी वारू संहारिले ॥ एकें सारथिया मारिलें ॥ विरथ झाला नीळध्वज ॥ ५२ ॥ अनेकशरजाल[५] सोडिलें ॥ सैन्य तयाचें संहारिलें ॥ नृपातें तीक्ष्ण शरें ताडिलें ॥ भूमीस पाडिला मूर्च्छित ॥ ५३ ॥ तों प्रवर्तला अस्तमान ॥ युद्ध पावलें अवसान[६] ॥ दुजे सारथियें स्यंदनीं घालून ॥ नीळध्वज नगरीं नेला ॥ ५४ ॥ तंव तो राजा सावध झाला ॥ ह्मणे स्त्रीलोभें ग्यां अनर्थ केला ॥ आतां भेटोनियां पार्थाला ॥ वारू[७] तयाचा देईन ॥ ५५ ॥ ऐसा नृपाचा निश्चय ॥ जाणोनि कांता सकोपहृदय ॥ ह्मणे मी सेवीन जी यमालय ॥ जरी अश्व द्याल पार्थाचा ॥ ५६ ॥ तंव नृप ह्मणे वो सुंदरी ॥ तूं राहें अथवा जाईं दुरी ॥ परी मी अश्व देऊन निर्धारीं ॥ सख्य करीन अर्जुनाचें ॥ ५७ ॥ ऐसें बोलोनि नृपभूषण ॥ पुढें करून श्यामकर्ण ॥ गज रथ वाजी[८] रत्न धन ॥ घेऊन भेटीस निघाला ॥ ५८ ॥ सचिव घेऊन समागम ॥ वस्त्रें घेऊनियां उत्तम ॥ येऊन भेटला राजोत्तम ॥ पार्थाप्रति बोलत ॥ ५९ ॥ सुभद्रापति मज आतां ॥ कांहीं आज्ञा करावी पार्था ॥ येरू ह्मणे अश्वरत्न उभयतां ॥ रक्षूं येईं समागमें ॥ १६० ॥ दोघे पावले समाधान ॥ पुढें चालिला श्यामकर्ण ॥ नीळध्वजासह अर्जुन ॥ पाठ राखिती तयाची ॥ ६१ ॥ तंव ती ज्वाळा क्रोधें तापली ॥ उठोनि बंधुगृहातें गेली ॥ बंधूतें बोलूं लागली ॥ तें श्रवणीं ऐकावें ॥ ६२ ॥ ज्वाळा ह्मणे रे बंधुराया ॥ अर्जुनें सर्व नेलें विलया ॥ गज रथ वाजी पदातिया[९] ॥ नेऊन राज्य बुडविलें ॥ ६३ ॥ राजाही धरून नेला ॥ सर्व इष्टजनांचा क्षय केला ॥ ह्मणोनि आश्रयिलें तुला ॥ तरी साह्य माझें करावें ॥ ६४ ॥ तुजसारिखा असतां बंधु ॥ मज प्राप्त झाला शोकसिंधु ॥ दुःखानें म्लान मुखेंदु ॥ तो स्वस्थ करीं स्वप्रतापें ॥ ६५ ॥ येरू ह्मणे वो भगिनी ॥ कांहीं खंती न धरावी मनीं ॥ हें गृह आपुलें मानुनी ॥ येथेंच राहावें चिरकाळ ॥ ६६ ॥ काळांतरें तुजलागुनी ॥

---

१ तृप्तीहोईपर्यंत. २ अर्जुन. ३ जांवयानें ( अग्नीनें ). ४ कर्णाला मारणारा ( अर्जुन ). ५ बाणसमूह. ६ शेवट. ७ रथामध्यें. ८ घोडा. ९ पायदळ.

मी बैसवीन राज्यासनीं ॥ येरी ह्मणे आतांच जाउनी ॥ त्यासी मारून देईं राज्य ॥ ६७ ॥ मग तो सक्रोध बोले उत्तर ॥ तुवांच बुडविलें आपुलें घर ॥ आतां बुडवावया माझें मंदिर ॥ येथें आलीस धांवोनियां ॥ ६८ ॥ जी स्त्री झाली अशिक्षित ॥ ती शिकविलें न मानित ॥ राहें अथवा जाय निभ्रांत ॥ येथून शीघ्र निर्लज्जे ॥ ६९ ॥ ऐसें ऐकोनि बंधुवचन ॥ चालिली त्वरें करीत रुदन ॥ ती नौकेमाजी बैसोन ॥ गंगापरपारा जातसे ॥ १७० ॥ ह्मणे माझिये वामचरणीं[1] ॥ कां लागलें हें अपवित्र पाणी ॥ येणें पातक झालें ह्मणोनी ॥ तें जळ वस्त्रें पुशिलें ॥ ७१ ॥ ऐकोनि कोपले समीपस्थ जन ॥ काय बोलती तयेस वचन ॥ सर्व पापहारक गंगाजीवन ॥ तें स्पर्शतां पाप ह्मणतेसी ॥ ७२ ॥ तें वचन ऐकोनि सवेगा ॥ मूर्तिमंत निघाली गंगा ॥ तयेसी ह्मणे ती तरंगा ॥ काय बोलतीस पापिष्ठे ॥ ७३ ॥ येरी ह्मणे अपुत्रिणी ॥ ऐक माझी सावध वाणी ॥ सप्त पुत्र झाले तुजलागुनी ॥ ते त्वां जीवनीं[2] बुडविले ॥ ७४ ॥ जेणें रतिकांत[3] जिंकिला ॥ तो एक भीष्म होता उरला ॥ तो पुढें करूनि शिखंडीला ॥ पार्थें मारिला रणांत ॥ ७५ ॥ जो पाववी संसारपार ॥ जो करी नरकांतिलांचा[4] उद्धार ॥ जो आलिंगनें शीतळ करी संसार ॥ धन्य तो सुपुत्र संसारीं ॥ ७६ ॥ जो अंकासनींचें भोगरत्न ॥ ज्याचे प्राप्तीलागीं कीजे प्रयत्न ॥ जो मातृपितृशोकहनन ॥ धन्य तो सुपुत्र संसारीं ॥ ७७ ॥ विशेषें भीष्माऐसा तनय ॥ ज्यातें पितृस्थानीं मानी यदुराय ॥ तयातें मारून पंडुतनय ॥ अश्वमेध करीतसे ॥ ७८ ॥ ह्मणोनि असती जे पुत्रहीन ॥ तयांचें न पाहावें वदन ॥ तयांसीं करितां संभाषण ॥ पाप दारुण होतसे ॥ ७९ ॥ तुझें निपुत्रीचें जीवन ॥ स्पर्शतां पाप झालें दारुण ॥ ऐसें ऐकतां तिचें वचन ॥ गंगा क्रोधें खवळली ॥ १८० ॥ ज्वाळावचनवज्रपात ॥ होतां खचला धैर्यपर्वत ॥ गंगा कोपली अत्यंत ॥ पुत्रांतका मारावया ॥ ८१ ॥ मग बोले शाप दारुण ॥ येथून षण्मासांत पूर्ण ॥ अर्जुना तुझें शिरश्छेदन ॥ होईल जाण निर्धारें ॥ ८२ ॥ ऐकतां ऐसें शापवचन ॥ ज्वाळा झाली सुप्रसन्न ॥ हा तों दुर्जनस्वभाव पूर्ण ॥ मानावें सुख परनाशीं ॥ ८३ ॥ मग ज्वाळा सेवोनि पावक ॥ बाण झालीसे भयानक ॥ बभ्रुवाहनभात्यांत रिघोन देख ॥ राहिली पार्था वधावया ॥ ८४ ॥ आतां शिळेसी जडेल श्यामकर्ण ॥ तयाचें अर्जुन करील मोचन ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ परम रसाळ ऐकावें ॥ ८५ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ कृष्णकथामृत अगाध ॥ श्रवणें होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १८६ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते नीलध्वजाख्याने पंचदशोध्यायः ॥ १५ ॥ अध्याय ॥ १५ ॥ ओव्या ॥ १८६ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

१ डाव्या पायाला. २ उदकामध्यें. ३ रतीचा पति मदन. ४ नरकांत पडलेल्यांचा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे नृपनाथा ॥ पुढें काय वर्तली कथा ॥ ती न्यावी जी श्रवणपंथा ॥ अत्यादरेंकरूनी ॥ १ ॥ पुढें चालिला यज्ञ[1]हरी ॥ तो हरिमनोगत हृदयीं धरी ॥ [2]हरिदिशेप्रति गमन करी ॥ तों पुढें सह्याद्रि देखिला ॥ २ ॥ पूर्व पश्चिम दोन्ही सागर ॥ स्पर्शोनि राहिला गिरिवर ॥ शिखरीं उचलीतसे अंबर ॥ वृक्षीं दिनकर दिसेना ॥ ३ ॥ नाना वृक्षलता परिपूर्ण ॥ नद नदी सरोवरें गहन ॥ नाना श्वापदांचे गण ॥ नाना जाती खग तेथें ॥ ४ ॥ तेथें अति विषम असे वाट ॥ ती सैन्यमर्दनें झाली नीट ॥ सैन्य चालिलें उद्भट ॥ अश्व पुढें तो चालतसे ॥ ५ ॥ तंव देखिलें एक सरोवर ॥ तेथें शिळा असे थोर ॥ घर्षणसुखालागीं सत्वर ॥ तेथें हयवर पातला ॥ ६ ॥ [3]हरिस्पर्शें उद्धरली शिळा ॥ हा एक शब्द तेणें होता ऐकिला ॥ मी हरीही उद्धरीन शिळा ॥ ह्मणोनि स्पर्शतां जडला तो ॥ ७ ॥ एक धरी नामाभिमान ॥ एकासी असे स्थलाभिमान ॥ एकासी असे वर्णाभिमान ॥ याचें लक्षण अवधारा ॥ ८ ॥ सरितोदकीं शुक्तिं[4]का अनेक ॥ त्या हरिती मृद्भांडें[5]मल देख ॥ समुद्रोदरीं त्याच अमोलिक ॥ मुक्तें प्रसवती भूषणार्थ ॥ ९ ॥ तुळा घालोनि व्यवहारा ॥ काचमणीसीं तोलितां हिरा ॥ तेणें धरिला गर्वफुगारा ॥ हिरा मजसमान झाला कीं ॥ १० ॥ परी हिरा इच्छिती सर्व जन ॥ तो नृपमस्तकीं होय भूषण ॥ काच वाटव्यामाजी घालून ॥ तोंड बांधून टाकिती ॥ ११ ॥ कनकं[6]पुष्प आणि निशाकर ॥ दोघे शुभ्र असती साचार ॥ मस्तकीं दोघांसी धरी शंकर ॥ परी करणी विलक्षण दोघांची ॥ १२ ॥ चंद्रें दशदिशा शोभती ॥ सकळ जनांचे ताप गळती ॥ अमृतें चातक विशोक होती ॥ आणि द्रवती चंद्रकांत ॥ १३ ॥ सरितां[7]पतीसी दाटे भरतें ॥ साग कनकपुष्पें काय होतें ॥ उर्द्[8]स करूनियां गृहांतें ॥ तेथें करिती निजवस्ती ॥ १४ ॥ यालागीं ऐसा अभिमान ॥ न धरावा असतांही गुण ॥ गुणाभिमान धरितां पूर्ण ॥ नरकीं पतन त्या होय ॥ १५ ॥ तेवीं हरिनामाचा अभिमान ॥ धरोनि चालिला श्यामकर्ण ॥ दृढ शिळेसी जडला पूर्ण ॥ जेवीं टंकणखार सुवर्णेंसीं ॥ १६ ॥ नामासम ह्मणोनि हरिलीळा ॥ जे करूं जाती अवलीळा ॥ ऐसी दशा घडेल त्याला ॥ ह्मणोनि काय जाणविलें ॥ १७ ॥ हा हरि मी यज्ञिय हरी ॥ ह्मणोनि काय शिळा उद्धरी ॥ ऐसाचि तो धरावा श्रीहरी ॥ हें सांगे काय जनांतें ॥ १८ ॥ तंव मागूनि सेवक पातले ॥ अश्व पाहूनि उभे ठेले ॥ अश्व तेथोनि न हाले ॥ जेवीं कामी स्त्रीसंगें ॥ १९ ॥ ते समीप येऊनि पहाती ॥ हरि शिळेसी जडला निश्चितीं ॥ एक हंसती एक ह्मणती ॥ घर्षणसुखें सुखावला ॥ २० ॥ मग सैनिक मागोनि पावले ॥ त्यांपासीं सेवक सांगों लागले ॥ ह्मणती परमाश्चर्य झालें ॥ अश्व जडला शिळेसी ॥ २१ ॥ जवळी येऊनियां पार्थ ॥ पाहे तों दृढ जडला तेथ ॥ जेवीं संसारीं होतां विरक्त ॥ जडे भक्त तो हरिचरणीं ॥ २२ ॥ [9]प्रतोदानें एक मारिती ॥ मुष्टिघातें एक ताडिती ॥ एक बळें पुढें ओढिती ॥ परी तो न हाले तेथूनी ॥ २३ ॥

१ यज्ञाचा घोडा. २ पूर्वदिशेकडे. ३ रामाच्या पायांच्या स्पर्शानें. ४ शिंपा. ५ मातीच्या भांड्याचा मळ. ६ धोत्र्याचें फूल. ७ समुद्रास. ८ ओसाड. ९ चाबुकानें.

नानापरी वीरीं पीडिला ॥ नानाशस्त्रें छेदिला ॥ जेवीं प्रल्हाद हरिपदीं जडला ॥ तेवीं हय जडला शिळेसी ॥ २४ ॥ देखोनि ह्मणे पार्थ सत्य ॥ हें तों झालें असे देवकृत्य ॥ शिळेचें करूनियां निमित्य ॥ विघ्न अद्भुत उदेलें ॥ २५ ॥ अर्जुन आज्ञापी सेवकांसी ॥ सभोंवतें शोधावें वनासी ॥ कोणीं जरी असेल तपोराशी ॥ पुसों त्यासी विचार ॥ २६ ॥ ऐसी ऐकतांचि मात ॥ सभोंवते धांवले दूत ॥ मग देखिला अद्भुत ॥ सौभर ऋषीचा आश्रम ॥ २७ ॥ तो देखतांचि ऋषिआश्रम ॥ पळोनि गेला सेवकश्रम ॥ जेवीं देखतां पुरुषोत्तम ॥ निरसे भ्रम प्रपंचाचा ॥ २८ ॥ तेथें नानावृक्षजाती ॥ शाल तमाल शोभती ॥ कर्णिकार[1] बकुलपंक्ती ॥ नारिकेळी[2] लवती फळभारें ॥ २९ ॥ चंपक चंदन कृष्णागर ॥ बेल पारिजातक देवदार ॥ अनेक सरोवरें मनोहर ॥ अनिवार क्षेत्रें शोभती ॥ ३० ॥ तया आश्रमाभीतरी ॥ सर्व जीव वसती निर्वैरी ॥ भुजंग[3] नकुळमुखावरी ॥ मुख देऊनि निजती पैं ॥ ३१ ॥ मूषक[4] मार्जारांसी खाजविती ॥ व्याघ्रांसी धेनुगण सेविती ॥ उलूक[5] काक विचार करिती ॥ एकासनीं बैसोनियां ॥ ३२ ॥ गज हरि[6] एके ठायीं असती ॥ मृग व्याघ्रिणीस्तन पिती ॥ दीर्घ[7]मीन[8] जळीं खेळविती ॥ लघु मत्स्यांतें आदरें ॥ ३३ ॥ ऐसा आश्रम तो निर्मळ ॥ होमधूम्राचा असे परिमळ ॥ वेदघोषाचा ध्वनि प्रबळ ॥ शास्त्रार्थकल्लोळ ऊठती ॥ ३४ ॥ न्याय मीमांसा वेदांत ॥ पातंजल सांख्य तर्क समस्त ॥ व्याकरण धर्मशास्त्र निभ्रांत ॥ ऋषि पढविती शिष्यांतें ॥ ३५ ॥ ऐसें देखोनियां दूत ॥ सांगावया परतले धांवत ॥ पार्थाप्रति निवेदित ॥ आहे आश्रम जवळीच ॥ ३६ ॥ ऐसें ऐकतां दूतवचन ॥ अर्जुन पावला समाधान ॥ आश्रमा पीडा होईल ह्मणोन ॥ पांचजण हो चालिले ॥ ३७ ॥ यौवनाश्व कर्णनंदन ॥ सात्यकी आणि प्रद्युम्न ॥ पांचवा पृथानंदन ॥ वेगें आश्रमा पावले ॥ ३८ ॥ ऋषि देखिला अलौकिक ॥ किंवा तो विधूम पावक[10] ॥ कीं प्रत्यक्ष तो ज्ञानार्क[11] ॥ आश्रमामाजी स्थिरावला ॥ ३९ ॥ कीं तो कैवल्यरूपाचा कोंभ ॥ कीं धैर्याचा अभंग स्तंभ ॥ कीं चातुर्यमुक्तीचा वल्लभ ॥ ऐसा शोभला विज्ञानें[12] ॥ ४० ॥ तो ऋषि देखतांचि नयनीं ॥ नमन करूनि उभे कर जोडूनी ॥ विनविती स्तुतिवचनीं ॥ दृष्टि चरणीं ठेवूनियां ॥ ४१ ॥ जय जय निगमागमसारा ॥ जय जय शास्त्ररत्नाकरा ॥ जय जय मोहहननवैश्वानरा ॥ विज्ञानदीपा तपोनिधी ॥ ४२ ॥ आमची ऐकावी विनंती ॥ युधिष्ठिर नामें असे नृपती ॥ त्याचा बंधु मज अर्जुन ह्मणती ॥ राज्य करितों गजपुरीचें ॥ ४३ ॥ आह्मीं केला जी गोत्रवध ॥ तेणें झाला पापबाध ॥ ह्मणोनि मांडिला अश्वमेध ॥ पापनाशनार्थ स्वामिया ॥ ४४ ॥ हय सोडिला धराप्रदक्षिणा ॥ मज पाठविलें अश्वरक्षणा ॥ तों या वनीं येऊनि जाणा ॥ शिळेसी जडला अश्व तो ॥ ४५ ॥ तयाचें होय मोचन ॥ ऐसें सांगावें जी वचन ॥ मग हास्यवदनें तपोधन ॥ अर्जुनातें बोलिला ॥ ४६ ॥ सौभर ह्मणे गा पार्था ॥ तुवांचि ऐकिली भगवद्गीता ॥ बरा बोध झाला तव

१ पांगारा. २ नारळी. ३ सर्प. ४ उंदीर. ५ घुबडें. ६ सिंह. ७ मोठे मासे. ८ सुगंध. ९ अर्जुन. १० अग्नि. ११ ज्ञानरूपी सूर्य. १२ अनुभवज्ञानानें.

चित्ता ॥ तयाप्रमाणें चालसी ॥ ४७ ॥ गीताशास्त्र ऐकोन ॥ बरवें झालें तुज ज्ञान ॥ ह्मणसी म्यां मारिले गोत्रजन ॥ अद्यापि अज्ञान तुज आहे ॥ ४८ ॥ साक्षात हरि जेथें असतां ॥ हा हरिमेध मांडिला वृथा ॥ ज्याचे स्मरणमात्रें तत्वतां ॥ पापी निष्पाप ते होती ॥ ४९ ॥ केवढें हें तुझें अज्ञान ॥ म्यां मारिले ह्मणसी कौरव जन ॥ मारिता आणि तें मरण ॥ ही कल्पना जाण अज्ञानें ॥ ५० ॥ मी मारिता दुजा मरता ॥ ही तूं सेविसी भ्रांतिसरिता ॥ ऐकोनि व्यर्थ गेली गीता ॥ तुझी मूर्खता तुज बाधे ॥ ५१ ॥ सकळ घटीं रवि बिंबला ॥ तो घटभंगें काय निमाला ॥ जळउपाधि नासोनि गेला ॥ रवि तो संचला निजस्थानीं ॥ ५२ ॥ गगनींचा सूर्य न देखती ॥ तो घटजळीं अडकला ह्मणती ॥ तेवीं निर्गुणाची नाहीं ज्या [१]प्रचीती ॥ ते मृत्यु ह्मणती आत्म्यातें ॥ ५३ ॥ स्वप्नींचा अति पुण्यवंत ॥ किंवा करी जो पापपर्वत ॥ दोघे जागृतीमाजी मिथ्याभूत ॥ तेवीं जन्ममरण आत्म्यासी ॥ ५४ ॥ चराचरीं आत्मा एक ॥ जो जगगणा व्यापी देख ॥ तेथें नानात्व काल्पनिक ॥ जेवीं मृगोदक काननीं ॥ ५५ ॥ जेव्हां होतें मृगजळ ॥ तेव्हां बोले काय तें स्थळ ॥ नातरी आटलिया केवळ ॥ झालें प्रांजळ शुष्क काय ॥ ५६ ॥ मुळीं मृगजळच नाहीं ॥ तेथें शुष्क आर्द्र कैंचें पाहीं ॥ तैसें नानात्व आत्म्याचे ठायीं ॥ कल्पिलें पाहीं भ्रांतीनें ॥ ५७ ॥ धोत्रें लुगडीं शेले पातळ ॥ पाहातां ते तंतूच दिसती केवळ ॥ घट माथणी मोघे परळ ॥ पाहातां सकळ मृत्तिका ती ॥ ५८ ॥ दृश्य नाहीं द्रष्टाच निश्चितीं ॥ ऐसें गीतेमाजी सांगे श्रीपती ॥ हरिवाक्यामृतें तुझी भ्रांती ॥ अद्यापि नृपति नसे गेली ॥ ५९ ॥ तंव तयासी ह्मणे पार्थ ॥ म्यां कुरुक्षेत्रीं ऐकिला गीतार्थ ॥ परी अज्ञानभ्रम यथार्थ ॥ तो निरसिला पाहिजे स्वामिया ॥ ६० ॥ सौभर ह्मणे धनंजया ॥ ही सर्व जाण श्रीहरीची माया ॥ जें दृश्य तें जाईल विलया ॥ समुद्र सरिता इत्यादि ॥ ६१ ॥ जें जें दिसे तें तें नासे ॥ एक सत्य हरिरूप असे ॥ तो श्रीहरि जरी हृदयीं वसे ॥ तरी अश्वमेध करणें कासया ॥ ६२ ॥ तो श्रीहरि पाठिसीं टाकुनी ॥ प्राकृत हरि पुढें करूनी ॥ प्रवर्तलासी जी हवनीं ॥ मूर्खशिरोमणी तूं खरा ॥ ६३ ॥ त्या हरीसी होऊन विमुख ॥ तुह्मीं मांडिलासे [४]महामख ॥ येणें काय पावाल सुख ॥ पदोपदीं दुःख प्राप्त कीं ॥ ६४ ॥ सोडून सुरतरूचें झाड ॥ कां रे सेवितां एरंड ॥ चिंतामणी टाकूनि उघड ॥ कां काचमणी इच्छिसी ॥ ६५ ॥ आधींच संसार असार ॥ त्यामाजी देह क्षणभंगुर ॥ जेवीं कमळपत्रामाजी नीरं ॥ किंवा झळकणें विजेचें ॥ ६६ ॥ षोडशकलात्मक लिंगशरीर ॥ त्यावरी स्थूळ हें निराकार ॥ केवळ मलमूत्रजंतूंचें घर ॥ अवस्था[६]त्रयें वेष्टिलें ॥ ६७ ॥ ऐसा करोनि देहपुतळा ॥ त्यामाजी आपण प्रवेशला ॥ मग करूं लागला अनंतलीला ॥ सृष्टि स्थिति प्रलयादिक ॥ ६८ ॥ ह्मणसी प्रवेशला हा कैसा ॥ आकाश जेवीं घटावकाशा ॥ तेवीं जाण हृषीकेशा ॥ प्रवेश आणि अप्रवेश ॥ ६९ ॥ जेवीं घटापूर्वीही [७]नभ असे ॥ घट झालिया तेंचि वसे ॥

१ खरोखर. २ अनुभव. ३ पाठमोरा, विरुद्ध. ४ मोठा यज्ञ. ५ पाणी. ६ बालपण, तरुणपण आणि ह्मातारपण ह्या तीन अवस्थांनीं. ७ आकाश.

घट भंगलिया तें न नासे ॥ तेवीं सर्वत्र असे आत्मा ॥ ७० ॥ नगांपूर्वीं सुवण असे ॥ नग झालिया त्यांमाजीच वसे ॥ नग आटिल्या हेमें न नासे ॥ तेवीं सर्वत्र वसे जीवात्मा ॥ ७१ ॥ जगापूर्वीं असे जाण ॥ जग झालिया व्यापक पूर्ण ॥ जग नासल्याही संपूर्ण ॥ तो तूं जाण रे निजात्मा ॥ ७२ ॥ त्या आत्म्यासी जन्ममरण ॥ कल्पिणें हें पूर्ण अज्ञान ॥ येथेंही असे तेंचि कारण ॥ कां सूत्रधारी सर्वांचा ॥ ७३ ॥ तो हृदयस्थ प्रेरक झाला ॥ ह्मणोनि अश्वमेध आरंभिला ॥ तरी करा तो पूर्ण वहिला ॥ मायाविलासीं पडोनियां ॥ ७४ ॥ तंव मुनीस ह्मणे वृत्रारिनंदन ॥ तुमच्या प्रसादें गेलें अज्ञान ॥ आतां सविस्तर शिळेचें कारण ॥ निरोपावें स्वामिया ॥ ७५ ॥ मग सौभर ह्मणे ऐक पार्था ॥ सांगतों रे पुरातन कथा ॥ उद्दालक नामें ऋषि होता ॥ अपरसविता ये जनीं ॥ ७६ ॥ तयाची असे जी निजनायिका ॥ नामें विख्यात चंडिका ॥ भ्रतारवचनवनदाहका ॥ विप्र कष्टी तत्संगें ॥ ७७ ॥ विवाहकाळीं ह्मणती जन ॥ तुवां ऐकावें पतिवचन ॥ ती ह्मणे मी सर्वथा न करीन ॥ सत्य वचन हें माझें ॥ ७८ ॥ मग ह्मणती द्विजवर्य ॥ अल्पवयींच हें नवल काय ॥ प्रौढ झालिया करील काय ॥ न सांगतां गृहींचें ॥ ७९ ॥ मग उद्दालकें आणिली गृहास ॥ प्रौढ झाली ती दिवसेंदिवस ॥ आपणचि करी गृहकर्मास ॥ परी तो तियेसी न सांगे ॥ ८० ॥ उद्दालक ह्मणे वो सुंदरी ॥ तूं नित्य अग्निशुश्रूषा करीं ॥ तुज पुत्र होईल निर्धारीं ॥ वीर्यवंत बहुश्रुत ॥ ८१ ॥ ती ह्मणे न करीं अग्निसेवन ॥ मज पुत्राचें नाहीं कारण ॥ ऐसें ऐकतां तिचें वचन ॥ विप्र मनीं दुःखित ॥ ८२ ॥ आणिक कोणे एके दिवसीं ॥ ह्मणे कमंडलु आणून दे मजसी ॥ तो तिनें आपटोनियां धरणीसी ॥ फोडूनियां टाकिला ॥ ८३ ॥ पुढें प्रौढ जाणोनि अंगना ॥ उद्दालक पाचारी शयना ॥ येरी जाऊनि गृहांगणा ॥ माजी उभी ठाकली ॥ ८४ ॥ ऐसे तिचे देखोनि दुर्गुण ॥ मनीं दुःखित ब्राह्मण ॥ स्नानसंध्या देवतार्चन ॥ त्याला न वाटे गोड कांहीं ॥ ८५ ॥ कांतारूपें हृद्रोग ॥ वाढतां कैंचा सुखभोग ॥ जळों लागलें तयाचें अंग ॥ निजपत्नी पाहातां ॥ ८६ ॥ तंव कोणे एके दिवसीं ॥ कौंडिन्य नामा तपोराशी ॥ आला उद्दालकाचे आश्रमासी ॥ तीर्थयात्राप्रसंगें ॥ ८७ ॥ कौंडिन्य ह्मणे उद्दालकास ॥ कां तुह्मी झालेत कृश ॥ किती पुत्रकन्या तुह्मांस ॥ तें मजपासीं सांगावें ॥ ८८ ॥ येरू ह्मणे जी कौंडिन्य मुनी ॥ कन्यापुत्र नाहींत मजलागोनी ॥ कांता अत्यंत दुष्टभाषिणी ॥ तें मज दुःख न सांगवे ॥ ८९ ॥ मूर्ख पुत्र दुष्ट वनिता ॥ शठ मित्र विधवा सुता ॥ आधीं सभाग्य मग दरिद्रता ॥ हीं जाळिती शरीरातें ॥ ९० ॥ खडाण गाय प्रतिकूळ कांता ॥ दुष्ट प्रजा आणि पराधीनता ॥ या चहूंमाजी एकही असतां ॥ सोळींव दुःख या नांव ॥ ९१ ॥ रामनामेंवीण जी वाणी ॥ जें द्रव्य न वेंचे भोग दानीं ॥ जो असिल्या दोहीं रक्षोनी ॥ सोळींव दुःख या नांव ॥ ९२ ॥ भार्या अनुकूळ वंशविस्तार ॥ ती प्रतिकूळ असतां दुःखसागर ॥ त्या नरा दुःख अपार ॥ क्षण-

१ दागिन्यांपूर्वीं. २ सोनें. ३ इंद्राचा पुत्र अर्जुन. ४ प्रतिसूर्य. ५ अग्नीची सेवा. ६ खरोखर. ७ पृथ्वीवर. ८ तीर्थयात्रा करीत करीत. ९ स्त्री.

क्षणा वाटतसे ॥ ९३ ॥ अप्रियवादिनी जी युवती ॥ ती तत्काळ टाकावी अशी वेदस्मृती ॥ त्यागार्थ नोहे चित्तवृत्ती ॥ ऐसियासी गती सांगिजे ॥ ९४ ॥ मी सांगतों जें वचन ॥ तें सर्वथा न करीच जाण ॥ नको करूं ह्मणतां आपण ॥ अत्यादरें करितसे ॥९५॥ पुढें आली पितृतिथी ॥ तिची कैसी होईल गती ॥ ह्मणोनि माझे जीवीं खंती ॥ वाटतसे स्वामिया ॥ ९६ ॥ ह्मणोनि कृश झालों जी स्वामी ॥ दुजें कोणी नसे धामीं ॥ आतां तुह्मांसी शरण आहें मी ॥ कांहीं विवेकबुद्धी सांगावी ॥ ९७ ॥ मग कौंडिन्य तयासी ह्मणत ॥ तुह्मीं सांगावी विपरीत मात ॥ तेणें होईल तुमचें मनोगत ॥ करून पाहावें यापरी ॥ ९८ ॥ तूं अग्निशुश्रूषेतें न करीं ॥ कमंडलु देऊं नको माझिये करीं ॥ इत्यादि विपरीत निर्धारीं ॥ वश्य होईल तुज कांता ॥ ९९ ॥ ऐसें बोलोनियां वचन ॥ कौंडिन्य निघाला तेथून ॥ ह्मणे या युक्तीनें श्राद्धदिन ॥ बरा संपादीन मी आतां ॥ १०० ॥ उद्दालक ह्मणे हो प्रिये ॥ उदयीक श्राद्धदिन आहे ॥ तें मी सर्वथा न करीं पाहें ॥ काय प्रयोजन श्राद्धाचें ॥ १ ॥ येरी ह्मणे मी पितृतिथी ॥ सिद्धीस नेईन निश्चितीं ॥ परी तुमचें वाक्य यथास्थिती ॥ सर्वथा न करीं जाण पां ॥ २ ॥ विप्र ह्मणे मी सांगेन ब्राह्मण ॥ कुष्ठी कुब्जी खंजी पादहीन ॥ मूक बधिर नेत्रहीन ॥ कीं ते षंढ वृषलीपती ॥ ३ ॥ येरी ह्मणे मी ब्राह्मण सांगेन ॥ वेदवेदांगशास्त्रसंपन्न ॥ जीवत्पितृक शास्त्रीं प्रवीण ॥ शांत दयाळू हृदय ज्यांचें ॥ ४ ॥ ऐसें विपरीत सांगतां ॥ पुरवूं लागली स्वमनोगता ॥ ऋषि ह्मणे कौंडिन्यें तत्वतां ॥ बरवी युक्ती सांगितली ॥ ५ ॥ श्रीगुरुवचनार्थावीण ॥ प्रपंच न साधेचि जाण ॥ आणि परमार्थप्राप्तीची खूण ॥ स्वतः न लाभे निश्चित ॥ ६ ॥ मग मुनि ह्मणे वो स्त्रिये ॥ माझें वाक्य तूं उल्लंघूं नये ॥ जरी श्राद्ध करिशील पाहें ॥ तरी मी धान्य निषिद्ध आणीन ॥ ७ ॥ चणक आणि कोद्रव तुरी ॥ कुलित्थ पावटे मसुरा निर्धारीं ॥ वृंताक गाजरादि शाका परोपरी ॥ निषिद्ध तितुक्या आणीन ॥ ८ ॥ येरी ह्मणे गोधूम तंडुल मुद्ग माष ॥ इत्यादि धान्यें निर्दोष ॥ आणोनियां विशेष ॥ निर्मळ पाक करीन मी ॥ ९ ॥ घृतपक्व पायस गुळवरिया ॥ दिव्यान्न वरान्न घारिया ॥ मांडे घारगे फेणिया ॥ करीन दिव्यान्न भक्तीनें ॥ ११० ॥ रंभा द्राक्षा रसाळ फळें ॥ शिखरिणी लेह्य पेय रसाळें ॥ दधि दुग्ध साय नवनीतगोळे ॥ सवस्त्र दक्षिणा देईन मी ॥ ११ ॥ ऐसें सर्व विपरीत सांगोन ॥ यथाविधि संपादिला श्राद्धयज्ञ ॥ पत्नीसहित करून भोजन ॥ विप्र मानसीं सुखावला ॥ १२ ॥ विषयमदांध होऊनि जन ॥ जेवीं विसरे हरिस्मरण ॥ तेवीं उद्दालक विपरीतवचन ॥ सोडोनि सुपरीत बोलिला ॥१३॥ सुखामाजी पडली भ्रांती ॥ विप्र विसरला विपरीत युक्ती ॥ मग तो बोलिला चंडिकेप्रती ॥ पिंड गंगोदकीं टाकावे ॥ १४ ॥ ऐसें ऐकतांचि सकोपी ॥ पिंड नेऊन टाकिले शौचकूपीं ॥ विप्र झाला कोपरूपी ॥ महा अकर्म देखोनी ॥ १५ ॥ उद्दाकलऋषि अत्यंत कोपला ॥ शापावया उदित झाला ॥ ह्मणे चंडिके तूं होईं

१ स्त्री. २ वेदवाणी. ३ घरामध्यें. ४ मनांतील इच्छित. ५ अग्नीची सेवा. ६ लंगडे. ७ शूद्रस्त्रीशीं गमन करणारे.

दीर्घ शिळा ॥ दुर्घट या वनामाझारी ॥ १६ ॥ सर्वेचि विप्र हृदयीं द्रवला ॥ उःशाप तयेप्रति बोलिला ॥ ह्मणे पार्थकरें तुजला ॥ उद्धार होईल निर्धारें ॥ १७ ॥ ती चंडिका ही महाशिळा ॥ यापरी झाली गा दयाळा ॥ आतां स्पर्श करीं इजला ॥ उद्धरावया शीघ्रत्वें ॥ १८ ॥ ऐसें ऐकोनियां वचन ॥ ऋषीतें करूनि वंदन ॥ आज्ञा घेऊनि अर्जुन ॥ येऊन शिळा स्पर्शिली ॥ १९ ॥ जेवीं रामपदरजें झाली मुक्त शिळा ॥ गौतम पावला अहल्या ॥ तेवीं चंडिका उद्धरली ते वेळां ॥ अर्जुनादिकां नमीतसे ॥ १२० ॥ आज्ञा मागोनि फाल्गुनाजवळी ॥ चंडिका स्वपतिस्थान पावली ॥ श्यामकर्ण मुक्त झाला ते स्थळीं ॥ परमानंद जाहला ॥ २१ ॥ ज्ञानोदयीं मुक्त होय जन ॥ तेवीं मुक्त झाला श्यामकर्ण ॥ मग पुढें करिता झाला गमन ॥ आश्चर्य वाटलें सर्वांतें ॥ २२ ॥ पुढें चंपावतीस जाईल श्यामकर्ण ॥ तेथें युद्ध होईल दारुण ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अमृतासमान ऐकावें ॥ २३ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ श्रवण करितां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १२४ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते हयमोचनशिलोद्धरणे षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥ अध्याय ॥ १६ ॥ ओव्या ॥ १२४ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जनमेजय ह्मणे जैमिनी ॥ पुढें कैसें वर्तलें तें बोला वदनीं ॥ ऐकवावें मजलागुनी ॥ कृपा करूनि स्वामिया ॥ १ ॥ तंव जैमिनि ह्मणे नृपवरा ॥ अश्व गेला चंपावती नगरा ॥ तो हंसध्वजें धरिला अवधारा ॥ जैशी प्रेमदा रक्षिती ॥ २ ॥ अर्जुनादि वीर मागें येती ॥ किरीटकुंडलमंडित नृपती ॥ मुक्तमाळा विराजती ॥ सर्वही शोभती सुवस्त्रें ॥ ३ ॥ देखोनियां राजदूत ॥ रायास सांगों गेले मात ॥ ह्मणती आला आला जी पार्थ ॥ पाठिराखा अश्वाचा ॥ ४ ॥ ऐकोनि तोषला धराधव ॥ पाचारिले बंधु पुत्र सर्व ॥ सचिवादिकांसीं विचार करी पार्थिव ॥ लाभवेळा जवळ आली ॥ ५ ॥ जेथें पार्थ तेथें कृष्ण ॥ ऐसें भगवद्गीतेचें वचन ॥ तरी या प्रसंगीं होईल कृष्णदर्शन ॥ धन्य दिन हा आजिचा ॥ ६ ॥ मनीं संतोषला मराळध्वज ॥ यावरी पाहों ह्मणे कपिध्वज ॥ त्यासवें येईल गरुडध्वज ॥ त्यासी मी पाहीन धणीभरी ॥ ७ ॥ भगवद्भक्त साधु सज्जन ॥ जे दिनीं होय त्यांचें दर्शन ॥ कोटी पर्वकाळ त्यावरून ॥ ओंवाळून टाकावे ॥ ८ ॥ पुष्करादि तीर्थपरवडी ॥ कीं गंगादि सरिता येती तांतडी ॥ कीं काशी आदि मोक्षपुरींची उडी ॥ पडे जे दिनीं संत भेटे ॥ ९ ॥ ऐसा दृढ निश्चय केला ॥ सत्वर सैन्यभारेंसीं सिद्ध झाला ॥ सेनापतीप्रति ह्मणे नृप ते वेळां ॥ तुह्मांस सांगतों मी आतां ॥ १० ॥ एकविंशति सहस्र गज मदोन्मत्त ॥ सप्तति सहस्र संख्या ते महारथ ॥ अश्व एक लक्ष गणित ॥ नव लक्ष पदाती ॥ ११ ॥ ऐशा सैन्याचा एक नायक ॥ ऐसे सत्तर सैन्यनायक देख ॥ इतुके सैन्येंसीं धरानायक ॥ नगराबाहेर तो आला ॥ १२ ॥ सर्वही वीर हरिनामपरायण ॥ सत्यवादी मधुरभाषण ॥ सदा संतुष्ट सर्वांचें मन ॥ आज्ञाधारक रतिपति ॥ १३ ॥ एकपत्नीव्रत सर्वांसी ॥ ज्यांचा धाक सर्व इंद्रियांसी ॥ ऐसे सर्व वीर रायापासीं ॥ अपारकाळ संग्रहीं ॥१४॥ त्यासी चौघे प्रधान ॥ त्यांचीं नामें ऐक सावधान ॥ सुमती संगती संतुष्टमन ॥ चौथा प्रधान श्रद्धाळू ॥ १५ ॥ बंधु विदूरथ चंद्रसेन ॥ महाबळ चंद्रकेतन ॥ न्यायवित्त बळ जाण ॥ अतिसुंदर धर्मवादी ॥ १६ ॥ नववा जाण चंद्रदेव ॥ अवघे रणमेदिनीं बळार्णव ॥ जे जिंकों शकती वासव ॥ ऐसे नऊजण प्रतापी ॥ १७ ॥ जयासी पुत्र पांचजण ॥ सुरथ सुबळ सुदर्शन ॥ सम सुधन्वा बलाढ्य पूर्ण ॥ रिपुकंदनकर्ते जे ॥ १८ ॥ जे अकर्मवनदावानळ ॥ जे सद्गुरुसरितेचे कल्लोळ ॥ जे स्वदाररसिक धर्मशीळ ॥ जे कनकाचळ धैर्याचे ॥ १९ ॥ सचिव बंधु आणि नंदन ॥ सवें घेऊन सकळ सैन्य ॥ बाहेर निघाला हंसकेतन ॥ दुंदुभिवाद्यें गर्जती ॥२०॥ करून ब्राह्मणपूजन ॥ बरवा पूजोन हुताशन ॥ शस्त्रास्त्रें कवच घेऊन ॥ वीर सकळ निघाले ॥२१॥ रायें केला दारुण पण ॥ दुंदुभिशब्द होतां श्रवण ॥ जो न ये त्यासी टाकीन ॥ तप्ततैलकढयीमाजी ॥ २२ ॥ ह्मणोनि सर्व सैन्य निघालें ॥ नगरीं कोणी नाहीं राहिलें ॥ रणतुरीं गगन दुमदुमिलें ॥ सूर्य लोपला ध्वजच्छायें ॥ २३ ॥ मग सर्व वीरांच्या ललना ॥ कौतुक पाहावया नयना ॥

१ तरुण स्त्री. २ राजा ( हंसध्वज ). ३ अर्जुन. ४ श्रीकृष्ण. ५ डोळेभर, पोटभर. ६ पायदळ. ७ समरभूमीवर. ८ इंद्र. ९ एकपत्नीव्रती. १० अग्नि.

वेगीं वेंघल्या उंच सदना ॥ माडियांवरी लगबगां ॥ ॥ २४ ॥ सकळ मिळाल्या युवती ॥ सादर सैन्य अवलोकिती ॥ कितीक परस्परें विनोद करिती ॥ हास्यवदनेंकरूनियां ॥ २५ ॥ सख्या सख्यांतें बोलती वचन ॥ तव अधरीं कां गे कृष्णवर्ण ॥ लज्जा न ये तुजलागून ॥ स्त्रीमंडळीमाजि येतां ॥ २६ ॥ तंव दुसरी बोले तवाधर ॥ न करीं हरिनामोच्चार ॥ ह्मणोनि शिक्षा केली थोर ॥ रमणेंदंतें बलाढ्यें ॥ २७ ॥ तंव तिजी बोले तियेप्रती ॥ तुझे केश कां विखुरले दिसती ॥ परच्छिद्र पाहे खळयुवती ॥ ती न होय खोडी उत्तमेची ॥ २८ ॥ कदा न ठेवावी खळसंगती ॥ सदैव असावी सत्संगती ॥ दुःखही घडो साधुसंगतीं ॥ परी खळसंगतीं राज्य नको ॥ २९ ॥ प्राप्त झालिया सत्संगती ॥ देहासी आली जरी विपत्ती ॥ परी तेथेंचि होय विश्रांती ॥ त्यातें इंद्रसंपत्ति तुळेना ॥ ३० ॥ दुर्जनसंगतीनें जें सुख ॥ तेंचि जाणावें महादुःख ॥ नातरी तो केवळ नरक ॥ दुःखदायक पदोपदीं ॥ ३१ ॥ ऐशा परस्परें विनोदकथा ॥ सस्मित करिती त्या योषिता ॥ सादर पाहाती सैन्यसरिता ॥ जी पार्थबलार्णवा मिळों जाय ॥ ३२ ॥ कढई रोंविली रणमेदिनीं ॥ ती पूर्ण केली तैल भरूनी ॥ तळीं पेटविलासे वन्ही ॥ मग रणदुंदुभि वाजविल्या ॥ ३३ ॥ जेणें फळानिमित्त बंधूचा ॥ हस्त छेदिला साचा ॥ तो शंख पुरोहित रायाचा ॥ तेणें ही आज्ञा केली ॥ ३४ ॥ ऐसा जाणून दारुण पण ॥ श्रवणीं ऐकोनि दुंदुभिवादन ॥ बाहेर आलें सकळ सैन्य ॥ एक्या सुधन्व्यावांचोनी ॥ ३५ ॥ तोही सिद्ध होऊनि चालिला ॥ वंदोनि मातृचरणांला ॥ मातेसी आज्ञा मागता झाला ॥ अति विनीत होवोनी ॥ ३६ ॥ ऐकोनियां तनयवचन ॥ माता बोले तयालागून ॥ पुत्रा असावें सावधान ॥ लाभवेळा जवळी आली ॥ ३७ ॥ चतुष्पद जोडोनियां हरी ॥ सहस्रपदांचा धरीं हरी ॥ तरीच धन्य चराचरीं ॥ तूं होसी रे पुत्रराया ॥ ३८ ॥ जेणें शेरसोपानें ऐरावत ॥ आणोनि सिद्धी नेलें जननीव्रत ॥ तोचि येथें आला पार्थ ॥ विमुख तयासी ह्मणीं होसी ॥ ३९ ॥ ब्रह्मादिकां जयाचें ध्यान ॥ इंद्रादिकां अलभ्य पूर्ण ॥ तें पाहोनियां पदनलिन ॥ धन्य होसी पुत्रा तूं ॥ ४० ॥ ऐसा वीररत्न किरीटी ॥ त्यासवें आहे जगजेठी ॥ त्या दोघांचें भय धरोनि पोटीं ॥ ह्मणीं पाठी देशील ॥ ४१ ॥ अनंतब्रह्मांडमाळमणी ॥ फिरवी जो इच्छासूत्रेंकरूनी ॥ तयाचे चरणनखेंदु पाहोनी ॥ नेत्रचकोरां तृप्त करीं ॥ ४२ ॥ सकळभुवनसर्वैकसदन ॥ त्यापुढें हो कां तुझें पतन ॥ अथवा विजयी होऊन ॥ मुखेंदु दाखवीं मम नेत्रचकोरां ॥ ४३ ॥ विजय अथवा पतन हरिसन्मुख ॥ पक्षद्वयें मी पावेन सुख ॥ नाहीं तरी मजऐसें दुःख ॥ भुवनत्रयीं असेना ॥ ४४ ॥ जरी पळसी तरी वीरमाता ॥ मातें उपहासितील तत्वतां ॥ ऐकोनियां अशुभ वार्ता ॥ कोण जीविता धरील ॥ ४५ ॥ दों पक्षांमाजी एक पक्ष ॥ धरूनि वसवीं भक्तामरवृक्ष ॥ तरीच ममोदरीं पुत्र लक्ष ॥ जन्मलासी निर्धारें ॥ ४६ ॥ पुत्राप्रति अशुभ वाणी ॥ जी ह्मणे ती षंढजननी ॥ रुदन

---

१ स्त्रिया. २ पतीच्या दांतानें. ३ सेनारूप नदी. ४ दुंदुभीचा नाद. ५ बाणांच्या शिडीनें. ६ पदकमळ. ७ अर्जुन.

करील तयालागुनी ॥ हरिसम्मुख निमाल्या ॥ ४७ ॥ करिकुंभकर्णाग्र अति चपळ ॥ त्याहूनही देह अति चंचल ॥ कीं जळीं उठतां जळकल्लोळ ॥ कीं बुद्बुदजाळ जळांगीं ॥४८॥ नातरी घनीं चपळांझळाळ[1] ॥ तेवीं जीवित अति चपळ ॥ ह्मणोनि कीर्तीचा अचळ ॥ ध्वज लावीं उभय पक्षीं ॥ ४९ ॥ देव सांगे देवकीसी ॥ एकांतीं सांगे रुक्मिणीसी ॥ सांगे वसुदेव बळिरामासी ॥ करणी ऐसी करा- वया ॥ ५० ॥ ऐकोनियां मातृवचन ॥ सुधन्वा बोले तियेकारण ॥ तें होवोनियां सावधान ॥ श्रवण करीं परीक्षितिसुता ॥ ५१ ॥ माते सृष्टिजनकभूमी ॥ तयेसीं तोषवीन संग्रामीं ॥ नाहींतरी तवोदरीं कृमी ॥ जन्मलों मी जाण माते ॥ ५२ ॥ जो योगिहृत्पद्मभ्रम-[2] धुकर ॥ तो तुझा करील नामोच्चार ॥ धन्य वीरपत्नी प्रसवली कुमर ॥ ऐसें ह्मणवीन हरिमुखें ॥ ५३ ॥ कवण मातेचे जठरकुहरीं ॥ हा होता अभिनव केसरी ॥ पार्थबळगजकुंभ नखाग्रीं ॥ विदारिलीं वीरमौक्तिकें ॥ ५४ ॥ तवोदर[3]शुक्तिकेमाझारी ॥ नृपवीर्य स्वाती- तोय निर्धारीं ॥ हा देह मुक्त देखोनि श्रीहरी ॥ करील भूषण निजकर्णीं ॥ ५५ ॥ तवोदरसागरोद्भव मी शशी ॥ तृप्त करीन पार्था- क्षचकोरासी ॥ सकळ नृपनक्षत्रमंडळासी ॥ गुप्त करीन शरकिरणें ॥ ५६ ॥ नातरी कैलासविलासलालस[4] ॥ ऐकोनि डोलवील निज शिरास ॥ ऐसें युद्ध करून सावकाश ॥ तत्कंठभूषण होईन ॥ ५७ ॥ तुवां असावें सुखरूप ॥ आणि बुजावा हा चिंताकूप ॥ उज- ळोनियां कीर्तिदीप ॥ कृष्णचरणा ओवाळिन ॥ ५८ ॥ ऐकोनि ऐसें सुतवचन ॥ तया केलें निंबलोण ॥ विजयी होईं हें आशीर्वचन ॥ घेऊन तेथून निघाला ॥ ५९ ॥ कुवला नामें त्याची भगिनी ॥ ती लक्षीत उभी राहूनी ॥ तंव येरें दोनी कर जोडुनी ॥ तयेलागीं वंदिलें ॥ ६० ॥ कुवला ह्मणे बंधुराया ॥ तूं चालिलासी रण कराया ॥ तरी विमुख होऊं नको धनंजया ॥ आणि यादवराया संतो- षवीं ॥ ६१ ॥ जरी पाठी देशील वीरपार्था ॥ तरी अपकीर्ति येईल माझ्या माथां ॥ तव पलायनाची वार्ता ॥ श्वशुरगृहा जाईल ॥ ६२ ॥ दारुण श्वशुरगृहनिवास ॥ नणंदा जावा असती बहुवस ॥ भावे दीर करितील उपहास ॥ मग या जीवास उरी कैंची ॥ ६३ ॥ याकारणें बंधुराया ॥ युद्धीं जिंकीं धनंजया ॥ जगदात्मा देवकीतनया ॥ आणोन आह्मां दाखवीं ॥ ६४ ॥ ऐसें असतां बंधुकेसरी ॥ धन्य होसील संसारीं ॥ उंच नाकें श्वशुरागारीं ॥ वागेन ऐसें करावें ॥ ६५ ॥ सुधन्वा ह्मणे वो भगिनी ॥ कांहीं चिंता न करावी मनीं ॥ तूतें ह्मणतील वीरभगिनी ॥ ऐसें करून दावितों ॥ ६६ ॥ जेवीं येऊन लघु केसरी[6] ॥ मदोन्मत्त कुंजरांचियां[7] हारी ॥ एकटाची कुंभस्थळें विदारी ॥ तेवीं रिपु शरधारीं वधीन ॥ ६७ ॥ युद्धीं जिंकोन कपिध्वज ॥ संतोषवीन गरुडध्वज ॥ आनंदवीन हंसध्वज ॥ तरीच बंधु होय तुझा ॥ ६८ ॥ ऐसा वीर बोलिला ॥ ऐकोन तोषली राजबाळा ॥ बंधुकंठीं पंकजमाळा ॥ घालोनि बोले विजयी हो ॥ ६९ ॥ वीर निघे तेथुनी ॥ तंव मार्गीं उभी देखिली रमणी ॥ करांबुजीं कनकपात्र घेउनी ॥ पंचदीपें

---

१ विजेचा क्षणिक चकचकाट. २ योगिजनांच्या हृदयरूप कमलावरील भुंगा. ३ तुझ्या उदररूप शिंपीमध्यें. ४ शंकर. ५ चैन, थारा. ६ सिंह. ७ हत्तींच्या.

शोभली ॥ ७० ॥ सुगंधतैलाभ्यंग करून ॥ कनकवस्त्र करून परिधान ॥ रत्नखचित कंचुकी लेऊन ॥ लेइलीं भूषणें यथास्थानीं ॥ ७१ ॥ भुजंग शिरीं दीर्घ वेणी ॥ भाळीं शीसमणी कृष्णफणी ॥ प्रभावती चंदनतरु जाणोनी ॥ सुवासलोभें गुंतला ॥ ७२ ॥ आकर्णनयन शुकनासिक ॥ सस्मित शोभे मुखमृगांक ॥ माजि कस्तूरीबिंदुकलंक ॥ धवाक्षिचकोर[1] तृप्त करी ॥ ७३ ॥ पतनभयें शुक्रबिंब ॥ कनकशलाकेचा करोनि अवलंब ॥ मुक्तमिषें नासिकीं राहोनि अधरबिंब ॥ चुंबावया धांविन्नला ॥ ७४ ॥ तेणें केलें समळ मन ॥ ह्मणोनि झाला काय एकनयन ॥ मग करूनियां अनुष्ठान ॥ गगनमंडळीं प्रकाशे ॥ ७५ ॥ आधीं अधर जिंकिती प्रवाळ ॥ वरी घेतलें सुगंधतांबूल ॥ बोलतां दंतपंक्तीचे झळाळ ॥ उठती कल्लोळ प्रभेचे ॥ ७६ ॥ वक्षःस्थळीं कुचमंडळ ॥ मदनाचे भेरीयुगुळ ॥ त्रिभुवन जिंकोनियां सकळ ॥ कुब्ज करोनि तो गेला ॥ ७७ ॥ मुक्तावळी ती भीष्ममाता[2] ॥ उदरीं रोमावळी ती रविसुता[3] ॥ कुंकुमरेखा सरस्वती सरिता ॥ गुप्त जाणा येथूनी ॥ ७८ ॥ हा देखोनियां प्रयाग ॥ तेथें बैसोनियां अनंग ॥ अनुष्ठान करीतसे सांग ॥ दिव्य अंग पावावया ॥ ७९ ॥ कलहंसगामिनी पिकस्वनी[4] ॥ मध्यभागीं जिंकिलें पंचानना[5] ॥ करकंकणांची प्रभा जाणा ॥ इंद्रधनुष्यासारिखी ॥ ८० ॥ तिचें देखोनि लावण्यरूप ॥ वातवेगें करदीप ॥ आनंदें करिती शिरकंप ॥ धन्य निर्मिता तो विधी ॥ ८१ ॥ भ्रूचाप आकर्ण ओढुनी ॥ जरी ती विंधील कटाक्षबाणीं ॥ घायेंवीण पाडील धरणीं ॥ एका सुधन्व्यावांचोनी ॥ ८२ ॥ जरी प्रतिअवयवाची करूं वर्णना ॥ तरी विस्तारेल ग्रंथरचना ॥ ह्मणोन किंचित स्वरूपसूचना ॥ केली श्रोतयांलागोनी ॥ ८३ ॥ जिचें देखोनि रूपवैभव ॥ दुःखित होईल मनोभव[6] ॥ होता रतीस लावण्यगर्व ॥ तो निःशेष गेला तियेचा ॥ ८४ ॥ ऐसी वीरपत्नी प्रभावती ॥ जीवें ओंवाळी प्राणपती ॥ परमानंदें तयाप्रती ॥ काय वचनोक्ति बोलत ॥ ८५ ॥ नाथ मज तों ऐसें भासलें ॥ कीं एकपत्नीव्रत भंगलें ॥ जियेनें तुह्मांतें वरूं आदरिलें ॥ ती मजसमान तरी असो ॥ ८६ ॥ श्रीकृष्णदर्शनीं लालस ॥ पूर्ण झालेंसे मानस ॥ सांडोनियां गृहनिवास ॥ कां उदास झाले स्वामी ॥ ८७ ॥ जियेची अवाच्य असे करणी ॥ मुळींच असे सर्वगामिनी ॥ पितापुत्र एके स्थानीं ॥ गमन करिती हें विशेष ॥ ८८ ॥ जी सर्व विषयीं करितसे विरक्ती ॥ तियेसी काय ह्मणोन संत वर्णिती ॥ ती तुह्मांसी देईल श्रीपती ॥ ह्मणोनियां जातसां ॥ ८९ ॥ ती कां तुह्मांसी आवडली प्रिया ॥ मी गृहीं असतां सती जाया ॥ हृदयीं धरितसें विवेकतनया ॥ मज टाकूनि जावया उचित नव्हे ॥ ९० ॥ नेत्रीं देखोनि श्रीहरिमूर्ती ॥ मग ती तुह्मांस नावडेल चित्तीं ॥ न करितां विवेकपुत्रोत्पत्ती ॥ तुह्मांसी ती वरीना ॥ ९१ ॥ तुह्मीं मांडिलें परनारीगमन ॥ हें देखोनि विवेकनंदन ॥ तुह्मांसी करितसे निवारण ॥ अकार्य कराल ह्मणोनी ॥ ९२ ॥ तयेसीं रत जाहलियानंतर ॥ मीही मोक्ष सेवीन सत्वर ॥ वक्रासी वक्र बोलावें उत्तर ॥

१ पतीचे नेत्ररूपी चकोर. २ गंगा. ३ यमुना. ४ कोकिळेप्रमाणें आहे स्वर जिचा अशी. ५ सिंहाला. ६ मदन.

भल्यासी मधुर बोलावें ॥ ९३ ॥ तुह्मांस हेळसील मुक्तिरमणी ॥ घरीं हे पतिव्रता स्त्री असोनी ॥ विशेष विवेकपुत्रजननी ॥ सांडून येतां ह्मणोनियां ॥ ९४ ॥ मी दृष्टी ठेवोनि माधवचरणीं ॥ तयेचे छेदीन चरण दोनी ॥ मग येईन माझे भुवनीं ॥ न करीं गमन आणिकासी ॥ ९५ ॥ तयेचें तंव मुखनलिन[1] ॥ हरीपासोन असे मलिन ॥ ऐसें जाणोन करिसील गमन ॥ तरी करीं सुखें प्राणेशा ॥ ९६ ॥ ऐकोनि ऐसें प्रियावचन ॥ काय बोले नृपनंदन[2] ॥ तेंच ऐकावें सावधान ॥ श्रोतेजनीं आदरें ॥ ९७ ॥ मग सुधन्वा ह्मणे सुमती ॥ तव संगें मज तियेची प्रीती ॥ तूं जी बोलिलीस वचनोक्ती ॥ मत्पराक्रमाहून आगळी ॥ ९८ ॥ तुझें ऐकतांचि वचनामृत ॥ मनीं काम जो होता किंचित ॥ तोही गेलाच निभ्रांत ॥ येथें संशय असेना ॥ ९९ ॥ मी तों जातों युद्धास निर्धारें ॥ तूं तों मोक्ष सेवीं आदरें ॥ स्रक्चंदनादि विषय सारे ॥ सोडोनि मोक्षीं रमावें ॥ १०० ॥ ऐसी तूं कैवल्यरसिका ॥ जरी मी जाणतों निका ॥ तरी विवाह इत्यादि प्रयत्न देखा ॥ सर्वथा जाण न करितों ॥ १ ॥ तंव काय ह्मणे प्रभावती ॥ तुह्मी युद्धासी जातां प्राणपती ॥ परी हृदयस्थ नये विवेकमूर्ती ॥ प्रगट करूनि दाखविजे ॥ २ ॥ तुह्मी गेलिया समरंगणा ॥ कोण देईल मज ऋतुदाना ॥ मी तंव ऋतुस्नात असें जाणा ॥ यथार्थ वचन मानिजे ॥ ३ ॥ तो ह्मणे ऐक एक आतां ॥ मी पाहेन कृष्णपार्थां ॥ पंचबाणें जिंकोन तत्वतां[3] ॥ मग तुजजवळीं येईन ॥ ४ ॥ प्रभावती ह्मणे प्राणनाथा ॥ जे पाहों गेले कृष्णनाथा ॥ ते पुनरावृत्ती[4] न करिती सर्वथा ॥ दुःखरूप संसारीं ॥ ५ ॥ जे सर्वदा करिती कृष्णचिंतन ॥ तयांसी न घडे पुनरागमन ॥ मग प्रत्यक्ष देखिलिया हरिचरण ॥ कैसेन जाण ते येती ॥ ६ ॥ लवण समुद्रातें भेटूं गेलें ॥ तें फिरोन मागुती नाहीं आलें ॥ तें तंव समुद्रच होऊन ठेलें[5] ॥ तैसें होईल हरिभेटीं ॥ ७ ॥ कापूर अग्नीसी भेटला ॥ तो भेटतांचि अग्नि झाला ॥ तेवीं होईल जी तुह्मांला ॥ तया गोपाळा भेटतांची ॥ ८ ॥ मग तियेतें बोले नृपनंदन ॥ कृष्णदर्शनें नाहीं पुनरागमन ॥ ऐसें जरी आहे पूर्ण ज्ञान ॥ तरी कां दर्शन न इच्छिसी ॥ ९ ॥ ऐकोनि बोले प्रभावती ॥ सत्पुत्रवंत हरिपद पावती ॥ संपादोनि पुत्रसंतती ॥ गेले महाभूप कीं ॥ ११० ॥ अपुत्रिकां नसे परलोक ॥ ऐसें देव बोले निःशंक ॥ हें जाणती अज्ञान लोक ॥ तुह्मी तों विवेकजलधि[6] कीं ॥ ११ ॥ ह्मणोनि पराशा[7] करूनि पूर्ण ॥ पुढें करिजे कार्यास गमन ॥ तें कार्य होईल निर्विघ्न ॥ येथें संदेह न धरावा ॥ १२ ॥ मग सुधन्वा बोले वचन ॥ रायाचें तों असे तीव्र शासन ॥ ही पाहा दुंदुभि गर्जतसे दारुण ॥ बाहेर निघावें ह्मणोनी ॥ १३ ॥ आणि केला दारुण पण ॥ तप्ततैलकढयींत पतन ॥ कोमलांगे रात्रीं करावें ऋतुदान ॥ दिवा निषिद्ध सर्वथा ॥ १४ ॥ सर्वही बाहेर गेले असती वीर ॥ पार्थासी करावया समर ॥ मी तों जावोन येतों सत्वर ॥ ऐसें प्रियेसी बोलिला ॥ १५ ॥ तंव ती रमणी वदे वल्लभातें ॥ आधीं जिंकोनि वल्लभेतें ॥ मग जिंकावें सेनावधूतें ॥

१ मुखकमल. २ राजपुत्र सुधन्वा. ३ खरोखर. ४ फिरून जन्मास येणें. ५ राहिलें. ६ विवेकाचा समुद्र. ७ दुसऱ्याची इच्छा.

निजबळेंकरूनियां ॥ १६ ॥ मीं अनंगव्रतें असें अंकिली ॥ ती तंव तुह्मीं येथें नसे जिंकिली ॥ जी संगविरहें बहुत व्यापिली ॥ ती काय जाणाल स्वामिया ॥ १७ ॥ आणि पार्थबळार्णव असतां ॥ मुक्तिरमा निघेल जी तत्वतां ॥ तिचा वदनसुधांशु चुंबितां ॥ मग मातें विसराल कीं ॥ १८ ॥ याकारणें जी गुणसदना ॥ आधीं देऊनियां ऋतुदाना ॥ मग करावें जी शीघ्र गमना ॥ सैन्यनिर्दळ-णालागोनी ॥ १९ ॥ सुधन्वा ह्मणे वो शशिवदने ॥ हें तों अयुक्त तुझें बोलणें ॥ मज शीघ्र युद्धा जाणें ॥ दिवा ऋतुदान केवीं करूं ॥ १२० ॥ जयाच्या स्मरणें होय निष्काम ॥ अर्जुन त्याचा भक्त परम ॥ तयासी करितां संग्राम ॥ सेवणें काम अति निंद्य ॥ २१ ॥ पुढें ऋतुदिन असती बहुत ॥ वाट पहात असेल नृपनाथ ॥ मजवरी क्रोध करील अद्भुत ॥ आज्ञा भंगिली ह्मणोनी ॥ २२ ॥ येरी ह्मणे हा शेवटिंचा दिन ॥ ह्मणोनि प्रार्थितें तुह्मांलागून ॥ मज देऊन ऋतुदान ॥ पुढें गमन करावें ॥ २३ ॥ तुह्मांसी करितें एक प्रश्न ॥ शेवटींचा असतां ऋतुदिन ॥ आणि तो प्राप्त असतां हरिदिन॑ ॥ पडिलें श्राद्ध पितयाचें ॥ २४ ॥ ऐसें एकत्र झालिया त्रय ॥ येथें करावा जी निर्णय ॥ मनीं करूनि निश्चय ॥ कृपा करून मज सांगा ॥ २५ ॥ रमण ह्मणे मृगडोळसे ॥ याचा निर्णय शास्त्रीं केला असे ॥ श्राद्ध केलिया शेषान्न सुरसें ॥ हुंगोनि द्यावें ऋतुदान ॥ २६ ॥ ऐसें संपादिलिया सकळ ॥ अधिक जोडे श्राद्धफळ ॥ उपवासही झाला प्रांजळ ॥ रात्रीं ऋतुदानातें द्यावें ॥ २७ ॥ येरी ह्मणे प्राणनाथा ॥ धर्मशास्त्र ऐसें जाणत असतां ॥ तरी कां सेवितां दुस्तर सरिता ॥ ऋतुकाळ भंगोनी ॥ २८ ॥ तैसें संकट नसे प्राप्त ॥ युद्धीं उभा असे तुमचा तात ॥ आतां दुराग्रह न करावा बहुत ॥ कामिनीमनोरथ पुरवावा ॥ २९ ॥ ऐसें बोलून रमणकंठीं ॥ करद्वयें घातली तेव्हां मिठी ॥ जेवीं चंदनतरुतनू गोमटी ॥ पंचवदनसर्पें वेष्टिजे ॥ १३० ॥ मग शस्त्रास्त्रें कवच सोडोनि ॥ प्रियेसीं पहुडला तो शयनीं ॥ निजबळें निजकामिनी जिंकोनी ॥ मग निघे कृष्णदर्शना ॥ ३१ ॥ पुरवोनि रमणीचें मनोगत ॥ शीघ्र होऊनियां सुस्नात ॥ देहीं श्रीहरिनामांकित ॥ द्वादश टिळे रेखिले ॥ ३२ ॥ दिव्य वस्त्रें करूनियां परिधान ॥ शस्त्रें कवच लेऊन ॥ मृगमदकेशरमिश्रित चंदन ॥ तिलक कपाळीं रेखिला ॥ ३३ ॥ तांबूल शोभला मुखकमळीं ॥ तुळसीमाळा रुळे वक्षःस्थळीं ॥ शिरीं रत्नमुगुट झळाळी ॥ तेजें जिंकिती दिनकरा ॥ ३४ ॥ धनुष्य-बाण शस्त्रास्त्रें ॥ रथावरी ठेविलीं विचित्रें ॥ रथारोहण केलें पवित्रें ॥ श्रीहरिनाम स्मरोनी ॥ ३५ ॥ मग प्रियेसी बोले वचन ॥ आतां विवेकतनयेशीं समाधान ॥ पावोनियां आमचें स्मरण ॥ असों द्या ह्मणोनि चालिला ॥ ३६ ॥ रथोदयाचळशिखरस्थळीं ॥ नेणों दुजा उदेला अंशुमाळी ॥ मग परसैन्यतिमिराँवळी ॥ पळों लागली अनायासें ॥ ३७ ॥ निजजनपदपंकजावळी ॥ वीरतेजें प्रफुल्ल झाली ॥ तों आश्चर्य वर्तलें ते वेळीं ॥ तें सावधान परिसावें ॥ ३८ ॥ हंसध्वज ह्मणे दळपती ॥ सर्व सैन्य आलें निश्चितीं ॥ परी

१ मुखचंद्र. २ सैन्यनाशाकरितां. ३ एकादशी. ४ कस्तूरी. ५ सूर्याला. ६ रथरूप उदयाद्रीवर. ७ शत्रुसेनारूपी अंधार.

अद्यापि न देखों सुधन्व्याप्रती ॥ तो कां झाला हरिविमुख ॥ ३९ ॥ माझा आज्ञासेतु भंगिला ॥ कां तप्त कढई विसरला ॥ कां दुंदु-
भिरव अपमानिला ॥ काय भुलला विषयसंगें ॥ १४० ॥ हयमत्तगज देखिला हरि ॥ येणें अव्हेरिला [1]मुरारी ॥ कां हो राहिला विष-
यमंदिरीं ॥ हरिविमुख होउनी ॥ ४१ ॥ ह्मणोनि झाला क्रोधायमान ॥ बोलावूं धाडिले सेवकजन ॥ ह्मणे सुताधमास केशीं धरून ॥
ओढीत आणा भूतळीं ॥ ४२ ॥ ऐसें नृपें आज्ञापिलें ॥ नेणों यमदूतचि धांवले ॥ गदा मुद्गर हातीं घेतले ॥ तों येतां देखिलें सुध-
न्व्यातें ॥ ४३ ॥ तंव ते ह्मणती राजकुमरा ॥ नृपाज्ञाद्रुमच्छेदक कुठारा ॥ दुंदुभिस्वरें[2]बधिरा ॥ तप्ततैलकढयीभूषणा रे ॥ ४४ ॥ तुज
करावया थोर बंधन ॥ आह्मी पातलों वीरगण ॥ नृपाज्ञा परम दारुण ॥ केशीं धरून न्यावयासी ॥ ४५ ॥ कां नृपाज्ञाभंग केला ॥
कां भेरीस्वर नाहीं ऐकिला ॥ आतां शीघ्र चाल रे वहिला ॥ तप्ततैलकढयींत ॥ ४६ ॥ ऐसें तयांचें क्रोधवचन ॥ ऐकोनि बोले [3]नृप-
नंदन ॥ ह्मणे चला येतों जेथें नृपमंडन ॥ पिता माझा त्या स्थळीं ॥ ४७ ॥ तों पुढें देखिलें पार्थसैन्य ॥ नेणों पसरलें सिंधुजीवन ॥
यो[4]जनत्रय भूमी व्यापोन ॥ राहिलेंसे युद्धार्थ ॥ ४८ ॥ तंव पुत्रें देखिलासे जनक ॥ जैसा मदनें त्रिपुरांतक ॥ सक्रोध देखोनि
सम्यक ॥ केलें नमन तयासी ॥ ४९ ॥ तंव परमाश्चर्य वाटलें ॥ आपल्या मनींच तें विचारिलें ॥ ह्मणे क्रोधशोकाचें भरतें आलें ॥
अमृतोदधीं वाटतें ॥ १५० ॥ देखोनियां निजात्मज ॥ क्रोधें बोले हंसध्वज ॥ कां मूढता आली रे तुज ॥ माझें शासन भंगिलें
॥ ५१ ॥ तुवां न पाहातां रमानायक ॥ कुळा लाविलास रे कळंक ॥ तुवां सेविला रे रतिनायक ॥ जळो तयेसीं रतलासी ॥ ५२ ॥
तुझी माझी आणि पूर्वजांची ॥ तेणें काय तृषा हरेल साची ॥ जेथें कुंठित मति [5]जळपतीची ॥ तो काय पुत्रें निवारिजे ॥ ५३ ॥
एका जगज्जी[6]वनावांचोन ॥ कोण करील तृषाहरण ॥ तो हरि सम्मुख येवोन ॥ मूर्खा विमुख झालासी तूं ॥ ५४ ॥ पाहा हा पार्थ
सुचित्त ॥ यासी क्षण न विसंबे अच्युत ॥ धिक् तुझें दुष्ट जीवित ॥ धिक् धिक् जळो धर्म तुझा ॥ ५५ ॥ आले जाणोनि नरना[7]-
रायण ॥ कैसें झालें कामातुर मन ॥ ऐसा कृष्णपराङ्मुख कुनंदन ॥ करीन दंडण तुज आतां ॥ ५६ ॥ ओढा ओढा रे येथोन ॥
करा तप्ततैलांत पतन ॥ आकंठ बुडवा नेऊन ॥ कामग्रस्त कुपुत्रातें ॥ ५७ ॥ ओढोनि न्यावें रे त्वरित ॥ माझे पुरोहित शंखलि-
खित ॥ जो जो सांगतील शास्त्रार्थ ॥ तोचि करावा शीघ्रकाळें ॥ ५८ ॥ ते जरी सांगतील पतन ॥ तरी पुनः तैल तप्त करून ॥
त्यांत घाला कुनंदन ॥ निर्दय होऊनि यावरी ॥ ५९ ॥ येथें आले नरनारायण ॥ आणि सर्वही मिळाले नृपगण ॥ ते सर्व करितील
श्रवण ॥ कीं तीव्र शासन हें माझें ॥ १६० ॥ ऐकोनियां ऐसें वचन ॥ सत्वर धांवले दूतगण ॥ तिहीं उपाध्यायातें निवेदन ॥ नृप-
वाक्य सर्व केलें ॥ ६१ ॥ रायासी पडलें धर्मसंकट ॥ तुह्मांसी पुसों पाठविलें स्पष्ट ॥ पुत्र तों झाला कर्मभ्रष्ट ॥ त्यासी विचार केउता

१ श्रीकृष्ण. २ नगाऱ्याचा शब्द न ऐकणाऱ्या. ३ राजपुत्र. (सुधन्वा.) ४ बारा कोस. ५ वरुणाची. ६ श्रीकृष्णावांचून. ७ अर्जुन व कृष्ण.

॥ ६२ ॥ आज्ञेचा भंग यानें केला ॥ भोगदानानिमित्तमार्गें राहिला ॥ कृष्णीं विमुख होऊन ठेला ॥ कामें सम्मुख स्त्रियेतें ॥ ६३ ॥ हें जाणोनि पुत्रस्नेह ॥ रायें सोडिला निःसंदेह ॥ तप्तकढयींत घाला पुत्रदेह ॥ ऐसी आज्ञा पैं केली ॥ ६४ ॥ परंतु तुमचें वचन ॥ या निमित्तें करावें श्रवण ॥ ह्मणोनि पाठविलें आह्मांलागून ॥ तरी काय तें वचन सांगावें ॥ ६५ ॥ ऐसें ऐकतांचि मुनि लिखित ॥ झाला क्रोधाग्नीनें संतप्त ॥ दूतांप्रति बोलिला मात ॥ ऐसें राया सांगिजे ॥ ६६ ॥ पूर्वीं तुवां केला होता पण ॥ नातू बंधू अथवा नंदन[1] ॥ जो करील आज्ञाभंग जाण ॥ तो मी घालीन कढयीमाजी ॥ ६७ ॥ तें तुह्मी अन्यथा करितां जाण ॥ असत्यवादी होसी पूर्ण ॥ सकाम हरिविमुख नंदन ॥ यावरी मोह धरिला तुवां ॥ ६८ ॥ आपुलें वचन करावया खरें ॥ कौशिका[2] राज्य दिधलें हरिश्चंद्रें ॥ स्त्रीपुत्र विकोनियां त्वरें ॥ ब्रह्मस्व तेणें फेडिलें ॥ ६९ ॥ दशरथें सत्य केलें वचन ॥ श्रीरामासारिखें पुत्रनिधान ॥ वनासी धाडिलें तेणें जाण ॥ हरिख जाहला कैकयीसी ॥ १७० ॥ हरिश्चंद्र अंत्यज[3]भृत्य झाला आपण ॥ सदा रक्षिलें स्मशान ॥ मृततनयांगवस्त्रहरण ॥ करोनि सत्व रक्षिलें ॥ ७१ ॥ सत्व रक्षिलें त्या श्रियाळें ॥ पुत्रा मारूनियां पैंचविलें[4] ॥ अतिथीलागीं भोजन दिधलें ॥ आपुले सत्वाकारणें ॥ ७२ ॥ पाहा शिबिराजा चक्रवर्ती ॥ तेणें स्वमांस छेदोनियां हातीं ॥ ससाण्यासी केली तृप्ती ॥ परी सत्वस्थिति राखिली ॥ ७३ ॥ ऐसें सांगतां आहेत अनेक ॥ थोर थोर जे पुण्यश्लोक ॥ परी तुजसारिखा धरानायक[5] ॥ असत्यवादी न देखिला ॥ ७४ ॥ असत्यवादियाचे नगरीं ॥ आह्मीं सर्वथा न राहावें निर्धारीं[6] ॥ ऐसें बोलोनि क्रोधोत्तरीं ॥ शंख उठोनि तेथुनी चालिला ॥ ७५ ॥ असत्यवादियाचे घरीं ॥ सर्वथा न राहावें क्षणभरी ॥ दुर्वासना उपजे अंतरीं ॥ येथें संदेह असेना ॥ ७६ ॥ ऐसी ऐकोनियां मात ॥ सत्वर धांवले राजदूत ॥ रायासी मुनिवृत्त ॥ निवेदिलेंसे निजमुखें ॥ ७७ ॥ ह्मणती धांवा धांवा त्वरित ॥ नगर सांडोनि गेले शंखलिखित ॥ ऐसें ऐकोनियां नृपनाथ ॥ काय प्रधानातें बोलिला ॥ ७८ ॥ राव ह्मणे सुमति प्रधाना ॥ तुवां ऐकावें माझिया वचना ॥ वेगें जाऊनि कुनंदना ॥ कढयीमाजी घालावें ॥ ७९ ॥ मज ब्राह्मणाहोनि परम इष्ट ॥ प्राणही नसे बोलतों स्पष्ट ॥ हा तों पुत्र परम नष्ट ॥ सर्वथा प्रिय मज नाहीं ॥ १८० ॥ मी जावोनि त्वरित ॥ समजावोनि आणितों शंखलिखित ॥ दृष्टीमाजी ठेवावा तो पार्थ ॥ ऐसें बोलोनि निघाला ॥ ८१ ॥ शंखलिखितांस करूनि वंदन ॥ नानावचनीं केलें समाधान ॥ त्यांतें सवें घेऊन ॥ शीघ्र आला कढयीपासीं ॥ ८२ ॥ प्रधान ह्मणे सुधन्व्यासी ॥ परम कष्ट होताती या देहासी ॥ परी मी काय करूं राजाज्ञेसी ॥ तीव्र शासन रायाचें ॥ ८३ ॥ तंव सुधन्वा ह्मणे सुमति सचिवा ॥ तूं कां कष्ट करितोसी आपुल्या जीवा ॥ तूं आधीन धरणीधवा ॥ त्याची आज्ञा करावी ॥ ८४ ॥ पितृवाक्यें करूनि संभ्रमें ॥ मातृशिर छेदिलें भार्गवरामें[7] ॥ तेवीं तुवां सचिव-

१ पुत्र. २ विश्वामित्राला. ३ चांडाळाचा सेवक. ४ शिजविलें. ५ राजा. ६ खरोखर. ७ परशुरामानें.

धर्मे ॥ नृपवाक्य करावें ॥ ८५ ॥ हृदयीं असतां यदुराय ॥ मज मरणाचें नसे भय ॥ तूं कां धरितोसी संशय ॥ शीघ्र टाकीं कढ-
यींत ॥ ८६ ॥ हृदयीं असतां गोपाळ ॥ पायां लागती कलिकाळ ॥ मग हें काय करील तप्त तैल ॥ तूं कां विव्हळ मानसीं ॥ ८७ ॥
हृदयीं होता गोविंद ॥ ह्मणोनि न जळाला प्रल्हाद ॥ नाना क्लेश केले अगाध ॥ परी तो मुकुंद रक्षिता ॥ ८८ ॥ तेवीं मी तयाचा
किंकर ॥ मज काय उपेक्षील चक्रधर ॥ तो भक्तजनांचा अव्हेर ॥ सर्वथा न करी दयाब्धी ॥ ८९ ॥ तंव तो होता पूर्वींचा सुस्नात ॥
दिव्य अंबरें मंडित ॥ तुळसीमाळा असे रुळत ॥ मुक्तहारासहित पैं ॥ १९० ॥ मुखें करीत हरिस्मरण ॥ हृदयीं धरिलें तेंचि ध्यान ॥
ऐसिया सुधन्व्यातें उचलोन ॥ कढयीमाजी टाकिलें ॥ ९१ ॥ तें तैल असे कढत ॥ ज्यामाजी फिरती शतावर्त ॥ जेवीं दुर्जनाचें
संतप्त चित्त ॥ परदयावंत देखोनी ॥ ९२ ॥ त्यामाजी टाकितां नृपनंदना ॥ येरू करितसे हरिस्मरणा ॥ त्राहें त्राहें जगज्जीवना ॥
भक्तवत्सला यदुपती ॥ ९३ ॥ जयजयाजी नंदकिशोरा ॥ जय देहवल्लीचित्तचकोरा ॥ जय रमावदनसुधाकरा ॥ मनमोहना श्रीकृष्णा
॥ ९४ ॥ एकवार करितां नामोच्चार ॥ तूं वैकुंठींहून धांवसी सत्वर ॥ परी मज न पावसी रमावर ॥ येथें कारण एक आहे ॥ ९५ ॥
तूं समीप आलासी ऐसें जाणून ॥ म्यां न करूनि तव दर्शन ॥ कामासक्त केलें मन ॥ ह्मणोनि मातें उपेक्षिसी ॥ ९६ ॥ विपत्ति-
काळीं करितसें स्मरण ॥ सुखकाळीं होतसे विस्मरण ॥ ह्मणोनि उपेक्षिसी मजलागून ॥ तरी तूं हृदयस्थ जाणसी ॥ ९७ ॥ गजेंद्र[2]
प्रल्हाद नृपनंदिनी[3] ॥ ध्रुवादि गोप गौळणी ॥ विपरीत[4]काळींच तुजलागुनी ॥ सर्वही स्मरती गोविंदा ॥ ९८ ॥ अंतकाळीं करितां
चिंतन ॥ जरी मी पावेन जी निधन ॥ तरीही पावेन मुक्तिसदन ॥ परी मागें जन निंदितील ॥ ९९ ॥ सुधन्व्याचें दुष्टाचरण ॥
ह्मणोनि पावला दुष्ट मरण ॥ तैलकढयीमाजी तळोन ॥ तस्करापरी निमाला जी ॥ २०० ॥ करूनियां युद्ध दारुण ॥ नाहीं तोषविले
कृष्णार्जुन ॥ गांडीवमुक्तशरें हनन ॥ छिन्नभिन्न नसे झालों ॥ १ ॥ मीं आपल्या बाणेंकरून ॥ झांकिले नाहींत पार्थ कृष्ण ॥ बलाढ्य
असतां आपण ॥ तस्करमरण पावला ॥ २ ॥ ऐसी जन करितील निंदा ॥ हें तुज योग्य नसे गोविंदा ॥ ह्मणोनि धांव पाव रे
मुकुंदा ॥ या दुर्मरणातें निवारीं ॥ ३ ॥ लज्जार्णवीं द्रौपदी बुडतां ॥ वस्त्रें देवोनि तारिली अनंता ॥ तेवीं दुर्मरणापासोनि आतां ॥
मज अच्युता रक्षावें ॥ ४ ॥ जय फुल्लारविंदनयना ॥ भक्तहृत्पद्मतल्पकशयना ॥ जय सकळदुरितनाशना ॥ खगवरगमना माधवा
॥ ५ ॥ ऐसिया नामाचे प्रबंध ॥ ऐकतां अग्नीसी झाला बोध ॥ शीतळ झाला जातवेद ॥ हरिभक्तसंगेंकरूनि ॥ ६ ॥ तया तैलक-
ढयीमाझारी ॥ तारीतसे तो भक्तकैवारी ॥ हरिनामाच्या आवृत्ती करी ॥ मुखपंकजेंकरूनियां ॥ ७ ॥ ऐसा भक्तवर पाहोन ॥
आश्चर्य करिती सर्व जन ॥ ह्मणती कैसें प्रफुल्ल मुखनलिन ॥ तप्ततैलामाझारी ॥ ८ ॥ तळीं लागती अग्निज्वाळ ॥ तेणें उतों येतसे

---

१ शेंकडों भोंवरे. २ हत्ती. ३ द्रौपदी. ४ दुःखकाळीं. ५ मृत्यु.

तैल ॥ तें तत्काळ झालें शीतळ ॥ जैसें मानस सज्जनाचें ॥ ९ ॥ अत्यंत टवटविलें मुखकमळ ॥ कोमली नसे तुळसीमाळ ॥ सकळ ह्मणती गोपाळ ॥ याजलागीं पावला ॥२१०॥ तंव तो शंखोपाध्या ह्मणे धीट ॥ हा मंत्रौषधी जाणतो कपट ॥ ऐसा दुःशब्द ऐकतां स्पष्ट ॥ तैल उसळलें बाहेरी ॥ ११ ॥ जरी झाला वेदशास्त्रसंपन्न ॥ जयासी न कळे भक्तिमहिमान ॥ तो जाणावा चांडाळासमान ॥ कीं त्याहून तो अधिक ॥ १२ ॥ त्याहूनि मूर्ख द्विज केवळ ॥ ह्मणोनि परीक्षितसे तैल ॥ टाकिलें एक नारिकेळ ॥ तंव तें तात्काळ द्विधा झालें ॥ १३ ॥ तेथोनि एक शकल उडालें ॥ तें शंखाचे कपाळीं बैसलें ॥ दुजें शकल जें उरलें ॥ तें बैसलें लिखितभाळीं ॥ १४ ॥ ह्मणोनि जे हरिभक्तां छळिती ॥ ते परम क्लेश पावती ॥ भक्तां साह्य रमापती ॥ उणें कल्पांतीं पडों नेदी ॥ १५ ॥ हरिनामें भक्त तरला ॥ ऐसा सैन्यामाजी शब्द फुटला ॥ सर्व वीरीं जयजयकार केला ॥ भला रे भला ह्मणोनि ॥१६॥ आतां सुधन्वा बाहेर निघोन ॥ युद्ध करील परम दारुण ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अमृतासमान पैं असे ॥ १७ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ श्रवण करितां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ २१८ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते सुधन्वाकटाहप्रवेशो सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥ अध्याय ॥ १७ ॥ ओंव्या ॥ २१८ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जनमेजय ह्मणे जैमिनी ॥ अभिनव ऐकिली भक्तकरणी ॥ पुढें कथादेवतटिनी ॥ कैसी चालिली तें सांग ॥ १ ॥ मग जैमिनी ह्मणे भक्तचूडामणी ॥ ऐकें पूर्वजकथास्वर्धुनी ॥ जी परिसतां दुरितश्रेणी ॥ निर्धूत होय क्षणार्धें ॥ २ ॥ हृदयीं आठविला गोपाळ ॥ तेणें तैल झालें शीतळ ॥ तयामाजी सुधन्वा सोज्वळ ॥ देखोनि लिखित पुसे दूतांतें ॥ ३ ॥ यासी जेव्हां कढयींत टाकिलें ॥ तेव्हां येणें काय रे चिंतिलें ॥ औषधमूळ मुखीं घातलें ॥ तेंचि सांगावें मज आतां ॥ ४ ॥ तंव दूत ह्मणती लिखितमुनी ॥ हा वारंवार आठवीत चक्रपाणी ॥ तयावांचोनि याची वाणी ॥ नाहीं राहिली क्षणार्ध ॥ ५ ॥ तें देखोन भक्तमहिमान ॥ पश्चात्तापें तापला शंख जाण ॥ धिक् माझें द्विजपण ॥ म्यां हा भक्तराज छळियेला ॥ ६ ॥ मी सत्कुळ उत्तम ब्राह्मण ॥ त्यांतही वेदशास्त्रसंपन्न ॥ परी तें हरिभक्तीचें महिमान ॥ न कळलें कीं अद्यापी ॥ ७ ॥ जो जातीनें असतां अमंगळ ॥ परी तो सर्वभूतीं दयाळ ॥ अंतरीं आठवीत श्रीगोपाळ ॥ तयास सकळ वंदिती ॥ ८ ॥ याचे पाहा ओष्ठपल्लव ॥ अखंड उच्चारिती रमाधव ॥ मी परम पातकी मानव ॥ कुटिल ऐसें बोलिलों ॥ ९ ॥ मज अपार घडलें जी दुरित ॥ तरी करीन देहांतप्रायश्चित्त ॥ ऐसें बोलोनियां त्वरित ॥ उडी कढयींत टाकिली ॥ १० ॥ मग आलिंगोनियां सुधन्व्यातें ॥ काय बोलतसे त्यातें ॥ कृपा करोनियां मातें ॥ आतां तारीं भक्तराया ॥ ११ ॥ जे तापत्रयें तापती ॥ तेचि गतश्री मंदमती ॥ तेचि असें दुःख भोगिती ॥ जे नाठविती हरीतें ॥ १२ ॥ जे हृदयीं चिंतिती अनंत ॥ ते होती तापत्रयमुक्त ॥ तेचि होती दुःखविवर्जित ॥ तेचि मुक्तिसदनीं नांदती ॥ १३ ॥ काय प्राज्ञा तया अग्नीची ॥ जे कां जाळील मूर्ति विष्णुभक्ताची ॥ प्रत्यक्ष प्रचीति आली साची ॥ करकंकणा कां आरसा ॥ १४ ॥ जो योगिजनध्यानीं नातुडे ॥ जो सांग वेदाध्ययनें न सांपडे ॥ तो तुवा स्मरणें वांडेंकोडें ॥ दुर्मरणातें निवारिलें ॥ १५ ॥ मज तुझा गात्रस्पर्श होतां ॥ परम झाली पवित्रता ॥ समूळीं गेली अहंममता[4] ॥ देहबुद्धीसहित ॥ १६ ॥ म्यां नेणोन तव महिमा ॥ एवढा दंड करविला भक्तोत्तमा ॥ हा माझा पूर्ण अपराध क्षमा ॥ तुवां केला पाहिजे ॥ १७ ॥ आतां बाहेर निघावें ॥ आपुल्या रथावरी बैसावें ॥ कृष्णार्जुनांतें तोषवावें ॥ युद्धयज्ञें करोनी ॥ १८ ॥ ऐसें बोलोनि झडकरी ॥ दोघे निघाले बाहेरी ॥ पुत्र दिधला नृपाचे करीं ॥ पवित्र होईं तूं सुतसंगें ॥ १९ ॥ येणें मुखीं मूळ होतें धरिलें ॥ तें नृसिंहमंत्रराजें रेखिलें ॥ तत्प्रसादें शरीर वांचलें ॥ यश संपादिलें अपार ॥ २० ॥ तों सुधन्वा करी पितृनमन ॥ मग रायें दिधलें आलिंगन ॥ म्यां तुझें नेणोन महिमान ॥ कढयींत पातन करविलें ॥ २१ ॥ जेवीं हिरण्यकश्यपें प्रल्हादासी ॥ नानापरी दंडिलें त्यासी ॥ परी तयासी साह्य हृषीकेशी ॥ नाना संकटीं रक्षिला ॥ २२ ॥ तरी तयाहूनि भक्त तूं अधिक ॥ दाविलें भक्तीचें कौतुक ॥ आतां सावध होऊनियां देख ॥ कृष्णार्जुन संतोषवावे

१ कथारूपी गंगा. २ पातकांची पंक्ति. ३ आवडीनें. ४ अहंकार, गर्व. ५ देहाभिमानासहवर्तमान.

॥ २३ ॥ बहु बरवें ह्मणोनियां सुत ॥ पुनः वंदोनियां नृपनाथ ॥ मग तो आणविला दिव्य रथ ॥ पुष्पकापरी तो असे ॥ २४ ॥ छत्रध्वजपताकामंडित ॥ रम्य गवाक्षें रत्नखचित ॥ किंकिणीनादें गर्जत ॥ आणि सुशोभित वस्त्रमाल्यें ॥ २५ ॥ ऐशा दिव्य रथावरी ॥ सुधन्वा बैसला झडकरी ॥ तंव सैन्य मिळालें परोपरी ॥ काळचक्रासारिखें ॥ २६ ॥ वीर करून तांबूलचर्वण ॥ पीक टाकिती थुंकून ॥ तेणें शोभलें तें रणांगण ॥ जेवीं पळसपुष्पें विखुरलीं[1] ॥ २७ ॥ अंगीं उठले घर्मतरंग ॥ तेणें गलित वीरांगराग ॥ नेणों उमटला संध्याराग ॥ दिवस असतां रणभूमीं ॥ २८ ॥ परस्परें होतां घर्षण ॥ मुक्ताहार पडती तुटोन ॥ तेणेंही शोभलें रणांगण ॥ जेवीं गगन नक्षत्रीं ॥ २९ ॥ रणीं पडले जे वीरांगचंदन ॥ वायु तयांसी नेत चोरून ॥ त्वरें अमरावतीस जाऊन ॥ शचीरमणातें तोषवी ॥ ३० ॥ वीरमस्तकींचे सुमनगण[2] ॥ पडतांचि वायु जाय घेऊन ॥ तीं सुरवृक्षांसी दाखवून ॥ लज्जा करवीत पुष्पांतें ॥ ३१ ॥ वीरमुखांचा परिमळ ॥ घेऊन जाय मलयानिळ ॥ तेणें निववी जग सकळ ॥ वेव्हार करून मुखांबुजा ॥ ३२ ॥ रणभूमी होती निष्पंक[3] ॥ ती गजदानोदकें[4] झाली सपंक ॥ हयखुरें उडे जें रजकटक ॥ तेणें विषम[5] भूमी सम झाली ॥ ३३ ॥ परम वाचाळ ते जळधर[6] ॥ आणि परम गर्जती सागर ॥ परी तेही मुके झाले समग्र ॥ रथशब्दांतें ऐकोनी ॥ ३४ ॥ ऐसा अभिनव सैन्यमेळा ॥ देखोनि हंसध्वज संतोषला ॥ मग दूतांसी आज्ञापिता झाला ॥ श्यामकर्ण आणाया ॥ ३५ ॥ ऐकोनि ऐसें नृपवचन ॥ दूतीं आणिला श्यामकर्ण ॥ तयाचें केलेंसे अर्चन ॥ गंधमाल्येंकरूनी ॥ ३६ ॥ पुत्र पौत्र सहोदरांसहित[7] ॥ सचिव सचिवात्मजांसमवेत ॥ पद्मव्यूह रचोनि नृपनाथ ॥ वाट पाहे पार्थाची ॥ ३७ ॥ मग ढोल दुंदुभि शंख भेरी ॥ शृंगें डिमडिमी काहाळ मोहरी ॥ झल्लरी मृदंग ताल नानापरी ॥ वाद्यें वाजती अपार ॥ ३८ ॥ सकळ वाद्यांचा घोष कैसा ॥ तेणें पतनशंका झाली आकाशा ॥ तळीं भय उपजलें शेषा ॥ भूमंडळ पडेल ह्मणोनी ॥ ३९ ॥ नेणों तयाचे भयेंकरून ॥ कंपें सर्प झाले कर्णहीन ॥ किंवा तेंचि भय पोटीं धरून ॥ चरण पोटांत निघाले ॥ ४० ॥ तों येरीकडे पृथानंदन ॥ कृष्णात्मजासी[8] बोले वचन ॥ आतां हंसध्वजें श्यामकर्ण ॥ धरून नेला नगरामाजी ॥ ४१ ॥ तरी हंसध्वज जिंकावयासी ॥ आणावया श्यामकर्णासी ॥ पाठवावें कवणकवणांसी ॥ कैसा विचार करावा ॥ ४२ ॥ तूं सपुत्र आणि यौवनाश्व ॥ सपुत्र नीळध्वज अनुशाल्व ॥ वृषकेतादि वीर सर्व ॥ येथें सावधान असावे ॥ ४३ ॥ आधीं मीच निजबळेंसीं ॥ युद्ध करूं जातों हंसध्वजासीं ॥ ऐसें ऐकतां कृष्णात्मजासी ॥ हास्य आलें अद्भुत ॥ ४४ ॥ जनकें पार्था सर्वस्व आपुलें ॥ माझे हातीं असे समर्पिलें ॥ तें आधींच वेंचितां नव्हे भलें ॥ निजबळें न्यावें तें वृद्धी ॥ ४५ ॥ धर्मादि वीर पाहात असतां ॥ जनकें सांगितलें पार्था ॥ तें मी जरी करीन अन्यथा ॥ तरी मुख केवीं दाखवूं ॥ ४६ ॥ ह्मणोनि आधीं मीच जाईन ॥ सपुत्र

१ पसरलीं. २ फुलांचे तुरे. ३ सुकी, खडखडीत. ४ हत्तींच्या गंडस्थळांतील मदस्त्रावानें. ५ उंचसखल. ६ मेघ. ७ बंधूंसह. ८ प्रद्युम्नास.

हंसध्वजा जिंकीन ॥ आणि तो श्यामकर्ण सोडवीन ॥ तरीच नंदन कृष्णाचा ॥ ४७ ॥ मी आपुले शर[1]जाळें ॥ भंगीन जाण पर-
दळें ॥ जेवीं आकाशीं अभ्रमंडळें ॥ वारिजे अनिळें[2] क्षणमात्रें ॥ ४८ ॥ ऐसी हरिनंदनाची मात ॥ ऐकोन हांसला वृषकेत ॥ तुह्मां
दोघांचें वचन अनुचित ॥ भासोन आलें मज आतां ॥ ४९ ॥ प्रलयोत्पत्तिकारक वीरासीं ॥ हें सैन्य काय योग्य त्यासीं ॥ मुख-
वातें उडे जी तूळ[3]राशी ॥ त्यातें प्रळयानिळ कासया ॥ ५० ॥ कीं बोलतां निघे जो ऊष्मानळ ॥ तेणें भस्म होय जो कां तूळ ॥ तेथें
पाठवावा दावानळ[4] ॥ हें तों उचित नव्हे कीं ॥ ५१ ॥ नेत्रपक्ष्म[5]प्रहारें मशक ॥ जो मरण पावे तात्काळिक ॥ तयावरी पाठवावा
नागांतक ॥ हें तों अपूर्व मज भासे ॥ ५२ ॥ नातरी स्वल्पजळसिंचनें जाण ॥ जे तात्काळ शमती रजःकण ॥ ते शांत करावया
स्वयें वरुण ॥ पाहातां कौतुक मज वाटे ॥ ५३ ॥ नातरी नखाग्रें खुडिजे कमळकोशा ॥ त्यावरी टाकावें कां कुलिशा[6] ॥ तेवीं पर-
सैन्य हें तुह्मां ईशा ॥ तृणप्राय जाणावें ॥ ५४ ॥ यमदूतपाशें बांधला जो नर ॥ परी तो हरिनामस्मरणीं तत्पर ॥ त्यासी बळें सोड-
विती ईश्वरकिंकर ॥ तेवीं मी अश्ववर सोडवीन ॥ ५५ ॥ ऐसें बोलोन कर्णनंदन ॥ करिता झाला शंखवादन ॥ हंसध्वजातें लक्षोन ॥
वारितां वारितां निघाला ॥ ५६ ॥ छत्रध्वजपताकीं मंडित ॥ मनोजव अश्वांसीं संयुक्त ॥ ऐसा संजोगूनि रथ ॥ त्यावरी आरूढ
झाला तो ॥ ५७ ॥ धांवला देखोनि वृषकेत ॥ तंव सुधन्वा आपुल्यांतें ह्मणत ॥ हा तंव नसे सत्य पार्थ ॥ हा वृषकेतु कवणाचा
॥ ५८ ॥ पद्मव्यूहातें देखत ॥ एकलाची वीर येत ॥ त्याचा प्रताप दिसे बहुत ॥ बलाब्य आणि सत्वधीर ॥ ५९ ॥ धनंजयाचा
पडतां कण ॥ काय न जळती भूधरगण ॥ तेवीं बहुतांवरी हा एकला जाण ॥ आला आह्मां न गणूनी ॥ ६० ॥ हा तंव असे
वीरोत्तम ॥ यासीं मी आतां करीन संग्राम ॥ ह्मणोनियां तो गुणधाम ॥ परम संतोष पावला ॥ ६१ ॥ मग सारथियासी ह्मणत ॥
वेगीं चालवीं आतां रथ ॥ पैल तो वीर येतो अद्भुत ॥ त्याचे समीप मज नेईं ॥ ६२ ॥ बरवें ह्मणोनि तो सारथी ॥ रथ चाल-
विला पवनगती ॥ दोघे परस्परें अवलोकिती ॥ समदृष्टी करोनियां ॥ ६३ ॥ मग सुधन्वा पुसे वृषकेतूसी ॥ तूं कवणाचा सुत अससी ॥
कोण्या नामें विख्यात आहेसी ॥ तेंचि आह्मां सांगावें ॥ ६४ ॥ मग कर्णात्मज बोले त्यासी ॥ तूं भेटों इच्छितोस ज्यासी ॥ तो
तंव पितामह होय आह्मांसी ॥ वंश तरी कश्यपाचा ॥ ६५ ॥ जो दातयांचा मुगुटमणी ॥ जो अद्वैत समरंगणीं ॥ तो कर्ण जनक
मजलागुनी ॥ नाम तरी माझें वृषकेतू ॥ ६६ ॥ आह्मी सकळ कश्यपोद्भव ॥ आतां पूर्वज माझे पांडव ॥ तूंही आपुला कुलोद्भव ॥
यथार्थ सांगें मजपुढें ॥ ६७ ॥ सुधन्वा बोले वृषकेतूसी ॥ हंसध्वज पिता होय मजसी ॥ सुधन्वा नाम या देहासी ॥ मधुच्छंदऋषी
मूळ आह्मां ॥ ६८ ॥ अशक्य ते वर्णनीं वंश ॥ तुझा तरी तेजस्वी आदिपुरुष ॥ तूं प्रकाशतेजें सावकाश ॥ रिपुतिमिरा निवारीं

---

१ बाणांच्या समूहानें. २ वाऱ्यानें. ३ कापसाची रास. ४ वणवा. ५ पापण्या मिटतांना जो वारा उत्पन्न होतो त्याच्या धक्यानें. ६ वज्राला.

॥ ६९ ॥ तंव कर्णसुत बोलिला बोल ॥ मार्गणेंचि दावीन नवल ॥ अवघें सैन्य करीन विकल ॥ मिथ्या संभाषण मी न करीं॥७०॥ ऐसें बोलून वीरजेठी ॥ वर्षता झाला शरवृष्टी ॥ तेणें सुधन्वा न दिसे दृष्टीं ॥ मेघपटळें सूर्य जैसा ॥ ७१ ॥ आणि करीतसे सिंह-नाद ॥ तेणें जळधरस्वन[1] होय मंद ॥ रथाश्वगजपदातिवृंद[2] ॥ भेदोनि निर्जीव पाडिलें ॥ ७२ ॥ चहूंकडोनि सोडी बाण ॥ तेणें विंधिला तो नृपनंदन ॥ बाणजाळें भरलें गगन ॥ कांहीं सैन्य दिसेना ॥ ७३ ॥ पांच बाण टाकून तेजःपुंज ॥ सुधन्व्याचा सार-थ्यासह ध्वज ॥ छेदोनि टाकिला मग सहज ॥ त्यावरी वर्षे शरधारा ॥ ७४ ॥ अति तीक्ष्ण धारा गृध्रपक्षपत्र ॥ बाण वर्षतसे पवित्र ॥ ध्वज चामरें आणि छत्र ॥ छेदूनि वाद्यें फोडिलीं ॥ ७५ ॥ बाहू गजशुंडेसमान[3] ॥ छेदी शस्त्रालंकारें मंडित जाण ॥ किरीटकुंडलें मंडित पूर्ण ॥ शिरें कित्येक छेदिलीं ॥ ७६ ॥ आपुलें सैन्य देखोन छिन्नभिन्न ॥ सुधन्वा झाला कोपायमान ॥ वृषकेतूचें पुरुषत्व पाहोन ॥ डोलवी मान आनंदें ॥ ७७ ॥ मग चारी अश्व आणि सारथी ॥ येरू विंधीत त्वरितगती ॥ तुच्छ मानोनि [4]भद्रावतीपती ॥ पांच बाणें विंधिला ॥ ७८ ॥ चाप छेदिलें एक्या बाणें ॥ भाते भेदिले पंच बाणें ॥ एक शर सोडूनियां त्राणें[5] ॥ कर्णनंदन उडविला ॥ ७९ ॥ केलें वीरें ऐसें अद्भुत ॥ तंव तो सावध झाला वृषकेत ॥ भोंवतालें जों पाहात ॥ तों निजसैन्य न दिसे शरजाळें ॥ ८० ॥ जेवीं गगन दाटलें मेघमंडळीं ॥ तेणें आच्छादे अंशुमाळी[6] ॥ नातरी मायापटळ ज्ञान आकळी ॥ तेवीं पाहे निजसैन्य ॥ ८१ ॥ आपण सैन्यांत एकला ॥ आणि बहुतां वीरीं वेढिला ॥ आणि रथही नाहींसा देखिला ॥ कोपा चढला वृषकेतू ॥ ८२ ॥ धनुष्यीं योजोनियां गुण[7] ॥ बाण सोडीत कनकभूषण ॥ हंसध्वजाचें सर्व सैन्य ॥ निर्जीव करीत चालिला ॥ ८३ ॥ तों आणिक सैन्य आलें धांवून ॥ तेणें वेढिला कर्णनंदन ॥ शक्ति तोमर भाली[8] जाण ॥ वर्षों लागले त्यावरी ॥ ८४ ॥ भिंडिमाला तोमर असी ॥ मुद्गर चक्रें भुशुंडीसी ॥ गदा पट्टिश त्रिशूळेंसीं ॥ शस्त्रवर्षाव करिताती ॥ ८५ ॥ कर्णनंदन महाबळी ॥ मुखें जपे हरिनामावळी ॥ तों सारथियानें त्वरा केली ॥ रथ आणिला जवळिकें ॥ ८६ ॥ तया रथावरी बैसोन ॥ दृष्टीसी सुधन्वा लक्षून ॥ बाण ओढोनि आकर्ण ॥ तयावरी सोडिला ॥ ८७ ॥ सर्वेचि अति तीक्ष्ण शरधारीं ॥ सकळ सैन्याचा संहार करी ॥ बाणवस्त्रें सेनासुंदरी ॥ नग्न ह्मणूनि झांकिलीसे ॥ ८८ ॥ तें देखून सुधन्वा कोपला ॥ कानासीं बाण ओढून सोडिला ॥ तो कर्णनंदनाचे हृदयीं बैसला ॥ रथीं पडिला मूर्च्छित ॥ ८९ ॥ सारथी पाहे कर्णनंदना ॥ तंव तो पावला दीर्घ मूर्च्छेना ॥ मग तो घेऊनियां जाणा ॥ शीघ्र स्यंदना चालविलें ॥ ९० ॥ तें देखोनियां जाण ॥ सुधन्व्यावरी चालिला मदन ॥ ह्मणे उभा रे उभा सावधान ॥ साहें बाण हे माझे ॥ ९१ ॥ आकर्ण ओढून पांच बाण ॥ सुधन्व्यावरी टाकिले दारुण ॥ तेणें मराळध्वजनंदन ॥ अत्यंत व्याकुळ तो झाला ॥ ९२ ॥ एकेच शरें तो



१ मेघगर्जना. २ रथ, घोडे, हत्ती, पायदळ यांचा समूह. ३ हत्तीच्या सोंडेसारखे. ४ वृषकेतु. ५ मोठ्या अवसानानें. ६ सूर्य. ७ दोरी. ८ बरच्या.

सारथी ॥ केला यमाचा अतिथी ॥ चहूं अश्वांची शकलें निश्चिती ॥ करूनि भूमीं विखुरलीं ॥ ९३ ॥ सर्वेचि करूनियां वेग ॥ एका शरें रथाचें युग ॥ तयाचे करून अष्ट भाग ॥ भूमीवरी टाकिले ॥ ९४ ॥ एकाच शरें चाप भंगिलें ॥ तयाचीं केलीं दोन शकलें ॥ मग सुधन्व्यातें मानवलें ॥ कृष्णसुताचें पुरुषत्व ॥ ९५ ॥ ह्मणे हा वीर असेल भला ॥ येणें पराक्रम तो फार केला ॥ आतां उपेक्षूं नये याला ॥ ह्मणोनि झाला सावध ॥ ९६ ॥ रोग शत्रु आणि ऋण ॥ यांची उपेक्षा करितां जाण ॥ वृद्धी पावोनि पीडन ॥ करिती प्राणांत देहाचा ॥ ९७ ॥ सुधन्वा होऊन नीट ॥ गुणीं लाविला शर तिखट ॥ तेणें विंधोनि सारथीकंठ ॥ शिर उडविलें आकाशीं ॥ ९८ ॥ शरें चापगुण केला अष्टधा ॥ तैसेंचि रथयुग केलें त्रिधा ॥ ध्वज केला षोडशधा ॥ धनुष्य पंचधा तेणें केलें ॥ ९९ ॥ सर्वेंचि बाणत्रयेंकरून ॥ वेगें विंधिला प्रद्युम्न ॥ सिंहनादें करिती गर्जन ॥ उभय वीर ते काळीं ॥ १०० ॥ दोघे वीर अति विख्यात ॥ कोणी कोणासी नाटोपत ॥ रक्तमय दोघे शोभत ॥ जैसे सपुष्प किंशुक ते ॥ १ ॥ क्षणैक युद्ध करिती गगनीं ॥ सर्वेंचि उतरती मेदिनीं ॥ दोघेही मूर्च्छा पावोनी ॥ पडले भूमीं शरघातें ॥ २ ॥ तों आधीं सुधन्वा झाला सावध ॥ मूर्च्छा प्रद्युम्नासी राहिली अर्ध ॥ तों शर घेऊन नानाविध ॥ सैन्यावरी टाकीतसे ॥ ३ ॥ ऐसा सुधन्वा देखोन पराक्रमी ॥ कृतवर्मा धांवला क्रूरकर्मी ॥ क्षत्रधर्मातें जो मर्मी ॥ तो पाचारी सुधन्वा ॥ ४ ॥ आला जाणोनि तो यादव ॥ त्यावरी टाकिले बाण नव ॥ कृतवर्म्यानें करून लाघव ॥ त्रिधा छेदून टाकिले ॥ ५ ॥ क्रोधें सुधन्वा शर वर्षला ॥ तेणें सारथी निमाला ॥ कृतवर्मा विरथ केला ॥ मग पीडिला शरजाळीं ॥ ६ ॥ तें न साहवेचि त्यालागून ॥ मग सोडोनियां समरंगण ॥ तेणें केलें पलायन ॥ मग धांवला अनुशाल्व ॥ ७ ॥ क्रोधें झाले ताम्र नयन ॥ सुधन्व्यानें दृष्टीं लक्षून ॥ धनुष्यासी चढवोनियां गुण ॥ काय वचन बोलिला ॥ ८ ॥ ह्मणे ऐक राजपुत्रा ॥ कां तूं प्रवर्तलासी संहारा ॥ युद्धीं तोषविले वीरवीरा ॥ आदि करून कर्णात्मज ॥ ९ ॥ पाहें माझे बळाचें कौतुक ॥ एकचि साहें हा तीव्र सायक ॥ तें पाहों टाके वीरनायक ॥ सुधन्वा थोर पराक्रमी ॥ ११० ॥ तेजें केवळ वडवानळ ॥ ऐसा बाण सोडिला सोज्ज्वळ ॥ व्यापित चालिला अंतराळ ॥ तेजें नेत्र झांकले ॥ ११ ॥ वारितां वारितां तो बाण ॥ हृदयीं बैसला दारुण ॥ तेणें मूर्च्छना पावोन ॥ धरणीवरी पडियेला ॥ १२ ॥ सुधन्वा मूर्च्छित पडियेला ॥ सर्वेंचि रथ छेदून टाकिला ॥ मग सिंहनादें गर्जला ॥ अनुशाल्व प्रतापी ॥ १३ ॥ सुधन्वा सांवरोनि मूर्च्छना ॥ मग दृष्टीं देखिला दैत्यराणा ॥ सोडोनियां दिव्य बाणा ॥ भुजास्थानीं लक्षुनी ॥ १४ ॥ तया घायें तो दुखवला ॥ मूर्च्छा येऊन तळीं पडला ॥ मग पार्थसैन्य मारीत चालिला ॥ बाणजाळें नृपात्मज ॥ १५ ॥ जेवीं उगवतां दिनकर ॥ तात्काळ निवारी तिमिर ॥ जेवीं अगस्ति शोषी सागर ॥ तैसा सुधन्वा वाढला ॥ १६ ॥ गजादिकांतें

१ गतप्राण, मृत. २ धनुष्याची दोरी. ३ पळस. ४ मृत्यु पावला. ५ दोरी. ६ बाण. ७ आकाश. ८ अंधकार.

भेदिलें ॥ अश्वचक्रातें संहारिलें ॥ पदाति[1]दळ पळों लागलें ॥ बुडों लागलें रक्तपूरीं ॥ ११७ ॥ रक्तनदीस पूर आला ॥ तेणें वाहे प्रेतमेळा ॥ गजाश्वरथ पडिले खळाळा ॥ रथकाष्ठसाठीं[2] वाहती ॥ १८ ॥ मांसशोणितांच्या पंकें[3] ॥ तेणें न हालती रथचाकें ॥ ऐसें युद्ध केलें नृपनायकें ॥ वधिली ऐकें नृपसेना ॥ १९ ॥ मुद्रिकांसह हस्त वाहती ॥ ते पंचफणी सर्पाऐसे दीसती ॥ जीं जीं शैवें[4] पडिलीं होतीं ॥ तीं तीं नेलीं रक्तपूरें ॥ १२० ॥ पुढें सुधन्वा आणि अर्जुन ॥ युद्ध करितील अति दारुण ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अति रसाळ पैं आहे ॥ २१ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १२२ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते अष्टादशोध्यायः ॥ १८ ॥ अध्याय ॥ १८ ॥ ओव्या ॥ १२२ ॥ ॥

१ पायदळ. २ रथांचे सांगाडे. ३ चिखलानें. ४ प्रेतें.

श्रीगणेशाय नमः॥ ॥ पुसे जनमेजय महाबळी॥ पुढें कथा कैसी वर्तली ॥ ती तुह्मीं माझिये कर्णबिळीं ॥ बरवे परी घालावी ॥ १ ॥ जैमिनि ह्मणे नृपनाथा ॥ पुढें ऐकावी पूर्वजकथा ॥ जी निवारी भवरोगव्यथा ॥ श्रवण करितां भावार्थें ॥ २ ॥ पांडवसैन्य देखोनि अति दुःखी ॥ उठावला वीर सात्यकी ॥ तयातेंही सत्तर सायकीं ॥ विंधी त्वरें सुधन्वा॥ ३ ॥ तयाचे ते निवारूनि बाण ॥ सात्यकी करीतसे संधान ॥ कार्मुक आकर्ण ओढून ॥ पंचसप्तति बाण सोडिले ॥ ४ ॥ ध्वज छत्र हय सूत रथ ॥ नीडयुग चक्रादि समस्त ॥ यादवें छेदोनियां त्वरित ॥ विरथ केला सुधन्वा ॥ ५ ॥ मग होऊनियां हास्यवदन ॥ सुधन्वा मांडीत निर्वाण ॥ न लागतांचि अर्ध क्षण ॥ केला विरथ सात्यकी ॥ ६ ॥ दोघे बैसोनियां आणिके रथीं ॥ वर्षों लागले शर शक्ती ॥ बाणजाळ सुवस्त्रबुंथी ॥ दोघे घेती परस्परें ॥ ७ ॥ दोघे शरभेदगात्र झाले ॥ दोघे रुधिरमंय देखिले ॥ वसंतीं जैसे किंशुक फुलले ॥ तैसे शोभले दोघेही ॥ ८ ॥ तंव सुधन्वा सोडीत शक्ती ॥ तेज उजळलें दश दिशांप्रति ॥ ती येऊन पवनगतीं ॥ हृदयीं आदळली सात्यकीचे ॥ ९ ॥ ती खडतरली पूर्ण शक्ती ॥ जेवीं हृदय भेदी दुरुक्ती ॥ कीं शब्देंच स्नेह विघडी युवती ॥ तेवीं केला हृदयभेद ॥ १० ॥ तो शक्तिघात लागला थोर ॥ मूर्च्छित पडला सात्यकी वीर ॥ तो पडतांचि हाहाकार ॥ दळीं झाला पार्थाचे ॥ ११ ॥ अद्भुत देखोनि तयाचें बळ ॥ पळों लागलें पांडवदळ ॥ ह्मणती वीर नव्हे हा काळ ॥ आह्मांभोंवता लागला ॥ १२ ॥ सैन्य देखोनि व्यथाभूत ॥ स्वयें लोटला वीर पार्थ ॥ सुधन्व्यातें काय बोलत ॥ उभा रे उभा केवीं जासी ॥ १३ ॥ माझिया दृष्टीखालोन ॥ कोठें करिसील पलायन ॥ बाणजाळें त्रिभुवन ॥ भरोन आतां काढितों ॥ १४ ॥ वृषकेतादि वीर सकळ ॥ प्रतापें दिनकरचि केवळ ॥ तुवां त्यांचा घेतलासे कवळ ॥ राहुरूप होऊनियां ॥ १५ ॥ ज्यांहीं अनेक संग्राम केले ॥ भीष्मद्रोणादि जिंकिले ॥ कृप आणि गुरुपुत्रादि भले ॥ सर्व जिंकिले समरांगणीं ॥ १६ ॥ काळासम जे कां दैत्यनाथ ॥ तेही जिंकिले बळें समर्थ ॥ आणि संतोषविला गौरीकांत ॥ निजबळेंकरूनी ॥ १७ ॥ मागेंही केले अपार संग्राम ॥ थोर थोर जिंकिले नरोत्तम ॥ परी तुझा देखोनि पराक्रम ॥ परमाश्चर्य मज झालें ॥ १८ ॥ ऐसें ऐकोन पार्थवचन ॥ सुधन्वा झाला हास्यवदन ॥ मग होऊनियां सावधान ॥ पार्थाप्रति काय बोले ॥ १९ ॥ तुवां युद्ध केलें बहुत ॥ वीरही जिंकिले कीर्तिवंत ॥ तेव्हां सारथी होता कृष्णनाथ ॥ त्याचें आश्चर्य कोण मानी ॥ २० ॥ आतां झालासी कृष्णहीन ॥ ह्मणोनि आश्चर्य पावलें मन ॥ तूं कां सांडिला नारायण ॥ तेणेंही तुज कैसें त्यजिलें ॥ २१ ॥ जैसी सुवर्णसंगें असतां लाख ॥ तयेसी पूजिती सर्व लोक ॥ तयाचा वियोग होतां देख ॥ मग तयेसी कोण पुसे ॥ २२ ॥ नातरी अग्निसंगें काष्ठ असतां ॥ सर्व लोक भीती तयासी देखतां ॥ अग्निवियोग झालिया सर्वथा ॥ मग तया हस्तें घर्षिती ॥ २३ ॥ जेथें पार्थ तेथें

१ बाणांनीं. २ धनुष्य. ३ रथांत बसावयाच्या दोन्ही जागा. ४ बाणांनीं भेदलेलीं आहेत गात्रें ज्यांचीं असे. ५ रक्तकंबाल. ६ पळस. ७ सैन्यामध्यें.

कृष्ण ॥ ऐसें भगवद्वाक्य प्रमाण ॥ तें अन्यथा कां झालें जाण ॥ कां वियोग तुवां केला ॥ २४ ॥ जेथें गर्वसर्प संचरला ॥ तयासी तो सुखार्णव अंतरला ॥ किंवा महत्पापें उदय केला ॥ ह्मणोनि आलासी तूं येथें ॥ २५ ॥ किंवा तूं झालासी भक्तिहीन ॥ ह्मणोनि समीप नये रमारमण[1] ॥ तरी मी निजबळें तयासी आणीन ॥ तुझें साह्य करावया ॥ २६ ॥ ऐसा करीन संग्राम ॥ जेणें संतोषे पुरुषोत्तम ॥ हाचि पुरुषाचा पुरुषधर्म ॥ जेणें भवश्रम[2] दूर होय ॥ २७ ॥ जरी तूं विद्याबळें अगाध ॥ सर्व वीरांमाजी प्रसिद्ध ॥ तथापि मजसीं करावया युद्ध ॥ समर्थ नव्हसी तूं आतां ॥ २८ ॥ जेवीं प्राणरहित शरीर ॥ तें केवळ होय भूमिभार ॥ तेवीं मज दिसे तुझा विचार ॥ कृष्णरहित ह्मणोनी ॥ २९ ॥ तुजसीं करावया रण ॥ मज तों नाहीं समाधान ॥ जयासी सोडी नारायण ॥ नव्हे भूषण तें युद्धीं ॥ ३० ॥ तुझा अश्व धरूनियां याग ॥ हंसध्वज करील सांग ॥ परी सोडवावयाचा तुझा लाग ॥ येथें कांहीं न चाले ॥ ३१ ॥ आज माझें हें भुजबळ[3] ॥ आतां पाहोत देव सकळ ॥ जरी तुज साह्य आला गोपाळ ॥ तरी मी दोघांतें जिंकीन ॥ ३२ ॥ ऐसें तयाचें ऐकोनि वचन ॥ क्रोधें तप्त सुभद्रारमण[4] ॥ मग धनुष्या चढवोनि गुण ॥ शतावधि बाणें विंधिला ॥ ३३ ॥ तंव सुधन्वा झाला हास्यवदन ॥ केलें शत बाणांचें चूर्ण ॥ मग दश शर सोडूनियां आपण ॥ कुंतीनंदन विंधिला ॥ ३४ ॥ मग शत सहस्र अयुतें[5] ॥ प्रयुतें[6] नियुतें[7] द्विलक्ष गणित ॥ उत्तरोत्तर बाण अनंत ॥ सोडूनि पार्थ झांकिला ॥ ३५ ॥ ते अर्जुनें येतां देखिले ॥ त्यांचे तिळप्राय कुटके केले ॥ तें देखोनि समाधान झालें ॥ तेव्हां सुधन्व्यालागोनी ॥ ३६ ॥ जेवीं याचकाचे अनंत गुण ॥ एकलें दुरी करी मागतेपण ॥ कीं राजमृगाचे अनंत गुण ॥ निवारी जेवीं दुर्गंधता ॥ ३७ ॥ नातरी सिंधूचे गुण अपार ॥ परी तृषाकाळीं क्षार नीर ॥ लोपवी तेवीं सुधन्व्याचे शर ॥ धनंजयशरें निवारिले ॥ ३८ ॥ मग दांतें अधरोष्ठ[8] चावुनी ॥ आग्नेयास्त्र योजी बाणीं ॥ सुधन्व्यावरी सोडी ते क्षणीं ॥ मग गर्जत सिंहनादें ॥ ३९ ॥ धरणी आणि गगन ॥ भरोनि चालिलासे अग्नि संपूर्ण ॥ पक्षी करूं न शकती गमन ॥ धूम्रें अंधकार पडियेला ॥ ४० ॥ त्या पावकास्त्रें वह्निज्वाळें ॥ चतुरंग सैन्य दग्ध झालें ॥ तें सुधन्व्यानें नयनीं देखिलें ॥ त्यावरी सोडिलें वारुणास्त्र ॥ ४१ ॥ तंव गगनीं दाटलें मेघमंडळ ॥ त्यांत होत विद्युल्लतांचे झळाळ ॥ वर्षों लागले मेघ प्रबळ ॥ धारा जैशा गजशुंडा ॥ ४२ ॥ शमोनि गेली अग्निज्वाळ ॥ जीवनचि झालेंसे प्रबळ ॥ बुडों लागलें पांडवदळ ॥ तया उदकामाझारीं ॥ ४३ ॥ चातकमयूरांचे वृंद ॥ नानापरींचे करिती शब्द ॥ चर्मवाद्यांचे नाद ॥ सर्व राहिले ते समयीं ॥ ४४ ॥ कनकचंपकाऐसी[9] कांती ॥ तयापरीस सूक्ष्म वस्त्रें शोभती ॥ तीं भिजोन गात्रीं जडती ॥ सर्वही जाणवती नग्नापरी ॥४५॥ ढाला चामरें गजकुंभ ॥ सर्वही झाले ते निष्प्रभ ॥ बाणपत्रांचा झाला स्तंभ ॥ जलसंयोगेंकरूनी ॥ ४६ ॥ ऐसें स्वसैन्य बुडों लागलें ॥



१ श्रीकृष्ण. २ संसारश्रम. ३ बाहूंची शक्ति. ४ अर्जुन. ५ दहा हजार. ६ दशलक्ष. ७ लक्ष. ८ खालचा ओंठ. ९ सोनचांफ्यासारखी.

तें पार्थें नयनीं देखिलें ॥ मग पवनास्त्रातें योजिलें ॥ जलविध्वंसालागोनी ॥ ४७ ॥ वायु सुटलासे अति थोर ॥ तेणें निवारिला तो जलधरें[1] ॥ सुधन्व्याचें सैन्य समग्र ॥ उडों लागलें तेधवां ॥ ४८ ॥ हें देखोनि सुधन्वा वीर ॥ सोडीत शर अर्धचंद्राकार ॥ तेणें पार्थाचे चाप गुण सत्वर ॥ छेदोनियां पाडिले ॥ ४९ ॥ चाप गुण आणि शर ॥ छेदितांचि नृपकुमर ॥ पार्थाप्रति बोले उत्तर ॥ तेंचि ऐकावें राजेंद्रा ॥ ५० ॥ जवळी सारथी नसे श्रीरंग ॥ ह्मणोनि छिन्न भिन्न झालें सर्वांग ॥ तुझे पुरुषार्थ जलतरंग ॥ निवाले कां ते मज सांगें ॥ ५१ ॥ सर्वेश सारथी टाकून ॥ मानव सारथी केला पाहून ॥ जळो तुझें पूर्ण ज्ञान ॥ व्यर्थ गीताश्रवण केलें ॥ ५२ ॥ सेवितां निवारी जन्ममरण ॥ तें सोडोनि जाह्नवीजीवन[2] ॥ थिल्लरोदक[3] सेवितां दोष दारुण ॥ काय जळोनि जाईल ॥५३॥ तो सोडोनि जगन्मोहन[4] ॥ सारथी केला प्राकृत जन ॥ आतां तरी तयालागून ॥ यमसदन दावितों ॥ ५४ ॥ मग सोडोनियां दिव्य बाण ॥ सारथी मारिला न लगतां क्षण ॥ सिंहनादें गर्जन ॥ करी ते क्षणीं सुधन्वा ॥ ५५ ॥ तंव अर्जुनें काय केलें ॥ दक्षिण करें हयदोर[5] धरिले ॥ वाम हस्तें धनुष्य ओढिलें ॥ संधान केलें कौतुकें ॥ ५६ ॥ परी पार्थ झाला असे व्याकुळ ॥ हृदयीं आठविला गोपाळ ॥ स्मरतांच तो तमाळनीळ ॥ उभा पुढें देखिला ॥ ५७ ॥ कीं वदनींच होता अनंत ॥ किंवा शब्दाची वाट पाहात ॥ व्याकुळ देखोनि सुभद्राकांत ॥ वेगें दयार्णव धांवला ॥ ५८ ॥ कीं वृकमुखीं[6] निजवत्स पडतां ॥ मागें न पाहे धेनु धांवतां ॥ तेवीं सुधन्व्यासी पार्थ वश्य होतां ॥ देव धांवला तात्काळ ॥ ५९ ॥ मग देव बोले अर्जुनाप्रती ॥ दे अश्वदोरे माझिये हातीं ॥ विस्मय पावोनि सुभद्रापती ॥ चरणीं माथा ठेविला ॥ ६० ॥ विजय ह्मणे यदुरायातें ॥ देवा कां हो आलास तूं येथें ॥ येरू ह्मणे भक्तसंकटातें ॥ देखोनि मातें न राहवे ॥ ६१ ॥ पुढें बैसला श्रीकृष्ण सारथी ॥ मागें बैसला महारथी ॥ मग पार्थ संतोषोनियां चित्तीं ॥ बाणजाळ सोडीतसे ॥ ६२ ॥ तंव सुधन्वा ह्मणे ऐक पार्था ॥ सारथी हरि झाला आतां ॥ कांहीं पण करीं रे तत्वतां[7] ॥ देखत मातें जिंकावया ॥ ६३ ॥ सुधन्वा ह्मणे अनंता ॥ धन्य झालों तुज देखतां ॥ भक्तसंकटा धांव घेतां ॥ दर्शनलाभ जोडला ॥ ६४ ॥ मग सुधन्व्यासी बोले पार्थवीर ॥ आतां ऐक प्रतिज्ञोत्तर ॥ तीन बाणीं तुझें शिर सत्वर ॥ न उडवितां रौरव मज होती ॥ ६५ ॥ हेंचि माझें सत्य वचन ॥ असत्य करूं न शके चतुरानन[8] ॥ आतां तूं बोल रे आपुला पण ॥ माझ्या कृष्णादेखतां ॥ ६६ ॥ सुधन्वा बोले आपला पण ॥ मी छेदीन तुझे तीनही बाण ॥ न छेदीन तरी मज पतन ॥ हो कां रौरवीं आकल्प ॥ ६७ ॥ ऐसें बोलोनियां वचन ॥ सात बाणीं विंधिला मधुसूदन ॥ सवेंचि सोडोनि तीन बाण ॥ पार्थ लक्षून भेदिला ॥ ६८ ॥ आणिक सोडोनि तीन बाण ॥ अश्वांसहित नरनारायण ॥ रथ उडवोनि नेला जाण ॥ योजन मात्र पश्चिमे ॥ ६९ ॥ जैसें कुलालचक्र फिरत ॥ तैसा पार्थरथ

---

१ मेघ. २ गंगाजळ. ३ डबक्याचें पाणी. ४ श्रीकृष्ण. ५ घोड्यांच्या लगामा. ६ लांडग्याच्या तोंडांत. ७ खरोखर. ८ ब्रह्मदेव.

गगनीं भ्रमत ॥ सर्वेचि दश बाणीं विंधित ॥ कुंतीपुत्रातें सक्रोधें ॥ ७० ॥ धनंजयासी ह्मणे यदुनाथ ॥ पाहा सुधन्व्याचा पुरुषार्थ ॥ तुवां केला पण व्यर्थ ॥ शर तीन आतां व्यर्थ जाती ॥ ७१ ॥ त्रैलोक्याचा भार घालित ॥ दोनी पायीं असें दडपित ॥ तरी रथ नव्हेचि भूमिगत ॥ ऐसें अद्भुत बळ याचें ॥ ७२ ॥ आहा रे पार्था काय केलें ॥ मज तूं पूर्वीं न विचारिलें ॥ कैसें अविचारें कार्य केलें ॥ तें सिद्धी केवीं जाईल ॥ ७३ ॥ ऐसेंच जयद्रथाचे वधीं ॥ मज न विचारतां पण केला आधीं ॥ मग मी पडिलों संकटोदधीं ॥ तें काय पार्था विसरलासी ॥ ७४ ॥ जें तुज मज न होय किंचित ॥ तें सुधन्वा करील एकपत्नीव्रत ॥ त्या पुण्यें हा बळवंत ॥ सर्वथा जाण नाटोपे ॥ ७५ ॥ श्वेतवाहनें[1] ह्मणे गोविंदा ॥ तीन बाणींच करीन शिरश्छेदा ॥ तोंवरीच संकट मुकुंदा ॥ जोंवरी तूं नव्हतासी येथें ॥ ७६ ॥ सुधन्वा महाक्रोधमुख ॥ पार्थावरी टाकी शिलीमुखें[3] ॥ सकळ सैन्यास देऊनि दुःख ॥ हरीप्रति बोलतसे ॥ ७७ ॥ तूं धांवलासी भक्तवत्सलपणें ॥ परी विषम भासतें मजकारणें ॥ एकास रक्षणें एकास मारणें ॥ हें काय योग्य तव कृपे ॥ ७८ ॥ उजवा नयन रक्षावा ॥ वामें नयन फोडावा ॥ हें काय घडेल जी माधवा ॥ करीं अवयवां समदृष्टी ॥ ७९ ॥ अवचट अंतीं होतां स्मरण ॥ तयासी प्राप्त नसे जन्ममरण ॥ तुजसन्मुख ज्यासी मरण ॥ कैवल्यसदन तयासी ॥ ८० ॥ हाचि निश्चय धरून मनीं ॥ युद्ध करितों तुज लक्षूनी ॥ परी सावध होऊनि चक्रपाणी ॥ गांडीवपाणी रक्षावा ॥ ८१ ॥ जैसा गायींसाठीं गोवर्धन ॥ धरूनि रक्षिले गोपजन ॥ तैसाचि आजी श्वेतवाहन ॥ बरव्यापरी रक्षावा ॥ ८२ ॥ तंव तो ऐकोनियां पण ॥ आकाशीं दाटले सुरगण ॥ विमानीं भरलेंसे गगन ॥ देवांगना त्याही आल्या ॥ ८३ ॥ त्रिपुरारी[6] आणि चतुराननं[7] ॥ लोकपाळांसह शचीरमण ॥ नारद तुंबरादि मुनिगण ॥ कौतुक पाहूं पातले ॥ ८४ ॥ ह्मणती कोण जिंकील हा पण ॥ तो सावध पाहूं आपण ॥ आजि नेत्रांचें समाधान ॥ सार्थक होऊं पाहातें ॥ ८५ ॥ तंव पार्थें शर टाकिला सोज्वळ ॥ जो तेजें प्रळयानळ ॥ तो सोडितांचि नभमंडळ ॥ देदीप्यमान जाहलें ॥ ८६ ॥ हरि ह्मणे म्यां सप्ताह गोवर्धन ॥ धरूनि रक्षिले गोकुळजन ॥ त्या पुण्येंकरूनि बाण ॥ लागो पूर्ण सुधन्व्यातें ॥ ८७ ॥ देवें पुण्य समर्पिलें ॥ हें सुधन्व्यानें ऐकिलें ॥ कृष्णाप्रति काय बोले ॥ सादरें तेंचि परिसावें ॥ ८८ ॥ कृष्णपुण्ययुक्त बाण ॥ याचें मी करीन खंडन ॥ नाहीं तरी माझें पुण्यधन ॥ सर्वही वृथा तें जाऊ ॥ ८९ ॥ राक्षस तस्कर वधोन ॥ जें केलें विप्रसंरक्षण ॥ तें पुण्य क्षय पावो पूर्ण ॥ जरी हा बाण न छेदीं मी ॥ ९० ॥ ऐसें बोलोनि उत्तर ॥ अर्धचंद्राकार सोडिला शर ॥ तेणें पार्थबाण सत्वर ॥ छेदोनि पाडिला भूमीवरी ॥ ९१ ॥ बाण छेदितां त्या अवसरा ॥ तंव देव झाला परम घाबरा ॥ ह्मणे पार्था धनुर्धरा ॥ माझा जीव तो धुकधुकी ॥ ९२ ॥ तयाचें देखोनि लाघव ॥ आश्चर्य करिती देव सर्व ॥ तें जाणोनि कुरुपुं-

१ अर्जुनाला. २ अर्जुन. ३ तीक्ष्ण बाण. ४ डावा. ५ मोक्षप्राप्ति. ६ शंकर. ७ ब्रह्मदेव. ८ इंद्र. ९ सात दिवस.

गेंव ॥ दुजा बाण योजिला ॥ ९३ ॥ जेवीं अत्यंत कृपण जन ॥ कष्टी होय वेंचतां धन ॥ तेवीं दुजा करीं घेतां बाण ॥ सुभद्रारमण मानीतसे ॥ ९४ ॥ धनुष्य ओढूनि आकर्ण ॥ पार्थें गुणीं लाविला बाण ॥ त्यावरी स्वयें नारायण ॥ पुण्य समर्पण तो करी ॥ ९५ ॥ म्यां परशुरामअवतारीं पूर्ण ॥ यागीं ब्राह्मणां दिधलें धरादान ॥ त्या पुण्यें लागोनि हा बाण ॥ शिर तुटो सुधन्व्याचें ॥ ९६ ॥ सुधन्वा कृष्णासी बोलत वचन ॥ याही बाणीं केलें पुण्यार्पण ॥ या बाणाचें करीन खंडन ॥ मत्प्रतिज्ञावचन ऐकावें ॥९७॥ अरुंधतीसहित वसिष्ठाचा ॥ वधदोष घडेल साचा ॥ तो दोष मज घडो त्रिवाचा ॥ जरी बाणातें न खंडीं ॥ ९८ ॥ सुधन्व्याचें प्रतापवचन ॥ ऐकतां तोषला नारायण ॥ ह्मणे मज कृतघ्नता आली पूर्ण ॥ हें भक्तरत्न निमालिया ॥ ९९ ॥ सुधन्वा ह्मणे हे धन्य पार्थ ॥ तुजनिमित्त वैकुंठनाथ ॥ निजपुण्य समर्पित ॥ नेणवे भाग्य पैं तुझें ॥ १०० ॥ तंव पार्थें बाण सोडिला सोज्ज्वळ ॥ नेणों काय प्रगटलें रविमंडळ ॥ असंभाव्य तेजबंबाळ ॥ तैसा बाण जातसे ॥ १ ॥ तो गगनीं बोलती देवता ॥ कोण जिंकील न कळे आतां ॥ हा बाण अग्नि वर्षे आतां ॥ नेणों प्रळयातें करील ॥ २ ॥ आला देखोनि पार्थबाण ॥ सुधन्वा करी घोर संधान ॥ त्याही बाणाचें करूनि खंडन ॥ शंख वाजवी आवेशें ॥ ३ ॥ याचकाशा भंगतां जाण ॥ जें दुःख होय त्यालागून ॥ तें दुःख पावला श्वेतवाहन ॥ भंगतां बाण दुसरा ॥ ४ ॥ त्या बाणाचें करितां खंडन ॥ पृथ्वी झाली कंपायमान ॥ तें देखोनि मधुसूदन ॥ पार्थाप्रति अनुवादे ॥ ५ ॥ तिजा योजीं महाबाण ॥ मी वाजवितों पांचजन्य ॥ तूंही देवदत्तांचें करीं गर्जन ॥ धैर्य आतां सोडूं नको ॥ ६ ॥ प्रतिज्ञा जे करिती सत्य ॥ तयांचें असे धन्य जीवित ॥ जे कीर्तनरंगीं नाचत ॥ स्वर्ग त्यांतें तृणप्राय ॥ ७ ॥ माझें पुण्य समर्पिल्यावांचोन ॥ सर्वथा नव्हे याचें निधन ॥ बाणत्रयें याचें मरण ॥ सर्वथा नव्हे धनंजया ॥ ८ ॥ ऐसें बोलोनि यदुनंदन ॥ करिता झाला शंखवादन ॥ देवदत्तातें अर्जुन ॥ वाजवीत आनंदें ॥ ९ ॥ तंव वायुसुत बोले आपण ॥ ऐक धनंजया माझें वचन ॥ कृष्णआज्ञेंकरून ॥ बाण घेई निजकरीं ॥ ११० ॥ मग श्रीहरीची आज्ञा वंदून ॥ पार्थें निजकरीं घेतला बाण ॥ तयातें पाहोनि नारायण ॥ सर्वदेवमय तो केला ॥ ११ ॥ पश्चिमभागीं चतुराननं ॥ मध्यें स्थापिला उमारमण ॥ बाणाग्रीं बैसोनि आपण ॥ पुण्य समर्पण तो करी ॥१२॥ जें रामावताराचें सुकृत ॥ तेथें केलें एकपत्नीव्रत ॥ देव केले बंधनमुक्त ॥ त्याचि पुण्यें हा बाण लागो ॥ १३ ॥ ऐसें करोनियां पुण्यार्पण ॥ भययुक्त बोले वचन ॥ याही बाणाचें करील खंडन ॥ प्रतापयुक्त सुधन्वा ॥ १४ ॥ माझे पुण्याचा व्यय करी ॥ आपली प्रतिज्ञा करी खरी ॥ ऐसा वीर त्रैलोक्यामाझारी ॥ सुधन्व्यावांचोनि आन नसे ॥ १५ ॥ ऐसे तयाचे घेऊनि गुण ॥ अंतरीं संतोषे रमारमण ॥ परी ह्मणे वांचो हा अर्जुन ॥ नेणवे महिमान पार्थाचें ॥१६॥ मग सुधन्वा बोले देवाधिदेवा ॥ सर्वही वेंचून पुण्यठेवा ॥

१ अर्जुन. २ दोरीला. ३ श्रीकृष्ण. ४ बोले. ५ या नांवाचा शंख. ६ गवतासारखा. ७ मरण. ८ भीम. ९ ब्रह्मदेव. १० शंकर. ११ पुण्य.

आता तरी रक्षीं पांडवा ॥ हाही छेदितों बाण कीं ॥ १७ ॥ अर्जुनासी ह्मणे वीरमान्या ॥ रणरंगधीरा कुरुकुळधन्या ॥ आतां तरी करीं सत्य प्रतिज्ञा ॥ या श्रीहरीदेखतां ॥ १८ ॥ अर्जुन तयातें बोलत ॥ जें मुगुटकुंडलें दिव्यमंडित ॥ तांबूलचर्वणें अति शोभत ॥ तें शिर छेदीन या शरें ॥ १९ ॥ जरी मी न करीं शिरश्छेद ॥ तरी जे हरिहरांसी करिती भेद ॥ जे कां असत्य मानिती वेद ॥ तें पातक मज घडो ॥ १२० ॥ भग सुधन्वा बोले आपण ॥ मीही या बाणाचें न करितां खंडन ॥ तूं बोलिलासी जें दारुण ॥ तेंचि पातक मज घडो ॥ २१ ॥ मणिकर्णिकाजळीं करूनि स्नान ॥ आणि विश्वनाथाचें घेऊन दर्शन ॥ सुवर्णकमळीं केलें पूजन ॥ वेदोक्तमंत्रें भक्तीनें ॥ २२ ॥ तया पूजनाचरणेंकरून ॥ जो काढील पापी दारुण ॥ तेंही पातक घडो मजलागून ॥ जरी शर न खंडीं मी ॥ २३ ॥ ऐसें सुधन्वा बोले निःशंक ॥ तों तों माधवोदरीं धुकधुक ॥ आतां न वांचे पांडवदीपक ॥ ह्मणोनि बोले खगकेतू[1] ॥ २४ ॥ तंव तो अर्जुनें बाण सोडिला ॥ तेजें ब्रह्मांडगोळ उजळला ॥ दिनकरही तो लोपला ॥ झाल्या सोज्ज्वळा दिशा दाही ॥ २५ ॥ तो बाण गर्जत चालिला ॥ नादें प्रलयांबुधि लाजला ॥ सर्व सैन्यनाद मंदावला ॥ पुंखशब्दें[2]करूनी ॥ २६ ॥ अष्टदिग्गज गजबजिले ॥ कुळाचळ[3] धाकें डळमळिले ॥ सप्त सागर उचंबळले ॥ बाणधाकेंकरूनी ॥ २७ ॥ तळीं दडपला सहस्रवदन[4] ॥ भयें पोटीं निघाले चरण ॥ तेंपासून सर्व सर्पगण ॥ झाले अचरण वाटतसे ॥ २८ ॥ तंव देव पळविती विमानें ॥ ह्मणती काय मांडिलें कृष्णार्जुनें ॥ कौतुक पाहातां विघ्नें ॥ अकस्मात उदेलीं कीं ॥ २९ ॥ ऐसा बाण येतां देखिला ॥ सुधन्वा परम कोपला ॥ अर्जुनाप्रति बोलिला ॥ जनमेजया तें ऐक ॥ १३० ॥ हरिहरब्रह्मादि देवगण ॥ सुखें रक्षोत तुजकारण ॥ तथापि निजशरें हा बाण ॥ छेदितों पहा वीरेशा ॥ ३१ ॥ जरी हा बाण न छेदीं आतां ॥ तरी म्यां लाजविला कीं पिता ॥ वीरपत्नी माझी माता ॥ लाज सर्वथा पावेल ॥ ३२ ॥ तैसीच प्रभावती नारी राणी ॥ ती ऐकतां निर्जीव पडेल रणीं ॥ तूं पार्थसारथी चक्रपाणी ॥ परात्पर ऐसें जाणतों ॥ ३३ ॥ ती मज ह्मणे पार्थ सोडोनी ॥ अन्यत्र नवजावें गमनीं ॥ युद्ध दारुण आचरोनी ॥ पार्थकृष्ण तोषवावे ॥ ३४ ॥ ऐसें ऐकतां तयाचें वचन ॥ देव करूं पाहे निंबलोण ॥ ह्मणे ओंवाळून पंच प्राण ॥ ययावरून टाकावे ॥ ३५ ॥ मागें झाले भक्त शूर अनंत ॥ पुढेंही होतील बहुत ॥ परी सुधन्व्याऐसा पुरुषार्थ[5] ॥ करील ऐसा जन्मेना ॥ ३६ ॥ हरि ह्मणे माझा पुरुषार्थ करूनि तृण ॥ यथार्थ केलें तुवां प्रतिज्ञावचन ॥ धन्य तुझें मातृजठरस्थान[6] ॥ ऐसें वीररत्न प्रसवली ॥ ३७ ॥ बाणभंगदुःखराहुवदनीं ॥ दुःखें प्रवेशला चापपाणी ॥ झाली प्रतापतेजहानी ॥ पडला अंधार सैन्यांत ॥ ३८ ॥ असो सुधन्व्यानें सत्य स्मरोन ॥ सोडिला अर्धचंद्र मार्गण[7] ॥ येतां देखोनियां पार्थबाण ॥ मध्यें छेदोनि पाडिला ॥ ३९ ॥ तो बाण छेदिला जाणोन ॥ हाहाकारें भरलें गगन ॥ सुधन्वा भुजा पिटोन ॥ सिंहनादें गर्जला ॥ १४० ॥

---

१ श्रीकृष्ण. २ बाणाच्या पिसाऱ्याच्या शब्दानें. ३ सप्त महापर्वत. ४ शेष. ५ पराक्रम. ६ आईचें उदर. ७ बाण.

होतां बाणाचें द्वय शकल ॥ नभीं कांपलें रविशशिमंडळ ॥ डोलों लागला भूगोळ ॥ तळीं दडपला सहस्रफणी ॥४१॥ तंव सुधन्वा ह्मणे श्रीहरी ॥ म्यां तों प्रतिज्ञा केली खरी ॥ आतां जें पुढें होईल परी ॥ तें सुखें घडो गोविंदा ॥ ४२ ॥ जेवीं पडतां राहुवदनीं ॥ निस्तेज होय रजनीधनी[1] ॥ तेवीं पार्थमुखेंदु पाहोनी ॥ वैकुंठविहारी[2] चिंतावला ॥ ४३ ॥ सुधन्वा आणि अर्जुन ॥ दोघेही ईश्वराचे नयन ॥ परी एक झाला सत्यवचन ॥ मिथ्यावादी दुजा कां ॥ ४४ ॥ हरि ह्मणे पार्थप्रतिज्ञा न होतां खरी॥ मज कोण ह्मणेल भक्तसाह्यकारी ॥ पार्थ जीवित्वातें न धरी ॥ मीही त्यावांचून न वांचें ॥४५॥ ह्मणोनि अघटितघटनाकर्मचतुरें ॥ रमावदनसुधाचकोरें[3] ॥ बाणोत्तरखंडा सत्वरें ॥ आज्ञा केली वधावया ॥४६॥ त्या बाणखंडें धांव घेतली ॥ जाऊन बैसलें कंठनाळीं ॥ शिर उडविलें आकाशपोकळीं ॥ मुगुटकुंडलांसमवेत ॥४७॥ ऐसी दोघांची केली सत्य प्रतिज्ञा ॥ दोघेही केले जगीं धन्या ॥ दोघेही झाले हरिमान्या ॥ भक्तिबळेंकरूनी ॥ ४८ ॥ तों हाहाकार झाला शत्रुतटीं ॥ परम संतोषला किरीटी[4] ॥ देवीं केली पुष्पवृष्टी ॥ अर्जुनावरी आनंदें ॥ ४९ ॥ मग कृष्णें अर्जुन धरून पोटीं ॥ परमानंदें घातली मिठी ॥ तों तें शिर नामघोषें निकटीं ॥ पातलें कृष्णपदाब्जीं ॥१५०॥ जयाचा पार नेणे विरिंची ॥ काय इच्छा न करी त्याची ॥ वधिला दैत्य नमुची ॥ जो साशंक महेशा ॥ ५१ ॥ जेथें भग्न झाले सुरगजदंत[5] ॥ जेथें इंद्राचें कुलिश[6] कुंठित ॥ जेथें शंकरपाशुपत अद्भुत ॥ दांतरज्या पडोनि पळालें ॥ ५२ ॥ ऐसें हिरण्यकशिपूचें वक्षःस्थळ ॥ तें सूक्ष्म नखें विदारिलें तात्काळ ॥ ह्मणोनि जें करील गोपाळ ॥ तेंचि सुखें ऐकावें ॥ ५३ ॥ शिरें धांव घेतली वैकुंठासी॥ परी तो वैकुंठींचा झाला रहिवासी ॥ ह्मणोनि फिरलें त्वरेंसीं ॥ कृष्णांघ्रिकमळ पावलें ॥ ५४ ॥ आतां सुरथ आणि अर्जुन ॥ दोघे युद्ध करितील दारुण ॥ तेंचि पुढें निरूपण पूर्ण ॥ सुधेहून गोड असे ॥ ५५ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १५६ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते सुधन्ववधो नाम एकोनविंशोध्यायः ॥ १९ ॥ अध्याय ॥ १९ ॥ ओव्या ॥ १५६ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥

---

१ चंद्र. २ श्रीकृष्ण. ३ श्रीकृष्णानें. ४ अर्जुन. ५ ऐरावताचे दांत. ६ वज्र.



अध्याय २०.
हंसध्वज राजा सुधन्व्याचें शिर पाहून रडत आहे.
सुरथ युद्ध करण्यास आज्ञा मागत आहे.
आकाशांत रथ उडविले आहेत.
सुरथ
अर्जुन

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जनमेजय ह्मणे जैमिनी ॥ अनुपम असे तव वाणी ॥ पडतां माझिये श्रवणीं ॥ निजसुखखाणी उघडली ॥ १ ॥ पुढें सुरथ आणि धनुर्धर[1] ॥ कैसे करिते झाले समर[2] ॥ तो वीररस मज सादर ॥ दया करून सांगिजे ॥ २ ॥ मग जैमिनि बोले वचन ॥ धन्य तूं श्रोता विचक्षण ॥ तव प्रश्नें माझें वदन ॥ परम पवित्र पैं झालें ॥ ३ ॥ आतां होऊनि सावधान ॥ ऐकें पूर्वजकथानुसंधान ॥ तुटेल भवभयबंधन ॥ होय निरसन पापाचें ॥ ४ ॥ सुधन्व्याचें उत्तम शिर ॥ कृष्णपदाब्जीं झालें भ्रमर ॥ रामकृष्णादि नामोच्चार ॥ करूनि गुंजे रुणझुणी ॥ ५ ॥ तंव तो भक्तवत्सल रमावर ॥ करकमळयुग्में सादर ॥ उचलोनि सुधन्व्याचें शिर ॥ सन्मुख नेत्रीं पाहातसे ॥ ६ ॥ आधींच आरक्त अधरपल्लव ॥ त्यावरी तांबूलचर्वणाचें वैभव ॥ त्यासहित होतसे भूषणगौरव ॥ नामस्मरणें हरीच्या ॥ ७ ॥ किरीटकुंडलें मंडित ॥ कुरळ कुंतल[3] सुशोभित ॥ केशरतिलक भाळीं रेखित ॥ मध्यें झळकती दंतपंक्ती ॥ ८ ॥ शुकनासिक विशाळनयन ॥ नेणों भ्रूचापीं लाविले बाण ॥ ऐसें भक्तशिर घेऊन ॥ सादर पाहता जाहला ॥ ९ ॥ त्या मुखापासून तेज निघालें ॥ तें कृष्णवदनीं प्रवेशलें ॥ सुधन्व्याचें सत्व आगळें ॥ कृष्णावांचून कोण जाणे ॥ १० ॥ सुधन्व्याचें कबंध अद्भुत ॥ सेनेमाजी असे धांवत ॥ संहार केला बहुत ॥ तेंही पार्थें छेदिलें ॥ ११ ॥ तें शिरकमळ घेऊन हरी ॥ टाकी हंसध्वजाचे रथावरी ॥ मुगुटकुंडलें मंडित नेत्रीं ॥ हंसध्वजें देखिलें ॥ १२ ॥ करीं घेऊन पुत्रमुखांबुज ॥ सन्मुख पाहे मराळध्वज[4] ॥ शोकाश्रुपूर्ण नयनांबुज ॥ करूनि बोले अति दुःखें ॥ १३ ॥ अरे सुधन्व्या वीरनाथा ॥ कां रे मज न बोलसी आतां ॥ मी हंसध्वज तव पिता ॥ कां रुसलासी बाळका ॥ १४ ॥ म्यां परम निर्दय हृदय केलें ॥ तुज तप्त कढयींत टाकिलें ॥ म्यां पुत्रस्नेहातें नोळखिलें ॥ ह्मणोनि काय रुसलासी ॥ १५ ॥ तूं तरी प्रतापें अति प्रचंड ॥ मी तंव तवापराधी उदंड[5] ॥ मूर्खपणें तुज केला दंड ॥ ह्मणोनि मातें न बोलसी ॥ १६ ॥ तुवां आपले भुजबळें ॥ सकळ नृपगण हे जिंकिले ॥ रणीं कृष्णार्जुन संतोषविले ॥ कामिनीकामही पुरविला ॥ १७ ॥ काहीं ठेविला नाहीं हेत ॥ अंतकाळीं देखिला अनंत[6] ॥ मज टाकोनि शोकसागरांत ॥ तूं गेलासी रे पुत्रराया ॥ १८ ॥ सन्मुख धरूनि पुत्रवदन ॥ स्नेहें तयासी देत चुंबन ॥ स्वभाळीं शिरातें ठेवून ॥ लोळे राजा धरणीसी[7] ॥ १९ ॥ पुत्रशोकें संतप्त झाला ॥ मग उठोनि काय बोलिला ॥ ऊठ ऊठ पुत्रा वहिला ॥ धरीं श्यामकर्ण पार्थाचा ॥ २० ॥ पुढें उभा करूनि प्रद्युम्न ॥ सर्व उभे उठाले वीरोत्तम ॥ तयांसीं तूं करीं संग्राम ॥ कां अबोला धरिलासी ॥ २१ ॥ जननीपणातें सिद्धी नेलें ॥ भगिनीवाक्यातें प्रतिपादिलें ॥ रणीं मनोगत पुरविलें ॥ आणि तोषविलें कृष्णार्जुनां ॥ २२ ॥ तव बंधू ऐकती समस्त ॥ तूं कां रे उत्तर नाहीं देत ॥ ह्मणोनि गडबडां लोळत ॥ तों सुरथ बोले पितयातें ॥ २३ ॥ ह्मणे क्षत्रियकुळटिळका ॥ तूं कां करितोसी पुत्रशोका ॥ करीं घेऊनियां पुत्रमुखा ॥

---

१ धनुष्य धारण करणारा ( अर्जुन ). २ युद्ध. ३ केंस. ४ हंसध्वज. ५ मोठा. ६ श्रीकृष्ण. ७ पृथ्वीवर.

नाना करुणा भाकिसी ॥ २४ ॥ पार्थ बलार्णव अतिगहन ॥ त्याचें केलें यानें मंथन ॥ मुक्तिरमा निघाली त्यांतून ॥ तिणें नंदन तुझा वरिला ॥ २५ ॥ वऱ्हाडी मिळालीं दोनी दळें ॥ तियेतें यानें वरिलें ॥ तीसवें सुखशयन केलें ॥ जेथें विस्मरण प्रपंचाचें ॥२६॥ ऐसियाचा करिसी शोक ॥ तुज हांसतील सकळ लोक ॥ जो होऊनि मेला नपुंसक ॥ त्याचा शोक करावा ॥ २७ ॥ जो जन्मोनि झाला कुळांगारक ॥ दुष्टबुद्धी षंढ देख ॥ जयासी कोणी न जाणती लोक ॥ त्याचा शोक करावा ॥ २८ ॥ देखोनि संग्रामप्रचं-डार्क ॥ विवर सेवी होऊन उलूक[1] ॥ जयासी कोणी न जाणती लोक ॥ त्याचा शोक करावा ॥ २९ ॥ जेणें जिंकिला कपिध्वज[2] ॥ रणीं तोषविला गरुडध्वज[3] ॥ उभारिला कीर्तिध्वज ॥ मुक्तिसदन प्रवेशला ॥ ३० ॥ नभीं अमरगणांचिया[4] पंक्ती ॥ जेणें आनंदविल्या वीर्यशक्ती ॥ संग्रामपात्रीं दिव्यकीर्ती ॥ दीपें त्रिजगती ओंवाळिली ॥ ३१ ॥ जेणें जलधिजाकांतजीमूत[5] ॥ पुण्यजळ वर्षला अतो-नात ॥ तो शोषोनि केला तोयरहित ॥ ऐसा बळवंत पुत्र तुझा ॥३२॥ ऐशाचा शोक करणें घडे ॥ तरी मूर्खपण हें जोडे ॥ आता न पाहें पुत्राकडे ॥ आज्ञा द्यावी मजलागीं ॥ ३३ ॥ ऐशी सुरथाची रम्य वाणी ॥ रायें ऐकिली श्रवणीं ॥ मग तयाप्रति बोले वचनीं ॥ तेंचि ऐक जनमेजया ॥ ३४ ॥ शोक करावयाचें कारण ॥ पुत्रा सांगतों मी तुजलागोन ॥ हें शिर पावोन कृष्णांघ्रिनं-लिन[6] ॥ पुनः वियोग पावलें ॥ ३५ ॥ अनंत जन्मींचें सुकृत[7] ॥ जरी निजग्रंथीं असेल अद्भुत ॥ तरी कृष्णपदांबुज हें प्राप्त ॥ ऐसें समस्त बोलती ॥३६॥ जरी ग्रंथीं असेल दुरितयोग[8] ॥ तरीच होतो कृष्णपदीं वियोग ॥ तरी हा पुण्यवंत असतां अव्यंग ॥ वियोग झाला कां मत्पापें ॥ ३७ ॥ मेलियाचा न करीं शोक ॥ जीवंताचें न धरीं सुख ॥ परी हरिवियोगाचें दुःख ॥ मजकारणें झोंबलें ॥ ३८ ॥ कृष्णचरणारविंदमधुकर ॥ होऊनि गुंजत होतें शिर ॥ तरी वियोग कां झाला सत्वर ॥ शोककारण हेंच मनीं ॥ ३९ ॥ ऐसें बोलोनियां उत्तर ॥ करीं घेऊन पुत्रशिर ॥ कृष्णरथावरी टाकिलें सत्वर ॥ हंसध्वजें अति दुःखें ॥४०॥ तें शिर घेऊन श्रीहरी॥ झुगारितां दिव्य अंबरीं[9] ॥ शिवगणीं नेऊन ते अवसरीं ॥ रुंडमाळेसी लाविलें ॥ ४१ ॥ तंव तो महावीर सुरथ ॥ बंधुदुःखें अति तप्त ॥ स्वसैन्यासी आज्ञापित ॥ युद्ध करावया दारुण ॥४२॥ जरी ये समरंगणीं कृष्णार्जुन ॥ संग्राम सोडोनि न करिती पलायन॥ तरी मी दोघांसी करीन निर्वाण ॥ भुजबळपराक्रमेंकरूनी ॥ ४३ ॥ पुनः वीरांसी झाला बोलता ॥ कृष्णोदरीं पडला मम भ्राता ॥ तें उदर फोडोनियां आतां ॥ काढीन बंधू आपला ॥४४॥ आणि पार्थाचें जें सर्व बळ ॥ त्याचा करीन मी तों कवळ ॥ रणीं पाहा माझें बळ ॥ सर्व वीरसैन्येंसीं ॥ ४५ ॥ सुरथ ह्मणे देवाधिदेव बरवा ॥ सारथिया त्यापुढें रथ न्यावा ॥ ऐसें बोलतां तेधवां ॥ रथ लोटिला पवनवेगें ॥ ४६ ॥ हरिसन्मुख येतांचि सत्वर ॥ सुरथ गर्जोनि बोले उत्तर ॥ ह्मणे कृष्णा पुण्यग्रंथी समग्र ॥ वेंचिली कीं



१ घुबड. २ अर्जुन. ३ श्रीकृष्ण. ४ देवसमूहांच्या. ५ लक्ष्मीपति विष्णु हाच कोणी मेघ. ६ कृष्णचरणकमल. ७ पुण्य. ८ पापाचा योग. ९ आकाशांत.

पार्थाकरितां ॥ ४७ ॥ वेंचूनियां पुण्याचा सांठा ॥ सुधन्वा पाठविला वैकुंठा ॥ तुवां तों केल्या बाळचेष्टा ॥ आपली हानी नेणोनि ॥ ४८ ॥ होती ती सरली पुण्यराशी ॥ आतां पार्थ कैसा रक्षिसी ॥ मातें कोण्या उपायें मारिसी ॥ हृषीकेशी तें मज सांगें ॥४९॥ जैसीं कां अज्ञान बाळें ॥ हातींचीं टाकिती मुक्ताफळें[1] ॥ आनंदें घेती बेंदरीफळें[2] ॥ तैसा न्याय तुवां केला ॥ ५० ॥ बंधुजीवित तें बदरीफळ ॥ तव पुण्य तें मुक्ताफळ ॥ देवोनि नागवलासी[3] केवळ ॥ कोण ठकला मज सांगें ॥ ५१ ॥ तूं अससी रे गोंवळें[4] ॥ तुवां सेवावे गोपाळ ॥ तुज शहाणपणाचें बळ ॥ कोठोनियां असावें ॥ ५२ ॥ सुधन्वा गेल्याचें उदर कोठें ॥ तें उदर फोडितों गोमटें ॥ काढीन बंधुरत्न नेटें ॥ झणीं सोडिसी संग्रामा ॥ ५३ ॥ ऐकोनियां सुरथवचन ॥ पार्थासी बोले जनार्दन ॥ यासीं धरूनि समरंगण ॥ सर्वथा उभें न राहावें ॥ ५४ ॥ हा भ्रातृदुःखें अतितप्त ॥ सर्व वीरांचा करील घात ॥ जरी तुज मारील तरी अनर्थ ॥ थोर होईल कीं पार्था ॥ ५५ ॥ जो गृह भक्षावया समर्थ ॥ तयासी कवाड तें कःपदार्थ ॥ जो सिंधुअशनीं[5] तृप्त ॥ तयासी थिल्लरोदकें नातृप्ती ॥ ५६ ॥ तेवीं गृह सिंधु मी रमावर ॥ तूं तों अससी थिल्लर ॥ उभयतांचा करावया संहार ॥ क्षण एक यासी न लागे ॥ ५७ ॥ मग अर्जुन ह्मणे वनमाळी ॥ तुवां सहस्र अनर्थांची केली होळी ॥ तो तूं सुरथासी ये काळीं ॥ काय अनर्थ मानसील ॥ ५८ ॥ नृसिंहमंत्र पडतां कर्णबिळीं ॥ समस्त पळती भूतावळी ॥ तया नृसिंहातें कवळी ॥ ऐसा बळी कोण भूत ॥ ५९ ॥ तंव तो यमुनातीरविहारी[6] ॥ अर्जुनाप्रति बोले वैखरी ॥ सुरथ दुजी सृष्टी करील निर्धारीं[7] ॥ ब्रह्मा चिंता करीत आहे ॥ ६० ॥ तुझें पाहातां स्वल्प बळ ॥ तो तंव बळाचा कल्लोळ ॥ सर्व सैन्याचा करूनि कवळ ॥ शेवटीं ग्रास आमुचा ॥ ६१ ॥ गांठीं होतें कांहीं सुकृत ॥ तें वेंचिलें सुधन्यानिमित्त ॥ आतां केवळ उरलें दुरित ॥ ह्मणोनि मातें भय वाटे ॥ ६२ ॥ हा तों बळोदधि[8] अगाध ॥ पुण्यवंत आणि विशुद्ध ॥ मजवरी याचा अति क्रोध ॥ ह्मणोनियां भय वाटे ॥ ६३ ॥ आतां प्रद्युम्नादि सर्व वीर ॥ यासीं करितील घोर समर ॥ तुवां सोडूनियां रणाजिर[9] ॥ शीघ्र गमन करावें ॥ ६४ ॥ अर्जुना आतां हेंचि करावें ॥ शीघ्र येथूनियां पळावें ॥ प्रद्युम्नादिकां पाठवावें ॥ यासीं युद्ध करावया ॥ ६५ ॥ कृष्णें पाचारोनि निजनंदन ॥ तयाप्रति बोले वचन ॥ तुह्मीं सुरथासीं करावें कंदनें[10] ॥ पार्था घेऊनि मी जातों ॥ ६६ ॥ बरवें ह्मणोनि प्रद्युम्न ॥ युद्धासी धांवला सैन्य घेऊन ॥ रणभूमि सोडोनि कृष्णार्जुन ॥ तीन योजनें ते गेले ॥ ६७ ॥ तंव सुरथ आला हरिखें ॥ परी तेथें कृष्णार्जुन न देखे ॥ मग म्लान होऊन अतिदुःखें ॥ मनामाजी विचारी ॥ ६८ ॥ काय देवाची नवलपरी ॥ पार्थ घेऊनि पलायन करी ॥ या बाळासीं करितां झुंजारी ॥ काय श्लाघ्यता मज जोडे ॥ ६९ ॥ जयाची ऐकतां आरोळी ॥ भयें मरण पावे गजावळी ॥ ती जंबुकें अवलंबिली ॥ तरी काय पुरुषार्थ ॥ ७० ॥ चुळकें प्राशिला सागर ॥

१ मोत्यें. २ बोरें. ३ फसलास. ४ गांवढळ, व्यवहारशून्य. ५ समुद्रप्राशनानें. ६ श्रीकृष्ण. ७ खरोखर. ८ बळाचा समुद्र. ९ युद्धस्थान. १० युद्ध.

ऐसा बलाढ्य कुंभकुमर ॥ तेणें जरी प्राशिलें लघु थिल्लर ॥ तरी पुरुषार्थ काय त्याचा ॥ ७१ ॥ परी पुढें उभा दळभार ॥ यासी दावावें यमनगर ॥ मग पार्थाचा समाचार ॥ घेतां श्लाघ्य आह्मांतें ॥ ७२ ॥ जेवीं न जिंकितां कामादिक वीर ॥ केवीं प्राप्त होईल निजमंदिर ॥ आधीं देखिलिया संग्रामसागर ॥ शेवटीं ब्रह्म पाविजे ॥७३॥ स्वर्ग मृत्यु पाताळ ॥ जरी भेदून पळतील पार्थयदुवीर ॥ तरी न भरतां एक पळ ॥ गवसीन मी तयांसी ॥ ७४ ॥ आधीं परिवार हा निवारीं ॥ तरी जवळी असतां न दिसे हरी ॥ ऐसा निश्चय केला अंतरीं ॥ मग युद्धासन्मुख तो आला ॥ ७५ ॥ तंव वीरांसी ह्मणे नृपनंदन ॥ कोठें गेले रे कृष्णार्जुन ॥ तें सांगा मजलागुन ॥ कां रे पलायन संपादिलें ॥ ७६ ॥ मदन बोले ते अवसरीं ॥ आधीं तूं आह्मांसीं युद्ध करीं ॥ मग पाचारीं श्रीहरी ॥ कां वल्गना करिसी बहू ॥ ७७ ॥ ऐसें बोलोनि उत्तर ॥ प्रद्युम्नादि सकळ वीर ॥ वर्षों लागले शर अपार ॥ रणीं सुरथातें देखोनि ॥ ७८ ॥ सुरथ वीर अति निर्कां ॥ वर्षता झाला सायकां ॥ भेदोनियां वीरनायकां ॥ मूर्च्छित रणीं पाडिलें ॥ ७९ ॥ कित्येक निर्जीव पडिले ॥ कित्येक रणीं विदारिले ॥ कोणी शिरांवेगळे केले ॥ हुंबों लागले कित्येक ॥ ८० ॥ हाहाकार प्रवर्तला ॥ पळ सुटला पांडवदळा ॥ योजनत्रय पळविलें सकळां ॥ माजी फिरे चक्रवत ॥ ८१ ॥ सैन्य पळविलें तेथवरी ॥ जेथें होते पार्थ श्रीहरी ॥ दोघांलागीं बरव्यापरी ॥ देखता झाला स्वनेत्रीं ॥ ८२ ॥ कृष्णार्जुन पाहोन नयनीं ॥ सुरथ संतोषला परम मनीं ॥ आतां घेईन निजधनी ॥ धरीन दोघां जिवंत ॥ ८३ ॥ ह्मणे बंधुजीविल चोरून ॥ तुह्मीं केलें कां पलायन ॥ अभिनव तस्कर हा जनार्दन ॥ पार्थही झाला तत्संगें ॥ ८४ ॥ तरी नृपें वधोनियां तस्कर ॥ बरवें रक्षावें स्वनगर ॥ ऐसें बोलतां नृपकुमर ॥ भयें यदुवीर कांपला ॥ ८५ ॥ मग वर्षों लागला तीक्ष्ण बाण ॥ आच्छादिले तेणें कृष्णार्जुन ॥ गर्जोनि बोलतसे वचन ॥ सावध राहें धनंजयाँ ॥ ८६ ॥ तंव कोपोनि पृथासुतँ ॥ नाराच सोडिले असंख्यात ॥ ससुत महावीर सुरथ ॥ विकळ केला क्षणमात्रें ॥ ८७ ॥ करींचें धनुष्य छेदिलें ॥ तिळप्राय रथाचे तुकडे केले ॥ ध्वजस्तंभातें उडविलें ॥ सारथीअश्वांसमवेत ॥ ८८ ॥ सुरथ कोपोनियां प्रबळ ॥ आरूढला दुजे रथावर ॥ शरजाळ घालोनियां तीव्र ॥ कृष्णार्जुन व्याकुळ केले॥८९॥ हा बंधुदुःखें अतिदुःखित॥ मजसी मारील निश्चित ॥ पळालों मी परि हा सुरथ ॥ मज सर्वथा न सोडी ॥ ९० ॥ कृष्ण ह्मणे पहा पार्था ॥ कैसी वीराची योग्यता ॥ नानास्त्रें सोडोनियां तळवतां ॥ युद्ध करीतसे दारुण ॥ ९१ ॥ पाहा बाणें व्यापिलें त्रिभुवन ॥ हा सर्वथा अनावर पूर्ण ॥ ऐसें ऐकोनि पृथानंदन ॥ अति कोपा पावला ॥ ९२ ॥ पार्थ ह्मणे रे देवाधिदेवा ॥ आतां घेईन मी याच्या जीवा ॥ तव प्रसादें मज केशवा ॥ असाध्य नाहीं त्रिभुवनीं ॥ ९३ ॥ ऐसें बोलोनि श्वेतवाहन ॥ सुरथावरी टाकिले बाण ॥ गगनगर्भी उडवोन ॥ आपटिला धरणीवरी ॥ ९४ ॥ अत्यंत



१ अगस्तिऋषि. २ अंतःकरणामध्यें. ३ बाण. ४ निधडा, प्रचंड. ५ चमत्कारिक. ६ चोर. ७ अर्जुन. ८ खरोखर. ९ अर्जुन.

कोपला तो सुरथ ॥ शरें त्रासिले कृष्णपार्थ ॥ गर्जोनि बोले रथनिःपात ॥ करितों पार्था सांभाळीं ॥ ९५ ॥ सुरथें दिव्य बाण सोडिला ॥ तेणें पार्थरथ गगनास नेला ॥ कृष्णार्जुनांसहित फिरवूं लागला ॥ चक्रापरी नभमंडळीं ॥ ९६ ॥ त्रिभुवनाचा भार घालोनी ॥ दोहीं चरणीं रथातें दडपोनी ॥ पृथ्वीमाजी रोंविला कष्टेंकरूनी ॥ तथापि न राहे क्षणमात्र ॥ ९७ ॥ आश्चर्य करी रमाधव ॥ तंव तो करीतसे बाणवर्षाव ॥ बाणें व्यापिले कृष्णपांडव ॥ कांहीं उपाय न चाले ॥ ९८ ॥ मग पांचजन्य वाजवी जनार्दन ॥ देवदत्त वाजवी अर्जुन ॥ भयेंकरूनि नंदनंदन ॥ अर्जुनासी अनुवादे ॥ ९९ ॥ म्यां बळें धरिला तव रथ ॥ परी सुरथबाणें असे भ्रमत ॥ आतां बाण सोडोनि त्वरित ॥ सुरथ विरथ करावा ॥ १०० ॥ परम क्रोधावला पार्थ ॥ बाण सोडिला अद्भुत ॥ तेणें सुरथाचा रथ ॥ शतखंडें करून टाकिला ॥ १ ॥ सुरथ विरथ केला पांडवें ॥ मग [1]लांगूल वेष्टूनि [2]वातोद्भवें ॥ पार्थरथ अति [3]लाघवें ॥ सुबद्ध केला धरणीसी ॥ २ ॥ पुनः भार घाली कृष्णनाथ ॥ स्थिर झाला तेणें रथ ॥ ऐसें देखोनियां सुरथ ॥ काय वचन [4]अनुवादे ॥ ३ ॥ उभयतां मिळोनियां रथ ॥ कष्टें केला भूमिगत ॥ तरी आतां पहा पुरुषार्थ ॥ पुनः नेतों गगनोदरीं ॥ ४ ॥ मग धांवोनि वीर सुरथ ॥ दोनी हस्तें उपडोनि रथ ॥ हांसोनि कृष्णासी बोलत ॥ कोठें टाकूं सांग पां ॥५॥ टाकूं मेरूवरी कीं सागरीं ॥ किंवा धाडूं हस्तिनापुरीं ॥ ऐसें बोलोनि उत्तरीं ॥ रथ चक्रापरी भोवंडित ॥ ६ ॥ हें देखोनि [5]कपिध्वज ॥ नभीं उडाला सतेज ॥ पंच शर सोडोनि सुतेज ॥ तेणें सुरथ विंधिला ॥७॥ सुरथ होतांचि मूर्च्छित ॥ हातींचा पडला गळोनि रथ ॥ मग सावध होऊनि त्वरित ॥ अन्य रथीं आरूढला ॥ ८ ॥ पार्थवीर आणि सुरथ ॥ युद्धीं मिसळले अद्भुत ॥ अर्धचंद्र [6]नाराच छेदित ॥ शिलीमुखांतें सोडिती ॥ ९ ॥ वराहकर्ण आणि नळिक ॥ क्षुरप्रकंटकमुख [6]सायक ॥ नाना जातींचे शर देख ॥ परस्परें ते मारिती ॥ १० ॥ सुरथ ह्मणे गा पार्था ॥ कांहीं प्रतिज्ञा करीं आतां ॥ तूं सत्यप्रतिज्ञ सर्वथा ॥ असत्य प्रतिज्ञे नातळसी ॥ ११ ॥ तंव बोले सुभद्रारमण ॥ पित्यादेखतां तुज मी मारीन ॥ हेंच माझें प्रतिज्ञावचन ॥ त्वांही पण वदावा ॥ १२ ॥ मग सुरथ बोले उत्तरीं ॥ तुज रथावरून पाडीन धरित्री[7]वँरी ॥ हें प्रतिज्ञावचन न करीं जरी ॥ तरी सुकृत नासो माझें ॥ १३ ॥ ऐसें बोलोनियां सुरथ ॥ शरवृष्टी पार्थावरी करित ॥ पार्थ त्याचे द्विगुण दावित ॥ हस्तलाघव आपुलें ॥ १४ ॥ सक्रोध होऊनि कुंतीसुत ॥ छेदिला सुरथाचा रथ ॥ दुजया रथावरी त्वरित ॥ राजसुत आरूढला ॥ १५ ॥ तोही पार्थें छेदिला त्वरित ॥ तंव अन्य रथीं बैसे सुरथ ॥ तोही छेदिला ऐसे गणित ॥ झाले [8]अष्टोत्तरशत ते ॥ १६ ॥ मग सोडोनि अर्धचंद्राकार बाण ॥ सुरथ पाडिला मूर्च्छित पूर्ण ॥ मग असंख्य सोडोनि [9]मार्गण ॥ सैन्यही सर्व संहारिलें ॥ १७ ॥ सुरथ होऊनि सावधचित्त ॥ अर्धचंद्राकार बाण सोडित ॥ तेणें पार्थचापाचें तोडित ॥ सीत तेव्हां क्षणमात्रें

---

१ शेंपूट. २ मारुतीनें. ३ कुशलतेनें. ४ बोलला. ५ अर्जुन. ६ बाण. ७ पृथ्वीवर. ८ एकशें आठ. ९ बाण.

॥ १८ ॥ पार्थाचे हृदयीं धडकला क्रोधाग्न ॥ सीत लावूनि सोडिला बाण ॥ अर्धचंद्राकार दारुण ॥ तेणें भुज छेदिला सुरथाचा ॥ १९ नाना अळंकारें मंडित ॥ समूळ छेदिला उजवा हस्त ॥ रणांगणीं पडिला निवांत ॥ जेवीं फणी पंचमुखी ॥ २० ॥ मग सुरथ चढला अति क्रोधा ॥ वामहातें घेऊनि गदा ॥ पार्था आणि गोविंदा ॥ गदाघातें ताडिलें ॥ २१ ॥ तैं सहस्र कुंजरें मारिले ॥ सहस्रद्वय हैय भंगिले ॥ दहा सहस्र संहारिले ॥ पैंदाती तेव्हां गदाघातें ॥ २२ ॥ वीरभूषणमणी सुरथ ॥ उभा उभा पार्थासी बोलत ॥ पुनः क्षणमात्रें त्वरित ॥ अयुत पदाती मारिले ॥ २३ ॥ मग पार्थें सोडोनियां शर ॥ सगद छेदिला वामकर ॥ कररहित झाला नृपकुमर ॥ परी पार्थाप्रति अनुवादे ॥ २४ ॥ पार्था रक्षीं रे आपणातें ॥ कृष्णा पाळीं तूं निजमित्रातें ॥ सन्मुख देखोनि मज सुरथातें ॥ कां असावध दोघेही ॥ २५ ॥ दोनी छेदिले असतां हस्त ॥ तरी पार्थावरी धांवे सुरथ ॥ आश्चर्य करी कृष्णनाथ ॥ ह्मणे हा शूर आगळा ॥ २६ ॥ मग पार्थें सोडून दोन बाण ॥ छेदोनि पाडिले दोनी चरण ॥ परि तो रुंडेंचि नृपनंदन ॥ पार्थावरी धांवला ॥ २७ ॥ मग देवदत्त सोडिला बाण ॥ तेणें शिर छेदिलें न लगतां क्षण ॥ मुकुटकुंडलें दीर्घ नयन ॥ तांबूलचर्चित उडालें ॥ २८ ॥ करचरणशिररहित ॥ कबंध पार्थसैन्यातें मारित ॥ वीर पळाले अपरिमित ॥ त्या रुंडभयेंकरूनी ॥ २९ ॥ सत्य करावया प्रतिज्ञोत्तर ॥ आकाशींहून उतरलें शिर ॥ तें पार्थललाटीं लागलें सत्वर ॥ तेणें पार्थ पडला भूतळीं ॥ १३० ॥ पार्थ रथाखालीं पडिला ॥ दीर्घ मूर्च्छेनें व्यापिला ॥ मग शिर उडोनि ते वेळां ॥ हरिपदकमळा लागलें ॥ ३१ ॥ मरण पावलियानंतर ॥ सत्य केलें प्रतिज्ञोत्तर ॥ हें देखोनि रमावर ॥ प्रेमाश्रुबिंदू टाकित ॥ ३२ ॥ मग सावध होऊनि अर्जुन ॥ त्या कबंधाचीं शतखंडें करून ॥ रथारूढ होतां जाण ॥ कृष्ण बोले पार्थातें ॥ ३३ ॥ ह्मणे तुजनिमित्त दोन्हीं रत्नें ॥ कैसीं गेलीं पहा प्राणें ॥ तुज सर्वथा न यावें उणें ॥ ह्मणोनि यांतें उपेक्षिलें ॥ ३४ ॥ यावरी हंसध्वज आणि अर्जुन ॥ दोघे युद्ध करितील दारुण ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अति रसाळ परिसावें ॥ ३५ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ कृष्णलीलामृत अगाध ॥ ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १३६ ॥ इति श्रीमन्महाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते सुरथवधोनाम विंशोध्यायः ॥ २० ॥ अध्याय ॥ २० ॥ ओव्या ॥ १३६ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

---

१ सर्प. २ हत्ती. ३ घोडे. ४ पायदळ. ५ दहा हजार. ६ विशेष, भारी.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जनमेजय ह्मणे जैमिनी ॥ धन्य धन्य तुझी वाणी ॥ पदोपदीं निजसुखखाणी ॥ ऐकतां श्रवणीं भावार्थें ॥ १ ॥ पार्थहंसध्वजांचें युद्ध ॥ पुढें कैसें झालें प्रसिद्ध ॥ तें मजकारणें बोध ॥ करोनियां सांगावें ॥ २ ॥ जैमिनि ह्मणे गा भारता ॥ ऐकें पूर्वजांची कथा ॥ भावार्थें श्रवण करितां ॥ भवरोगव्यथा निवारी ॥ ३ ॥ सुरथाचें शिर रमावर ॥ करीं धरूनियां सादर ॥ तों दिव्य ज्योती तेजाकार ॥ कृष्णमुखीं प्रवेशली ॥ ४ ॥ मग ह्मणे ऐकें चापपाणी ॥ पहा सुरथ वीरचूडामणी ॥ सत्योत्तरी जितेंद्रिय निर्धारीं ॥ सर्वभावें पुण्यात्मा ॥ ५ ॥ जेणें पावोनियां मरण ॥ सत्य केलें प्रतिज्ञावचन ॥ ऐसा वीर त्रिभुवन ॥ शोधितां दृष्टी पडेना ॥ ६ ॥ ऐकतां बोले पार्थवीर ॥ वज्रप्राय याचें शिर ॥ मज ललाटीं लागतां प्रहार ॥ रथाखालीं पडियेलों ॥ ७ ॥ माझे हातीं द्यावें शिरनलिन ॥ मी त्यासी करितों वंदन ॥ तेणें होईल देह पावन ॥ स्पर्शतां येईल शूरत्व ॥ ८ ॥ ऐसें बोलतां धनुर्धारी ॥ शिर दिधलें तयाचे करीं ॥ तेणें धरिलें हृदयांतरीं ॥ परम प्रीतींकरोनी ॥ ९ ॥ मग देवें तये क्षण ॥ केलें गरुडाचें चिंतन ॥ येरू आला धांवोन ॥ पुढें उभा सर्पारी ॥ १० ॥ तयासी बोले नंदकुमर ॥ प्रयागीं टाकीं हें नेऊनि शिर ॥ कुरळकेशीं सुंदर ॥ मुगुटकुंडलांसहित ॥ ११ ॥ मग विस्मितवदनें खगपती ॥ काय बोले कृष्णाप्रती ॥ प्रयागीं काय आहे ख्याती ॥ पदतीर्थ सोडोनि ॥ १२ ॥ सर्व तीर्थीं करितां जी स्नान ॥ तेणें निर्मळ होतसे मन ॥ मग पावावें हरिपदनलिन ॥ याहून अधिक काय असे ॥ १३ ॥ वेदशास्त्रींचें असे वचन ॥ कीं हरीपरतें नसे आन ॥ हें सोडोनियां प्रयागगमन ॥ करवितां आश्चर्य मज वाटे ॥ १४ ॥ तथापि स्वामिआज्ञा प्रमाण ॥ शिर करीं द्यावें कृपा करून ॥ मज हांसतील सकळ जन ॥ हें शिर नेतां प्रयागीं ॥ १५ ॥ गंगोदरीं पडती जयाच्या अस्थी ॥ तोचि करितो स्वर्गवसती ॥ हरिपदप्रयागीं धरितां वसती ॥ जन्ममृत्यु त्या कैंचा ॥ १६ ॥ तंव देव बोले गरुडासी ॥ सर्वस्वें पावन होय प्रयागासी ॥ ह्मणोनि पाठवितों मी यासी ॥ भांडारगृहीं ठेवावया ॥ १७ ॥ बरें ह्मणोनि घेतलें करीं ॥ हरिस्मरणें उडाला अंबरीं ॥ तों भवानीसहित त्रिपुरारी ॥ गगनमंडळीं तो होता ॥ १८ ॥ वृषभारूढ गणांसहित ॥ चराचरगुरु शिव समर्थ ॥ सृष्टि स्थिति संहार करीत ॥ सत्तामात्रें निजलीलें ॥ १९ ॥ भस्मोद्धूलित सर्व शरीर ॥ सर्पभूषण कर्पूरगौर ॥ पिनाकपाणी चंद्रशेखर ॥ सर्वेश्वर तो मदनारी ॥ २० ॥ ऐसा भक्तवत्सल तो त्रिपुरारी ॥ नेतां शिर देखिलें गरुडाकरीं ॥ मग शृंगीस आज्ञापी झडकरी ॥ भक्तशिर आणीं ह्मणोनि ॥ २१ ॥ महादेव ह्मणे शृंगी ॥ येथोनि धांव धांव गा वेगीं ॥ गरुड शिर टाकितो प्रयागीं ॥ माधव आज्ञे-करूनियां ॥ २२ ॥ ऐसें ऐकतां शिववचन ॥ शृंगी गेला धांवोन ॥ तें पार्वतीनें देखोन ॥ शिवाप्रति अनुवादे ॥ २३ ॥ कर्पूरगौरा त्रिपुरारी ॥ गरुड काय नेतो करीं ॥ तुह्मीं कां निजगण धाडिला लौकरी ॥ काय आश्चर्य मज सांगा ॥ २४ ॥ मदनांतक ह्मणे वो

१ अर्जुना. २ शिरकमळ. ३ सर्पांचा शत्रु=गरुड. ४ कृष्ण. ५ आकाशांत. ६ उत्पत्ति. ७ पालन. ८ शंकर.

सुंदरी ॥ पार्थें सुरथ वधिला समरीं ॥ त्याचें शिर गरुड नेतो लौकरी ॥ कृष्णआज्ञेनें प्रयागीं ॥ २५ ॥ तें शिर आणावयालागीं ॥ वेगें पाठविला शृंगी ॥ जों पडिलें नाहीं प्रयागीं ॥ तोंवरी वेगें आणावें ॥ २६ ॥ याचा सुधन्वा सहोदर ॥ त्याचेंही काल म्यां आणिलें शिर ॥ तें रुंडमाळेंत ओंविलें सुंदर ॥ परम भक्त ह्मणोनियां ॥ २७ ॥ जयाचे मुखीं नामस्मरण ॥ आणि सदा निर्मत्सर अंतःकरण ॥ हरिकथामृत नित्य श्रवण ॥ सत्यवादी जितेंद्रिय ॥ २८ ॥ धर्मिष्ठ वैदान्य[1] सत्यवचन ॥ सन्मुख रणीं पावला मरण ॥ विभूतिजळें करी मार्जन ॥ त्याचें रुंड मज प्रिय ॥ २९ ॥ ह्मणोनि हिमगिरिबाळे[2] ॥ मेरु[3] करावया रुंडमाळे ॥ शिर आणविलें वेल्हाळे ॥ परम आवडींकरूनी ॥ ३० ॥ ऐसें शिवें पार्वतीस कथिलें ॥ तंव येरीकडे कैसें वर्तलें ॥ तों शृंगीनें गरुडासी विनविलें ॥ परी तो शिर देईना ॥ ३१ ॥ कोपोनि शृंगी बोले वचन ॥ तो मी नव्हें पैवनाशन[4] ॥ सदाशिवाचा बलाढ्य गण ॥ करीन निर्वाण क्षणमात्रें ॥ ३२ ॥ मी तों करूनि बलात्कार ॥ हिरोन घेईन भक्तशिर ॥ ऐसें बोलोन उत्तर ॥ बळें झगटला आंगाशीं[5] ॥ ३३ ॥ विनतासुतें पक्षवातें ॥ बळें झडपिलें शृंगीतें ॥ उडविला आकाशपंथें ॥ शुष्कपर्णाचियापरी ॥ ३४ ॥ पक्षवातें भ्रमत ॥ शृंगी श्रम पावला बहुत ॥ जेथें होता उमाकांत ॥ तेथें येवोनि पडियेला ॥ ३५ ॥ तें देखोनि भवानी ॥ सस्मित बोले विनोदवाणी ॥ धन्य स्वामी तुमचे सदनीं ॥ ऐसा भृत्य अति शूर ॥ ३६ ॥ तुह्मीं तों जाणतां हरिवाहन ॥ त्यावरी कां धाडिला मृतप्राण ॥ केवळ दिसतो दीनवदन ॥ स्वामी सेवक तैसेची ॥ ३७ ॥ त्या गरुडाचे पक्षवातें ॥ हे दशा झाली शृंगीतें ॥ ऐसे भृत्य असतां स्वामीतें ॥ असाध्य त्रिभुवनीं काय असे ॥ ३८ ॥ तुह्मांसी काय ह्मणावें ॥ गरुडावरी अशासी धाडावें ॥ तुमचें वैभव जरी बोलावें ॥ तरी तें अवाच्य न बोलवे ॥ ३९ ॥ अतिवृद्ध वृषभ असे घरीं ॥ सागरगामिनी प्रिया दुसरी ॥ वस्त्रें गजचर्माचीं बरीं ॥ शस्त्र करीं खट्वांग ॥ ४० ॥ सर्पाचें सर्व भूषण ॥ आंगासी भस्मलेपन ॥ सेवक ह्मणों तरी हे दीनवदन ॥ पात्रें तरी नृकपाळें ॥ ४१ ॥ ऐसी जया घरीं समृद्धी ॥ त्यासी तैसीच असे बुद्धी ॥ ऐसें प्रियावचन ऐकोन सुखनिधी ॥ काय नंदीतें बोलत ॥ ४२ ॥ शिव ह्मणे तूं नंदिकेश्वरा ॥ जिंकावें विनताकुमरा ॥ येईं घेऊन भक्तशिरा ॥ उपहास सुंदरी करीतसे ॥ ४३ ॥ शिवदूताचें महिमान ॥ ईस कळलें पाहिजे पूर्ण ॥ केवळ निष्कामिक जाण ॥ ह्मणोनि हेळना ही करी ॥ ४४ ॥ शिवाज्ञेनें वृषभपती[6] ॥ नभीं चालिला पवनगती ॥ तों पुढें देखिला खगपती[7] ॥ शिर घेवोनि जातसे ॥ ४५ ॥ नंदीश्वरनासिकवात ॥ तेणें ओढिला विनतासुत ॥ नाकामाजी गतागत ॥ करी जैसा संसारी ॥ ४६ ॥ जेवीं विसरोनि आपआपण ॥ पावे गर्भागारीं गमन ॥ तेवीं पावे विनतानंदन ॥ गमनागमन वृषभनाकीं ॥ ४७ ॥ नंदिनासिकींचा वात ॥ गरुडा दावी आकाशपंथ ॥ चक्राचे परी भ्रमत ॥ लागला तो न सुटेची ॥ ४८ ॥ अति बलिष्ठ विनतातनय ॥ परी कांहीं

१ दाता. २ हिमालयपर्वताचे कन्ये, हे पार्वति! ३ माळेचा वरील मणि. ४ सर्प. ५ गरुडानें. ६ नंदी. ७ गरुड.

न चालेचि उपाय ॥ बाहेर निघे आंत जाय ॥ शिणला करितां येरझारा ॥ ४९ ॥ गजाननीं जेवीं तीळ ॥ तेवीं नासिकीं विनता-बाळ ॥ मग भ्रमों लागला भूगोळ ॥ सप्तद्वीपें गिरिसरिता ॥ ५० ॥ सत्यलोक वैकुंठलोक ॥ कैलासादि सकळिक ॥ फिरों लागला खगनायक ॥ नंदीनासिकपवनानें ॥ ५१ ॥ फिरतां फिरतां विहंग ॥ दैवयोगें पावला प्रयाग ॥ तेथें शिर टाकोनि सवेग ॥ गरुड पळाला तेथूनी ॥ ५२ ॥ जंव तें पडावें प्रयागीं ॥ तंव नंदीनें उचलिलें श्वासवेगीं ॥ आणोनि दिधलें शिवालागीं ॥ तया गौरीदे-खतां ॥ ५३ ॥ मग तो सुधाकरकलावतंस ॥ भक्तजनमानसराजहंस ॥ तें सुरथशिर रुंडमाळेस ॥ मेरू करूनि घातलें ॥ ५४ ॥ बंधु-द्वयशिरें सोज्वळें ॥ कंठीं घातलीं रुंडमाळे ॥ तेव्हां अमृतकलांकित भाळें ॥ परम शोभें शोभला ॥ ५५ ॥ हिमगिरिनंदिनीचा हेतु ॥ पुरवोनियां वृषकेतु ॥ आतां पार्थबलार्णवसेतु ॥ कोण भेदील तें पाहूं ॥ ५६ ॥ सकळखगकुलमंडन ॥ तेणें देखिला यदुनंदन ॥ चर-णाब्जीं करूनि वंदन ॥ सर्व कथन निवेदी ॥ ५७ ॥ पुत्र निमाला देखूनि हंसध्वज ॥ नेत्रींहूनि टाकी क्रोधाग्निपुंज ॥ युद्धास पाचारी कपिध्वज ॥ गरुडध्वजासमवेत ॥ ५८ ॥ सक्रोध देखोनि धरारमण ॥ भूगोळ करूं लागला भ्रमण ॥ तळीं भियाला सहस्रवदन ॥ कंपायमान सर्वांगीं ॥ ५९ ॥ कैसा कोपला नृपोत्तम ॥ नेणों ब्रह्मांड करील भस्म ॥ तें देखोनि पुरुषोत्तम ॥ काय लाघव आदरी ॥ ६० ॥ परम कौतुकी वनमाळी ॥ रथाखालीं उडी घातली ॥ भुजा पसरोनि ते वेळीं ॥ भेटों धांवला नृपातें ॥ ६१ ॥ भूमिस्थ देखतां यदुनंदन ॥ उडी टाकी हंसकेतन ॥ देव ह्मणे देईं आलिंगन ॥ पुत्रशोकें श्रमलासी ॥ ६२ ॥ मग धांवोनियां जगजेठी ॥ राव कवळून धरिला पोटीं ॥ शोक लावोनि बारा वाटीं ॥ सुखसंतुष्टी तो केला ॥ ६३ ॥ तयासी ह्मणे रमानायक ॥ देईं सोडून पुत्रशोक ॥ क्षात्रधर्में जिंकिले सर्व लोक ॥ शिवासी भूषण ते झाले ॥ ६४ ॥ सप्रेम होऊनि नृपभूषण ॥ हरिप्रति बोले वचन ॥ करितां तव चरणस्मरण ॥ शोका ठिकाण नसेचि ॥ ६५ ॥ म्यां साक्षात देखिले चरण ॥ भाग्यें पावलों आलिंगन ॥ आतां कां पावेन शोकस्थान ॥ जन्ममरणा अंतरलों ॥ ६६ ॥ तंव देव ह्मणे चक्रवर्ती ॥ त्रैलोक्यामाजी एक पुरुषार्थी ॥ तो पार्थ बैसलासे रथीं ॥ त्याची भेटी तुवां घ्यावी ॥ ६७ ॥ मग अर्जुनातें पाचारून ॥ दोघेही करीं धरून ॥ करविलें क्षेमालिंगन ॥ केलें समाधान तयाचें ॥ ६८ ॥ नृप ह्मणे देवाधिदेवा ॥ मी धन्य झालों कीं रमाधवा ॥ आतां कळिकाळाची पर्वा ॥ तव प्रसादें न करींच ॥ ६९ ॥ तुज-सारिखा स्वामी जोडला ॥ जन्ममृत्यूंचा ठाव पुशिला ॥ अर्जुनासारिखा बंधु भला ॥ प्राणसखा स्वामीचा ॥ ७० ॥ नृपासी बोले यदुनंदन ॥ पांडव माझे पंचप्राण ॥ म्यां धर्मकार्जी योजिला प्राण ॥ सहकुटुंब यादवेंशीं ॥ ७१ ॥ तुवां सोडावा श्यामकर्ण ॥ आणि तयाचें करावें पाळण ॥ पार्थाचें करावें रक्षण ॥ हें प्राणधन जाण माझें ॥ ७२ ॥ मग बोले हंसकेतन ॥ स्वामिआज्ञा मज प्रमाण ॥

१ हत्तीचे तोंडांत. २ चंद्रशेखर ( महादेव ). ३ पार्वतीचा. ४ गरुड. ५ श्रीकृष्ण. ६ कृष्णासहित. ७ राजा हंसध्वज. ८ शेष. ९ कौशल्य.

आणून दिधला श्यामकर्ण ॥ ह्मणे रक्षण करीन मी ॥ ७३ ॥ मग सकळ सैन्यासमवेत ॥ पांच दिवस कृष्ण राहिला तेथ ॥ वस्त्रालंकार भोजनें देत ॥ सकळांलागीं गौरवुनी ॥ ७४ ॥ मग कृष्ण ह्मणे रायासी ॥ आतां निघावें प्रयाणासी ॥ मी जातों हस्तनापुरासी ॥ धर्मरायातें भेटावया ॥ ७५ ॥ मग देव गेला हस्तनापुरा ॥ भेटावया कुंतीकुमरा ॥ सांगितलें सर्व समाचारा ॥ धर्मरायातें तेधवां ॥ ७६ ॥ मग पुढें ठेविला श्यामकर्ण ॥ तो करूं लागला भ्रमण ॥ हंसध्वजेंसीं अर्जुन ॥ मागें जात तयाचे ॥ ७७ ॥ तों पुढें देखिलें सरोवर ॥ अति विशाळ दुजा सागर ॥ तेथें गेला तो हयवर ॥ प्राशन नीर करावया ॥ ७८ ॥ जलपान करितेक्षणीं ॥ अश्वाची झाली अश्विनी[1] ॥ तें देखोनियां नयनीं ॥ आश्चर्य वाटलें सैनिकां ॥ ७९ ॥ ह्मणती हें झालें विपरीत ॥ कां दैव कोपलें निश्चित ॥ धर्मकार्याचा परम घात ॥ मांडला ऐसें वाटतें ॥ ८० ॥ सर्व आश्चर्य करिती वीर ॥ तों पुढें देखिलें दुजें सरोवर ॥ तुरंगी प्राशितां तेथील नीर ॥ व्याघ्र झाली तेधवां ॥ ८१ ॥ वडवा झाली व्याघ्र घोर ॥ हें देखोनि भियाले सर्व वीर ॥ ह्मणती विघ्न उदेलें थोर ॥ या दुष्ट वनामाझारी ॥ ८२॥ अश्वाची झाली अश्विनी ॥ त्याचें भय नसे कीं मनीं ॥ परी व्याघ्राचे भयेंकरूनी ॥ होईल हानि जीविताची ॥ ८३ ॥ पार्थ ह्मणे कैसें करावें ॥ धर्मासन्मुख केवीं जावें ॥ यागकर्म संपादावें ॥ कवण्यापरी यावरी पहा ॥ ८४ ॥ ऐसें ऐकोनि मुनिवचन ॥ जनमेजय करीतसे प्रश्न ॥ ह्मणे अश्व करितां जळपान ॥ अश्विनी केवीं जाहली ॥ ८५ ॥ येथें काय असे जी कारण ॥ कोणें दिधला शाप दारुण ॥ परमाश्चर्य वाटे मजलागून ॥ याचें उत्तर मज द्यावें ॥ ८६ ॥ मग अन्य देखोनि सरोवर ॥ तेथें वडवा प्राशितां नीर ॥ घोडीचा झाला व्याघ्र ॥ हेंही आश्चर्य मज वाटे ॥ ८७ ॥ पुनः कैसा झाला श्यामकर्ण ॥ हें सर्व सांगा जी कथन ॥ ऐकोनि मुनि ह्मणे सावधान ॥ पूर्वकथन ऐकावें ॥ ८८ ॥ जी चैतन्यलतिकामूळकंद[2] ॥ जी शिवचरणारविंदमिलिंद[3] ॥ ती गौरी होऊनि स्वानंद ॥ या वनांत तप मांडिलें ॥ ८९ ॥ या सरोवराचे तीरीं ॥ घोर तप करीत गौरी ॥ प्रसन्न व्हावा त्रिपुरारी ॥ सदासर्वदा ह्मणोनी ॥ ९० ॥ गौरी करीत शिवप्रार्थना ॥ मी येथें करीतसें अनुष्ठाना ॥ निर्विघ्न करीं रे त्रिनयना ॥ संकल्प करून बैसली ॥ ९१ ॥ ऐसें तप करितां पार्वती ॥ तंव कोणी एक आला दैत्यपती ॥ तो दुष्ट दुराचार दुर्मती ॥ तपासी विघ्न मांडिलें ॥ ९२ ॥ देवीप्रति[4] बोले दैत्याधिप ॥ तूं किमर्थ करितेसी गे तप ॥ दिव्य लावण्यरूप ॥ कां देहासी कष्टविसी ॥ ९३ ॥ कोटी मदनरूपांचा दीप ॥ करूनि ओवाळावें हें रूप ॥ ऐशियातें तपाग्निसंताप ॥ कां हो देशी मृगाक्षी[6] ॥ ९४ ॥ सांडोनियां तपारंभ ॥ पाहें मी कोटिमदनरूपारंभ ॥ झालिया तव वल्लभ ॥ कांहीं दुर्लभ असेना ॥ ९५ ॥ मान्य होशील त्रिभुवनीं ॥ जरी होशील माझी राणी ॥ सर्व सुखाचिये खाणी ॥ त्याची स्वामिणी तूं होसी ॥ ९६ ॥ ब्रह्मांडमनुष्यांतील जें रत्न ॥ तें तुज प्राप्त होईल अयत्न ॥



१ घोडी. २ ब्रह्मरूप वेलीची मूळभूत. ३ शिवाच्या चरणकमलीं भ्रमरवत् तत्पर असणारी. ४ पार्वती. ५ शंकर. ६ हरिणाक्षि.

सेवा करितील आमुचे सपत्न ॥ ऐसें ऐश्वर्य तूं पावशी ॥ ९७ ॥ ऐकोनि ऐसी दुष्ट वाणी ॥ परम कोपयुक्त भवानी ॥ शापिती झाली तयालागोनी ॥ भस्म होईं रे पापिष्ठा ॥ ९८ ॥ ऐसा दैत्य शापिला ॥ तत्क्षणीं तो भस्म झाला ॥ पुनः अचळाधीशबाळा[1] ॥ शाप सरोवरा देतसे ॥ ९९ ॥ आजिपासोनि सरोवरीं ॥ जो कोणी पुरुष स्पर्श करी ॥ तो स्त्री होईल निर्धारीं ॥ येथें संशय असेना ॥ १०० ॥ ऐसा गौरीशाप दारुण ॥ हें नामें जाण उमावन ॥ येथें जो करील प्रवेशन ॥ तो स्त्री होऊन राहील ॥ १ ॥ ह्मणोनि तें स्पर्शितांचि पाणी ॥ अश्वाची झाली अश्विनी ॥ हें प्रश्नोत्तर तुजलागोनी ॥ म्यां सांगीतलें नरेंद्रा ॥ २ ॥ आतां अश्विनीचा झाला व्याघ्र ॥ या प्रश्नाचें ऐक उत्तर ॥ कृतयुगीं एक मुनिवर ॥ अति धार्मिक तो होता ॥ ३ ॥ मनीं स्मरोनि नारायण ॥ सदैव करी तीर्थाटन ॥ फिरत फिरत मुनिभूषण ॥ या सरोवरासी पैं आला ॥ ४ ॥ मुखें करी हरिस्मरण ॥ जळीं प्रवेशोनि करी स्नान ॥ वेदोक्त मंत्रविधान ॥ करोनि बाहेर चालिला ॥ ५ ॥ तों जळीं होता नक्र[2] दारुण ॥ त्याणें धरिला विप्रचरण ॥ दंतें करी पदखंडन ॥ आंत ओढून नेतसे ॥ ६ ॥ भयभीत झाला ब्राह्मण ॥ मुखें करी हरिस्मरण ॥ ह्मणे दैत्य दानव किंवा मीन ॥ माझ्या चरणातें ओढितो ॥ ७ ॥ माझें कां जी भ्रष्टलें ज्ञान ॥ येथें म्यां कां करावें स्नान ॥ ह्मणोनि सक्रोध झाला ब्राह्मण ॥ सोडविला चरण निजबळें ॥८॥ मग तें जळ आणि जळदेवता ॥ तयांसी विप्र झाला बोलता ॥ येथें जो जळपान करील तत्वतां ॥ तो व्याघ्र होईल निर्धारें ॥ ९ ॥ ऐसा शाप देवोनि ब्राह्मण ॥ तेथोनियां केलें गमन ॥ तेथोनि हें सरोवर[3]जीवन ॥ स्पर्शतां व्याघ्रत्व होतसे ॥ ११० ॥ ह्मणोनि [4]वडवा तें नीर ॥ प्राशन करितां झाली व्याघ्र ॥ हें द्वितीय प्रश्नोत्तर ॥ तुजलागीं म्यां सांगितलें ॥ ११ ॥ आतां पुनः कैसा झाला श्याम-कर्ण ॥ तें ऐक राया वचन ॥ वडवा व्याघ्र होतां अर्जुन ॥ चिंतातुर जाहला ॥ १२ ॥ मग विष्णुस्तवन आरंभिलें ॥ ह्मणे देवा धांव गा वहिलें ॥ दुर्योधनभयापासून रक्षिलें ॥ आतां कां उपेक्षिलें मजलागीं ॥ १३ ॥ भक्तकैवारी ह्मणविसी ॥ आमुचीं सर्व संकटें वारिसी ॥ हें विघ्न झालें धर्मकार्यासी ॥ कां तूं न पावसी देवराया ॥ १४ ॥ ऐसी स्तुति ऐकतां नारायण ॥ जो अघटित घडवी विचक्षण ॥ व्याघ्राचा केला [5]श्यामकर्ण ॥ असाध्य कांहीं नसे त्यासी ॥ १५ ॥ अवचट लागतां ज्याचा चरण ॥ [6]वधू झाली शिळा अचेतन ॥ व्याघ्र तो सहज चेतन ॥ तो अश्व होतां नवल काय ॥ १६ ॥ प्रसन्न झाला श्रीपती ॥ तों पुढें श्यामकर्ण देखती ॥ परमानंद झाला चित्तीं ॥ वाद्यें वाजविती आनंदें ॥ १७ ॥ पुढें चालिला श्यामकर्ण ॥ मागें चालिलें सकळ सैन्य ॥ फिरत फिरत अश्वरत्न ॥ स्त्रीराज्याप्रति आलें ॥ १८ ॥ तें स्त्रीराज्य अति गहन ॥ जेथें पुरुषाचें नाहीं दर्शन ॥ रूपयौवनगुणसंपन्न ॥ प्रमदाजन[7] अवघेची ॥१९॥ ज्यांचे रूपलावण्यें मोहिले ॥ जे तत्संगतीनें भुलले ॥ ते सर्वही निमोनि गेले ॥ पुनरपि न आले स्वस्थाना ॥१२०॥

---

१ पर्वतकन्या ( पार्वती ). २ सुसर. ३ सरोवरांतील पाणी. ४ घोडी. ५ घोडा. ६ स्त्री ( अहल्या ). ७ स्त्रीसमुदाय.

नृत्य गीत हास्य विनोद मृदु वचन ॥ इत्यादिकांसी जे भुलले जन ॥ ते त्यांसी मात्र भोगून ॥ पावती मरण मासांतीं ॥ २१ ॥ नाना हावभाव दाविती ॥ नाना चेष्टा कुचेष्टा करिती ॥ पुरुषमात्र रंजविती ॥ भोगूनि करिती मृतप्राय ॥ २२ ॥ असो ऐसा भोग करितां निरंतरीं ॥ जरी पुरुषगर्भ संभवे उदरीं ॥ तो नाश पावे निर्धारीं ॥ कन्यागर्भ वांचतो ॥ २३ ॥ ऐसिया स्त्रीराज्यालागून ॥ तो गेलासे श्यामकर्ण ॥ तें देखोनियां अर्जुन ॥ काय रायातें बोलिला ॥ २४ ॥ हें तों अवघें स्त्रीमंडळ ॥ मूर्तिमंत विश्वलयाचें स्थळ ॥ जरी अश्व धरून नेतील ॥ तरी कार्य समूळीं नासलें ॥ २५ ॥ जें अविद्येचें[१] मूळपीठ ॥ ज्यांचे दर्शनें होय धैर्यगिरि कूट ॥ फुटती नियमसरोवरपाट ॥ भरिती घोट वीर्याचा ॥ २६ ॥ ऐसें बोलत असतां पार्थ ॥ तों पावलें स्त्रीसैन्य अमित ॥ केवळ लावण्य अपरिमित ॥ निजसदन मदनाचें ॥ २७ ॥ कनकचंपकसमानवर्ण ॥ बिंबोष्ठ आकर्णनयन ॥ शरत्पूर्णचंद्रानन ॥ वस्त्रालंकारीं मंडित ॥ २८ ॥ त्यांचें करावें जरी वर्णन ॥ तरी त्या सांग करिती मदन ॥ नेत्रकटाक्षें त्रिभुवन ॥ जिंकिती ऐशा बलाढ्य ॥२९॥ त्यांमाजी एक धांवली बाळा[२] ॥ तिनें अश्व तो धरिला ॥ राणीस नेऊन दाखविला ॥ तिनें पाहिला तो सावध ॥ १३० ॥ लैलाटीं[३] पत्र होतें बांधिलें ॥ तें सोडोनियां वाचिलें ॥ लिखित वर्तमान विदित झालें ॥ चित्ता आलें समाधान ॥ ३१ ॥ मग अश्वशाळे नेऊन ॥ तिनें बांधिला श्यामकर्ण ॥ ह्मणती बलाढ्य श्वेतवाहन ॥ कैसा सोडवील तें पाहूं ॥ ३२ ॥ आतां स्त्रीमंडळापासोन ॥ कैसा सोडवितील श्यामकर्ण ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ सावधान परिसावें ॥ ३३ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ कृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १३४ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते हंसध्वजकृष्णार्जुनसख्याश्वस्त्रीराज्यगमनं नाम एकविंशोऽध्यायः ॥ २१ ॥ अध्याय ॥ २१ ॥ ॥ ओव्या ॥ १३४ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥

१ अज्ञानाचें. २ स्त्री. ३ मस्तकावर.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे नृपचूडामणी ॥ ऐक भारतकुलारविंदतरणी ॥ सावध होऊनियां श्रवणीं ॥ ऐकें कथानुसंधान ॥ १ ॥ स्त्रीमंडळीनें धरितां हय ॥ चिंतातुर झाला धनंजय ॥ ह्मणे येथें उपाय करावा काय ॥ परम संकट हें धडलें ॥ २ ॥ स्त्रीयांसीं तों युद्ध करूं नये ॥ युद्धावांचोनि अश्व नये ॥ येथें उपाय करावा काये ॥ पुसे सकळ वीरांसी ॥ ३ ॥ तंव त्या चंद्रवदना हंसगमना ॥ फुल्लारविंददलनयना ॥ नवयौवना मदविकलवचना ॥ कोकिळास्वरांकितवक्त्रा ॥ ४ ॥ भ्रूचाप आकर्ण ओढोनी ॥ नेत्रकटाक्ष शर लावूनी ॥ वायुवेगें अश्वारूढ होऊनी ॥ चालिल्या त्या लक्षसंख्या ॥५॥ मत्तगजकुंभपयोधरा॥ कनकचंपककुसुमनगौरा॥ आरूढ होऊनि मत्तकुंजरा ॥ चालिल्या सुंदरी एकलक्ष ॥ ६ ॥ नयनबाणें जिंकिती सर्व जग ॥ दर्शनें धैर्यार्णवाचा भंग ॥ रथारूढ त्या स्वरांग ॥ एक लक्ष निघाल्या ॥ ७ ॥ ऐशा लक्षांच्या लक्ष कामिनी ॥ असंख्य पदाती नितंबिनी ॥ जिच्या दर्शनमात्रें धैर्यहानी ॥ ती प्रेमळा राणी चालिली ॥ ८ ॥ हावभाव कटाक्षबाणेंसीं ॥ शस्त्रास्त्रें अभेद्य कवचेंसीं ॥ प्रेमळा चालिली युद्धासी ॥ तों पुढें पार्थासी देखिलें ॥ ९ ॥ पार्थास ह्मणे प्रेमळा राणी ॥ तुह्मीच काय गांडीवपाणी ॥ महाभारतीं समरंगणीं ॥ भीष्मद्रोणादि जिंकिले ॥ १० ॥ म्यां तुझा धरिला तुरंग ॥ तो पराक्रमें सोडवीं अव्यंग ॥ मी तुझा करीन गर्वभंग ॥ सकळवीरांसमवेत पैं ॥ ११ ॥ आधीं मारीन नेत्रबाण ॥ जरी तेथोन वांचविसी प्राण ॥ मग मी तुज मारीन बाण ॥ एक क्षण न लागतां ॥१२॥ पुढें तुरंगारूढ ज्या ज्या नारी ॥ तिहीं भ्रूचाप ओढोनि सत्वरीं ॥ नयनकटाक्षांचिया शरधारीं ॥ सकळ वीर विंधिले ॥१३॥ सर्वावयव दावूनि प्रगट ॥ सर्व वीर केले वीर्यभ्रष्ट ॥ नेत्रबाण लागतां तिखट ॥ धैर्यव्यूह भेदिला ॥ १४ ॥ तोंवरीच असे विवेकज्ञान ॥ तोंवरीच सन्मार्गसेवन ॥ जोंवरी नारीकटाक्षबाण ॥ हृदयलक्षा न भेदिती ॥१५॥ ज्या कज्जलविषें माखल्या असती ॥ ज्या पक्ष्मंपिसारें अति शोभती ॥ ज्या धैर्यरक्तातें प्राशिती ॥ त्या लागतां चित्तीं शुद्धी नुरे ॥ १६ ॥ एकी धांवोन आलंगिती ॥ एकी मुखें मुख चुंबिती ॥ एकी कुचकुंभ हातीं देती ॥ ऐशिया वीरांतें मोहिती त्या ॥ १७ ॥ तंव वीर ह्मणती बरवें झालें ॥ कामराजें वैभव दिधलें ॥ विषयसुखामाजी बुडविलें ॥ धन्य केलें संसारीं ॥ १८ ॥ राहो कां या धर्माचा याग ॥ येथें अनंग हा करूं सांग ॥ सर्व विषयसुखतरंग ॥ येथें भोगूं सावकाश ॥ १९ ॥ ऐशा सोडोनि कामिनी ॥ वृथा कोण मरेल रणीं ॥ लटकी स्वर्गसुखाची वाणी ॥ जेवीं काननीं मृगतोय ॥ २० ॥ नातरी आकाशीं गंधर्वनगरें ॥ कीं आकाशसरोवरींचीं कल्हारें ॥ तैशीं याज्ञिकविप्रोत्तरें ॥ ऐकोनि भुलावें कासया ॥ २१ ॥ प्रत्यक्ष हें तरी स्वर्गसुख ॥ सोडा ह्मणती ते सर्व मूर्ख ॥ लटिका ऐकोनि स्वर्गलोक ॥ कां हो वृथा श्रमताती ॥ २२ ॥ राया मकरकेतन हा धीवर ॥ पाहोन पार्थसैन्यसागर ॥ माजी टाकिलें स्त्रीजाळ ॥ वीरमनोमत्स्य धरावया ॥ २३ ॥ अधरामृतमिषें मांसगोळे ॥ तेणें ज्या वीरांस

१ पीनस्तनी अशा. २ सोनचांफ्याप्रमाणें कांति आहे ज्यांची अशा. ३ घोडा. ४ बिनजखमी. ५ डोळ्यांच्या पापणीच्या केशरूप पिसाऱ्यानें. ६ मृगजळ. ७ कमळें.

लाविले ॥ मग सहजचि मरण पावले ॥ ओंगरिले[1] काळपात्रीं ॥ २४ ॥ निजजीवनावेगळे झाले ॥ अनुरागवन्हीनें पक्व केले ॥ गोडीमिषें संपूर्ण गुंतले ॥ विसरले सुवांच्छेतें ॥ २५ ॥ नातरी कामिनीदेह कांतारें[2] ॥ कुचपर्वत दिसे भयंकर ॥ तेथें बलाढ्य कामतस्कर ॥ मनः[3]-पांथ तेणें नागविला ॥ २६ ॥ जी दर्शनमात्रें धैर्य हरी ॥ स्पर्श करितां बळ संहारी ॥ संभोगें पुरुषा निर्वीर्य करी ॥ नारी राक्षसी जाणावी ॥ २७ ॥ विश्वामित्रादि ऋषिगण ॥ करिती वातांबुपर्णाशन ॥ ते मोहिले देखतांचि वदन ॥ तेथें पाड कोण मानवांचा ॥ २८ ॥ हरि हर आणि चतुरानन[4] ॥ त्यांसीही लागतां कामबाण ॥ तेही केले अनन्य ॥ तें काय ह्मणोनि सांगावें ॥ २९ ॥ कनक आणि दिव्य कामिनी ॥ हीं परम भ्रामक असती दोनी ॥ या दोहींवेगळा जो झाला प्राणी ॥ तो द्विभुज विष्णु जाणावा ॥ ३० ॥ मातंग[5]-कुंभ विदारिती कोणी ॥ प्रचंड मृगराज मारिती रणीं ॥ परी कंदर्पदर्पदलनीं ॥ विरळा वीर जाणावा ॥ ३१ ॥ शुकदेवें कित्येक दिवस ॥ यासी दिधला होता त्रास ॥ परी तोही शेवटीं वश्य यास ॥ झाला असे निजांगें ॥ ३२ ॥ अतिवीर एक देखिला ॥ गांगेय भीष्म ह्मणती ज्याला ॥ कीं कार्तिकस्वामी हनुमंत भला ॥ येहीं रगडिला पदतळीं ॥ ३३ ॥ जयावरी कृपा भगवंताची ॥ तोचि आवरील शक्ति मदनाची ॥ नाहीं तरी काय प्राप्ति मानवांची ॥ कंदर्पदर्प हरावया ॥ ३४ ॥ ऐसा पराक्रम सांगतां ॥ तरी विस्तार होईल या ग्रंथा ॥ ह्मणोनि फिरविली वाक्सरिता ॥ कथानुसंधानसिंधूप्रति ॥ ३५ ॥ ऐसें कामजाळ पसरलें ॥ त्यामाजी सर्व वीर सांपडले ॥ त्यापासून दोघे वीर सुटले ॥ पार्थ आणि वृषकेतू ॥ ३६ ॥ तंव प्रेमळा बोले अर्जुनास ॥ तुज जिंकोन करीन मी निजदास ॥ तरी आधींच रूपलावण्यविलास ॥ कां न भोगिसी सुखातें ॥ ३७ ॥ मग तयेसी बोले अर्जुन ॥ तुझिया संगें निश्चित मरण ॥ आणि पावावें अधः-पतन[6] ॥ अन्य गोष्टी असेना ॥ ३८ ॥ जी अविश्वासवनींची लता ॥ नातरी सर्वदोषजळसरिता ॥ कीं कपटमंदिरदेवता ॥ कीं अर्गळा स्वर्गकपाटाची ॥ ३९ ॥ कीं संशयनद्यावर्त[7] ॥ कीं साहसकर्माचें नगर विस्तृत ॥ जी पाडी पुरुषधैर्यपर्वत ॥ दर्शनवज्रेंकरूनियां ॥ ४० ॥ तरी तो मी नव्हे जाण ॥ बळें होईन तवाधीन ॥ प्रेमळा हांसे ऐकोन ॥ मग काय वचन बोलली ॥ ४१ ॥ आतां उभयपक्षीं तुजला मरणें ॥ पार्था हें मी निश्चित जाणें ॥ नयनबाणें वांचलासी प्राणें ॥ तरी मग बाणें मारीन ॥ ४२ ॥ पक्ष्मपत्रें विराजमान ॥ कज्जल-विषें माखले पूर्ण ॥ ऐसे सोडोनि दृष्टिबाण ॥ न लागतां क्षण विंधीन ॥ ४३ ॥ मी तरी दीपकळा[8] अति सुरंग ॥ अज्ञाननिर्वातस्थळीं अभंग ॥ तुजहोनि थोर वीरपतंग ॥ नेणों किती भस्म झाले ॥ ४४ ॥ आह्मांसी अबला ह्मणती सर्व लोक ॥ परी ते विचारितां सर्व मूर्ख ॥ दृष्टिमात्रें जिंकिले ब्रह्मादिक ॥ त्या अबला कीं सबळा ॥ ४५ ॥ अधरामृताची वाटी ॥ बळेंचि लावोनियां ओंठीं ॥ मोहोनि सोडिल्या वीरकोटी ॥ तेथें तूं किरीटी केव्हडा ॥ ४६ ॥ आतां तूं पार्थ बापुडें ॥ मशकप्राय आह्मांपुढें ॥ ऐसें वचन ऐकतां कोडें ॥

१ लोटले गेले, ढकलले गेले. २ अरण्य. ३ मनोरूपी वाटसरू. ४ ब्रह्मदेव. ५ हत्तींचीं गंडस्थळें. ६ नरकवास. ७ संशयरूप नदींतील भोंवरा. ८ प्रकाशमय ज्योति.

पार्थ मनीं खोंचला ॥ ४७ ॥ जेवीं गारोडियें धरिला सर्प ॥ तेथें काय चाले त्याचा दर्प ॥ स्त्री अबला ह्मणोनि पाळी कंप ॥ तरी ती मारील नेत्रबाणें ॥ ४८ ॥ शब्दबाणाचें शल्य हृदयीं ॥ राहिल्या न निघे कोणेही समयीं ॥ आमरण[1] तें पाहीं ॥ क्षणक्षणां सलतसे ॥ ४९ ॥ लोहबाणाचा पडतां घाय ॥ तेथें चालतो औषधोपाय ॥ परी शब्दबाणघायोपाय ॥ कुंठित समुदाय वैद्यांचा ॥ ५० ॥ ऐसा शब्दबाणें विंधिला ॥ पार्थ जर्जर फार झाला ॥ मग सहा बाणीं विंधिता झाला ॥ तिनें केले पंचशरें पंचधा ते ॥ ५१ ॥ कीं लक्ष्मणें शूर्पणखा ॥ शरें छेदोनि कर्णनासिका ॥ विरूप करूनि विटंबिली देखा ॥ तैशी परी करूं काय ॥ ५२ ॥ मग तो क्रोधावेशें खवळला ॥ मोहनास्त्रातें योजिता झाला ॥ तें देखोनि हंसे प्रेमळा ॥ ह्मणे हो मूर्खा ऐकावें ॥ ५३ ॥ मोहनास्त्रासी मी मूळ ॥ मज काय मानिजेल तें तूळ ॥ दृष्टीमाजी भुलवितें भूगोळ ॥ तें तुवां हें मजवरी प्रेरिलें ॥ ५४ ॥ जरी मूषक बळें माजला ॥ तरी उचलोन पाडील काय कनकाचळा ॥ कीं प्रळयकाळींच्या घनपडळा[2] ॥ व्यंजनपवन[3] उडवील ॥ ५५ ॥ नातरी मातलें पिपीलिकाबाळ[4] ॥ तरी तें काय गज उचलील ॥ नातरी मशक कोपलिया सबळ ॥ महाकाळ केवीं जिंकी ॥ ५६ ॥ बाळा लागलिया तृषा ॥ तरी शुष्क करवेल काय नदीशा[5] ॥ कीं बाधा नव्हे महेशा ॥ भूतदृष्टी पडतांची ॥ ५७ ॥ ऐशा ऐकोनि वचनासी ॥ पार्थ संतापला मानसीं ॥ मग योजिता झाला चाक्षुषी ॥ कामिनीसैन्य वधावया ॥ ५८ ॥ तंव वाचा झाली गगनीं ॥ पार्था या वधासी न प्रवर्तें झणीं ॥ अवध्य सर्व कामिनी ॥ वधितां कुळा कलंक ॥ ५९ ॥ तुवां यांसीं सख्य करावें ॥ युक्तीनें स्वकार्य साधावें ॥ इयेसी वरूनि धाडावें ॥ हस्तिनापुरा सवेग ॥ ६० ॥ ऐसें ऐकोनि देववचन ॥ परम संतोषला फाल्गुन[6] ॥ मग प्रेमळेतें वचन ॥ काय बोलता जाहला ॥६१॥ पार्थ ह्मणे प्रेमळेसी ॥ काय आहे तव मानसीं ॥ येरी ह्मणे मज वरीं त्वरितेंसीं ॥ रूपयौवन भोगावया ॥६२॥ बरवे बोलोनियां बोल ॥ येरू ह्मणे निघें तात्काळ ॥ आतां न लावीं कीं उशीर ॥ निजमंदिरा जावया ॥ ६३ ॥ परी मी आहें व्रतस्थ ॥ ब्रह्मचर्यमन केलें समस्त ॥ यागकर्म झालिया समाप्त ॥ मग सांगसी तें करीन ॥ ६४ ॥ म्यां तुज वरिलें मनोभावें ॥ षण्मास धैर्यातें धरावें ॥ आतां हस्तिनापुरा तुवां जावें ॥ धर्मदर्शन घ्यावया ॥ ६५ ॥ आणि नारी न्याव्या अपार ॥ तयांसी तेथें होतील भ्रतार ॥ ऐसें पार्थाचें उत्तर ॥ बरवें मानलें तियेसी ॥ ६६ ॥ बरवें ह्मणोनि स्त्रीशिरोमणी ॥ श्यामकर्ण दिधला सोडोनी ॥ वस्त्रालंकार मुक्तमणी ॥ देवोनि पार्थ गौरविला ॥ ६७ ॥ कामिनीराहूचें ग्रहण ॥ लागलें होतें वीरदंशेसी[7] पूर्ण ॥ पार्थ मुक्तिधन देवोन ॥ तें मुक्त केलें निजबळें ॥ ६८ ॥ मग हस्तिनापुरा चालिली प्रेमळा ॥ इकडे श्यामकर्ण असे सोडिला ॥ मागें दळभार असे चालिला ॥ परम संतोषेंकरूनी ॥ ६९ ॥ मग देशोदेश फिरत ॥ वारू[8] पातलासे तेथ ॥ मनुष्यें प्रसवती वृक्ष जेथ ॥ वृक्षसृष्टी त्या देशीं ॥ ७० ॥ जैशीं फळें वृक्षासी

---

१ मरेपर्यंत. २ अभ्राच्छादनाला. ३ पंख्याचा वारा. ४ मुंगीचें पोर. ५ समुद्राला. ६ अर्जुन. ७ वीरं अर्जुनाच्या शौर्यास. ८ घोडा.

लागती ॥ तैशीं मनुष्यें वृक्षीं लोंबती ॥ गज रथ हय पशू याती ॥ त्यांची उत्पत्ती वृक्षदेहीं ॥ ७१ ॥ प्रातःकाळीं त्यां बाळपण ॥ माध्यान्हकाळीं तारुण्य ॥ सायंकाळीं वृद्धपण ॥ पावोनि मरण पावती ॥ ७२ ॥ [1]कर्णास्तरण कर्णप्रावरण ॥ एकनेत्र एकचरण ॥ दीर्घनासिक [2]हैयानन ॥ ऐसे जन जया देशीं ॥ ७३ ॥ त्रिपाद मस्तक नयन ॥ द्विश्रृंगी आणि [3]खरोष्ट्रवदन ॥ ऐसे नाना देश लंघोन श्यामकर्ण ॥ राक्षसदेशा पातला ॥ ७४ ॥ राक्षसाधिपति भीषण ॥ तयाचें तें असे पट्टण ॥ तेथें राहाती राक्षसगण ॥ ज्यांसी भक्षण नरमांस ॥ ७५ ॥ केवळ कोपाचिया आगटी ॥ पार्थसैन्य मावेल त्यांचे पोटीं ॥ ऐसे राक्षस तीन कोटी ॥ वास करिती त्या नगरीं ॥ ७६ ॥ तंव भीषणाचा पुरोहित ॥ मेदोह नामें विख्यात ॥ तो काननीं फिरतां अकस्मात ॥ श्यामकर्ण देखिला ॥ ७७ ॥ तो ब्राह्मणराक्षस निश्चित ॥ नरआंतड्याचें यज्ञोपवीत ॥ नरकपाळ जपमाळा फिरवित ॥ कमंडलु करीं गजाचा ॥ ७८ ॥ नेत्रगोळकांची कंठमाळ ॥ कर्णीं गजद्वयदंतांचें कुंडल ॥ गजपृष्ठास्थीचा दंड केवळ ॥ धरोनि चाले सर्वदा ॥ ७९ ॥ तो भीषणापासी जाऊन ॥ काय सांगता होय वचन ॥ तुझा शत्रु जो अर्जुन ॥ सहश्यामकर्ण पातला ॥ ८० ॥ तयासवें अपार सैन्य ॥ सकळ पृथ्वीचे नृपगण ॥ पूर्वभाग्यें येथें आगमन ॥ झालें जाण अलभ्य लाभ आह्मां ॥ ८१ ॥ याचा बंधू भीमसेन ॥ तेणें तुझा पिता बक दारुण ॥ मारिला तरी यातें धरून ॥ नरमेधयागातें करीं ॥ ८२ ॥ सर्व लक्षणीं संपूर्ण असे गात्र ॥ नरमेधासी महापवित्र ॥ मी आचार्य होऊनि मंत्र ॥ यथाविधि संपादितों ॥ ८३ ॥ श्रावणीं असे मांसव्रत ॥ भाद्रपदीं यतिमांस वर्जित ॥ जटावंताचें मांस त्यजित ॥ आश्विन मासीं जाण आह्मी ॥ ८४ ॥ कार्तिकीं कुमारीमांस वर्ज्य ॥ ऐसें चातुर्मास्यव्रत पूज्य ॥ तयाची पारणा करावया योज ॥ नरमेध राया पार्थाचा ॥ ८५ ॥ गजाश्वनरमांसांचें भोजन ॥ उष्ण उष्ण करवीं रक्तप्राशन ॥ जेणें तृप्त आह्मी ऋषिगण ॥ ऐसें तुवां करावें ॥ ८६ ॥ पूर्वीं रावणें केलें नरमेधास ॥ तेथें तृप्त झाले सर्व राक्षस ॥ तैंपासोनि उपवास ॥ आह्मां राक्षसांलागुनी ॥ ८७ ॥ तूंही बळाधीश जैसा लंकेश ॥ अनायासें आलें आमिष ॥ तरी तुवा सर्वां आह्मांस ॥ तृप्त करावें [4]धैंणीभरी ॥ ८८ ॥ तंव गुरूप्रति बोले भीषण ॥ जें तुह्मी सांगाल तें मी करीन ॥ [5]पितृहंत्याचा बंधु अर्जुन ॥ तो मी धरीन निजबळें ॥ ८९ ॥ तुह्मांसारिखे ब्रह्मराक्षस ॥ सन्निध असतां जी तामस ॥ नाना विद्येचे ईश ॥ जिंकाल काळ कोपलिया ॥ ९० ॥ तुह्मांस पुसतों तें सांगा वचन ॥ किती पाहिजे तृप्तिभोजन ॥ कोण पदार्थ यज्ञाकारण ॥ पाहिजे सामग्री सूचवा ॥ ९१ ॥ मग मेदोह बोलिला तो सहज ॥ दुष्ट नरांचें मेद प्रिय मज ॥ गजहयांचे नेत्रपुंज ॥ मेद भक्षावया अति प्रीतीं ॥ ९२ ॥ सहस्र पदातींचें भोजन ॥ तव यज्ञीं करीन जाण ॥ मितआहारी मी जाण ॥ अल्पभोजन तपस्वी ॥ ९३ ॥ ऐसें ऐकोनि गुरुवचन ॥ परम संतोषला तो भीषण ॥ मग पुरोहितासी सांगोन ॥ यज्ञमंडप उभविले ॥ ९४ ॥

---

१ कानच ज्यांचीं आंथरुणें. २ घोडमुखे. ३ गाढव व उंट यांच्यासारखीं मुखें. ४ तृप्ति होई तोंपर्यंत, पोटभर. ५ बापाला ठार मारणाऱ्या भीमाचा.

यज्ञार्थ साधावया आपण ॥ पार्थावरी चालिला जाण ॥ कोटित्रय राक्षस घेऊन ॥ अति गजरें निघाला ॥ ९५ ॥ मग राक्षसांच्या ज्या नारी ॥ त्या वेंघल्या पर्वतशिखरीं ॥ सैन्य पहातां अंतरीं ॥ भयाभीत जाहल्या ॥ ९६ ॥ त्यांत एकीनें शंखध्वनि करून ॥ ह्मणे पळा रे पळा अवघेजण ॥ पैलें वानर तो दारुण ॥ लंकादहन केलें जेणें ॥ ९७ ॥ अशोकवनीं होती सीता ॥ तेथें हा म्यां देखिला होता ॥ लंका जाळिली रावणादेखतां ॥ संहार केला राक्षसां ॥ ९८ ॥ तंव अपार बोलती राक्षसनारी ॥ उदरें जैसीं पर्वतदरी ॥ लंबग्रीवा क्रोशभरी[3] ॥ योजन एक तोंडें जयां ॥ ९९ ॥ त्या ह्मणती तयेसी ॥ कां वो वानराचें भय धरिसी ॥ तुज देखत तयासी ॥ रगडीन दाढेखालतें ॥ १०० ॥ दुजी बोले प्रतिज्ञावचन ॥ माझे पाहा हे विशाळ स्तन ॥ पाठी टाकिले तरी योजन ॥ भूमी व्यापून राहिले ॥ १ ॥ जयांच्या घर्षणें द्रुम[4] मोडती ॥ लागतां पर्वत ढांसळती ॥ या स्तनें पांडव मारुती ॥ क्षणामाजी मारीन ॥ २ ॥ पार्थसेनेसह हनुमान ॥ माझें हें ताबूलचर्वण ॥ मजकारणें भीषण ॥ बरा जाणतो अंतरीं ॥ ३ ॥ मग तिजी बोले कोपोन ॥ माझे असती द्वय योजन स्तन ॥ पार्थ आणि हनुमान ॥ खंती कां त्यांची मानितां ॥ ४ ॥ तंव एक बोले विशांलागी ॥ मी तों हें सैन्य सांठवीन भगीं ॥ मजसारिखी जगीं ॥ स्थूळ दुजी दावा गे ॥ ५ ॥ ऐशा श्रेष्ठ राक्षसी वचनीं ॥ बीभत्स बोलती ते क्षणीं ॥ तें बोलतां वाणीं ॥ लज्जा वाटे आपणा ॥ ६ ॥ ऐशा राक्षसी धांवोन ॥ आटोपिलें पार्थसैन्य ॥ कुचभ्रमणेंकरून ॥ पार्थसैन्य आटित ॥ ७ ॥ ते लागती जेथें स्तन ॥ तेथें चतुरंग सैन्य होय चूर्ण ॥ ऐसा मार दारुण ॥ निशाचरी करिती तेधवां ॥ ८ ॥ करीं धरूनि अश्व गज नर ॥ तोंडीं घालोनि भक्षिती समग्र ॥ ऐशा राक्षसी अपार ॥ सैन्यसंहार करिती ॥ ९ ॥ मग भीषण बोले पार्थासी ॥ अरे तूं मजला सांपडलासी ॥ तुज मारून ससैन्येंसीं ॥ मग भीमातें मारीन ॥ ११० ॥ मी समीप नव्हतों ह्मणून ॥ भीमें वधिला माझा पिता जाण ॥ ऐसें बोलोनि भीषण ॥ करीत कंदन सैन्याचें ॥ ११ ॥ स्वसैन्येंसीं भीषण ॥ परदळाचें करूं पाहे मर्दन ॥ मग पार्थें गांडीव चढवोन ॥ निर्वाण शर सोडित ॥ १२ ॥ परी त्या नाटोपती पार्था ॥ हें जाणवलें हनुमंता ॥ मग पुच्छीं बांधिल्या राक्षसवनिता ॥ पृथ्वीवरी आपटीत ॥ १३ ॥ मग पळों लागल्या पर्वतोदरीं ॥ तेथेंही पुच्छें धांव घेतली ॥ भयें बुडती सागरीं ॥ तेथेंही पुच्छ न सोडीच ॥ १४ ॥ उडोनि पळती आकाशीं ॥ परी पुच्छ न सोडी तयांसी ॥ बांधोनि आपटी धरणीसी ॥ प्रेतें भिरकावी सागरीं ॥ १५ ॥ ऐशा मारिल्या राक्षसनारी ॥ एकही उरों नेदी कपिकेसरी ॥ मग येऊनि बैसला ध्वजाग्रीं ॥ युद्धकौतुक पहावया ॥ १६ ॥ तंव महावीर तो सुभद्रावर ॥ दोन कोटी मारिले निशाचर ॥ ते महायोद्धे रजनीचर ॥ परि सुभद्रावर नाटोपे तयां ॥ १७ ॥ ऐसें दळ त्यांचें संहारिलें ॥ मग भीषणें विंदान रचिलें ॥ कपटवेषें ते वेळे ॥ मुनि झाला सत्वर ॥ १८ ॥ गंगातीरा येऊनि बैसला ॥ संगें अनेक शिष्यमेळा ॥ अध्ययन सांगतसे

---

१ चढल्या. २ पलीकडे. ३ एक कोस लांब. ४ वृक्ष. ५ राक्षसी.

सकळां ॥ वेदांतशास्त्रें नानापरी ॥ १९ ॥ त्याउपरी पार्थ दळासहित ॥ गंगातीरीं उतरले समस्त ॥ जळपानार्थ तृषाक्रांत ॥ पार्थही गेला जलपाना ॥ १२० ॥ तयासी बोले तो कपटमुनी ॥ धन्य पार्था गांडीवपाणी ॥ तूं आह्मांसी रक्षावयालागुनी ॥ येथें आलासी दयाळा ॥ २१ ॥ आह्मी येथें तपस्वी ब्राह्मण ॥ परी हे राक्षस करिती तपासी विघ्न ॥ तूं यांचें करीं संहारण ॥ आमच्या रक्षणाकारणें ॥ २२ ॥ आणि आमचिया मठीं ॥ आजी राहावें किरीटी ॥ विद्या मजपाशीं कोट्यानकोटी ॥ त्या तुजलागीं निवेदूं ॥ २३ ॥ ऐसें पार्थें ऐकतां ॥ कर्म देखिलें विपरीतता ॥ मग भय उपजलें पार्था ॥ कृष्णस्मरण सत्वर केलें ॥ २४ ॥ झांकितां पलांडूचा दुर्गुण ॥ परी तात्काळ सांगे घ्राण ॥ तेवीं कपटियाचें कर्माचरण ॥ तात्काळ पडे बाहेरी ॥ २५ ॥ करूनियां कृष्णनामस्मरण ॥ पार्थें खड्ग काढिलें दारुण ॥ भीषणाचें शिर छेदोन ॥ आकाशपंथें उडविलें ॥२६॥ त्यावरी त्याचा पुरोहित ॥ तयाचाही अर्जुनें केला प्राणघात ॥ कपटी राक्षस पळत ॥ पार्थभयें उरले जे ॥ २७ ॥ ऐशी पाहोनि राक्षसमाया ॥ आश्चर्य वाटलें सर्व रायां ॥ मग परम कोपोनियां ॥ नगर लुटिलें तयाचें ॥२८॥ अनेक रत्नें सुवर्ण ॥ मुक्ताफळें अनेक पूर्ण ॥ नानावस्तु हरोन ॥ राक्षस सर्वही मारिले ॥२९॥ फोडोनि सर्वही भांडारें ॥ छत्र ध्वज आणि चामरें ॥ सर्वही घेवोनि सुभद्रावरें ॥ पुढें गमन आरंभिलें ॥१३०॥ पुढें वारू जातसे सत्वर ॥ मागें चालती सर्व वीर ॥ तों पुढें देखिलें मणिपुर ॥ परम सुंदर रचनेचें ॥३१॥ तेथें राजा तो बभ्रुवाहन ॥ धीर उदार गुणसंपन्न ॥ लोक सत्यव्रती परायण ॥ पतिव्रता सर्वही स्त्रिया ॥३२॥ वेदशास्त्रीं अति निपुण ॥ जितेंद्रिय सत्यवादी ब्राह्मण ॥ सदैव कृष्णचिंतन ॥ अन्य वार्ता न जाणती ॥३३॥ ठायीं ठायीं तुळशीवृंदावनें ॥ स्थळोस्थळीं होती गायनें ॥ भावें करिती पुराणश्रवणें ॥ नामसंकीर्तनें घरोघरीं ॥३४॥ केशपुष्पांस जेथें बंधन ॥ द्यूतसारीस असे मरण ॥ छत्रालागीं असे दंडधारण ॥ सुरतीं हारी पुरुषातें ॥३५॥ जेथें स्वप्नींहि नसे अनृत ॥ घरोघरीं हरिनामामृत ॥ नाना उत्साहमंडित ॥ मंगलकार्यें घरोघरीं ॥३६॥ तेथें वसती वीरचूडामणी ॥ जे विमुख न होती रणमेदिनीं ॥ स्वजीविताविधि दानक-रणी ॥ ऐसे धर्मात्मे सर्वही ॥३७॥ निजमुखासी कृष्णवचन ॥ हरिपूजनीं जन संपूर्ण ॥ रत्नसुवर्णादिक प्रतिमा जाण ॥ रत्नखचित स्थळो-स्थळीं ॥३८॥ ज्यासी हंसध्वजादिक वीर ॥ सुवर्णशकट सहस्र ॥ देती आणून करभार ॥ रौप्यभूमी घरोघरीं ॥३९॥ मठ प्रासाद गोपुरें ॥ आकाशचुंबित सुवर्णमंदिरें ॥ रत्नखचित सुंदरें ॥ इंद्रभुवनातें झांकिती ॥१४०॥ दुजें वैकुंठ पृथ्वीवरी ॥ ईश्वरें रचिलें काय निर्धारीं ॥ कीं मनोभावातें कनकगिरी ॥ ऐसें भासे सर्वांतें ॥४१॥ ऐशिया नगरासमीप जाण ॥ तेथें गेला तो श्यामकर्ण ॥ तें नगर देखोन अर्जुन ॥ परम आश्चर्य पावला ॥४२॥ हंसध्वजासी ह्मणे पृथासुत ॥ हें नगर कोणाचें विस्तीर्ण येथ ॥ नांदे कोणता नृपनाथ ॥ हें सविस्तर मज सांगावें ॥४३॥ आतां बभ्रुवाहनाचें आख्यान ॥ हंसध्वज कळवील पार्थाकारण ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अमृतासमान गोड असे ॥१४४॥ इति श्रीजैमि-निअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥१४५॥ इति श्री० आ० जै० भी० ॥अ० ॥२२॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे नृपवरा ॥ हरिचरणांबुजमधुकरा ॥ ऐकें पूर्वजकथामृतसागरा ॥ सावधान होऊनियां ॥ १ ॥ पार्थासी ह्मणे हंसकेतन ॥ येथें राजा तों बभ्रुवाहन ॥ भगवद्भक्तिपरायण ॥ नित्य पूजी धेरामरां ॥ २ ॥ प्रतापतेजें सैहस्रकिरण ॥ क्षमा तरी धरेसमान ॥ आल्हादपणें निशारैमण ॥ संताप हरी सकळांचा ॥ ३ ॥ सुंदर तरी अपर मदन ॥ क्रोधी तरी यमासमान ॥ बलाढ्य तरी वीरसर्वदमन ॥ उदारपणें जैलद दुसरा ॥ ४ ॥ धैर्यादिगुणरत्नाकर ॥ सर्वकळाप्रवीण चतुर ॥ सत्यवादी जितेंद्रिय निरं-तर ॥ धार्मिक सुशीळ मनाचा ॥ ५ ॥ ऐसा हा विजयी नृपवर ॥ मजसारिखे वीर अपार ॥ सहस्र शकट कनकभार ॥ देती कर-भार प्रतिवर्षी ॥ ६ ॥ याचा सुमति असे प्रधान ॥ नेणों केवळ विवेकवन ॥ सत्यवादी जितेंद्रिय पूर्ण ॥ वैदान्य आणि धर्मात्मा ॥ ७ ॥ नाठवी कदा परांचे अपकार ॥ स्वयें सर्वांसी करी उपकार ॥ अतिबळें रणरंगधीर ॥ शौर्यवीर्यप्रतापें ॥ ८ ॥ अनेकगुणरत्न-पूर्ण ॥ अति सन्मानी बभ्रुवाहन ॥ दोघां सदैव ऐक्यपण ॥ अर्थ जैसा वाक्यांशीं ॥ ९ ॥ ऐसें सर्व वीरमंडळ ॥ धार्मिक वदान्य सुशीळ ॥ नेणों प्रळयानळाचे कल्लोळ ॥ होती पावतां रणरंगीं ॥ १० ॥ हे जरी धरिती श्यामकर्ण ॥ तरी महासंकट दारुण ॥ सर्वथा नव्हे हयमोचन ॥ मज तों ऐसें वाटतसे ॥ ११ ॥ ऐकोनि स्तब्ध झाला अर्जुन ॥ तों पुढें देखिलें आश्चर्य गहन ॥ ध्वजीं गृध्र येवोनि बैसला जाण ॥ मुख्य पार्थरथाच्या ॥ १२ ॥ तो अमंगळ गृध्र थोर ॥ पाहात ठेले सकळ वीर ॥ ह्मणती परम अरिष्ट दुर्धर ॥ पावेल ऐसें दुश्चिन्ह हें ॥ १३ ॥ तंव रायापासीं सांगती सेवकजन ॥ महाद्वारीं उभा श्यामकर्ण ॥ कोणास विमुख नारायण ॥ झाला नेणों स्वामिया ॥ १४ ॥ तंव दूतांसी पार्थिव बोले उत्तर ॥ तो धरून आणा रे सत्वर ॥ ऐकोनि धांवले सहस्र वीर ॥ धरोनि शीघ्र आणिला तो ॥ १५ ॥ तंव तों झाला अस्तमान ॥ सभेस बैसला बभ्रुवाहन ॥ करितां ती सभा वर्णन ॥ तरी इंद्रभुवन तुच्छ वाटे ॥ १६ ॥ रत्नखचित कनकभिंती ॥ उंचपणें आकाश चुंबिती ॥ कनकनिबद्ध सर्व असती ॥ पटांगणें तेथींचीं ॥ १७ ॥ हंस मयूर शुक सारिका ॥ सारस पारावत आणि पिकां ॥ चित्रांचा करील कवण लेखों ॥ सजीव सर्वांतें भासती ॥ १८ ॥ राजासन्निध सहस्र रत्नदीप ॥ त्यांपुढें लक्ष कर्पूरदीप ॥ सुगंधतैलदीपिका अमूप ॥ उभ्या असती रणांगणीं ॥ १९ ॥ त्यांवरी उडतसे कर्पूरचूर्ण ॥ केशर मृगमद मलयचंदन ॥ तयाचें सभेंत पडे मृदु चूर्ण ॥ पाउलें उठती वीरांचीं ॥ २० ॥ सुगंधधूपें धूपित ॥ सुवर्णमाला अति मंडित ॥ मुक्तचूर्णांचे सेक देत ॥ सुगंधोदकें आंगणीं ॥ २१ ॥ उर्वशीरंभेसी देती दूषणा ॥ ऐशिया पुढें नाचती नृत्यांगना ॥ भाट बंदीजन करिती स्तवना ॥ नेणों गर्जना मेघांची ॥ २२ ॥ अनुपम तें सभास्थान ॥ तेथें बैसला बभ्रुवाहन ॥ तंव दूतीं आणिला श्यामकर्ण ॥ तो सर्व वीरेंशीं नृप पाहे ॥ २३ ॥ ह्मणती तप करूनि चतुरानन ॥ सर्व लावण्य ओतिलें अश्वरत्न ॥ पाहातां तें परम समाधान ॥

१ ब्राह्मणांना. २ सूर्य. ३ चंद्र. ४ मेघ. ५ सोन्याचे भार. ६ दाता. ७ गिधाड. ८ बभ्रुवाहनाजवळ. ९ सुवर्णखचित. १० कोकिळा. ११ मोजमाप.

सर्व वीर पावले ॥२४॥ तों भाळीं कनकपत्र देखिलें ॥ तें बभ्रुवाहनें वाचिलें ॥ लिखित वर्तमान विदित झालें ॥ मग पुसों लागला सुमतीतें ॥ २५ ॥ हा तों धर्माचा यज्ञहय ॥ यासी रक्षण असे धनंजय[१] ॥ कैसा करावा जी उपाय ॥ महासंकट मांडलें ॥ २६ ॥ ऐसें बभ्रुवाहन बोलतां ॥ वीर ह्मणती काय जी नृपनाथा ॥ येरू ह्मणे तेलवतां[२] ॥ ऐका तुह्मां सांगतों ॥ २७ ॥ जो कुरुकुळदीपक ॥ ज्याचा सारथी यदुनायक ॥ तो आमुचा सत्य जनक ॥ त्याचा असे हा श्यामकर्ण ॥ २८ ॥ बाळपणीं माझी माता ॥ आपुले जनकाघरीं असतां ॥ ताल चुकली हो नाचतां ॥ मग ते शापिली जनकानें ॥ २९ ॥ म्यां तुजकारणें श्रम केले फार ॥ ते वृथा दवडिले कीं समग्र ॥ तरी तूं होशी जलचर ॥ पैलसरोवरामाझारीं ॥ ३० ॥ [३]येरी पितयातें बोले उत्तर ॥ उःशाप द्यावा जी सत्वर ॥ येरू ह्मणे येईल पार्थवीर ॥ तीर्थयात्राप्रसंगें ॥ ३१ ॥ तो सरोवरीं करितां स्नान ॥ तयाचा तूं धरीं चरण ॥ तेव्हां तूं दिव्य[४] होऊनें[५] ॥ तोचि भर्ता वरशील ॥ ३२ ॥ ऐकोनि जनकाचें उत्तर ॥ शीघ्र झाली ती जलचर ॥ तों तीर्थप्रसंगें धनुर्धर ॥ तेथें स्नानासी पातला ॥ ३३ ॥ उदकीं करूनियां स्नान ॥ बाहेरी निघतां अर्जुन ॥ जलचरें धरितां चरण ॥ तो तेणें झाडोनि टाकिला ॥ ३४ ॥ चरणस्पर्श होतां पार्थाचा ॥ दिव्य देह झाला तियेचा ॥ जेवीं शिळे स्पर्श होतां रामाचा ॥ झाली अहिल्या दिव्यदेही ॥ ३५ ॥ तंव आश्चर्य करी श्वेतवाहनं ॥ मग तिनें निवेदिलें पूर्वकथन ॥ मग त्याचा हस्त धरून ॥ निजभवना आणिला ॥ ३६ ॥ विवाह केला यथासांग ॥ मग तियेचा झाला देहसंग ॥ गर्भ राहिला अव्यंग ॥ मम देह तेथें जन्मला ॥ ३७ ॥ तयाचा पुण्यप्रभाव ॥ मज हें प्राप्त झालें वैभव ॥ जयातें देखोनि शचीधवें ॥ अभिलाष धरितो मानसीं ॥ ३८ ॥ यापरी तो पिता माझा पार्थ ॥ मी तयाचा असें कीं सुत ॥ तयाचा अश्व आला येथ ॥ हा विचार तों जाहला ॥ ३९ ॥ पुढें तयासी काय करणें ॥ झुंजणें कीं शरण जाणें ॥ कीं अश्व सोडूनि देणें ॥ हें विचारोनि मज सांगा ॥ ४० ॥ मग सुमति बोले प्रधान ॥ राया बरवें पुशिलें वर्तमान ॥ अश्व धरिला अविचारून ॥ यासीं परिहार एक आहे ॥ ४१ ॥ घेऊनियां श्यामकर्ण ॥ जावोनि करावें पितृवंदन ॥ आणि करावें हयरक्षण ॥ स्वकार्य ह्मणोनि आदरें ॥ ४२ ॥ आपुला स्वधर्म बरवा ॥ भावें करावी जनकसेवा ॥ [६]चतुरंग राज्यवित्त ठेवा ॥ पितृचरणीं समर्पिजे ॥ ४३ ॥ उत्तम गजाश्व निवडावे ॥ पितृचरणीं ते अर्पावे ॥ वस्त्राभरणवैभवें ॥ भेटीस जावें तयाचे ॥ ४४ ॥ पुढें करूनियां श्यामकर्णासी ॥ नाना वाद्यगजरेंसीं ॥ घेऊनियां स्वराज्यविलासासी ॥ जनकालागीं भेटावें ॥ ४५ ॥ ऐसें प्रधानाचें ऐकतां वचन ॥ संतोषला बभ्रुवाहन ॥ मग प्रातःकाळीं उठोन ॥ हाकारलें सैन्यासी ॥ ४६ ॥ चतुरंग सैन्य सिद्ध झालें ॥ वस्त्रालंकारें वीर शोभले ॥ येऊनि सन्मुख उभे ठेले ॥ वाद्यें अनेक वाजती ॥४७॥ वस्त्रालंकार रत्नभार ॥ वित्तें भरलीं शँकटें[७] सहस्र ॥ गजाश्वरथ ते अपार ॥

---

१ अर्जुन. २ खरोखर. ३ उलूपी. ४ देवस्त्री. ५ इंद्र. ६ चार प्रकारचें सैन्य–गजदळ, रथदळ, हयदळ व पायदळ. ७ गाडे.

मंडित केले द्यावया ॥ ४८ ॥ ध्वज छत्र पताका शोभती ॥ नाना वाद्यें हो वाजती ॥ तेथें लोपला गभस्ती[1] ॥ वीर गर्जती स्वानंदें ॥ ४९ ॥ पुढें नाचती नृत्यांगना[2] ॥ सुवेषें करिती नर्तना ॥ भाट बंदीजन[3] करिती स्तवना ॥ नेणों गर्जना मेघांची ॥ ५० ॥ ऐशापरी भेटीस चालिला ॥ तो सकळ वीरीं देखिला ॥ तिहीं परमानंद मानिला ॥ मृत्यु टळला ह्मणोनी ॥ ५१ ॥ सर्व ह्मणती बरवें झालें ॥ बभ्रुवाहन भेटीस आले ॥ आजि जीवित्व वांचलें ॥ पुढें होणार तें होतसे ॥ ५२ ॥ वयें तारुण्य सुंदर ॥ सर्व संपत्तीचा सागर ॥ ज्यासी तुळितां शचीवँर[4] ॥ परम दरिद्री वाटला ॥ ५३ ॥ ऐसा तो प्रतिअर्जुन ॥ पितयासमीप बभ्रुवाहन ॥ दुरोनि देखतां पितयाचे चरण ॥ गजावरून उतरला ॥ ५४ ॥ उभा राहोनियां नीट ॥ काढोनि मस्तकींचा मुगुट ॥ आधीं वंदोनि पितृपदपीठ ॥ चरणीं मस्तक ठेविला ॥ ५५ ॥ गजारूढ होत्या सर्व कुमारी ॥ घेवोनियां दूर्वाक्षता करीं ॥ मुक्ताफळांसहित अर्जुनावरी ॥ वर्षाव करिती सुमनांचा[5] ॥ ५६ ॥ जें आणिलें होतें वित्तजात[6] ॥ तें तयापुढें ठेविलें समस्त ॥ नानाधूपें धूपित ॥ सन्मुख ठेविती तयाच्या ॥ ५७ ॥ स्वकेशांनीं पितृचरण ॥ झाडों लागला बभ्रुवाहन ॥ सकळ शोधितां हें त्रिभुवन ॥ ऐसा वीर अन्य नसे ॥ ५८ ॥ हंसध्वजादिक नृपगण ॥ धन्य ह्मणती बभ्रुवाहन ॥ सकळांमाजी तूं निधान ॥ ईश्वरभक्त प्रतापी ॥ ५९ ॥ तुजऐसा सत्वशीळ वीर ॥ नाहीं नाहीं कीं नृपवर ॥ भगवद्भक्तांचा आदर ॥ करिसी स्वयें येवोनियां ॥ ६० ॥ असो पुनः पुनः वंदन ॥ करोनि बोले बभ्रुवाहन ॥ ह्मणे स्वामी मम वचन ॥ मान्य करावें यावरी ॥ ६१ ॥ मी तों तुमचा नंदन ॥ उलूपीउदरीं झालों निर्माण ॥ उत्पन्न चित्रांगीपासून ॥ तीर्थयात्राप्रसंगें ॥ ६२ ॥ माझें नाम बभ्रुवाहन ॥ तुह्मां नेणतां धरिला श्यामकर्ण ॥ हा माझा अपराध पूर्ण ॥ क्षमा केला पाहिजे ॥ ६३ ॥ गजाश्वरथादि सर्वही दँळ[7] ॥ देहासहित राज्य सकळ ॥ स्वामीस अर्पिलें सहफळ ॥ रिक्त हस्तें न भेटावें ॥ ६४ ॥ परी सक्रोध देखोनि पितयाला ॥ ह्मणे नेणतपणें अपराध झाला ॥ तो समर्थें पाहिजे क्षमा केला ॥ पुनः चरणीं लागतसे ॥ ६५ ॥ उत्तमाचा क्रोधहुताशन[8] ॥ तोंवरीच पेटे दारुण ॥ जों न पावे नमनजीवन ॥ तें पावल्या शमे तात्काळ ॥ ६६ ॥ पितृवदनेंदु पाहोनि कुमर ॥ तेथें लाविले नयनचकोर ॥ परी तो आच्छादिला विषादजलधर ॥ ह्मणोनि राहिला तो उपवासी ॥ ६७ ॥ मग उभा राहोनि प्रद्युम्न ॥ पार्थाप्रति बोले वचन ॥ ह्मणे उठवोनि निजनंदन ॥ क्षेमालिंगन द्यावें यासी ॥ ६८ ॥ मनीं विचारिती नृपगण[9] ॥ बभ्रुवाहनासारिखा नंदन ॥ यासी पार्थ नेदी सन्मान ॥ काय अपराध देखिला ॥ ६९ ॥ बहुधा आमचें अँदृष्ट[10] फिरलें ॥ मरण चुकलें तें पुनः आलें ॥ भय हरोनि पुनः आदरिलें ॥ हें काय केलें जगदीशा ॥ ७० ॥ हंसध्वजादि सर्व नृपती ॥ पार्थासी सर्व विनविती ॥ ह्मणती उठावें सुभद्रापती ॥ वेगें भेटावें नंदना ॥ ७१ ॥ हा तों सुपुत्र ऋतुवसंत ॥ करी सत्कर्मांप्रवृक्ष सफलित ॥

१ सूर्य. २ वेश्या. ३ स्तुतिपाठक. ४ इंद्र. ५ फुलांचा. ६ द्रव्यसमुदाय. ७ सैन्य. ८ क्रोधरूपी अग्नि. ९ राजेलोक. १० नशीब.

तेथें बैसोनि स्वजनपरभृत[1] ॥ पंचमस्वरें बोलती ॥ ७२ ॥ जो निजाचळमलयानिळ ॥ गज भरोनि काढिलें मलयपरिमळ ॥ पूर्ण चंदनें केलें उभय कुळ ॥ धन्य तो पुत्र संसारीं ॥ ७३ ॥ जो भवसागरामाजी नौका ॥ जो उत्तमाचरणें नेत परलोका ॥ नरक निवारोनि देत परम सुखा ॥ आणि ऋणत्रयातें[2] परिहारी ॥ ७४ ॥ ऐसिया पुत्राचा मुगुटमणी ॥ हा बभ्रुवाहन कीं गांडीवपाणी ॥ यासी अपमानितां हानी ॥ पुढें होणार दिसताहे ॥ ७५ ॥ पुत्र विनीत आणि गुणसागर ॥ कांता सुंदर आणि सेवापर ॥ मित्र अवंचक आणि उदार ॥ हें त्रय पुण्यें पाविजे ॥ ७६ ॥ तुज बभ्रुवाहनाऐसा पुत्र ॥ घरीं सुभद्रेऐसें कैलत्र[3] ॥ इंदिरावराऐसा सुमित्र ॥ हें भाग्य विचित्र पैं तुझें ॥ ७७ ॥ अति पराक्रमी बभ्रुवाहन ॥ पोटीं धरावा आलिंगोन ॥ हा संपत्तीनें शचीरमण ॥ तेजें दुजा गभस्ती ॥ ७८ ॥ ऐसें ऐकोनियां वचन ॥ सक्रोध झाला तो अर्जुन ॥ पुढें होणारासारिखी दारुण ॥ बुद्धि तया संचरली ॥ ७९ ॥ पुढें जैसी होणार गती ॥ तया तैशीच आठवे मती ॥ काय सर्वज्ञ जो सीतापती ॥ कनकमृगातें न जाणे ॥ ८० ॥ ज्ञानी असोनि जो नहुष ॥ यांनीं योजावें काय द्विजगणास ॥ अविचार सहस्रार्जुनास ॥ विप्रगोहरण[4] घडावें ॥ ८१ ॥ धर्म धर्मात्मज असोनी ॥ हरी बंधु स्त्रीशीं द्यूतपणीं ॥ तरी विनाशकाळीं विपरीतवाणी ॥ बुद्धि होतसे निर्धारें ॥ ८२ ॥ अर्जुनें चरणघातें ताडिला नंदन ॥ निर्भर्त्सोनि बोले वचन ॥ तूं माझा पुत्र नव्हेसी जाण ॥ भयभीत दुर्मती ॥ ८३ ॥ नर्तकी चित्रांगदेचा नंदन ॥ पार्थवीर्याचा नव्हे जाण ॥ आधीं धरूनि श्यामकर्ण ॥ मग भयें कां रे सोडिला ॥ ८४ ॥ अति क्लीब आणि भयभीत ॥ ऐसा पुत्र काय पार्थजनित[5] ॥ एक मजला झाला पूर्व सुत ॥ अभिमन्यु धन्य महाबळी ॥ ८५ ॥ कृष्णप्रिय धर्मरत ॥ मज तो प्रिय सुभद्राजनित ॥ तोचि पुत्र एक विख्यात ॥ क्षत्रिय होय महाबळी ॥ ८६ ॥ भीष्म द्रोणादि सकळ वीर ॥ जेणें शरें केले जर्जर ॥ चक्रव्यूह भेदोनि समग्र ॥ धर्मनंदना रक्षिलें ॥ ८७ ॥ तोचि एक सुभद्रानंदन ॥ माझे जीवींचें निजधन ॥ तूं तंव केवळ जंबुक[6] पूर्ण ॥ केसँरी[7] होय अभिमन्यु ॥ ८८ ॥ कांहीं बळ न दाविलें ॥ बाणीं हृदय नसे भेदिलें ॥ तों पूर्वींच कां रे भय धरिलें ॥ सोडोनि दिधलें श्यामकर्णा ॥ ८९ ॥ नर्तकी गंधर्वराजदुहिता ॥ तियेपासोनि जन्मलासी तत्वतां ॥ नटवर होऊनि आतां ॥ टाकोनि राज्य तुवां जावें ॥ ९० ॥ रथ धनुष्य टाकोनि देईं ॥ वीणा तंतुवाद्य करीं घेईं ॥ कटीं मृदंग बांधोनि पायीं ॥ नाचवीं नर्तकी नृपसभे ॥ ९१ ॥ तूं तंव केवळ कुळीं अधम ॥ नेणसी क्षत्रियांचा धर्म ॥ क्षात्रधर्में वांचणें सुगम ॥ नव्हे जाण षंढासी ॥ ९२ ॥ ऐसें ऐकोनि पितृवचन ॥ क्रोधें तप्त झाला बभ्रुवाहन ॥ भ्रूलते ग्रंथी पाडोन ॥ काय पितया बोलत ॥ ९३ ॥ पार्था तव अपराध सकळ ॥ म्यां साहिले सर्व एक वेळ ॥ परी एक न साहवे अनळ ॥ होवोनि जाळितो सर्वांगीं ॥ ९४ ॥ मज वेश्यानंदन ह्मणसी ॥ माझ्या जननीतें निंदिसी ॥ ऐसा तूं अल्पबुद्धि होसी ॥

१ स्वजनरूपी कोकिळ. २ देवांचें, पितरांचें आणि ऋषींचें ऋण. ३ स्त्री. ४ जमदग्नीच्या कामधेनूचें हरण करणें. ५ अर्जुनापासून झालेला. ६ कोल्हा ७ सिंह.

गर्वराशी तुझी हरीन ॥ ९५ ॥ पूर्वी जिंकिले तुवां महारथी ॥ तेथें श्रीकृष्ण होता सारथी ॥ आतां पाहीन तुझी ख्याती ॥ क्षत्रिय ह्मणविसी आपणा ॥ ९६ ॥ मग आज्ञा करी प्रधानासी ॥ वारू पाठवावा नगरासी ॥ नेऊनि बांधा लवेंसीं ॥ कैसा सोडवील तें पाहूं ॥ ९७ ॥ द्रव्यशकटें न्यावीं वेगीं ॥ सैन्य सिद्ध करीं चतुरंगीं ॥ पराक्रमें रणरंगीं ॥ राजे सर्व मारावे ॥ ९८ ॥ हा तों पार्थ दुर्मती ॥ नीति न शोभे कुटिलाप्रती ॥ भुजंग पयःपान करिती ॥ अंतीं वमिती गॅरळातें ॥ ९९ ॥ द्यूतियाचें सत्य वचन ॥ किंवा जारिणी कुळवधू पूर्ण ॥ कीं मद्यप्याचें आत्मज्ञान ॥ हें तों किमर्थ सत्य मानावें ॥ १०० ॥ कीं स्त्रीची कामोपशांती ॥ कीं उॅरगाची नीट गती ॥ मित्र ह्मणावा भूपती ॥ हें सर्वथा न घडेची ॥ १ ॥ नाना शास्त्रींचें व्याख्यान ॥ ऐकतां द्रवेना दुर्जनमन ॥ त्यांचे पंक्तीचा हा अर्जुन ॥ आतां पूर्ण मज कळला ॥ २ ॥ तो पिता ह्मणोनि जाण ॥ मी या भावें यास आलों शरण ॥ परी यासी दाटलें मरण ॥ ह्मणोनि बुद्धि भ्रष्टली ॥ ३ ॥ बरवें ह्मणोनियां प्रधान ॥ सर्वही सिद्ध केलें जाण ॥ दुर्धर सैन्य घेऊन ॥ उभा ठाकला रणांगणीं ॥ ४ ॥ जैसें प्रळयकाळींचें मेघमंडळ ॥ तैसें राहिलें सर्वही दळ ॥ ज्यातें देखतां महाकाळ ॥ धाकें सोडित प्राणातें ॥ ५ ॥ महाघंट सुबद्ध ॥ ऐसे गज ठाकले एक अॅर्बुद ॥ सप्त कोटी रथांचें वृंदें ॥ ध्वजपताकीं शोभलें ॥ ६ ॥ मनपवनाचा करिती जय ॥ ऐसे दोन अर्बुदें हॅय ॥ पदातिवीर अर्बुदत्रय ॥ उभे ठाकले शस्त्रास्त्रीं ॥ ७ ॥ सर्वही ते युद्धीं कुशळ ॥ सत्यवादी धर्मशील ॥ भुजाबळें जिंकिती महाकाळ ॥ सिंहनादें गर्जती ते ॥ ८ ॥ ध्वज पताका शोभती ॥ नाना रणवाद्यें वाजती ॥ दणाणिलीं सप्त पाताळें तीं ॥ नादावलें अॅंबर ॥ ९ ॥ सकळ सैन्य धांवलें ॥ वेगें पार्थदळातें वेढिलें ॥ अज्ञानमोहपडळें केलें ॥ वेढें जैसें जगातें ॥ ११० ॥ कनकनिर्मित रत्नखचित ॥ छत्र ध्वज पताकामंडित ॥ मुक्तमाळा शोभित ॥ मनोवेग अश्वातें ॥ ११ ॥ ऐसा आणोनि दिव्य रथ ॥ तयावरी बैसला पार्थसुत ॥ नाना शस्त्रें विख्यात ॥ तयावरी रचियेलीं ॥ १२ ॥ किंकिणी वाजती खणखणा ॥ नाद उठतसे गगना ॥ जो रथ शक्र-ॅनंदना ॥ शोभा न पावे यापुढें ॥ १३ ॥ पार्थाप्रति बोले बभ्रुवाहन ॥ आतां कां रे विलंब पूर्ण ॥ गांडीवातें चढवीं गुण ॥ पुरुषत्व दावीं आपुलें ॥ १४ ॥ मी पितृभावेंकरून ॥ आणोनि दिधला श्यामकर्ण ॥ आतां रक्षीं आपुला प्राण ॥ महायत्नेंकरूनी ॥ १५ ॥ ऐसें बोलोनि उत्तरीं ॥ युद्धा पार्थातें पाचारी ॥ तें देखोनि ते अवसरीं ॥ दैत्यनाथ उठावला ॥ १६ ॥ अनुशाल्व धांवला प्रचंड ॥ हातीं धनुष्य घेतलें वितंड ॥ अति विशाळ दोर्दंड ॥ सिंहनादें गर्जत ॥ १७ ॥ ॅकनकपुंख अति सुंदर ॥ ऐसे सोडिले नव शर ॥ येतां देखोनि समोर ॥ बभ्रुवाहनें छेदिले ते ॥ १८ ॥ पार्थात्मजें बाण शत ॥ सोडोनि विंधिला दैत्यनाथ ॥ दैत्यनाथ समर्थ बहुत ॥ शत शर तेणें सोडिले ॥ १९ ॥ ते शत शर सोडिले देखोन ॥ परम कोपला बभ्रुवाहन ॥ शुष्कपत्रनिभ कोटि बाण ॥ आकर्ण

१ घोडा. २ विषातें. ३ सर्पाची. ४ दहा कोटी. ५ समुदाय. ६ आकाश. ७ अर्जुनाला. ८ सोन्याचे पिसारे आहेत ज्यांला असे बाण.

ओढोनि विंधिले ॥ १२० ॥ तितुकेचि सोडिले दैत्यनाथें ॥ उभयतां भेदले शरघातें ॥ सर्वांगीं रुधिर वाहातें ॥ जैसे पर्वत शेंदुरें ॥ २१ ॥ दोघे वीर बलाढ्य भले ॥ सर्वांगीं रक्तें न्हाले ॥ तेव्हां कैसे शोभले ॥ जेवीं माघमासीं किंशुक[1] ॥ २२ ॥ गगनीं येवोनि जलधर ॥ आच्छादित जेवीं सहस्रकर ॥ प्रबळ वर्षों लागलें नीरें[2] ॥ तेवीं वर्षती शरधारा ॥ २३ ॥ मग पार्थात्मजें दैत्यहयां ॥ चहूं शरें नेलें यमालया ॥ सारथी मारिला त्या ठायां ॥ केला विरथ अनुशाल्व ॥ २४ ॥ कनकपुंखी दश बाण ॥ सोडिले आकर्ण ओढून ॥ तेणें दैत्यहृदय भेदोन ॥ छिन्न भिन्न तेव्हां केलें ॥ २५ ॥ येरू अन्य रथीं बैसला ॥ चापासी गुण चढविला ॥ बाणजाळें विंधिला ॥ पार्थात्मज ते काळीं ॥ २६ ॥ परम क्रोधें पार्थपुत्र ॥ बाण सोडिले एक सहस्र ॥ तेणें अनुशाल्वाचें रथगात्र ॥ तिळप्राय पैं केलें ॥ २७ ॥ दैत्येश पावला अतिक्रोधा ॥ करीं घेतली महागदा ॥ ह्मणे करीन तुझा चेंदा ॥ ह्मणोनियां सोडिली ॥ २८ ॥ मग पार्थसुतें काय केलें ॥ तीव्र बाणातें सोडिलें ॥ गदा छेदोनि ते वेळे ॥ दैत्य मूर्च्छित पाडिला ॥ २९ ॥ मग वृषकेतु महावीर ॥ समीरापरी[3] धांवला सत्वर ॥ तेणें पाचारिला पार्थकुमर ॥ युद्धाकारणें तेधवां ॥ १३० ॥ तें देखोनियां मदन ॥ त्यापुढें धांविन्नला आपण ॥ सुवर्णपुंख दहा बाण ॥ सोडिता झाला प्रतापी ॥ ३१ ॥ तयासी ह्मणे बभ्रुवाहन ॥ दावीं रे आपुलें आंगवर्ण[4] ॥ तूं सुकुमार कृष्णनंदन ॥ कैसें रण साहसील ॥ ३२ ॥ कृष्णप्रसादें झालासी सांग ॥ परी मी बभ्रुवाहन तुज करीन अनंग ॥ मग शरें भेदिलें त्याचें सर्वांग ॥ विकळ पडिला भूतळीं ॥ ३३ ॥ गाढ मूर्च्छेनें व्यापिला ॥ कार्याकार्य विसरला ॥ मग बभ्रुवाहन पेटला ॥ पार्थसैन्य जाळावया ॥ ३४ ॥ पार्थसैन्यसागरमंथन ॥ बळें करीत बभ्रुवाहन ॥ हाहाकार वर्तला जाण ॥ वीर पळती दशदिशां ॥ ३५ ॥ तों सावध झाला प्रद्युम्न ॥ वेगें सोडिले पांच बाण ॥ त्या कामबाणीं पार्थात्मजसैन्य ॥ मोह पावलें सर्वही ॥ ३६ ॥ कामेंकरूनि विव्हळ सर्व ॥ गळोनि गेले रणमदगर्व[5] ॥ हें तों त्यांसी नव्हे अपूर्व ॥ विश्वजन जेणें मोहिले ॥ ३७ ॥ गजाश्व पशु मानव ॥ सर्व पीडिले उपजे कामभाव ॥ शस्त्रास्त्रें टाकोनि सर्व ॥ काममोहें मोहिले ते ॥ ३८ ॥ अश्व भोगूं धांवती अश्विनी ॥ कुंजर[6] धरूं धांवती हस्तिणी ॥ उंष्ट्र[7] धांवती उष्ट्रीलागुनी ॥ ऐसी करणी मांडली ॥ ३९ ॥ कामबाणें व्यापिले वीर ॥ करिती स्त्रीशब्दउच्चार ॥ संग होतां वीर्यसागर ॥ तो काम केवीं हारपे ॥ १४० ॥ विवेकदीप मावळलियापाठीं ॥ अविवेक अंधकार करी दाटी ॥ मग उत्तमकर्मराहटी ॥ सहजचि लोपे त्या ठायां ॥ ४१ ॥ नातरी भ्रमें भ्रमलिया जन ॥ सहजचि विसरती कार्यकारण ॥ तेवीं सैन्य मोहिलें जाणोन ॥ भूतवेताळ क्रीडती ॥ ४२ ॥ यक्ष भूत प्रेतांचें दळ[8] ॥ आणि चतुःषष्टि योगिनी प्रबळ ॥ झोटिंग आणि वेताळ ॥ मांडिती खेळ रणांगणीं ॥ ४३ ॥ गजकुंभांचीं करूनि ताटें ॥ वाढिती वीरमांस चोखटें ॥ नररिशररक्तपान करिती घटघटें ॥ वाढिताती एकमेकां ॥ ४४ ॥ गजकुंभ-

१ पळस. २ उदक. ३ वाऱ्यासारखा. ४ सामर्थ्य. ५ रणासंबंधी अभिमान. ६ हत्ती. ७ उंट. ८ सैन्य.

स्थळें विदारिती ॥ आंतोनि मुक्ताफळें काढिती ॥ अस्थिपत्रें चर्में झांकिती ॥ वाणें देती परस्परें ॥४५॥ गजदंत घेवोनियां हातीं ॥ योगिनी त्या नरशिरें फोडिती ॥ भूत वेताळ ओढिती ॥ मांसरक्तासमवेत ॥ ४६ ॥ कूष्मांड भैरव कंकाळ ॥ महाभूतें यक्ष वेताळ ॥ सर्वही मिळोनि गोंधळ ॥ चामुंडेचा घालिती ॥ ४७ ॥ गाती नाचती हांसती ॥ गजशुंडाविणे वाजविती ॥ गजकोथळ्यांचे मृदंग करिती ॥ टाळ करिती गजकर्ण ॥ ४८ ॥ पायीं नरशिरांच्या घागरिया ॥ गजशुंडांच्या करिती मोहरिया ॥ नरवक्र वाजवूनियां ॥ पुढें नाचती योगिनी ॥४९॥ श्रृगाल गीध आणि वृक ॥ हे तेथींचे सभानायक ॥ पहाती नृत्यकौतुक ॥ भूत वेताळ प्रेतांचें ॥१५०॥ ऐसें युद्ध दारुण ॥ पार्थपुत्र आणि कृष्णनंदन ॥ माजविलें घोर रण ॥ दोघेही वीर दुर्निवार ॥ ५१ ॥ नरशिरें कमळें वाहती ॥ ढाला कूर्मरूपें पोहती ॥ पंचफणी फणाकृती हस्त धांवती ॥ काय ते वीर वैतरणी ॥ ५२ ॥ ऐसें रण मांडिलें कृष्णसुतें ॥ नदी वाहों लागली शोणितें ॥ नरमस्तकें वाहती तेथें ॥ केशशेवाळें व्यापिली ॥ ५३ ॥ ऐसें कृष्णात्मजें केलें कंदन ॥ देखोनि कोपला पार्थनंदन ॥ पुढिले प्रसंगीं युद्ध दारुण ॥ श्रोतेजनीं परिसावें ॥ ५४ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ ऐकतां हृदय होय शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १५५ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते बभ्रुवाहनप्रद्युम्नयुद्धं नाम त्रयोविंशोऽध्यायः ॥ ॥ २३ ॥ ॥ अध्याय ॥ २३ ॥ ॥ ओव्या ॥ ॥ १५५ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ऐक राया नृपती ॥ पुढील संगराची[1] स्थिती ॥ कोणेपरी युद्ध करिती ॥ तें सादर परिसावें ॥ १ ॥ तया रक्तनदीचे तीरीं ॥ फिरती श्वापदांच्या हारी ॥ शवें काढोनि बाहेरी ॥ भक्षिती नेत्र तयांचे ॥ २ ॥ मांसपंक नृकपालोपल[2] ॥ इहीं दुर्ग[3] रचिती विशाळ ॥ भूत भैरव आणि वेताळ ॥ युद्ध करिती गजदंतें ॥ ३ ॥ त्या दुर्गीं उभे राहती समग्र ॥ करिती नरशिरांचा मार ॥ आणि गजदंतांचे प्रहार ॥ करिती जाण परस्परें ॥ ४ ॥ ऐसें प्रद्युम्नें मारिलें दळ ॥ पार्थसुतदळीं सुटला पळ ॥ मग तो बभ्रुवाहन सबळ ॥ प्रळयाग्नीपरी कोपला ॥ ५ ॥ राया काम सर्वांतें छळी ॥ करितसे वीर्यहोळी ॥ परी क्रोधावतां चंद्रमौळी ॥ स्वदेहापासूनि मुकला ॥ ६ ॥ कीं भीष्मदेवें चरणातळीं ॥ केली कामाची रांडोळी ॥ कीं तो वातात्मज[4] महाबळी ॥ तेणें पायांतळीं घातला ॥ ७ ॥ तेवीं तारकारीनें[5] ठोकिला ॥ तैसाच शुकें पळविला ॥ तेवीं बभ्रुवाहनें शोषिला ॥ कामबळाब्धि ते काळीं ॥ ८ ॥ जेवीं गारुडीयाचें चेटक उदंड ॥ क्षणें निवारीत गांवगुंड ॥ तेवीं कामास्त्र वारूनि प्रचंड ॥ बभ्रुवाहन उठावला ॥ ९ ॥ रथ ध्वज सारथी हय[6] ॥ गजाश्व पदातींचा केला क्षय ॥ प्रद्युम्नसैन्यांत प्रळयसमय ॥ वाटला तेव्हां सर्वांसी ॥ १० ॥ प्रद्युम्नें घेतला आणिक रथ ॥ तोही छेदित पार्थसुत ॥ ऐसे छेदिले विंशति[7] रथ ॥ तया कृष्णात्मजाचे ॥ ११ ॥ परम कोपला कृष्णसुत ॥ छेदिला बभ्रुवाहनाचा रथ ॥ मग धांवोनियां त्वरित ॥ धरिला बभ्रुवाहन तो ॥ १२ ॥ चारी वेळां भवंडिला ॥ आकाशामाजी भिरकाविला ॥ येरूनें पडतां पडतां भिरकाविला ॥ प्रद्युम्नवीर आकाशीं ॥ १३ ॥ दोघेही बळी दारुण ॥ एकमेकां नाटोपती जाण ॥ दोघेही सिंहनादें गगन ॥ भरिते झाले तेधवां ॥ १४ ॥ दोघे शस्त्रास्त्रीं प्रवीण ॥ दोघेही रणरंगीं निपुण ॥ युद्धकौशल्य दारुण ॥ दावितातो नानाविध ॥ १५ ॥ युद्ध करिती आकाशीं ॥ सवेंचि उतरती भूमीसी ॥ जेवीं देखोनि आमिषासी ॥ खग[8] भांडती परस्परें ॥ १६ ॥ परस्परें सोडिती शर ॥ तेणें व्यापिलें अंबर[9] ॥ कबंधें उठलीं अपार ॥ नाचताती रणांगणीं ॥ १७ ॥ जेवीं सुरतीं स्त्री न देखे शरीर ॥ भेदल्या दुःख न मानी नर ॥ तेवीं झालिया शस्त्रप्रहार ॥ दुःख वीर न मानिती ॥ १८ ॥ कोणी खड्गहस्तें वीर पडिले ॥ कोणी त्रिशूळें विंधिले ॥ कोणी गदेनें निमाले[10] ॥ कोणी शक्तीनें आरंबळती ॥ १९ ॥ भुशुंडी परिघ पाश कुठार ॥ कुंतायुधादि शस्त्रें अपार ॥ भिंडिमाला मुसल नागर ॥ बभ्रुवाहन वर्षतसे ॥ २० ॥ अंकुशेंसहित पाडी कुंजर ॥ वीरेंसहित मारीत रहंवर ॥ शस्त्रेंसहित पदाती अपार ॥ भूमीवरी लोळवी तो ॥ २१ ॥ रथाश्व गज आणि पदाती ॥ एके शरें पाडीत क्षितीं ॥ ऐसें दळ मारिलें नेणों किती ॥ जेवीं अग्निसंगें तृणवन ॥ २२ ॥ ऐशी सकळ पार्थसेना ॥ वश जाहली बभ्रुवाहना ॥ गर्जना करीतसे वीरराणा ॥ कोणी नये सन्मुख ॥ २३ ॥ तों सावध झाला अनुशाल्व ॥ पुढती रणांत घेतली धांव ॥ नीळध्वज धांवला अभिनव ॥ स्वसैन्यातें घेउनी ॥ २४ ॥ सपुत्र यौवनाश्व प्रद्युम्न ॥ हंसध्वज आणि कर्णनंदन ॥ सर्वही राजे

---

१ युद्धाची. २ नरकपाळें हेच कोणी दगड. ३ किला. ४ मारुति. ५ कार्तिकस्वामीनें. ६ घोडे. ७ वीस. ८ पक्षी. ९ आकाश. १० मृत्यू पावले.

मिळोन ॥ पार्थपुत्र वेढिला ॥ २५ ॥ मग पांच पांच बाण तीक्ष्ण ॥ सर्वांतें मारी बभ्रुवाहन ॥ रथ अश्व सारथिहीन ॥ सर्वेही केले एकदांची ॥ २६ ॥ अर्धचंद्रबाणें ते वेळे ॥ निचेष्टित भूतळीं निजविले ॥ देहभान विसरले ॥ मरणकळा पातली ॥ २७ ॥ ललाटीं बाण भेद्ले दारुण ॥ तेणें रुधिराचें होय प्राशन ॥ जेवीं द्विजांसहित यजमान ॥ करी सोमपान स्वयागीं ॥ २८ ॥ कित्येक वीर भ्रमती धांवती ॥ दुःखें श्वासोच्छ्वास टाकिती ॥ ऐसे पार्थात्मजें शरघातीं ॥ वीर प्राणांतें मुकविले ॥ २९ ॥ कोणी वीर भयें नग्न पळाले ॥ त्यांसी वृक आडवे आले ॥ त्यांनीं मारूनि भक्षिले ॥ क्षणमात्र नलगतां ॥ ३० ॥ कोणी वीर रूपवंत ॥ कामिनीस्तनकुंकुमें चर्चित ॥ त्यातें शिवा नेतसे ओढित ॥ विदारूनि भक्षी आनंदें ॥ ३१ ॥ तंव अकस्मात विमान आलें ॥ त्यासी बैसवोनि चालविलें ॥ देवांगनेनें त्यातें वरिलें ॥ परम शूर ह्मणोनी ॥ ३२ ॥ ती त्यासी बोले हास्योत्तर ॥ रणीं पडिलें तुमचें शरीर ॥ शिवा करिती त्याचा विदार ॥ तें कौतुक पाहा जी ॥ ३३ ॥ मी देतें कीं आलिंगन ॥ शराऐसे खुपती स्तन ॥ मीही झालें निष्कारण ॥ तुह्मांकारणें तिजऐशी ॥ ३४ ॥ आणिक एक तेथें वीर ॥ प्रियादंतक्षतअधर ॥ रणीं त्यासी लागोनि शर ॥ मरोन स्वर्गा चालिला ॥ ३५ ॥ मग तो स्वर्गांगनेनें वरिला ॥ चुंबितां अधरोष्ठ दुखावला ॥ ऐसा व्यथा तो पावला ॥ कौतुकें रणीं यापरी ॥ ३६ ॥ तंव गज पडिला जो प्राणरहित ॥ बाणें झाला तो पूर्ण शांत ॥ तो स्वर्गीं जातां असे पाहत ॥ आपुला देह गजदेहीं ॥ ३७ ॥ स्वर्गीं देह देखे आपुला ॥ तो हिंदोळ्यामाजी बैसला ॥ स्वर्गांगना सेविती त्याला ॥ हिंदोळा हालविती स्वानंदें ॥ ३८ ॥ वरुणपाशीं बांधोनी ॥ अपार वीर पडिले रणीं ॥ तो देवांगनाहस्तपाशेंकरूनी ॥ बांधिला पाहे रणीं देह ॥ ३९ ॥ अपार शर वर्षतां पावला मरण ॥ दिव्यदेहीं केलें स्वर्गगमन ॥ तेथें सुर वर्षती शिरीं सुमन ॥ परी तेथून पाहे रणदेहा ॥ ४० ॥ क्रोधें वीरासी रणीं खंडितां ॥ तो शस्त्रघातें मरण पावतां ॥ तयासी चुंबिती स्वर्गीं वनिता ॥ परी रणदेहातें विलोकी ॥ ४१ ॥ ऐसे जे वीर पडिले समरंगणीं ॥ तयांसी भोगिती स्वर्गकामिनी ॥ दों देहांचा अनुभव घेउनी ॥ ह्मणती धन्य संग्राम ॥ ४२ ॥ ऐसा थोर महिमा रणींचा ॥ एक शूरचि ग्राहक त्याचा ॥ येर ऐकतांचि ही वाचा ॥ परम भयातें पावती ॥ ४३ ॥ असो खांडववनारिसुतें ॥ यापरी मारिलें सर्वही वीरांतें ॥ दश वाटा झाल्या सैन्यातें ॥ जेवीं वातें मेघपटल ॥ ४४ ॥ जे जे वीर बाणें भेदिले ॥ ते ते वैकुंठनगरीं चालिले ॥ अश्व गज रथ ते वेळे ॥ छिन्न भिन्न झाले ठायीं ठायीं ॥ ४५ ॥ प्रद्युम्नादि वीर समस्त ॥ रणीं पडिले स्मृतिरहित ॥ शरीरें झालीं प्रेतवत ॥ श्वासोच्छ्वास राहिले ॥ ४६ ॥ ऐसा तो रणकेसरी ॥ पार्थसैन्याचा संहार करी ॥ स्वनगरगिरिवरद्वारीं ॥ उभा राहोनि गर्जतसे ॥ ४७ ॥ पुढें जैमिनि मुनिभूषण ॥ सांगेल लवकुशाख्यान ॥ तें द्वादश प्रसंगीं निरूपण ॥ अति रसाळ पैं आहे ॥ ४८ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ४९ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते बभ्रुवाहनप्रद्युम्नयुद्धं नाम चतुर्विंशोऽध्यायः ॥ २४ ॥ अध्याय ॥ २४ ॥ ओव्या ॥ ४९ ॥ श्रीकृ० ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे गा भारता ॥ तुंबळ युद्ध झालें पितया आणि सुता ॥ जेवीं लवकुशा आणि रघुनाथा ॥ युद्ध झालें त्रेतायुगीं ॥ १ ॥ ऐसी ऐकतां ऋषिभारती ॥ संतुष्ट झाला पारीक्षिती ॥ हस्त जोडोनि करी विनंती ॥ ह्मणे आश्चर्य सांगतां जी ॥ २ ॥ श्रीराम भक्तकामकल्पद्रुम ॥ शिवहृदयविश्रामधाम ॥ ज्याचे नामश्रवणें कैवल्यधाम ॥ योगी पावती अनायासें ॥ ३ ॥ तो श्रीराम सर्वज्ञचूडामणी ॥ केवळ कैवल्यसुखाची खाणी ॥ तो पुत्रासी युद्धालागोनी ॥ किंनिमित्त प्रवर्तला ॥ ४ ॥ ते श्रीरामाचे नंदन ॥ सकळ रत्नांचें पूर्णधाम ॥ त्यांनीं जाणोनि कीं नेणोन ॥ शरें पितृचरण वंदिले ॥ ५ ॥ हा माझा संदेह पूर्ण ॥ स्वामींनीं करावा निवारण ॥ समूळ सांगावें कथन ॥ जें वर्तलें रामावतारीं ॥ ६ ॥ ऐसें ऐकोनि जैमिनी ॥ ह्मणे धन्य नृपचूडामणी ॥ तरी ती कथाकैवल्यखाणी ॥ उघडोनि तुज दाखवितों ॥ ७ ॥ आतां होऊनि सावधान ॥ ऐक रामकथानुसंधान ॥ जेणें तुटे भव-बंधन ॥ तेंचि संपूर्ण ऐकावें ॥ ८ ॥ श्रीराम सर्वज्ञ समर्थ ॥ आपुले जाणोनि ते सुत ॥ संग्राम केला अद्भुत ॥ पुत्रप्रताप पाहा-वया ॥ ९ ॥ आपणासहित बंधूंचा ॥ गर्व हरिला वानरांचा ॥ बाळांहातीं सर्व वीरांचा ॥ पराभव करोनि ॥ १० ॥ अवतारलीला रघुपती ॥ कळावया निजपुत्रांची ख्याती ॥ मायावी तो दाशरथी ॥ करीत लाघव पुत्रहस्तें ॥ ११ ॥ केवळ आह्मी सीताजनित ॥ जनक नेणोनियां निश्चित ॥ नाना शस्त्रीं निज तात ॥ पूजिला त्यांहीं संग्रामीं ॥ १२ ॥ संसारदशवदनरोगें व्यापिलें ॥ वीरअज्ञा-नकुपथ्यें दुणावलें ॥ सकळ जग मृत्युप्राय देखिलें ॥ आत्मारामें निजदृष्टीं ॥ १३ ॥ सद्भावदशरथाचेनि योगें ॥ सद्भक्तिकौसल्येचेनि अनुरागें ॥ श्रीराम वैद्यरूपी अभंगें ॥ जन्मला जैसा रवि तोयीं ॥ १४ ॥ धर्मार्थकाममोक्ष जाण ॥ ऐसे रविकुळीं जन्मले चौघे जण ॥ सकळ आनंदलें त्रिभुवन ॥ एक दशवदनावेगळें ॥ १५ ॥ नामस्मरण मंत्रमात्रा ॥ उच्चार करितांचि पुण्यवक्त्रा ॥ भावें ऐक-तांचि श्रोत्रपात्रा ॥ भवरोग पळाले तेथुनी ॥ १६ ॥ प्रथम अविद्याताटिका वधोनी ॥ विवेकगाधिजमख रक्षोनी ॥ अहल्या उद्ध-रोनि चरणीं ॥ सीतास्वयंवरा तो गेला ॥ १७ ॥ कौशिकपुलकसहवर्तमान ॥ काय रामें उचलिलें शरासन ॥ मग नृपाननेंसीं रघु-नंदन ॥ लवविता झाला कोदंडा ॥ १८ ॥ जनकमनीं संशयसमवेत ॥ धनुष्य टणत्कारी रघुनाथ ॥ वाटे जनकदुहिताचित्तासमवेत ॥ ओढीत राम गुण चापाचा ॥ १९ ॥ कनकाचळाऐसा थोर ॥ वाढला जो भार्गवअहंकार ॥ तेणेंसह काय रघुवीर ॥ भंगिता झाला धनुष्यातें ॥ २० ॥ नातरी ईशचाप पापें त्रासलें ॥ तेणें मन पश्चात्तापें तापलें ॥ तें पाप कोण ह्मणशील वहिलें ॥ सावध ऐकें जनमेजया ॥२१॥ शिवें विधिशिरश्छेद केला ॥ आणि मनोभव जाळिला ॥ भार्गवें स्वमातृवध केला ॥ संहार केला क्षत्रियांचा ॥ २२ ॥ ऐसे दोघे पापी थोर ॥ पूर्वीं त्यांचेसवें मी निरंतर ॥ तें आंगीं जडलें पाप थोर ॥ मनीं विचार करीतसे ॥ २३ ॥ ह्मणे रामपाणी स्पर्शतां ॥ मुक्तीस पावेन मी तत्वतां ॥ मग तेणें सांडोनि निजजीविता ॥ केलें देहाचें पुरश्चरण ॥ २४ ॥ यापरी

भक्तकामकल्पद्रुमें ॥ शिवहृदयविश्रामधामें ॥ त्र्यंबकचाप भंगोनि प्रतापकामें ॥ वरिली निष्काम जानकी ॥ २५ ॥ भार्गवअहंकारदैत्य भंगोनी ॥ बाणें स्वर्गगति त्याची रोधुनी ॥ मग येऊनि अयोध्यापट्टणीं ॥ सुखें क्रीडे श्रीराम ॥ २६ ॥ पितृआज्ञा शिरीं वंदुनी ॥ धैर्यलक्ष्मण सवें घेउनी ॥ चिच्छक्ति जनकजा पुढें करुनी ॥ ब्रह्मारण्यासी चालिला ॥ २७ ॥ ब्रह्मारण्यामध्यें नृसिंह एक ॥ त्याचा ऐकतां नामघोष ॥ महापातक कुंजर अनेक ॥ पळोनि गेले दिगंता ॥ २८ ॥ सद्भक्त वानरदळ मेळवून ॥ अहंतासिंधूंत सेतु बांधून ॥ लिंगदेहलंका वेढून ॥ प्रपंचरावण निवटिला ॥ २९ ॥ पूर्वार्ध सिंधुशत्रूचें जन्म ॥ उत्तरार्ध रविसुताचें नाम ॥ दोनी मिळोनि राक्षसोत्तम ॥ तोही वधिला श्रीरामें ॥ ३० ॥ दिनकरसुतारितातवैरी ॥ तोही मारविला लक्ष्मणकरीं ॥ निजशक्ति जनकजा सुंदरी ॥ सोडविली श्रीरामें ॥ ३१ ॥ वधोनि राक्षसांच्या कोटी ॥ तोडिली देवांची बंदवटी ॥ ऐसी करूनि प्रतापप्रौढी ॥ विश्व भरिलें कीर्तीनें ॥ ३२ ॥ विजयी होऊनि रघुनाथ ॥ मग तो बिभीषण शरणागत ॥ कनकपुरराज्यासनीं स्थापित ॥ केला चिरंजीव अक्षयी ॥ ३३ ॥ स्वयें अग्नीची अंतरकळा ॥ लौकिकाग्निशुद्ध जनकबाळा ॥ स्वयें घेऊनि भक्तपाळा ॥ राम चालिला तेथोनी ॥ ३४ ॥ मनोरथीं बैसला रघुनंदन ॥ वायुसुताचे स्कंधीं लक्ष्मण ॥ रामशब्दें कपिगण ॥ गर्जत गगनीं चालिले ॥ ३५ ॥ सुग्रीव बिभीषण लंकानाथ ॥ नळनीळ आणि जांबुवंत ॥ अंगदादि वीर समस्त ॥ रामसंगें चालिले ॥ ३६ ॥ नंदिग्रामीं भरत बंधु ॥ तयासी भेटला सौख्यसिंधु ॥ हरोनियां त्याचा खेदु ॥ मग शत्रुघ्नासी भेटला ॥ ३७ ॥ सवें घेऊनि बंधुवरा ॥ पुढें चालिला निजनगरा ॥ तें जाणवलें वसिष्ठादि मुनिवरां ॥ तेही सन्मुख पातले ॥ ३८ ॥ तो चतुराननाचा नंदन ॥ सकळविद्यांचें जीवन ॥ ज्याचे वंदितां चरण ॥ भवबंधन निवारे ॥ ३९ ॥ ज्याचा करून नामोच्चार ॥ शिष्य पावले संसारपार ॥ ज्याचिया ज्ञानार्कासी समोर ॥ न राहे अंधार अविद्येचा ॥ ४० ॥ अनुभवामृतसिंधुचंद्र ॥ जो विवेकवैराग्यभूधर[1] ॥ जो देहअहंकारद्रुमकुठार ॥ ऐसा वसिष्ठ देखिला ॥ ४१ ॥ दुरून देखतां गुरुचरण ॥ राघव उतरला रथावरून ॥ सद्भावें करूनियां नमन ॥ क्षेमालिंगन दिधलें ॥ ४२ ॥ ह्मणे श्रीगुरुप्रसादेंकरून ॥ निर्मूळ केला प्रपंचदशानन ॥ विदेहनंदिनी मुक्ति घेऊन ॥ स्वामिचरण पाहिले ॥ ४३ ॥ साध्य साधिलियावरी ॥ गुरुसेवा उरे निर्धारी ॥ त्या अद्वयभजनाची परी ॥ विरळा जाणे गुरुभक्त ॥ ४४ ॥ ऋषिवरांसहित श्रीवर ॥ प्रवेशला अयोध्यापुर ॥ नगरीं झाला आनंद थोर ॥ सर्वही जनांकारणें ॥ ४५ ॥ ह्मणे जिचे प्रसादें ख्याति झाली ॥ रावणवधें कीर्ति वाढली ॥ ती कैकयी भेटवा माउली ॥ चरण वंदूं तियेचे ॥ ४६ ॥ भावें वंदून कैकयीचरण ॥ प्रेमें दिधलें आलिंगन ॥ केलें दुर्बुद्धीचें हरण ॥ सुबुद्धि दिधली कैकयीसी ॥ ४७ ॥ जिच्या पुत्रें प्राणरक्षण ॥ चौदा वर्षें केलें पूर्ण ॥ त्या सुमित्रेचे वंदून चरण ॥ क्षेमालिंगन दिधलें ॥ ४८ ॥

---

१ विवेक आणि वैराग्याचा पर्वत.

ह्मणे या देहतरूची अवनी ॥ कोठें आहे कौसल्याजननी ॥ ती साश्रुनेत्रीं सद्गद होऊनी ॥ वाट पाहे रामाची ॥ ४९ ॥ दुरून देखतां मातृचरण ॥ रामें घातलें लोटांगण ॥ सप्रेमें केलें वंदन ॥ क्षेमालिंगन दिधलें ॥ ५० ॥ करी मस्तकाचें अवघ्राण[1] ॥ सोडी मुक्ताश्रू नेत्रीं जाण ॥ पाहोनियां निजनंदन ॥ हर्ष पोटीं न समाये ॥ ५१ ॥ भ्रतारमरणें अति दुःखित ॥ रामवियोगें केवळ मृत ॥ तियेसी देऊनि क्षेमामृत ॥ रामें सजीव ती केली ॥ ५२ ॥ अंकीं बैसवोनि निजसुता ॥ पुत्रवदनेंदु पाहे माता ॥ नेत्रचकोरां तत्वतां ॥ धणी[2] पाहतां न पुरे ॥ ५३ ॥ करें रामशरीर स्पर्शिलें ॥ तंव राक्षसशस्त्रीं क्षतावलें ॥ मग वसिष्ठवचन आठविलें ॥ जें कां पूर्वीं बोलिला ॥ ५४ ॥ हा तो अच्छेद्य[3] आत्माराम ॥ हा अदाह्य शशिधरविश्राम[4] ॥ हा अक्लेद्य[5] कल्पद्रुम[6] ॥ ह्मणे तें अन्यथा कां झालें ॥ ५५ ॥ आणि बोलिली ती बोला ॥ शिवभक्त रावण भला ॥ त्याचा संहार याणें केला ॥ सहकुळीं जाउनी ॥ ५६ ॥ त्या शिवभक्ताचे पुण्यबाण ॥ तयांसी दिधलें आंगीं स्थान ॥ ऐसा भक्तवत्सल कृपाघन ॥ स्वामिवाक्य असत्य नव्हे ॥ ५७ ॥ ऐसें ऐकोनि मातृवचन ॥ परम तोषला रघुनंदन ॥ पुनः पुनः क्षेम देऊन ॥ वारंवार नमन करी ॥ ५८ ॥ ऐसियापरी लक्ष्मण ॥ यथा-नुक्रमें करी वंदन ॥ सर्वांलागीं नमून ॥ आला रामाजवळिकें ॥ ५९ ॥ तैसेंच विदेहात्मजारत्न ॥ सर्वांस करूनि नमन ॥ श्वश्रूसी करूनि वंदन ॥ अंतःपुरीं राहिली ॥ ६० ॥ राम पावला स्वनगरा ॥ परमानंद झाला समग्रां ॥ दुःखदैन्यासी थारा ॥ राहिला नाहीं त्या स्थळीं ॥ ६१ ॥ मग वसिष्ठें पाहोनि मुहूर्त ॥ भद्रीं बैसविला नृपनाथ ॥ त्रिभुवन झालें आनंदभरित ॥ रामराज्य पैं झालें ॥ ६२ ॥ तिघे बंधु सेवा करिती ॥ मध्यें शोभे राममूर्ती ॥ पुढें उभा मारुती ॥ हस्तकमळें जोडोनी ॥ ६३ ॥ मग बिभीषणादि सर्व वीर ॥ वस्त्रालंकारीं गौरविले समग्र ॥ त्यांचे मानोनि उपकार ॥ निजभुवना पाठविले ॥ ६४ ॥ भद्रीं देखतां रामचंद्र ॥ सर्वांचे नेत्र झाले चकोर ॥ सज्जनसोमकांतपाझर ॥ द्रवों लागले तेधवां ॥ ६५ ॥ रामराज्य प्रगटलें ॥ सकळ विश्व आनंदलें ॥ दैन्य दरिद्र पळालें ॥ पाप संताप हरला ॥ ६६ ॥ राज्य करितां गुणनिधी ॥ पळोनि गेली आधिव्याधी ॥ घरोघरीं समृद्धी ॥ जें इच्छिलें तें प्राप्त होय ॥ ६७ ॥ अकाळीं मृत्यु नसे जनासी ॥ नवनिधी लोळती बिदीसी ॥ कोणी न घेती तयांसी ॥ श्रीराम निधान देखोनी ॥ ६८ ॥ सदा फळें वृक्ष फळती ॥ वांझा गायी दुग्ध देती ॥ वंध्या कामिनी प्रसवती ॥ मेघ वर्षती यथाकाळीं ॥ ६९ ॥ ब्राह्मणांघरीं वेदपठण ॥ करिती नाना यागहवन ॥ वेदांतवाक्य कथाश्रवण ॥ घरोघरीं जन करिती ॥ ७० ॥ बंध हा शब्द केशसुमनाला ॥ दंड हा शब्द असे छत्राला ॥ मारशब्द असे अरीला ॥ हारी स्त्रीपुरुषां रतिरंगीं ॥ ७१ ॥ परी एक शोक अवधारा ॥ अतिथि आज न आला घरा ॥ रामें धनदानें तृप्त समग्रां ॥ केले मग येती कैंचे ॥ ७२ ॥ श्रीरामकर तोचि जीमूत ॥ माजी रत्नकंकणें

---

१ हुंगणें. २ तृप्ति, संतोष. ३ तोडण्यास अशक्य. ४ शंकराचें विश्रांतीचें स्थान. ५ कधीं न भिजणारा. ६ कल्पवृक्ष.

वीज झळकत ॥ प्रारब्धपुण्यें उंच होत ॥ स्मरणामृत वर्षतसे ॥ ७३ ॥ गुणग्राम भूमी ती भिजली ॥ कीर्तितरंगिणी दाटली ॥ याचकसरोवरें पूर्ण भरली ॥ पंडितदरिद्राग्नि शमलासे ॥ ७४ ॥ ऐसें वर्तलें रामराज्य ॥ घरोघरीं भक्ष्यभोज्य ॥ सर्व करिती साम्राज्य ॥ रामचंद्रप्रसादें ॥ ७५ ॥ ऐसें रामराज्य करितां ॥ पुढें वर्तली कैसी कथा ॥ ती पुढिले प्रसंगीं आतां ॥ अमृतासम परिसावी ॥ ७६ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ श्रवण करितां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ७७ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते लवकुशआख्यानं नाम पंचविंशोऽध्यायः ॥ २५ ॥ ॥ अध्याय ॥ ॥ २५ ॥ ओव्या ॥ ७७ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे गा भारता ॥ सावध ऐकें रामकथा ॥ समूळ जाईल भवव्यथा ॥ भावें श्रवण केलिया ॥ १ ॥ ऐसा नवसहस्र वर्षें रघुनाथ ॥ राज्य करितां अद्भुत ॥ तंव चिंता झाली प्राप्त ॥ पुत्र पोटीं असावा ॥ २ ॥ कधीं मज होईल संतान ॥ ह्मणोनि चिंती रघुनंदन ॥ तैसेंच भूगर्भरत्न[1] ॥ चिंतानळें पुत्राच्या ॥ ३ ॥ प्रकृतिपुरुष दोघेंजणें ॥ स्वइच्छा प्रसवलीं चौदा भुवनें ॥ तीं काय शोभती या संतानें ॥ परी अवतारलीला दाविती ॥ ४ ॥ पुढें कोणे एके काळीं ॥ विष्णुदैवत[2]नक्षत्रमेळीं ॥ गर्भ धरी जनकबाळी[1] ॥ देखोनि राम संतोषला ॥ ५ ॥ मग तो गर्भ दिवसेंदिवस ॥ वाढे गगनीं जेवीं तारेश ॥ गर्भासी झाले पंच मास ॥ तों तों राघवेश संतोषे ॥ ६ ॥ तंव एके दिनीं रघुनंदन ॥ रात्रौ देखतसे स्वप्न ॥ गंगातीरीं सीतारत्न ॥ करी रुदन दीनवदनीं ॥ ७ ॥ उठोनि स्मरे पार्वतीवरा ॥ बरवें न वाटे जनकजावरा ॥ मग पाचारोनि गुरुवरा ॥ स्वप्न सांगे श्रीराम ॥ ८ ॥ म्यां देखिलें जी स्वप्न ॥ सीतागर्भासी उदेलें विघ्न ॥ तरी करावें जी हवन ॥ यथाविधि स्वामिया ॥ ९ ॥ बरवें ह्मणोनि गुरुनाथ ॥ त्वरें काढिला मुहूर्त ॥ वैशाखशुद्ध पंचमीआंत ॥ पुष्य नक्षत्र ते दिवसीं ॥ १० ॥ मुहूर्त पाहोनि अनुरागें ॥ श्रीरामचंद्रास जावोनि सांगे ॥ सच्छिष्यवरा ऐक वेगें ॥ मुहूर्त आला पंचमीसी ॥ ११ ॥ तों काळपर्यंत रघुनंदना ॥ करीं विप्रसंतर्पणा ॥ मीही संपादीन यज्ञसाधना ॥ तव आज्ञेंकरूनि ॥ १२ ॥ ऐसें ऐकोनि सद्गुरुवचन ॥ श्रीरामें पाचारिला लक्ष्मण ॥ ह्मणे तुवां सत्वर जाऊन ॥ मैथिलेश आणावा ॥ १३ ॥ तैसाचि गाधिनंदन ॥ तुवां आणावा प्रार्थून ॥ जनकनंदिनीचें पुंसवनें[3] ॥ पंचम दिनीं नेमिलें ॥ १४ ॥ ऐकोनि ऊर्मिलानायक ॥ मनीं पावला हरिख ॥ मग वंदोनि सीतानायक ॥ रथीं बैसोनि चालिला ॥ १५ ॥ मग शिल्पिकां पाचारोनि भूप ॥ षट्कोण करविला यज्ञमंडप ॥ पाचारों धाडिले सर्व नृप ॥ अगस्त्यादि सर्व ऋषी ॥ १६ ॥ तेथें वसिष्ठें केलें स्थंडिल ॥ केली औदुंबरफळांची माळ ॥ सूत्र वेष्टोनि विशाळ ॥ औदुंबरपीठ आणवी ॥ १७ ॥ ऐसी क्रिया संपादून ॥ सिद्ध बैसला ब्रह्मनंदन ॥ तों शीघ्र आला लक्ष्मण ॥ विदेहासी घेवोनियां ॥ १८ ॥ वंदन करोनि बोले लक्ष्मण ॥ जनक आणि गाधिनंदन ॥ शीघ्र तयांसी घेवोन ॥ येथें आलों स्वामिया ॥ १९ ॥ रामें तयांसी करूनि वंदन ॥ आदरें दिधलें आलिंगन ॥ अर्घ्यपाद्यादि पूजाविधान ॥ करोनियां स्तवीत ॥ २० ॥ मग मुहूर्त प्राप्त झाला असतां ॥ ब्रह्मसुत ह्मणे रघुनाथा ॥ जनकजेसहवर्तमान आतां ॥ मंगल स्नान करावें ॥ २१ ॥ मातृबंधूंसहवर्तमान ॥ यावें यज्ञमंडपालागोन ॥ ऐसें ऐकोनि गुरुवचन ॥ अभ्यंग करवी सीतेसी ॥ २२ ॥ सहोदर आणि सपत्नीक ॥ मंडपाप्रति आला रघुनाथ ॥ तंव मिळाले सकळ लोक ॥ नाना उपायनें घेऊनि ॥ २३ ॥ मुनि ह्मणे राया तो श्रीराम ॥ यथार्थचि असे आत्माराम ॥ परी गुरुवचनीं मानूनि विश्राम ॥ आश्रमधर्म संपादी

१ सीता. २ श्रवणनक्षत्रावर. ३ गर्भ राहिल्यावर दुसऱ्या किंवा चवथ्या, सहाव्या, आणि आठव्या महिन्यांत गर्भास पुंस्त्वप्राप्तीकरितां जो विधि करितात तो.

॥ २४ ॥ निगमागमज्ञ[1] अति सुशीळ ॥ सदाचारी धर्मज्ञ यागकुशळ ॥ ऐसें मिळालें विप्रमंडळ ॥ करित घोष वेदांचे ॥ २५ ॥ असो पुण्याहवाचन करोनि रामें ॥ होम संपादिला यथानुक्रमें ॥ यश संपादोनि नियमें ॥ अभिषेक आरंभिला ॥ २६ ॥ सीता-मस्तकीं ब्रह्मनंदन ॥ करिता झाला सूत्रवेष्टन ॥ औदुंबरमाळा कंठीं घालून ॥ कुरळीं त्रिशुक्ली[2] खोंविली ॥ २७ ॥ कैसी शोभे जन-कबाळा ॥ नेणों ब्रह्मांडगोळाची माळा ॥ कंठीं घालोनि वेल्हाळा ॥ अभिनव शोभली ॥ २८ ॥ मग वीणावादन करी भरत ॥ तेणें संतुष्ट जगन्नाथ ॥ तें गर्भस्थीं ऐकावें गीत ॥ ह्मणून ऐकवी सीतेतें ॥ २९ ॥ स्वयें असोनि मंगलायतन[3] ॥ रामें केलें मंगल हवन ॥ करी पायसाज्यशर्करापान ॥ ब्राह्मणां दिव्यान्नें दिधलीं ॥ ३० ॥ मग रथाश्वगजदानें ॥ वस्त्रालंकारभूषणें ॥ विप्रांलागीं दशरथनंदनें ॥ अपार दक्षिणा दिधली ॥ ३१ ॥ वैराग्य पावोनि नृपजनक ॥ आपुलें राज्य तें निष्कलंक ॥ रामजामातासी सम्यक ॥ देवोनि तपासी तो गेला ॥ ३२ ॥ विप्र आणि नृपगण ॥ राघवें गौरविले संपूर्ण ॥ तयांसी देऊन आज्ञावचन ॥ निजस्थाना पाठ-विले ॥ ३३ ॥ एकदा नृपचूडामणी ॥ रात्रीं सीतेशीं निजशयनीं ॥ संतुष्ट होवोनियां मनीं ॥ सीतेप्रति अनुवादे ॥ ३४ ॥ राम वदे हो शशिवदने ॥ शरत्कमलदललोचने ॥ काय आवडतें तव मनें ॥ मजलागीं तें सांगिजे ॥ ३५ ॥ येरी ह्मणे रघुकुळटिळका ॥ शिवहृदयविश्रामकारका ॥ तव प्रसादें जगन्नायका ॥ सर्व मनोरथ पूर्ण असती ॥ ३६ ॥ तथापि आवडी घेतली जीवें ॥ गंगा-तटीं जावोनि राहावें ॥ आणि ऋषिपत्न्यांसी सेवावें ॥ हेंचि आवडे मानसीं ॥ ३७ ॥ ऐसें ऐकोनि तयेस ॥ सस्मित बोले राघ-वेश ॥ चौदा वर्षें केला वनवास ॥ तरी वांछा उरली तुझी ॥ ३८ ॥ हें काय मागितलें प्रिये ॥ परी तव वचन भंगूं नये ॥ प्रातः-काळींच पुण्यनिलये[4] ॥ गंगातीरा पाठवितों ॥ ३९ ॥ ऐसें बोलोनि रघुनंदन ॥ मग करिता झाला शयन ॥ तंव लोटलें शर्वरी-मान ॥ दोनी याम तेधवां ॥ ४० ॥ तंव ते आले गुप्त चार ॥ तयांप्रति वदला सीतावर ॥ ह्मणे काय लौकिकाचार ॥ श्रवणीं ऐकिला तुह्मीं रे ॥ ४१ ॥ तुह्मी सर्वत्र फिरोन ॥ काय ऐकिलें वर्तमान ॥ लोक बोलती पैशुन्य ॥ माझें किंवा प्रियेचें ॥ ४२ ॥ दूत ह्मणती श्रीरामा ॥ भक्तकामकल्पद्रुमा ॥ निगमागमाची सीमा ॥ तव वर्णनीं जाहली ॥ ४३ ॥ करितां तव नामस्मरण ॥ होय पातकांचें दहन ॥ ऐशा तुज बोलेल दोषवचन ॥ संपूर्ण तो अधःपाती ॥ ४४ ॥ तथापि लोक हे अनिवार ॥ कांहीं बोलती निंद्यो-त्तर ॥ तें सांगतां अंतर ॥ भय पावलें श्रीरामा ॥ ४५ ॥ तंव श्रीराम ह्मणे दूता ॥ माझी तुह्मांसी निर्भयता ॥ जी ऐकिली असेल वार्ता ॥ ती तत्वतां सांगावी ॥ ४६ ॥ तंव दूत ह्मणती रघुनाथा ॥ रात्रीं नगरीमाजी फिरतां ॥ एक रजक दुष्ट होता ॥ तेथें कलह मांडला ॥ ४७ ॥ तया रजकाची तरुण पत्नी ॥ चार दिवस होती पितृसदनीं ॥ तो तिचा पिता बोले नंदिनि ॥ ही तों

१ वेद व स्मृति जाणणारा. २ तीन जागीं शुभ्र असलेलें साळशीत. ३ सुखाचें स्थान. ४ पुण्यवती स्त्रिये.

करणी भली नव्हे ॥ ४८ ॥ चिरकाळ पितृगृहीं असतां ॥ लोक निंदिती तत्वतां ॥ क्रोध येईल जामाता ॥ कां राहिली ह्मणोनि ॥ ४९ ॥ लावण्यरूप यौवनसरिता ॥ स्त्रीदेहाची आली तत्वतां ॥ जनकें गृहीं न ठेवावी दुहिता ॥ भ्रतार शीघ्र कोपेल ॥ ५० ॥ शिखा स्वस्थानीं दिसे साजिरी ॥ तेवीं भ्रतारगृहीं तरुण नारी ॥ जरी ठेवितां आत्ममंदिरीं ॥ उद्धट होय अविचारें ॥ ५१ ॥ ऐसा रजकें केला विचार ॥ समागमें घेतले आप्त नर ॥ कन्या घेवोनि सुंदर ॥ जामातगृहा चालिला ॥ ५२ ॥ तों भ्रतारें देखूनि तीतें ॥ अत्यंत कोपला चित्तें ॥ श्वशुर प्रार्थी तयातें ॥ अपराध क्षमा करावा ॥ ५३ ॥ आजिपासोनि मम मंदिरा ॥ जरी येईल तुमची दारा ॥ तरी बरवी शिक्षा करा ॥ या अपराधा सोसावें ॥ ५४ ॥ तंव तो बोले रजक अधम ॥ तो मी नव्हे श्रीराम ॥ षण्मास सेविलें राक्षसधाम ॥ ती सीता पुनः भोगितो ॥ ५५ ॥ तरी तो पडिला नृपनाथ ॥ युक्तायुक्त त्यासी चालत ॥ आह्मी तों दुर्बळ निश्चित ॥ लोकापवादा भीतसों ॥ ५६ ॥ ऐसें वारंवार बोले अधम ॥ तें ऐकोनि वाटला भ्रम ॥ तुज पाहातां रामा श्रम ॥ सर्व माझा निरसला ॥ ५७ ॥ जरी नीच बोले हीन वचन ॥ त्याचें काय मानावें दूषण ॥ जरी महाजन निंदिती जाण ॥ त्याचें दूषण लागेल ॥ ५८ ॥ याची पहावी प्रचीती ॥ परी गुणातें न जाणे मंदमती ॥ उष्ट्र सोडी सकळ लतेप्रति ॥ परी तो कंट-कातें घेतसे ॥ ५९ ॥ आकाश करावें काळें ॥ ह्मणोनि करें घेतलीं काजळें ॥ परी लावितां निराळें ॥ आकाश जैसें तैसेंचि ॥६०॥ तेवीं आत्माराम तूं निर्मळ ॥ तुज कोण लावील मळ ॥ ऐसें दूतवाक्य निर्मळ ॥ परी रामवदनेंदु कोमला ॥ ६१ ॥ चिंता पावोनि रघुनंदन ॥ दूतांसी दिधलें आज्ञावचन ॥ मग तयाचें जें विचारण ॥ करिता झाला मानसीं ॥ ६२ ॥ निःपाप सत्य जनकबाळी ॥ अग्निमुखीं दिव्य झाली ॥ परी लोकांची विपरीत बोली ॥ यासी कैसें करावें ॥ ६३ ॥ तरी वल्लभेचा[1] त्याग करावा ॥ लोकापवाद रक्षावा ॥ ऐसा विचार केला परी राघवा ॥ मोह झळंबे कांतेचा ॥ ६४ ॥ फुल्लपंकेरुहनेत्रा ॥ पूर्णराकाधिपचारुवक्त्रा[2] ॥ कोटिमद-नभाव दिव्यगात्रा ॥ कैसी त्यजूं निरपराधें ॥ ६५ ॥ ऐसा कनकपुराधिपअरी[3] ॥ परम पडिला विचारीं ॥ सोडूं कीं न सोडूं येर-झारीं ॥ मन पडिलें तयाचें ॥ ६६ ॥ जो आगमनिगमाप्रमेय[4] ॥ ब्रह्मादिक वंदिती पाय ॥ तो राम लोकापवादाचें भय ॥ धरिता झाला मानसीं ॥ ६७ ॥ चिंतार्णवें झाला दीन ॥ तों पूर्वेस उगवला तपन ॥ मग सेवकादि बंधुजन ॥ आले दर्शना रामाच्या ॥ ६८ ॥ तंव तो कैवल्यायतन ॥ परम देखिला म्लानवदन ॥ परस्परें बोलती वचन ॥ राम सकोप कां झाला ॥ ६९ ॥ शीघ्र आमुचें न झालें आगमन ॥ किंवा न करूं धर्मदान ॥ कीं न करूं विप्रांचें रक्षण ॥ ह्मणोनि राम कोपला ॥ ७० ॥ कीं दानधर्म करितों थोडा ॥ ह्मणोनियां तो कोपला गाढा ॥ आह्मां न कळेचि मूढां ॥ मनोगत तयाचें ॥ ७१ ॥ ह्मणोनि दूरचि थोकले ॥

---

१ पत्नीचा. २ पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें मुख आहे जिचें अशी. ३ लंकापुराचा राजा जो रावण त्याचा शत्रु राम. ४ वेद व निगम=स्मृत्यादिक, यांना अतर्क्य.

भिवोनि पुढें पुढें आले ॥ मग वंदोनि रामपाउलें ॥ उभे ठाकले बद्धांजली ॥ ७२ ॥ बद्धांजलि होऊनि विनती ॥ करिते झाले रामाप्रति ॥ आह्मी तुझे दास निश्चितीं ॥ कां क्रोधदृष्टी आह्मांतें ॥ ७३ ॥ वारंवार बंधु विनविती ॥ परी न बोलेचि रघुपती ॥ बंधू काकुळती येती ॥ कां न बोला जी स्वामिया ॥ ७४ ॥ ऐकोनि ऐसें बंधुवचन ॥ काय बोले जगज्जीवन ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ सावधान अवधारा ॥ ७५ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ रामकथामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ७६ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते कुशलवाख्यानं नाम षड्विंशोध्यायः ॥ २६ ॥
॥ अध्याय ॥ ॥ २६ ॥ ॥ ओव्या ॥ ७६ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे नृपसुता ॥ एकाग्र करीं चित्त आतां ॥ श्रवणीं ऐकें रामकथा ॥ जी भवरोगव्यथा दूर करी ॥ १ ॥ रामें ऐकोनि भ्रातृवचन ॥ तयांप्रति सांगे दूतकथन ॥ मी आतां सीता त्यागीन ॥ येथें संदेह न धरावा ॥ २ ॥ राम ह्मणे ऐक भरता ॥ मी तों त्यजितों कीं सीता ॥ भवभय हरोनि चित्ता ॥ योगी ममता जेवीं टाकी ॥ ३ ॥ जानकीतें लोक निंदिती ॥ जेवीं पाखंडी दूषिती श्रुती[1] ॥ ऐसें राम बोलतां निश्चितीं ॥ झाला वज्रपात तयातें ॥ ४ ॥ नेत्रीं सुटल्या अश्रुधारा ॥ भयें कांपे थरथरां ॥ रोमांच उठती सर्व शरीरा ॥ मुखें हरिहरां आठवी ॥ ५ ॥ तंव भरत ह्मणे जी रघुनाथा ॥ हें काय आणिलें जी चित्ता ॥ सकळ जन बोलती वार्ता ॥ कृपाळू तूं श्रीरामा ॥ ६ ॥ पैशुन्या[2]पासोनि शुद्ध कपिलां[3] ॥ बळें सोडविली दयाळा ॥ दुष्ट स्पर्शला ह्मणोनि तिजला ॥ काय वनीं सोडावें ॥ ७ ॥ तरी क्रोध हाचि मातंगें[4] ॥ तेणें स्पर्शिलें तुमचें अंग ॥ ह्मणोनि शस्त्रें तनूचा[5] भंग ॥ काय करावा राघवा ॥ ८ ॥ पवित्र ती भागीरथी ॥ शूद्रजाती विटाळ करिती ॥ ब्रह्मादि सुरवर काय वर्जिती ॥ तियेलागीं राघवा ॥ ९ ॥ ह्मणोनि ऐक राघवेशा ॥ अग्निमुखें ही शुद्ध राजसा ॥ पितृवाक्यामृत सहसा ॥ कैसें विसर पावलेती ॥ १० ॥ प्रळयानळाची दीप्ति[6] ॥ ज्वाळा गगना कवळिती ॥ तयांमाजी ही सीता सती ॥ देखोनि दशरथ बोलिला ॥ ११ ॥ शुद्ध शुद्ध ही जनकनंदिनी ॥ रामा संदेह न धरीं मनीं ॥ इनें आमुचे वंशालागुनी ॥ पॉंवन केलें निर्धारें ॥ १२ ॥ पुत्रशोकें मरण पावलों ॥ तो इचेनि सद्गतीस गेलों ॥ ऐसें ब्रह्मादिकां बोलिलों ॥ तें कां विसरलासी श्रीरामा ॥ १३ ॥ सकळ सृष्टि शोधितां ॥ इजसमान नाहीं पतिव्रता ॥ जी कां त्रैलोक्याची माता ॥ ती काय रामा त्यजावी ॥ १४ ॥ जी हें ब्रह्मांड घडी मोडी ॥ इच्छामात्रें निर्मी देवकोडी ॥ त्या जगज्जननीस खोडी ॥ काय वाचे बोलवे ॥ १५ ॥ त्या ब्रह्मादिकांचें वचन ॥ स्वश्रवणीं केलें श्रवण ॥ ऐसें असोनि नेणतपण ॥ कां करितां श्रीरामा ॥१६॥ ऐसें बोलतां भरत ॥ तयाप्रति बोले रघुनाथ ॥ तूं बोलसी तें यथार्थ ॥ परी अनिवार जननिंदा ॥१७॥ जननिंदेचें संभाषण ॥ रायासी हें परम दूषण ॥ सद्यः करी यशहरण ॥ कीर्तिसदन पाडोनि ॥ १८ ॥ भगीरथ पुरूरवा ययाती ॥ इक्ष्वाकु हरिश्चंद्र चक्रवर्ती ॥ अद्यापि तयांची कीर्ती ॥ सकळ वर्णिती निजमुखें ॥ १९ ॥ कीर्तिविरहित जन्म ॥ तो परम दुर्मरणासमान ॥ त्यासी न भेटे सर्वोत्तम ॥ व्यर्थ वांचणें तयाचें ॥ २० ॥ स्त्री पुत्र भ्राता प्रिय ज्यास ॥ परी त्यांच्या योगें घडे अपयश ॥ त्यांचा त्याग करावा निःशेष ॥ तरीच सौख्य पावावें ॥ २१ ॥ कीर्तिनिमित्त सोडिती प्राण ॥ कीर्तिनिमित्त टाकिती राज्य धन ॥ लोकनिंदा तस्कर दारुण ॥ सत्कीर्तिधना चोरिती ॥ २२ ॥ जरी माझें इच्छिसी जीवन ॥ तरी आणिक न बोलें वचन ॥ वनीं सीतेतें त्यजोन ॥ करीन रक्षण स्वकीर्तीचें ॥२३॥ ऐसें ऐकोनि श्रीरामवचन ॥ सक्रोध झाला लक्ष्मण ॥ हस्तें हस्त चोळून ॥ काय

१ वेद. २ कसायापासून. ३ कृष्णवर्णाची गाई. ४ मांग. ५ शरीराचा. ६ ज्योत. ७ पवित्र. ८ तत्काल.

 

वचन बोलत ॥२४॥ हें मूर्खत्व रघुनाथा॥ लोकापवादें त्यजावी सीता॥ स्त्रियेसी कलह केलिया माता ॥ सुज्ञें काय सांडावी ॥२५॥ विश्वजनांची जननी ॥ विदेहरायाची नंदिनी ॥ म्लेच्छें श्रुति निंदिली ह्मणोनी ॥ त्यागावी काय ब्राह्मणें ॥ २६ ॥ जो करील जनकेजेची निंदा ॥ त्याचिया करीन शिरच्छेदा ॥ वंदितों तव चरणारविंदा ॥ सर्वथा सीता न टाकावी ॥ २७ ॥ तंव शत्रुघ्न बोले वचन ॥ मी त्यजीन ह्मणसी रामा प्राण ॥ ते कोठें जातील निघोन ॥ जगद्व्यापका श्रीरामा ॥ २८ ॥ तुवां जे दवडिले प्राण ॥ ते पावले कैवल्यसदन ॥ तथापि तुवां सोडितां प्राण ॥ सीता वांचवील निजसत्वें ॥ २९ ॥ तूं सीतेसी दवडिसी वृथा ॥ ऐसें कळों आलें आतां ॥ तरी मी रक्षण तुज रघुनाथा ॥ ही गोष्ट सर्वथा न करावी ॥ ३० ॥ मग श्रीराम बोले बंधूसी ॥ मी त्यजीन आपुले प्राणासी ॥ सोडीन तुह्मांऐशा बंधूंसीं ॥ मग सीतेचा काय पाड ॥ ३१ ॥ ऐसा बोलिला रघुनाथ ॥ सीता त्यागीन मी निश्चित ॥ भरत शत्रुघ्न होऊनि दुःखित ॥ गृह त्यागोनि ते गेले ॥ ३२ ॥ एक उरला सुमित्रासुत[३] ॥ तयाप्रति बोले रघुनाथ ॥ सौमित्रा खड्गघातें त्वरित ॥ छेदीं शिर माझें पैं ॥३३॥ हें एक करीं सुमित्रासुता ॥ नातरी गंगातीरा नेईं सीता ॥ सीतात्यागाचा दोष माथां ॥ पडो माझ्या निर्धारें ॥ ३४ ॥ मग शिवहृदयारविंदमधुकर[४] ॥ बोलता झाला उत्तर ॥ तुज विनवितों वारंवार ॥ सीता सत्वर त्वां न्यावी ॥ ३५ ॥ परम दुःखित सुमित्रासुत ॥ सारथ्यातें ह्मणे आणीं रथ ॥ त्यानें आणिला त्वरित ॥ त्यावरी बैसला सलज्ज ॥३६॥ शीघ्र चालिला सीताभुवना ॥ अश्रु स्रवती नयना ॥ परम कष्ट वाटती लक्ष्मणा ॥ रथावरून उतरावया ॥ ३७ ॥ सीतासदना पावोन ॥ रथाखालीं उतरला लक्ष्मण ॥ त्यातें जानकी देखोन ॥ समाधान पावली ॥ ३८ ॥ ह्मणे राजीवदलाक्ष श्रीराम ॥ भक्तमानसकल्पद्रुम ॥ माझा करावया मनःकाम ॥ सौमित्र रामें पाठविला ॥ ३९ ॥ मी हांसत बोलिलें त्यासी ॥ परी सत्य केलें मम वचनासी ॥ मनोरथ जाणावयासी ॥ रामावांचोनि दुजा नसे ॥ ४० ॥ लक्ष्मणासी बोले सीतारत्न ॥ वस्त्रें भूषणें चंदन ॥ नाना सुगंध कस्तूरी पूर्ण ॥ ऋषिपत्न्यांसी द्यावया घेतें जी ॥ ४१ ॥ ऐसें अवनिजा[५] बोलत ॥ परी तो सौमित्रा झाला वज्रपात ॥ नयनीं अश्रु दाटत ॥ हळूच ह्मणे घ्यावें जी ॥ ४२ ॥ विविध वस्त्रें भूषणें ॥ कंचुक्यादि दिव्यरत्नें ॥ नानापरींचीं कृष्णाजिनें ॥ ऋषींकारणें घेतलीं ॥ ४३ ॥ सर्व घालोनि रथावरी ॥ पुढें रामपादुका ठेवी सुंदरी ॥ मग चालिली झडकरी ॥ श्वश्रूचरणवंदना ॥ ४४ ॥ कौसल्याचरण वंदून ॥ सीता बोले कर जोडून ॥ इच्छा झाली कीं मजलागून ॥ गंगातीरीं राहावें ॥ ४५ ॥ तें पूर्ण करावया सत्वर ॥ वल्लभें पाठविला सौमित्र ॥ तुमचे आज्ञेनें तीर ॥ पाहेन ह्मणतें गंगेचें ॥ ४६ ॥ तंव कौसल्या बोले उत्तर ॥ सीते तूं तों सुकुमार ॥ कंटकवृक्ष शिळा अपार ॥ तें तों अरण्य निर्धारें ॥४७॥ तव सुकुमार वदननलिन ॥ तें तमारितापें होईल म्लान ॥ प्रवालाधर जातील सुकोन ॥



१ जनकराजाची. २ सीतेची. ३ लक्ष्मण. ४ शिव=महादेव, त्याचें हृदय=अंतःकरण, हेंच अरविंद=कमल, तेथील मधुकर=भ्रमर=श्रीराम. ५ सीता.

येरी हांसे ऐकोनी ॥ ४८॥ सीता ह्मणे ऐका जी मात॥ कंटकमर्दन तंव रघुनाथ॥ जयासी वनवासीं प्रीति बहुत ॥ त्याची कामिनी मी असें ॥ ४९ ॥ करितां रामचिंतन ॥ कदापि नव्हे वदन म्लान ॥ रामनामामृतपानेंकरून ॥ सदा अधर टवटविती ॥ ५० ॥ करितां रामचिंतन ॥ समूळ हरपे जन्ममरण ॥ तो स्वामी माझा रघुनंदन ॥ सर्व श्रमहारक ॥ ५१ ॥ कायावाचामनें जाण ॥ तुमचे पूज्य कीं मज चरण ॥ जरी पूजिले असतील देवगण ॥ तरी राम मातें न विसंबे ॥ ५२ ॥ ऐसें बोलोनियां वंदिलें चरणां ॥ भावें केल्या तीन प्रदक्षिणा ॥ मग वंदोनि कैकयीच्या चरणां ॥ सुमित्रेतें वंदिलें ॥ ५३ ॥ मग चालिली सत्वर ॥ जेथें होता लक्ष्मण दीर ॥ रथीं बैसतां हर्षनिर्भर ॥ मानस झालें तयेचें ॥ ५४ ॥ शोकाकुलित अश्रुनयन ॥ होवोनियां लक्ष्मण ॥ चालिला स्यंदनीं बैसोन ॥ परम म्लान मुख झालें ॥ ५५ ॥ जानकी ह्मणे वेगें चालवा स्यंदन ॥ तंव बोले लक्ष्मण ॥ मी जाणतों अश्वअंतरखुण ॥ ते कांहीं बोलों इच्छिती ॥ ५६ ॥ कन्यादुखें दुःखित ॥ पृथ्वी झाली ही कंपित ॥ शीघ्र चालतां ती दुःखित ॥ होईल हय हें भाविती ॥ ५७ ॥ संग्राममार्गीं आमचा वेग ॥ कुश्चितमार्गीं तों गात्रभंग ॥ ऐसें अश्वांचें अंतरंग ॥ कळों आलें ये समयीं ॥ ५८ ॥ तथापि चालवितों स्यंदन ॥ स्वामिआज्ञा शिरीं वंदून ॥ मग प्रतोदेंकरून ॥ हयशिक्षा कल्पिली ॥ ५९ ॥ गंगातीराप्रति जावोन ॥ सीता सोडील तो लक्ष्मण ॥ तें पुढें असे निरूपण ॥ अति रसाळ ऐकावें ॥ ६० ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीरामकथामृत अगाध ॥ श्रवणें होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ६१ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते लवकुशाख्यानं नाम सप्तविंशोध्यायः ॥ २७ ॥

॥ अध्याय ॥ २७ ॥ ॥ ओव्या ॥ ६१ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥

१ स्त्री. २ टाकणार नाहीं. ३ रथामध्यें.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ सकळविद्यार्णवसुधाकर ॥ श्रोता परीक्षितिसुत चकोर ॥ रामकथामृतरससार ॥ होऊनियां तृप्त केलें ॥ १ ॥ मंगळजननीप्रियतनया ॥ रथीं बैसवूनि रामजाया ॥ श्रीरामें टाकिली ह्मणोनियां ॥ अयोध्यानगर दुःखित ॥ २ ॥ विनोद केला तुजसीं रघुवीरें ॥ तें तुवां वचन मानिलें खरें ॥ चंचळ ध्वज पल्लवाचेनि करें ॥ काय निषेध करी गमनाचा ॥ ३ ॥ रथारूढ ती जनकबाळी ॥ सौमित्रासहित चालिली ॥ तों नेत्रीं देखती झाली ॥ अपशकुन अद्भुत ॥ ४ ॥ शिवा सन्मुख रुदती ॥ सव्यापसव्य हरिणी धांवती ॥ स्फुरे दक्षिणनेत्रपाती ॥ तें देखोनि बोले जनकजा ॥ ५ ॥ कनकपुराधीशमथना ॥ सुमित्राहृदयांभोजतपना ॥ रामसेवामृतसंतुष्टमना ॥ या अपशकुना देखिलें ॥ ६ ॥ शिवा गोमायु आणि मृग ॥ रुदन करिती रोधून मार्ग ॥ सांगती अशुभ चिन्हतरंग ॥ तरी तो श्रीरंग सुखी असो ॥ ७ ॥ त्याचें अक्षय भुजाबळ ॥ असो आयुष्यही प्रबळ ॥ परदळीं विजय असो अचळ ॥ कल्याण असो त्या रामा ॥ ८ ॥ खरदूषणादि निशाचर ॥ जनस्थानीं वधिले अपार ॥ तो राज्यासनीं रघुवीर ॥ अचळ असो सर्वदा ॥ ९ ॥ समुद्रजळ होतें अनंत ॥ तें सेतू बांधोनि केलें शांत ॥ भद्रीं स्थापिला शरणागत ॥ तो राघव सुखी असो ॥ १० ॥ केली कनकपुराची होळी ॥ मंदोदरीनेत्रोदकें विझविली ॥ मजनिमित्त कपि बळी ॥ धाडिला तो सुखी असो ॥ ११ ॥ पापअवतार मूर्तिमंत ॥ शक्रारिजनक प्रतापवंत ॥ त्याचा जेणें केला निःपात ॥ तो स्वामी माझा सुखी असो ॥ १२ ॥ ऐसें बोलतां जनकनंदिनी ॥ तों पुढें देखिली देवतटिनी ॥ कपिलाक्षीरसम शुभ्र पाणी ॥ कल्लोळ गगनीं उसळती ॥ १३ ॥ कीं ती शंकरकंठींची शुभ्र माळा ॥ चळोन पडली या भूमंडळा ॥ कीं क्षमालक्ष्मीची शुद्ध कळा ॥ पताका शोभे भूगोळीं ॥ १४ ॥ जी आनंदपुरविहारिणी ॥ श्रवणें हरी पापश्रेणी ॥ ती देखतां स्वर्गगामिनी ॥ रामजाया सुखावे ॥ १५ ॥ सीता ह्मणे नव्हे त्रिपथगा ॥ रामकीर्तीच काय गंगा ॥ जीचे देखतां जलतरंगा ॥ सौख्य अंतरंगा होतसे ॥ १६ ॥ धन्य तो श्रीरघुवीर ॥ जेणें दाविलें गंगातीर ॥ भोंवतें पाहे सुकुमार ॥ देखतां अंतर सुखावलें ॥ १७ ॥ जंबू बकुल चंपक ॥ खर्जुरी चंदन अनेक ॥ अशोक रंभा केतकी फणसादिक ॥ शोभती वेल द्राक्षांचे ॥ १८ ॥ ऐशी देखोनि देवतटिनी ॥ मनीं संतोषली रामराणी ॥ परम दयाळु कोदंडपाणी ॥ जेणें मज ही दाखविली ॥ १९ ॥ तों लक्ष्मणें पाचारिला नावाडी ॥ तेणें नाव आणिली पुढीं ॥ तीमाजी बैसोनि पैलतडी ॥ सौमित्र जानकी पावलीं ॥ २० ॥ उभयतां करूनि स्नान ॥ परम पावलीं समाधान ॥ नेसोनियां शुद्ध वसन ॥ रामस्मरण मांडिलें ॥ २१ ॥ रत्नजडित रामपादुका ॥ कनकपीठीं मांडोनि देखा ॥ भावें पूजी रामनायका ॥ जपे मुखीं रामनाम ॥ २२ ॥ ऐसें नित्यकर्म सारोन ॥ उभयतां केलें फलभक्षण ॥ सत्वर रथारूढ होऊन ॥ दारुण वनीं चालिलीं ॥ २३ ॥ बोरी बाभूळ खदिर ॥ वट अश्वत्थ पलाशपत्रें

१ पृथ्वीची प्रिय कन्या सीता. २ भालू. ३ कोल्हा. ४ राक्षस. ५ भागीरथी. ६ काशींत असणारी. ७ पापसमूह. ८ केळी. ९ वस्त्र. १० खैर.

जर्जर ॥ कुशकंटक निंब गोक्षुर ॥ शुष्ककंटक वृक्षजाती ॥ २४ ॥ सिंह व्याघ्र वृक[1] सूकर[2] ॥ तरस चितळें[3] महिषे अपार ॥ व्याळ मूषक मार्जार ॥ दुष्ट भार श्वापदांचे ॥ २५ ॥ वृक्षकोटरीं काकध्वनी ॥ ऐकतां भय उपजे श्रवणीं ॥ तें वन देखोन जनकनंदिनी ॥ पावली मनीं अति भय ॥ २६ ॥ मग ह्मणे सुमित्रानंदना[4] ॥ रामहृदयानंदवर्धना ॥ अद्यापि न देखें ऋषिस्थाना ॥ या दुष्ट वना कां हो जातां ॥ २७ ॥ मुनिआश्रम न देखों नयनीं ॥ वेदध्वनि कां न पडे श्रवणीं ॥ सुवेष पतिव्रता मुनिकामिनी ॥ कां जी अजूनि न दिसती ॥ २८ ॥ मौंजीकृष्णाजिनधर ॥ वेदाध्ययनीं अति तत्पर ॥ ऐसे ऋषींचे लघु कुमर ॥ कां हो नयनीं न दिसती ॥ २९ ॥ अग्निहोत्रधूम्रमाळा ॥ अजोन न दिसती नेत्रकमळा ॥ शुष्क तृणकाष्ठ दीर्घ शिळा ॥ हेंचि नयनीं पाहातें ॥ ३० ॥ कीं म्यां सोडिला श्रीराम ॥ ह्मणोनि दृष्टीं न देखें मुनिआश्रम ॥ जयाचे नामें संसारश्रम ॥ जाय तो सोडिला ह्मणोनि ॥ ३१ ॥ जे कां रामविमुख ॥ त्यांसी हेंचि प्राप्त दुःख ॥ मज कां मनीं न वाटे हरिख ॥ चित्तवृत्ती भ्रमित झाली ॥ ३२ ॥ ऐसें ऐकोनि सीतावचन ॥ अति विव्हल झाला लक्ष्मण ॥ सीतेप्रति वदे वचन ॥ दूरी असती आश्रम ते ॥ ३३ ॥ प्राणांत होय ऐसें जाण ॥ वज्रपातासमान वचन ॥ बोले तयेसीं लक्ष्मण ॥ तें श्रवणीं नायकवे ॥ ३४ ॥ अश्रुधारा चालिल्या नयनीं ॥ ह्मणे तुज रामें सांडविलें या वनीं ॥ लोकापवाद[5] धरोनियां मनीं ॥ झाला निर्दय राघव ॥ ३५ ॥ मी तों अत्यंत अधर्मी ॥ ह्मणोनि मज धाडिलें या कर्मीं ॥ भ्रातृवचनदुःखोर्मी ॥ घोटोनियां मी प्यालों ॥ ३६ ॥ ऐसे दुःखशब्द पडता कानीं ॥ रथाखालीं पडली रामराणी ॥ निर्जीव झाली जनकनंदिनी ॥ प्राणपंचक[6] एकवटलें ॥ ३७ ॥ तंव लक्ष्मण झाला घाबरा ॥ ह्मणे धांव धांव रे रघुवीरा ॥ शब्दासवेंचि पंचसमीरां ॥ इनें एथें सोडिलें ॥ ३८ ॥ भरत शत्रुघ्न पुण्यश्लोक ॥ ते या कर्मासी झाले विमुख ॥ माझे ग्रंथीं महापातक ॥ तेणें या कर्मीं योजिलें ॥ ३९ ॥ शब्दासरसी पडली तळीं ॥ जेवीं महावातें कर्दळी ॥ नातरी छिन्नमूळें पडे वल्ली ॥ तेवीं जनकबाळी पडियेली ॥ ४० ॥ नातरी स्वर्गींहूनि पडे रोहिणी ॥ नातरी त्रिशूळघातें कपिला वनीं ॥ किंवा कुमारी सर्पदंश होऊनी ॥ तेवीं पडली राजबाळा ॥४१॥ जानकीवदन सुधाकर[7] ॥ यावरी न पाहती रामनेत्रचकोर ॥ सीतावदनकल्हार ॥ रामाक्षिभ्रमर न सेविती ॥ ४२ ॥ रामनेत्रचातक सुंदर ॥ सीतावदनामृतजलधर ॥ न पाहतांचि तृषातुर ॥ आतां येथून राहती ॥ ४३ ॥ सौमित्र नव्हे मी कुमित्र ॥ म्यां वनीं मारिलें रामकलत्र ॥ ग्रंथीं माझें पाप विचित्र ॥ तेणें हें कर्म करविलें ॥४४॥ एके करांबुजें करी छाया ॥ दुजिया करें घाली वह्निसखया[8] ॥ एकदा वांचो ही रामजाया ॥ धरेशतनया स्वामिया ॥ ४५ ॥ सीताश्रुशोकजीवन ॥ हस्तें पुसी सुमित्रानंदन ॥ ह्मणे मज पापियाचें करस्पर्शन ॥ न घडो सर्वथा पतिव्रते ॥४६॥ म्यां निष्कपट रामसेवा ॥ जरी केली असेल उमाधवा ॥ तरी जानकी



१ लांडगे. २ डुकर. ३ या प्रकारचीं हरणें. ४ लक्ष्मणा. ५ लोकांनीं केलेली निंदा. ६ प्राण, अपान आदि पांच वायूंला. ७ चंद्र. ८ वारा.

ही जीवभावा ॥ पावो सर्वथा या काळीं ॥४७॥ ऐसा शब्दश्रवणतरणी[1] ॥ ऐकतां विकासली नेत्रनलिनी ॥ सौमित्रनेत्रमधुप मनीं ॥ परम संतोष पावला ॥ ४८ ॥ जनकजा झाली सावधान ॥ करें पुसी शोकाश्रुजीवन ॥ मग देवराप्रति वचन ॥ काय बोलिली पतिव्रता ॥ ४९ ॥ ह्मणे रामचरणामृतभ्रमरा ॥ आतां मी काय करूं जी सुकुमारा ॥ माझा कां उबग[2] आला रघुवीरा ॥ ह्मणोनि श्वास टाकित ॥ ५० ॥ जनस्थान पाहोनि सुस्थळीं ॥ मजनिमित्त पर्णकुटी केली ॥ वनफळें आणोन ते वेळीं ॥ तूं क्षुधा हरिली आमची ॥ ५१ ॥ श्रीराम चालतां पुढें वेगें ॥ तुह्मी चालतां मजसंगें ॥ रक्षीत होतां मज अनुरागें ॥ त्यापरी रक्षील कोण मातें ॥ ५२ ॥ राम तरी ज्ञानार्णव अगाध ॥ आणि श्रीगुरु वसिष्ठाचा बोध ॥ तेणें माझा कोणता अपराध ॥ देखोनियां त्याग केला ॥ ५३ ॥ मी तरी काया वाचा मनें ॥ श्रीरामासी अनन्य[3] शरणें ॥ रामावांचोनि अन्य न जाणें ॥ चराचरीं या मानसीं ॥ ५४ ॥ शरत्पूर्णेंदुबिंबवदन[4] ॥ फुल्लकल्हारपत्रनयन ॥ मुगुट कुंडलें शोभायमान ॥ कुरळ[5] कुंतलें साजिरे ॥ ५५ ॥ कुंदकुसुमासमान रदन[6] ॥ अधरें[7] जिंकिती प्रवाळवर्ण[8] ॥ मंदस्मित मृदु वचन ॥ इंदु त्यापुढें मलिन दिसे ॥ ५६ ॥ कस्तूरीतिलकांकितभाळ ॥ शुकनासिक दीर्घ कपाळ ॥ वाक्यामृतांचे जलद केवळ ॥ आर्तचातक निववी हो ॥ ५७ ॥ ऐसें रामाचें वदन ॥ आतां काय पहातील हे नयन ॥ श्रीरामाचें अमृतवचन ॥ सर्वथा श्रवण नायकती ॥५८॥ जेव्हां काकुत्स्थपुत्र गुणैकराशी ॥ सकौशिक आला मिथिलेसी ॥ भंगोनि त्र्यंबकशरासनासी ॥ मग मातें पर्णिलें ॥ ५९ ॥ मजनिमित्त मित्र केले वानर ॥ शिळीं बुजिला सागर ॥ सर्व वधोनि निशाचर ॥ रामें मातें सोडविलें ॥ ६० ॥ ऐसा राम तो दयाळ ॥ अक्षय सुखाचा कल्लोळ ॥ वृक्ष पाषाण लता केवळ ॥ माझ्या वियोगें आलिंगी ॥ ६१ ॥ तो निष्ठुर झाला मज रमण ॥ तरी त्याचा अपराध नसे जाण ॥ माझें अदृष्ट यासी कारण ॥ बोल ठेवूं कवणातें ॥ ६२ ॥ कनकमृग वधावयालागून ॥ वेगें गेला रघुनंदन ॥ म्या तुह्मां मारिले वाग्बाण ॥ तेंचि पातक उभारिलें ॥ ६३ ॥ अथवा जन्मांतरीं वधूवरां ॥ म्यां वियोग केला असेल खरा ॥ तेंणें पातकें रघुवीरा ॥ वियोग घडला मजलागीं ॥ ६४ ॥ रामपादुका धरोनि पोटीं ॥ ऐशी विलाप करी गोरटी ॥ ऐकोनि सौमित्र करी वृष्टी ॥ नेत्राश्रूंची भूतळीं ॥ ६५ ॥ पुनः ह्मणे जी लक्ष्मणा ॥ श्वश्रूसी सांगा मम प्रार्थना ॥ तुमच्या चिंतोनि चरणा ॥ दुर्घट वनीं कर्मीन ॥ ६६ ॥ सौमित्रासी बोले बोल ॥ सर्वभूतीं तुह्मी दयाळ ॥ ऐशिया कर्मी तमाळनीळ ॥ व्यर्थ योजिलें तुह्मांसी ॥ ६७ ॥ भ्रातृघातकी बिभीषण ॥ तैसाची सुग्रीवही कठिण ॥ ते या कर्मीं योजावे जाण ॥ रामें अन्याय हा केला ॥ ६८ ॥ तुह्मीं जावें आतां वेगीं ॥ तुह्मांस कल्याण असो मार्गीं ॥ अग्रज कोपतील तुह्मांलागीं ॥ उशीर लागला ह्मणोनि ॥ ६९ ॥ ऐकोनि ऐसें सीतावचन ॥ सौमित्रि करीतसे रुदन ॥ वंदन प्रदक्षिणा करून ॥ निघता झाला अति

---

१ सूर्य. २ कंटाळा, वीट. ३ एकनिष्ठतेनें. ४ शरदृतूंतील पूर्णिमेच्या चंद्रबिंबाप्रमाणें मुख ज्याचें असा. ५ कुरळे केंस. ६ दांत. ७ ओंठ. ८ पोंवळ्यासारखे लाल.

दुःखी ॥ ७० ॥ सौमित्रि प्रार्थी वनदेवतांलागुनी ॥ तुह्मीं रक्षावी जनकनंदिनी ॥ मग सीतेतें नमस्कारुनी ॥ शीघ्र तेथोनि चालिला ॥ ७१ ॥ परी चालतां न वाहती चरण ॥ वारंवार पाहे फिरोन ॥ जोंवरी दृष्टीस पडे लक्ष्मण ॥ तोंवरी आशा भासमात्र ॥ ७२ ॥ होतां सौमित्रीचें अदर्शन ॥ सीता उभाउभी पावली पतन ॥ अत्यंत झाली मूर्च्छायमान ॥ एक मुहूर्तपर्यंत ॥७३॥ एकली सांडोनि जनकबाळा[1] ॥ सौमित्रि गंगा तरोन गेला ॥ अनाथाचे परी वेल्हाळा ॥ विलाप करीत अतिदुःखें ॥ ७४ ॥ ह्मणे काय पाप केलें ॥ आतां मज एकटें वनीं टाकिलें ॥ विदेहकुळीं जन्मलें ॥ आणि वरिलें श्रीरामा ॥ ७५ ॥ जनकाऐसा जनक ॥ दशरथाऐसा श्वशुर देख ॥ रामासारिखा निजनायक ॥ असोनि मज हें दुःख कीं ॥ ७६ ॥ दिशा करी अवलोकन ॥ तंव नेत्रीं दिसे सर्व शून्य ॥ ह्मणे देवर[2] करितो विनोद पूर्ण ॥ आतां येऊनि नेईल ॥ ७७ ॥ राया दशरथाची स्नुषा ॥ श्रीरामाची मुख्य योषा[3] ॥ जनककन्या प्रेममंजूषा ॥ असतां हें दुःख तयेसी ॥ ७८ ॥ उभय कुळ शुद्ध समर्थ भर्ता ॥ स्वयें पवित्र आणि पतिव्रता ॥ तयेसी ही झाली अवस्था ॥ कोण विचित्र कर्मगती ॥ ७९ ॥ जीच्या परिचारिका अनेकी ॥ ती एकटी वनीं रडे जानकी ॥ राम भ्रतार असतां मस्तकीं ॥ कैसी बळी कर्मरेखा ॥ ८० ॥ वनीं सीताशोकश्रवणोत्तरें ॥ गहिंवरलीं वनचरें ॥ नेत्रांपासोनि सोडिती नीरें ॥ नेणों गळल्या भूलिंगा ॥ ८१ ॥ ह्मणोनि पुनः पुनः मूर्च्छा पावली ॥ वेल्हाळ अति विव्हळ झाली ॥ तिच्या दुःखें खगावळी[4] ॥ अश्रु ढाळती वृक्षाग्रीं ॥ ८२ ॥ तृणांकुरांतें टाकोनी ॥ शीघ्र धांवोनि आल्या हरिणी ॥ नृत्य सांडोनि मयूरश्रेणी[5] ॥ सीतेपासीं धांवती ॥ ८३ ॥ सीतेचें ऐकोनि रुदन ॥ कोकिळांनीं सांडिला निजस्वन ॥ मृणालें मुखांतूनि टाकोन ॥ तिजपासीं धांवल्या ॥ ८४ ॥ फळें देती भक्षावया ॥ निजपक्षें करिती छाया ॥ जळपक्षी येऊनि कायां[6] ॥ शीतळ करिती पक्षजळें ॥ ८५ ॥ गाई येऊनि पुच्छचामरें ॥ जानकीवरी ढाळिती आदरें ॥ कोकिळादिक सुस्वरें ॥ जानकीतें रंजविती ॥ ८६ ॥ भागीरथीचें करूनि स्नान ॥ कमळपरागविभूति[7] लावून ॥ मृगाक्षमाळ कंठीं घालून ॥ वायु द्विजांऐसे सेविती ॥ ८७ ॥ माझिया पुत्राची स्वामिणी ॥ एकटी पडली कीं या वनीं ॥ मंद सुगंध शीतळ गुणी ॥ पुत्र स्वामिनीसी दावित ॥ ८८ ॥ रामनामाचा उच्चार ॥ जीचे करिती प्रवाळाधर ॥ मुक्त झाले कबरीभार[8] ॥ धुळीनें धूसर ते झाले ॥ ८९ ॥ जरी आतां सोडूं पंचप्राण ॥ तरी मज आत्महत्या घडेल दारुण ॥ आतां मी उपाय करूं कवण ॥ कोण मजला रक्षील ॥ ९० ॥ ह्मणोनि धांवे इकडे तिकडे ॥ धांवतां ती अडखळोनि पडे ॥ चरणीं कंटक मोडतां रडे ॥ करी आक्रोश रामनामें ॥ ९१ ॥ पदकमळ अतिसुकुमार ॥ कंटक लागतांचि स्रवे रुधिर ॥ याप्रकारें ती दुःखातुर ॥ दुर्घटवनीं फिरतसे ॥ ९२ ॥ मग धरेसी बोले जानकी मात ॥ आतां माते ठाव देईं उदरांत ॥ वल्लभें टाकिलिया निभ्रांत ॥ मातृगृहीं असावें

१ सीता. २ दीर. ३ पट्टाभिषिक्त स्त्री. ४ पक्षिसमुदाय. ५ मोरांचे समुदाय. ६ शरीर. ७ कमळांतील पराग=रज हेंच कोणी भस्म. ८ केश.

॥ ९३ ॥ तंव धरा मनीं विचारित ॥ निरपराधें न त्यजी जामात ॥ परी कांहीं असेल अपराधवंत ॥ तरी ऐसी कन्या मज नलगे ॥ ९४ ॥ जयातें सांडी सर्वेश्वर ॥ तयाचा कोण करील अंगीकार ॥ ऐसा करोनि विचार ॥ धरा नेघे कन्या पोटीं ॥ ९५ ॥ तंव अकस्मात तपोराशी ॥ वाल्मीक आला तया वनासी ॥ यज्ञार्थ कुश समिधा न्यावयासी ॥ अनेक शिष्यांसमवेत ॥ ९६ ॥ तंव मृग-शावाक्षी नृपनंदिनी ॥ अकस्मात पडली मुनीच्या नयनीं ॥ पाहतां समाधान मनीं ॥ पावता झाला ऋषिवर्य ॥ ९७ ॥ पुढें जाणोनि रामकांता ॥ ऋषि आश्रमीं नेईल सीता ॥ ती पुढिले प्रसंगीं रसाळ कथा ॥ भवरोगव्यथानाशक जी ॥ ९८ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीरामलीलामृत अगाध ॥ श्रवणें होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ९९ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके लवकुशआख्यानं नाम अष्टाविंशोध्यायः ॥ २८ ॥ अध्याय ॥ २८ ॥ ओव्या ॥ ९९ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

# अध्याय २९.



वाल्मीकि ऋषि.
आश्रम
सीता.
सेवक
वीर.
श्रीराम श्यामकर्णा-ची पूजा करितात.
ब्राह्मण
लव
श्यामकर्ण
ब्राह्मणाचीं मुलें दुरून पाहतात.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे कुरुकुळनंदना ॥ ऐक पुढील कथानुसंधाना ॥ जें ऐकतां जन्ममरणा ॥ उरी न राहे निश्चित ॥ १ ॥ मग त्या वाल्मीकें देखिली सीता ॥ म्लानमुखी जनकदुहिता ॥ ह्मणे ही तपःसिद्धि तत्वतां ॥ अनवेक्षणीं रूसली ॥ २ ॥ कीं हे ब्रह्मादिकांची माता ॥ कीं योगपीठमूळदेवता ॥ कीं भक्तमनोरथकल्पलता ॥ रुसोनि आली वनासी ॥ ३ ॥ कीं कैवल्यतरूची कल्पलता ॥ कीं अद्वैतसागरींची सुखसरिता ॥ ऐसे नाना तर्क करितां ॥ निर्धार मुनिनाथा नव्हेचि ॥ ४ ॥ कीं ज्ञानमकरालयाची रमा ॥ कीं ब्रह्मानंदशंभूची उमा ॥ कीं साधकमनोरथद्रुमा ॥ आधारभूमी गमताहे ॥ ५ ॥ तंव तो ह्मणे विशाळनयने ॥ तूं कोण येथें शुभानने ॥ तूं एकटी या वनें ॥ कां भ्रमसी हें मज सांगें ॥ ६ ॥ मग जानकी ह्मणे जी मुनिवर्या ॥ मी श्रीरामाची असें भार्या ॥ माझा त्याग केला कवणा कार्या ॥ तें मी सर्वथा न जाणें ॥ ७ ॥ तुज नमन असो ताता ॥ माझें नाम जाणावें सीता ॥ या वनांत मज रक्षिता ॥ कोणी नसे जी ऋषिराया ॥ ८ ॥ निगमागमाचें नंदनवन ॥ तो सीतेसी बोले धर्मपरायण ॥ ह्मणे वाल्मीक जाण नाम पूर्ण ॥ माझें मित्र मी जनकाचा ॥ ९ ॥ तूं तंव माझी नंदिनी ॥ शीघ्र चालें आश्रमालागुनी ॥ पत्रें पुष्पें फळें लतादिक वनीं ॥ अत्यंत जेथें मनोहर ॥ १० ॥ तेथें तुजला पर्णशाळा ॥ करून देईन विशाळा ॥ तेथें प्रसूती होईल तुजला ॥ द्वयपुत्रांतें पावसी ॥ ११ ॥ ऐसी ऐकोनि वाल्मीकवाणी ॥ संतोष पावली रामरमणी ॥ जेवीं मयूर महावनीं ॥ मेघ ओळतां सुखावे ॥ १२ ॥ बरवें ह्मणोनि जानकी ॥ दृष्टीं देखोनि मुनिवर कीं ॥ हा तों वाल्मीक महाविवेकी ॥ ह्मणोनि चाले पाठीसीं ॥ १३ ॥ जैसी विवेकामागें सुमती ॥ स्वानंदें जातसे नृपती ॥ सद्भावापाठीं जाय भक्ती ॥ तेवीं सीता सती ऋषिमागें ॥ १४ ॥ तयाचा आश्रम अतिसुंदर ॥ जेथें गायी व्याघ्रां नसे वैर ॥ बिडाल आश्रयती उंदिर ॥ निद्रा करिती स्वलीलें ॥ १५ ॥ नकुळ उरग मयूर ॥ एके ठायीं असती सादर ॥ मृगराज आणि मत्त कुंजर ॥ निद्रा करिती एकशय्ये ॥ १६ ॥ आणि सरोवरामाझारीं ॥ बक मत्स्य करिती जलकल्लोळीं ॥ निर्वैरभावें श्वापदावळी ॥ सदा एकत्र क्रीडती ॥ १७ ॥ तेथें अनेक तपोधन ॥ ऋषिभार्या सुलक्षण ॥ बटु बटु मुनिनंदन ॥ देखोनि सीता आनंदली ॥ १८ ॥ देखोनि ऋषिकांता सुलक्षण ॥ सीता तयांस करी वंदन ॥ त्याही पावल्या समाधान ॥ आलिंगन देती जानकीतें ॥ १९ ॥ मग ऋषिकुमारीं पर्णशाळा ॥ बरवी केली अतिविशाळा ॥ तयेमाजी सीता वेल्हाळा ॥ काळ क्रमी सुखरूप ॥ २० ॥ ऋषिकामिनी यथाकाळें ॥ आणून देती वनफळें ॥ सीता तीं भक्षूनि निर्मळ जळें ॥ तृषा पुरवी गंगेचे ॥ २१ ॥ ऐसे क्रमितां दिवस ॥ गर्भासी भरले नव मास ॥ शुक्लपक्षीं तारकाधीश ॥ वाढे गर्भ त्यापरी ॥ २२ ॥ मग दशम मासीं ती प्रसूत झाली ॥ द्वय पुत्रांतें प्रसवली ॥ बाळांची कांति प्रकाशली ॥ तेणें आश्रम उजळले ॥ २३ ॥ घडीत जांबुनंदाचीं तगटें ॥ पावलीं मुक्ताफळें चोखटें ॥ रत्न-

१ जनमेजया. २ न पाहिल्यानें [ दुर्लक्षतेनें ]. ३ ज्ञानरूपी समुद्राची ४ मुंगूस. ५ सिंह. ६ हत्ती. ७ पशुसमुदाय. ८ देखणी, सुंदर. ९ सुवर्णाचीं.

चित मंचकीं गोमटें ॥ असती त्यावरी पुष्पशय्या ॥ २४ ॥ तेथें जयेसी निद्रा न लागे ॥ ती ऋषिपत्न्यांसी मृगचर्म मागे ॥ तयावरी निद्रा करी अनुरागें ॥ अभिनव गति कर्माची ॥२५॥ जयाचे रुचीनें लाजे अमृत ॥ ऐसीं मिष्टान्नें नित्य भक्षित ॥ ती फळें मूळें भक्षून होय तृप्त ॥ ऐसी गति कर्माची ॥ २६ ॥ नमस्कारासी न लाभे अवसर ॥ जीचा प्रसाद इच्छिती सुरवर ॥ ती मुनिपत्न्यांसी पसरी कर ॥ अभिनव गति कर्माची ॥२७॥ राम दिनकरकुलांबुनिधि सोम ॥ जानकी त्याची स्त्री ललाम[1] ॥ तियेसी पर्णकुटी प्रसूतिधाम[2] ॥ अभिनव गति कर्माची ॥ २८ ॥ अति सुखमय जन्मकाळ ॥ आकाश झालें अतिनिर्मळ ॥ प्रदक्षिणेचें जळ अचळ ॥ त्रिगुणातें वाहतसे ॥ २९ ॥ तंव तो वाल्मीक गंगास्नान ॥ करूनि येत आश्रमालागून ॥ मार्गीं झालें तयातें श्रवण ॥ पुत्रद्वय प्रसवली तें ॥३०॥ एक हस्तीं मुष्टी कुशांची[3] ॥ दुजी मुष्टी ती लवांची ॥ येऊनि आंगें प्रोक्षिलीं[4] बाळांचीं ॥ वेदोक्तमंत्रेंकरूनि ॥ ३१ ॥ कुशें ज्याचें केलें सिंचन ॥ तयासी ठेविलें कुशाभिधान ॥ लवजळें सिंचिला पूर्ण ॥ तयासीं अभिधान लव ऐसें ॥ ३२ ॥ मग जातकर्मादि संस्कार ॥ करता झाला ऋषीश्वर ॥ पुढें चूडादि कर्म सविस्तर ॥ करिता झाला सप्रेमें ॥ ३३ ॥ द्वादश वर्षें भरतां पूर्ण ॥ द्विजें केलें व्रतबंधन ॥ जनांस भासती नंदन ॥ चंद्रसूर्यचि जन्मले ॥ ३४ ॥ वसिष्ठादि मुनिगण ॥ वाल्मीकें आणिले पाचारून ॥ आणि कामधेनु प्रार्थून ॥ व्रतबंधा आणिली ॥३५॥ कामधेनु झाली प्रसन्न ॥ प्रसवली चतुर्विध अन्न ॥ अठ्यायशीं सहस्र ऋषिगण ॥ केले तृप्त वाल्मीकें ॥३६॥ प्रतिदिनीं लक्ष भोजन ॥ मुनि करी आनंदोन ॥ अन्नसुवासें परिपूर्ण ॥ सर्व गगन कोंदलें ॥ ३७ ॥ त्या आश्रमासमीप ॥ गंगातीरीं घातले मंडप ॥ त्यांत बैसले मुनिदीपक ॥ जे आगर निगमांचे[5] ॥ ३८ ॥ अन्नवर्णना करूं सविस्तर ॥ तरी ग्रंथ होईल थोर ॥ कामधेनु प्रसाद रुचिकर ॥ कोण वर्णूं शके तया ॥ ३९ ॥ अन्नपरिमळेंकरून ॥ देवांचीं घ्राणें[6] भरलीं पूर्ण ॥ तिहीं सांडोनि अमृतपान ॥ करिती इच्छा त्या अन्नाची ॥ ४० ॥ कामधेनुअन्नाची रुची ॥ ती अमृतपानीं नसेची ॥ ह्मणोनि इच्छा देवांची ॥ तयावरी उपजली ॥ ४१ ॥ ऐसें दिधलें भोजन ॥ समाप्त झालें व्रतबंधन ॥ सीता पावली समाधान ॥ मुनीप्रति बोलतसे ॥ ४२ ॥ जानकी ह्मणे जी ताता ॥ माझा लटिकाचि जनक पिता ॥ तूंचि सत्य माझा पिता ॥ माझा लळा पाळिसी ॥ ४३ ॥ ऐकोनि कन्येची वाणी ॥ काय बोले वाल्मीक मुनी ॥ तूं सकळ जनांची जननी ॥ आह्मी बाळें तुझींच ॥ ४४ ॥ करूनि ब्रह्मांडाची घरकुली[7] ॥ माजी बैसविलीं ब्रह्मादिक बाहुलीं ॥ हा तुझाचि खेळ जनकबाळी ॥ बाळपणीं अज्ञानें ॥ ४५ ॥ सकळ जन हें भातुकें ॥ मुखीं घालिसी कौतुकें ॥ ऐसा तुझा हा खेळ देखे ॥ ऐसा ज्ञानी कोण तो ॥ ४६ ॥ तूं सकळ जनांची जननी ॥ मज गौरविशी हो वचनीं ॥ ऐसें बोलतां वाल्मीकमुनी ॥ सीता चरणांसी लागली ॥ ४७ ॥ कृतोपनयन[8] सीतानंदन ॥ तयांसी सांगे वेदाध्ययन ॥ परमानंदेंकरून ॥ श्रीराम-

१ देखणी, सुंदर. २ बाळंतगृह. ३ दर्भाची. ४ वर पाणी टाकलें. ५ वेदांचे. ६ नाकें. ७ घरटी. ८ मौंजीबंधन झालेले.

चरित्र सांगतसे ॥ ४८ ॥ स्वरूपें अति सुंदर ॥ दोघांचेही मधुर स्वर ॥ श्रवणमात्रें सविस्तर ॥ रामचरित्र गाताती ॥ ४९ ॥ लव धरीतसे टाळ ॥ पुढें वीणा धरी कुशबाळ ॥ आलाप करितां मंजुळ ॥ तेणें गंधर्व विस्मित ॥ ५० ॥ ऐकती सर्व मुनिगण ॥ श्रवणें पावती समाधान ॥ प्रेमाश्रूनें पूर्ण नयन ॥ मुखें स्तविती बाळकां ॥ ५१ ॥ संतोषोनि मुनिगण ॥ तपोबळें निर्माण करून ॥ शस्त्रें देते झाले दारुण ॥ अपयश नयेचि रणांगणीं ॥ ५२ ॥ उत्तम शरासनें[1] दोनीं ॥ वाल्मीकें दिधलीं त्यांलागुनी ॥ भाते भरूनि अक्षय-बाणीं ॥ देती सुखें मुनी ते ॥ ५३ ॥ कोणी अभेद्य देती कवचें ॥ कोणी खड्गें चर्म नाराचें[2] ॥ कोणी किरीट कुंडलें त्यांचे ॥ कर्णीं आणोनि घालिती ॥ ५४ ॥ ऐसे धनुर्धर केले सीतापुत्र ॥ सकळ विद्यांचे सागर ॥ दोघेजण महाशूर ॥ आश्रमासी क्रीडती ॥ ५५ ॥ कंद फळें मूळें आणोन ॥ करिती जननीसी अर्पण ॥ सेविताती वाल्मीकचरण ॥ आज्ञेमाजी सादर ॥ ५६ ॥ ऐसी वाल्मीकाश्रमीं सीता ॥ पुत्रद्वयेंसीं गुणसरिता ॥ तों अयोध्येमाजी वर्तली कथा ॥ ती सावधान परिसावी ॥ ५७ ॥ आजानुबाहु रघुनंदन ॥ सीता-वियोगें उद्विग्न ॥ न भोगी सुखाचा कण ॥ सर्व विषयीं अनावडी ॥ ५८ ॥ त्या अवस्थेमाजी भूपाळा ॥ ब्रह्महत्या पीडितसे त्याला ॥ तो दोष हरावयाला ॥ यागइच्छा[3] उद्भवली[4] ॥ ५९ ॥ गुरु वसिष्ठ पाचारिला ॥ आणि कौशिकवामदेवांला[5] ॥ गालवादिकांतें सकळां ॥ पाचारिलें श्रीरामें ॥ ६० ॥ वंदोनियां मुनिचरण ॥ राम बोले कर जोडून ॥ अश्वमेध करावया पूर्ण ॥ इच्छा मातें उद्भवली ॥ ६१ ॥ तरी तयाचें विधिविधान ॥ आणि अश्वाचें लक्षण ॥ कैसें करावें विधानदान ॥ तें सर्वही सांगावें ॥ ६२ ॥ ऐकोनि श्रीरामाची वाणी ॥ सस्मित झाली मुनिश्रेणी[5] ॥ शिवादि वंदिती पायवणी ॥ याग तो काय श्रीरामा ॥ ६३ ॥ तुझें करितां नामस्मरण ॥ सर्व याग होती पावन ॥ तो तूं ह्मणसी करीन यज्ञ ॥ आश्चर्य आह्मां वाटतें ॥ ६४ ॥ तथापि लीलाविग्रह[6] धरिला ॥ तयासारिखा पाहिजे खेळ केला ॥ तरी सांगतों दयाळा ॥ अश्वमेधविधानँ[7] ॥ ६५ ॥ अश्वमेध करितां रामा ॥ अति कष्ट नृपोत्तमा ॥ तरी तुज ऐसा श्रीरामा ॥ भुवनत्रयीं असेना ॥ ६६ ॥ अश्व तो कुंदेंदुवर्ण[8] ॥ पुच्छ पीत श्यामकर्ण ॥ सर्वत्रही जयाचें गमन ॥ हें लक्षण अश्वाचें ॥ ६७ ॥ विप्रांची संख्या ऐक ॥ वीस सहस्र असावे द्विजनायक ॥ लक्षावधि अनेक देख ॥ भोजनातें असावे ॥ ६८ ॥ विप्रांस दक्षिणा प्रत्येक ॥ गज रथ हय एक एक ॥ गोसहस्र प्रत्येक प्रत्येक ॥ सहस्रार्बुदें द्रव्यसंख्या ॥ ६९ ॥ चैत्रपौर्णिमेसी तो सोडावा ॥ वर्षपर्यंत तो रक्षावा ॥ स्वयें असिपत्र व्रत नेम धरावा ॥ आणि वर्जावा भोगमात्र ॥ ७० ॥ जेथें अश्व करील मलमूत्र ॥ तेथें द्यावें गोसहस्र ॥ हवन करोनि पवित्र ॥ धनें विप्र तोषवावे ॥ ७१ ॥ अश्वाचें पूजन करावें ॥ भाळीं[9] कनकपत्र बांधावें ॥ स्वनामांकित करावें ॥ लेखन वरी प्रौढीनें ॥ ७२ ॥ जो बलाढ्य असेल पार्थिव[10] ॥ तेणेंचि धरावा हा अश्व ॥ धरिलिया जाऊनि बलगर्व ॥ धरूनि अश्व सोडवावा ॥ ७३ ॥

---

१ धनुष्यें. २ बाण. ३ यज्ञाची इच्छा. ४ झाली. ५ मुनिसमूह. ६ क्रीडादेह. ७ विधि, प्रकार. ८ पांढरा. ९ मस्तकावर. १० राजा.

यज्ञकर्मीं साह्य भार्या ॥ पूर्ण असावी रामराया ॥ स्त्रीवांचूनि यज्ञचर्या ॥ निष्फळ ऐसें श्रुति बोले ॥ ७४ ॥ रामासी येऊनि दया ॥ यागार्थ आणील जनकतनया ॥ सुचविलें ह्मणोनि तया ॥ सीता देवी आणी कां ॥७५॥ ऐकोनियां गुरुवचन ॥ राम झाला बाष्प-[1]नयन ॥ बोले तयांसी करीन ॥ सुवर्णप्रतिमा सीतेची ॥ ७६ ॥ सीताप्रतिमा करूनि शुद्ध ॥ मी संपादीन अश्वमेध ॥ तुह्मी श्रीगुरु प्रसिद्ध ॥ असतां सर्व सिद्ध होय ॥ ७७ ॥ यज्ञारंभ करावा सत्वर ॥ यज्ञशाळा निर्माव्या रुचिर ॥ लक्षणोक्त पाहोनि हयवर ॥ दीक्षा द्यावी मजलागीं ॥ ७८ ॥ ऐकोनियां रामवचन ॥ ऋषींसह ब्रह्मनंदन ॥ वाजिशालेमाजी जावोन ॥ अश्वलक्षण पाहातसे ॥ ७९ ॥ लक्षणोक्त घेतला निवडोन ॥ सुमुहूर्त पाहोन रघुनंदन ॥ यथासांग पूजिले ब्राह्मण ॥ यागारंभ[2] तो केला ॥ ८० ॥ वस्त्रालंकारभू-षणें ॥ आणि मनोजव अश्वरत्नें ॥ सुरत मत्त वारणें ॥ ब्राह्मणतृप्ति आधीं केली ॥ ८१ ॥ सुवर्णशृंग रौप्यखुर ॥ ज्या दुग्ध देती अपार ॥ ऐसीं गोदानें सहस्रें सहस्र ॥ देवोनि विप्र तोषविले ॥८२॥ सीतेची प्रतिमा करून ॥ दीक्षित झाला रघुनंदन ॥ मग केलें अश्वपूजन ॥ वस्त्रालंकारभूषणें ॥ ८३ ॥ श्रीराम तंव घनसांवळा ॥ सुवर्णसीता शोभे चपळा ॥ मग वेदघोषें गर्जला ॥ विप्रमेळा तेधवां ॥ ८४ ॥ सुवर्णपत्र बांधिलें भाळीं ॥ त्यावरी लिहिल्या अक्षरावळी ॥ दशरथराव महाबळी ॥ जो भूपति अयोध्येचा ॥ ८५ ॥ त्याची पत्नी एकवीरा ॥ कौसल्या नामें सुंदरा ॥ तयेचा पुत्र तो अवधारा ॥ श्रीरामनामें जगद्वंद्य ॥ ८६ ॥ महावीर रघुनंदन ॥ सकळ वीरांत मुगुटरत्न ॥ ज्याचे प्रतापतेजेंकरून ॥ भुवनत्रय उजळलें ॥ ८७ ॥ रामप्रतापानळाचिया तेजें ॥ लाजोनि नृप अस्ता जाइजे ॥ वीरनक्षत्रावळी सहजें ॥ सत्कीर्तिचंद्रीं निस्तेज ॥ ८८ ॥ तेणें मांडिला हययज्ञ ॥ ह्मणोनि सोडिला श्यामकर्ण ॥ ज्यासी बळ असेल पूर्ण ॥ त्यानें अश्व धरावा ॥ ८९ ॥ तयासी शत्रुघ्न जिंकोन ॥ बळें सोडवील श्यामकर्ण ॥ ऐसें पत्र लिहोन ॥ भाळीं बांधिलें अश्वाचे ॥ ९० ॥ शत्रुघ्नासी ह्मणे रघुनंदन ॥ तुवां करावें अश्वरक्षण ॥ तीन अक्षौहिणी दळ[3] देऊन ॥ अश्व श्रीरामें सोडिला ॥ ९१ ॥ नाना देश नाना वनें ॥ नगरें आणि पट्टणें ॥ स्वेच्छा फिरत श्यामकर्ण ॥ भ्रमत चालिला भूतळीं ॥ ९२ ॥ जे जे देखती श्यामकर्ण ॥ ते ते राजे करिती नमन ॥ श्रीरामाचे भयेंकरून ॥ कोणी अश्वातें न धरिती ॥ ९३ ॥ कित्येक राजे बळवान ॥ तिहीं धरितां श्यामकर्ण ॥ शत्रुघ्न वीर दारुण ॥ युद्ध करूनि अश्व सोडवी ॥ ९४ ॥ ऐसा अश्व फिरत फिरत ॥ वाल्मीकाश्रमीं आला धांवत ॥ रामात्मजांचा लागतां हस्त ॥ होईन कृतार्थ या भावें ॥ ९५ ॥ वरुणें मांडिलें होतें हवन ॥ तेथें वाल्मीक नेला पाचारून[4] ॥ तंव तो अकस्मात श्यामकर्ण ॥ आश्रमातें पावला ॥ ९६ ॥ तें परम रमणीय उपवन ॥ जेथें कर्दळी निबिड[5] जाण ॥ दाडिमी फळ-भारेंकरून ॥ लवताती अपार ॥ ९७ ॥ अति सुतेज लतासुमनें ॥ वृक्षांधकारीं करिती चांदणें ॥ बकुळ चंपक चंदनें ॥ सुगंध दीजे



१ पाण्यानें भरलेले आहेत डोळे ज्याचे असा. २ अश्वमेध यज्ञाला प्रारंभ. ३ सैन्य. ४ बोलावून. ५ दाट.

सर्व वृक्षां ॥ ९८ ॥ मंडपीं द्राक्षफळांचे घोंस ॥ घंटायंत्रें शब्द करिती राजस ॥ रंभा क्रीडती त्या वनास ॥ स्वर्गधामा सांडोनि ॥ ९९ ॥ ऐसें वन तें मनोहर ॥ स्वयें रक्षी लव धनुर्धर ॥ तंव श्यामकर्ण तेथें दूर्वांकुर ॥ सुखें भक्षितां देखिला ॥ १०० ॥ लवानें देखोन तयातें ॥ आश्चर्य पावला मनातें ॥ मग पाचारोनि मुनिपुत्रांतें ॥ अश्वासमीप तो गेला ॥ १ ॥ तंव तो असे श्यामकर्ण ॥ बरवें केलेंसे तयाचें पूजन ॥ भाळीं पत्र देखोनि सीतानंदन ॥ सोडोनियां वाचितसे ॥ २ ॥ एकवीरा कौसल्या सत्य ॥ तिचा पुत्र श्रीरघुनाथ ॥ तयाचा अश्व हा निभ्रांत ॥ यज्ञाकारणें सोडिला ॥ ३ ॥ जो कोणी असेल बलवान ॥ तेणें धरावा श्यामकर्ण ॥ तयासी युद्ध करील शत्रुघ्न ॥ निजप्रतापें सोडवील ॥ ४ ॥ पत्राभिप्राय जाणोनी ॥ लव बाळ विचारी मनीं ॥ कौसल्याच वीरजननी ॥ या भूमंडळामाझारीं ॥ ५ ॥ आमची माता जनकनंदिनी ॥ ही काय नव्हे वीरजननी ॥ आह्मां पुत्रां प्रसवोनी ॥ काय वंध्या झाली पैं ॥ ६ ॥ ऐसें बोलोनियां वचन ॥ लवानें धरिला श्यामकर्ण ॥ कटीचें उत्तरीय वस्त्र लावोन ॥ हय बांधिला कर्दळीसी ॥ ७ ॥ तें देखोनि विप्रकुमर ॥ सर्वही झाले भयातुर ॥ मुखें करिती हाहाकार ॥ हें काय रे करितोसी ॥ ८ ॥ हा राजयाचा श्यामकर्ण ॥ यासीं तूं करितोसि बंधन ॥ आतां येतील अश्वरक्षकगण ॥ ते तुजला धरून नेतील ॥ ९ ॥ तूं महाचपळ बाळ ॥ उगा न राहसी एक पळ ॥ तुवां अनर्थ मांडिला प्रबळ ॥ ऋषिआश्रमाभोंवता ॥ ११० ॥ भयाभीत ऋषिकुमर ॥ तयातें विनविती दीनोत्तरें[1] ॥ परी तें क्षत्रियवीर्य प्रखर ॥ भय न पावे सर्वथा ॥ ११ ॥ लव बोले ऐका मात ॥ तुह्मी विप्रस्त्रीजठरोद्भूत[2] ॥ मी तों सीतोदरसंभूत ॥ क्षत्रियवीर्य प्रतापी ॥ १२ ॥ माझें नाम ठेविलें लव ॥ याचा तुह्मां न कळे अभिप्राव ॥ शरधारीं रिपुगणांचे लव ॥ करीन ऐसें जाणावें ॥ १३ ॥ हें जरी न करीं यथार्थ ॥ तरी मी सीताउदरीं जन्मलों जंत ॥ मन करूनि भयाभीत ॥ धरिला अश्व जरी सोडीं ॥ १४ ॥ जरी हा श्यामकर्ण सोडीन ॥ तरी मातेसी लाजवीन ॥ याहून बरवें वाटे मरण ॥ व्यर्थ वांचणें अश्व देतां ॥ १५ ॥ तुह्मी तों वाक्शूरांचे नंदन ॥ मी तों बाहुशूराचा पूर्ण ॥ सकळ जगा मानितों तृण ॥ मग अश्वरक्षक कायसे ॥ १६ ॥ ऐसें ऐकोनि मुनिपुत्र ॥ पळोनि उभे ठाकले दूर ॥ क्षत्रियतेज समर्थ थोर ॥ वाट पाहे सैन्याची ॥ १७ ॥ आतां येतील सैनिकगण ॥ लव त्यांसी करील महारण ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अति रसाळ परिसावें ॥ १८ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ रामकथामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ११९ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते लवकुशाख्यानं नाम एकोनत्रिंशत्तमोध्यायः ॥ २९ ॥ ॥ अध्याय ॥ २९ ॥ ॥ ओव्या ॥ ११९ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥

---

१ काकुळतीने. २ ब्राह्मणस्त्रीच्या उदरांतून जन्म पावलेले.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ॥ जैमिनीसी ह्मणे नृपपुंगवं[1] ॥ परम सांगतां जी लाघव[2] ॥ द्वादश वर्षांचा बाळ लव ॥ कैसा हय तेणें धरिला ॥ १ ॥ शत्रुघ्नाऐसा वीर प्रसिद्ध ॥ जो बळसिंधु अगाध ॥ तयासीं तेणें केलें युद्ध ॥ तेंचि कौतुक मज सांगा ॥ २ ॥ मग जैमिनी बोले वचन ॥ राया तूं सकळ कळाप्रवीण ॥ परी पराक्रमी पुरुषाकारण ॥ वयमान थोर कासया ॥ ३ ॥ पाहा दीपकळा[3] असे केव्हडी ॥ परी अंधकारांचीं नगरें मोडी ॥ लघु वज्र परी आपुले प्रौढीं ॥ कडेचि पाडी पर्वतांचे ॥ ४ ॥ पाहा केव्हडा सिंहनंदन ॥ उपजतांचि करी गजविदारण ॥ कीं गंगाबिंदु प्राशन ॥ करितां नाशी पातककोटी ॥ ५ ॥ नातरी केव्हडा अंकुश ॥ स्थूळदेहासी करी कासावीस ॥ ह्मणोनियां तेजस्वी पुरुषास ॥ नसे वयाची अपेक्षा ॥ ६ ॥ अग्निस्फुलिंग केव्हडा ॥ परी क्षणमात्रें जाळी तृणहुडा[4] ॥ ह्मणोनि स्थूळ तो नसे गाढा ॥ जो तेजस्वी तोचि थोर ॥ ७ ॥ नामें असे बाळ लव ॥ परी रणीं करील शत्रूंचे रंव ॥ हा मनीं धरूनि भाव ॥ धरिला हय प्रतापें ॥ ८ ॥ तंव शत्रुघ्नाचे सैनिक वीर ॥ घोडा घोडा करिती स्वर ॥ चहूंकडोनि येतां सत्वर ॥ तों आश्रम देखिला मुनीचा ॥ ९ ॥ चहूंकडे पाहातां जाण ॥ दुरोनि देखिला श्यामकर्ण ॥ गळां उत्तरीय वस्त्र घालून ॥ कर्दळीसी बांधिला ॥ १० ॥ तों समीप देखिले विप्रकुमार ॥ तयांसी पुसती सैनिकवीर ॥ ह्मणती कोणें धरिला हयवर ॥ ऐकोनि भियालीं ऋषिबाळें ॥ ११ ॥ एक करिती पलायन ॥ एक भयें करिती रुदन ॥ एक चोळिती नयन ॥ आह्मी बाळें हें नेणो ॥ १२ ॥ एक ह्मणती आह्मी विप्रनंदन ॥ नित्य करितों वेदपठण ॥ तुह्मांसी देतों आशीर्वचन ॥ हें काय आह्मां योग्य असे ॥ १३ ॥ एक ह्मणती आह्मी आश्रित ॥ तुमचेचि असों स्थापित ॥ आह्मी अत्यंत भयभीत ॥ हें कर्म आह्मां घडेना ॥ १४ ॥ ह्मणाल कोणें हा अश्व बांधिला ॥ तरी तो आम्रच्छायेस बैसला ॥ त्याणें बांधितां आह्मीं वर्जिला ॥ परी कदा नायके तो ॥ १५ ॥ तो महाहट्टी देखिला ॥ ह्मणोनि त्याचा संग सोडिला ॥ ऐकोनि ऐशा बाळबोला ॥ सर्वही वीर हांसती ॥ १६ ॥ उत्तम देखोनि श्यामकर्ण ॥ बाळें बांधिला धांवोन ॥ येथें अन्याय पाहे कवण ॥ सोडा अश्व वेगेंसीं ॥ १७ ॥ मग लव त्यांसी झाला बोलता ॥ कां रे अश्व सोडूं पाहतां ॥ मज वीरातें न जिंकितां ॥ वृथा गर्व कां करितां मनीं ॥ १८ ॥ आपणां वीर ह्मणवितां ॥ गर्वेंचि अश्व सोडूं पाहतां ॥ लाज न वाटे तुमच्या चित्ता ॥ व्यर्थ सोडितां कां हय ॥ १९ ॥ ऐकोनि ऐसें त्याचें वचन ॥ वीर झाले क्रोधायमान ॥ कोणी झाले हास्यवदन ॥ बाळ ह्मणोनि उपेक्षिती ॥ २० ॥ बाळ ह्मणोनि हांसले ॥ कोणी अश्व सोडिते झाले ॥ तंव लवानें शर सोडिले ॥ हस्त तोडिले तयांचे ॥ २१ ॥ छिन्नहस्त वीरगण ॥ सक्रोध बोलती दारुण ॥ ह्मणती छेदा याचे नाककान ॥ अपराधी किशोरँ[7] हा ॥ २२ ॥ ह्मणोनि सोडिती त्यावरी बाण ॥ कोणी टाकिती पाषाण ॥ कोणी शक्ति टाकिती उचलोन ॥ कोणी खड्ग हाणती ॥ २३ ॥ लवानें सोडोनियां बाण ॥ केलीं

---

१ नृपश्रेष्ठ. २ कौतुक. ३ दिव्याची ज्योत. ४ गवताची रास. ५ बारीक तुकडे. ६ श्यामकर्ण. ७ बालक.

सर्व शस्त्रें निवारण ॥ जेवीं करितां गौतमीस्नान ॥ महापातकें निवारती ॥ २४ ॥ जो निस्पृह वेदज्ञ अंगीं ॥ अति विरक्त महायोगी ॥ तो भवबंधनातें सोडी वेगीं ॥ तैसे शर निवारिले ॥ २५ ॥ नातरी रामनाम ऐकतां ॥ पळ सुटे अवघिया दुरितां ॥ तैसें लवाचिया बाणें तत्वतां ॥ बाणजाळ निवारिलें ॥ २६ ॥ मग पांच पांच बाणेंकरून ॥ अवघियांचें हृदय भेदून ॥ पाठीसीं तूणीर दीव्यमान ॥ अचुक संधान तयाचें ॥ २७ ॥ कित्येक गजांचीं खंडें केलीं ॥ हस्त्यारूढांचीं शिरें छेदिलीं ॥ गजघंटाकबंधें मुक्त झालीं ॥ बाणें टाकित छेदोनि ॥ २८ ॥ रत्नखचित कनकरथ ॥ ध्वज सारथी अश्वांसहित ॥ ऐसा करीत निःपात ॥ बाणजाळ घालोनि ॥ २९ ॥ अश्व बहुत मारिले ॥ सारथी सर्व निवटिले ॥ ध्वजस्तंभ छेदोनि पाडिले ॥ शरेंकरूनि लाघवें ॥ ३० ॥ बाणेंकरून चाप तूणीरें ॥ लव छेदिता झाला सत्वर ॥ मनोजव अश्व अपार ॥ प्रेतें करूनि पाडिले ॥ ३१ ॥ पालाणिले अश्व मर्दिले ॥ सशस्त्र पदाती ते मारिले ॥ सकळ वीर ते पळविले ॥ सीतानंदनें रणांगणीं ॥ ३२ ॥ वयें तो बाळ कोमळ ॥ परम त्रासिलें शत्रुघ्नदळ ॥ हाहाकार उठला प्रबळ ॥ तंव तो शत्रुघ्न कोपला ॥ ३३ ॥ रथारूढ धांवला वीर ॥ धनुष्यास केला टणत्कार ॥ उभा रे उभा ह्मणोनि थोर ॥ गर्जना करी शत्रुघ्न ॥ ३४ ॥ ऐकोनि ऐसें सीतानंदन ॥ मांडिलें तेव्हां वज्रठाण ॥ द्वादश सोडोनियां बाण ॥ शत्रुघ्न हृदयीं भेदिला ॥ ३५ ॥ एके शरें हृदय भेदिलें ॥ चहूंनीं चारी अश्व मारिले ॥ चहूंनीं चक्ररक्षक संहारिले ॥ एकें उडविलें ध्वजातें ॥ ३६ ॥ एके शरें गुण छेदिला ॥ ऐसा द्वादश बाणें झाडा केला ॥ लवाचा प्रताप आगळा ॥ देखोनि कोपला शत्रुघ्न ॥ ३७ ॥ शत्रुघ्न ह्मणे हें तों नवल ॥ आह्मीं मानिलें यासी बाळ ॥ हा तो सर्वांचा दिसे काळ ॥ सावध व्हावें वीर हो ॥ ३८ ॥ मग सावध होऊनि शत्रुघ्न ॥ अन्य धनुष्यीं चढविला गुण ॥ नाळीक नाराच भल्ल बाण ॥ नाना जातींचे टाकिले ॥ ३९ ॥ तिहीं बाणीं विंधिला तो बाळ ॥ तंव लवानें हास्ययुक्त केलें मुखकमळ ॥ ह्मणे शरप्रहारें तुझें बळ ॥ कळों आलें मजलागीं ॥ ४० ॥ माझ्या ललाटीं काय लागलें ॥ पुष्प किंवा मृदु फळें ॥ ऐसें बोलोनियां बळें ॥ चार बाण सोडित लव ॥ ४१ ॥ ते बाण कठिण लागले ॥ चारी हयांतें संहारिलें ॥ एकें सारथिया मारिलें ॥ एकें छेदिलें ध्वजातें ॥ ४२ ॥ शत्रुघ्नधनुष्य प्रचंड ॥ त्याचें लवानें केलें दुखंड ॥ ऐसा लवप्रताप प्रचंड ॥ देखोनि शत्रुघ्न कोपला ॥ ४३ ॥ छिन्नधनुष्य आणि विरथ ॥ देखोनि अश्व सारथी मृत ॥ शत्रुघ्न झाला कंपित ॥ आणिक धनुष्य घेतलें ॥ ४४ ॥ चढवोनि त्यातें गुण ॥ शर लाविला दारुण ॥ जो मंडित गृध्रपिच्छेंकरून ॥ अग्निसम तीक्ष्ण तेजाळ ॥ ४५ ॥ बाळ ह्मणोनि उपेक्षावें ॥ तरी निजप्राणासी म्यां मुकावें ॥ बाळावरी शस्त्र घालावें ॥ तरी अपयश या जगीं ॥ ४६ ॥ उभयप्रकारीं संकट ॥ घडोनि आलें दुर्घट ॥ सैन्यरहित बाळ एकट ॥ तोही पदाती पितृहीन ॥ ४७ ॥ मी सैन्यांकित आणि रथस्थ ॥ यासी मारितां कोण पुरुषार्थ ॥ लज्जा होईल जनांत ॥ न

१ गोदावरीचें स्नान. २ पातकांला. ३ धनुष्यें. ४ भाते. ५ सर्वत्र पसरलेले. ६ विशेष. ७ दोरी. ८ मोडलेलें धनुष्य ज्याचें असा. ९ पराक्रम.

मारितां अनर्थ सर्वांतें ॥ ४८॥ भलतें अकार्य करावें ॥ परी आपले प्राण राखावे ॥ ऐसें शास्त्रज्ञ बोलती बरवें ॥ तेंचि करावें निश्चित ॥ ४९ ॥ शत्रुघ्न तयासी बोले उत्तर ॥ आतां राखीं रे आपलें शिर ॥ नातरी मरण आलें रे सत्वर ॥ परी तुझी कृपा येतसे ॥ ५० ॥ ऐकतां ऐसें त्याचें वचन ॥ लवें सोडिला दिव्य बाण ॥ शत्रुघ्नाचा बाण खंडोन ॥ पाडिला त्वरें भूमीवरी ॥ ५१ ॥ जो लटिकें बोले वचन ॥ त्याचे पितर पावती पतन ॥ तेवीं तो द्विधा[1] होवोनि बाण ॥ पडिला व्यर्थ भूमीसीं ॥ ५२ ॥ शत्रुघ्न विस्मय पावला ॥ धनुष्यीं दुजा बाण योजिला ॥ काळानळासमान देखिला ॥ तेजें लोपला दिनेश ॥ ५३ ॥ देखोनि लवें लाघव केलें ॥ शरें शर धनुष्य छेदिलें ॥ तें [2]लवणारीनें कौतुक पाहिलें ॥ मग मन झालें कंपायमान ॥ ५४ ॥ मग शत्रुघ्नें शर निवडून घेतला ॥ जो रामदत्त तेजें आगळा ॥ जेणें लवणासुर मारिला ॥ तो सोडिला लवावरी ॥ ५५ ॥ शत्रुघ्न बोले गर्जोन ॥ या शरें पावसी रे मरण ॥ बाणतेजें आकाश पूर्ण ॥ व्यापिलें तेणें देव भय पावले ॥ ५६ ॥ सत्व सामर्थ्य वदला लव तत्वतां ॥ जरी जानकी सत्य असेल पतिव्रता ॥ तरी यातें छेदीन त्वरिता ॥ ह्मणोनि लव बाण सोडी ॥ ५७ ॥ तेथें झालें कौतुक ॥ मध्येंच तोडिला तो सायक ॥ पूर्वार्ध भूमीसी पडत ॥ उत्तरार्ध तेव्हां नाटोपे ॥ ५८ ॥ तो शर अनिवार जाणोन ॥ लवें केलें कुशाचें स्मरण ॥ तो या समयीं असता तरी मजलागुन ॥ भय नसतें बाणाचें ॥ ५९ ॥ आधीं त्या शरें धनुष्य छेदिलें ॥ नंतर हृदयीं तें प्रवेशलें ॥ बाळ धरणीवरी पडिलें ॥ धनुष्य गळालें हातींचें ॥ ६० ॥ तों बाळ झाला रुधिरमय पूर्ण ॥ सर्वेंद्रियें गळालीं जाण ॥ न सुचे कार्यकारण ॥ देहभाव विसरला ॥ ६१ ॥ मग शत्रुघ्नसैन्यामाझारीं ॥ वाजविती शंख भेरी ॥ वीर संतोषोनि अंतरीं ॥ सिंहनादें गर्जती ॥ ६२ ॥ पडिला देखोनि सीतानंदन ॥ वीरीं सोडिला श्यामकर्ण ॥ पुढें मांडिलें गमन ॥ सकळ सैन्यासमवेत ॥ ६३ ॥ लव मूर्च्छित देखोन ॥ कृपेनें हृदयी द्रवला शत्रुघ्न ॥ जवळी आला धांवून ॥ स्वहस्तें तया उचलिलें ॥ ६४ ॥ लक्षूनि पाहिला शत्रुघ्नें बाळ ॥ ह्मणे हा रामाकृति केवळ ॥ उदक पाजूनि शीतळ॥ पल्लवें अनिळ घातला ॥ ६५॥ कांहीं सावधसा देखिला ॥ मग तो रथावरी घातला ॥ अश्व घेऊनि चालिला ॥ रामानुज तेधवां ॥ ६६ ॥ आतां येईल कुश बाळ ॥ तो निज बंधूतें सोडवील ॥ ती पुढें कथा रसाळ ॥ श्रोतेजनीं परिसावी ॥ ६७ ॥ इति श्रीजैमिनीअश्वमेध ॥ रामलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतया ॥६८॥
इति श्रीमहाभारते आश्वमेधिके लवकुशाऽऽख्यानं नाम त्रिंशोऽध्यायः ॥ ३० ॥ अध्याय ॥ ३० ॥ ओव्या ॥ ६८॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

१ दोन तुकडे. २ शत्रुघ्नानें.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ह्मणे कुंजरपुराधीश्वर[1] ॥ जेव्हां धरून नेला लवकुमार ॥ तेव्हां कोठें गेला होता कुश वीर ॥ सीतेसी कैसें जाणवलें ॥ १ ॥ ही पवित्र रामकथा ॥ मज सांगावी मुनिनाथा ॥ ऐकोनियां ऐसें वक्ता ॥ सादर झाला कथेसी ॥ २ ॥ स्त्री हो अथवा पुरुष ॥ ब्रह्महत्यादिक अति दोष ॥ कुशचरित्र ऐकतां निर्दोष ॥ होय यांत संशय नसे ॥ ३ ॥ जैमिनि ह्मणे कुंभिनीपाळा[2] ॥ चित्त द्यावें जी कथेला ॥ कुशचरित्र जाह्नवीजळा[3] ॥ प्राशन करीं श्रोत्रपात्रें ॥ ४ ॥ शत्रुघ्नें लव नेला धरून ॥ मग धांवत आले ऋषिनंदन ॥ शोकाश्रूनें भरूनि नयन ॥ सीतेपासीं पातले ॥ ५ ॥ रुदन करूनि बोल बोलती ॥ माते ऐकावी विनंती ॥ कोणे एक नृपाचा वनाप्रती ॥ आला होता श्यामकर्ण ॥ ६ ॥ तो लवें जावोनि धरिला ॥ बळें कर्दळीसी बांधिला ॥ तों मागून आला कटकमेळा ॥ लव झुंजला तयासीं ॥ ७ ॥ असंख्य बाण सोडिले ॥ सकळ दळ मारिलें ॥ तों मुख्यवीरें शरजाळें ॥ वेगें घातलें यावरी ॥ ८ ॥ तेणें शरें मूर्च्छित पडिला ॥ उदक पाजोनि सावध केला ॥ रथावरी बांधोनि नेला ॥ नृप गेला तो जननीये ॥ ९ ॥ ऐकोनियां ऐसिया वृत्ता ॥ तटस्थ झाली जनकदुहिता ॥ जेवीं अचळ चित्रस्थ देवता ॥ तेवीं झालें सीतेतें ॥ १० ॥ जेवीं विद्युल्लताध्वनि ऐकोनी ॥ भय पाविजे निस्तेजपणीं ॥ नातरी सर्व हरिलिया नृपगणीं ॥ धनिक[4] जैसा तटस्थ ॥११॥ मग काय बोले सीता पवित्र ॥ जरी सत्य असेल रामचंद्रचरित्र ॥ तो कुश येवोनि लवपुत्र ॥ सोडवून आणील त्या पुण्यें ॥ १२ ॥ सीता ह्मणे माझें तान्हें बाळ ॥ राजस सुकुमार कोमळ ॥ एकल्यावरी येवोनि परदळ ॥ कैसें मारिलें पापिष्ठें ॥ १३ ॥ वातें पडे जैसी केळी ॥ तैसी पडली जनकबाळी ॥ लवा न पुसतां मजजवळी ॥ कैसा गेलासी संग्रामा ॥ १४ ॥ चंद्रबिंबासमान वदन ॥ आतां मी केव्हां पाहेन ॥ शरीर झालें असेल छिन्नभिन्न ॥ बाणघातें तुझें कीं ॥ १५ ॥ तूं करिसी कंदमूलाशन[5] ॥ द्वादश वर्षांचा तूं नंदन ॥ त्या तुझें करावया छेदन ॥ कोणता वीर पातला ॥१६॥ धाय मोकलून ह्मणे जानकी ॥ या समयीं तात नाहीं वाल्मीक कीं ॥ नाहीं कुशही विवेकी ॥ दुःख कवणा मी सांगूं ॥ १७ ॥ ऐसा विलाप करी जनकबाळा ॥ तंव फळें मूळें घेऊनि कुश आला ॥ वाटे येतां तयाला ॥ अपशकुन जाणवती ॥ १८ ॥ दोन्ही बाहूंस होतसे स्फुरण ॥ उगेंच नेत्रांस येतसे जीवन[6] ॥ वारंवार व्याकुळ होत मन ॥ ह्मणे दुश्चिन्हें कां जाणवती ॥ १९ ॥ आश्रमासमीप आला सत्वर ॥ मग बोले मातेसी उत्तर ॥ मज लव येतसे समोर ॥ आजि कोठें तो गेला ॥ २० ॥ मी येतों ह्मणोन पाठीं लागला ॥ नको ह्मणून म्यां दवडिला ॥ ह्मणोनियां तो रुसला ॥ कोठें गेला जननीये ॥ २१ ॥ मग उतरिला समिधाफळमूळभार ॥ आश्रमामाजी सत्वर ॥ मातेकडे पाहे सादर ॥ तंव ती विलाप करीतसे ॥ २२ ॥ कुश बोले स्नेहासरिसा ॥ माते हा विलाप कां हो ऐसा ॥ येरी ह्मणे माझ्या पाडसा ॥ धरून नेला परवीरीं ॥ २३ ॥ कोणें नृपाचा श्यामकर्ण ॥

---

१ जनमेजय. २ पृथ्वीपते. ३ गंगाजळाला. ४ धनाढ्य व्यापारी. ५ कंदमूळांचें भक्षण. ६ अश्रु.

येतां लवें बांधिला धरून ॥ मागून सैन्य आलें रक्षण ॥ तयासीं युद्ध पैं केलें ॥ २४ ॥ लवें सकळ दळ भंगिलें ॥ मग मुख्यवीरें याशीं पाडिलें ॥ बांधोनियां घेऊन गेले ॥ बाळक माझें राजस ॥ २५ ॥ लव माझें धाकुटें बाळ ॥ कुशा तुजवीण कोण सोडवील ॥ मज लागली तळमळ ॥ धांव धांव रे राजसा ॥ २६ ॥ म्यां काय जन्मांतरीं केलें पाप ॥ मज अंतरला कुळदीप ॥ तूं नव्हतासी समीप ॥ वत्सधेनू विघडलीं ॥ २७ ॥ सजीव किंवा निर्जीव ॥ माझा बाळ असेल तो लव ॥ हें तों न कळे दैवलाघव ॥ ह्मणोनि रडें आक्रोशें ॥ २८ ॥ कुश बोले तये क्षणीं ॥ शोक न करीं जनकनंदिनी ॥ मी तव जठरीं येउनी ॥ काय जन्मलों कीटक ॥ २९ ॥ सूर्यकिरणें तापली धरा[१] ॥ ती रक्तोदकें निववीन अवधारा ॥ तृषा हरीन मी सत्वरा ॥ रक्तनिम्नगा[२] वाहवीन ॥ ३० ॥ जरी शत्रुसाह्यालागून ॥ आले इंद्रयमाऽग्निवरुण ॥ वायु कुबेर ईशान ॥ तरी त्यांतें जिंकीन क्षणार्धें ॥ ३१ ॥ कवच किरीट धनुष्यबाण ॥ खड्ग चर्म[३] देईं आणोन ॥ माते तव चरणप्रतापेंकरून ॥ बंधुरत्न आणितों ॥ ३२ ॥ ऐकोनियां ऐसी बोली ॥ परम संतोषली जनकबाळी ॥ पर्णशाळेमाजी प्रवेशली ॥ आणोन दिधलीं शस्त्रास्त्रें ॥ ३३ ॥ लेवोनियां कवच मुकुट ॥ पाठिसीं भाते बांधिले नीट ॥ खड्ग चर्म धरोनियां उद्भट ॥ वीरश्रियेनें बाणला ॥ ३४ ॥ मग वंदोनि मातृचरणा ॥ भावें करीत प्रदक्षिणा ॥ मग कुश काय बोले वचना ॥ वाल्मीकचरणां स्मरोनि ॥ ३५ ॥ मी तव उदरीं जन्मलों सिंह केवळ ॥ शरनखें शत्रुगजकुंभस्थळ ॥ विदारोनियां मुक्ताफळ ॥ काढीन बंधु लव माझा ॥ ३६ ॥ हें मी जरी न करीं जाण ॥ तरी तवोदरीं कृमी जन्मलों पूर्ण ॥ ह्मणोनि वंदी सीताचरण ॥ येरी आशीर्वचन बोलिली ॥ ३७ ॥ विजयी होईं रे कुशनंदना ॥ सत्वर मंथूनियां शत्रुसेना ॥ येईं घेऊन बंधुरत्ना ॥ मग निंबलोण करीन तूतें ॥ ३८ ॥ मनीं स्मरोनि रामचरण ॥ युद्ध करावें सावधान ॥ बरवें ह्मणोनि सीतानंदन ॥ शीघ्र तेथून चालिला ॥ ३९ ॥ स्वामी[४] चालिला तारकावरी ॥ कीं राम दशवदनावरी ॥ कीं अंधकावरी त्रिपुरारी ॥ तेवीं कुशेंद्र चालिला ॥ ४० ॥ तों समीप देखिला दळभार ॥ कुश वीरांप्रति बोले उत्तर ॥ ह्मणे उभे रे उभे तस्कर[५] ॥ कां रे सत्वर पळतसां ॥ ४१ ॥ माझें बंधुरत्न चोरुनी ॥ पळोनि जातां रे तस्कर घेवोनी ॥ मी कुश आलों तयाकारणीं ॥ फिरा मागें वीर हो ॥ ४२ ॥ ऐसे ऐकतां अवचित बोल ॥ फिरोनि पहाती वीर सकळ ॥ नेणों पाठीस लागला महाकाळ ॥ तैसा तो बाळ देखिला ॥ ४३ ॥ जे समरधीर अति उद्भट ॥ कुश देखोनि बोलती स्पष्ट ॥ हें पाठी लागलें ब्रह्मकपाट[६] ॥ जाऊं नेदीच सर्वथा ॥ ४४ ॥ वीर ह्मणती हा नव्हे बाळ ॥ आह्मांस भासतो कृतांत काळ ॥ हा भंगोनिया सकळ दळ ॥ नेईल वेगें जयलक्ष्मी ॥ ४५ ॥ बाळ देखोनि रामाकृती ॥ सर्वही वीर मनीं नमिती ॥ मग शत्रुघ्नातें सर्व सांगती ॥ फिरा दुजा हा वीर आला ॥ ४६ ॥ आतां कासया पुढें गमन ॥ शत्रु वधावा यत्नेंकरून ॥ परी हा अनावर दारुण ॥

१ पृथ्वी. २ रक्ताच्या नद्या. ३ ढाल. ४ कार्तिकस्वामी. ५ चोरांनो. ६ एका प्रकारचें विघ्न.

वीरांलागीं उरों नेदी ॥ ४७ ॥ चिंतावला शत्रुघ्न ॥ मग तयासी बोले प्रधान ॥ तुह्मी बलाब्य वीर पूर्ण ॥ बाळकालागीं कां भितां ॥ ४८ ॥ मज द्यावें आज्ञावचन ॥ आतां आणितों बाळ धरून ॥ [1]नखसाध्य कर्मालागून ॥ कुठार कां हो योजावी ॥ ४९ ॥ तों शत्रुघ्न बोले तयासी ॥ तुवां न मारितां बाळकासी ॥ धरून आणावें वेगेंसीं ॥ रामालागीं भेटावया ॥ ५० ॥ तों तेथें झाले अपशकुन ॥ ध्वज पडिले उन्मळोन ॥ जेवीं प्रचंड वातेंकरून ॥ वृक्ष जैसा उन्मळे ॥ ५१ ॥ तूणीरापासोनि बाण ॥ उगेच निघती आपआपण ॥ कोशगृहापासून ॥ खड्गें पडती [2]धरणीसी ॥ ५२ ॥ रजें झांकोळलें सर्व नभ ॥ दिनमणि झाला निष्प्रभ ॥ तो पुढें देखिला अंतककुंभ ॥ कुश नंदन सीतेचा ॥ ५३ ॥ मग शत्रुघ्न पाठवी सैन्याधिपती ॥ वेगें होईंजे युद्धाप्रती ॥ बरें ह्मणोनि शीघ्रगती ॥ सकळ दळेंसीं धांवला ॥ ५४ ॥ सेनापति बोले ते वेळ ॥ कुमारा आहेसी तूं कोमळ ॥ आह्मी तों कृतांत केवळ ॥ शिक्षा लावूं काळातें ॥ ५५ ॥ येरू ह्मणे तुह्मी स्थूळ ॥ शिक्षा लावूं आलेति केवळ ॥ परी तुह्मी तों तृणाचळ ॥ वडवाग्नि दारुण मी असें ॥ ५६ ॥ तूं पर्वत असशी थोर ॥ मी तरी असें लघु वज्र ॥ तूं तरी अंधकाराचें नगर ॥ मी दीपकळिका अति सूक्ष्म ॥ ५७ ॥ ऐकतां त्याचे ऐसिया बोला ॥ सेनापति परम कोपला ॥ दश बाणीं कुश विंधिला ॥ तो हांसला गदगदां ॥ ५८ ॥ कुशें धनुष्य चढवून ॥ योजिला तीक्ष्ण एक बाण ॥ त्याचें सेनाधीशें निवारण ॥ करितां कुश क्रोधावला ॥ ५९ ॥ मग चारी सोडोनि शर ॥ मारिले चारी अश्व थोर ॥ एकें सारथ्याचें शिर ॥ उडविलें गगनोदरीं ॥ ६० ॥ एकें केला रथाचा चूर ॥ चारी चक्ररक्षक मारिले वीर ॥ दोहों बाणीं अति सत्वर ॥ धनुष्य कवच छेदिलें ॥ ६१ ॥ अर्धचंद्रशरें तात्काळ ॥ छेदोन पाडिले दोनी करकमळ ॥ सवेंचि दोहों बाणीं उतावेळ ॥ दोन्ही चरण छेदिले ॥ ६२ ॥ मग तीक्ष्ण बाणेंकरून ॥ शिर छेदिलें नलगतां क्षण ॥ किरीटकुंडलें मंडित पूर्ण ॥ पडिलें शत्रुघ्नासन्मुख ॥ ६३ ॥ सेनापति पावला [3]परत्र ॥ सैन्यांत उठिला हाहाकार ॥ मग त्याचा बंधु नागवीर ॥ तो धांवला कुशावरी ॥ ६४ ॥ तेणें कुशावरी टाकिली शक्ती ॥ तेज दडिलें तिचें [4]क्षितीं ॥ मग कुशें योजिली दुजी शक्ती ॥ निवारिली ती आकाशीं ॥ ६५ ॥ काळदंडवत सोडूनि बाण ॥ गजाचे छेदिले चारी चरण ॥ येरें गजाखालीं उडी टाकून ॥ चरणचाली धांवला ॥ ६६ ॥ हातीं गदा घेतली [5]क्रूर ॥ जी घंटांकित मनोहर ॥ ती भोंवंडोनि सत्वर ॥ कुशावरी टाकिली ॥ ६७ ॥ कुशें बाण सोडिला ते क्षणीं ॥ गदा छेदोनि पाडिली धरणीं ॥ सव्य हस्त तत्क्षणीं ॥ एक शरें उडविला ॥ ६८ ॥ उरला होता वामकर ॥ तेणें भिरकाविलें चक्र थोर ॥ तें देखोनि सीतापुत्र ॥ वामहस्त छेदिता झाला ॥ ६९ ॥ परी तो महावीर असे गाढा ॥ कररहित धांवला पुढां ॥ मग चरण छेदोनियां धडा ॥ बाण योजिला दारुण ॥ ७० ॥ छिन्नचरण छिन्नकर ॥ वदन झालें [6]धुळिंधूसर ॥ रुधिरें माखलें रक्तांबर ॥ तैसाचि पुढें

१ नखानें साधण्याजोगें. २ पृथ्वीवर. ३ परलोक. ४ पृथ्वीवर. ५ बळकट. ६ धुळीनें मळून गेलेलें.

धांवला ॥ ७१ ॥ कीं अंबरीं रविबिंबाशीं ॥ राहु धांवे ग्रासावयासी ॥ छिन्न बाहूमाजी धरोनि गदेशीं ॥ कुशालागीं ताडिलें ॥७२॥ तयाचें शूरत्व अत्यंत अधिक ॥ देखोनि संतोषला सीतासुत ॥ अर्धचंद्रशरें अति त्वरित ॥ शिर त्याचें छेदिलें ॥ ७३ ॥ शिरकमळ उडविलें ॥ तें गगनामाजी अदृश्य झालें ॥ चंद्रचूडें असे नेलें ॥ रुंडमाळेकारणें ॥ ७४ ॥ यापरी तो नागवीर ॥ त्यातें मारूनि सीतापुत्र ॥ मग शत्रुघ्नाचा सैन्यसागर ॥ शोषावया धांवला जैसा अगस्ती ॥ ७५ ॥ पर्वताकार गजदेहातें ॥ छेदितां उसळती बाणें रक्तें ॥ वीरांचीं अंगें आरक्तें ॥ जेवीं किंशुक फुलले ॥ ७६ ॥ होतां बाणबाणातें घर्षण ॥ तेथोनि वर्षे कृशान ॥ तेणें जळे सैन्यइंधन ॥ गगनीं देव आश्चर्य करिती ॥ ७७ ॥ ज्यांसी कुशाचे बाण लागले ॥ त्यांनीं प्राण तेथेंचि ठेविले ॥ हस्ती अश्व रथ चूर्ण झाले ॥ पदाती आटले बहुतेक ॥ ७८ ॥ शरें उडविले शिरभार ॥ ते पृथ्वीवरी पसरले समग्र ॥ कन्यावित्तग्राहक नर ॥ त्याचे पितर जयापरी ॥ ७९ ॥ कन्याविक्रयें नर ॥ चालवी आपुला संसार ॥ अधोगती पडती त्याचे पितर ॥ तेंवीं अधःशिर वीर पडले ॥ ८० ॥ यापरी चतुरंग सेना ॥ कुशेंद्रें नेली यमसदना ॥ जेवीं करितां स्वधर्माचरणा ॥ दुरितकानना भस्म करी ॥ ८१ ॥ यापरी शत्रुघ्न आणि कुश ॥ रणीं भिडतील अति आवेश ॥ तें पुढिले प्रसंगीं सुरस ॥ सावधान परिसावें ॥ ८२ ॥ इति श्रीजैमिनि अश्वमेध ॥ रामकथामृत अगाध ॥ श्रवण करितां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ८३ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते लवकुशाख्यानं नाम एकत्रिंशोऽध्यायः ॥ ३१ ॥ ॥ अध्याय ॥ ३१ ॥ ॥ ओव्या ॥ ८३ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

१ शिवानें. २ अग्नि. ३ सैन्यरूपी सर्पण. ४ पायदळ. ५ मुलीचा पैसा घेणारा. ६ पातकरूपी अरण्याला.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे नृपनाथा ॥ सावध ऐकें पुढें कथा ॥ कुशें मारितां सैन्यनाथा ॥ पुढें कैसें वर्तलें ॥ १ ॥ आजानुबाहु तो शत्रुघ्न ॥ अतिरथी वीर दारुण ॥ सेनापति मारिला देखोन ॥ क्रोधानळें पेटला ॥ २ ॥ धनुष्या करूनि टणत्कार ॥ गुणीं[1] लावोनि शर ॥ आकर्ण वोढोनि सत्वर ॥ कुशावरी टाकिले ॥ ३ ॥ तें देखोनि सीतानंदन ॥ सोडिता झाला चार बाण ॥ अश्वांसहित रथ चूर्ण ॥ करूनियां टाकिला ॥ ४ ॥ गृध्रपक्षनिशित[2] बाण ॥ तेणें हृदयीं भेदला शत्रुघ्न ॥ सवेंचि दुजे घाली मार्गण[3] ॥ ते भेदोनि गेले हस्तातें ॥ ५ ॥ त्या बाणघातेंकरून ॥ भूतळीं पडिला शत्रुघ्न ॥ जेवीं मत्त कुंजर अडखळोन ॥ पर्वतपतन होतसे ॥ ६ ॥ गाढ मूर्च्छा त्यासी दाटली ॥ देहशुद्धि हारपली ॥ कनकफळभक्षणें[4] पडे भूतळीं ॥ तेवीं झालें शत्रुघ्ना ॥ ७ ॥ उरले शत्रुघ्नाचे जे वीर ॥ त्यांहीं आटोपिलें अयोध्या नगर ॥ मग तो लवनामें वीर ॥ सावध झाला ते काळीं ॥ ८ ॥ पुढें देखिला कुश बंधु ॥ जो सर्वांआगळा वीर्यसिंधु ॥ तेणें सोडितांचि उभय बंधू ॥ आनंदाश्रु टाकिती ॥ ९ ॥ कुश ह्मणे लवा ऐक वचन ॥ वेगीं धरीं रे श्यामकर्ण ॥ येरें तात्काळ धरून ॥ मुरडला तेथोनि ॥ १० ॥ दोघे होतां एकत्र ॥ कैसे शोभले जानकीपुत्र ॥ रमावर आणि उमावर ॥ एकेठायीं बाळवेषें ॥ ११ ॥ एक वह्नि एक तो वात ॥ ऐसे दोघे ते जनकजासुत ॥ उभे ठाकले रणाआंत ॥ वाट पाहाती शत्रूची ॥ १२ ॥ ऐकावें परीक्षितिज सादर ॥ जे कां अयोध्येसी गेले वीर ॥ रघुपतीपुढें भयातुर ॥ येवोनियां कांपती ॥ १३ ॥ श्रीरामें घेतलें दीक्षाग्रहण ॥ त्यासी मृगचर्माचें प्रावरण ॥ मेखला दंड कमंडलु पूर्ण ॥ असिपत्रव्रतस्थ ॥ १४ ॥ भरत लक्ष्मण सुमंतयुक्त ॥ वसिष्ठादि मुनि विख्यात ॥ होमधूम्रें नेत्र आरक्त ॥ सुवर्णसीता वामांगीं ॥ १५ ॥ ऐसिया मंडपीं रघुवीर ॥ तयासी बोलती घायाळ वीर ॥ अश्व फिरोनि धरणी समग्र ॥ जिंकिले राव शत्रुघ्नें ॥ १६ ॥ कित्येक पत्र वाचोन नृपवर ॥ अश्वासी करिती नमस्कार ॥ देवोनियां करभार ॥ वस्त्रालंकारें गौरविती ॥ १७ ॥ ह्मणती श्रीरामाचा श्यामकर्ण ॥ यातें धरील ऐसा कोण ॥ ऐसे बहुत नृपगण ॥ वंदन करून सोडिती ॥ १८ ॥ ऐसा फिरत श्यामकर्ण ॥ गेला एका ऋषिआश्रमाकारण ॥ तेथें होता एक द्विजनंदन ॥ द्वादश वर्षांचा किशोर ॥ १९ ॥ तेणें धरूनि श्यामकर्ण ॥ वस्त्रें कर्दळीसी बांधोन ॥ युद्धालागीं निर्वाण ॥ महावीर तो मिसळला ॥ २० ॥ तो द्वादश वर्षांचा बाळ ॥ परी सर्वही वीरांचा काळ ॥ भंगोनियां शत्रुघ्नदळ ॥ वीरें वीर पाडिले ॥ २१ ॥ मग शत्रुघ्नें सोडिला निर्वाणशर सबळ ॥ तेणें मूर्छित पडिला तो बाळ ॥ रथीं घालोनि तात्काळ ॥ उरले दळेंसीं परतला ॥ २२ ॥ सवेंचि त्यापाठीं दुसरा ॥ बाळ धांवला रघुवीरा ॥ तोही द्वादश वर्षांचा अवधारा ॥ खड्गचर्मधनुष्यपाणी ॥ २३ ॥ तेणें येऊनि युद्धकंदन ॥ करून सेनाधिपतीचा घेतला प्राण ॥ तयाचा बंधु नागाभिधान ॥ यमालया धाडिला ॥ २४ ॥ शेवटीं पाडिला शत्रुघ्न ॥ दळभार टाकिला

---

१ दोरीला. २ कठोर. ३ बाण. ४ धोत्र्याचें फळ खाल्ल्यानें.

संहारून ॥ निजबळें बंधु सोडवून ॥ घेऊनि गेला श्यामकर्णा ॥ २५ ॥ ऐकोनियां ऐसें वचन ॥ विस्मित झाला रघुनंदन ॥ ह्मणे काय रे जल्पतां वचन ॥ भ्रम झाला काय तुह्मां ॥ २६ ॥ नेणों तुह्मां लागलें पिसें ॥ ह्मणोनियां बोलतां ऐसें ॥ शत्रुघ्नासी पाडिलें कैसें ॥ बाळ ऐसें कवणाचें ॥ २७ ॥ प्रभाहीन होईल दिनमणी ॥ शैत्यता बाधेल हुताशनीं ॥ काळ पडेल मशकवदनीं ॥ तरीच शत्रुघ्न रणीं शमेल ॥ २८ ॥ मृगजळ असतां भरलें ॥ त्यामाजी देवर्षिसंतान बुडालें ॥ तें आंधळ्यानें काढिलें ॥ नेवोनि ठेविलें गंधर्वपुरीं ॥ २९ ॥ मुका सांगे हा समाचार ॥ ऐकोनि कोपला बधिर ॥ हेंही घडे परी शत्रुघ्नवीर ॥ न मरेचि रणांगणीं ॥ ३० ॥ ऐकोनि बोलती ते वीरोत्तम ॥ आह्मांसी काय झाला पिशाचभ्रम ॥ एकवार चिंतिल्या श्रीराम ॥ तया भ्रमासी ठाव कैंचा ॥ ३१ ॥ जिहीं साधिलें पूर्णब्रह्म ॥ तयांसी कासयाचा भ्रम ॥ तरी आह्मी रामसेवक उत्तम ॥ मग भ्रम आह्मां कैंचा ॥ ३२ ॥ एक वेळ स्मरतां रघुनाथा ॥ निरसे भवभ्रमव्यथा ॥ मग युद्धाची भ्रमवार्ता ॥ केवीं सांगोंजी स्वामिया ॥ ३३ ॥ यथार्थ श्रीरामा बाळबाणें ॥ रणीं शयन केलें शत्रुघ्नें ॥ ऐसें ऐकतां रघुनंदनें ॥ आंग टाकिलें धरणीसी ॥ ३४ ॥ जो विप्रपीडक दारुण ॥ तो जेणें मारिला लवण ॥ जो माझा केवळ प्राण ॥ तो शत्रुघ्न बाळें मारिला ॥ ३५ ॥ महासागरींचा पोंहणार ॥ तो थिल्लरीं कैसा बुडाला वीर ॥ जो महाकाळाचा झुंझार ॥ तो बाळें कैसा मारिला ॥ ३६ ॥ मज कोणता दोष घडला ॥ तेणें शत्रुघ्न रणीं पडिला ॥ कां ही अवस्था बंधु पावला ॥ ह्मणोनि विलापे श्रीराम ॥ ३७ ॥ मग समीप पाचारून लक्ष्मण ॥ तयासी बोले रघुनंदन ॥ म्यां तों केलें दीक्षाग्रहण ॥ युद्ध सर्वथा न करावें ॥ ३८ ॥ तुवां सैन्य घेऊनि चतुरंग ॥ येथोनि जावें लागवेग ॥ ज्या स्थळीं दळभंग ॥ होवोनि पडिला शत्रुघ्न ॥ ३९ ॥ तेथें सौमित्रा जावोन ॥ युद्ध करूनि दारुण ॥ सोडूनियां श्यामकर्ण ॥ बंधुसहित तुवां यावें ॥ ४० ॥ शिरीं वंदोनि रामचरण ॥ शीघ्र निघाला लक्ष्मण ॥ सवें घेतलें चतुरंग सैन्य ॥ तेंही सांगों अवधारा ॥ ४१ ॥ गज निघाले मदोन्मत्त ॥ कनकरथ असंख्यात ॥ अश्व घेतले वेगवंत ॥ पदाती ते अगणित ॥ ४२ ॥ रत्नपताकांकित[1] ध्वज ॥ रक्तचंदनांकित वीरराज ॥ रत्नकंकणें मंडित तेजःपुंज ॥ ऐसे कित्येक निघाले ॥ ४३ ॥ जे वीरश्रियेंचे नायक ॥ कंठीं मुक्ताहारपदक ॥ सुगंध तैलें झिरपती अलक[2] ॥ तरुण किंचित् श्मश्रूंचे ॥ ४४ ॥ धर्मिष्ठ आणि जितेंद्रिय[3] ॥ ऐसे वीररायांचे समुदाय ॥ निघते झाले निर्भय ॥ लक्ष्मणासमागमें ॥ ४५ ॥ सर्वांत श्रेष्ठ इंद्रारिमर्दन[4] ॥ सेनाधीश काळजित दारुण ॥ अति धर्मिष्ठ परायण ॥ धनुर्वेद जाणता ॥ ४६ ॥ मार्गीं सैन्य तें चालत असतां ॥ शुष्क झाल्या तेणें सरिता[5] ॥ शूरस्वनें तुंग पर्वता ॥ नादें[6] उठिला अपार ॥ ४७ ॥ स्थळें झालीं दारुण विपिनें ॥ शत्रुमुखीं मात्र राहिलीं तृणें ॥ वाहती रिपुवधूनयनीं जीवनें ॥ नद्या सरोवरें आटलीं ॥ ४८ ॥ रथचक्रांची जी धुळी ॥ तेणें मेघमंडळें कालवलीं ॥ निबिड



१ रत्नांच्या पताकांनीं युक्त. २ केश. ३ मनोनिग्रही. ४ इंद्रारि—इंद्रजित—मर्दन—शत्रु=लक्ष्मण. ५ नद्या. ६ पडसाद.

झाली मेघावळी ॥ घन हें नाम तेथूनि ॥ ४९ ॥ अत्युच्च गजशुंडादंडाग्रीं ॥ ताडण झालें मेघशरीरीं ॥ जरी वेगें पळावें गगनोदरीं ॥ परी पंकभारें लवले ते ॥ ५० ॥ पुढें धावती कुंजर मत्त ॥ नेणों धरा सांडोनि चालिले पर्वत ॥ घडघडाटें धांवती रथ ॥ नेणों नगरेंचि चालती ॥ ५१ ॥ मागें सांडोनि मनोवेग ॥ पुढें धांवती ऐसे तुरंग ॥ जनांसी दाविती नृत्यरंग ॥ जो न ठाउका अप्सरांतें ॥ ५२ ॥ नाना शस्त्रें घेऊनि हातीं ॥ पुढें धांवती पदाती ॥ छत्र ध्वज पताका शोभती ॥ तेणें गभस्ति[1] लोपला ॥ ५३ ॥ वीर गर्जना करिती ॥ अश्व दीर्घस्वरें हिंसती ॥ रथ घडघडाटें निश्चिती ॥ स्वर्गपाताळें डळमळिलीं ॥ ५४ ॥ ऐसें रामसैन्य चतुरंग ॥ पुढें चालिलें सवेग ॥ लवाप्रति कुश बोले अव्यंग ॥ तेंही पुढें परिसावें ॥ ५५ ॥ ऐसें सैन्य पाहूनि कुशें ॥ लवाप्रति बोलिला आवेशें ॥ ती कथा सुरस संतोषें ॥ कर्णद्वारीं प्राशन करा ॥ ५६ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ रामकथामृत अगाध ॥ श्रवणें करितां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ५७ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके लवकुशाख्यानं नाम द्वात्रिंशोध्यायः ॥ ३२ ॥ ॥ अध्याय ॥ ३२ ॥ ॥ ओव्या ॥ ५७ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥

१ सूर्य.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ॥ ऐसें भयंकर महादळ ॥ देखोनियां जानकीबाळ ॥ लवाप्रति बोले कुशेंद्र ॥ तेंचि ऐकावें
नृपेंद्रा ॥ १ ॥ लवा पाहावें तुंबळ ॥ असंख्य दाटलें परदळ ॥ आतां कैसें करावें बोल ॥ मजप्रति बंधुराया ॥ २ ॥ तूं परदळाचे
करिशी रव ॥ ह्मणोनि नाम तुझें ठेविलें लव ॥ तरी शिकवीं लाघव ॥ कैसें करूं या वेळीं ॥ ३ ॥ येरू बोले ऐक वीरेशा ॥ मम वचन
यथार्थ कुशा ॥ जानकीनयना राजहंसा ॥ होईं सहोदरा सावधान ॥ ४ ॥ स्मरोनियां रामचरण ॥ युद्ध करावें जी दारुण ॥ कूष्मां-
डापरी हे वीरगण ॥ रणकुंडीं होमावे ॥ ५ ॥ नातरी आम्रफळाचिये परी ॥ वीर झोडोनि पाडावे धरित्रीं ॥ पक्कफळापरी शिरें
निर्धारीं ॥ भूलिंगासी वाहावीं ॥ ६ ॥ आजानुबाहो बंधुराया ॥ हे न पुरती तव बळवीर्या ॥ अगाधसिंधु कुंभतनया ॥ चुळुकमात्र
आचमनीं ॥ ७ ॥ जरी मातली जंबुकावळी ॥ तरी केसरीपुढें ती काय बळी ॥ नातरी उगवलिया अंशुमाळी ॥ काय तिमिरें भांडती
॥ ८ ॥ मीहि न होतों यांसी भग्न ॥ परी धनुष्य छेदिलें दारुण ॥ ह्मणोनि नेलें मज धरून ॥ नातरी यांचा अंतक मी ॥ ९ ॥ तरी
सावध असावें कुशा ॥ बाण योजून धनुष्या ॥ आतां मी प्रार्थितों दिनेशा ॥ धनुष्यप्राप्तीकारणें ॥ १० ॥ ऐसें बोलोनि वचन ॥ लवें
एकाग्र केलें मन ॥ आरंभिलें सूर्यस्तवन ॥ सावधान परिसावें ॥ ११ ॥ जय सप्तास्यमुखतुरंगवाहना ॥ सकळनयनप्रकाशमाना ॥
ज्योतिश्चक्रनियमपूर्णा ॥ सहस्रकिरणा तुज नमो ॥ १२ ॥ तूं अयनद्वयातें करिसी ॥ स्वप्रकाशें विश्व चेतविसी ॥ मेषादि राशी मास-
मासीं ॥ व्यापका रे तुज नमो ॥ १३ ॥ मुके अंध बधिर ॥ तयांसी देशी नेत्र श्रोत्र ॥ कुष्ठादि रोगांचा संहार ॥ करिसी देवा तुज
नमो ॥ १४ ॥ जय जय चतुर्वेदस्वरूपा ॥ जय विधिहरिहररूपा ॥ पुराणपुरुषा आद्यरूपा ॥ ब्रह्मस्वरूपा तुज नमो ॥ १५ ॥ नमो
कमळकुळविकाशका ॥ नमो भक्तमनोरथपूरका ॥ नमो दुरितांधकारवारका ॥ वृष्टिकारका तुज नमो ॥ १६ ॥ उदयकाळीं विधिरूप ॥
माध्याह्नीं गिरिजेशरूप ॥ अस्तमानीं स्वयें विष्णुरूप ॥ ऐसिया त्रिमूर्ति तुज नमो ॥ १७ ॥ नमो किरीटकुंडलधरा ॥ हिरण्यवर्णा मणि-
हारा ॥ केयूरकुंडलमंडित भास्करा ॥ नारायणा रथस्था ॥ १८ ॥ तूं आदिनारायणरूप ॥ स्मरणें हरिसी भक्तपाप ॥ प्रसन्न होवो-
नियां चाप ॥ अभेद्य द्यावें मजलागीं ॥ १९ ॥ ऐसें स्तवन ऐकोनी ॥ प्रसन्न झाला दिनमणी ॥ अभेद्य चाप तत्क्षणीं ॥ देवोनि वरातें
दिधलें ॥ २० ॥ संतुष्ट झाला लवबाळ ॥ कुशाप्रति बोले वाक्य मंजुळ ॥ मजलागीं सूर्यस्तवन प्रांजळ ॥ वाल्मीकें होतें शिकविलें
॥ २१ ॥ तेणें प्रसन्न केला तँपन ॥ धनुष्य पावलों अभेद्य जाण ॥ सर्वदा जय ऐसें वरदान ॥ दिनकरनाथें ओपिलें ॥ २२ ॥ ऐकतां
तोषला तो कुश ॥ दोघे एकत्र झाले सुवेश ॥ परदळतृण जाळावयास ॥ काय वाताग्नी मिळाले ॥ २३ ॥ लक्ष्मणाचें आलें सैन्य ॥
देखोनि सरसावले दोघेजण ॥ सोडिती अनंत मार्गण ॥ जेवीं मेघीं जलधारा ॥ २४ ॥ दळीं प्रवेशतां दोघे वीर ॥ खळबळला

१ पृथ्वीवर. २ अगस्तीला. ३ कोल्ह्यांचा समुदाय. ४ सिंहापुढें. ५ सूर्य. ६ सातमुखी घोडा ज्याचें वाहन आहे अशा. ७ सूर्य. ८ बाण. ९ सैन्यामध्यें.

सैन्यसागर ॥ जेवीं मैनाक आणि मंदार ॥ भिडतां सागर आंदोळे[1] ॥ २५ ॥ संघटतां[2] लव आणि कुश ॥ मागें सैन्य सरलें दोन क्रोश ॥ तों काळजितसौमित्रांस ॥ शरें मार्ग रोधिले ॥ २६ ॥ मग क्रोधावला लक्ष्मण ॥ शत गजभ्रमी करूनि दारुण ॥ ओढो-नियां वर्षतसे बाण ॥ जेथें प्रवेश न चले वायूचा ॥ २७ ॥ मग बोले परीक्षितिनंदन ॥ कैसें सांगा जी भ्रमीचें लक्षण ॥ तंव जैमिनि ह्मणे सावधान ॥ ऐक लक्षण तयाचें ॥ २८ ॥ शत गुणावे शतेंकरून ॥ इतकी संख्या कुंजर जाण ॥ प्रतिगजीं दाहा दाहा स्यंदन ॥ रथारथाप्रति शत वाजी ॥ २९ ॥ हयीं हयीं शत पदाती जाण ॥ इतके मिळोनि एक भ्रमीप्रमाण ॥ ऐशा लक्षणें शत भ्रमी करून ॥ लवबाळ वेष्टिला ॥ ३० ॥ पाश पट्टिश बाण मुद्गल ॥ गदा शक्ति आणि कुठार ॥ चक्रें कुंत पाश अपार ॥ मारिती सकळ शस्त्रें ऐशीं ॥ ३१ ॥ तेणें लवबाळ एकला ॥ त्या भद्रव्यूहांत सांपडला ॥ परी तो महावीर आगळा ॥ मानी तयांलां तृणासम ॥ ३२ ॥ नाना-विध सोडोनि बाण ॥ केलें शस्त्रांचें निवारण ॥ सिंहनादें गर्जे सीतानंदन ॥ जेवीं घन कल्पांतीं[3] ॥ ३३ ॥ शतें शतातें लव मारी ॥ द्विशतें द्विशतांतें संहारी ॥ ऐशा चाळीस गजभ्रमी निर्धारी ॥ मारोनि गर्जे लव वीर ॥ ३४ ॥ शस्त्रें भिन्नांग झाला लव ॥ बाणें गजदेहातें करी लव ॥ ऐसा तो चतुरंग सैन्यार्णव ॥ फोडोनि टाकिला क्षणमात्रें ॥ ३५ ॥ लव नयनीं पाहे भूतळ ॥ तंव गजदेह-खंडें झालेंसे नीळ ॥ सैन्य पळों लागलें हो सकळ ॥ भयेंकरूनि दश दिशा ॥ ३६ ॥ जिकडे पाहती तिकडे कुंजर ॥ पळती शब्द करूनि किंकार ॥ जंव तो पाठीसीं पाहे लववीर ॥ तंव कुशेंद्र न देखे ॥ ३७ ॥ जो तमरिपुवारण अंकुश ॥ तो कोठें वीर गेला कुश ॥ ह्मणोनि व्याकुळ झालें मानस ॥ तों अपूर्व एक वर्तलें ॥ ३८ ॥ लवणासुराचा मातुळ ॥ रुधिराक्ष नामें राक्षस प्रबळ ॥ श्रीरा-मापुढें शरण जावूनि केवळ ॥ मग प्राण वांचविला ॥ ३९ ॥ तो राक्षस होता लक्ष्मणासवें ॥ तेणें लवाचें धनुष्य नेलें लाघवें ॥ त्यातें देखोनि स्वभावें ॥ लव काय बोलिला ॥ ४० ॥ अरे राक्षसा क्रूरा ॥ उभा रे उभा तस्करा ॥ आतां रक्षीं आपुल्या शिरा ॥ ह्मणोनि चक्र घेतलें ॥ ४१ ॥ चक्र घेवोनि जानकीबाळ ॥ वेगें उडाला नभमंडळ ॥ श्येन[4] घेऊनि आमिषकवळ[5] ॥ जैसा उडे आकाशीं ॥ ४२ ॥ हातीं घेतलेंसे चक्र ॥ रुधिरें व्यापिलें सर्व शरीर ॥ तेणें शोभला तो कैसा किशोर[6] ॥ नेणों चक्रधर साक्षात ॥ ४३ ॥ लहूतें देखतां गगनीं ॥ सर्व भयभीत मनीं ॥ नेणों कोणाचे मस्तकीं येवोनी ॥ कोसळेल अकस्मात ॥ ४४ ॥ कोणी धनुष्या लाविती बाण ॥ कोणी शिरीं धरिती ओढण[7] ॥ हा आह्मांवरी पडेल ह्मणोन ॥ करिती शयन कित्येक ॥ ४५ ॥ कोणी मृतगजदेहीं लपाले ॥ कोणी प्रेतदेहासीं झगटले ॥ कोणी रथाखालीं लपाले ॥ मनीं भय पावोनियां ॥ ४६ ॥ ऐसे धाक पावले ॥ नाना उपाय करिते झाले ॥ होते अवशिष्ट जे उरले ॥ तेही पळाले दश दिशा ॥ ४७ ॥ पूर्वीं दशरथाचा होता जो प्रधान ॥ सुज्ञ नामें अतिप्रवीण ॥ तयाचे दहा



१ क्षोभ पावतो. २ सैन्याला भिडतां. ३ प्रलयकालीं. ४ ससाणा. ५ मांसगोळा. ६ बाळक. ७ ढाल.

नंदन ॥ नामें तयांचीं ऐकावीं ॥ ४८ ॥ जितश्रम धार्मिक शत्रुसूदन ॥ सुकेतु चंद्र शल मदन ॥ काल मल्ल सिंहाभिधान ॥ ऐसे दहाजण उठावले ॥ ४९ ॥ अनेक बाणांतें सोडून ॥ अंबरीं विंधिला सीतानंदन ॥ दश दश बाणेंकरून ॥ विंधिती सक्रोधें लवातें ॥ ५० ॥ ऐसे अनंत सोडोनि शर ॥ हातींचें चक्र छेदिलें सत्वर ॥ मग भूमीस येऊनि लववीर ॥ परिघ घेतला दारुण ॥ ५१ ॥ मग घालोनियां घायातें ॥ सारथीसह मारिलें मंत्रिपुत्रांतें ॥ छिन्न भिन्न करोनि त्यांतें ॥ दाहीजणांतें पाडिलें ॥ ५२ ॥ वेदशास्त्रहीन ब्राह्मण कुटिळ ॥ पाखंडी नास्तिक कुशीळ ॥ ते रौरवीं[१] पडती तात्काळ ॥ तेवीं पडिले दाहाजण ॥ ५३ ॥ मातृद्रोही गुरुनिंदक ॥ द्विजद्रोही विश्वासघातक ॥ तयांसी नरकपात जेवीं देख ॥ तेवीं पतन तयांसी ॥ ५४ ॥ मग उडोनियां सीतासुत ॥ गदाहस्तें अकस्मात ॥ रुधिराक्ष विख्यात ॥ एकाएकीं हाणिला ॥ ५५ ॥ तो रणीं पडिला मूर्च्छित ॥ सवेंचि सावध झाला राक्षसनाथ ॥ उसणें घाई ताडित ॥ ऐसा वीर तो ऊठिला ॥ ५६ ॥ तेणें लव मूर्च्छित पाडिला ॥ एक मुहूर्तें सावध झाला ॥ मग हातीं कुंतायुध घेतला ॥ बळें लोटला राक्षसावरी ॥ ५७ ॥ कुंतें त्याचें छेदोनि शिर ॥ आपुलें धनुष्य हरिलें सत्वर ॥ जें सूर्यें दीधलें सुंदर ॥ तें चढवूनि सत्वर सरसावला ॥ ५८ ॥ पुनः लक्ष्मणें भ्रमी रचोन ॥ वेढिला तो सीतानंदन ॥ जेवीं गर्भस्थ आणि अज्ञानेंकरून ॥ वेढिजे तैसा वेढिला ॥ ५९ ॥ धरूनि देहाची अहंममता ॥ तिच्या योगें स्त्रीपुत्रदुहिता ॥ त्यांचिया मायेनें वेढिजे पिता ॥ तेवीं सीतासुता वेढिलें ॥ ६० ॥ ऐसा संध्याकाळपर्यंत ॥ वीरीं वेढिला सीतासुत ॥ जरी तृणें वेष्टिला हिरण्यरेत ॥ तरी नाश कवणाचा ॥ ६१ ॥ तेवीं सीतेचा बाळ ॥ सैन्य जाळीतसे प्रबळ ॥ सर्वांसी झाला प्रळयकाळ ॥ वीर पळती दश दिशा ॥ ६२ ॥ आतां पुढें कुशलक्ष्मण ॥ युद्ध करितील दारुण ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अमृतोपम ऐकावें ॥ ६३ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ रामलीलामृत अगाध ॥ श्रवणें होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ६४ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते लवकुशाख्यानं नाम त्रयस्त्रिंशोध्यायः ॥ ३३ ॥ ॥ अध्याय ॥ ३३ ॥ ॥ ओव्या ॥ ६४ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥

---

१ नरकामध्यें.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे गा भारता ॥ या पुढें कैसी वर्तली कथा ॥ एकाग्र होवोनियां चित्ता ॥ सावधान परिसावी ॥ १ ॥ कुशवीराचा विक्रम ॥ अद्भुत केला पराक्रम ॥ लक्ष्मणाऐसा वीरोत्तम ॥ बाणें केला जर्जर ॥ २ ॥ लक्ष्मणातें देखोन ॥ पुढें चालिला सीतानंदन ॥ तंव लक्ष्मणें पांच बाण ॥ सोडूनि कुश विंधिला ॥ ३ ॥ त्याचें देखोनियां संधान ॥ कुश तयाप्रति बोले वचन ॥ आतां स्थिर होईं न सोडीं रण ॥ तुझा काम पुरवीन मी ॥ ४ ॥ ऐसें बोलोनि सोडिला बाण ॥ रथासहित उडविला लक्ष्मण ॥ घटिकाद्वय पावला भ्रमण ॥ कुंलालचक्राचिये परी ॥ ५ ॥ अंतरिक्ष भ्रमती रथाश्व चारी ॥ ते मरण पावले अंबरीं ॥ मग सौमित्र अन्य रथावरी ॥ जावोनियां बैसला ॥ ६ ॥ मग लक्ष्मणें अति तिखट ॥ तीन बाणें विंधिला कुश उंद्भट ॥ एके बाणें पाडिला मुगुट ॥ दोन बाणीं कवच तोडिलें ॥ ७ ॥ कवचापासोनि मुक्त झाला ॥ तेव्हां कुशवीर कैसा शोभला ॥ जीर्ण कांति सोडोनि वहिला ॥ शोभे जैसा सैंर्पराज ॥ ८ ॥ मग तो रणरंगीं सीतातनय ॥ परम धरोनियां विनय ॥ सौमित्राप्रति निर्भय ॥ काय वचन बोलत ॥ ९ ॥ तुवां शत्रुभाव तो सोडिला ॥ माझा कवचभार उतरिला ॥ मज तुवां उपकार केला ॥ मीही करीन प्रत्युपकार ॥ १० ॥ तुज सैन्याचा असे भार ॥ तो मी दूर करीन सत्वर ॥ नानाविध सोडीन शर ॥ तुवां सावध असावें ॥ ११ ॥ अथर्वण वेदींचें अग्निसूक्त ॥ जपता झाला जानकीसुत ॥ तेव्हां अग्निशस्त्र विख्यात ॥ अकस्मात प्रगटलें ॥ १२ ॥ ज्वाळा निघाल्या अकस्मात ॥ तेणें जाळिला सौमित्राँचा रथ ॥ छत्र ध्वज पताका जळत ॥ वस्त्राभरणें भस्म होती ॥ १३ ॥ वीरांचीं जाळिलीं कवचें ॥ श्मश्रुमंडळ जळालें साचें ॥ केश भस्मले सकळांचे ॥ नेत्रपातीं भस्म होती ॥ १४ ॥ हय पुच्छेंसकट जळती ॥ रथ आणि चक्रें भस्म होती ॥ चामरादि चिन्हें दग्ध होती ॥ संतप्त होती शस्त्रजाती त्या ॥ १५ ॥ तप्त झालें विधुमंडळँ ॥ उसळों लागलें सिंधुजळ ॥ त्यामाजी जळचरांचें कुळ ॥ कढों लागलें तेधवां ॥ १६ ॥ ऐसें सैन्य जळालें पाहोन ॥ क्रोधावला लक्ष्मण ॥ वरुणास्त्रातें सोडोन ॥ शांत अग्नि तो केला ॥ १७ ॥ कुशें तेव्हां सत्वर ॥ सोडिलें प्रबळ वायव्यास्त्र ॥ वात सुटला झुंजाटें थोर ॥ तेणें सैन्य उडों पाहे ॥ १८ ॥ वीर कांपती थरथरां ॥ अश्वावळी फिरती गरगरां ॥ वस्त्रें उडती भरभरां ॥ कित्येक नग्न जाहले ॥ १९ ॥ ऐसा कुशपराक्रम विख्यात ॥ नेत्रीं देखोनि काळजित ॥ सौमित्रालागीं बोलत ॥ काय पाहतां बाळ हें ॥ २० ॥ आतां मी स्वबाणेंकरून ॥ या वीरातें संहारीन ॥ पहा मारिलें महासैन्य ॥ वीर पळती दश दिशा ॥ २१ ॥ जोंवरी कनिष्ठ नाहीं आला ॥ तों आधीं वधावें याला ॥ ऐसें बोलोनि लोटिला ॥ काळजितें स्वरथ ॥ २२ ॥ मग बोले त्या बाळकास ॥ तुझें अभिधान ह्मणती कुश ॥ तरी तो योजितों रणयज्ञास ॥ सावध होईं ऋषिपुत्रा ॥ २३ ॥ अति सूक्ष्मातें बोलिजे लव ॥ आणि तृणातें नामही लव ॥ ह्मणोनि नाम ठेविलें लव ॥ तूं तंव तृण

१ कुंभाराच्या चाकाप्रमाणें. २ महापराक्रमी. ३ शेष. ४ लक्ष्मणाचा. ५ चंद्रमंडळ. ६ सोसाट्यानें.

कुशशब्दें ॥ २४ ॥ अति निर्बळ ब्राह्मण ॥ ते तुझें करिती छेदन ॥ मी तों बलाढ्य दारुण ॥ काळजित या नामें ॥ २५ ॥ तुह्मी उभयतां तृणजाती ॥ आर्द्रस्थळीं तुमची वस्ती ॥ मी प्रलयानळ निश्चिती ॥ भस्म करीन तुह्मांतें ॥ २६ ॥ ऐकोनि तयाचे बोल ॥ परम कोपला कुशबाळ ॥ ह्मणे काळजित हें नाम केवळ ॥ कासया व्यर्थ ठेविलें ॥ २७ ॥ जेवीं अजाकंठींचे[1] स्तन ॥ जेवीं पुरुषाचे बधिर कान ॥ किंवा धोतऱ्यालागून ॥ कनकवृक्ष बोलती ॥ २८ ॥ नातरी विजयादशमीसी ॥ सुवर्ण बोलती शमीसी ॥ नातरी महाराष्ट्रदेशीं ॥ विभूति ह्मणती राखुंडीतें ॥ २९ ॥ नातरी भौमा नाम मंगळ ॥ परी सर्व कर्मीं अमंगळ ॥ नातरी कल्याणी[2] नामें केवळ ॥ परी वर्ज्य सर्व कार्यीं ॥ ३० ॥ वृषभा[3] नाम ठेविलें वजिर ॥ परी तो दिवसभरी वाहे नीरें[4] ॥ उत्तम नामाचा बडिवार ॥ पराक्रम नसतां कां ॥ ३१ ॥ नाम असे कमलनयन ॥ परी कांहीं त्यातें न दिसे पूर्ण ॥ तेवीं काळजित अभिधान ॥ कोणीं तुज ठेविलें ॥ ३२ ॥ तोंवरी गर्जे काळकूट ॥ जों देखिला नाहीं नीळकंठ ॥ तोंवरीच अंधकार उद्भट ॥ जोंवरी दीप न देखिला ॥ ३३ ॥ तोंवरी शोभे खद्योत[5] ॥ जों न उदेला दिननाथ ॥ तोंवरीच तूं काळजित ॥ मजसीं युद्ध न केलें जों ॥ ३४ ॥ भावीं जाण अर्थगौरव ॥ जो शत्रुदेहाचे करी लव ॥ ह्मणोनि ज्ञानें नाम ठेविलें लव ॥ वाल्मीक ऋषीनें तयाचें ॥ ३५ ॥ रिपुमत्त विदारण अंकुश ॥ मम नाम ठेविलें ह्मणोनि कुश ॥ कीं खळसर्प जिव्हा छेदावयास ॥ कुश नाम म्यां धरिलें ॥ ३६ ॥ एके शुक्तींत मुक्ताफळ ॥ एक शुक्तिका काढी मृद्भांडमळ[6] ॥ बा उगाचि रसकल्लोळ ॥ काय करिसी क्रियेविण ॥ ३७ ॥ दळाधिपति तूं काळजित असतां ॥ सैन्य वधितो मम भ्राता ॥ तयाप्रति टाकोनि वृथा ॥ बोलोनि काळ क्रमिसी ॥ ३८ ॥ नामअर्थ नेणोनि चित्तीं ॥ तुज व्यर्थ केलें सेनापती ॥ तो अप्रमाणिक नृपती ॥ नामार्थातें न जाणे ॥ ३९ ॥ नाम परम सुंदर असे ॥ परी पराक्रम कांहीं नसे ॥ ऐसिया नामाच्या आवेशें ॥ मूर्ख जन तोषती ॥ ४० ॥ ऐसें बोलोनि उत्तर ॥ बाण सोडिला अनिवार ॥ तेणें दळपतीचें शिव्हार ॥ छेदोनि भूमीं पाडिलें ॥ ४१ ॥ परम कोपोनि काळजित ॥ दोन बाण सोडिले अद्भुत ॥ एक कुशहृदयीं भरत ॥ दुजा लागे वाम बाहू ॥ ४२ ॥ बाप वीरनृसिंह निर्भय ॥ अति शूर सीतातनय ॥ सोडोनियां शरद्वय ॥ दोनी भुजा छेदिल्या ॥ ४३ ॥ पंचांगुळभूषण पडलें ॥ तेव्हां ते भुज कैसे शोभले ॥ पंचफणीच पसरले ॥ रत्नांकित मस्तकीं ॥ ४४ ॥ सोडोनि अर्धचंद्राकार शर ॥ तेणें उडविलें तयाचें शिर ॥ मुकुटकुंडलें मनोहर ॥ तयांसहित पडियेलें ॥ ४५ ॥ सेनापति निमाला[7] देखोन ॥ खवळला तो लक्ष्मण ॥ सहा बाणें सीतानंदन ॥ विंधिला तेव्हां हृदयांत ॥ ४६ ॥ खड्ग गदादि मुद्गर ॥ कुंत चक्र पाश कुठार ॥ नाना आयुधें सुमित्रापुत्र ॥ टाकित जैसीं घनापरी ॥ ४७ ॥ कुशें सोडोनि शर अपार ॥ सकळ शस्त्रें केलीं चूर ॥ मग गर्जिन्नला सीतापुत्र ॥ प्रळयकाळीं मेघ जैसा ॥ ४८ ॥ मग वाल्मीकदत्त

१ शेळीच्या गळ्यांतील. २ भद्रानामक करण. ३ बैलाला. ४ उदक. ५ काजवा. ६ मातीच्या भांड्यांत सांचलेला मळ. ७ मृत्यू पावला.

पंच बाण ॥ जे तेजें केवळ प्रळयाग्न ॥ ते कुशें आकर्ण ओढून ॥ सोडिता झाला सत्राणें ॥ ४९ ॥ ते बाण अति दारुण ॥ प्रकाशें उजळलें त्रिभुवन ॥ मोह पावलें सकळ सैन्य ॥ देव विमानें पळविती ॥ ५० ॥ वृषभीं बैसोनि चंद्रमौळी ॥ पुढें बैसविली होती गौरी वेल्हाळी ॥ बाण समीप येतां ते काळीं ॥ पळतां कौतुक जाहलें ॥ ५१ ॥ शिवांगींचे भस्मांध झाले फणिवर ॥ ते फूत्कार सोडों लागले सत्वर ॥ तेणें तृतीय नेत्रींचा वैश्वानर ॥ जागृत होऊनि लागे चंद्रासी ॥ ५२ ॥ त्या तेजें भाळीं परम ॥ अमृत द्रवों लागला सोम ॥ त्या अमृतें गजचर्म ॥ सजीव झालें क्षणमात्रें ॥ ५३ ॥ त्या गजभेणें वृषभ भ्याला ॥ तो तडतडां उडों लागला ॥ तें देखोनि अचळबाळा ॥ खदखदां ते हांसत ॥ ५४ ॥ ऐसी सर्व देवांलागुनी ॥ पळतां दाटी झाली गगनीं ॥ तेज व्यापिलें त्रिभुवनीं ॥ ऐसी अस्त्रदेवता ती ॥ ५५ ॥ ते शर गर्जोनि सत्वरी ॥ लागले सौमित्राचे हृदयावरी ॥ लक्ष्मण पडिला भूमीवरी ॥ प्राणपंचक कोंडलें ॥ ५६ ॥ तेव्हां झाला हाहाकार ॥ पडिला पडिला सौमित्र वीर ॥ जेवीं अंबरींहूनि दिनकर ॥ पतन झाला भूतळीं ॥ ५७ ॥ मग घालोनि अस्त्रजाळ ॥ दळभार मारिला तात्काळ ॥ पळों लागले वीर सकळ ॥ कुशभयें धाकावले ॥ ५८ ॥ रवि जातां अस्तमाना ॥ किरणें मावळती तत्क्षणां ॥ तेवीं रामभ्राता पडतां रणां ॥ पावली सेना तीच गती ॥ ५९ ॥ इकडे लववीर एकला ॥ गजभ्रमींत असे वेढिला ॥ तो कुशेंद्रें देखिला ॥ परम कोपला त्या काळीं ॥ ६० ॥ तो लववीर महाबळी ॥ पंचाणव मारिल्या गजहारी ॥ मग दोघे मिळाले संग्रामांतरीं ॥ केली बोहरी सर्वांची ॥ ६१ ॥ ऐसें करूनि रणकंदन ॥ येऊनि भेटले दोघेजण ॥ रणांगणीं उभे राहून ॥ मार्ग लक्षिती सैन्याचा ॥ ६२ ॥ ऋषिआश्रमाभोंवतें जाण ॥ हुंबूं लागलें अपार रण ॥ त्यामाजी उभे दोघेजण ॥ सीतातनय निर्भय ॥ ६३ ॥ आतां पुढें येऊनि भरत ॥ संग्राम करील अद्भुत ॥ तें पुढिले प्रसंगीं कथामृत ॥ आहे सावध परिसावें ॥ ६४ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ रामकथामृत अगाध ॥ श्रवणें होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ६५ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते लवकुशाख्यानं नाम चतुस्त्रिंशोध्यायः ॥ ३४ ॥ अध्याय ॥ ३४ ॥ ओव्या ॥ ६५ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

१ अति जोरानें. २ शंकर. ३ नंदी. ४ पार्वती.


अध्याय ३५.
घायाळ दूत येऊन युद्धाचें वर्तमान सांगतात.
भरत.
श्रीराम.
सुवर्ण सीता.
मारुती सुग्रीव जांबुवंतादि.
मारुती अंगद जांबुवंतादि सैन्य घेऊन भरत युद्धास आला.
शत्रुघ्न लक्ष्मण मूर्च्छित
भरत.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे परीक्षितिसुता ॥ चित्ताची करूनियां एकाग्रता ॥ पुढें कैसी वर्तली कथा ॥ ती सावध परिसावी ॥ १ ॥ गंगातीरीं रघुनाथ ॥ यागमंडपीं बैसलासे दीक्षित ॥ वसिष्ठादिकांसमवेत ॥ तो भरताप्रति काय बोले ॥ २ ॥ दोघे ऋषीचे बाळक ॥ त्यांनीं अपार मारिले सेनानायक ॥ शत्रुघ्नाऐसा वीर देख ॥ समरांगणीं पाडिला ॥ ३ ॥ तयां जिंकावयालागोन ॥ म्यां पाठविला लक्ष्मण ॥ तो लवणासुरारीतें घेऊन ॥ अद्यापि कां न ये भरता ॥ ४ ॥ अनाथ अज्ञान ऋषीचे बाळ ॥ लक्ष्मण वीर हा प्रबळ ॥ भयभीत होवोनि केवळ ॥ शरण आले असतील कीं ॥ ५ ॥ अति क्रोधी लक्ष्मण वीरेश ॥ क्रोधें मारील बाळकांस ॥ ते ऋषिपुत्र मरणास ॥ पावल्या अनर्थ रोकडा ॥ ६ ॥ स्वप्रतापेंकरून लक्ष्मण ॥ धर्मलोकींहूनियां शत्रुघ्न ॥ त्या बाळांसहवर्तमान ॥ मरण पावल्याही आणील ॥ ७ ॥ क्रोधेंकरूनि लक्ष्मण ॥ हें त्रिभुवन जाळील न लागतां क्षण ॥ पुढें आलिया शचीरमण ॥ न वांचेल कीं त्या हातीं ॥ ८ ॥ ते तों ऋषीचे बाळक ॥ प्राण त्यजितील तात्काळिक ॥ ह्मणोनि चिंता उदेली देख ॥ मजकारणें भरतवीरा ॥ ९ ॥ वर्षांतांचे दोन दिवस ॥ अंतर पडिलें अश्वशत्रुघ्नांस ॥ कोण कोठील ऋषीचे वीरेश ॥ तेंही नकळे मजलागीं ॥१०॥ मी तूं वीर आणि लक्ष्मण ॥ तैसाचि तो शत्रुघ्न ॥ सुग्रीव अंगद बिभीषण ॥ परम बलाढ्य तो वायुपुत्र ॥ ११ ॥ आणिक माझे सुहृद्गण ॥ सकळांसी मानोनियां तृण ॥ निर्भय धरिला श्यामकर्ण ॥ ऐसे ते कोण झुंजारी ॥ १२ ॥ अश्व देखोनि उत्तम ॥ त्यांसी उपजला तो काम ॥ बांधोनि पाहों संभ्रम ॥ ह्मणोनि केली बाळचेष्टा ॥ १३ ॥ तरी तूं भरता सत्वर ॥ तेथें पाठवावे हेर ॥ ते आणितील समाचार ॥ बंधुद्वयाचा मजलागीं ॥ १४ ॥ ऐकोनियां रामवाक्यामृत ॥ भरतें पाचारिले दूत ॥ त्यांस देखोनि रघुनाथ ॥ काय बोलता जाहला ॥ १५ ॥ तुह्मी लक्ष्मणापासीं जाऊन ॥ सांगावें त्वरें मम वचन ॥ मोहनास्त्रें बाळें मोहून ॥ जिवंत धरून आणावीं ॥ १६ ॥ जरी तुजवर टाकितील शर ॥ तरी त्वां रक्षावे ते ऋषिकुमर ॥ तुजपासीं चतुरंगदळभार ॥ महायोद्धा काळजितही ॥१७॥ तरी तूं रथस्थ आणि समर्थ ॥ बाळें निराश्रित आणि विरथ ॥ पितृहीन आणि अनाथ ॥ ह्मणोनि त्यांतें न मारावें ॥ १८ ॥ तरी ऋषिबाळांकारणें ॥ न मारावें तुवां बाणें ॥ त्यांची माता त्यांकारणें ॥ शोक करील ह्मणोनि ॥ १९ ॥ जे परबाळावरी न करिती दया ॥ ते पुत्रपौत्रीं जाती विलया ॥ ह्मणोनि त्यांवरी सखया ॥ कृपा करावी सर्वस्वें ॥ २० ॥ सुपुत्रा करितां विलोकन ॥ सर्वांग होय हर्षायमान ॥ पाहातां मुखेंदु नयन ॥ चकोर होती पितयाचे ॥ २१ ॥ जो पुत्र नरकींहून तारी ॥ उपजतां ऋणत्रयांतें हरी ॥ जो संसारसागरीं तारी ॥ ऐसा पुत्र असावा ॥ २२ ॥ जो उत्संगासनींचें भोगरत्न ॥ जयासी ह्मणती गृहभूषण ॥ जो रांगतां शोभे गृहांगण ॥ ऐसा नंदन देखों आह्मी ॥ २३ ॥ जेथें नाहीं दधिमंथन ॥ जेथें नाहीं लघुबाळकरांगण ॥ जेथें नसे भगवद्गुणकीर्तन ॥ तें

१ शत्रुघ्नाला. २ इंद्र. ३ वर्ष पुरें होण्यास. ४ मारुति. ५ योद्धे. ६ हत्ती, घोडे, रथ आणि पायदळ. ७ देव, ऋषि आणि पितर यांचें ऋण.

काय भवन[1] ह्मणावें ॥ २४ ॥ सुपुत्ररत्नाची खाणी ॥ परी आह्मीं निरपराधें त्यजिली रमणी ॥ आतां इच्छितों पुत्रालागुनी ॥ ते कोठून प्राप्त आह्मां ॥ २५ ॥ ह्मणोनि तें कोणाचे बाळ ॥ त्यांसी न मारावें केवळ ॥ जनकजननींसी होईल ॥ दुःखकल्लोळ तयांचे ॥ २६ ॥ जयेचे उदरीं दोघे बाळ ॥ उपजले वीर्यसिंधूचे कल्लोळ ॥ तिचें भाग्य कोण वर्णील ॥ धन्य तो जनक तयाचा ॥ २७ ॥ आह्मांस नाहीं संतान ॥ ह्मणोनि चित्त उद्विग्न ॥ हे वांचवितां त्या पुण्येंकरून ॥ ईश्वर पुत्र देईल आह्मां ॥ २८ ॥ कां राहातां वनांतरीं ॥ तुह्मी कोणापासून निर्धारीं ॥ तुमचीं मातापिता नेमोत्तरीं[2] ॥ सांगा ह्मणोनि पुसावें ॥ २९ ॥ ऐसें दूतांप्रति रघुनाथ ॥ स्वमुखें असे सांगत ॥ तों घायाळ आले कुंथत ॥ रुधिर स्रवे सर्वांगीं ॥ ३० ॥ ते लक्ष्मणाचे वीर ॥ हाहाकार करिती समग्र ॥ रामनामाचा करिती उच्चार ॥ महाभयें ग्रस्त जे ॥ ३१ ॥ ह्मणती ऐकावें श्रीरामा ॥ भक्तजनकल्पद्रुमा ॥ रक्षीं रक्षीं तूं आह्मां ॥ महाभयापासोनि ॥ ३२ ॥ अनेक सैन्यासमवेत ॥ तेथें निमाला काळजित ॥ तैसाचि सुमित्रासुत ॥ समरांगणीं पहुडला ॥ ३३ ॥ कुशबाणें छिन्नभिन्न गात्रें ॥ रक्तमय झालीं वस्त्रें ॥ ती दशा न देखवे नेत्रें ॥ ऐसें झालें सौमित्रा ॥ ३४ ॥ जी ऐकिली नाहीं कधीं व्यथा ॥ ती दृष्टीं देखिली आतां ॥ कांहींच नाठवे चित्ता ॥ शरें पीडिलें सर्वांतें ॥ ३५ ॥ एकलिया कुशें सकळ दळ[3] ॥ मारूनि पूजिलें भूमंडळ ॥ दुजा साह्य झाला तो केवळ अनळ ॥ लव नाम तयाचें ॥ ३६ ॥ लवें वाहिनीचें[3] केले लव ॥ काय सांगों तयाचे लाघव ॥ सकळ मारूनि वीरपुंगव ॥ गजभार सर्व आटिला ॥ ३७ ॥ सौमित्राऐसा प्रतापवंत ॥ त्याचपरी तो काळजित ॥ जिंकिले ऐसे वीर समस्त ॥ काय सांगों नवलपरी ॥ ३८ ॥ ते बाळवीर दोघेजण ॥ युद्ध शिकले कोठून ॥ लक्ष्मणें कृपा केली पूर्ण ॥ स्नेहेंकरूनि तयांवरी ॥ ३९ ॥ कुशाप्रति बोलिला शक्रारिहंता[4] ॥ जाईं बाळा तुज सोडिलें आतां ॥ कनिष्ठ बंधूसी तत्वतां ॥ निजगृहातें नेइंजे ॥ ४० ॥ मातेस सांग ऐसें वचन ॥ लक्ष्मणें सोडिलें आह्मांकारण ॥ तुह्मां मारितां दारुण ॥ कष्ट पावेल जननी ती ॥ ४१ ॥ ऐसा बोल ऐकोन ॥ कुशें केलें हास्यवदन ॥ तयासी बोलिला प्रतिवचन ॥ ह्मणे ऐकावें लक्ष्मणा ॥ ४२ ॥ तूं बंधुदुःखें दुःखित ॥ ह्मणोनि तुज सोडिलें जित ॥ रघुनाथा पाठीशी जाऊन त्वरित ॥ प्राण आपुला वांचवीं ॥ ४३ ॥ सुखें होतासी गृहातें ॥ कां सोडोन आलासी जीवित्वातें ॥ तुज रामचंद्रें वनांत बहुतें ॥ कष्ट दीधले मागें रे ॥ ४४ ॥ सर्वांसी वंद्य चंदन ॥ जग निववी स्वगुणें करून ॥ परी द्विजिव्हांसी[5] देतसे स्थान ॥ हा एक दुर्गुण तयाचा ॥ ४५ ॥ आम्रवृक्ष रसाळ पूर्ण ॥ फळ ज्याचें अमृतासमान ॥ परी पिककाकांसी[6] देतसे मान ॥ हा एक दुर्गुण तयाचा ॥ ४६ ॥ समुद्र रत्नांचा आगर ॥ आणि सकळ जीवनाचा आधार ॥ परी तो सर्वांशीं क्षार ॥ हा एक दुर्गुण तयाचा ॥ ४७ ॥ शंकराचा जो श्वशुर ॥ अनेक रत्नांचा वैरागर[7] ॥ परी हिमें पीडिजे सकळ नर ॥ हा एक दुर्गुण

१ गृह. २ सत्य उत्तर देऊन. ३ सैन्य. ४ लक्ष्मण. ५ सर्पाला. ६ कोकिळेला आणि कावळ्यांला. ७ खाण.

तयाचा ॥ ४८ ॥ जो शंकरशेखरीं भूषण ॥ ज्याचे सुधामय किरण ॥ परी त्यासी कलंक लक्षण ॥ हा एक दुर्गण तयाचा ॥ ४९ ॥ सर्व गुण सेविती रामातें ॥ परी निर्दयपणें पाठविलें तूतें ॥ हें देखोनि कृपा मातें ॥ उपजली जाई सौमित्रा ॥ ५० ॥ जरी तुजमध्यें असेल पुरुषार्थ ॥ तरी मज मारावा बाणघात ॥ ऐसें ऐकोनियां सुमित्रासुत ॥ क्रोधें तप्त अति झाला ॥ ५१ ॥ आकर्ण ओढोनि सप्त शर ॥ सौमित्रें सोडिले दुर्धर ॥ ते भेदोनि गेले अंतर ॥ परी तो वीर न ढळेचि ॥ ५२ ॥ त्याचें धैर्य महाक्रूर ॥ धनुष्या केला टणत्कार ॥ बाण सोडोनि अपार ॥ जर्जर केलें लक्ष्मणा ॥ ५३ ॥ शरें भेदिलें जिव्हार ॥ मग शरीर केलें कुंडलाकार ॥ सौमित्र पडिला शेषाकार ॥ नवल काय सांगावें ॥ ५४ ॥ कुशाचिये शरधारीं ॥ सौमित्र पडिला भूमीवरी ॥ मग सैन्याची होळी सत्वरीं ॥ अग्निसंगें तृण जैसें ॥ ५५ ॥ सैन्य अवघें भंगिलें ॥ उरलें तें दशदिशा पळालें ॥ ऐसें सर्वही निवर्तलें ॥ रामचंद्रजी दयार्णवा ॥५६॥ आतां काय पाहासी रघुनाथा ॥ सोडावी यज्ञदीक्षा आतां ॥ जों आली नाहीं कुशबाणसरिता ॥ चापपर्वतापासोनि ॥ ५७ ॥ तुज-वांचोनि रघुनंदना ॥ सर्वांसी अजेय ते जाणा ॥ ते आणिकांची न धरिती गणना ॥ ऐसें आह्मास समजलें ॥ ५८ ॥ ऐकोनियां दूतवचन ॥ राम पडिला मूर्च्छायमान ॥ पुढें होता कैकैयीनंदन ॥ तोही घाबरा जाहला ॥ ५९ ॥ तंव भरतें उदक शिंपोन ॥ घालोनि व्यंजनें समीर पूर्ण ॥ सावध केला रघुनंदन ॥ आसनावरी बैसविला ॥ ६० ॥ आनंदविग्रहा गुणातीता ॥ भरत ह्मणे कैव-ल्यदाता ॥ हें काय आलें तुमचे मता ॥ कां जी दुःख आरंभिलें ॥ ६१ ॥ रणीं पडले दोघे बंधू ॥ ह्मणोनि खेद करितां सौख्यसिंधू ॥ हें वीरलक्षण नव्हे जी बंधू ॥ काय सांगों तुह्मातें ॥ ६२ ॥ तुमची आज्ञा झाली ह्मणोन ॥ मज सांगत होता लक्ष्मण ॥ म्यां वेळा केली निरीक्षण ॥ मृतचिह्नित वाटली ॥६३॥ आतां तो देहीं उदास ॥ त्यासी कां पाठविलें संग्रामास ॥ उत्तम वेळा फावली तयास ॥ दुःखआयास सर्व हरले ॥ ६४ ॥ तुह्मीं जानकी टाकोनियां ॥ आरंभिलें यज्ञकार्या ॥ तें प्रतिकूळ झालें तया ॥ ह्मणोनि देह त्यागिला ॥ ६५ ॥ निरपराधें सीतात्याग ॥ करितां पाप झालें अभंग ॥ तें दूर करावया सवेग ॥ लक्ष्मण गेला स्वसैन्येंसीं ॥ ६६ ॥ कुशाचा-पोद्भव सरिता ॥ ती प्राप्त झाली सुमित्रासुता ॥ तेथें मज्जन करूनि स्वदुरिता ॥ हरोनि निष्पाप तो झाला ॥ ६७ ॥ मी तैसाचि राहिलों पापराशी ॥ मज कां न पाठवा त्या तीर्थासी ॥ पवित्र करावया देहासी ॥ दे आज्ञा श्रीरामा ॥ ६८ ॥ वनीं जानकीचा त्याग केला ॥ त्यामुळें बैसली ही अवकळा ॥ तो मळ हरावया मजला ॥ धाडीं स्वामी रणासी ॥ ६९ ॥ निरपराधें सीतात्याग ॥ केला ह्मणोनि पाप झालें अभंग ॥ त्याकारणें जयभंग ॥ झाला जाण आमुचा ॥ ७० ॥ पहा दोघे बंधू प्रबळ ॥ जयांतें पाहातां धाके काळ ॥ तयांतें जिंकिती बाळ ॥ हें फळ तों सीतात्यागाचें ॥ ७१ ॥ जे तरोनि गेले सागर ॥ ते बुडाले थिल्लरीं सत्वर ॥ जे

१ महादेवाच्या मस्तकाच्या ठायीं. २ अमृताचे. ३ भरत. ४ पंख्यानें. ५ वारा. ६ बुडी मारणें.

उल्लंघोनि जाती गिरिवर ॥ ते उंबरा लंघितां निमाले ॥ ७२ ॥ जेणें प्राशिलासे नदीरमण ॥ तो निमाला उदकीं बुडोन ॥ जेणें प्राशिला हुताशन ॥ तो उष्णान्न ग्रासितां निमाला ॥ ७३ ॥ हें आश्चर्य झालें विपरीत ॥ लज्जेनें न बोलवे ही मात ॥ यासी रणीं मरणें यथार्थ ॥ हें तों पाप सीतात्यागाचें ॥ ७४ ॥ शीघ्र देईं आज्ञावचन ॥ तव चरणीं ठेवूनि प्राण ॥ जेथें पडिले बंधू दोघेजण ॥ मीही तेथें जातों आतां ॥ ७५ ॥ श्रीराम ह्मणे भरता ॥ तुवां जावें हें मानतें चित्ता ॥ आणि त्यांतें पुसें वार्ता ॥ तुह्मी कोण कोणाचे ॥ ७६ ॥ दोघां जिंकोनि समरांगणीं ॥ मजपासीं आणीं धरोनी ॥ दोघां बंधूंतें उठवोनी ॥ तेही आणीं सत्वर ॥ ७७ ॥ सकळ वानरांसीं हनुमंत ॥ समागमें घेईं जांबुवंत ॥ हे न्यावे तव साह्यार्थ ॥ आज्ञा माझी ही करीं ॥ ७८ ॥ म्यां पितृवाक्याकारण ॥ चौदा वर्षें सेविलें कानन ॥ तूं परम सज्ञान ॥ जाईं सत्वर युद्धासी ॥ ७९ ॥ नंदिग्रामीं तूं राहून ॥ केलें वल्कलांचें धारण ॥ तुवां माझ्या दर्शनालागून ॥ सर्वही भोग वर्जिले ॥ ८० ॥ तूं माझा केवळ प्राण ॥ तुझी प्रीति मजकारण ॥ तरी तूं शीघ्र गमन ॥ करावें वानर घेऊनि ॥ ८१ ॥ सैन्यविनाशक दोघे बाळ ॥ त्यांतें धरून आणीं केवळ ॥ कोण ते आहेत समूळ ॥ वर्तमान समजावें ॥ ८२ ॥ हा अंगद तव प्रधान ॥ ओळखील बाळांलागून ॥ मग त्यांसहित घेऊन ॥ सकळ सैन्येंसीं यावें ॥ ८३ ॥ अंगद ह्मणे रघुनाथा ॥ जनापवादें त्यजिली सीता ॥ तो दुर्मंत्र बाळरूपें तत्वतां ॥ पीडितो ऐसें मज वाटे ॥ ८४ ॥ सीतात्यागदुरिताचळ ॥ जगीं वाढला तो प्रबळ ॥ तोचि रूपें होऊनि बाळ ॥ पीडितसे मज वाटे ॥ ८५ ॥ ऐसें ऐकतां वचन ॥ राम पावला अंतरखुण ॥ ह्मणे भला होसी तूं प्रधान ॥ ऐसें अगम्य बोलिलासी ॥ ८६ ॥ रामआज्ञा घेऊनि भरत ॥ रथीं बैसला तो त्वरित ॥ हनुमंतादि वानर समस्त ॥ घेऊनि रणा चालिला ॥ ८७ ॥ चतुरंग दळ चाले भूमीसी ॥ वानरदळ चाले आकाशीं ॥ भरत घेऊनि ऐशा दळासी ॥ वेगें रणभूमीसी पातला ॥ ८८ ॥ कुशें जें पाडिलें रण ॥ भरत दावी हनुमंतालागून ॥ कैसे पडिले वीरगण ॥ मस्तकहस्तांविरहित ॥ ८९ ॥ कोठें पाऊल कोठें चरण ॥ कोठें मस्तक कोठें आनन ॥ कोठें नासिक कोठें कर्ण ॥ पडोनि भूमी चितारली ॥ ९० ॥ नर हय गज दासेरक ॥ सर्वही पडिले रहितमस्तक ॥ ऐसें कुशरणमंडळींचें कौतुक ॥ भरत दावी हनुमंता ॥ ९१ ॥ पुढें शोणितसरिता देखिली ॥ दुस्तर ह्मणोनि सेना थोकली ॥ रक्तें प्रेतें वाहावलीं ॥ जाऊन मिळालीं जाह्नवीतें ॥ ९२ ॥ भरत होय म्लानमुखेंदु ॥ जरी वाहून गेले असतील बंधू ॥ तरी ते पावले असतील सिंधू ॥ अप्राप्य ते आह्मांतें ॥ ९३ ॥ तरी आता शीघ्र चलावें ॥ या रक्तनदीतें उल्लंघावें ॥ रणमंडळातें शोधावें ॥ दृष्टीं पाहावें सौमित्रा ॥ ९४ ॥ पूर्वीं तुवां लंघोनि उदधी ॥ बरवी केली सीताशुद्धी ॥ राम तोषविला गुणनिधी ॥ तैसें मजला तोषवीं ॥ ९५ ॥ मग मारुति ह्मणतसे भरता ॥ तैं मज सन्मुख होती सीता ॥ आतां ती मज विमुख

१ समुद्र. २ अग्नि. ३ लोकांच्या निंदेमुळें. ४ सीतेच्या त्यागरूप पातकांचा पर्वत. ५ तोंड. ६ उंट. ७ रक्ताची नदी. ८ समुद्र. ९ अनुकूल.

असतां ॥ कैसा लंघूं नदीतें ॥ ९६ ॥ जेथें लक्ष्मणाऐसा जळचर ॥ ह्मणोनि ही तों नदी दुस्तर ॥ तथापि लंघीन आतां सत्वर ॥ रामस्मरणें करोनियां ॥ ९७ ॥ ऐसें बोलोनि कपि उडाला ॥ कष्टें परतीरा पावला ॥ रणमंडळ शोधूं लागला ॥ तंव दोघे बंधू सांपडले ॥ ९८ ॥ करकमळद्वय ते जोडोनी ॥ सन्मुख पडले असती मेदिनीं ॥ कन्यादुःख सोडीं ह्मणोनी ॥ प्रार्थना करिती पृथ्वीची ॥९९॥ आह्मी सीताद्रोही केवळ ॥ क्षमा करीं अपराध सकळ ॥ आपल्या उदरीं देइंजे स्थळ ॥ लवकुशबाळांनीं पीडिलों ॥ १०० ॥ आपुले कन्येचा केला त्याग ॥ ह्मणोनि धरेसी आला राग ॥ यास्तव दोघांचें अंग ॥ कांहीं केल्या न सोडी ॥ १ ॥ हनुमंतें दोघे उचलिले ॥ वस्त्रेंकरून देह पुशिले ॥ दोघे हृदयीं धरून आणिले ॥ हातीं दीधले भरताच्या ॥ २ ॥ लवकुशबाणें छिन्नभिन्न ॥ बंधू देखे कैकेयीनंदन[2] ॥ कांहीं विस्मय कांहीं रुदन ॥ करून वर्णी बाळकां ॥ ३ ॥ भरतें दोघे आलिंगिले ॥ ते दीर्घमूर्च्छित देखिले ॥ मग रथावरी निजविले ॥ रक्षण ठेविलें तयांतें ॥ ४ ॥ हनुमंतासी बोले भरत ॥ सैन्यनाशक दोघे सुत ॥ कोठें आहेत ते निःशंक ॥ जवळी जाऊनि पाहावें ॥ ५ ॥ हनुमंत ह्मणे नृपनंदना ॥ इंद्रजितशर लागला लक्ष्मणा ॥ परी ऐसी न पावला मूर्च्छना ॥ तों हा कुशबाणें पावला ॥ ६ ॥ सकळ वीर धांवोन ॥ नेत्रीं पाहाती लक्ष्मण ॥ तों कुशबाणें छिन्नभिन्न ॥ रक्त वाहे सर्वांगीं ॥ ७ ॥ ऐसे वीर पडले रणीं ॥ दुस्तर पाहिली वीरश्रेणी[3] ॥ सर्व दळें पडिलें धरणीं ॥ ह्मणोनि कुशातें वर्णिती ॥ ८ ॥ आतां लवकुशभरत ॥ युद्ध करितील अद्भुत ॥ तें पुढिले प्रसंगीं कथामृत ॥ सावधान परिसावें ॥ ९ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ रामलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ११० ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके लवकुशाख्यानं नाम पंचत्रिंशत्तमोध्यायः ॥ ३५ ॥ ॥ अध्याय ॥ ३५ ॥ ॥ ओव्या ॥ ११० ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥

---

१ पृथ्वीवर. २ भरत. ३ योद्ध्यांचा समूह. ४ सैन्य.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे नृपनंदना ॥ ऐक राया कथानुसंधाना ॥ जी ऐकतां दुरितंसेना ॥ पळोनि जाय दशदिशा ॥ १ ॥ तों इतुकियांत काय झालें ॥ कुशलवें धनुष्या टणत्कारिलें ॥ तें ऐकतां हृदय भेदलें ॥ सकळ वीरांचें तेधवां ॥ २ ॥ खड्गच-र्मधर दोघे बाळ ॥ सन्मुख दिसती जेवीं काळ ॥ देखोनि खवळलें दळ ॥ ह्मणती बाळकें नाटोपती ॥ ३ ॥ तों सुटला झुंझाटमारुत ॥ तेणें धुळी उडाली अद्भुत ॥ झांकोळला दिवानाथ ॥ अस्तमानसा भासला ॥ ४ ॥ सागरमेखलांकित भूमंडळ ॥ निज तेजें करी सोज्वळ ॥ तो बुजोनि ठेला केवळ ॥ अंधकार पडियेला ॥ ५ ॥ बाळांनीं स्वकुलक्षय आरंभिला ॥ हें नयनीं न पाहवे त्याला ॥ ह्मणोनि देह झांकिला ॥ अति लाजला मानसीं ॥ ६ ॥ आप पर न दिसे ऐसें झालें ॥ नामें पाचारिती आपुले ॥ सकळ दळ भय पावलें ॥ तयां बाळां देखोनि ॥ ७ ॥ मदोन्मत्त गज धांवती ॥ तेणें सकळ रथ चूर्ण होती ॥ रथ धांवतां वीर पडति ॥ हयावरोनि भूतळीं ॥ ८ ॥ हयवेगें पदाती पडती ॥ ऐसी झाली सैन्यस्थिती ॥ आप आपणातें मारिती ॥ बाप रघुपति खेळ खेळे ॥ ९ ॥ मग खड्ग घेऊनि ते वेळां ॥ लव सैन्यामाजी प्रवेशला ॥ चर्म शिरीं धरूनियां वहिला ॥ छेदों लागला हयपदें ॥ १० ॥ विशाळ गजशुंडांतें ॥ लव तोडी एकेचि घातें ॥ दीर्घ शुंडा धरूनि हातें ॥ चढे वेगें गजमस्तकीं ॥ ११ ॥ जेवीं काष्ठ विदारिजे कुठारधारीं ॥ तेवीं गजकुंभातें विदारी ॥ मुक्तें पडती धरित्रीवरी ॥ विखरोनि तेधवां ॥ १२ ॥ आधीं कन्यादुःखें दुखवली ॥ त्यावरी शवभारें दाटली ॥ ह्मणोनियां पौत्रें पूजिली ॥ गंजमुक्तेंकरोनियां ॥ १३ ॥ हस्तिदंतीं खड्ग लागतां ॥ तेथोनि अग्नि पडे अवचितां ॥ तो जाळितसे तत्वतां ॥ रामसैन्यालागोनि ॥ १४ ॥ तंव तो कुशवीरेश ॥ करिता झाला बाणप्रकाश ॥ छेदित उठिला वीरांस ॥ शिरें भूमीस समर्पी ॥ १५ ॥ बाहु छेदोनि सांडी धरणीं ॥ शिरें उडवीतसे गगनीं ॥ एकत्र होऊनि तये स्थानीं ॥ राहिलीं जाण कित्येक ॥ १६ ॥ ऐसें रण मागें न झालें ॥ आतां पुढें न होईल भलें ॥ कोट्यवधि वीर पडिले ॥ नेणों कित्येक महागज ॥ १७ ॥ शरें उडाला हस्तिहस्त ॥ तो गगनीं जाण नक्षत्र हस्त ॥ अद्यापि उदकातें वर्षत ॥ शेवटीं गर्जत पर्जन्यकाळीं ॥ १८ ॥ ऐसीं छेदोनि गजशिरें ॥ कौतुक केलें कुशवीरें ॥ कोदंडाचे टणत्कारें ॥ बधिर केले दिग्गज ॥ १९ ॥ त्यांतें देखोनि कैकेयीपुत्र ॥ ह्मणे हे मरुद्गण कीं गणेश्वर ॥ किंवा पवन वैश्वानर ॥ सैन्य जाळावया पातले ॥ २० ॥ ऐसें बोलोनि भरतवीर ॥ सोडिता झाला अपार शर ॥ जेवीं गगनींहोनि जलधर ॥ पर्वतशिखरीं वर्षे जैसा ॥ २१ ॥ करीं शोभती धनुष्यबाण ॥ काकपक्षधर मेघवर्ण ॥ ऐसे लवकुश देखोन ॥ काय बोले मारुती ॥ २२ ॥ हे रामाकृती दिसती बाळ ॥ सर्व मारितील आमुचें दळ ॥ तरी तुह्मीं होवोनि निश्चळ ॥ युद्ध करावें कुशासीं ॥ २३ ॥ ऐसें बोलतां हनुमंत ॥ कुश लवातें बोलत ॥ सैन्य हें पावलें त्वरित ॥ श्यामकर्ण सोडवावया ॥ २४ ॥ तरी तुवां रक्षावें

१ पापसमूह. २ सोसाट्याचा वारा. ३ सूर्य. ४ सैन्य. ५ ढाल. ६ पृथ्वीवर. ७ हत्तीच्या गंडस्थलांतील मोत्यांनीं. ८ धनुष्याचे. ९ भरत. १० अग्नि.

हयातें ॥ मी मारीन परदळातें ॥ कुश येवोनि भरतातें ॥ काय वचन बोलत ॥ २५ ॥ तुझे दोघे बंधू म्यां निजविले ॥ सकळ वीर रणीं पाडिले ॥ माझें नाम जाण वहिलें ॥ वैरी तुमचा मी कुश ॥ २६ ॥ मग तयासी बोले भरत ॥ मी तुज धरून नेईन जित ॥ काय मांडिलें बाळचेष्टित ॥ सोडोनि देईं श्यामकर्ण ॥ २७ ॥ तुज देखतां बाळकासी ॥ कृपा उपजली मम मानसीं ॥ तुझी माता असेल तापसी ॥ तयेसी जाऊन हें सांगें ॥ २८ ॥ बंधुसहवर्तमान मातें ॥ कृपेनें सोडिलें भरतें ॥ तुवां वधिलें माझ्या सैन्यांतें ॥ तो अपराध क्षमा केला ॥ २९ ॥ ऐकोनि वचन भरताचें ॥ कुश प्रत्युत्तर देत बाणें तयाचें ॥ आकर्ण सीतं[1] ओढून धनुष्याचें ॥ अमित बाण वर्षला ॥ ३० ॥ सात बाण भरतातें ॥ सात सात बाण वानरांतें ॥ सातचि बाणें खिळिलें हनुमंतातें ॥ मग सिंहनादें गर्जेला ॥ ३१ ॥ रोषेंकरूनि त्या क्षणातें ॥ साहा बाणें खिळिलें अंगदातें ॥ पंचशतें विंधिलें नळातें ॥ सत्तरीं बाणीं नीळ खिळिला ॥ ३२ ॥ अति पावोनि क्रोधातें ॥ सहस्रें खिळिलें जांबुवंतातें ॥ यापरी सकळ सैन्यातें ॥ कुशें बाणें गौरविलें ॥ ३३ ॥ ललाटीं आणि हृदयीं ॥ जेथें तेथें बाण लागले पाहीं ॥ ऐसें लवें कुशें बाणघायीं ॥ सकळ दळ केलें जर्जर ॥ ३४ ॥ लवें साहा बाणेंकरून ॥ भरताचें धनुष्य छेदोन ॥ शरें रथ केला तिळप्रमाण ॥ अति लाघवेंकरूनि[2] ॥ ३५ ॥ कुशकोदंडाचा लागतां बाण ॥ भरत पडिला मूर्च्छा येऊनि ॥ तें देखोन वायुनंदन ॥ काय करी अवधारा ॥ ३६ ॥ एक पर्वत आणिला उपटोन ॥ राया तो असे योजनप्रमाण[3] ॥ लवकुशांचे मस्तकीं टाकितां जाण ॥ तंव ते काय करिती ॥ ३७ ॥ कुशलवीं लाघव करून ॥ पर्वत केला रेणुप्रमाण ॥ शिवगात्रीं करावया लेपन ॥ नेणो विभूंति[4] ती केली ॥ ३८ ॥ कनकें विचित्र पांच बाण ॥ सोडोनि ताडिला वायुनंदन ॥ तोही होऊनि मूर्च्छायमान ॥ शेषप्राय पडियेला ॥ ३९ ॥ स्वपौत्रांचा पराक्रम देखोन ॥ धरणी झाली सुप्रसन्न ॥ कन्या जामातें त्यागिली ह्मणोन ॥ सैन्यरक्तें न्हाली ती ॥ ४० ॥ ऐसें भग्न देखोनि दळ ॥ अयोध्येसी पळाले घायाळ ॥ श्रीरामाप्रति जाऊनि सकळ ॥ युद्धवार्ता सांगती ॥ ४१ ॥ ऐकतां राम झाला दीन ॥ बंधुदुःखें करी रुदन ॥ मग यागदीक्षा त्यागोन ॥ युद्धास आपण चालिला ॥ ४२ ॥ सवें बिभीषण आणि सूर्यनंदनं[5] ॥ बाळपराक्रमें विस्मित मन ॥ बंधुदुःखें करी रुदन ॥ हर्ष संताप दुःखही ॥ ४३ ॥ रथारूढ रघुनंदन ॥ शीघ्र पावला तो युद्धस्थान ॥ तों राम राम ऐसें वचन ॥ वीर पडिले बोलती ॥ ४४ ॥ ते देखोनि बाळकोत्तम ॥ अंतरीं[6] तोषला श्रीराम ॥ सकळ योगिजनमनँ[7]विश्राम ॥ काय पुसे तयांप्रति ॥ ४५ ॥ तुह्मी कोणाचे कोण ॥ कोठें केलें रे अध्ययन ॥ ऐसा धनुर्वेद तुह्मांलागून ॥ कवण्या गुरूनें शिकविला ॥ ४६ ॥ कोणें केलें उपनयन ॥ पितामाता तुमचीं कोण ॥ सांगा तुमचें वसतिस्थान ॥ सर्वही तें मजलागीं ॥ ४७ ॥ ऐकोनि हांसे सीतानंदन ॥ आमुचे वंशकथेचें प्रयोजन ॥ कासया जी तुजलागून ॥ युद्धांगणीं येवोनि ॥ ४८ ॥

१ दोरी. २ कौशल्यानें. ३ चार कोस लांब. ४ भस्म. ५ सुग्रीव. ६ अंतःकरणामध्यें. ७ योग्यांचें विश्रांतिस्थान.

तूं तों नृपाचें भूषण ॥ भय पावतोसी बाळें देखोन ॥ कां पुससी जन्मकथन ॥ क्षात्रधर्म सांडोनि ॥ ४९ ॥ आपुला नव्हे बोलें श्यामकर्ण ॥ कीं युद्ध करीं दारुण ॥ ऐसें ऐकोनियां प्रतिवचन ॥ राम देत तयांतें ॥ ५० ॥ तुह्मी न सांगतां वंशस्थिती ॥ मी युद्ध न करीं निश्चितीं ॥ ऐशी ऐकोनियां भारती ॥ कुशवीर अनुवादे ॥ ५१ ॥ आह्मीं उभयतां नंदन ॥ केवळ सीता प्रसवली जाण ॥ जातकर्मादि उपनयन ॥ केलें गुरु वाल्मीकें ॥ ५२ ॥ धनुर्वेदादि अध्ययन ॥ तेणेंचि सांगीतलें जाण ॥ आतां तरी सावधान ॥ युद्ध करीं आह्मांसीं ॥५३॥ सीताप्रसूत[1] ऐकतां ॥ स्वपुत्र जाणवले रघुनाथा ॥ धिक्कार असो मज सर्वथा ॥ ह्मणोनि झाला विव्हळ ॥५४॥ मग सावध होऊनि सीतारमण ॥ सुग्रीवाप्रति बोले वचन ॥ हे तों कवणाचे नंदनें[2] ॥ जाणवलें कीं कपिराया ॥ ५५ ॥ मग सुग्रीव बोले रामराया ॥ ही तों शक्ती नव्हे अन्य वीर्या ॥ स्वकीय वीर्यशक्तीचें स्वामिया ॥ हेंचि मातें वाटतसे ॥ ५६ ॥ तुह्मांपुढें राहावयासी ॥ सामर्थ्य नसे अन्यासी ॥ प्रतिबिंब पहावया बिंबासी ॥ भय नसे परस्परें ॥ ५७ ॥ हे रामइंदूचें[3] प्रतिबिंब ॥ धैर्यसदनाचे अक्षय खांब ॥ केवळ धनुर्विद्येचे कोंब ॥ रूपें पुतळे मदनाचे ॥ ५८ ॥ ऐसें बोलोनि सुग्रीवें ॥ वृक्ष उपडिला पराक्रमभावें ॥ तो तिळप्राय केला लवें ॥ रामें देखिलें कौतुक ॥ ५९ ॥ तों कुशें सोडोनियां शर ॥ मूर्च्छित पाडिला सूर्यकुमरें ॥ तों सावध झाला नीळ वानर ॥ पर्वत घेवोनि धांवला ॥ ६० ॥ मग कुशें शर सोडोन ॥ विशाळ पर्वत केला चूर्ण ॥ एके मार्गणें[5] दारुण ॥ नीळ वानर विंधिला ॥ ६१ ॥ त्याचे अंगापासोनि निघालें रुधिर ॥ त्याचे कोट्यवधि झाले नीळ वानर ॥ हें कौतुक देखतां कुशवीर ॥ भय पावला अंतरीं ॥ ६२ ॥ मग जल्हकास्त्र सोडून ॥ तयाचें रक्त केलें शोषण ॥ नीळ पडिले निचेष्टित होऊन ॥ अपूर्व वाटलें सकळातें ॥ ६३ ॥ मग कुशेंद्र कोपला ॥ वर्षाव दारुण शस्त्रांचा केला ॥ सर्वही खिळिला सैन्यमेळा ॥ उरला एक श्रीराम ॥ ६४ ॥ जेवीं दरिद्रियाचे मनोरथ ॥ पूर्ण नव्हेती यथार्थ ॥ तेवीं पुत्रापुढें रघुनाथ ॥ हारी[6] आपण घेतसे ॥ ६५ ॥ पुत्रापासोनि पराजय ॥ असावा हा शास्त्रनिश्चय ॥ याकरितां दाशरथेय ॥ हारी आपण स्वीकारी ॥ ६६ ॥ मग रामें सोडिले अनंत बाण ॥ त्यांचें लवकुश करिती निवारण ॥ आत्मसम बळी देखोन ॥ श्रीराम परम संतोषला ॥ ६७ ॥ कुशलव दोघे नंदन ॥ सीताजनित महाशूर पूर्ण ॥ मग कुशें निर्वाण बाण ॥ रामावरी टाकिले ॥ ६८ ॥ अति पराक्रमी कुश आणि राम ॥ बाणें दाटिती सकळ व्योम[7] ॥ निर्वाण करिती संग्राम ॥ येरयेरां नाटोपती ॥ ६९ ॥ मग कुशें सोडिला वाल्मीकदत्त शर ॥ जो सूर्यापरीस तेजें तीव्र ॥ तो रामहृदयीं बैसतां अव्यग्र[8] ॥ मूर्च्छा दाटली रामराया ॥ ७० ॥ मूर्छित देखतां राघव ॥ रथावरी चढिला तो लव ॥ सर्व भूषणें अभिनव ॥ हरोनियां घेतलीं ॥७१॥ तैशींच लक्ष्मणाचीं वस्त्रें भूषणें ॥ सर्व हरिलीं सीतानंदनें ॥ भरतशत्रुघ्नांचींही आनंदमनें ॥ हरूनि घेत तो लव ॥७२॥

१ सीतेपासून जन्मलेले. २ पुत्र. ३ रामरूपी चंद्राचें. ४ सुग्रीव. ५ बाणानें. ६ पराजय. ७ आकाश. ८ जोरानें, घट्ट.

मग कुशाप्रति बोले उत्तर ॥ आतां मी दोघे धरितों वानर ॥ तूं रामरथारूढ होऊन सत्वर ॥ चाल जाऊं मंदिरा ॥ ७३ ॥ मी लक्ष्मणाचे रथावरी बैसोन ॥ चला त्वरित जाऊं निघोन ॥ हें ऐकोनि वायुनंदन ॥ ऋषभ वानरा बोलतसे ॥ ७४ ॥ नेत्र झांका रे वेगेंसीं ॥ लव धरून नेईल सीतेपासीं ॥ मग त्या लज्जेनें जीवित्वासी ॥ काय वाटेल ठेवावें ॥ ७५ ॥ जरी रामें सोडवावें आह्मांतें ॥ तरी तोही वश झाला त्या बाळांतें ॥ ह्मणोनि आपल्या प्राणांतें ॥ वांचविजे युक्तीनें ॥ ७६ ॥ ऐसें करूनियां भाषण ॥ लटिकेचि झाले मूर्च्छायमान ॥ परी ते लवें तैसेचि धरून ॥ रथावरी घातले ॥ ७७ ॥ सत्वर पावले स्वस्थान ॥ साष्टांगें वंदिले मातृचरण ॥ प्रेमें दिधलें आलिंगन ॥ आवडी वदन चुंबिलें ॥ ७८ ॥ मग लव आद्यंत कथन ॥ मातेसी सांगे आपण ॥ माते कुशें जें केलें समरांगण ॥ तें सर्वथा न बोलवे ॥ ७९ ॥ कुशें श्रीरामातें जिंकिलें ॥ आणि सकळ दळातें भंगिलें ॥ वस्त्रें अळंकार म्यां हरिले ॥ दृष्टीं पाहें जननीये ॥ ८० ॥ मग दोघे पुत्र बैसविले जवळी ॥ तेणें शोभली रामवेल्हाळी[1] ॥ जेवीं तारकारि[2] पार्वतीजवळी ॥ आणि दुजा विघ्नेश[3] ॥ ८१ ॥ माते हे अपूर्व वानर देखिले ॥ म्यां तुजलागीं दाखवावया आणिले ॥ ते तुवां दृष्टीं पाहावे वहिले ॥ कैसे लांगूल[4] हालविती ॥ ८२ ॥ जाणोनि सीता बोले त्यालागुनी ॥ त्यांसी सोडीं रे त्वरेंकरुनी ॥ ते तों महावीर अभिमानी ॥ मज पाहतां प्राण देतील ॥ ८३ ॥ पैल तो वीर मजकारणें ॥ बहुत कष्टला असे प्राणें ॥ याचिया उपकारा ठेंगणें ॥ गगन वाटे लवबाळा ॥ ८४ ॥ तव देहाचा जो जनिता[5] ॥ त्याचा प्राण हा कपि सर्वथा ॥ हाही तयाचे भक्तिपंथा ॥ सोडीं त्यांतें जाऊनि ॥ ८५ ॥ ऐसें ऐकतां मातृवचन ॥ लवानें दिधले सोडून ॥ न पाहतां सीतावदन ॥ मनें वंदोनि पळाले ॥ ८६ ॥ परम संतोष दोघांसी ॥ निघोन आले रामापासीं ॥ झालें वर्तमान तयासी ॥ सावध करून सांगती ॥ ८७ ॥ मग तो वाल्मीक येतां गृहासी ॥ सीताकुमरीं[6] वंदिलें तयासी ॥ सांगती आद्यंत कथेसी ॥ जें जें युद्धीं वर्तलें ॥ ८८ ॥ ऐकतां वाल्मीक संतोषला ॥ ह्मणे मज परम लाभ झाला ॥ श्रीराम पाहीन मी डोळां ॥ या कुमारांचे प्रसादें ॥ ८९ ॥ आतां मी एक करीन ॥ श्रीराम आश्रमातें आणीन ॥ सपुत्र जानकी समर्पीन ॥ करीन पूजन यथाविधि ॥ ९० ॥ मग मुनि जावोनि पाहे रणांगण ॥ तों सकळ सैन्य गतप्राण ॥ मग आपले कमंडलूचें उदक सिंचोन ॥ केले सजीव सर्वही ॥ ९१ ॥ रामें वंदिले मुनिचरण ॥ प्रेमें दिधलें आलिंगन ॥ भरत लक्ष्मण शत्रुघ्न ॥ सर्वही वंदिती वाल्मीकातें ॥ ९२ ॥ सैन्य उठतां प्रबळ ॥ वाद्यें वाजती तुंबळ ॥ आनंदले वीर सकळ ॥ धन्य ह्मणती मुनिवरा ॥ ९३ ॥ मग सकळ सैन्येसीं रघुनंदन ॥ वाल्मीकें आणिला आश्रमीं प्रार्थून ॥ सन्मानेंसीं सीतारमण ॥ मुनिवरें तो पूजिला ॥ ९४ ॥ मग लवकुशांचें जन्मकथन ॥ वाल्मीकें सांगीतलें रामाकारण ॥ ऐकतां श्रीराम संतोषोन ॥ धन्य ह्मणे जी मुनिवरा ॥ ९५ ॥ मग लवाप्रति बोले मुनिभूषण ॥

१ रामस्त्री=सीता. २ कार्तिकस्वामी. ३ गणपति. ४ शेंपूट. ५ बाप. ६ लवकुशांनीं.

भावें वंदा रे पितृचरण ॥ तंव कुशलवांनीं मातेचें वदन ॥ पाहोन झाले साशंक ॥ ९६ ॥ तंव ती जानकी मूळमाया ॥ जाणवी पुत्रांस खुणावोनियां ॥ ममोदरशुक्तीं मुक्तें निपजवाया ॥ जलधर हाच जाणिजे ॥ ९७ ॥ ऐसी सीतावचनाची खूण ॥ वेगें पावोनि नृपनंदन ॥ मग वंदिले श्रीरामचरण ॥ प्रेमें आलिंगन दिधलें ॥ ९८ ॥ पितापुत्रांची झाली भेटी ॥ नेणों कैवल्यीं पडिली मिठी ॥ जेवीं गंगा मिळतां सागरपोटीं ॥ द्वैतभाव नुरेचि ॥ ९९ ॥ मग मुनीचे आज्ञेंकरुनी ॥ श्रीरामचरण वंदी जनकनंदिनी ॥ अधोमुख उभी कर जोडुनी ॥ मग हास्यवक्रें राम बोले ॥ १०० ॥ तुज जनापवादें म्यां टाकिलें ॥ तेंचि आह्मां पाप घडलें ॥ ह्मणोनि देहांत प्रायश्चित्त दिधलें ॥ कुशबाणतीथैं आह्मांसी ॥ १ ॥ जरी झाला ह्मणसी अपराध ॥ तरी ही तुझी करणी अगाध ॥ मी अकर्ता हें प्रसिद्ध ॥ ज्ञानदृष्टी जाणती ॥ २ ॥ ऐसी ही आपलीच करणी ॥ जाणोन खेद न करावा मनीं ॥ विशेषें विदेहाची नंदिनी ॥ आणि क्षेमाप्रसूत अससी ॥ ३ ॥ निरपराधें टाकिलें तुज ॥ ह्मणोनि अपजयें सेविलें मज ॥ तूं तरी विवेकवल्लीचें मूळबीज ॥ अविचारभूमी नातळसी ॥ ४ ॥ रामवियोग राहुमंडळ ॥ आड होता सीतामुखेंदु केवळ ॥ तो रामदर्शनें तात्काळ ॥ मुक्त झाला वाक्यधनदानें ॥ ५ ॥ मग प्रकाशली हर्षकळा ॥ तेणें रामसंदेह अंधकार हरिला ॥ विकासता आली वीरमुखकमळां ॥ रामाक्षचकोरां तृप्ति झाली ॥ ६ ॥ मग दोंमांडींवरी दोघे कुमर ॥ वाल्मीकें बैसविले सत्वर ॥ वामभागीं सीता सुंदर ॥ बैसती झाली रामाचे ॥ ७ ॥ वाल्मीकें षोडशोपचारें पूजन ॥ केलें तेव्हां प्रेमेंकरून ॥ हस्तकमळ जोडून ॥ केलें स्तवन रामाचें ॥ ८ ॥ असो त्या समयीं सीतावर ॥ कैसा शोभला मनोहर ॥ दिसे जैसा कँर्पूरगौर ॥ स्कंदगणेशांसमवेत ॥ ९ ॥ मग भरतादिक लक्ष्मण ॥ शत्रुघ्न आणि वायुनंदन ॥ सूर्यसुतादिक वानरगण ॥ येऊनि नमिती उभयतां ॥ ११० ॥ परी लक्ष्मणाचा तों सापराधें ॥ म्लान मुखेंदु भासला खेदें ॥ तें जाणोनि सीता विनोदें ॥ काय बोले तेधवां ॥ ११ ॥ ह्मणे व्यर्थ संकोचे कां मन ॥ मी तों पावलें पुत्रधन ॥ पराक्रमकीर्तिसाधन ॥ त्यागेंचि कारण सर्व घडलें ॥ १२ ॥ मग पुत्रासी ह्मणे सद्भावें ॥ तुह्मी पितृव्यचरण वंदावे ॥ मग अनुक्रमें कुशलवें ॥ नमस्कारिलें त्रयातें ॥ १३ ॥ तिहीं देवोनि आलिंगन ॥ परम पावले समाधान ॥ करें मुखेंदु कुरवाळून ॥ चुंबन देती आवडीं ॥ १४ ॥ ह्मणती रामवीर्यशौर्य ॥ आमचा केला कीं पराजय ॥ नाहीं तरी ऐसे तनय ॥ कोण प्रसवे वीरमाता ॥ १५ ॥ हनुमंतादि सर्व वीरीं ॥ नमस्कारिली जानकी सुंदरी ॥ अमृतदृष्टीनें पाहातां शरीरीं ॥ सुखमय ते झाले ॥ १६ ॥ मग बोले वाल्मीक मुनी ॥ श्यामकर्ण सीता तनय दोनी ॥ मिरवत जावें अयोध्याभुवनीं ॥ यज्ञसमाप्तीकारणें ॥ १७ ॥ मग आनंदोनि रघुनाथ ॥ स्त्रीपुत्रभ्रातृसमवेत ॥ रथीं बैसले वीर समस्त ॥ उत्साहेंकरून चालिले ॥ १८ ॥ वीर करिती जयजयकार ॥ देव वर्षती सुमनसंभार ॥ वानर करिती बुभुःकार ॥

---

१ माझ्या उदररूप शिंपल्यांत. २ मोत्यें. ३ मोक्षऐक्यानें. ४ हास्यमुख. ५ पृथ्वीपासून जन्मलेली. ६ टवटवी. ७ महादेव.

श्रीरामनामेंकरूनियां ॥ १९ ॥ मग गंगातीरीं येऊन ॥ अश्वमेध केला संपूर्ण ॥ स्त्रीपुत्रांसहवर्तमान ॥ राज्य करी आनंदें ॥ १२० ॥ ऐसें कुश आणि रघुनंदना ॥ युद्ध झालें परीक्षितिनंदना ॥ तैसेंचि पार्थ आणि बभ्रुवाहना ॥ दारुण युद्ध प्रवर्तलें ॥ २१ ॥ सूत सांगे सौनकाप्रति ॥ ऐसें जैमिनि सांगे रायाप्रति ॥ ती म्यां कथा यथामति ॥ तुह्माप्रति सांगीतली ॥ २२ ॥ ऐसें लवकुशआख्यान ॥ जे करिती श्रवण पठन ॥ तयांचें निरसे भवबंधन ॥ कैवल्यधाम[1] ते पावती ॥ २३ ॥ ऐसा पितापुत्रांचा संग्राम ॥ ही कथा वाचितां उत्तम ॥ तयाचे पूर्ण होती काम[2] ॥ येथें संशय न धरावा ॥ २४ ॥ अश्वमेध यज्ञाचें पुण्य ॥ श्रवणेंचि पावती पूर्ण ॥ ऐसें व्यासादिकांचें वचन ॥ विकल्प चित्तीं न धरावा ॥ २५ ॥ आतां पार्थ आणि बभ्रुवाहन ॥ संग्राम करितील दारुण ॥ तें पुढिले अध्यायीं निरूपण ॥ भावेंकरूनि परिसावें ॥ २६ ॥ ही रामकथा पवित्रावली ॥ द्वादश अध्यायीं संपली ॥ जी मुक्तीची खाणी भली ॥ सकळ किल्बिषां नाशक ही ॥ २७ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीरामकथामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १२८ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके लवकुशाख्यानं नाम षट्त्रिंशोऽध्यायः ॥ ३६ ॥ ॥ अध्याय ॥ ॥ ३६ ॥ ॥ ओव्या ॥ ॥ १२८ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥

---

१ मोक्षपद. २ मनोरथ.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जनमेजय ह्मणे जैमिनि ॥ अपूर्व कथामृताची धणी[1] ॥ स्वामिंनीं आह्मांलागुनी ॥ दिधली यावरी बोलिजे ॥ १ ॥ जैमिनि ह्मणे गा भारता ॥ बभ्रुवाहनयुद्धकथा ॥ तीच ऐकें सावधान आतां ॥ तुज तत्वतां सांगतों मी ॥ २ ॥ सकळ सैन्य पडिलें जाणोनी ॥ मग हंसध्वज उठला ते क्षणीं ॥ तेणें पार्थसुतालागुनी ॥ बाणें केलें जर्जर ॥ ३ ॥ शर सोडोनि अनंत ॥ छेदिला बभ्रुवाहनाचा रथ ॥ सहस्र रथांचें झालें गणित ॥ एक एक छेदितां ॥ ४ ॥ तंव पार्थपुत्र कोपला दारुण ॥ शरें झालासे छिन्नभिन्न ॥ हंसध्वजावरी तीक्ष्ण बाण ॥ वर्षोनि केला व्याकुळ ॥ ५ ॥ मग स्मरोनि कृष्णाचे चरण ॥ आठवोनि पुत्राचें निधन ॥ सक्रोध होऊनि हंसकेतनें[2] ॥ अक्षौहिणीपंचक मारिलें ॥ ६ ॥ देखोनि पार्थपुत्र कोपला ॥ अर्धचंद्र बाण सोडिला ॥ तेणें रथ अश्व सारथि मारिला ॥ भूमीस पाडिला हंसध्वज ॥ ७ ॥ निर्जीव पडिला हंसध्वज ॥ रणीं बाणांची केली शेज ॥ तें देखोन वीरराज ॥ सुवेग वेगें उठावला ॥ ८ ॥ सुवेगें सोडोनियां बाण ॥ वेगें ताडिला पार्थनंदन ॥ छत्र ध्वज तोडोन ॥ एकीकडे पाडिलीं ॥ ९ ॥ मग तो क्रोधावला पार्थसुत ॥ त्यावरी टाकीत बाण शत ॥ देखोनि येरें अनंत ॥ बाणजाळ सोडिलें ॥ १० ॥ नवशत मत्त गज ॥ सुवेगें मारिले सहज ॥ बाणेंकरूनि तेजःपुंज ॥ सर्व सैन्य त्रासिलें ॥ ११ ॥ मांसशोणितांचा[3] कर्दम[4] ॥ भूमीस झाला निरुपम ॥ ऐसा दारुण केला संग्राम ॥ सुवेगवीरें तेधवां ॥ १२ ॥ सुवेगें अर्धचंद्र शर ॥ सोडिला काळानळासमान तीव्र ॥ परी तो अनिवार पार्थपुत्र ॥ दुखंड केला देखतांचि ॥ १३ ॥ त्या शराचा अग्रभाग ॥ पुढें चालिला सवेग ॥ परी त्याचेही दोन भाग ॥ केले बभ्रुवाहनें ॥ १४ ॥ तथापि खंडाग्र धांवलें ॥ तेंही द्विभाग सवेंचि केलें ॥ त्यांतून किंचित उरलें ॥ तें बैसलें हृदयांत ॥ १५ ॥ तेणें आली मूर्च्छना ॥ तों सावध झाला तत्क्षणा ॥ सूर्यवत् तीक्ष्ण बाणा ॥ गुणीं लाविला सबीज ॥ १६ ॥ तो सुवेगावरी सोडिला ॥ तेणें तो गतप्राण पडिला ॥ मग तो संहारूं लागला ॥ पार्थसैन्य बाणजाळें ॥ १७ ॥ सर्व वीर रणीं पडले ॥ पार्थ वृषकेतु दोघे उरले ॥ घायाळ नगरीं पाठविले ॥ बभ्रुवाहनें तेधवां ॥ १८ ॥ तेथें उलूपी[5] आणि चित्रांगदा ॥ त्यांतें लावोनि औषधा ॥ नानाप्रकारें वीरवृंदां ॥ सावध करिती वैद्यांकरीं ॥ १९ ॥ मागें शिवशापें ती नागदुहिता[6] ॥ उलूपी झाली पार्थवनिता ॥ त्याच काळीं गंधर्वसुता[7] ॥ वरिती झाली अर्जुना ॥ २० ॥ त्या भगिनीस्नेहेंकरूनी ॥ काळ क्रमिती एके सदनीं ॥ एकाची सुतें दोघीजणी ॥ सम स्नेहें नांदती ॥ २१ ॥ त्या दोघी करविती उपचार ॥ सावध करिती घायाळ वीर ॥ असो पार्थ तेव्हां धनुर्धर ॥ वृषकेतूसी अनुवादे ॥ २२ ॥ अरे कर्णपुत्रा ऐक मात ॥ सर्व वीर नेले नगरांत ॥ आमचें सर्व वस्तुजात ॥ तेंही येणें लुटिलें ॥ २३ ॥ हंसध्वजादि वीर समस्त ॥ गतप्राण विकळ अत्यंत ॥ पुत्रासहित कृष्णसुत ॥ नेला तेणें मणिपुरा ॥ २४ ॥ अनुशाल्व कोठें पडला ॥ त्याचा समाचार नसे मजला ॥ सुवेग

---

१ समाधानी. २ हंसध्वज. ३ रक्तमांसांचा. ४ चिखल. ५ बभ्रुवाहनाची आई. ६ नागकन्या ( उलूपी. ) ७ गंधर्वकन्या ( चित्रांगी किंवा चित्रांगदा ).

मजदेखतां निमाला ॥ घोर संग्राम करूनि ॥ २५ ॥ शिबिरें ध्वज चामरें छत्रें ॥ शर चापें कवचें विचित्रें ॥ मुगुट आणे कुंडलें सुंदरें ॥ सर्वही लुटिलें यानें कीं ॥२६॥ सायक त्रिशूळ अंकुशादि आयुधें फार ॥ कोटीचा कोटी पडला दळभार ॥ यावरी बरवा विचार ॥ न दिसे सत्य वृषकेता ॥२७॥ तरी तुवां करावें गमन ॥ जावोनि घ्यावें धर्मदर्शन ॥ सांगावें सर्व वर्तमान ॥ दारुण युद्धाचें कृष्णासी ॥ २८ ॥ तूं कुळीं पुत्र एकला ॥ कर्णप्रसूत असशी उरला ॥ ह्मणोनि प्रार्थितों तुजला ॥ हस्तनापुरा जाइंजे ॥२९॥ ऐसें बोलतां पार्थ वीर ॥ तों ध्वजीं बैसला येवोनि गृध्र ॥ शब्द करीत घरघर ॥ पार्थमरण तो सूचवी ॥ ३० ॥ रथावरी कपोत ॥ येवोनि बैसला अवचित ॥ शिराविरहित छाया तत्वतां ॥ नासारहित मुख दिसे ॥३१॥ ऐसीं देखोनि दुश्चिह्नें ॥ पुन्हा पार्थ त्यासी ह्मणे ॥ तुवां शीघ्र नगरा जाणें ॥ अनमान न करीं आतां ॥३२॥ हीं दुश्चिह्नें देखिलीं ॥ यांनीं मरणसूचना केली ॥ तुवां जावोनि वनमाळी ॥ धर्मभीमादिकां जाणवावें ॥३३॥ जरी तूं मजस-हवर्तमान ॥ प्रसंगीं पावलिया मरण ॥ तरी कुंती धर्म भीमसेन ॥ सर्वथा प्राण न ठेविती ॥ ३४ ॥ त्यांहीं सोडिलिया प्राण ॥ नकुळादिक पावतील मरण ॥ ऐसा होईल अनर्थ पूर्ण ॥ ह्मणोनि त्वरें त्वां जावें ॥३५॥ तुवांही महायुद्ध केलें ॥ बाणीं सर्वांग भेदलें ॥ भयभीत त्यांत झालें ॥ अंतर माझें निश्चित ॥३६॥ तुजवांचोनि ती पृथा[2] ॥ सर्वथा न ठेवी जीविता ॥ थोर अनर्थ झाला रे कर्णसुता ॥ यज्ञ आतां राहिला ॥३७॥ नृपें असिपत्रव्रत मांडिलें ॥ सकळ समारंभा मिळालें ॥ अवभृथस्नान[3] कैसें वहिलें ॥ धर्मराया यज्ञांतीं ॥३८॥ कृष्णादि सकळ यादव ॥ व्यासादि मुनिपुंगव ॥ सर्व पाहों आले उत्साह ॥ तें सर्व व्यर्थ झालें वृषकेता ॥३९॥ देवकीआदि सर्व माता ॥ रुक्मिणीआदि सर्व कांता ॥ अरुंधतीआदि मुनिवनिता[4] ॥ भग्नमनोरथा त्या झाल्या ॥ ४० ॥ बभ्रुवाहनवायु सुटला ॥ तेणें उत्साहतरु पाडिला ॥ तरी धिक्कार असो मजला ॥ तो अनावर मज बळहीना ॥४१॥ म्यां श्रीकृष्णबळेंकरून ॥ पूर्वी जाळिलें खांडववन ॥ मत्पुत्रें यज्ञउत्साहवन ॥ भस्म केलें निज-बळें ॥४२॥ कीं यज्ञउत्साहसागर ॥ त्यासी भेटला हा कुंभकुमर ॥ नातरी यज्ञउत्साह गिरिवर ॥ बभ्रुवाहन कुलिशें भेदिला ॥ ४३ ॥ अप-कीर्तीचें आलें मरण ॥ अंतरले धर्मराजाचे चरण ॥ तुवां आतां शीघ्र करावें गमन ॥ सर्वथा येथें न राहावें ॥४४॥ ऐसें ऐकोनि पार्थवचन ॥ काय बोले कर्णनंदन ॥ तेंचि ऐकावें सावधान ॥ जनमेजया राजेंद्रा ॥४५॥ वृषकेतु ह्मणे जी पार्था ॥ मी येथोन न जाईं सर्वथा ॥ क्षणभं-गुर देहाची ममता ॥ धरोनि अपयश न घें मी ॥४६॥ मृत्यूचें भय धरून ॥ म्यां सोडितां समरांगण ॥ तरी हा पितामह तपन[5] ॥ पतन पावेल मत्पापें ॥४७॥ चतुर्दिशांसीं करितां वंदन ॥ मज सन्मुख होतसे हा तपन ॥ यास्तव रणांगणीं मरण ॥ निःसंदेह पावेन मी ॥ ४८ ॥ तुह्मां-लागीं रणीं सोडून ॥ देहलोभें करीन पलायन ॥ तरी पतिव्रता स्त्री मम वदन ॥ न पाहेचि सर्वथा ॥४९॥ गोब्राह्मणधर्मकाजा ॥ निर्भय प्राण समर्पावा ओजा ॥ तेंचि मान्य होतें गरुडध्वजा ॥ येथें संशय असेना ॥ ५० ॥ ऐशा महत्फला सोडून ॥ जलबुद्बुददेहाशा धरून ॥ रण



१ बाण. २ कुंती. ३ यज्ञाच्या अखेरीस जें स्नान करितात तें. ४ ऋषींच्या स्त्रिया. ५ सूर्य.

सोडोनियां गमन ॥ सर्वथा न करीं मी पार्थराया ॥५१॥ जेवीं सौदामिनी विलसित ॥ तेवीं कलेवर हें अशाश्वत ॥ तयाच्या लोभें हें शाश्वत ॥ कैसें सोडूं स्वामिया ॥५२॥ देऊन जांबूनदाचें नाणें ॥ घेतलें गंधर्वनगरीचें ठाणें ॥ नातरी चित्रधनाकारणें ॥ प्राण बलिदान देईंजे ॥ ५३ ॥ पश्चिमे उगवेल दिनमणी ॥ कां आकाश पडेल मेदिनीं ॥ कां शेष सोडील धरणी ॥ परी मीं न सोडीं रणांगण ॥५४॥ आतां पाहा माझा पुरुषार्थ ॥ युद्धीं तोषवीन तुमचा सुत ॥ ऐसें बोलोनि वृषकेत ॥ पार्थासी वंदून चालिला ॥५५॥ रणीं जावोनि वृषकेतें ॥ पाचारिलें बभ्रुवाहनातें ॥ ह्मणे तुवां मारिलें सर्व वीरांतें ॥ त्याचा सूड घेईन मी ॥ ५६ ॥ ऐसें बोलोनि कर्णनंदन ॥ तयातें मारिले तीन बाण ॥ ते तयाचें हृदय भेदून ॥ त्रास देते जाहले ॥५७॥ मग जे मांसरक्तशोषक मार्गण ॥ ते पार्थसुतें दीधले सोडून ॥ तेणें विकळ कर्णनंदन ॥ झाला घाबरा ते काळीं ॥५८॥ मग वृषकेतु कोपला ॥ साहा बाणें पार्थसुत विंधिला ॥ मूर्च्छा येत परी सांवरिता झाला ॥ सत्वरचि महावीर ॥५९॥ मग बाण सोडिले असंख्यात ॥ छेदिला वृषकेतूचा रथ ॥ चारी अश्व मारून यमपंथ ॥ सारथि नेला त्याच बाणें ॥ ६० ॥ मग वृषकेतें गर्जोन ॥ अपार सोडिले कनकबाण ॥ परी नाटोपे बभ्रुवाहन ॥ अस्त्रें दारुण सोडित ॥६१॥ बभ्रुवाहनें सोडिलें अग्न्यस्त्र ॥ वृषकेतें सोडिलें जलदास्त्र ॥ पार्थात्मजें वाय्वस्त्र ॥ येरें पर्वतास्त्र योजिलें ॥६२॥ पार्थात्मजें योजिलें वज्र ॥ तेणें केले नगांचे चूर ॥ वृषकेतें ब्रह्मास्त्र ॥ प्रयोजिलें तेधवां ॥६३॥ पार्थात्मजें सूर्यास्त्रें ॥ निरसिलें तें क्षणमात्रें ॥ कर्णात्मजें शांभवास्त्रें ॥ त्रासिलें परम बभ्रुवाहना ॥६४॥ येरें सोडिला भस्मासुर ॥ तेणें मोहिनी निर्मिली सत्वर ॥ त्यावरी चित्रांगीचा कुमर ॥ यमास्त्रातें योजितसे ॥ ६५ ॥ तेणेंकरून पार्थसैन्य ॥ जाळीतसे जैसें तृण ॥ त्यावरी वृषकेतु दारुण ॥ स्वामिकार्तिकास्त्र सोडित ॥६६॥ ऐसीं नाना अस्त्रें सोडिती ॥ कोणी कोणास नाटोपती ॥ भूतवेताळराक्षसांची तृप्ती ॥ झाली तेव्हां अपार ॥६७॥ वृषकेतें बाणें विंधिला ॥ बभ्रुवाहन चिंता पावला ॥ मग वैष्णवास्त्रातें सोडिता झाला ॥ सर्वास्त्रनाशक ते काळीं ॥६८॥ शरें वृषकेतें ते समयीं ॥ पांडवास्त्रातें सोडोन पाहीं ॥ वैष्णवास्त्राचा उपशमही ॥ करीतसे वीर तो ॥६९॥ मग बभ्रुवाहन ह्मणे वृषकेतूतें ॥ त्वां बहु त्रासिलें रे मातें ॥ त्रास उपजविला चित्तातें ॥ आतां स्वजीवितातें रक्षावें ॥७०॥ जैसा इंद्र मारी वृत्रासुर ॥ तैसें मारीन तुज सत्वर ॥ ऐसें बोलोनि तीक्ष्ण शर ॥ सोडिता झाला वृषकेतूवरी ॥७१॥ त्या शरघातेंकरूनी ॥ वृषकेतु उडाला गगनीं ॥ वायुचक्रामाजी भ्रमणीं ॥ पडिला तो फिरतसे ॥७२॥ जेवीं कृष्णविमुख नर ॥ फिरे जन्ममरणीं निरंतर ॥ तेवीं मार्तंडात्मजकुमर ॥ पार्थात्मजें फिरविला ॥७३॥ अष्ट दिशांतें फिरविला ॥ सप्त सागरांपलीकडे नेला ॥ परी तो भूमंडळातें नाहीं पडिला ॥ परम कौतुक तयाचें ॥७४॥ यापरी वृषकेतूतें ॥ बाणें भेटविलें पितामहातें ॥ तो पितापुत्र पाहाती त्यातें ॥ बाणें भ्रमवी अनिवार ॥ ७५ ॥ ऐसा त्रिमुहूर्त तो फिरविला ॥ मग भूमंडळामाजी पाडिला ॥ जेथें पार्थवीर उभा राहिला ॥ तेथें पडिला वृषकेतू ॥ ७६ ॥ मग सावध होऊनि कर्णसुत ॥ क्रोधावला तो अद्भुत ॥ पंच शरें पार्थात्मजरथ ॥ आकाशपंथें उडविला ॥ ७७ ॥ सारथ्यासह पार्थसुत ॥ अश्वपताकांसमवेत ॥ तो रविमंडळाप्रति नेला रथ ॥ स्वर्गलोक

दाविला ॥७८॥ पुत्राचा पुत्र कष्टी केला ॥ ह्मणोनि तो रवि कोपला ॥ तेणें रथ तेथें दग्ध केला ॥ जैसा संपाती पक्षिराज ॥७९॥ आपुल्या पुत्राचा निधनकर्ता ॥ त्याचा पुत्र बभ्रुवाहन तत्वतां ॥ तेणें कष्टी केलें आत्मजसुता ॥ ह्मणोनि रथातें जाळिलें ॥८०॥ पडला खालीं बभ्रुवाहन ॥ लक्षोन वृषकेतें सोडिला बाण ॥ पुनः उडविला गगना ॥ सूर्यमंडळापावेतों ॥८१॥ आमुचा वीर हंसध्वज ॥ तुवां मारिला तेजःपुंज ॥ ह्मणोनि तुजला सहज ॥ हंसापाशीं पाठविलें ॥८२॥ ऐसें तयाचें वाक्य ऐकोन ॥ क्रोधावला बभ्रुवाहन ॥ निजांगाचा उपडोनि बाण ॥ वृषकेतूवरी कोसळला ॥८३॥ तयाची धरोनियां मान ॥ ओढितांचि बभ्रुवाहन ॥ येरें पंचशर दारुण ॥ हृदयामाजी ताडिले ॥८४॥ प्रद्युम्नादिकांचें बंधन ॥ तुवां केलें ह्मणोन ॥ तयाचें फळ हें घे संपूर्ण ॥ ह्मणोन शरें उडविला ॥८५॥ भूमीसीं आला बभ्रुवाहन ॥ ऐसें देखोन सोडित बाण ॥ मागुती दाखवीत गगन ॥ पार्थ कौतुक पाहातसे ॥८६॥ ऐसें युद्ध करीत वृषकेत ॥ पार्थाप्रति बोले मात ॥ कर्णाचा भूमिग्रस्त केला रथ ॥ तुवां पूर्वीं समरांगणीं ॥८७॥ मी यासी उडवितों गगना ॥ परी हा नाटोपेचि वीरराणा ॥ न सोडीच समरांगणा ॥ अति बलाढ्य वीर हा ॥८८॥ ऐसें बोलतां कर्णनंदन ॥ अकस्मात पडला बभ्रुवाहन ॥ तेणेंही बाणेंकरून ॥ वृषकेता उडविलें ॥८९॥ क्षणैक सेविती दोघे रथ ॥ क्षणैक होती दोघे विरथ ॥ क्षणें धरिती आकाशपंथ ॥ क्षणें भूमिस्थ होती पैं ॥९०॥ यापरी दोघे वीर ॥ परस्परें सोडिती शर ॥ स्वर्ग भूतळ पाताळ समग्र ॥ बाणेंकरून व्यापिलें ॥९१॥ एक असे भूमंडळीं ॥ एक असे आकाशपोकळीं ॥ ऐसी त्या युद्धाची नव्हाळी ॥ दोघे दाविती पार्थातें ॥९२॥ ऐसें दोघांचें युद्ध निर्वाण ॥ घोरंदर झालें पांच दिन ॥ विश्रांति नाहीं एक क्षण ॥ ऐसे वीर ते अनिवार ॥९३॥ मग वृषकेतूसी बोले पार्थसुत ॥ तव विक्रम देखिला अद्भुत ॥ मागें पुढें सांप्रत ॥ ऐसा वीर न देखों ॥९४॥ तरी आतां राहें सावधान ॥ मनीं आठवीं जनार्दन ॥ हा तों माझा अनिवार बाण ॥ तुजलागीं नावरे ॥९५॥ मग अर्धचंद्राकार बाण ॥ सोडिता झाला बभ्रुवाहन ॥ बाप लाघवी कर्णनंदन ॥ शर त्रिधा तो केला ॥९६॥ सवेंचि सोडिला तीव्र शर ॥ तो कंठीं बैसला सत्वर ॥ तेणें उडविलें तयाचें शिर ॥ रविमंडळापावेतों ॥९७॥ तेथोनि शिर उतरलें ॥ बभ्रुवाहनाचे उरीं बैसलें ॥ तेणें तया मूर्च्छित केलें ॥ खालीं पाडिलें धरणीवरी ॥९८॥ तेथोनियां उसळलें ॥ येवोनि पार्थचरणासी लागलें ॥ पितामहासी देखोनि लाजलें ॥ तेथोनि परतलें या हेतू ॥९९॥ मेल्यावरी शत्रूसी मारिलें ॥ ऐसें शूरत्व त्या आगळें ॥ जनासी कौतुक दाविलें ॥ मूर्च्छित पाडिलें पार्थसुता ॥१००॥ अंतकाळीं हरिचरण ॥ न पाहातां शीघ्र आलें मरण ॥ तद्भक्त पूर्ण अर्जुन ॥ ह्मणोनि चरणा लागलें ॥१॥ ऐसा वीरें वीर मारिला ॥ रणीं पार्थ उरला एकला ॥ तोही व्याकुळ झाला ॥ पुत्रदुःखेंकरूनि ॥२॥ आतां पितापुत्र दोघेजण ॥ युद्ध करितील दारुण ॥ तें पुढिले अध्यायीं निरूपण ॥ अति रसाळ परिसावें ॥३॥ जैमिनिवाक्य सुधामृत ॥ कर्णद्वारें प्राशिजे समस्त ॥ जन्ममरणाचें भय तेथ ॥ कासयाचें श्रोतयां ॥ ४ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ श्रवणें होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥१०५॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते वृषकेतुवधो नाम सप्तत्रिंशोऽध्यायः ॥३७॥ ओव्या ॥ १०५॥ ॥

# अध्याय ३८.


बभ्रुवाहनसेना.
अर्जुनाचें धड.
अर्जुनाचें सैन्य.
बभ्रुवाहन.
वृषकेताचें शिर पाहून पार्थ शोक करतो.
ब.
उलूपी चित्रांगी अर्जुनास मृत पाहून रडतात.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे जनमेजया ॥ बहुत दुःख झालें धनंजयां ॥ शिरातें करीं धरोनियां ॥ विलाप करीत अति-दुःखें ॥ १ ॥ मुगुटकुंडलें मंडित ॥ केशरतिलक सुशोभित ॥ तांबूलरंगें आरक्त ॥ अधर त्याचे विराजती ॥ २ ॥ रामकेशवादि नामोच्चार ॥ ओष्ठें करीतसे शिर ॥ तें हस्तद्वयें धनुर्धर ॥ धगेनि नेत्रीं विलोकिती ॥ ३ ॥ येरीकडे कबंध उठिलें ॥ बळें सैन्यातें मारूं लागलें ॥ दळभार तेणें युद्धलीलें ॥ बभ्रुवाहनाचा पळविला ॥ ४ ॥ देह पडला समरांगणीं ॥ देखतां धांवली श्वापदश्रेणी ॥ परी तो शस्त्रहस्तेंकरूनी ॥ स्पर्श कवणा करूं न दे ॥ ५ ॥ पार्थ ह्मणे रे पुत्रराया ॥ कां मज दिधलें सोडोनियां ॥ आतां माझें साह्य करावया ॥ कोण धांवेल यावरी ॥ ६ ॥ श्रीहरिसन्मुख मरण ॥ कां रे न झालें तुजलागोन ॥ बहुधा रुसला नारायण ॥ आह्मांवरी वाटतें ॥ ७ ॥ अरे पुत्रा काय केलेंसी ॥ कैसें मुख दाखवूं धर्मासी ॥ आणि काय सांगूं कुंतीमातेसी ॥ तुझी वाणी मज सांगें ॥ ८ ॥ येते समयीं बोलिली कुंती ॥ पार्था बाळ दिधलें तुझे हातीं ॥ तुवां रक्षावें सुभद्रापती ॥ प्राणाहुनी ययातें ॥ ९ ॥ म्यां वांचवोनि आपुला प्राण ॥ तुज समर्पिलें काळालागून ॥ ऐसा मी अधर्मी जाण ॥ ऐकोनि भीम कोपेल ॥ १० ॥ जेव्हां युद्ध करीत भीमसेन ॥ तेव्हां तूंचि साह्य तयालागून ॥ तो तुझें ऐकतां मरण ॥ सोडील प्राण तात्काळ ॥ ११ ॥ ऐकतां कुंती पावेल मरण ॥ द्रौपदी सोडील आपुला प्राण ॥ नकुळ सहदेवादि धर्मनंदन ॥ जगती काय हें ऐकतां ॥ १२ ॥ तुवां श्यामकर्ण आणिला ॥ रणीं यौवनाश्व जिंकिला ॥ अनुशाल्व धरून आणिला ॥ कृष्णादेखत पुत्रराया ॥ १३ ॥ आतां शत्रुसेनेची लाखोली ॥ भूलिंगातें समर्पिली ॥ संतुष्ट होवोनि चंद्रमौळी ॥ आपणाजवळी बाहिलासी ॥ १४ ॥ तव पित्यानें देह छेदोनी ॥ कवचकुंडलें दिधलीं शक्रालागुनी ॥ तयाचा पुत्र मी जाणोनी ॥ मज दिधलें त्वां शिरकमळ ॥ १५ ॥ मजनिमित्त पडिलासी रणीं ॥ शरीर दिधलें पक्ष्यांलागुनी ॥ तूं दाता झालासी पित्याहुनी ॥ ऐसें मज वाटलें ॥ १६ ॥ सकळ वीरांचीं शिरकमळें ॥ तीं करीं घेऊन मुक्ताफळें ॥ पितामहासी अर्घ्य समर्पिलें ॥ ऐसें वाटतें मज आतां ॥ १७ ॥ पुत्रा तव मरणेंकरून ॥ आतां दोघांसी होईल पतन ॥ स्वर्गींहून पडेल तपन ॥ मी या पडेन रणांगणीं ॥ १८ ॥ मोहें पार्थ तयासी बोले ॥ पुत्रा उघडीं आतां डोळे ॥ इंद्रादिक पाहों आले ॥ रणरंगधीर ह्मणोनि ॥ १९ ॥ तव पितयाचा रथ ॥ शापें झाला भूमिग्रस्त ॥ म्यां केला तयाचा घात ॥ काय तें दुःख आठवलें ॥ २० ॥ रणयशें तोषविला आजा ॥ शिरें सत्कार केला माझा ॥ रामकृष्णनामें उच्चार ओजा ॥ तुवां केला शिरमुखें ॥ २१ ॥ आजि मेला सुभद्रातनय ॥ आजि झाला सर्वकुळक्षय ॥ आजि सैन्याचा झाला विलय ॥ देवकीतनय अंतरतां ॥ २२ ॥ रविवांचोनि जैसें अंबर ॥ कीं दीपावांचोनि मंदिर ॥ लिंगरहित पीठ सुंदर ॥ तेवीं वंश तुजविण ॥ २३ ॥ पंडितावांचोनि सभा ॥ कीं वल्लभावांचोनि जाया स्वयंभा ॥

१ अर्जुनाला. २ पशुसमूह. ३ महादेव. ४ बोलावला गेलास. ५ इंद्राला. ६ सूर्य. ७ अभिमन्यु. ८ कृष्ण. ९ आकाश.

कीं विद्येविण वदनशोभा ॥ तेवीं वंश तुजविण ॥ २४ ॥ ह्मणे कृष्णा कोठें गेलासी ॥ काय निर्वाणं पाहासी ॥ स्मरणमात्रेंचि धांवसी ॥ आजि न येसी सर्वथा कां ॥ २५ ॥ ऐसें बोलोन अर्जुन ॥ पुत्रासी हृदयीं धरून ॥ रथावरोन पावला पतन ॥ मूर्च्छा आली आगळी ॥ २६ ॥ तें देखोन बभ्रुवाहन ॥ समीप आला धांवोन ॥ मूर्च्छा पावला श्वेतवाहन ॥ त्यातें करीत सावध ॥ २७ ॥ ह्मणे सावध व्हावें सत्वरी ॥ मी वेश्यापुत्र असें जवळी ॥ ह्मणोनियां वारा घाली ॥ पल्लवेंकरून अर्जुना ॥ २८ ॥ या रणार्णवींचे जाहजीं ॥ तूं सावकार भाससी सहजीं ॥ आणिक वीरांची पुंजी ॥ सत्वर काढीं बाहेरी ॥ २९ ॥ अवध्यांचीं शिरें तोलिलीं ॥ वीर्यधनें विकत घेतलीं ॥ कांहीं असती उरलीं ॥ तींही द्यावीं स्वशिरेंसीं ॥ ३० ॥ मी बळधनें सभाग्य थोर ॥ घेतला वीरजीवांचा मार ॥ आतां उरलें तुझें शिर ॥ सत्वर उठें याकरितां ॥ ३१ ॥ ऊठ सावध होईं सत्वर ॥ भावें पूजीं रे[1] कामहर ॥ करोनि निर्मळ अंतर ॥ पाचारावें यादवेंद्रा[3] ॥ ३२ ॥ तुज तुष्टेल उमाकांत[2] ॥ देईल अस्त्र पाशुपत ॥ तें घेऊनि युद्ध करीं त्वरित ॥ कां विलपसी क्लीबाऐसा[4] ॥ ३३ ॥ ऐकोनि ऐसें वचन ॥ सावध होऊनि उठिला अर्जुन ॥ सन्मुख देखोनि बभ्रुवाहन ॥ क्रोधेंकरूनि खवळला ॥ ३४ ॥ वेगें रथारूढ झाला ॥ गांडीवा बाण लाविला ॥ मग बोले स्वपुत्राला ॥ तें ऐकें गा जनमेजया ॥ ३५ ॥ तुवां सकळ सैन्या मारिलेंसी ॥ आतां मजपुढें कोठें जासी ॥ जे जे वीर पडिले रणासी ॥ ते तुजपासीं आणवीन ॥ ३६ ॥ वृषकेतु मारूनि वीर ॥ समोर येवोनि बोलसी तीव्र ॥ तरी रक्षावें आपलें शिर ॥ कैसा वांचसी मजपुढें ॥ ३७ ॥ साहें साहें माझे बाणप्रहार ॥ ऐसें बोलोनि उत्तर ॥ सोडिता झाला असंख्य शर ॥ जेवीं जलधर पृथ्वीवरी ॥ ३८ ॥ चित्रांगीकुमाराचा दळभार ॥ शरें केला त्याचा संहार ॥ बभ्रुवाहनाचें शरीर ॥ छिन्नभिन्न झालें शरघातें ॥ ३९ ॥ गगनीं गर्जे जेवीं घन ॥ तेवीं गर्जे श्वेतवाहन[5] ॥ विद्युल्लतेसमान ॥ गांडीव चमके ओढितां ॥ ४० ॥ अर्जुनशरेंकरून ॥ रथ हय गज पदातिगण ॥ उडोनि जाती नगरीं जाण ॥ जैसें तृण वायुसंगें ॥ ४१ ॥ फोडिला मणिपुराचा कोट ॥ पार्थबाण अचाट ॥ गृहें गोपुरेंसगट ॥ ढांसळोन बाण पाडिती ॥ ४२ ॥ पार्थबाणीं व्यापिलें गगन ॥ आणि मणिपुरीं भरले मार्गण[6] ॥ महावीर झाले पतन ॥ हाहाकार उठिला ॥ ४३ ॥ शतांचीं शतें वारण[7] मरती ॥ शतांचीं शतें शिरें उडती ॥ अगाध विद्या सुभद्रापती[5] ॥ दाविता झाला आवेशें ॥ ४४ ॥ जेवीं प्रचंड सुटतां वात ॥ तृणपर्णें गगनातें नेत ॥ तेवीं शरमुखें अगणित ॥ वीरशिरें उडविलीं ॥ ४५ ॥ बाणासी बाण होत घर्षण ॥ तेणें पडे अग्नि दारुण ॥ तेणें भस्म झाले कित्येकजण ॥ ऐसा प्रळय मांडला ॥ ४६ ॥ जेवीं वाढतां अज्ञान ॥ तेणें अंध होती सकळ जन ॥ तैसें झालें वीरांकारण ॥ पार्थबाणें वेडावले ॥ ४७ ॥ त्राहें त्राहें ह्मणती वीर ॥ पळा रे पळा झाला संहार ॥ ऐसा पार्थवीरें केला हाहाकार ॥ बभ्रुवाहन जर्जर झाला ॥ ४८ ॥



---

१ अंत. २ महादेव. ३ कृष्ण. ४ नपुंसकाप्रमाणें. ५ अर्जुन. ६ बाण. ७ हत्ती.

ह्मणे याचें नांव धनंजय ॥ सर्वदा यासी असे जय ॥ धन्य धन्य वीर हा माय ॥ यासी सत्य प्रसवली ॥ ४९ ॥ जे जे मेले पार्थाचे हातें ॥ ते ते पावले मोक्षातें ॥ यापरी मम सैन्यातें ॥ पार्थें मुक्ति दीधली ॥ ५० ॥ जेवीं भवभयें भीत जाण ॥ काशीमाजी पावतां मरण ॥ नेत्रीं देखतां उमारमण[1] ॥ मग मुक्तीतें पावती ॥ ५१ ॥ तेवीं पार्थाचिया शरजाळें ॥ लिंगदेहातें भेदिलें ॥ सकळ मरणातें पावले ॥ विकळ झालें शरीर माझें ॥ ५२ ॥ ऐसा अनेक बाणेंकरून ॥ आच्छादिला बभ्रुवाहन ॥ बाणें बाणाचें निवारण ॥ करितां नावरे तयातें ॥ ५३ ॥ पुत्रशोकें संतापला ॥ रणांगणीं प्रळय मांडिला ॥ कोट सर्वहि पाडिला ॥ गृहें गोपुरें कोसळलीं ॥५४॥ बाणें सकळ वनें छेदिलीं ॥ सरोवरींचीं जळें आटलीं ॥ उद्यानें सकळ मोडिलीं ॥ नगरजन सर्व पळती ॥ ५५ ॥ नेसलीं वस्त्रें जळती ॥ तीं रोदनोदकें[2] विझविती ॥ मुखीं महावाद्यांतें करिती ॥ बाळें धरिती पोटासीं ॥ ५६ ॥ ऐसें झालें महाक्रंदन[3] ॥ मग कोपला बभ्रुवाहन ॥ चारी सोडोनियां बाण ॥ चारी अश्व खिळियेले ॥ ५७ ॥ सारथि भेदिला एके बाणें ॥ छत्र छेदिलें एके मार्गणें ॥ दोन शतें पवनात्मजा[4]कारणें ॥ खिळोनियां त्रासित ॥ ५८ ॥ सोडोनियां शत बाण ॥ आकाशीं उडविला स्यंदन ॥ तो अंतराळीं करीत भ्रमण ॥ जेवीं तृण वायुसंगें ॥ ५९ ॥ रथ स्थिर करावयासी ॥ सामर्थ्य नसे अर्जुनासी ॥ ऐसे बाण भेदले आंगासी ॥ रक्त वाहे तेथूनि ॥ ६० ॥ अमर्याद शस्त्रें सोडिलीं पार्थें ॥ तीं तीं निवारिलीं सुतें ॥ रक्तक्षतयुक्त[5] तनूतें ॥ पाहे पार्थ आपुले ॥ ६१ ॥ मग सावध होऊनि पांडव ॥ ओढोनियां तें गांडीव ॥ पुत्रालागीं हस्तलाघव ॥ दाविता झाला किंचित ॥ ६२ ॥ एकें शरें हृदय भेदिलें ॥ चार शरें चार वारू मारिले ॥ सारथि मारून सत्वरें ॥ मुगुट तळीं पाडिला ॥ ६३ ॥ जो जो रथ घेई बभ्रुवाहन ॥ तो तो तोडीत अर्जुन ॥ बाणें आच्छादिला तपन[6] ॥ मग देवदत्त[7] वाजवी ॥ ६४ ॥ दोघेही सर्वास्त्रीं कुशळ ॥ पर्वतासारिखे रणीं अढळ ॥ मानवले सुरवर सकळ ॥ युद्ध त्यांचें पाहोनि ॥ ६५ ॥ जेवीं बाणासुराचे नगरीं ॥ शंकर आणि श्रीहरी ॥ घोर युद्धा प्रवर्तले समरीं ॥ तीचि गति येथें झाली ॥ ६६ ॥ राया तें युद्ध अभिनव ॥ आटिले वीरें वीर सर्व ॥ एकलाचि उरला पांडव ॥ दुजा कोणी असेना ॥६७॥ जेणें सोडिले हरिचरण ॥ तयासी होय पदोपदीं पतन ॥ प्रत्यक्षासी प्रमाण ॥ पार्थ तेथें पावला ॥ ६८ ॥ देवें जया दिधलें सोडून ॥ तो सहजचि होय अचेतन ॥ त्यातें वधावया जाण ॥ उशीर काय युद्धांत ॥ ६९ ॥ ऐसे दोघे द्वय दिन ॥ युद्ध करिती दारुण ॥ श्वासोच्छ्वास टाकावया क्षण ॥ न क्रमिती ते शूर ॥ ७० ॥ मग क्रोधावला बभ्रुवाहन ॥ पार्थाप्रति बोले वचन ॥ तें ऐकावें सावधान ॥ मुनि ह्मणे रायातें ॥ ७१ ॥ पार्था गुरुद्रोणापासून ॥ विद्या तुज प्राप्त जाण ॥ ती शस्त्रकळा निर्वाण ॥ मज कांहींच न दाविसी ॥ ७२ ॥ शंकरादिकांचें विद्याधन ॥ जें जें पावलासी संपूर्ण ॥ तें तें काढीं निवडोन ॥ मजसीं रण करावया ॥ ७३ ॥

---

१ महादेव. २ रडतांना डोळ्यांतून गळलेल्या पाण्यानें. ३ मोठें युद्ध. ४ मारुतीला. ५ रक्तबंबाळ व्रणांनीं युक्त अशा शरीराला. ६ सूर्य. ७ शंखविशेष.

आजि कां तेजहीन झालासी ॥ म्लानता आली कीं मुखासी ॥ शस्त्रास्त्रांतें विसरलासी ॥ भ्रांत झालासी कासया रे ॥ ७४ ॥ पतिव्रता माझी जननी ॥ तियेतें बोलिलासी निष्टुर वाणी ॥ तें पाप तुजला रणीं ॥ येवोनि आड राहिलें ॥ ७५ ॥ पूर्वीं करितां हरिस्मरण ॥ तेव्हांचि प्रगटे जगज्जीवन ॥ आतां कां न ये नारायण ॥ पापें लिप्त झालासी ॥ ७६ ॥ आतां करीं रे हरिस्मरण ॥ करीं सर्व विद्येची आठवण ॥ तोंवरी मीं युद्ध न करीं जाण ॥ गुरुचरण स्मरें वेगीं ॥ ७७ ॥ कर्णपुत्रासीं करावें समर ॥ तरी त्यानें सेविलें स्वर्गमंदिर ॥ तूंही संग्राम करूनि थोर ॥ त्याचि ठाया जा आतां ॥ ७८ ॥ ऐकतां ऐसें दुर्वचन ॥ क्रोधावला पृथानंदन ॥ जो पुत्रवाग्बाणें[1] दारुण ॥ वर्मस्थळीं विंधिला ॥ ७९ ॥ नाना शरें सुत विंधिला ॥ परी तो न सोडीच रणमंडळा ॥ शरें करूनि गगनाला ॥ तृप्ति केली मागुती ॥ ८० ॥ जें जें शस्त्र सोडी पार्थ ॥ तें तें पुत्र करी व्यर्थ ॥ गंगाशापें मोह प्राप्त ॥ अनर्थकारी प्राप्त झाला ॥ ८१ ॥ गंगाशापें पार्थ मोहला ॥ महा अस्त्रें भ्रांत झाला ॥ तंव तो बभ्रुवाहन कोपला ॥ बाण काढिला अर्धचंद्र ॥ ८२ ॥ सर्व सत्वीं तो मंत्रिला ॥ आकर्ण ओढोनि सोडिला ॥ ज्वाळा धांवती गगनाला ॥ उल्कापात[2] होय तेव्हां ॥८३॥ वायु सुटला घोरांदर[3] ॥ मेघ सवों लागले रुधिर ॥ सूर्यमंडळीं पाहिलें छिद्र ॥ पार्थवीरें तेधवां ॥ ८४ ॥ तो बाण आला समर्थ ॥ त्याचे निवारणा भ्रमला पार्थ ॥ मग कृष्णनामावळी स्मरत ॥ महावीर तो अर्जुन ॥ ८५ ॥ करी कृष्णाचें स्मरण ॥ तों कंठनाळीं बैसला बाण ॥ कंबुकंठ[4] दीप्यमान ॥ शिर उडविलें आकाशीं ॥ ८६ ॥ वैकुंठीं असेल रमावर ॥ ह्मणोनि वेगें धांवलें शिर ॥ परी तो तेथें न देखतां सत्वर ॥ फिरोनि आलें रणांगणीं ॥ ८७ ॥ इकडे पार्थकबंधें अनर्थ केला ॥ संहारिलें सकळ दळा ॥ मग येऊनि पडिला ॥ जेथें निजेला वृषकेतु ॥ ८८ ॥ मुगुट कुंडलें विराजित ॥ भाळीं कस्तूरी रेखित ॥ अधरमंदस्मित शोभत ॥ आणि उच्चारित कृष्णनामें ॥ ८९ ॥ जेथें वृषकेतूचें पडिलें शिर ॥ तेथेंचि पडिलें तेंही सत्वर ॥ तें देखोनि बोलती वीर ॥ रणीं चंद्रसूर्य काय पडिले ॥ ९० ॥ कार्तिकशुद्ध एकादशी ॥ उत्तरा नक्षत्र सौम्यवारेंसीं ॥ संध्याकाळीं पार्थासी ॥ मरण झालें सत्वर ॥ ९१ ॥ नाळविरहित शिरकमळें ॥ दिसती राकाचंद्रमंडळें[5] ॥ किंवा सूर्यांचीं युगुलें ॥ रणांगणीं उगवलीं ॥ ९२ ॥ कपिकेत[6] वृषकेत ॥ दोघे पडिले रणांत ॥ हाहाकार झाला अद्भुत ॥ स्वर्गमृत्युपाताळीं ॥ ९३ ॥ बभ्रुवाहनाचिया दळीं ॥ हर्ष झाला ते काळीं ॥ वाद्यें वाजों लागलीं सकळीं ॥ कन्या वर्षती सुमनांतें ॥ ९४ ॥ विजयी झाला बभ्रुवाहन ॥ वाखाणिती बंदिजन ॥ मनीं पावोनि समाधान ॥ परतला समुदायेंसीं ॥ ९५ ॥ छत्र ध्वज पताका शोभत ॥ नाना वाद्यें वाजत ॥ पुढें चंदनोदकाचे सडे होत ॥ नृत्यांगना नाचती ॥ ९६ ॥ ऐसा करोनि सोहळा ॥ राव नगरीं प्रवेशला ॥ जयजयकार प्रवर्तला ॥ नगरामाजी आनंदें ॥ ९७ ॥ गोरोचनें कुंकुमा-



१ बभ्रुवाहनाच्या वाणीरूप बाणांनीं. २ विजा पडणें. ३ भयंकर. ४ शंखासारखा तीन रेषांनीं चिन्हित जो कंठ (गळा) तो. ५ पौर्णिमेचें चंद्रमंडळ. ६ अर्जुन.

क्षता ॥ दधि दूर्वांकुर लाजा मुक्ता ॥ सदीपपात्रें घेवोनि वनिता ॥ ओंवाळिती नृपातें ॥ ९८ ॥ धांवोनियां कामिनी ॥ चित्रांगदेसी सांगती वाणी ॥ धन्य पुत्र प्रसवलीस जनीं ॥ ज्याणें पार्थ जिंकिला ॥ ९९ ॥ विजयी झाला तव नंदन ॥ तयासी करावें नीराजन ॥ ऐकतां ऐसें वचन ॥ मूर्च्छा येऊन पडियेली ॥ १०० ॥ झाला होता परमानंद ॥ त्यामाजी पडिला विषबिंद ॥ सर्व स्त्रिया करिती शंखनाद ॥ मुखें ताडन करिताती ॥ १ ॥ सर्व स्त्रिया रुदन करिती ॥ चित्रांगदेतें वेष्टिती ॥ करें उर शिर ताडिती ॥ आणि लोळती भूमीसीं ॥ २ ॥ चित्रांगदा पार्थयुवती ॥ निश्चेष्टित पडिली क्षितीं ॥ तीसी चंदनोदक शिंपिती ॥ वारा घालिती सुवासिक ॥ ३ ॥ स्वामिनी निश्चेष्टित पडिली ॥ ह्मणोनि दूती सांगों गेली ॥ पुत्राप्रति निवेदिली ॥ वार्ता सर्व तियेचि ॥ ४ ॥ चित्रांगी उलूपी दोघीजणी ॥ पार्थनिधन ऐकोनी ॥ मूर्च्छागत पडिल्या धरणीं ॥ चला वेगीं त्या स्थळा ॥ ५ ॥ काय दुःख झालें तयांला ॥ निवारावें जी दयाळा ॥ सावध करून मातांला ॥ उठवा करें आपुले ॥ ६ ॥ ऐसें ऐकतां वचन ॥ राव उतरला रथावरून ॥ तेणें धांव घेवोन ॥ तया स्थळा पातला ॥ ७ ॥ तंव त्या देखिल्या माता ॥ कंठसूत्रविरहिता ॥ ताटंकद्वयवर्जिता[३] ॥ नासिकें मुक्ताविरहित ॥ ८ ॥ जी नागाधीशनंदिनी[४] ॥ उलूपी नामें जननी ॥ ती श्वासोच्छ्वास टाकोनी ॥ विव्हळ भ्रतारशोकानें ॥ ९ ॥ पुत्रें दोघी उठवोनी ॥ नेत्रीं उदक लावुनी ॥ सजीव करोनि प्रसन्नवदनीं ॥ तयांलागीं बोलत ॥ ११० ॥ म्यां बाहुबळें दळ ॥ जिंकोनि मारिलें सकळ ॥ ऐसी झालिया आनंदवेळ ॥ कां जी शोक आरंभिला ॥ ११ ॥ जो हय धरिला विख्यात ॥ तयाचा रक्षक वीर पार्थ ॥ अनेक वीरांसमवेत ॥ दारुण युद्ध मज झालें ॥ १२ ॥ प्रद्युम्नादि सर्व वीर ॥ बांधोनि आणिले अपार ॥ सर्व सैन्याचा संहार ॥ केला कीं म्यां रणांगणीं ॥ १३ ॥ कर्णपुत्र वृषकेत ॥ पराक्रमी अति विख्यात ॥ तेणें मज त्रासिलें बहुत ॥ अनेक शरेंकरूनि ॥ १४ ॥ तो महावीर रणांगणीं ॥ पाडिला शिर छेदोनी ॥ ऐसा मी विजयी होउनी ॥ भेटीस आलों तुमचे ॥ १५ ॥ तैसाचि वीर पार्थ ॥ सकळ वीरांचा नाथ ॥ त्याचाहि पुरविला अंत ॥ शिरकमळ छेदिलें ॥ १६ ॥ ऐशिया माझ्या विजयकाळीं ॥ तूं पडिलीस दुःखमेळीं ॥ विजयपुत्रासी ये वेळीं ॥ अमृतदृष्टीं विलोकीं ॥ १७ ॥ कंठीं बांधीं मंगळसूत्र ॥ कर्णी घालीं ताटंकपत्रें[५] ॥ ऐसें बोलोनियां निजपुत्र ॥ मातांप्रति गौरवी ॥ १८ ॥ ऐसें ऐकोनि पुत्रवचन ॥ माता झाली क्रोधायमान ॥ ह्मणे मज न दाखवीं रे वदन ॥ पितृघातक्या दुरात्म्या ॥ १९ ॥ माझा मारिलासी प्राणेश्वर ॥ जो धर्मरायाचा सहोदर ॥ जयाचा सारथि सर्वेश्वर ॥ सर्वसंकटीं रक्षिता ॥ १२० ॥ ऐकतां ही पुत्राची वार्ता ॥ प्राण सोडील कुंतीमाता ॥ धर्मादिक बंधु तत्वतां ॥ आत्मघात करतील ॥ २१ ॥ सुभद्रा द्रुपदनंदिनी ॥ घेतील वैधव्यनदीचें पाणी ॥ अरे पापिया तव शिर धरणीं ॥ कां रे रणीं न

१ लाह्या. २ स्त्रिया. ३ तानवडें, कर्णालंकार यांनीं रहित. ४ शेषराजाची कन्या. ५ तानवडें.

पडिलें ॥ २२ ॥ धर्माश्वमेध राहिला ॥ सकळ उत्साह मोडिला ॥ सकळ सौख्याब्धि शोषिला ॥ पापिया त्वां कुंभसुतें ॥ २३ ॥ मातेच्या व्रताकारण ॥ जेणें स्वर्गमार्गीं बांधिलें सोपान ॥ ऐरावत आणिला जेणें ॥ तो पार्थ कैसा मारिला रे ॥ २४ ॥ जो ब्रह्मादिकां दुर्लभ ॥ तो श्रीहरि ज्यासी सुलभ ॥ ऐसा माझा प्राणवल्लभ ॥ कैसा रणीं मारिलासी ॥ २५ ॥ जेणें समरीं भीष्म द्रोण ॥ वधिला महावीर कर्ण ॥ ऐसा वीर अर्जुन ॥ कैसा रणीं मारिलासी ॥ २६ ॥ पोटा येऊनि वैर साधिलें ॥ माझें कंठसूत्र जाळिलें ॥ कर्णभूषण भस्म केलें ॥ पुत्ररूपें पापिया ॥ २७ ॥ खदिरांगारशृंखळा ॥ आतां घालीं माझिया गळां ॥ लोहशलाका कर्णबिळा ॥ दे रे कुपुत्रा स्वजोडी ॥ २८ ॥ पिता मारून निजबळप्रौढी ॥ घेवोनि आलासी यशाची गुढी ॥ ह्मणोनि आह्मीं तांतडी ॥ ओवाळावें तुजलागीं ॥ २९ ॥ कैसें केलें विपरीत ॥ कां रे पित्याचा केला घात ॥ वैधव्यदीक्षा निश्चित ॥ आह्मांलागीं आणिली ॥१३०॥ ह्मणोनि ती गडबडां लोळे ॥ केश सोडिले मोकळे ॥ अति आरक्त झाले डोळे ॥ शोकाग्नीनें तेधवां ॥ ३१ ॥ मग उलूपी ह्मणे वो बाई ॥ मज गोष्टी आठवली पाहीं ॥ ती ऐकावी ये समयीं ॥ चला त्वरें समरभूमीं ॥ ३२ ॥ आत्ममरणाची खूण ॥ मज स्वमुखें सांगितली असे जाण ॥ जरी दाडिंबीपंचक जळे अग्निवीण ॥ तेव्हां मरण जाणावें ॥ ३३ ॥ ह्मणोनि तुवां व्हावें स्थिर ॥ मी पाहोन येतें त्वरें ॥ मग सेवावें कीं रणाजिर ॥ जेथें पडिला प्राणपति ॥ ३४ ॥ असें ऐकतां दोघीजणी ॥ त्वरें धांवल्या क्रीडावनीं ॥ तंव दाडिंबीपंचक जळोनी ॥ धरणीवरी पडिलेंसे ॥ ३५ ॥ तें देखोनि दोघी वल्लभा ॥ धरणीं देह टाकिती उभा ॥ तो शोकाग्नि जाळीत नभा ॥ तेणें सूर्यप्रभा करपली ॥ ३६ ॥ दोघी गडबडां लोळती ॥ करें शिरातें ताडिती ॥ सखिया त्यांतें आवरिती ॥ परी पिशाचगति त्यां झाली ॥ ३७ ॥ मग पुत्रातें बोलती रे दुर्बुद्धी ॥ पार्थपदीं आह्मांही वधीं ॥ तो वाट पहात असेल त्रिशुद्धी ॥ विलंब न करीं कुपुत्रा ॥ ३८ ॥ नाना विलाप मुखें करिती ॥ पिशाचापरी धांवती ॥ धरितां धरेवरी पडती ॥ वक्षःस्थळें पिटोनियां ॥ ३९ ॥ घाबरला बभ्रुवाहन ॥ अद्भुत कष्टला कष्टेंकरून ॥ ह्मणे मज कोपला नारायण ॥ ह्मणोनि झालें विपरीत ॥१४०॥ धांवोनि वंदी मातेसी ॥ तंव त्या झिडकाविती त्यासी ॥ अरे पितृघातक्या आह्मांसी ॥ स्पर्श न करीं पापिष्ठा ॥ ४१ ॥ आमुचा कांत शिरीं असता ॥ तरी तूं पुत्र आह्मी माता ॥ आह्मां देऊन वैधव्यव्यथा ॥ पायां कासया लागसी ॥ ४२ ॥ मग जावोनि प्रेत कवळिती ॥ शिराजवळी बैसती ॥ त्या शोकातें नाहीं मिती ॥ ऐकतां रडती श्वापदें ॥४३॥ भ्रतारचरणीं ठेवूनि माथा ॥ ह्मणती उठा जी प्राणनाथा ॥ विराटगोधनें तत्वतां ॥ नेलीं असतील कौरवीं ॥ ४४ ॥ द्रुपदें अपमानिलें द्रोणा ॥ तो तुह्मां मागे गुरुदक्षिणा ॥ तो द्रुपद त्वरें धरून आणा ॥ गुरुदक्षिणा संपादा ॥ ४५ ॥ किरातवेषें गिरिजावर ॥ तुमचे पारधीचा नेतो सूकर ॥ तया जिंकोनि



१ त्वां अगस्तीनें. २ शिडी, जिना. ३ लोखंडाच्या सळया. ४ बभ्रुवाहनाची माता. ५ रणभूमीस. ६ दाळिंबीचे पांच वृक्ष. ७ रणभूमि. ८ सीमा, मर्यादा.

सत्वर ॥ आपला सूकर सोडवा ॥ ४६ ॥ द्रौपदीचें मांडिलें स्वयंवर ॥ तेथें राव मिळाले अपार ॥ यंत्र भेदोनि सत्वर ॥ राजकुमारी वरावी ॥ ४७ ॥ अग्नि आला जी तुह्मां शरण ॥ मागावया खांडववन ॥ तयावरी शरमंडप करून ॥ मेघवृष्टि निवारा जी ॥ ४८ ॥ मातेसी आहे गजगौरीव्रत ॥ ह्मणोनि पाहिजे ऐरावत ॥ स्वर्गमार्गीं बांधोनि बाणपंथ ॥ इंद्रेहस्ती तो आणावा ॥ ४९ ॥ ऐशा नानापरी शोकाकुलित ॥ तों समीप देखिला वृषकेत ॥ तयाचें शिर घेऊनि बोलत ॥ धन्य धन्य सुपुत्रा ॥ १५० ॥ तुझा पिता मारिला पार्थें ॥ तुवां सोडिलें पितृदुःखातें ॥ धर्मकाजीं दिधलें प्राणातें ॥ थोर कीर्ति संपादिली ॥५१॥ मग पुनः ह्मणती पार्थासी ॥ तूं पुत्ररागें रुसलासी ॥ तरी क्षमा करावें अपराधासी ॥ चरण केशीं झाडूं आह्मीं ॥ ५२ ॥ दोघींनीं शिर नेवोनि मुखासमीप ॥ नानापरी करिती विलाप ॥ ऐकतां खोल कर्णकूपें ॥ उचंबळती शोकजळें ॥ ५३ ॥ ह्मणती पुत्रा कां करिसी उशीर ॥ खड्ग घेवोन येईं सत्वर ॥ दोघींचीं शिरें छेदोनि सत्वर ॥ टाकीं तूं रे भार्गवापरी ॥ ५४ ॥ भार्गवें मारिली एक माता ॥ तूं वधाव्या उभयतां ॥ पूर्वीं मारिलासी पिता ॥ आतां पांच माता संहारीं ॥ ५५ ॥ कुपुत्रा उठें रे त्वरित ॥ काष्ठें आणीं रे शुष्क येथ ॥ अग्निप्रवेश निश्चित ॥ केला पाहिजे आह्मांसीं ॥ ५६ ॥ आतां येतील माझे दीर ॥ तयां काय दाऊं वक्त्र ॥ तूं तंव जन्मलासी कुलांगार ॥ कष्टकारक महापापिया ॥ ५७ ॥ थोर आशा धरिली मनीं ॥ हस्तनापुरा जावया झणीं ॥ माथा ठेवीन धर्मचरणीं ॥ नयनीं अश्वमेध पाहीन ॥ ५८ ॥ वडील भावोजी भीमसेन ॥ नकुळ सहदेवादि जाण ॥ तयांचें करूनि दर्शन ॥ करीन वंदन पायांचें ॥ ५९ ॥ सुभद्रा आणि द्रुपदनंदिनी ॥ दोघी भेटतील माझ्या भगिनी ॥ तयांतें वस्त्रालंकारभूषणीं ॥ गौरवून राहीन तयांसंगें ॥ १६० ॥ वीरपुत्राची जननी ॥ वसुदेवाची भगिनी ॥ त्या श्वश्रूचे चरण वंदोनी ॥ सेवा करीन आवडीं ॥ ६१ ॥ देवकी ती कृष्णमाता ॥ आणि रुक्मिणी आदि सर्व वनिताँ ॥ तयांचे चरणीं ठेवूनि माथा ॥ वस्त्राभरणें गौरवीन ॥ ६२ ॥ ऐसें आशावन तें जाळिलें ॥ कुपुत्रा तुवां समूळें ॥ वैधव्यदुःख दिधलें ॥ परम तूं रे पापिष्ठा ॥ ६३ ॥ आजि उत्साहसागर आटला ॥ आनंदध्वज उलंडिला ॥ कीं मनोरथद्रुम उन्मळिला ॥ कुपुत्रवार्तेंकरूनि ॥ ६४ ॥ ऐसें ऐकोनियां मातृवचन ॥ काय बोले बभ्रुवाहन ॥ मी पार्थ पिता जाणोन ॥ गेलों शरण आधीं तया ॥ ६५ ॥ मीं द्रव्यें शकट भरून ॥ गज अश्वादि घेऊन ॥ श्यामकर्ण पुढें करून ॥ वंदिले चरण तयाचे ॥ ६६ ॥ तयानें दिधली लात ॥ आणि बोलिला विपरीत ॥ तें न बोलवेचि येथ ॥ ह्मणोनि म्यां संग्राम केला ॥ ६७ ॥ मी तों पितृहंता झालों ॥ कीर्तीपासोनि मुकलों ॥ स्वर्गालागीं अंतरलों ॥ निंदिती जन मज आतां ॥ ६८ ॥ मी पितृघातकी देखोन ॥ तीर्थें करितील पलायन ॥ यज्ञ आणि तप दान ॥ मज सर्व अंतरलें ॥ ६९ ॥ जरी दग्ध करीन देहाला ॥ तरी पावक न स्पर्शे

१ बाणवृष्टि. २ ऐरावत. ३ कान ह्याच कोणी विहिरी. ४ परशुरामाप्रमाणें. ५ तोंड. ६ सासूचे ( कुंतीचे ). ७ स्त्रिया. ८ गाडे. ९ अग्नि.

मजला ॥ चक्रपाणिमित्र मारिला ॥ ह्मणूनि तोही कोपेल ॥ १७० ॥ कृष्णस्मरणें पातकें जळती ॥ परी लौकिकीं राहाती ॥ मी पापी जाणोनि रमापती[1] ॥ मज प्रत्यक्ष न भेटे ॥ ७१ ॥ शिररहित पार्थ देखेल ॥ मित्रदुःखें दुखवेल ॥ मज क्रोधदृष्टीं जाळील ॥ मग मी जाईन नरकासी ॥ ७२ ॥ अग्नि शक्ति तयाची ॥ ह्मणोनि समाप्ति न घडे या देहाची ॥ तरी आतां कोण गति आमुची ॥ घडविसील ईश्वरा ॥ ७३ ॥ जरी उदकीं सोडूं प्राण ॥ तरी तो आपोनारायण ॥ जरी शस्त्रेंकरून देह छेदीन ॥ तरी शक्ति ती तयाची ॥ ७४ ॥ मातेपासोनि अंतर पडलें ॥ जन्मतांचि मज कां नाहीं मारिलें ॥ कां पितृहत्याऱ्या वांचविलें ॥ कां न मारिला सर्पापरी ॥ ७५ ॥ मी महापापी या जनीं ॥ वैधव्ययुक्त केली जननी ॥ आणि रिपुकांतांलागुनी ॥ झालों वैधव्यदीक्षागुरु ॥ ७६ ॥ असो होणार न चुके आतां ॥ मज अग्निप्रवेश करणें तत्वतां ॥ ह्मणोनि काष्ठें आणवी त्वरिता ॥ अग्निप्रवेश आरंभिला ॥ ७७ ॥ चित्रांगदा ह्मणे पितृघ्ना ॥ क्षण मार्ग पाहें मरणा ॥ उपायें प्राण नये अर्जुना ॥ तरी मग अग्नि सेवावा ॥ ७८ ॥ तंव उलूपी ह्मणे लवलाहें ॥ पार्थ जीववावया उपाय पाहें ॥ संजीवकमणि आहे ॥ पाताळभुवनीं पितृगृहीं ॥ ७९ ॥ मृतामृत नागकुळातें ॥ निजबळें वांचवी सकळांतें ॥ वासुकी[2] रक्षितसे तयातें ॥ तो आणिलिया कार्यसिद्धि ॥ १८० ॥ तो मणि शेषलोकीं असे ॥ तयातें सर्प रक्षिती प्राणाऐसें ॥ ज्यांचे फूत्कारासरिसे ॥ जळोनि पर्वत भस्म होती ॥ ८१ ॥ कर्कोटक पुलह तक्षक ॥ वासुकी दीर्घजीवी अनेक ॥ भयकारक धृतराष्ट्रादिक ॥ ऐसे सर्प दुर्धर ॥ ८२ ॥ शतफणिया जयांसी ॥ चतुःपंच फणा तयांसी ॥ सप्तशत असती कोणासी ॥ वसु[3] कोणासी नव शतें ॥ ८३ ॥ महाभयंकर ते फणी[4] ॥ मस्तकीं ज्यांचे दिव्यमणी ॥ जयांचे अवलोकनें प्राणी ॥ प्राण आपुले त्यागिती ॥ ८४ ॥ जरी हा पुंडरीक जाईल पाताळीं ॥ तरी तो मणि आणील तात्काळीं ॥ मग बभ्रुवाहन ते वेळीं ॥ काय बोलता जाहला ॥ ८५ ॥ परम समाधान पावोन ॥ बोलतसे पार्थनंदन ॥ ह्मणे पुंडरीका ऐक वचन ॥ तुवां जावें पाताळा ॥ ८६ ॥ तूं उलूपीमातेचा सेवक ॥ शेष वासुकीसी बोलें एक ॥ बभ्रुवाहनें नमन देख ॥ तुह्मांलागीं सांगीतलें ॥ ८७ ॥ पार्थवृषकेतूकारणें ॥ प्राप्त झालें युद्धीं मरणें ॥ ह्मणोनि आह्मां मणि देणें ॥ सजीव करावया तव जामातातें ॥ ८८ ॥ तंव पुंडरीक बोले तयाप्रति ॥ मी पाताळा जातों शीघ्रगतीं ॥ परी या दोघांचीं शिरें निश्चिती ॥ बरव्यापरी रक्षावीं ॥ ८९ ॥ पार्थ वृषकेतूचें शिर ॥ दंशूनियां फणिवर ॥ घेऊनि आज्ञा सत्वर ॥ जाता झाला पाताळीं ॥ १९० ॥ मग पुंडरीकें ते वेळीं ॥ पाताळभुवन केलें जवळी ॥ वासुकीतें वंदोन सकळी ॥ वर्तमान निवेदित ॥ ९१ ॥ तुझा दौहित्र बभ्रुवाहन ॥ तेणें पिता मारिला अर्जुन ॥ तयातें करावया संजीवन ॥ मणि सत्वर मागितला ॥ ९२ ॥ वासुकी बोले वचन ॥ मणि नेईं सुखेंकरून ॥ तंव कर्कोटक येऊन ॥ विघ्न करिता जाहला ॥ ९३ ॥

१ विष्णु ( कृष्ण ). २ नामविशेष सर्प ( सर्पांचा राजा ). ३ आठ ( शतें ). ४ सर्प.

कर्कोटक तयातें बोलत ॥ हा काय करिशी आत्मघात ॥ मानव लुब्ध अत्यंत ॥ मणि मग सर्वथा न देतील ॥ ९४ ॥ कैंचा पार्थ कैंची दुहिता ॥ कासया व्यर्थ ही ममता ॥ ऐसें तयासी वर्जितां ॥ परी मणि दिधला वासुकीनें ॥ ९५ ॥ पुंडरीक घेऊन आला मणी ॥ हर्ष झाला सकळांलागुनी ॥ प्रथम कर्णात्मजा उठवुनी ॥ मग अर्जुन उठविला ॥ ९६ ॥ पार्थ वृषकेतु उठले ॥ ते बभ्रुवाहनें वंदिले ॥ पार्थें तया आलिंगिलें ॥ परम प्रीतींकरूनि ॥ ९७ ॥ चित्रांगदा उलूपी दोघीजणी ॥ कनकदीप पात्रीं घेउनी ॥ दधिदूर्वाक्षतेंकरुनी ॥ ओंवाळिती पतिचरणां ॥ ९८ ॥ प्रद्युम्नादिसकळ वीर ॥ सजीव केले समग्र ॥ सैन्य उठविलें सत्वर ॥ वाद्यगजर लागला ॥ ९९ ॥ सर्वांस आनंद झाला ॥ अर्जुन नगरामाजी नेला ॥ पांच दिवस राहिला ॥ उत्साह केला अद्भुत ॥ २०० ॥ प्रद्युम्नादिकांचीं सर्व दळें ॥ पार्थें अळंकारसोज्ज्वळें ॥ वस्त्राभरणीं गौरविलें ॥ तैसेंच पत्नीपुत्रांतें ॥ १ ॥ ऐसा उत्साह करून ॥ पुढें सोडिला श्यामकर्ण ॥ सवें घेऊनि बभ्रुवाहन ॥ पार्थ वेगें चालिला ॥ २ ॥ पार्थ मनामाजी बोलिला ॥ जरी अभिमन्यु असता पुत्र वांचला ॥ तरी दोघेच पुत्र अश्वाला ॥ रक्षिते कीं पराक्रमें ॥ ३ ॥ ऐशी संक्षेपकथा श्रवण ॥ करितां रायासी नव्हे समाधान ॥ तरी पुढिले प्रसंगीं प्रश्न ॥ होईल तोंचि परिसावा ॥ ४ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ तें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ २०५ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके अर्जुनवधसजीवकरणबभ्रुवाहनसंगमवर्णनं नाम अष्टत्रिंशोध्यायः ॥ ३८ ॥ ॥ अध्याय ॥ ३८ ॥ ॥ ओव्या ॥ २०५ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ॥ जनमेजय ह्मणे जैमिनी ॥ संक्षिप्त कथा ऐकिली श्रवणीं ॥ तेणें संदेह राहिला मनीं ॥ तो कृपा करूनि निरसावा ॥ १ ॥ परम संकोप[1] ते फणी ॥ तिहीं उगाच कैसा दिधला मणी ॥ कैसा उठविला गांडीवपाणी[2] ॥ तें मज सविस्तर सांगावें ॥ २ ॥ ऐकोनि जैमिनि बोलत ॥ धन्य अपेक्षित तव चित्त ॥ जें सांगीतलें संक्षिप्त ॥ तेंचि सविस्तर ऐकावें ॥ ३ ॥ श्रोता झालिया दुश्चित्त ॥ व्यग्र होय वक्तयाचें चित्त ॥ निघत असतां कथामृत ॥ कुंठित होतें अवधारा ॥ ४ ॥ गृहा पातलिया ग्राहिक ॥ तयाची पाहोनियां भूक ॥ तैसेंचि तया अंशुक[3] ॥ काढोनि दावी व्यवहारी ॥ ५ ॥ जितुका सोमवतीचा वेग ॥ तितुकी भागीरथी सवेग ॥ हें प्रत्यक्ष असे चांग ॥ लोणारक्षेत्रीं अद्यापी ॥ ६ ॥ जरी स्नेहें[4] दीपपूर्ण असे ॥ तरी दुरील पदार्थ दिसे ॥ निःस्नेहलें मंदत्व दिसे ॥ ही तों प्रचीत[5] सर्वांसी ॥ ७ ॥ नातरी कंठामाजी निघे उत्थापनी ॥ जितका वायु तितकाच ध्वनी ॥ मंद वायु होतां त्यालागोनी ॥ शब्द सहजचि मंदावला ॥ ८ ॥ मुरली वाजती गोड ॥ परी वाजवितांचि पुरवी कोड ॥ न वाजवितां निश्चल जड ॥ अचेतन काष्ठ तें ॥ ९ ॥ आतां असोत सर्व दृष्टांत ॥ कथा पडते अखंडित ॥ जैसें श्रोतियांचें चित्त ॥ तैसाचि वक्ता अनुवादे ॥ १० ॥ बभ्रुवाहनें केला नेम ॥ देह जाळून करावा भस्म ॥ पुढें काय वर्तलें परम ॥ नवल राया ऐकावें ॥ ११ ॥ देह जाळोन कां घ्यावें ॥ पार्थजीवना[6] उपाय करावे ॥ ते केलिया जरी साध्य नोहे ॥ तरी मग देह जाळावा ॥ १२ ॥ जरी उपाय ह्मणसी कोण ॥ तरी मी सांगतें ऐक सावधान ॥ तो द्विविध असे जाण ॥ असाध्य साध्य प्रकार ॥ १३ ॥ असाध्य जाणोनियां रोग ॥ वरी करिती औषधाचा योग ॥ परी ज्यावरी असे यमाचा राग ॥ तोचि असाध्य जाणावा ॥ १४ ॥ नातरी रत्न पडिलें समुद्रोदरीं ॥ तें यत्नें न काढी बाहेरी ॥ ह्मणे शुष्क झालिया घेईन करीं ॥ कासया यत्न खर्चावा ॥ १५ ॥ पदार्थ गृहामाजी असे ॥ परी तो अंधकारें न दिसे ॥ तो दीप लावलिया सांपडे अनायासें ॥ हाचि यत्न सुसाध्य ॥ १६ ॥ आत्मरत्न असे चांगलें ॥ अविद्याअंधकारें हरपलें ॥ तें गुरुवचनदीपें हातासी आलें ॥ हाचि यत्न सुसाध्य ॥ १७ ॥ आधींच साध्यासाध्य जाणोनी ॥ मग यत्न करावा त्यालागुनी ॥ तेवीं पार्थसंजीवनीं ॥ साध्य सत्य मज वाटे ॥ १८ ॥ मग प्रगट बोले शेषनंदिनी ॥ संजीवकमणि आहे पाताळभुवनीं ॥ तो आणिल्या गांडीवपाणी ॥ सजीव होईल सुपुत्रा ॥ १९ ॥ मरण आलिया नागकुळातें ॥ त्या मण्यानें वांचविती सर्वांतें ॥ परी वासुकी रक्षित तयातें ॥ तो प्राप्त झालिया कार्यसिद्धि ॥ २० ॥ तो मणि शेषलोकीं असे ॥ त्यातें सर्व राखिती प्राणाऐसें ॥ ज्यांचिये धुधुःकारांसरिसें ॥ ब्रह्मांड सगळें जळेल ॥ २१ ॥ तरी तो प्राप्त व्हावया सांकडें ॥ तुज ते युद्धीं करितील वेडे ॥ विवेकें कार्याचे निवाडे ॥ करावे कीं पुत्रराया ॥ २२ ॥ सर्वांमाजी शेष असे प्रबळ ॥ जयाचे मस्तकीं असे भूमंडळ ॥ जेवीं चंपकतरूचें[8] फूल[9] ॥ नातरी दळ

१ क्रोधी. २ अर्जुन. ३ कापड, वस्त्र. ४ तेल. ५ अनुभव. ६ अर्जुनाला उठविण्याकरितां. ७ अर्जुन. ८ चांफ्याच्या वृक्षाचें. ९ पत्र पान.

तुळसीचें ॥ २३ ॥ ऐकूनि बभ्रुवाहन बोले वार्ता ॥ जेणें पार्थाऐसा मारिला पिता ॥ तयासी शेषभयाची कथा ॥ काय असे जननीये ॥ २४ ॥ काय मजपुढें विषधर ॥ क्षणें करीन संहार ॥ माझा पराक्रम सत्वर ॥ पाहें आतां जननीये ॥ २५ ॥ जेथें स्वयें सहस्रवदन ॥ जेथें पहुडे नारायण ॥ त्याचा तो मणि ह्मणोन ॥ असाध्य कार्य मज वाटे ॥ २६ ॥ जरी कृपा करील नागनाथ ॥ ओळखील मातें आणि जामात ॥ तरी तो देईल यथार्थ ॥ मणि क्षण नलगतां ॥ २७ ॥ स्नेह सोडूनि पाहेल स्वार्थ ॥ कैंची सुता कैंचा जामात ॥ तरी मणि सर्वथा नेदी निश्चित ॥ निर्धारेंसीं जाणिजे ॥ २८ ॥ जोंवरी आली नाहीं पार्थजननी ॥ भीमसेन आणि चक्रपाणी ॥ त्या आधीं कार्य साधोनी ॥ वैधव्य पुत्रा छेदीं आमुचें ॥ २९ ॥ गरुडभयें भियाले फणी ॥ शंकरासी प्रार्थना करोनी ॥ मागीतला तो संजीवकमणी ॥ स्पर्शितां करी सजीव तो ॥ ३० ॥ मग बोले बभ्रुवाहन ॥ मी जातों पाताळा निघोन ॥ सर्वेही सर्प जिंकोन ॥ मणि आणितों निर्धारें ॥ ३१ ॥ जो समुद्र तरणार निश्चित ॥ तयासी नदीचें काय दुश्चित ॥ जो बळेंच उचली पर्वत ॥ तो काय शिळेसी शंकेल ॥ ३२ ॥ मनासी कांहीं दूर नसे ॥ ईश्वरासी कांहीं दुर्लभ नसे ॥ रवीसी काय तें न दिसे ॥ तेवीं मज हें सुसाध्य ॥ ३३ ॥ जेणें शरें सेतु बांधिला ॥ ऐरावत भूमीसी आणिला ॥ इंद्र जेणें संतोषविला ॥ तो म्यां मारिला धनुर्धर ॥ ३४ ॥ जेणें उमावल्लभ[3] जिंकिला ॥ भीष्म द्रोण हारीस आणिला ॥ देव ज्याचा सारथि झाला ॥ तो म्यां मारिला धनुर्धर ॥ ३५ ॥ तेथें कायसे फणिवर ॥ क्षणमात्रें करीन संहार ॥ सकळ सर्पांचा संभारें ॥ वैश्वानरें जाळीन ॥ ३६ ॥ सर्व मारून सर्पकुळें ॥ संजीवकमणि आणीन बळें ॥ सकळ जीववीन मणिमेळें ॥ जे पाडिले रणांगणीं ॥ ३७ ॥ अवघे मर्दोनि फणी ॥ बळेंचि घेईन मस्तकमणी ॥ तरीच पुत्र तुझा जननी ॥ नातरी जाण कृमिरूप ॥ ३८ ॥ सव्यसाचीऐसा पिता ॥ मारिला क्षण न लागतां ॥ तयासी सर्पभयाची कथा ॥ व्यर्थ कासया बोलसी ॥ ३९ ॥ ऐसें ऐकोनि वचन ॥ माता ह्मणे व्यर्थ बोलून ॥ ह्मणसी मी शेषातें जिंकीन ॥ ही व्यर्थ वल्गना करितोसी ॥ ४० ॥ जेणें धरिला भूगोळ[6] ॥ ज्यावरी हें चराचर सकळ ॥ तेथें जावोनि तूं बाळ ॥ कैसा वांचसी सांग पां ॥ ४१ ॥ अति बलाढ्य ते विषधर ॥ तुझा करितील संहार ॥ करूनियां धुधुःकार ॥ ब्रह्मांड सकळ जाळितील ॥ ४२ ॥ तेथें मशक तूं बापुडें ॥ तुज काय लागलें वेडें ॥ भलतेंच जल्पसी तोंडें ॥ कांहीं विवेकें न बोलसी ॥ ४३ ॥ मग बोले बभ्रुवाहन ॥ हें कार्य मजला सुसाध्य जाण ॥ तुवां शेषभयाचें कथन ॥ मजलागीं न सांगावें ॥ ४४ ॥ तीं काय किरडें विषधर ॥ क्षणमात्रें करीन संहार ॥ लटिका सांगोनि बडिवार ॥ कासया भय दाविसी ॥ ४५ ॥ जरी त्याचे साह्यालागोनी ॥ वज्रासह इंद्र आला धांवोनी ॥ जरी भूतगणेंसीं पिनाकपाणी ॥ आलिया सर्व मारीन ॥ ४६ ॥ मग बोले माता वचन ॥ बळाचें काम नव्हे जाण ॥ युक्तीनें आणावा हें शाहाणपण ॥

१ सर्पांचा राजा. २ श्रीकृष्ण. ३ शंकर. ४ समूह. ५ अग्नीनें. ६ पृथ्वी. ७ शंकर.

वृथा अनर्थ कां करिसी ॥ ४७ ॥ बळवंतासीं स्पर्धा करितां ॥ विश्वास वनितेचा[1] धरितां ॥ अनुचित कर्म आचरतां ॥ मरणास मूळ होतसे ॥४८॥ जें बुद्धिबळें होय कार्य॥ तें करावया समर्थ नोहे वीर्य[2] ॥ ऐसें जाणोनियां आर्य[3] ॥ विवेकें साधिती निजकार्या ॥४९॥ देहासी मारितां पाषाण ॥ तो अंतरीं न शिरे आपण ॥ अतिसूक्ष्ममुखी बाण ॥ तो हृदय भेदोनि जातसे ॥ ५० ॥ माझा सखा पुंडरीक ॥ तो बरवा जाणतो विवेक ॥ तो जावोनि माझा जनक ॥ बरव्यापरी बोधील ॥ ५१ ॥ ज्या प्रकारें मणि हस्तगत ॥ होईल तैसी बोलेल मात ॥ ह्मणोनि विवेकें युक्तिवंत ॥ होवोनि साधिती निजकार्या ॥ ५२ ॥ ऐसें बोलोन पुत्र वारिला ॥ मग पुंडरीक पाचारिला ॥ त्याप्रति वृत्तांत निवेदिला ॥ मणि साध्य जेणें होय ॥ ५३ ॥ ह्मणे सुमित्रा पुंडरीका ॥ तूं बरव्या जाणसी विवेका ॥ तुवां जावोनि नागलोका ॥ माझिया जनका भेटावें ॥ ५४ ॥ तयाची पाहोनि हर्षवेळा ॥ कोणी खळ नसेल जवळा ॥ परोपकारी असिजेल आगळा ॥ तेव्हां त्वां गोष्टी वदावी ॥ ५५ ॥ दिवसधूसैरी[4] निशीचा धनी ॥ गलितयौवना कामिनी ॥ सरोवररहित कमलश्रेणी ॥ सुंदर पुरुष निरक्षरी ॥ ५६ ॥ समर्थ धनपरायण ॥ दुष्टसंगती लागला सज्जन ॥ खळां सर्व सेवी नृप आपण ॥ हीं सप्त शल्यें जाणावीं ॥ ५७ ॥ खळजनाचा धरणें विश्वास ॥ तेणें होय दुजयाचा नाश ॥ हें तों नावडे सज्जनास ॥ तो परोपकारीच सर्वदा ॥ ५८ ॥ पाहातां रोहिणीचा धव ॥ राहुग्रस्त एक पार्श्व ॥ एकाच पार्श्वें जग सर्व ॥ पीयूषेंकरूनि[5] निववीत ॥ ५९॥ तावितां दिव्य होय सुवर्ण ॥ घांसितां सुगंध चंदन ॥ गाळितां सुरस ईक्षु[6] पूर्ण ॥ तेवीं सज्जन परोपकारी ॥ ६० ॥ ह्मणोनि सभेसी नसतां खळ ॥ असतां सज्जन केवळ ॥ तेव्हांचि तो नागपाळ[7]॥ बरव्यापरी बोधावा ॥६१॥ ताटंकयुगुळ कंठसूत्र ॥ पितयापुढें ठेवीं पवित्र॥ तया नंदिनीपुत्राचें चरित्र ॥ आद्यंत विस्तारें सांगावें ॥ ६२ ॥ कृपा उपजेल तयाचे मनीं ॥ जनक बोधीं ऐशा वचनीं ॥ हरप्रयत्नेंकरूनी ॥ मणि साधीं सुजाणा ॥६३॥ आमुच्या वैधव्यदुःखसागरा ॥ तुवां घटोद्भव व्हावें मित्रा ॥ नातरी वैधव्यर्दुःखभूधरा[8] ॥ कुलिश[9] होईं इंद्राचें ॥ ६४ ॥ बरवें धैर्य मनीं धरून ॥ हें कार्य साधीं तूं पूर्ण ॥ मार्गीं तुज होवो कल्याण॥ ऐसिया वचनीं गौरविला ॥६५॥ ऐसें उल्पीचें वचन ॥ ऐकोन पुंडरीक ह्मणे आपण ॥ तव वचनें करितों गमन ॥ परी मम वचन अवधारीं ॥ ६६ ॥ नाना परिमळकुसुमवचनें ॥ पूजीन नागराजपदपद्में ॥ ऐसें बोधीन युक्तीनें ॥ दयाळुपणें होय उद्युक्त ॥ ६७ ॥ सावध होऊनि निरंतर ॥ तुह्मीं रक्षावा धनुर्धर ॥ कां चिरकाळ नरशिर ॥ सर्वथा स्थिर न राहे ॥ ६८ ॥ जो मरण पावला प्राणी ॥ त्याचें शरीर पडे धरणीं ॥ तें भूतप्रेतगणीं ॥ भक्षितां बहु अनर्थ ॥ ६९ ॥ मी तों करीन प्रयत्न ॥ परी ते द्विजिव्ह संपूर्ण ॥ तयांचा अधिपति तो मंद जाण ॥ ऐसा जनापवाद ऐकिला ॥ ७० ॥ सर्प न धरावा आप्त ॥ हाचि असे मुख्यार्थ ॥ जयांचे विषें पर्वत ॥ दग्ध होती क्षणमात्रें ॥७१॥

---

१ स्त्रीचा. २ शौर्य. ३ श्रेष्ठ लोक. ४ दिवसाच्या प्रकाशामुळें निस्तेज दिसणारा. ५ अमृतानें. ६ ऊंस. ७ शेष. ८ वैधव्यरूप पर्वताला. ९ वज्र.

तरी मी आतां ऐसें करीन ॥ पार्थशिरातें दंशीन ॥ त्या विषयोगेंकरूनि विघ्न ॥ न बाधीच तयातें ॥ ७२ ॥ मग बोले बभ्रुवाहन ॥ आधीं वृषकेतूसी करीं दंशन ॥ येणें मजसीं युद्ध केलें दारुण ॥ परम कष्टें मारिला ॥ ७३ ॥ हा तों पार्थाचा पूर्ण प्राण ॥ पार्थ झालिया संजीवन ॥ जरी यासी देखेल तो मरण ॥ पुनः प्राण त्यजील ॥ ७४ ॥ ह्मणोनि वृषकेतूसी दंशून ॥ मग पार्थासी करावें दंशन ॥ जोंवरी होय तुझें पुनरागमन ॥ तोंवरी रक्षीन दोघांतें ॥ ७५ ॥ मग पुंडरीकें जाऊन ॥ उभयतां केलें दंशन ॥ मग सत्वर केलें गमन ॥ शेषलोकीं तयानें ॥ ७६ ॥ सत्वर देखिलें अतळ ॥ जें मणिरत्नांचें सोज्वळ ॥ तेथें सर्पांचें मंडळ ॥ नाना तरूंचीं उद्यानें[1] ॥ ७७ ॥ अतळ वितळ सुतळ ॥ तळातळ रसातळ ॥ पुंडरीकें पाहिलीं सकळ ॥ मग पाताळीं तो गेला ॥ ७८ ॥ जेथें हाटकेश्वर दैवत ॥ देवालय परमाद्भुत ॥ भोगावती विख्यात ॥ देखतां पातकें दग्ध होती ॥ ७९ ॥ तेथें करून स्नानदान ॥ हाटकेश्वराचें केलें पूजन ॥ चंपकादि शोभायमान ॥ नाना पुष्पें शोभती ॥ ८० ॥ जेथें नागांगना[2] मनोहर ॥ रूपें लाजविती रतिवर[3] ॥ सर्व लावण्यें सुंदर ॥ रूपें त्रैलोक्य भुलविती ॥ ८१ ॥ तेथींचें वैभव अभिनव ॥ ज्यातें इच्छीत वासव[4] ॥ जें ऐकतां सुखावे जीव ॥ म्यां देखिल्या सुखा न वदवे ॥ ८२ ॥ करितां पद्मगंध[5] ग्रहण ॥ सर्व पापाचें होय दहन ॥ दिव्य वृक्ष शोभायमान ॥ अमृतकुंडें मंडित ॥ ८३ ॥ भावें हाटकेश्वरा वंदून ॥ पुंडरीक करीतसे गमन ॥ तों नयनीं देखिलें वन ॥ जें नंदनवना लाजवी ॥ ८४ ॥ जेथें नव कुंडें अमृताचीं ॥ त्यांतें रक्षिती सर्पसैन्यें साचीं ॥ जेथें प्रवेशेना वायु इतरांची ॥ गति कोठें त्या स्थळीं ॥ ८५ ॥ जरी पाताळ वर्णूं सविस्तर ॥ तरी रणीं पडिलासे धनुर्धर ॥ यालागीं वाणीस न करीं प्रसर ॥ उठवावया सत्वर पार्थातें ॥ ८६ ॥ लग्नघटिका आलिया समीप ॥ न ह्मणती मंगळाष्टकें अमूप ॥ वस्त्रें द्यावया सिद्ध भूप ॥ तेथें मुहूर्त न पाहावा ॥ ८७ ॥ पर्वकाळ उरला स्वल्प ॥ कासया आरंभावा संकल्प ॥ तो अन्याय घडे ह्मणोनि वाग्जल्प ॥ म्यांही जाण आवरिला ॥ ८८ ॥ तों देखिलें शेषमंदिर ॥ जें वैकुंठापरीस सुंदर ॥ नाना सर्पांचे दळभार[6] ॥ उभे असती त्या स्थळीं ॥ ८९ ॥ शेषसभा नेत्रीं देखिली ॥ त्यापुढें सुरधामें[7] उद्वस[8] वाटलीं ॥ जीं न जाती वर्णिलीं ॥ तेथें बैसला शेषराजा ॥ ९० ॥ दिव्यासनीं शेष बैसला ॥ वासुकी तक्षकादिकीं वेष्टिला ॥ वासुदेवादि नाममाळा ॥ मुखें स्मरण करिताती ॥ ९१ ॥ कायावाचामनेंकरून ॥ करिती कृष्णाचें चिंतन ॥ ऐसा समय देखोन ॥ केलें नमन पुंडरीकें ॥ ९२ ॥ ताटंकें[9] आणि कंठसूत्र ॥ त्यापुढें ठेविलीं त्वरित ॥ मग मुखेंकरूनि बोलत ॥ अति नम्र वाक्यातें ॥ ९३ ॥ पुंडरीक बोले वंदोनि चरण ॥ मी तुह्मांसीं आलों शरण ॥ उलूपीनें पाठविलें जाण ॥ आत्महितालागोनि ॥ ९४ ॥ देखोनि तयेचे भूषणा ॥ ह्मणे मृत्यु पावला श्वेतवाहन[10] ॥ हृदयामाजी सर्पराणा ॥ विचार करोनि बोलत ॥ ९५ ॥ हें तों कन्येचें भूषण ॥ काय झालें जामातालागून ॥

१ बागा. २ नागस्त्रिया. ३ मदनाला. ४ इंद्र. ५ कमळाचा सुगंध. ६ सैन्यसमूह. ७ देवांचीं मंदिरें. ८ ओसाड. ९ कर्णभूषणें. १० अर्जुन.

जो सव्यसाची वीर दारुण ॥ सारथि ज्याचा श्रीहरी ॥ ९६ ॥ संग्रामीं तोषविला हर ॥ आरोग्य केला वैश्वानर ॥ तो किरीटी महावीर ॥ जो अजय सुरनरांतें ॥ ९७ ॥ त्या प्राप्त मरण कैसें ॥ अन्यथा दिसतसे कीं सांचें ॥ जो कार्यकर्ता त्रिभुवनाचें ॥ कृष्णभक्त धनुर्धर ॥ ९८ ॥ पतन होईल नभमंडळ ॥ चंचळ होईल कनकाचळ ॥ शैत्यें पीडेल अनळ ॥ परी पार्था मरण नसे ॥ ९९ ॥ सर्वावरिष्ठ जो पार्थ ॥ त्याचा कवणें केला निःपात ॥ तेणें सोडिला काय कृष्णनाथ ॥ जो संकटें निवारिता ॥१००॥ पतन पावला पार्थ ॥ हा मोठा झाला अनर्थ ॥ आतां त्यास रक्षावया समर्थ ॥ कृष्णावांचोनि कोण असे ॥ १ ॥ ऐसें वदतां सर्पनायक[1] ॥ मग विनवी पुंडरीक ॥ असत्य वचनें नरक ॥ पावों आह्मी राजया ॥ २ ॥ समरीं पडिला कीं फाल्गुन ॥ ह्मणोनि यावयाचें कारण ॥ शेष ह्मणे काय कारण ॥ रणीं पार्थ कैसा पडिला ॥ ३ ॥ विस्मय झाला मजकारण ॥ पार्थ पराक्रमी तो दारुण ॥ जेणें समरीं संपूर्ण ॥ वीर जिंकिले धरणीचे ॥ ४ ॥ भीष्मद्रोणादिक वीर ॥ त्यांचा केला संहार ॥ गोत्रवधपातकें युधिष्ठिर ॥ परम पातकी जाहला ॥ ५ ॥ त्याकारणेंकरून ॥ कोणें मारिला काय अर्जुन ॥ मग पुंडरीक बोले वचन ॥ ऐक सावधान नागेशा ॥ ६ ॥ त्या पापाचें व्हावया क्षाळन ॥ कृष्णआज्ञेंकरून ॥ पार्थें हयमेध आरंभिला जाण ॥ तो सकळ पृथ्वी जिंकीत आला मणिपुरा ॥ ७ ॥ तेथें पार्थात्मज बभ्रुवाहन ॥ तेणें अश्व धरिला जाण ॥ मग निजपिता जाणोन ॥ शरण गेला तो त्यासी ॥ ८ ॥ तों सक्रोध झाला श्वेतवाहन ॥ क्षात्रधर्म सांडिला ह्मणोन ॥ तयासी केलें पदें ताडन ॥ मग संग्रामासी प्रवर्तला ॥ ९ ॥ गंगाशापें मोहिला पार्थ ॥ ह्मणोनि पुत्रें केला निःपात ॥ सकळ सैन्यासमवेत ॥ रणांगणीं पाडिला ॥ ११० ॥ शिराविरहित जामात ॥ तयाच्या जीवनालागीं सत्य ॥ मज पाठविलें निश्चित ॥ संजीवकमणि आणावया ॥ ११ ॥ तव कन्येसी वैधव्य प्राप्त ॥ तेंचि हरावें त्वां त्वरित ॥ तुजसारिखा असतां तात ॥ मग दुःख कां असावें कन्येतें ॥१२॥ धर्मानुज कृष्णभक्त ॥ यज्ञअश्वातें रक्षित॥ऐसा विशेष तो जामात ॥ उठवावा[7] समरींचा ॥ १३ ॥ संजीवकमणि द्यावा ॥ वैधव्यरोग कन्येचा हरावा ॥ आणि जामात वांचवावा ॥ यश घ्यावें मजलागीं ॥ १४ ॥ भल्याचे घरींचें वैभव ॥ तें परोपकारीं वेंची सर्व ॥ खळासी आलिया भाग्य वैभव ॥ करी पीडा सर्वत्रां ॥ १५ ॥ निंबीं निंबोळ्या भरल्या ॥ तरी त्या कावळ्यासी प्राप्त झाल्या ॥ तेवीं दुर्जनसंग्रहीं वस्तु भल्या ॥ प्राप्त नव्हती सर्वज्ञा ॥ १६ ॥ चंद्र चंदन मलयानिल ॥ स्वगुणें सकळां करिती शीतळ ॥ सज्जनहृदय तें सोज्वळ ॥ उपकार करी सर्वांसी ॥ १७ ॥ तूं सर्वज्ञ भुजंगेश ॥ सकळ वैभवांचा ईश ॥ ब्रह्मांडनायक हृषीकेश ॥ तयाची शय्या तूं स्वांगें ॥ १८ ॥ मी अज्ञान तव कन्येचा दूत ॥ सर्वज्ञासी काय बोलों बहुत ॥ जामात वांचवोनि यथार्थ ॥ यश घेईं स्वामिया ॥ १९ ॥ ऐकोनि पुंडरीकवचन ॥ शेष पावला समाधान ॥ ह्मणे पार्थ काय पावावा मरण ॥ हें

१ शंकर. २ अग्नि. ३ शेष. ४ अर्जुन. ५ पृथ्वीवरील. ६ युद्धाला. ७ उठविण्याकरितां.

विचित्र जाहलें ॥ १२० ॥ जेणें त्रिपुरारि[1] तोषविला ॥ इंद्र शरणागत जेणें केला ॥ तो अर्जुन पुत्रें मारिला ॥ काय लाघव काळाचें ॥ २१ ॥ काळ सुरां[2] असुरां[3] छळी ॥ काळ सकळांची मुंडी पिळी ॥ काळ दुष्टांची करी होळी ॥ सर्वांत बळी हा काळ ॥ २२ ॥ कृष्णभजनीं जो सादर ॥ धर्मकार्यीं जो तत्पर ॥ जो स्वयें बळसागर ॥ तो पार्थ पुत्रहस्तें निमाला ॥ २३ ॥ कन्यावैधव्य हरावया ॥ पार्थ जामात उठवावया ॥ अपार यश संपादावया ॥ देईन मणि तयातें ॥ २४ ॥ गेलें पार्थाऐसें निधान ॥ त्या मण्याचें मग काय कारण ॥ तरी शीघ्र जा घेऊन ॥ संजीवकमणि पुंडरीका ॥ २५ ॥ दोन वस्तु मजपासीं ॥ त्या न देतां परोपकारासी ॥ अमृत अथवा मण्यासी ॥ नेऊनि पार्था उठवीं रे ॥ २६ ॥ परम विष्णुभक्त पार्थ ॥ त्यांत आप्त तो जामात ॥ तरी मणि द्यावा त्वरित ॥ पार्थवीर जीववावा ॥ २७ ॥ ऐसें ऐकतां शेषाचें वचन ॥ सर्प झाले क्रोधायमान ॥ श्वासोच्छ्वास टाकोन ॥ ह्मणती अनर्थ मांडिला ॥ २८ ॥ तयांत धृतराष्ट्रफणी ॥ शेषासी बोले ते क्षणीं ॥ तेचि ऐकावी वाणी ॥ स्वस्थचित्तें राजया ॥ २९ ॥ राया पृथ्वीवरील विचार ॥ असत्य सर्वही तेथील नर ॥ त्यांसी काय उपकार ॥ करावया निघावें ॥ १३० ॥ छाया पुष्पीं फळीं तरुवर ॥ सर्वांशीं होत उदार ॥ त्यासी मृत्युलोकीं दुराचार ॥ छेदोनियां पाडिती ॥ ३१ ॥ दुजया उपकारें वांचवणें ॥ स्वजातीतें मारणें ॥ ऐसा उपकार सज्जनें ॥ कासयातें करावा ॥ ३२ ॥ जीवदायक हा मणी ॥ पाठवितां मृत्युलोकालागुनी ॥ पुनः नयेचि परतोनी ॥ निश्चय मनीं जाणावें ॥ ३३ ॥ कृतघ्न गुरुहत्यारी ॥ ऐसा जो नर निर्धारी[6] ॥ तयासी औषधें वांचवणें परी ॥ निष्फळ होय राजया ॥ ३४ ॥ ते मानव निरंतर ॥ मृत्यु पावती निर्धार ॥ त्यांसी मणि द्यावा हा विचार ॥ बरवा न दिसे स्वामिया ॥ ३५ ॥ यद्यपि वृक्ष परोपकारी ॥ छाया पुष्प फळें वरी ॥ परी आपुलें मूळ प्रगट न करी ॥ केलिया नाश जीवित्वा ॥ ३६ ॥ हा मणि जीवन साचें ॥ सर्वभावें पँन्नगांचें ॥ याच्या योगें वैनतेयाचें ॥ भय नाहीं आह्मांतें ॥ ३७ ॥ मातंग ऋषीचा शाप त्यासी ॥ ह्मणोनि तो न ये पाताळासी ॥ तो येवोनि मृत्युलोकासी ॥ मणि नेईल आमुचा ॥ ३८ ॥ आधीं मनुष्य कृतघ्न ॥ महाकपटी दुर्जन ॥ हा मणि प्राप्त झालिया जाण ॥ मग देवांतें न गणिती ॥ ३९ ॥ मग येथें यावया न भीती ॥ सुधारसातें घेऊन जाती ॥ आमुची जी सर्पजाती ॥ त्यांसी मारितील चरणघातें ॥ १४० ॥ त्यांच्या स्त्रिया स्वहस्तें ॥ नेतील आमुच्या मस्तकमणीतें ॥ मग खेळवणेंचि होय त्यांतें ॥ आह्मी आबालवृद्ध पैं ॥ ४१ ॥ जोंवरी धरावा अभिमान ॥ तोंवरी तयासी भिती सकळ जन ॥ तेणेंचि प्राप्त होय सन्मान ॥ न धरितां जाण तृणप्राय ॥ ४२ ॥ धगधगीत अग्नि देखतां ॥ भय उपजे जनांचे चित्ता ॥ तो निमालिया तत्वतां ॥ हाणिती लाता तयातें ॥ ४३ ॥ विषदंत पडलियावरी ॥ रज्जुप्राय तो निर्धारी ॥ वृश्चिकें[10] नांगी पडिल्यावरी ॥ मग तो होय खेळवणें ॥ ४४ ॥ तिळसम अपराधें साचा ॥ राहु ग्रास करितो

१ महादेव. २ देवांला. ३ राक्षसांला. ४ मृत्यु पावला. ५ अपूर्व ठेवा. ६ खरोखर. ७ सर्पांचें. ८ गरुडाचें. ९ दोरीप्रमाणें. १० विंचू.

चंद्राचा ॥ प्रसाद हा मृत्युपणाचा ॥ ह्मणोनि ठेवणें उग्रत्व ॥ ४५ ॥ ऐसा संजीवकमणी ॥ न द्यावा सर्वथा मृत्युभुवनीं ॥ मग या सर्पांच्या श्रेणी ॥ काय निमित्त राहवितां ॥ ४६ ॥ गतविष गतमणी ॥ निराश्रिता सर्पश्रेणी ॥ मग भिकारी आह्मां घेउनी ॥ पोट भरतील आपुलें ॥ ४७ ॥ ऐकोनियां ऐसें वचन ॥ शेष झाला विस्मितमन ॥ मग बोले त्यालागुन ॥ ऐक मंत्रिया मम वाक्य ॥४८॥ तुझ्या वाक्येंकरूनी ॥ जरी मी त्यातें न देईं मणी ॥ त्याचा सखा चक्रपाणी ॥ तो काय न वांचवील त्यातें ॥ ४९ ॥ जेणें राजा होय विख्यात ॥ तेंचि प्रधानें करावें हित ॥ मग तें सुबुद्धीनें नृपनाथ॥ करो किंवा न करोची ॥ १५० ॥ देशीं नगरीं रम्य मंदिरीं ॥ मार्गीं अथवा वनांतरी ॥ मूर्खसंगती नसावी निर्धारी ॥ असलिया हरी संपदा ॥ ५१ ॥ मूर्खसंगतीनें हानी ॥ मूर्खसंगतीनें उपहास जनीं ॥ मूर्खसंगतीनें पापश्रेणी[३] ॥ पदोपदीं होतसे ॥ ५२ ॥ जी अज्ञानेंसागरतटिनी[४] ॥ सकळ पापांची श्रेणी ॥ जी अविवेक दुष्टवाणी ॥ ती संगती नसावी ॥ ५३ ॥ जी आत्मसुखातें हरी ॥ जी विवसी बुद्धीचे घरीं ॥ जी विवेकचंदनातें कुठारी ॥ ती दुष्टसंगती नको ॥ ५४ ॥ जी सद्बुद्धिच्छेदक कुठार ॥ ज्ञानमूळें काढणार ॥ जी दुःखपर्वतदरी थोर ॥ ती संगती नको देवा ॥ ५५ ॥ सर्वस्वाची हानि घडो ॥ कां माथां कोसळोनि पर्वत पडो ॥ परी दुष्टसंगती सर्वथा न घडो ॥ जन्मोजन्मीं मुरारी ॥ ५६ ॥ सेवोनियां कंदमूळांसी ॥ परी राहावें साधुसंगतीसी ॥ परी न इच्छावें इंद्रभुवनासी ॥ मूर्खसंगती करूनियां ॥ ५७ ॥ कृष्णसखा हा गांडीवपाणी[५] ॥ तो वांचवील त्यालागुनी ॥ तो घेईल यशकरणी ॥ परी अपयश येईल आह्मांतें ॥ ५८ ॥ मणि ज्याची जीवनकळा ॥ तो श्रीहरि अमृतजिव्हाळा ॥ तुह्मां काय कळे मूढांला ॥ नकळे लीला ब्रह्मादिकां ॥ ५९ ॥ ब्रह्मा ह्मणे हा नंदनंदन ॥ त्यासी काय ह्मणती ब्रह्म सनातन ॥ तरी मी याचें पाहीन पूर्णपण ॥ ह्मणोनि अज्ञान उद्भवलें ॥ १६० ॥ तेणें गायी वत्सें हरून ॥ नेवोन लपवी नवलक्ष पूर्ण ॥ परी तैसीं रूपें श्रीकृष्ण ॥ होऊनि राहिला जनीं वनीं ॥ ६१ ॥ ब्रह्मा ह्मणे गोपाळांतें ॥ तुह्मांस आणिलें सत्यलोकातें ॥ जें सर्वही सुख येथें ॥ तें भोगा जी आनंदें ॥ ६२ ॥ ते ह्मणती कोठें श्रीकृष्ण ॥ हा लोक त्यावीण स्मशान ॥ स्मशानीं वसे उमारमण[६] ॥ हें तों त्याहुनी अमंगळ ॥ ६३ ॥ तूं तंव ब्रह्मा सत्य चांडाळ ॥ आह्मां अंतरविलासी गोपाळ ॥ जो कैवल्याचा केवळ ॥ तो काढिला कवळ मुखांतुनी ॥ ६४ ॥ कृष्णदर्शना विघ्नप्रासी ॥ कैसी केली रे अधर्मरीती ॥ स्वकन्या देखोनि रूपवती ॥ कैसा धांवलासी भोगावया ॥ ६५ ॥ मृडानीचें[७] देखोनि रूप ॥ उपजला तुज कंदर्प[८] ॥ पद्मज ह्मणविसी स्वरूप ॥ तुझें कळों आलें आह्मां ॥६६॥ जन्मला हरिनाभीस[९] विधि[१०] ॥ हा बोल नासला त्रिशुद्धि ॥ हरिस्मरणीं असावी तयाची बुद्धि ॥ तूं तरी उदधि पापाचा ॥ ६७ ॥ कोणाचे कांहींएक गुण ॥ शुद्ध उमटावे संपूर्ण ॥ तूं तंव झालासी मलिन ॥ हरिवियोग केला आह्मांतें ॥ ६८ ॥ सकल जन दुरित-

१ पंक्ती. २ छीथू, फजिती. ३ पापसमूह. ४ अज्ञानरूप समुद्राची नदी. ५ अर्जुन. ६ शंकर. ७ पार्वतीचें. ८ मदन. ९ विष्णूच्या नाभीपासून. १० ब्रह्मदेव.

धूळी ॥ दुर्बुद्धितोयें पंकला पावली ॥ तूं उपजलासी तज्जातकमळीं ॥ ह्मणोनि मलिन झालासी ॥ ६९ ॥ मग वनीं जावोनि पाहे कमलोद्भव ॥ तेथें तैसाचि संचला समुदाव ॥ ह्मणे येणें केलें लाघव ॥ गोप नेले ते आणोनि ॥ १७० ॥ मग पाहों धांवे चतुरानन ॥ तों तेथेंही तैसेचि देखोन ॥ पुनः पाहे वनीं येऊन ॥ तंव ते आनंदें नाचती ॥ ७१ ॥ विधि झाला हिंपुटी ॥ ह्मणे म्यां जोडिल्या पापकोटी ॥ जो परब्रह्म जगजेठी ॥ तो प्राकृत पोटीं मानिला ॥ ७२ ॥ दुःखें बोले चतुरानन ॥ मज गोकुळीं कां नसे जनन ॥ धन्य तेथींचे तृण पाषाण ॥ कृष्णचरणें पावन मीही होतों ॥ ७३ ॥ धन्य ते गोकुळींचे जन ॥ धन्य तेथील लता वृक्ष पाषाण ॥ जयांतें लागती कृष्णचरण ॥ वनीं गोधनें चारितां ॥ ७४ ॥ म्यां फार केला अपराध जाण ॥ ह्मणोनि केलें येथें माझें स्थापन ॥ मग वत्स गोप दिधले आणोन ॥ ऐसा श्रीकृष्ण लाघवी तो ॥ ७५ ॥ तो अनुकूळ असतां जगजीवन ॥ वज्र होतें तृणासमान ॥ तो प्रतिकूळ झालिया तृण ॥ वज्र होवोनि मारीत ॥ ७६ ॥ तो हरि कृपादृष्टीनें ॥ सजीव करील अर्जुनाकारणें ॥ आमुचीं होतील कृष्णवदनें ॥ मणि न दिधला ह्मणोनि ॥ ७७ ॥ जोंवरी आहे संपत्तिभार ॥ तोंवरीच साधावा परोपकार ॥ दधीचि मुनीनें आपुलें शरीर ॥ देवकार्या लाविलें ॥ ७८ ॥ नातरी अमावास्येचे चंद्रें ॥ शीतळ होतील काय शरीरें ॥ उष्णकाळींचें जलधरें ॥ काय वृष्टी करिजेल ॥ ७९ ॥ धृतराष्ट्रा ऐकें वाणी ॥ जेथें नांदतो चक्रपाणी ॥ तेथें फिरोन न देतील मणी ॥ ऐसी करणी न घडेचि ॥ १८० ॥ येरू ह्मणे तयावरी ॥ एका वांचवूनि सकळां मारी ॥ ऐसा तूं राजा आमुचे शिरीं ॥ कैसा काळ हा आणिला ॥ ८१ ॥ सकळ पन्नगांचें मरण ॥ जरी इच्छिसी गरुडापासून ॥ तरी मणि देऊन ॥ कन्यावैधव्य हरावें ॥ ८२ ॥ ऐसी ऐकोनियां मात ॥ मनीं विचारी फणिनाथ ॥ पुढील जाणोनि भविष्यार्थ ॥ सर्वथा निग्रह न करी तो ॥ ८३ ॥ आतां पुढें बभ्रुवाहन ॥ येवोनि करील मणिहरण ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अतिरसाळ परिसावें ॥ ८४ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १८५ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके मणिग्रहणार्थं पुंडरीकपातालगमनं नाम एकोनचत्वारिंशोध्यायः ॥ ३९ ॥ ॥ अध्याय ॥ ३९ ॥ ॥ ओव्या ॥ १८५ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

## अध्याय ४०.



श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे गा भारता ॥ पुढें ऐकें पूर्वजकथा ॥ जी नेलिया श्रवणपंथा ॥ भवरोगव्यथा दूर होय ॥ १ ॥ मग पुंडरीक ह्मणे जी फणिपति ॥ धर्मकार्यीं हा मंदमति ॥ नाशक तुझे सभेप्रति ॥ महाखळात्मा दिसतो ॥ २ ॥ जेवीं अमृत केवळ शशांक ॥ परी त्यामाजी असे कलंक ॥ तम संहारितो दीपक ॥ परी तो लांधे काळिमा ॥ ३ ॥ अति मधुर मधु केवळ ॥ परी त्याभोंवत्या मक्षिका खळ ॥ तूं तों धर्मात्मा केवळ ॥ परी वेष्टिलासी खळ सर्पीं ॥ ४ ॥ दृष्टी पडिलें जरी निधान ॥ तरी त्यावरी असती भूतगण ॥ सुगंध शीतळ चंदन ॥ परी तो विखारीं वेष्टिला ॥ ५ ॥ तूं तों सर्पांचा ईश्वर ॥ हे सर्व तुझे किंकर ॥ तरी सजीव करावा धनुर्धर ॥ कन्यावैधव्य हरावें ॥ ६ ॥ तयासी ह्मणे नागनाथ ॥ हें तों या दुष्टातें अमान्य वाटत ॥ जे कां दुष्ट प्राणी जन्मत ॥ ते परोपकारा न येती ॥ ७ ॥ ज्यावरी कृपा भगवंताची ॥ त्यासी परोपकाराची रुची ॥ दुष्ट दुर्जनां अपकाराची ॥ लागली गोडी सुटेना ॥ ८ ॥ स्वयें परोपकार न करी ॥ दुजा करितांच विघ्न करी ॥ ऐसिया दुष्टाची परी ॥ त्वां समूळ पाहिली कीं ॥ ९ ॥ नाना बुद्धीनें बोधिला ॥ परी ममता नयेचि खळाला ॥ बहुकाळ दुग्धीं शिजविला ॥ परी गोटा नये पक्कते ॥ १० ॥ गोक्षीरें वारंवार ॥ प्रक्षाळिलें काकशरीर ॥ परी तो सहसाही नव्हे शुभ्र ॥ निज काळिमा न सोडी ॥ ११ ॥ नातरी मृगमंदाचें केलें आळें ॥ तें अमृतोदकें पूर्ण भरिलें ॥ तयामाजी पँलांडु लाविले ॥ परी ते वास न सोडिती ॥ १२ ॥ जरी शर्करेमाजी घातला ॥ परी निंब न सोडी कडूपणाला ॥ जरी कर्पूरचूर्णें मिश्रित केला ॥ तरी रामठाअंगीं दुर्गंधी ॥ १३ ॥ मकरवंक्त्रींचें घेइजे मुक्ताफळ ॥ वाहातां सांपडेल सागरमेळ ॥ हेंही घडेल एक वेळ ॥ परी दुष्टचित्त न बोधवे ॥ १४ ॥ हिंडतां शशकशृंग सांपडेल ॥ मृगजळें तृषा जाईल ॥ वाळू रगडितां सांपडेल तैल ॥ परी दुष्टचित्त न बोधवे ॥ १५ ॥ ह्मणोनि त्वां पुंडरीका ॥ शीघ्र जावें मृत्युलोका ॥ ऐशी माझी शब्दमाळिका ॥ बभ्रुवाहना सांगावी ॥ १६ ॥ हे सर्प अवघे दुष्टश्रेणी ॥ सहसा देऊं न देती संजीवकमणी ॥ आतां जें असेल तुझे मनीं ॥ तें शीघ्रकाळीं करावें ॥ १७ ॥ तूं येथें व्यर्थ आलासी धांवुनी ॥ सोडोनि श्रीकृष्णसंजीवनी ॥ तो कृपादृष्टी करोनी ॥ सकळही जनां उठवील ॥ १८ ॥ मग पुंडरीक तेथोनी ॥ शीघ्र पावला रणमेदिनी ॥ तंव त्या देखिल्या भगिनी ॥ पार्थप्रेताजवळिकें ॥ १९ ॥ रणीं लाविले कर्पूरदीप ॥ सुगंध तैलाचे अमूप ॥ आपण बैसोनियां समीप ॥ देहद्वयातें रक्षिती ॥ २० ॥ पुंडरीक आणील मणी ॥ सजीव करील आपुला धनी ॥ ऐशी आशा धरूनि मनीं ॥ वाट पाहत बैसल्या ॥ २१ ॥ तंव पुंडरीकमुखद्विजराज ॥ चिंतातुर देखोनि निस्तेज ॥ ऐसें जाणोनि भर्तृजीवनकाज ॥ नासलेंसें भाविती ॥ २२ ॥ भग्नाश देखोनि पुंडरीक ॥ आरंभिला परम शोक ॥ येरू ह्मणे जे जवळील सेवक ॥ मणि न देती दुष्टभावें ॥ २३ ॥ शेषें सांगितली बरवी रीती ॥ परी ते कदापि नायकती ॥ ऐसें ऐकतां

१ चंद्र. २ अंधकार. ३ पावे. ४ सर्पांनीं. ५ चाकर. ६ कस्तूरीचें. ७ कांदे. ८ हिंगाच्या. ९ मगराच्या तोंडांतील. १० समरभूमीवर.

नरपती ॥ बभ्रुवाहन कोपला ॥ २४ ॥ आज्ञा दिधली सैन्यासी ॥ शीघ्र चला पाताळासी ॥ मग घाव देऊनि निशाणासी ॥ सिद्ध झालें सकळ सैन्य ॥ २५ ॥ कोठें वासुकी तक्षक ॥ कोठें आहे सर्पनायक ॥ जो खळ सर्पकंटक ॥ धृतराष्ट्र कोठें आहे तो ॥ २६ ॥ सर्पसंहार करूनी ॥ बळें आणितों संजीवकमणी ॥ अमृतातें आणोनी ॥ सकळ सैन्य उठवितों ॥ २७ ॥ जेणें मारिला पार्थपिता ॥ तयासी काय दुष्ट सर्पांची कथा ॥ मातुळादिकांसी[1] व्यथा ॥ शस्त्रघातें करीन ॥ २८ ॥ आजि माझें भुजबळ ॥ सर्वेही पाहातील ते व्याळ[2] ॥ घालोनियां अस्त्रजाळ ॥ भस्म करोनि टाकीन ॥ २९ ॥ आजि भोगावतीचें[3] जळ ॥ माझे बाण प्राशितील ॥ पार्थअंगातें प्रक्षाळितील ॥ हेंचि करणें मजलागीं ॥ ३० ॥ आजि सर्पमस्तकमणी ॥ कंठभूषणें करितील तरुणी ॥ आणि जे म्यां मारिले समरंगणीं ॥ तेही सर्व लेतील ॥ ३१ ॥ आजि शेषानिमित्त शंकर ॥ त्याच्या कैवारा जरी येईल ॥ तरी शरधारीं व्याकुळ ॥ करीन मी वीर गाढा ॥ ३२ ॥ पाताळाचे विवरद्वारें ॥ सर्व सैन्य चालिलें त्वरें ॥ तें समजोनियां स्ववाक्यशरें ॥ शेष विंधी धृतराष्ट्रा ॥ ३३ ॥ या दुष्ट धृतराष्ट्राचिया वचनें ॥ कोप धरिला बभ्रुवाहनें ॥ आतां युद्धाकारणें ॥ पाठवावा तयासी ॥ ३४ ॥ जैसा धृतराष्ट्र नर ॥ बळें खवळविले पांडववीर ॥ एकोत्तरशतें[4] कुमर ॥ रणांगणीं मारिले ॥ ३५ ॥ कृष्णभक्तासीं भांडणें ॥ तें काळाचें आमंत्रणें ॥ पाताळ जाळील अर्धक्षणें ॥ येथें काय संदेह ॥ ३६ ॥ पुढें करा या धृतराष्ट्रा ॥ तोचि निवारील पार्थपुत्रा ॥ जयाच्या बोलें कुळसंहारा ॥ होईल तोचि निवारिता ॥ ३७ ॥ कर्कोटक तक्षक फणिवर ॥ निघाले सर्वेही फणींद्र ॥ सिद्ध झाला सर्पदळभार ॥ महाघोर जो दारुण ॥ ३८ ॥ कोणासी फणा शतें द्विशतें ॥ कोणासी त्रिशत चतुःशतें ॥ कोणी बाण[5] शास्त्र सप्त[6] धरिते ॥ कोणी अष्टशत नवशतें ॥ ३९ ॥ ऐसे निघाले फणी ॥ सूर्यासारिखे मुगुटमणी ॥ ज्यांच्या विषानळेंकरुनी ॥ दग्ध होती पर्वत ॥ ४० ॥ नाना अळंकारमंडित ॥ चतुरंग सैन्येंशीं शोभत ॥ कंबुकंठ विराजित ॥ शोभती माथां किरीट ॥ ४१ ॥ रथाश्व गज पदाती थोर ॥ ऐसा निघाला पन्नगभार ॥ पांच योजनें व्यापूनि विखार[7] ॥ राहिले शीघ्र युद्धासी ॥ ४२ ॥ जयांचे निघतां फुंकार ॥ तेणें जळेल हें चराचर ॥ विषाग्निस्फुलिंग अपार ॥ उडों लागले चहूंकडे ॥ ४३ ॥ नरपति आणि सर्पपतिसेना ॥ दोघे मिसळले भांडणा ॥ विषाग्निशस्त्रसंघट्टणा ॥ होवों लागली तेधवां ॥ ४४ ॥ युद्धा प्रवर्तले दारुण ॥ खड्ग मुद्गल पाश बाण ॥ कुंत शक्ति पट्टिश दारुण ॥ परस्परें मारिती ॥ ४५ ॥ नरपन्नगांचें युद्ध ॥ तेथें दारुण झालें विशद ॥ तें पाहावयासी विबुध[8] ॥ विमानीं बैसोनि चालिले ॥ ४६ ॥ देवगणासह आला इंद्र ॥ ग्रहगणेंसीं पाहे चंद्र ॥ आले गणेश आणि रुद्र ॥ युद्धकौतुक पाहावया ॥ ४७ ॥ कोणी ह्मणती जिंकील नरपती ॥ सर्प जिंकितील कोणी ह्मणती ॥ ऐशा विमानारूढ सुरपंक्ती ॥ पाहाती कौतुक तेधवां ॥ ४८ ॥ दारुण युद्ध



१ मामा आदि सर्वांस. २ सर्प. ३ पातालनदीचें. ४ एकशेंएक. ५ पांचशें. ६ सहाशें. ७ सर्प. ८ देव.

प्रवर्तलें ॥ सर्पीं मानवांतें मोहिलें ॥ सर्पदंशें करूनि मेले ॥ महावीर रणांगणीं ॥ ४९ ॥ धृतराष्ट्र विषाग्नि वमिला ॥ त्यासी वायु साह्य झाला ॥ तो धडधडीत चालिला ॥ सैन्य जाळीत पार्थपुत्राचें ॥ ५० ॥ धृतराष्ट्र अस्त्रें मारित ॥ सैन्याचा करीत निःपात ॥ विषें मारित शतानुशत ॥ पुढें चालिला तेधवां ॥ ५१ ॥ ऐसें देखोनि बभ्रुवाहन ॥ झाला परम क्रोधायमान ॥ मग सोडोनियां बाण ॥ विरथ केला धृतराष्ट्र ॥ ५२ ॥ करूनियां हरिस्मरण ॥ बभ्रुवाहन वर्षे बाण ॥ सर्पसैन्य घायाळ पूर्ण ॥ जर्जर केलें क्षणमात्रें ॥ ५३ ॥ छेदोनियां शिरांच्या हारी ॥ सायकें[1] पाडीत भूमीवरी ॥ प्रळयकाळीं नक्षत्रावळी[2] ॥ रिचवे[3] खालीं ज्यापरी ॥ ५४ ॥ चक्षुःश्रवीं वेष्टिला नृपती ॥ मस्तकमणी तेजें प्रकाशिती ॥ तेणें शोभला भूपती ॥ जैसा श्रीहरि साक्षात ॥ ५५ ॥ नृपें शस्त्र सोडिलें मयूराचें ॥ तेणें सैन्य व्यापिलें विषधरांचें ॥ उदर फाडिती सर्पांचें ॥ तडतडां तोडिती ॥ ५६ ॥ मग मधुअस्त्र सोडून ॥ सर्प न्हाणिले सर्व जाण ॥ त्यावरी पिपीलिकास्त्र[4] दारुण ॥ सोडिता झाला पार्थपुत्र ॥ ५७ ॥ सर्पगात्रें क्षतयुक्त झालीं ॥ त्यांमाजी मधु सर्व भरली ॥ तेणें व्याकुळ झाली सर्पावळी ॥ वेग राहिले सर्वांचे ॥ ५८ ॥ पिपीलिकास्त्रें पिपीलिकामेळा ॥ सकळ सर्पांगांसीं झोंबला ॥ तेणें चरफडिती ते वेळां ॥ रणांगणीं व्याळ[5] ते ॥ ५९ ॥ ऐसा संहार केला तयांचा ॥ निश्चेष्टित देह पडला धृतराष्ट्राचा ॥ तैसाची प्राण तक्षकाचा ॥ कासाविस जाहला ॥ ६० ॥ पिपीलिका झोंबतां चरफडती ॥ पुच्छें भूतळीं आदळिती ॥ परी त्या मुंग्या न सोडिती ॥ रस शोषिती शरीराचा ॥ ६१ ॥ त्यावरी नकुळास्त्र[6] सोडिलें ॥ तेणें सर्पकुळ व्यापिलें ॥ देखोनि देवांचीं मंडळें ॥ आश्चर्य करूं लागलीं ॥ ६२ ॥ मयूर पिपीलिका नकुळ[7] ॥ यांहीं संहारिलें सर्पकुळ ॥ नकुळें खंडें केलीं सकळ ॥ आणि भक्षिती आनंदें ॥ ६३ ॥ जेवीं प्रतिकूळ होतां रमावर ॥ क्षणें जाय संपत्तिभार ॥ तेवीं सर्पांचा दळभार ॥ निमोनि गेला नृपबाणें ॥ ६४ ॥ यापरी कित्येक मरण पावले ॥ कित्येक अग्निअस्त्रें जाळिले ॥ घायाळ पळोनियां गेले ॥ शेषापासीं सांगावया ॥ ६५ ॥ त्यांतें देखोनि नागराज ॥ हास्य करीत तेजःपुंज ॥ कां रे पळालेती भूभुज- ॥ भय मानोनि या स्थळीं ॥ ६६ ॥ ऐसा सबळ तो देखिला ॥ कां रे पुंडरीक रिक्त पाठविला ॥ कोठें रे धृतराष्ट्र गेला ॥ जो वर्णीत होता पराक्रम ॥ ६७ ॥ तुमचें मंत्रसामर्थ्य काय झालें ॥ काळकूट कोठें हरपलें ॥ मानवीं तुह्मां जिंकिलें ॥ लाज न वाटे बोलतां ॥ ६८ ॥ दूत ह्मणती शेषाला ॥ पिपीलिका झोंबल्या धृतराष्ट्राला ॥ तो मेला किंवा वांचला ॥ हें तों न कळे आह्मांतें ॥ ६९ ॥ स्वयें तो महादुर्जन ॥ तें योग्यचि केलें त्या दंडण ॥ ऐसें ऐकोनियां वचन ॥ हास्य करीत नागराज ॥ ७० ॥ मग बोले शेष वाणी ॥ महामूर्ख हा धृतराष्ट्र फणी ॥ पहिलाचि देऊं देता संजीवकमणी ॥ तरी इतकी हानि कां पावता ॥ ७१ ॥ तो हरिभक्त प्रबळ ॥ त्यातें हात जोडोनि उभा काळ ॥ तेथें तुह्मी मशक व्याळें ॥ कीटक केवळ

१ बाणांनीं. २ नक्षत्रसमूह. ३ पडे. ४ मुंग्यारूपी शस्त्र. ५ सर्प. ६ मुंगुसांचें अस्त्र. ७ मुंगूस.

नष्ट महा ॥ ७२ ॥ हरिभक्तीनें समर्थ ॥ त्यासी जावें शरणागत ॥ तया अर्पावें सर्व चित्त ॥ वरी शरीरही अर्पावें ॥ ७३ ॥ हरि-भक्तां न देतां धन ॥ पुढें राखितां जाय भस्म होऊन ॥ किंवा तस्कर[1] करिती हरण ॥ मग शोकेंकरून रडताती ॥ ७४ ॥ हरिभक्त पाहतां दुरी ॥ त्यासी शरण जावें सत्वरी ॥ चित्त वित्त समर्पावें निर्धारी ॥ निजकल्याणाकारणें ॥ ७५ ॥ ऐकोनि तक्षकादिक विषधर ॥ हात जोडोनि बोलती उत्तर ॥ आतां शरण रिघावें सत्वर ॥ प्राण वांचवावयाकारणें ॥ ७६ ॥ अति बलाढ्य बभ्रुवाहन ॥ पाताळ जाळील न लगतां क्षण ॥ आतां मणि देऊन ॥ सत्वर येथून जाऊं द्या ॥ ७७ ॥ मग नागेश संतोषून ॥ ह्मणे दौहित्र[2] बभ्रुवाहन ॥ तयालागीं भेटोन ॥ मणि द्यावा सत्वर ॥ ७८ ॥ मग शत सेवकीं घेतले भार ॥ अमूल्य रत्नें अळंकार ॥ नाना वस्त्रें परिकर ॥ घेऊनि मणि तो आला ॥ ७९ ॥ मग सकळां बोले सहस्रफणी ॥ हरिभक्तासीं तुह्मी करणी ॥ अप्रयोजक केली तरी निघोनी ॥ सत्वर यावें दर्शना ॥ ८० ॥ ज्यास प्रसन्न क्षीरसागर[3] ॥ त्यापुढें काय अजाक्षीर[4] ॥ जेथें कामधेनुखिल्लार ॥ तेथें कासया अविक[5] तो ॥ ८१ ॥ जेथें कल्पवृक्षाचें वन ॥ तेथें एरंडांचें काय नांदण ॥ जेथें मंदाकिनीचें[6] जीवन[7] ॥ तेथें काय थिल्लरोदक ॥ ८२ ॥ तुमचा पराभव केला मानवें ॥ हें योग्य न केलें वैकुंठधवें ॥ बापा त्याचें उसनें फेडावें ॥ मणिदान देऊनि ॥ ८३ ॥ आतां चला रे सकळजण ॥ पाहाया रमारमण ॥ पार्थालागीं आला असेल धांवोन ॥ मणिपुराकारणें ॥ ८४ ॥ जरी नेत्रीं पाहाल हरिपदकमळ ॥ तरी गरुड तुह्मांसी हस्त जोडील ॥ भावें प्रणिपात करील ॥ आलेती दर्शना ह्मणोनि ॥ ८५ ॥ ऐसें बोलोनि सहस्रफणी ॥ वस्त्रें अळंकार घेउनी ॥ बभ्रुवाहनासी अर्पोनी ॥ उभयतां भेटले ॥ ८६ ॥ मग कन्यात्मजें घेउनी ॥ मणिपुरा आणिला सहस्रफणी ॥ परमानंद त्याचे मनीं ॥ ह्मणे लाभ जाहला ॥ ८७ ॥ श्रीकृष्णभेटी होईल जाणोनी ॥ जामातही पडेल नयनीं ॥ डोळे निवतील देखोनी ॥ ह्मणोनि हर्ष पावला ॥ ८८ ॥ मणिपुरा शेष गेला ॥ इकडे धृतराष्ट्र दुखावला ॥ तेणें काय केली कळा ॥ तेचि ऐका सादर ॥ ८९ ॥ दुर्बुद्धि आणि दुर्भाव जाण ॥ ऐसे दोघे त्याचे नंदन[8] ॥ त्यांतें समीप पाचारून ॥ काय बोलता जाहला ॥ ९० ॥ ह्मणे पुत्र हो झाला अनर्थ ॥ आतां सजीव होईल पार्थ ॥ मज दुःख झालें बहुत ॥ तरी तुह्मीं सामर्थ्य दावावें ॥ ९१ ॥ विजयी झाला बभ्रुवाहन ॥ अश्वमेध होईल संपूर्ण ॥ कीर्तीनें व्यापील त्रिभुवन ॥ हें दुःख मज वाटे ॥९२॥ जैसा देखोनि राजहंस ॥ कासावीस होय वायस[9] ॥ तेवीं दुर्जन सत्पुरुषांस ॥ देखोनियां वीटती ॥ ९३ ॥ मंजुळ वाणी बोले कीर[10] ॥ तेणें न संतोषे मार्जार ॥ कस्तूरीमृग देखतां व्याघ्र ॥ न पावेचि संतोषा ॥ ९४ ॥ उगवतां अमृतकर[11] ॥ खेद मानिती तस्कर[12] ॥ तेवीं धृतराष्ट्र फणींद्र ॥ पार्थ उठेल तेणें दुखवला ॥ ९५ ॥ सर्वांचे हितालागून ॥ म्यां रायाचें केलें निवारण ॥ तें विशेषें आलें घडोन ॥ तरी विघ्न करा पुत्र हो ॥ ९६ ॥ मग दुर्बुद्धि झाला

१ चोरटे. २ नातू (मुलीचा मुलगा). ३ दुधाचा समुद्र. ४ शेळीचें दूध. ५ शेळ्यांचा कळप. ६ गंगेचें. ७ पाणी. ८ पुत्र. ९ कावळा. १० पोपट. ११ चंद्र. १२ चोर.

बोलता ॥ कां जी शोक करितां वृथा ॥ मी तनय जवळी असतां ॥ काय चिंता तुह्मांतें ॥ ९७ ॥ मी धर्ममंदिरहारक ॥ सत्कर्माचा नाशक ॥ भूतदयेचा घातक ॥ स्वहितधनाचा चोरिता ॥ ९८ ॥ मी सद्भक्तिअमृतनाशक ॥ स्वहितधनाचा चोरक ॥ अविद्येचा जनक ॥ वाढविता दंभाचा ॥ ९९ ॥ मी असतां विद्यमान ॥ कैसा याग होईल पूर्ण ॥ अपूज्याचा साह्यकर्ता जाण ॥ पूज्याचा निधन[2]कर्ता मी ॥ १०० ॥ त्वां मज केलें निर्माण ॥ तो मी असतां विद्यमान ॥ नाशकार्यीं मी प्रवीण ॥ तरी कां शोक करितोसी ॥ १ ॥ मी कनिष्ठ बंधूसहवर्तमान ॥ ज्याचे घरीं राहूं एक क्षण ॥ तयासी करावया नरकीं पतन ॥ क्षणही एक न लागे ॥ २ ॥ तुह्मीं रायासवें त्वरेंकरून ॥ करावें आतां गमन ॥ मी जातों बंधूसहवर्तमान ॥ पार्थशिर हरावया ॥ ३ ॥ गरुडविवर्जित जें वन ॥ तेथें शिर घेऊन बैसेन ॥ मग कैसा उठेल अर्जुन ॥ शिरावीण सांग मज ॥ ४ ॥ मग बंधु घेऊनि संगें ॥ पार्थशिर उचलोनि सवेगें ॥ दुर्बुद्धि चालिला वेगें ॥ बकदाल्भ्यवना तो गेला ॥ ५ ॥ तें शिर मुखीं कृष्णनाम जपत ॥ किरीटकुंडलें मंडित ॥ तें घेऊनि उद्वस[3]-वनांत ॥ दुर्बुद्धि तो राहिला ॥ ६ ॥ जैसें उकरड्यावरी निधान ॥ कीं मर्कटाहातीं सांपडे रत्न ॥ कीं दुर्जनहस्तीं सज्जन ॥ तैसें पार्थ-शिर त्या हस्तीं ॥ ७ ॥ तंव त्या दोघी पार्थसुंदरा ॥ पाहों लागल्या पार्थशिरा ॥ तें न देखतां हाहाकारा ॥ करित्या झाल्या तेधवां ॥ ८ ॥ कोणें दुष्टें कर्म केलें ॥ वल्लभशिर चोरिलें ॥ ह्मणोनि स्वशरीर घातलें ॥ धरणीवरी तेधवां ॥ ९ ॥ पार्थचरणीं ठेवून शिर ॥ मुखें बोलत उत्तर ॥ इकडे कल्लोळ झाला थोर ॥ बभ्रुवाहन तो पातला ॥ ११० ॥ पुढें असे सहस्रवदन ॥ संजीवकमणि घेऊन ॥ रणीं प्रवेशे बभ्रुवाहन ॥ तों आकांत प्रवर्तला ॥ ११ ॥ नेलें नेलें पार्थशिर ॥ ऐसा उठिला हाहाकार ॥ शिरविरहित धनुर्धर ॥ कैसा वांचेल यावरी ॥ १२ ॥ ऐसें ऐकतां वचन ॥ मूर्च्छित पडिला बभ्रुवाहन ॥ मग नागराज करी समाधान ॥ भेटोनियां स्वक-न्येचें ॥ १३ ॥ जे दिनीं पार्थशिर छेदिलें ॥ ते रात्रीं गजपुरीं कुंतीनें स्वप्न देखिलें ॥ तें जागृत होवोनि सांगीतलें ॥ धर्मभीम कमळांवरा ॥ १४ ॥ ऐकें कृष्णा परम दारुण ॥ स्वप्न पडिलें मजकारण ॥ तैलवापींत पडिला अर्जुन ॥ मग बैसला उष्ट्रांवरी ॥ १५ ॥ यँमदिशेस केलें गमन ॥ सर्वांग माखलें गोमयेंकरून ॥ जपाकुसुमीं शोभायमान ॥ दुष्ट स्वप्न हें श्रीपति ॥ १६ ॥ निश्चयेंसीं कृष्णा जाण ॥ तव सखा नसे विद्यमान ॥ सुभद्रेचें मोडलें कंकण ॥ तेंही दुश्चित मज वाटे ॥ १७ ॥ ऐकतां पृथेचें वचन ॥ गरुडातें स्मरत श्रीकृष्ण ॥ तेच क्षणीं विनतानंदन ॥ कर जोडोनि उभा असे पुढें ॥ १८ ॥ देव कुंती आणि रुक्मिणी ॥ देवकी सत्यभामादि कामिनी ॥ भीमसेनादि गदापाणी ॥ भुजंगारीवरी बैसले ॥ १९ ॥ मनोवेग टाकोनि मागें ॥ भुजंगारि चालिला वेगें ॥ तों रण-मंडळ देखिलें श्रीरंगें ॥ जेथें पडिला निजसखा ॥ १२० ॥ तो विनक देखे पद्मनाभ ॥ जयाला असती सहस्र स्तंभ ॥ सभोंवते पडिले

---

१ मायेचा. २ नाशकर्ता. ३ ओसाड रानांत. ४ कृष्णाला. ५ तेलाच्या विहिरींत. ६ उंटावर. ७ दक्षिणदिशेला. ८ जास्वंदीच्या फुलांनीं. ९ गरुडावर.

वीरदंभ ॥ जे बभ्रुवाहनें मारिले ॥ २१ ॥ जेवीं प्रचंड वातबळें ॥ गळोनि पडती वृक्षफळें ॥ तेवीं पडिलीं शिरकमळें ॥ रणांगणामाझारी ॥ २२ ॥ कीं प्रळयकाळ होतां प्राप्त ॥ धरणीं होय नक्षत्रपात ॥ तेवीं नृपशिरें कमळाकांत ॥ देखता झाला तेधवां ॥ २३ ॥ तेथें रत्नदीप ते झळकती ॥ किरीटकुंडलांची फांकें दीप्ती ॥ लागल्या रत्नांच्या ज्योती ॥ तया विनकामाझारी ॥ २४ ॥ चंदनधूपें धूपिते ॥ तेथें शोकशब्द ऐकिला बहुतें ॥ वेढोनियां पार्थकलेवरातें ॥ बहुत जन बैसले ॥ २५ ॥ देखोनि शंकला श्रीधर ॥ ह्मणे दिसती स्त्रीवदनसुधाकर ॥ परी कां न दिसे पार्थमुखकल्हार ॥ शोक करिती मृत ऐसा ॥ २६ ॥ मग भीम ह्मणे जगज्जीवना ॥ उदय झाला नसतां तपना ॥ विकाश पार्थवदननलिना ॥ केवीं होईल सांग पां ॥ २७ ॥ वेगीं गरुडावरूनि उतरोन ॥ सवें घेतला भीमसेन ॥ पार्थाजवळी येतां जगज्जीवन ॥ अश्रु स्रवती नेत्र त्याचे ॥ २८ ॥ ह्मणे काय झालें अनुचित ॥ कोणे केला मित्रघात ॥ पार्थशरीर आकळित ॥ जगत्पति आणि तो भीमसेन ॥ २९ ॥ मग देव ह्मणे पार्था ॥ उठें वीरा रे समर्था ॥ मजकडे न पाहासी रे आतां ॥ असला अन्याय तो क्षमा करीं ॥ १३० ॥ देवकी यशोदा जननी ॥ आणि कुंती ही तव जननी ॥ भीमासहवर्तमान मी चक्रपाणी ॥ तूं कां न पाहासी आह्मांकडे ॥ ३१ ॥ ऐसें बोलतां नारायण ॥ मग त्यातें विनवी भीमसेन ॥ पतन पावला अर्जुन ॥ तूं त्यातें कां पुससी ॥ ३२ ॥ तुझें अवक्रपास्त्र दारुण ॥ तेणें मारिला हा अर्जुन ॥ तव मित्र मारावया कवण ॥ सामर्थ्य धरी निजांगें ॥ ३३ ॥ आतां कृपा करीं तात्काळ ॥ उठवीं वीर हा प्रबळ ॥ कासया तूं शोकाकुळ ॥ स्वयें येऊनि या स्थळा ॥ ३४ ॥ अंधकाराचें भय थोर ॥ काय जाणे दिनकर[१] ॥ भूतभयें शंकर ॥ केवीं पडेल स्वामिया ॥ ३५ ॥ शोक करणें मनुष्यधर्म ॥ तूं तों केवळ कैवल्यधाम ॥ ऐसें बोलोनियां भीम ॥ भ्रातृदुःखें कोपला ॥ ३६ ॥ कोणें धरिला रे श्यामकर्ण ॥ कोणें मारिला बंधु जाण ॥ त्याचे रक्तें घोट भरीन ॥ काय मज भीमा न जाणती ॥ ३७ ॥ माझिया प्राणाचा प्राण ॥ कोणें मारिला कर्णनंदन ॥ त्याचें करीन रक्तप्राशन ॥ एक घटिका न लागतां ॥ ३८ ॥ दोघी मातांसहवर्तमान ॥ मूर्च्छित पडिला बभ्रुवाहन ॥ मग तो केला सावधान ॥ तों पुढें कृष्ण देखिला ॥ ३९ ॥ कुंतीसहित रमाकांत ॥ क्रोधयुक्त वायुसुत[३] ॥ तयांप्रति बोलत ॥ पार्थात्मज तेधवां ॥ १४० ॥ ह्मणे मी पुत्र पतित ॥ मारिलासे जनक पार्थ ॥ केला सैन्याचा निःपात ॥ कर्णात्मजही[४] म्यां मारिला ॥ ४१ ॥ ऐसा मी दुष्ट पतित ॥ मजवरी करीं गदाघात ॥ केला स्वकुळाचा घात ॥ पिता भ्राता मारूनि ॥ ४२ ॥ पाताळीं सर्व सर्प जिंकोनी ॥ शेषासहित आणिला संजीवक मणी ॥ परी पार्थशिर कोणीं ॥ नेलें न कळे पापियें ॥ ४३ ॥ कृष्णा वंदितों तव चरण ॥ हातीं घेऊनि सुदर्शन ॥ छेदावें शिर माझें जाण ॥ पावन करीं मजलागीं ॥ ४४ ॥ पूर्वी जैसा मधुसूदना ॥ राहुकंठ छेदिला जाणा ॥ तैसेंच करीं ये क्षणा ॥ छेदीं



१ सूर्याचा. २ सूर्य. ३ भीमसेन. ४ कर्णपुत्र वृषकेतु.

कंठ अ[1]विलंबें ॥ ४५ ॥ पिता बंधु इष्टजनीं ॥ ज्या काळीं न रक्षिती कोणी ॥ त्या काळीं तूं चक्रपाणी ॥ भक्तांलागीं रक्षिता ॥४६॥ म्यां चांडाळें मारिला जनक ॥ मज तों प्राप्त महानरक ॥ तुज दृष्टीं देखिला नरकतारक ॥ तरी मज देईं मोक्षधाम ॥ ४७ ॥ अत्यंत कष्टाचें दुर्मरण ॥ तें आलें होतें मजकारण ॥ तव हस्तें तें होतां जाण ॥ जन्मसार्थक जाहलें ॥ ४८ ॥ तुझें पार्थमित्ररत्न ॥ म्यां [2]तस्करें चोरिलें जाण ॥ ईश्वरआज्ञा भंगिली पूर्ण ॥ तरी कां रक्षिलें मज अद्यापी ॥ ४९ ॥ म्यां पितयातें मारिलें ॥ जननीचें सौभाग्य हरिलें ॥ अजूनहि मातें कां देवा रक्षिलें ॥ होईं अकरुण सत्वर ॥ १५० ॥ कुंतीचिया चरणावरी ॥ तिघें रुळती नाना-परी ॥ परी आशीर्वादउत्तरीं ॥ न बोलेचि पार्थदुःखें ॥ ५१ ॥ आतां श्रीकृष्ण करील समाधान ॥ पार्थ होईल सजीव पूर्ण ॥ हें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अतिरसाळ ऐकावें ॥ ५२ ॥ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १५३ ॥ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके श्रीकृष्णकुंतीभीमसेनादिरणमे-दिनीगमनं नाम चत्वारिंशोध्यायः ॥ ४० ॥ ॥ अध्याय ॥ ४० ॥ ॥ ओव्या ॥ १५३ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

१ सत्वर. २ चोरानें.

श्रीगणेशाय नमः ॥ जैमिनि ह्मणे जनमेजया ॥ ऐक राया गुणनिलया ॥ त्रिविधतापें[1] तापलिया ॥ निवर्वी पूर्वजकथामृतें ॥ १ ॥ उल्पी पृथेसी करी नमस्कार ॥ दुःखें कुंती बोले उत्तर ॥ तुझें वंदन पावलें समग्र ॥ विषदृष्टी कामिनी ॥ २ ॥ भुजंगगृहीं जो करी वास ॥ त्याणें अवंतिलें[2] मृत्यूस ॥ मग सर्पीण कामिनी[3] ज्यास ॥ मरण तयासी रोकडें ॥ ३ ॥ पितृहत्यारी पाळोनि नंदन ॥ पावलीसी गे समाधान ॥ गिळिलें अर्जुननिधान ॥ आतां कासया बोलसी ॥ ४ ॥ ऐसें बोलोनि वचन ॥ अहा पार्थ ह्मणोन ॥ सर्वांसीं आलें रुदन ॥ आठवून गुण पार्थाचे ॥ ५ ॥ मोठा झाला शोककल्लोळ ॥ तेणें व्यापिलें नभमंडळ ॥ तें देखोनि फणिकुळपाळ ॥ बोले वचन कृष्णातें ॥ ६ ॥ वंदोनियां हरिचरण ॥ शेष बोले कृष्णालागून ॥ काय पाहातां विवंचून ॥ मनमोहना श्रीकृष्णा ॥ ७ ॥ शोकाचिया सागरीं ॥ पांडव बुडाले निर्धारीं ॥ तूं उपेक्षिसी जरी ॥ तरी कोण यांतें तारिता ॥ ८ ॥ तुवां करोन कृपेची नौका ॥ सकळ संकटार्णवजळीं देखा ॥ पांडव तारिले यदुनायका ॥ ते या क्षुद्रोदकांत बुडविसी ॥ ९ ॥ तूं सर्व जगाचें जीवन ॥ परी या मण्यास मान देऊन ॥ पार्थाचें करीं संजीवन ॥ समाधान करीं सर्वांचें ॥ १० ॥ अवघे करिती रुदन ॥ परम झालें व्याकुळ मन ॥ कवणें पार्थशिर नेलें चोरून ॥ तें ठाईं पाडावें जी ॥ ११ ॥ दुष्ट दुर्जनातें मारावें ॥ आणि सज्जनातें तारावें ॥ ह्मणोनि अवतार देवें ॥ धरिलासी तुवां यादवेंद्रा ॥ १२ ॥ मग कृष्णें करूनि ध्यान ॥ अंतरीं स्मरे पार्वतीरमण ॥ काय करिता झाला आपण ॥ तें सावधान परिसावें ॥ १३ ॥ जरी माझें ब्रह्मचर्य असेल ॥ तरी पार्थशिर हाता येईल ॥ जेणें नेलें तो शीघ्र मरेल ॥ या व्रतपुण्यप्रभावें ॥ १४ ॥ ऐसें बोलतां रमाकांत ॥ तों वर्तलें नवल अद्भुत ॥ तें ऐकावें सावचित्त ॥ जैमिनि ह्मणे रायातें ॥ १५ ॥ पार्थशिर अकस्मात आलें ॥ सर्वीं तें नयनीं देखिलें ॥ तेथें मरण शीघ्र झालें ॥ दुर्बुद्धि आणि दुर्भाव सर्पा ॥ १६ ॥ जेवीं पडतां अवर्षण ॥ जैसें शुष्क होय तृण ॥ त्यावरी पडलिया घन ॥ टवटवीत मागुती ॥ १७ ॥ पार्थवदननिशाकर ॥ सर्पराहु ग्रासितां सत्वर ॥ तो मुक्त होतां सैन्यसागर ॥ उचंबळला ते स्थळीं ॥ १८ ॥ सर्व देखोनि आनंदले ॥ चिंताकुर ते वाळले ॥ आतां सजीव करावें वहिलें ॥ पार्थ आणि वृषकेता ॥ १९ ॥ मग श्रीहरि ह्मणे सर्वांसी ॥ आतां राहावें स्वस्थमानसीं ॥ आधीं उठवावें वृषकेतूसी ॥ मग पार्थासी उठवीन ॥ २० ॥ नरनारी आनंदल्या चित्तीं ॥ कैसा सजीव करितो श्रीपती ॥ ह्मणोनि सर्व तटस्थ पाहाती ॥ नेत्रपातीं न हालवितां ॥ २१ ॥ जेवीं लोहचुंबकमणी ॥ करी लोखंडाची मेळणी ॥ तेवीं तंतु शिर चक्रपाणी ॥ इच्छामात्रें संयोजी ॥ २२ ॥ देवें धडाशीं शिर मेळवोनी ॥ हृदयीं ठेविला संजीवकमणी ॥ ह्मणे ऊठ रे वीरशिरोमणी ॥ कासया निद्रा तुवां केली ॥ २३ ॥ ऐसें ह्मणतांच उठला वृषकेत ॥ ह्मणे साहें साहें रे बाणघात ॥ ऐसें बोलोनि त्वरित ॥ कृष्णनामावळी जपे वदनीं ॥ २४ ॥ ऐसा उठवोनि वृषकेत ॥

१ आधिदैविक, आधिभौतिक आणि आध्यात्मिक असे त्रिविधताप. २ बोलाविलें. ३ स्त्री. ४ शेष. ५ महादेव. ६ अर्जुनाचा मुखचंद्र. ७ सत्वर. ८ शरीर.

देव तयातें आलिंगित ॥ मुखानें मुख असे चुंबित ॥ प्रेमाश्रु सांडित भूमीवरी ॥ २५ ॥ मग भीमासी वंदी कर्णनंदन ॥ येरें दिधलें आलिंगन ॥ आवडीनें मुख चुंबून ॥ भागलासी ह्मणे रे बाळका ॥ २६ ॥ मग कुंतीस केलें वंदन ॥ तिणें ओसंगां घेतला भानुज[2]नंदन ॥ मुखीं घालितां शुष्क स्तन ॥ तयासी पान्हा फूटला ॥ २७ ॥ भीम ह्मणे चक्रपाणी ॥ तूं या मण्याचा अंतरमणी ॥ परी अवताराची करणी ॥ मणिभावें दाविसी ॥ २८ ॥ जिचे असे कंठीं कृष्णमणी ॥ तयेसी विधवा न ह्मणे कोणी ॥ तेवीं न धरी जो तुज कृष्णमणी ॥ तोचि मुके सर्वस्वातें ॥ २९ ॥ ज्याचे मुखीं नाहीं तव नाममणी ॥ तोचि रांडवा जाणावा प्राणी ॥ सर्व विद्या अळंकारश्रेणी ॥ एक कृष्णावांचोनि व्यर्थ ॥ ३० ॥ मग पार्थशिरा धड मेळवुनी ॥ हृदयीं ठेवी संजीवकमणी ॥ ह्मणे ऊठ रे गांडीवैंपाणी[3] ॥ कां घेतोसी दीर्घ निद्रा ॥ ३१ ॥ जैसा इंद्रजाळीं प्रवीण नर ॥ तो ऊठवी नाना प्रकार ॥ तेवीं लाघवी रमावर ॥ ब्रह्मांडपुतळे ऊठवी ॥ ३२ ॥ अनंत ब्रह्मांडांची घडी मोडी ॥ जो करी न भरतां घडी ॥ तयाची कौतुकपरवडी ॥ कोण जाणे अगम्य ॥ ३३ ॥ नेत्र उघडोन पार्थ आहे ॥ तों पुढें त्रैलोक्यनाथ आहे ॥ मग उठोनि लँवलाहें ॥ चरण धरी आनंदें ॥ ३४ ॥ नामोच्चारी मुखकमळीं ॥ जपे रामकृष्णनामावळी ॥ मग देवें भक्ततनु आलिंगिली ॥ प्रेमेंकरोनि न सोडीच ॥ ३५ ॥ तेथें झाला जयजयकार ॥ देव वर्षती सुमनभार[5] ॥ दुंदुभी[6] वाजती मनोहर ॥ इंद्र संतोषला अंतरीं ॥ ३६ ॥ पार्थें वंदिला भीमसेन ॥ तयासी दिधलें आलिंगन ॥ ह्मणे अंतरले होते तव चरण ॥ ते कृष्णकृपेनें लाभलों ॥ ३७ ॥ मग कुंतीस केलें वंदन ॥ तिणें हृदयीं धरिला अर्जुन ॥ बा रे कष्टलासी पूर्ण ॥ हात मुखावरून फिरविला ॥ ३८ ॥ देवकी यशोदेसी भेटला ॥ प्रद्युम्नादिकांसी आलिंगिता झाला ॥ वर्णितां तो सोहळा ॥ सहस्रमुँखातेंही न वर्णवे ॥ ३९ ॥ देवें सकळ सैन्य उठविलें ॥ पूर्वींपेक्षां सबळ झालें ॥ सकळ नृप आनंदले ॥ हंसध्वजादि वीरेश ॥ ४० ॥ देखोनियां श्वेतवाहन[8] ॥ सलज्ज झाला बभ्रुवाहन ॥ मग सकळ वीर वचन ॥ काय बोलती तेधवां ॥ ४१ ॥ ह्मणती धन्य गांडीवपाणी ॥ तुझें साह्यकर्ता चक्रपाणी ॥ बभ्रुवाहन पुत्र तुजलागुनी ॥ जो त्रिभुवनीं विख्यात ॥ ४२ ॥ जेणें रणीं ख्याति केली ॥ केली वीरांची रांडोळी ॥ पन्नग[9]मंडळी जिंकिली ॥ मणि आणिला संजीवनी ॥ ४३ ॥ सकळांपासोनि इच्छावा जय ॥ परी पुत्रापासोनि असावा पराजय ॥ तें यथार्थ झालें निश्चय ॥ पुत्र बळिया पार्था तुझा ॥ ४४ ॥ तरी पार्था यासी भेटावें ॥ सकळ दुःख याचें हरावें ॥ वचनामृतें गौरवावें ॥ आशीर्वाद देऊनियां ॥ ४५ ॥ याचें यश अँगळें[10] ॥ धैर्य शौर्य तेजबळें ॥ कृष्णभक्तिपुण्यमेळें ॥ धन्य हा बभ्रुवाहन ॥ ४६ ॥ भूप ह्मणती श्रीपती ॥ भेटवीं पितापुत्रां शीघ्रगती ॥ आणि पार्थाच्या युवती[11] ॥ पतिव्रता भेटवाव्या ॥ ४७ ॥ बभ्रुवाहना ऐसा सुत ॥ जो देहत्यागार्थ उदित ॥ जो कां आह्मांत वीरनाथ ॥ शासनकर्ता सर्वांचें ॥ ४८ ॥ मग वंदोनि कृष्णचरण ॥ काय बोले

---

१ मांडीवर. २ वृषकेतु. ३ अर्जुना. ४ सत्वर. ५ पुष्पवृष्टि. ६ नगारे. ७ शेषाला. ८ अर्जुन. ९ सर्प. १० विशेष. ११ स्त्रिया.

बभ्रुवाहन ॥ तें ऐकावें सावधान ॥ ह्मणे जैमिनि जनमेजया ॥ ४९ ॥ धर्मानुज हा जनक ॥ कृष्णप्रतापें अश्वरक्षक ॥ ऐसिया पितृ-वधाचें पातक ॥ कोणे तीर्थीं शमवावें ॥ ५० ॥ तरी हें पाप हरावया ॥ जातों हिमाद्रिशिखरालया ॥ तेथें ही सांडोन [1]काया ॥ महापातक हरीन ॥ ५१ ॥ करीन देहांतप्रायश्चित्त ॥ परी मी नोहेंचि पुनीत ॥ ऐसें ऐकोनियां भीम बोलत ॥ वचन काय तयातें ॥ ५२ ॥ जरी तव देहीं असतें पातक ॥ तरी दृष्टीसी पडता काय रमानायक ॥ तूं वृथा करितोसी शोक ॥ कां देहत्याग वांछिसी ॥ ५३ ॥ पातकाची हीच खूण ॥ तेणें अंतरती श्रीकृष्णचरण ॥ हा तों सन्मुख सुप्रसन्न ॥ आतां पातक कासयाचें ॥ ५४ ॥ तुवां क्षात्रधर्म केला ॥ रणीं पिता तोषविला ॥ उभय लोकीं प्रकाशला ॥ कीर्तिदीप आगळा ॥ ५५ ॥ तुझ्याऐसें आह्मीं केलें ॥ रणीं भीष्मद्रोण वधिले ॥ कर्णादिक संहारिले ॥ निजकुळींचे सर्वही ॥ ५६ ॥ जरी देहीं पातक असतें ॥ तरी कृष्णचरण अंतरते ॥ ते आमच्या गृहीं न वागते ॥ ब्रह्मादिकांचे ध्येय जे कां ॥ ५७ ॥ तरी तुवां एक करावें ॥ कृष्णचरण न सोडावे ॥ आणि अश्वातें रक्षावें ॥ पार्थासवें जावोनि ॥ ५८ ॥ तुवां पूर्वीं केली भक्ती ॥ ती येणें न मानिली ख्याती ॥ जेव्हां दाविली वीरख्याती ॥ तेणें हा संतोष पावला ॥ ५९ ॥ ऐसें ऐकतां भीमवचन ॥ बभ्रुवाहनें वंदिले चरण ॥ भीमें दिधलें आलिंगन ॥ तुझेनि वंश धन्य सुता ॥ ६० ॥ मग बोले कमला[2]पती ॥ धन्य बभ्रुवाहना तुझी ख्याती ॥ तूं प्रतापी त्रिजगतीं ॥ पार्थउदरीं जन्मलासी ॥ ६१ ॥ मग देव सत्वर उठिला ॥ पार्थपुत्र आलिंगिला ॥ मग नेवोनि घातला ॥ कुंतीचरणीं श्रीकांतें ॥ ६२ ॥ [3]पृथेनें देवोनि आलिंगन ॥ मांडीवरी बैसविला नंदन[4]नंदन ॥ देती झाली आशीर्वचन ॥ चिरंजीव आणि विजयी तूं होईं ॥ ६३ ॥ मग कृष्णजननींसी भेटला ॥ तिहीं आशीर्वचनें गौरविला ॥ प्रद्युम्नादिकीं आलिंगिला ॥ जयजयकारें गर्जती ॥ ६४ ॥ मग धांवोनि पितृचरण ॥ भावें वंदी बभ्रुवाहन ॥ पार्थें दिधलें आलिंगन ॥ काय वचन बोलत ॥ ६५ ॥ आधीं तुवां पुत्रधर्म केला ॥ मग क्षात्रधर्म संपादिला ॥ कृष्णादिकीं स्तविला ॥ आतां झालासी मम पुत्र ॥ ६६ ॥ नाना वचनें छळिलासी ॥ पादघातें ताडिलें तुजसी ॥ ऐसिया माझ्या कर्तृत्वासी ॥ क्षमा करीं पुत्र-पणें ॥ ६७ ॥ येरू ह्मणे जी किरीटी ॥ म्यां केल्या अपराधकोटी ॥ त्या घालाव्या सर्व पोटीं ॥ करीं धरावें बाळातें ॥ ६८ ॥ मग चित्रां-गदा उलूपी नितंबिनी ॥ भावें लागल्या पृथेचे चरणीं ॥ त्यांसी आलिंगन देउनी ॥ सुवचनें गौरविल्या ॥ ६९ ॥ तैशाच भेटल्या कृष्ण-जननी ॥ त्यांहीं गौरविल्या वस्त्रभूषणीं ॥ ह्मणती धन्य तुह्मी वीरजननी ॥ वीर[5]स्त्रिया पतिव्रता ॥ ७० ॥ जन्मांतरींचें स्मरण ॥ या जन्मीं जेवीं नसे जाण ॥ तेवीं कृष्णप्रतापेंकरून ॥ आपपर कोणा नाठवे ॥ ७१ ॥ मग नगरप्रवेशालागून ॥ प्रार्थना करी बभ्रुवाहन ॥ बरवें ह्मणोनि जगज्जीवन ॥ प्रवेश करीत तेधवां ॥ ७२ ॥ तें नगर देखोनि सर्व जन ॥ निंदिती अमरा[6]धीशपट्टण ॥ जें तुळितां त्रिभुवन ॥

---

१ देह. २ श्रीकृष्ण. ३ कुंतीनें. ४ नातू ( बभ्रुवाहन ). ५ स्त्रिया. ६ इंद्राची नगरी ( अमरावती ).

उणें भासे नगरासी त्या ॥ ७३ ॥ मग देखिली नृपसभा ॥ तीपुढें तुच्छ धर्मसभा ॥ स्वयें देव राहोनि उभा ॥ वर्णन करी अद्भुत ॥ ७४ ॥ जेणें पूर्वी सेविली कांजी ॥ त्यातें कोणी अमृत पाजीं ॥ मग तो निंदी कांजी सहजीं ॥ तो न्याय येथें वर्तला ॥ ७५ ॥ तैसे सर्व पराभव पावले ॥ धृतराष्ट्रादिक त्रासिले ॥ शेषादिक सज्जन गौरविले ॥ आणि पावले सभेप्रति ॥ ७६ ॥ सकळ सभेमाजी बैसले ॥ नाना वस्त्रालंकारीं गौरविले ॥ भोजनपूजनीं मिरविले ॥ आनंदले सर्वही ॥ ७७ ॥ नाना वाद्यें वाजती ॥ पुढें नृत्यांगना नाचती ॥ भाट बिरुदें वर्णिती ॥ जें जें झालें रणांगणीं ॥ ७८ ॥ कृष्णा आणि कुंती जननी ॥ नेवोनि बैसविल्या वरासनीं ॥ अलंकार वस्त्रें समर्पुनी ॥ भावें पूजी पार्थसुत ॥ ७९ ॥ पार्थादिक नृपनाथ ॥ वृषकेतु प्रद्युम्नादि सुत ॥ सर्वांसी पूजोनि चित्रांगीचा सुत ॥ स्तुतिस्तोत्रें गौरवी ॥ ८० ॥ सकळ सेना सेवकगण ॥ तयांसी अलंकार वस्त्रें देऊन ॥ पाववीत समाधान ॥ नाना उपचार करूनि ॥ ८१ ॥ तैशाच उलूपी चित्रांगदा ॥ कुंती देवकी यशोदा ॥ वस्त्रालंकारें आनंदा ॥ ठाव झाला पूजनीं तेथें ॥ ८२ ॥ ऐसे नाना उत्साह केले ॥ घटिकासमान दिवस गेले ॥ सर्व राजे तृप्त झाले ॥ संपत्ति देखोनि तयाची ॥ ८३ ॥ मग कृष्ण बोले भीमासी ॥ कुटुंब घेऊन जावें गृहासी ॥ मी जातों हयरक्षणासी ॥ पार्थासवें निर्धारें ॥ ८४ ॥ पुढें राजे विख्यात ॥ बलाढ्य असती विष्णुभक्त ॥ तेथें होईल युद्ध अद्भुत ॥ ह्मणोनि पार्था मी न सोडीं ॥ ८५ ॥ बरवें ह्मणोनि भीमसेन ॥ सकळ कुटुंब घेऊन ॥ त्वरें निघाला तेथून ॥ गजपुरातें जावया ॥ ८६ ॥ उलूपी चित्रांगी दोघीजणी ॥ कुंतीआदि सुखासनीं ॥ सकळ स्त्रिया निघोनी ॥ परमानंदें चालिल्या ॥ ८७ ॥ मग आज्ञा देवोनि शेषासी ॥ देवें धाडिलें पाताळासी ॥ पुढें सोडिलें श्यामकर्णासी ॥ आपण झाला सारथि ॥ ८८ ॥ नगरीं ठेवोनि प्रधान ॥ सवेंचि निघे बभ्रुवाहन ॥ सेनापतित्व त्याकारण ॥ देता झाला श्रीहरि ॥ ८९ ॥ जनमेजय ह्मणे मुनिवरा ॥ तृप्ति झाली माझिया श्रोत्रा ॥ येरू ह्मणे पुसिल्या उत्तरा ॥ सविस्तर सांगणें घडे जी ॥ ९० ॥ ऐसें पावन हें आख्यान ॥ जे करितील श्रवण ॥ त्यांचें तुटे पुढें बंधन ॥ मोक्षसदनातें पावती ॥ ९१ ॥ पार्थसैन्यसंजीवन ॥ बभ्रुवाहनाचें आख्यान ॥ जे करितील श्रवण पठण ॥ त्यांतें श्रीकृष्ण रक्षित सदा ॥ ९२ ॥ शतावर्तनेंकरून ॥ सर्व व्याधींचें होय हरण ॥ दुःख दरिद्र त्याकारण ॥ न बाधीच काळत्रयीं ॥ ९३ ॥ ही पार्थसंजीवनकथा ॥ केवळ अमृताची सरिता ॥ या सरितेमाजी स्नान करितां ॥ भवभयव्यथा नुरेचि ॥ ९४ ॥ आतां ताम्रध्वज श्यामकर्ण ॥ धरील पुढें तेंचि कथन ॥ तेथें युद्ध होईल दारुण ॥ पार्थ आणि सर्वांतें ॥ ९५ ॥ ती कथा अति सुंदर ॥ ऐकावी धरूनि आदर ॥ जेथें रक्षिता श्रीधर ॥ सर्व भावें पार्थातें ॥ ९६ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ श्रवणें हरी सकळ बंध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ९७ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके पार्थवृषकेतुसंजीवनपूर्वकश्रीकृष्णपार्थबभ्रुवाहननगरप्रवेशो नाम एकचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४१ ॥ ॥ अध्याय ॥ ४१ ॥ ॥ ओव्या ॥ ९७ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ जनमेजय ह्मणे जैमिनी ॥ धन्य धन्य तुझी वाणी ॥ कैवल्याची[1] जी खाणी ॥ उघडोनि दावीं मजलागीं ॥ १ ॥ आधींच गोड कथामृत ॥ तें तुझे मुखें श्रवण अत्यंत ॥ प्राशन करितां तृप्त ॥ जन्ममरणा आंचवती[2] ॥ २ ॥ आधींच क्षीरनिधीचें जीवन ॥ तयावरी पडिले चंद्रकिरण ॥ कुसुमगंधीचा मलयपवन ॥ मिळतां काय ताप उरे ॥ ३ ॥ तेवीं वासुदेवकथामृत ॥ तव मुखें गोड लागत ॥ त्रिविध ताप शमवित ॥ पावे चित्त समाधान ॥ ४ ॥ ऐसी कथा गोड पूर्ण ॥ जे कर्ण टाकिती चाड श्रवण ॥ तीं केवळ मूषकबिळें जाण ॥ कर्णरूपें मिरवती ॥ ५ ॥ कमळजाधवकीर्तना ॥ सर्वथा न वर्णी जी रसना ॥ ती विषवल्लीसमान जाणा ॥ विषयरंगें रंगली ॥ ६ ॥ हरिकथाविरहित जें वदन ॥ तें केवळ मद्यप्याचें[3] भांडें जाण ॥ विषयकृमी परिपूर्ण ॥ निंदादुर्गंधीनें घाणतसे ॥ ७ ॥ यास्तव सांगा जी हरिकीर्तन ॥ सार्थकीं लावा आयुष्यधन ॥ नाहीं तरी काळ चोरून ॥ क्षणक्षणां नेत असे ॥ ८ ॥ नरदेहींचा अर्ध क्षण ॥ न मिळे देतां कोटी सुवर्ण ॥ महद्भाग्यें लाभतां पूर्ण ॥ भवव्यथादुःख दवडावें ॥ ९ ॥ नागपुरा गेलिया भीमसेन ॥ पुढें सोडिला श्यामकर्ण ॥ तो कैसा करिता झाला भ्रमण ॥ तें निरूपण मज सांगें ॥ १० ॥ नृपासी ह्मणे ऋषिवर ॥ तव वाक्यें निवालें अंतर ॥ वक्त्रतरूचें[4] मूळकंदर ॥ सर्वथा सुकों न देसी ॥ ११ ॥ जरी नेत्रीं पडे रोहिणीकांत[5] ॥ तरी मग द्रवों लागे चंद्रकांत ॥ नातरी वना आलिया वसंत ॥ सोडी परभृत[6] निज मौना ॥ १२ ॥ वनांतरीं वत्सजननी ॥ वत्समुख लागतांच स्तनीं ॥ द्रवों लागे मोहपणीं ॥ तेवीं आह्मांतें तूं नृपवरा ॥ १३ ॥ आतां व्हावें सावधान ॥ ऐकावें सर्व निरूपण ॥ जेणें निरसे भवबंधन ॥ हरिचरण जोडती ॥ १४ ॥ पुढें सोडोनि श्यामकर्ण ॥ मागें चालिले कृष्णार्जुन ॥ तों मयूरध्वजाचा नंदन ॥ ताम्रध्वज देखिला ॥ १५ ॥ अश्वमेध करीत मयूरध्वज ॥ तेणें अश्व सोडिला सतेज ॥ तो हय रक्षी ताम्रध्वज ॥ बाहुबळेंकरूनि ॥ १६ ॥ ते हय दोघे एकत्र झाले ॥ वदन अवघ्राण करूं लागले ॥ पश्चिमचरणें ताडूं लागले ॥ करूं लागले युद्धचेष्टा ॥ १७ ॥ एकमेकांतें चाविती ॥ मुक्ताफळमाळा तोडिती ॥ लत्ताप्रहार हाणिती ॥ क्रोधेंकरूनि वक्षस्थळीं ॥ १८ ॥ दशनेंकरून[7] दंशिती ॥ घोर शब्दें हिंसती ॥ ऐशा युद्धगती दाविती ॥ पुनः ताडिती चरणघातें ॥ १९ ॥ ताम्रध्वजें तें देखिलें ॥ जावोनि हयांतें[8] धरिलें ॥ तों मस्तकीं पत्र देखिलें ॥ तें वाचोनि पाहात ॥ २० ॥ सकळ वृत्तांत ते वेळां ॥ ताम्रध्वजें वाचोनि पाहिला ॥ प्रधानाकरीं मग दिधला ॥ पांडवांचा हयराज ॥ २१ ॥ हा कृष्णार्जुनांचा अश्व जाण ॥ रायासी निवेदीं हें वर्तमान ॥ आपण निर्भयअंतःकरण ॥ युद्ध करूं सरसाउनी ॥ २२ ॥ तों प्रद्युम्न अनिरुद्ध हंसध्वज ॥ अनुशाल्व यौवनाश्व वीरराज ॥ बभ्रुवाहन वृषकेतादि समाज ॥ वीरावळी[9] पातल्या ॥ २३ ॥ मग श्येनव्यूह तेणें रचोन ॥ प्रधानाप्रति बोले वचन ॥ माझे पित्यानें अश्वमेध पूर्ण ॥

---

१ मोक्षाची. २ मुकतात. ३ दारूबाजाचें. ४ मुखरूपी वृक्षाचें. ५ चंद्र. ६ कोकिळ. ७ दांतानीं. ८ घोड्याला. ९ वीरसमूह.

साहा संपादन केले हो ॥ २४ ॥ आतां सातवा आरंभिला ॥ त्यानिमित्तें अश्व सोडिला ॥ तों आठवाही प्रगट झाला ॥ अनायासें आह्मातें ॥ २५ ॥ हा पांडवयज्ञाचा अश्व धरिला ॥ तेणें संतोष वाटे मजला ॥ कृष्णावेगळा याग तो मागें केला ॥ आतां सकृष्ण होईल रे ॥ २६ ॥ देवकीचा जो आठवा ॥ तो मनामाजी आठवा ॥ तेणें याग आठवा ॥ सिद्धी झालियापरी भासे ॥ २७ ॥ एक कृष्णासह केलिया याग ॥ ते मागीलही झाले सांग ॥ ऐसें बोलोनि सवेग ॥ युद्ध करावया उदित तो ॥ २८ ॥ तो बकुलध्वज प्रधान ॥ रायाप्रति बोले वचन ॥ तुमचें सैन्य तों गहन ॥ पार्थसैन्य अल्प असे ॥ २९ ॥ बहुत सैन्यासी अल्प सैन्य ॥ केवीं करील भांडण ॥ तेथें एक वीर तो बभ्रुवाहन ॥ तो तंव आमचा मांडलिक ॥ ३० ॥ मुक्ताफळांचे रहंवर[1] सहस्र ॥ प्रतिवर्षीं देतो तो कर-भार ॥ नृत्यकाळीं नर्तकींचे कर ॥ तृप्ति करितो त्या दानें ॥ ३१ ॥ केवळ अनुष्टुप निर्बळ ॥ ऐसें दिसे पांडवदळ ॥ जरी तें करील युद्धकल्लोळ ॥ तरी तें निमेलें[2] एक क्षणें ॥ ३२ ॥ तें नाश पावेल तत्क्षणीं ॥ तृणालागीं जेवीं अग्नि ॥ कीं भेटों आलिया पतंग-श्रेणी ॥ केवीं वांचवी दीपक ॥ ३३ ॥ रायें ऐकोनि प्रधानबोला ॥ मग काय उत्तर बोलिला ॥ मजला मिसळती युद्धाला ॥ वीर दोघेचि पार्थदळीं ॥ ३४ ॥ ते बभ्रुवाहन वृषकेत ॥ हे विख्यात रणीं पंडित ॥ काल नारदें यांची मातें[3] ॥ मजलागीं सांगितली ॥ ३५ ॥ आणि वीर ते कृष्णार्जुन ॥ ते अवतारी नरनारायण ॥ त्यांचा पराक्रम कवण ॥ वर्णू शके या लोकीं ॥ ३६ ॥ प्रद्युम्ना-दिक वीर ॥ सर्वही मिळाले महाशूर ॥ पाहा पांचजन्यस्वर ॥ यॉंदवेश्वर[4] वाजवितो ॥ ३७ ॥ ऐकें नाद अद्भुत ॥ देवदत्त वाजवी कुंतीसुत[5] ॥ सैन्य धांवलें त्वरित ॥ सावध असा रे युद्धासी ॥ ३८ ॥ सर्व युद्धीं कुशल जन ॥ तेणें असावें सावधान ॥ असावध जो तो मरण ॥ पावताहे या लोकीं ॥ ३९ ॥ ऐसें बोलतां ताम्रध्वज ॥ तो पुढें देखे कपिध्वज ॥ त्याप्रति बोले ताम्रध्वज ॥ खग-ध्वजादेखतां[6] ॥ ४० ॥ मजसी करावया समरांगण ॥ सावध व्हावें सर्वजण ॥ तों पार्थाप्रति वचन ॥ यॉंदवेश्वर बोलत[7] ॥ ४१ ॥ पाहा मयूरध्वजाचा नंदन ॥ येणें धरिला श्यामकर्ण ॥ मज भय वाटे दारुण ॥ परम संकट मांडलें ॥ ४२ ॥ बळें अश्व सोडवावा ॥ ताम्र-ध्वज तो जिंकावा ॥ जेवीं मारूनि शंखासुर बरवा ॥ वेद सोडविले वैकुंठपतीनें ॥ ४३ ॥ तरी प्रद्युम्न बभ्रुवाहन ॥ यासीं युद्ध करि-तील जाण ॥ आह्मी युद्धभूमी सांडोन ॥ दूर जाऊं निर्धारें ॥ ४४ ॥ पार्था संग्राम न करावा ॥ ऐसें वाटतें माझ्या जीवा ॥ हा वीर न धरी परवा ॥ कोणाचीही या दळीं ॥ ४५ ॥ याचा पिता नर्मदातीरीं ॥ दीक्षित झाला निर्धारीं ॥ परम शूर असे समरीं ॥ मदन जिंकिला स्वहस्तें ॥ ४६ ॥ क्रोधरहित सत्यवचन ॥ जयाचें निश्चळ ईशभजन ॥ सदाचारी धर्मपरायण ॥ दानीं पाहातां महा-शूर ॥ ४७ ॥ गृध्रव्यूह रचिला दारुण ॥ यासीं योजावा बभ्रुवाहन ॥ तुवां न करावें समरंगण ॥ मम वचन आइकें ॥ ४८ ॥

१ रथ. २ मृत्यू पावेल. ३ गोष्ट. ४ श्रीकृष्ण. ५ अर्जुन. ६ कृष्णासमोर. ७ खरोखर.

प्रद्युम्न वृषकेतु दोघेजण ॥ अनिरुद्ध वीर सनंदन ॥ यासी करितील कंदन ॥ युद्ध दारुण अर्जुना ॥ ४९ ॥ मीही रथारूढ होऊन ॥ युद्ध करीन दारुण ॥ तुज श्रम झाले ह्मणोन ॥ स्वस्थ राहें सुमित्रा ॥ ५० ॥ मग तो रथारूढ रमाकांत ॥ पुढें लोटला वीरांसहित ॥ गृध्रव्यूहाचे द्वारीं सावचित्त ॥ सर्व सैन्य अवलोकी ॥ ५१ ॥ व्यूहमुखीं अनुशाल्व ठेविला ॥ हंसध्वज नेत्रीं स्थापिला ॥ दक्षिणपक्षीं सात्यकी निरोपिला ॥ वामपक्षीं कृतवर्मा ॥ ५२ ॥ गृध्रचरणीं संपूर्ण ॥ स्थापिले अनिरुद्ध प्रद्युम्न ॥ पार्थात्मज कर्णनंदन ॥ चंचुस्थानीं योजिले ॥ ५३ ॥ बहु वीरेंसीं वेष्टित ॥ हृदयीं ठेविला वीर पार्थ ॥ ऐसा कृष्णें व्यूह विख्यात ॥ आत्मसैन्याचा रचिला ॥ ५४ ॥ तीस अक्षौहणी दळाचा पती ॥ ताम्रध्वज महामती ॥ सकळ वीरां त्यजोनि क्षितीं ॥ आधीं कृष्णातें बोलत ॥ ५५ ॥ ह्मणे म्यां धरिला पार्थतुरंग ॥ तुवां सोडवावा सवेग ॥ सावध करीं सैन्य चतुरंग ॥ पार्थ बरवा रक्षावा ॥ ५६ ॥ माझा हा मुक्त श्यामकर्ण ॥ कृष्णा तूं न धरसी त्यालागून ॥ शक्ति नव्हे तुजलागून ॥ तुरंगम धरावया ॥ ५७ ॥ अति चपळ मनतुरंग ॥ तो धरावया समर्थ तूं श्रीरंग ॥ न चाले आणिकाचा लाग ॥ तुजवांचोनि श्रीहरी ॥ ५८ ॥ बरवें युद्ध करावया मजसीं ॥ सावध होईं रे हृषीकेशी ॥ सुदर्शनगदास्त्रेंशीं ॥ सिद्ध असावें यादवेशा ॥ ५९ ॥ तुजसीं युद्ध करावया रणीं ॥ मज भय न वाटे चक्रपाणी ॥ परी सर्वथा संग्राममेदिनी ॥ सांडूं नको श्रीधरा ॥ ६० ॥ तोंवरीच भय धरावें मनीं ॥ जों न देखिला चक्रपाणी ॥ तो गोचर झालिया मनीं ॥ भयहानि सहजचि ॥ ६१ ॥ ऐसें बोलोनि वाग्बाण ॥ मग ताम्रध्वजें युद्ध मांडिलें दारुण ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अति रसाळ परिसावें ॥ ६२ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ श्रवण करितां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ६३ ॥ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके पांडवताम्रध्वजसमागमो नाम द्विचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४२ ॥ ॥
॥ अध्याय ॥ ४२ ॥ ॥ ओव्या ॥ ६३ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥

---

१ युद्ध. २ बभ्रुवाहन. ३ वृषकेतु. ४ पृथ्वीवर.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे परीक्षितिसुता ॥ पुढें कैशी वर्तली कथा ॥ जी वीररसाची दुस्तर सरिता ॥ ती सावधान परिसावी ॥ १ ॥ ऐसें तो कृष्णाप्रति बोलोन ॥ पार्थसैन्यीं वर्षला बाण ॥ नाराच अर्धचंद्राकार जाण ॥ कानाडी ओढोनि वर्षतसे ॥ २ ॥ सत्तर बाणीं पार्थ विंधिला ॥ तीन बाणीं वृषकेतु भेदिला ॥ सिंहनादें गर्जला ॥ ताम्रध्वज महावीर ॥ ३ ॥ पांच पांच बाणें विंधिले वीरगण ॥ दों दों बाणीं अश्व पूर्ण ॥ चहूं चहूं बाणीं वारण ॥ एकेके बाणें पदाती ॥ ४ ॥ सात्यकी नव बाणीं ताडिला ॥ कृतवर्मा अष्ट बाणीं भेदिला ॥ बभ्रुवाहन सात बाणीं खोंचिला ॥ अयुत बाणें प्रद्युम्न अनिरुद्ध ॥ ५ ॥ तें देखोनि कामसुत ॥ तयाप्रति बोलत ॥ ह्मणे पराक्रम दाविला बहुत ॥ अरे शूरा धीर धरीं ॥ ६ ॥ तुवां मम पुरुषत्वा पाहणें ॥ बाणघात ते सोसणें ॥ रणांगणीं भिडणें ॥ आह्मांऐशा वीरांतें ॥ ७ ॥ मग ताम्रध्वज बोले उत्तर ॥ तूं तों मदनाचा पुत्र ॥ तव श्वशुर बाणासुर ॥ तरी युद्ध दावीं करोनियां ॥ ८ ॥ तुझा पिता अनंग जाण ॥ त्याचें कुसुमाचें शरासन ॥ मधुर तयाचा गुण ॥ वसंत प्रधान तयासी ॥ ९ ॥ त्याचा पुत्र तूं अससी ॥ आणि केवढें कर्तृत्व सांगसी ॥ बाणें ध्वजस्तंभीं बांधिलासी ॥ उखेनें रक्षिलें तुजलागीं ॥ १० ॥ आतां होईं सावधान ॥ करीं स्वप्राणरक्षण ॥ बाणें तुझें रे पतन ॥ कृष्णापुढें करीन ॥ ११ ॥ साहें आले अनिवार बाण ॥ जे हरणार तव प्राण ॥ तें अनिरुद्धानें ऐकोन ॥ तयाप्रति बोलत ॥ १२ ॥ बहु भाषणें काय थोर ॥ आतां शर वर्षें तूं दुर्धर ॥ मी तोडीन जेवीं तरुवर ॥ कुठारें छेदोनि पाडिजे ॥ १३ ॥ तेवीं तुजला छेदीन ॥ मग दावीं रे आंगवण ॥ ऐसें बोलोनि मदननंदन ॥ दारुण शर वर्षला ॥ १४ ॥ येरें सोडोनि अपार शर ॥ बाणीं बाण निवारिले समग्र ॥ नव्वद बाणीं स्मरपुत्र ॥ हृदयामाजी खोंचिला ॥ १५ ॥ क्रोधावला बाणजामात ॥ बाण सोडिले असंख्यात ॥ सेनेचा करीत निःपात ॥ मांडिला अनर्थ यादवें ॥ १६ ॥ सोडोनियां चार बाण ॥ चारी अश्व मारून ॥ एक सारथ्याचा प्राण ॥ घेऊन छेदी ध्वजातें ॥ १७ ॥ जैसे विजूचे हुंडे कल्लोळें ॥ तैसे अनिरुद्धें बाण सोडिले ॥ वीरांचे बाहु चरण तोडिले ॥ वेडावले सैनिक रणांगणीं ॥ १८ ॥ किल्येकांचीं शिरें जाण ॥ गगनीं उडवी जेवीं पक्षिगण ॥ तीन कोटी वीर जाण ॥ संहारिले महाशूरें ॥ १९ ॥ कर छेदी मुद्रिकांसहित ॥ ओंठांसहित छेदी दांत ॥ केला थोर आकांत ॥ वीर पळती दशदिशा ॥ २० ॥ मारिल्या अश्वथाटी ॥ तैसेचि गज पाडिले भूतळवटीं ॥ मग त्यासी देवोनि पाठी ॥ वीर पळों लागले ॥ २१ ॥ सैन्याची केली रांडोळी ॥ जेवीं वायु उडवीत धुळी ॥ शरें मारिल्या वीरावळी ॥ उखावदनाजमिलिंदें ॥ २२ ॥ ऐसें उखाधवें युद्ध केलें ॥ तीन अक्षौहिणी दळ मारिलें ॥ ताम्रध्वजातें विरथ केलें ॥ धनुष्य छेदिलें हातींचें ॥ २३ ॥ ऐसा त्याचा पराक्रम ॥ देखोन कोपला नृपोत्तम ॥ मग करिता झाला संग्राम ॥ तो सावध चित्तें ऐकावा ॥ २४ ॥

१ नदी. २ बाण. ३ अनिरुद्ध. ४ धनुष्य. ५ पडणें, पराभव. ६ कुऱ्हाडीनें. ७ किल्ला इत्यादिकांचे उंच बुरूज. ८ पृथ्वीवर. ९ अनिरुद्धानें. १० सैन्य.

सभोंवतें पाहे नरपती ॥ तों अनिरुद्धबाणाग्नीनें जळती ॥ पतंगवत् भस्म होती ॥ रथ जळती धडधडां ॥ २५ ॥ ताम्रध्वजें सोडोनियां शर ॥ विरथ केला कामपुत्र ॥ ध्वज छेदिला पवित्र ॥ क्षणमात्र नलगतां ॥ २६ ॥ अनिरुद्ध वीर गाढा ॥ अग्निमुख बाण सोडी कुन्हाडा ॥ तेणें रथ जळाला भडभडां ॥ ताम्रध्वज बैसला दुजे रथीं ॥ २७ ॥ ताम्रध्वजें शक्ति दारुण ॥ सोडितां हृदयीं भेदली पूर्ण ॥ तेणें मूर्च्छा ये दाटोन ॥ अनिरुद्ध पडला भूमंडळीं ॥ २८ ॥ तें देखोनियां जाण ॥ बळें लोटला प्रद्युम्न ॥ पांच बाणेंकरून ॥ ताम्रध्वज विंधिला ॥ २९ ॥ येरें सोडोनि एक शर ॥ मूर्च्छित पाडिला कृष्णपुत्र ॥ मग गर्जिन्नला महाथोर ॥ गाजवी अंबर वीरशब्दें ॥ ३० ॥ ह्मणे कां नयेचि पुरुषोत्तम ॥ मज युद्ध करावया उत्तम ॥ तेणें माझा पूर्णकाम ॥ सर्व होता रणांगणीं ॥ ३१ ॥ ऐसें बोलतां ताम्रकेत ॥ तयातें पाचारी वृषकेत ॥ ह्मणे युद्धाचें सामर्थ्य ॥ मजपुढें दावीं कां ॥ ३२ ॥ ऐसें वृषकेतें बोलून ॥ तीक्ष्ण सोडिले पांच बाण ॥ तेणें रथाश्व सारथि जाण ॥ चूर्ण केला समरांगणीं ॥ ३३ ॥ तंव घेऊनि दुजा रथ ॥ तयावरी बैसे ताम्रकेत ॥ सवेंचि कर्णात्मजें विरथ ॥ केलें तयाकारणें ॥ ३४ ॥ जो जो रथ घेत विचित्र ॥ तो तो छेदीत कर्णपुत्र ॥ यापरी शतत्रय रथ थोर ॥ कर्णात्मजें छेदिले ॥ ३५ ॥ मग काळानळासमान ॥ शर वर्षे ताम्रकेतन ॥ मूर्च्छित पडिला कर्णनंदन ॥ अर्ध क्षण नलगतां ॥ ३६ ॥ मग ताम्रध्वजें विचारोन ॥ सोडिता झाला काळबाण ॥ घायाळ केलें सकळ सैन्य ॥ वीरें वीर खिळियेले ॥ ३७ ॥ गज अश्व महारथी ॥ पदाती आणि उष्ट्रजाती ॥ पांच पांच बाणें क्षितीं ॥ मूर्च्छित पाडिले एकसरां ॥ ३८ ॥ वीरें वीर पाडिला ॥ उरल्या सैन्या पळ सुटला ॥ हाहाकार प्रवर्तला ॥ पार्थसैन्यीं तेधवां ॥ ३९ ॥ शत बाणीं मूर्च्छित ॥ अनुशाल्व पाडिला तेथ ॥ शौर्य सोडोनि निचेष्टित ॥ रणांगणीं तो पडिला ॥ ४० ॥ सवेंचि केलें लाघव ॥ मूर्च्छित पाडिला यौवनाश्व ॥ ताम्रध्वज बळार्णव ॥ सकळ वीर पाडिले ॥ ४१ ॥ तंव सात्यकी वीर धांवला ॥ सहस्र बाणीं तो पाडिला ॥ मग सिंहनादें गर्जेला ॥ महावीर ताम्रध्वज ॥ ४२ ॥ बाण सोडिले सहस्र दोनी ॥ कृतवर्मा खिळिला समरांगणीं ॥ ऐसें कौतुक करोनी ॥ कृष्णार्जुनांतें लक्षिलें ॥ ४३ ॥ जेवीं साधक स्वसाधनें ॥ निवारोनि अनेक विघ्नें ॥ दृश्य मारोनि द्रष्टेपणें ॥ लक्षितसे निजधैर्यें ॥ ४४ ॥ ताम्रकेतें वीर पाडिले ॥ ते भूमीवरी कैसे शोभले ॥ जेवीं स्वर्गींहून चेवेले ॥ पुण्य सरतां मृत्युलोकीं ॥ ४५ ॥ शेवटीं धांवला बभ्रुवाहन ॥ क्रोधें विंधिला ताम्रकेतन ॥ रथ अश्व सारथि संपूर्ण ॥ बाणघातें छेदिला ॥ ४६ ॥ क्रोधें बोले ताम्रध्वज ॥ साहें रे माझे बाण तेजःपुंज ॥ तुझे बाणाचें कर्ते काज ॥ जे मुक्तीतें देती तूतें ॥ ४७ ॥ तूं प्रतिवर्षीं आह्मांलागून ॥ देसी मुक्ताफळें आणोन ॥ त्याचें फळ तें मुक्तिसदन ॥ पावसी तूं आतांची ॥ ४८ ॥ बभ्रुवाहनें सहस्र बाण ॥ सोडोन विंधिला ताम्रकेतन ॥ एके बाणें चाप छेदून ॥ मुगुट पाडिला

१ आकाशमंडळ. २ तीनशें. ३ वृषकेतु. ४ पडले. ५ धनुष्य.

धरणीसी[1] ॥ ४९ ॥ बाणभाता छेदिला ॥ ताम्रध्वज मूर्च्छित पाडिला ॥ परी तो वीर आगळा[2] ॥ सवेंचि आरूढे रथावरी ॥ ५० ॥ एकामागें एक रथ ॥ छेदिले त्याचे सात शत ॥ धनुष्यें छेदिलीं पांच शत ॥ छिन्न भिन्न झाला ताम्रध्वज ॥ ५१ ॥ मग वरुणदत्त ते वेळां ॥ दिव्य शर तो काढिला ॥ अकस्मात सोडितां बैसला ॥ पार्थसुताचे हृदयावरी ॥ ५२ ॥ तेणें मूर्च्छना घोर दाटली ॥ बभ्रुवाहन पडिला रथातळीं ॥ भूषणें मुक्कें विखुरलीं ॥ तया महावीराचीं ॥ ५३ ॥ मुखें करून कृष्णस्मरण ॥ पुढें धांवला ताम्रकेतन ॥ तयातें वीर देखोन ॥ नेत्र झांकिती मृतप्राय ॥ ५४ ॥ कित्येक करिती पलायन ॥ कोणी सोडोनियां वहन ॥ प्रेतांमाजी जावोन ॥ प्राण आपुला लपविती ॥ ५५ ॥ वीर सकळही खिळिले तेथ ॥ हंसध्वजही पाडिला मूर्च्छित ॥ रण हुंबों[3] लागलें बहुत ॥ महा आकांत प्रवर्तला ॥ ५६ ॥ आपुलाले घेऊनि प्राण ॥ सर्व करिती पलायन ॥ परी कोणी कोणा नोळखती जाण ॥ ऐसें दारुण युद्ध तें ॥ ५७ ॥ कोणी शस्त्रें त्यजिती ॥ कोणी वस्त्रांतें टाकिती ॥ थरथरां ते वीर कांपती ॥ ऐसें घेतलें भय सैन्यें ॥ ५८ ॥ कोणी रत्कीं बुड्या देती ॥ कोणी मीनाकृती पोंहती ॥ कोणी मृतमिषें दडती ॥ शर सोडील ह्मणोनियां ॥ ५९ ॥ मग पार्थातें वीर बोलत ॥ धांव रे काय पाहसी अंत ॥ तुज गोत्रवधाचें प्रायश्चित्त ॥ बरवें दिधलें ताम्रध्वजें ॥ ६० ॥ श्यामकर्णातें तुवां सोडून ॥ आमुचे घेवविले रे प्राण ॥ काय याचें यागपुण्य ॥ दडसी कां रे मागें आतां ॥ ६१ ॥ ऐकोनियां वीरभाषण ॥ पार्थ झाला हास्यवदन ॥ तयांसी ना भी ना भी ह्मणोन ॥ पळतें सैन्य स्थिर केलें ॥ ६२ ॥ यावरी ताम्रध्वज आणि कपिध्वज ॥ दारुण करिती पुढें झुंज ॥ तें श्रोतीं श्रवण सहज ॥ कौतुकें करोनि ऐकावें ॥ ६३ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ श्रवण करितां पाप विविध ॥ नाशाप्रति पावेल ॥ ६४ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके ताम्रध्वजकृतसकलसैन्यपराभवो नाम त्रिचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४३ ॥ अध्याय ॥ ४३ ॥ ओव्या ॥ ६४ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥

---

१ पृथ्वीवर. २ शौर्यानें विशेष. ३ कण्हूं लागलें.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे नृपवरा ॥ ऐकें पूर्वजकथागुणसागरा ॥ ताम्रध्वज आणि धनुर्धरा ॥ दारुण संग्राम झाला तो ॥ १ ॥ क्रोधावला वीर पार्थ ॥ नव बाण सोडिले अद्भुत ॥ तेणें तयाचा हृदयप्रांत ॥ फोडोनि पाडिला धरणीवरी ॥ २ ॥ तो महारथिशिरोमणी ॥ आणिके रथीं बैसोनी ॥ वर्षला तो बाणश्रेणी ॥ पर्वतावरी मेघ जैसा ॥ ३ ॥ सुभद्रापति क्रोधावला ॥ शिलीमुख बाण वर्षता झाला ॥ देवदत्त शंख वाजविला ॥ उभा रे उभा ह्मणतसे ॥ ४ ॥ ताम्रध्वजाचा रथ छेदून ॥ सारथि मारिला नलगतां क्षण ॥ हें देखोनि विंदान ॥ ताम्रध्वजें दाविलें ॥ ५ ॥ मग सोडोनि पांच बाण ॥ हृदयीं भेदिला अर्जुन ॥ ह्मणे सोडूं नको रे आंगवण ॥ धीर धरीं रे अर्जुना ॥ ६ ॥ मातें जिंकोनि सुभद्रापति ॥ जाऊं इच्छिसी नगराप्रति ॥ परी अश्व आणि तव सारथि ॥ तुजसहित राखें आतां ॥ ७ ॥ ऐसें बोलोन ते वेळां ॥ नाना बाण सोडिता झाला ॥ रणीं अर्जुन त्रासिला ॥ महावीरें ताम्रध्वजें ॥ ८ ॥ मग पार्थें कोपेंकरून ॥ एकामागें एक स्यंदन ॥ एकसहस्र केले चूर्ण ॥ तया ताम्रध्वजाचे ॥ ९ ॥ सर्वेचि तो रथीं बैसोन ॥ पार्थावरी सोडीत बाण ॥ सहस्र बाणें अर्जुन ॥ मूर्च्छित केला समरांगणीं ॥ १० ॥ मग मूर्च्छा सांवरी पार्थवीर ॥ सोडोनियां लक्ष शर ॥ भूतळीं पाडिला पुत्र ॥ मयूरध्वजाचा तेधवां ॥ ११ ॥ येरें मूर्च्छना सांवरून ॥ पार्थावरी टाकिले सहस्र बाण ॥ तीन योजनें प्रमाण ॥ रथ त्याचा उडविला ॥ १२ ॥ तों सर्वेचि आला पार्थरथ ॥ देखोनि कोपला ताम्रकेत ॥ मग भेदिला वाम हस्त ॥ निजबाणेंकरूनि ॥ १३ ॥ तेणें क्रोधावला श्वेतवाहन ॥ सोडोनियां कोटी बाण ॥ तयाचा रथ उडवोन ॥ ध्रुवमंडळा पाठविला ॥ १४ ॥ मग शरजाळेंकरून ॥ आटिलें त्याचें सकळ सैन्य ॥ रक्तनिम्नगा भरून ॥ माजी प्रेतें वाहती ॥ १५ ॥ ते वेळां ताम्रध्वज कोपला ॥ भूमंडळासी उतरला ॥ कनकचित्रित शर वर्षला ॥ घाबरा केला अर्जुन ॥ १६ ॥ दोघे शस्त्रास्त्रीं निपुण ॥ युद्ध करिती दारुण ॥ वीरश्रीनें व्यापिले पूर्ण ॥ नसे भान तयांतें ॥ १७ ॥ धन्य वीर श्वेतवाहन ॥ पांच अक्षौहिणी सैन्य पूर्ण ॥ ताम्रध्वजाचें मारोन ॥ त्रासिला बहुत संग्रामीं ॥ १८ ॥ ताम्रध्वजें पार्थसैन्य ॥ अयुतसंख्य मारिलें जाण ॥ नाटोपती कोणी कोणालागून ॥ स्वजयातें इच्छिती ॥ १९ ॥ मग ताम्रध्वजें काय केलें ॥ धनुष्याचें शीत छेदिलें ॥ अर्जुनातें भेदिलें ॥ हृदयीं आणि मस्तकीं ॥ २० ॥ पार्थ खवळला दारुण ॥ रथ छेदिला नलगतां क्षण ॥ अश्व सारथि ध्वज जाण ॥ छेदोन पाडी शक्रात्मज ॥ २१ ॥ जो जो रथ घेई ताम्रकेत ॥ तो तो रथ छेदी कुंतीसुत ॥ ऐसें रथांचें गणित ॥ दहा सहस्र जाहलें ॥ २२ ॥ पार्थबाणें छिन्नभिन्न ॥ झाला परी तो न सांडी रण ॥ तुटोनि पडिले मांसकण ॥ वातें त्याचे शरीराचे ॥ २३ ॥ पवन लागतां मांसगोळे ॥ येवोनि कृष्णमस्तकीं पडिले ॥ नेणों पुष्पभार समर्पिले ॥ भक्तराजें देवासी ॥ २४ ॥ ऐसें त्रैलोक्यमोहन ॥ युद्ध झालें अति दारुण ॥ सप्त दिन

१ पराक्रम. २ रथ. ३ अर्जुन. ४ रक्ताची नदी. ५ दहा हजार. ६ अर्जुन. ७ त्रैलोक्यास मोह पाडणारें.

एक क्षण ॥ विराम नाहीं दोघांतें ॥ २५ ॥ रात्रंदिवस दोघे वीर ॥ युद्ध करिती घोरांदर ॥ तें देखोनि सुरवर ॥ परमाश्चर्य मानिती ॥ २६ ॥ मग ताम्रध्वजें काय केलें ॥ करीं पार्थरथातें धरिलें ॥ खगन्यायें उड्डाण केलें ॥ तें देखिलें सकळिकीं ॥ २७ ॥ सक्रोध जेवीं सुपर्ण ॥ जाय घेऊनि सर्प दारुण ॥ तेवीं रथातें घेऊन ॥ ताम्रध्वज उडाला ॥ २८ ॥ आकाशींहूनि टाकिला अकस्मात ॥ तो रुक्मिणीकांतें देखिला त्वरित ॥ मग उठोनियां तो रथ ॥ पुष्पप्राय झेलिला ॥ २९ ॥ ताम्रध्वज ह्मणे जनार्दना ॥ म्यां पार्थरथ नेला गगना ॥ तेथोनि टाकितां रणांगणा ॥ तुवां केलें लाघव ॥ ३० ॥ इतुकियानें थोर झालासी ॥ कां मनामाजी आनंदलासी ॥ पाहें आतां मम बळासी ॥ कोठें पळसी यावरी ॥ ३१ ॥ तुझीं लपावयाचीं स्थानें ॥ सर्वही कृष्णा मी जाणें ॥ तूं सेविसी साधूंचीं मनें ॥ तेथूनि सर्वदा न निघसी ॥ ३२ ॥ भावार्थपर्वतीं धांवसी ॥ भक्तहृदयदरीमाजी दडसी ॥ कीं सत्कीर्तनामाजी अससी ॥ भक्तबळें निर्भय ॥ ३३ ॥ जेव्हां काळयवनभेणें पळालासी ॥ तेव्हां मुचकुंदें रक्षिलें तुजसी ॥ माझ्या भयें कोठें दडसी ॥ भक्तसखया तें सांग ॥ ३४ ॥ ऐसें ऐकतां वचन ॥ क्रोधें खवळला जनार्दन ॥ गदा घेऊनि दारुण ॥ मस्तकीं त्याचे ताडिली ॥ ३५ ॥ तेणें छिन्नभिन्न मस्तक झाला ॥ परी तेणें पडत पडत आवरिला ॥ अमित बाणें विंधिला ॥ रुक्मिणीवल्लभ तेधवां ॥ ३६ ॥ मग कृष्ण बोले अर्जुनातें ॥ सावधपणें बैसें रथातें ॥ तुह्मी आह्मी ताम्रध्वजातें ॥ जिंकों सत्वर यावरी ॥ ३७ ॥ हा तों बळें आगळा[३] वीर ॥ तूं तों महा धनुर्धर ॥ मीही असें चक्रधर ॥ दोघे भांडों ययासी ॥ ३८ ॥ याचे बाणें पीडा पावली ॥ सेना पाहें पळाली ॥ बभ्रुवाहनादि महाबळी ॥ तेही मूर्च्छित पाडिले ॥ ३९ ॥ गांडीवीं योजीं नाराचें[४] ॥ छिन्नांग करीं ययाचें ॥ निवारण करीं बाणांचें ॥ जे कां येती काळदंडासम ॥ ४० ॥ एकासीं दोघीं न भांडावें ॥ हें नीतिकार्य क्षात्रभावें ॥ ऐसियासी दावावें ॥ पुरुषत्व आपुलें अर्जुना ॥ ४१ ॥ जयद्रथवधीं जाण ॥ दिवसा लपविला म्यां तपन ॥ रक्षिला तेथें तुझा प्राण ॥ तोचि समय येथें दिसे ॥ ४२ ॥ म्यां पण केला भीष्माप्रति ॥ सर्वथा शस्त्र न धरीं हातीं ॥ तुजनिमित्त सुभद्रापति ॥ असत्य प्रतिज्ञा जाहली ॥ ४३ ॥ तूं होईं यासी विमुख ॥ आणि मी होतों याचे सन्मुख ॥ यातें जिंकोनि हरिखें[५] ॥ दोघे पावों पार्थवीरा ॥ ४४ ॥ मग दोघे मिळोनि सोडिती बाण ॥ भांडती नरनारायण[६] ॥ तथापि नाटोपे नंदन ॥ मयूरध्वजाचा रणांगणीं ॥ ४५ ॥ तेणें सोडोनियां बाण ॥ दोघांचेही छेदिले गुण[७] ॥ मग होऊनियां आनंदवदन ॥ कृष्णाप्रति अनुवादे ॥ ४६ ॥ तूं तों पार्थाचा पूर्वी होतास सारथी ॥ कां सांडिलें त्यास रथीं ॥ आतां होऊनियां महारथी ॥ मजसीं युद्ध आरंभिलें ॥ ४७ ॥ हें कर्म न साजे तुजला ॥ आवरीं पार्थाचे अश्वांला ॥ तुवां रथीं बैसोनि गोपाळा ॥ सारथ्य त्याचें करावें ॥ ४८ ॥ होईं सारथि जनार्दना ॥ आवरीं ह्या रे वल्गना ॥ ऐशा ऐकतां वचना ॥

---

१ गरुड. २ कृष्णानें. ३ अधिक, मोठा. ४ बाण. ५ हर्षे. ६ अर्जुन आणि कृष्ण. ७ धनुष्याच्या दोऱ्या.

अश्वदोर धरिले देवें ॥ ४९ ॥ हातीं धरून अश्वदोरे ॥ रथ फेरीत असे त्वरें ॥ तेव्हां बोलिजे सर्व वीरें ॥ भारती युद्ध मांडिलें ॥ ५० ॥ परम क्रोधें रमावर ॥ समीप नेला रथ थोर ॥ स्वहस्तें सारथियाचें शिर ॥ ताडितसे निकरें तो ॥ ५१ ॥ सुचित्रध्वज सावधान ॥ दश बाणें ताडिला जनार्दन ॥ साठी बाणीं श्वेतवाहन[1] ॥ विंधोनियां गर्जला तो ॥ ५२॥ बाणें अर्जुनाचें छत्र पाडिलें॥ शत बाण कृष्णातें मारिले ॥ कृष्ण पार्थाप्रति बोले ॥ काय पाहातोसी रे वीरा ॥ ५३ ॥ मग अर्जुनें सोडोनि बाण ॥ ताम्रध्वजाचा रथ केला चूर्ण ॥ गात्रें केलीं छिन्नभिन्न ॥ रक्तपूर सूटला ॥ ५४ ॥ तो उडोन आला पार्थावर ॥ परी पार्थरथीं रमावर ॥ लत्ता-प्रहारें करूनि दूर ॥ उडविलें तयालागीं ॥ ५५ ॥ होतां कृष्णाचा लत्ताप्रहार ॥ धरेणीवरी[2] पडिला तो नृपवर ॥ मग उठोनि सत्वर ॥ गजावरी बैसला ॥ ५६ ॥ तो गज मारिला अर्जुनें ॥ पुनः केलें रथीं ठाणें ॥ तोही रथ छेदितां अर्जुनें ॥ पुनः गजीं आरूढला ॥ ५७ ॥ गजीं बैसोनि नृपनंदन ॥ बाणीं व्यापिले कृष्णार्जुन ॥ अश्वासहवर्तमान ॥ रथ भोंवंडी चक्रापरी ॥ ५८ ॥ जेवीं गारोडी वारी मूर्च्छना ॥ उठतां ऊर्ध्व करिती माना ॥ पुनः गांवगुंड टाकितां कणा ॥ पडती तैसेचि वीर पडती ॥ ५९ ॥ बभ्रुवाहनादिक वीर ॥ सावध होऊनि उठतां सत्वर ॥ बाणघातें नृपपुत्र ॥ उठों नेदी तयांतें ॥ ६० ॥ ऐसें युद्ध करितां सुचित्रकें ॥ नेत्रीं देखिलें रमानायकें ॥ मग उभा राहोनियां तवकें ॥ चक्र हस्तीं घेतसे ॥ ६१ ॥ तेव्हां डळमळिला भूगोळ ॥ देवांसी वाटे प्रळयकाळ ॥ समुद्रीं झाला हलकल्होळ ॥ सूर्य कांपे आकाशीं ॥ ६२ ॥ तळीं शेषादि सर्प भ्याले ॥ धाकें कुंडलाकार पडिले ॥ सकळ वीरीं नेत्र झांकिले ॥ क्रोध हरीचा देखोनि ॥ ६३ ॥ देवें चक्र धरिलें जाणोन ॥ नृपात्मजें गज दिधला सोडोन ॥ सत्वर आला धांवोन ॥ कृष्णासन्मुख स्वानंदें ॥ ६४ ॥ मग चक्र सोडोनि श्रीअनंतें ॥ सैन्य मारिलें अक्षौहिणीशतें ॥ उरलें सैन्य वाता-हतें॥ होऊनि गेलें दिगंता ॥ ६५ ॥ यावरी ताम्रध्वज खगध्वज ॥ बरवा करितील वीररसराज ॥ तें पुढिलें प्रसंगीं निरूपणबीज ॥ वाढेल जाणा अवधारा ॥ ६६ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ श्रवणें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ६७ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके ताम्रध्वजकृष्णार्जुनसंग्रामो नाम चतुश्चत्वारिंशोऽध्यायः ॥ ४४ ॥ अध्याय ॥ ४४ ॥ ॥ ओव्या ॥ ६७ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥

---

१ अर्जुन. २ पृथ्वीवर.

श्रीगणेशाय नमः॥ ॥ जैमिनि ह्मणे नृपती ॥ ऐकावी कथा भारती ॥ श्रवणमात्रें दोष पळती ॥ जीवन्मुक्ति देतसे ॥ १ ॥ क्रोधें-
करून देवकीतनय ॥ सेनेचा केला क्षणें क्षय ॥ ऐसें देखोनियां नृपतनय ॥ तयासी बोले ताम्रध्वज ॥ २ ॥ जैसा सद्गुरुकृपेंकरून ॥
बोध निवारी कुलक्षण ॥ मग प्रगट दावी स्वरूप चिद्धन ॥ परम सुख पावावया ॥ ३ ॥ तैसें हें मायार्णवसैन्य ॥ याचें केलें तुवां
निरसन ॥ आतां देखिलें सहसुदर्शन ॥ बरवें रूप स्वामिया ॥ ४ ॥ ही देखतां स्वरूपस्थिती ॥ आतां न सोडींच कल्पांतीं ॥ डांक
कैनकीं जडे निश्चिती ॥ तैसा तवांगीं जडेन मी ॥ ५ ॥ पूर्वीं पुण्यें होतीं केलीं ॥ तीं मागिल्या युद्धीं समर्पिलीं ॥ आतां तनु मात्र
उरली ॥ ती या युद्धीं समर्पावी ॥ ६ ॥ तूं अर्जुनाचा अससी ऋणी ॥ त्यासी वांचविसी पुण्य देउनी ॥ आतां काय करिसील
शंखपाणी ॥ भांडवल होतें तें सरलें ॥ ७ ॥ पार्थासहित तुज देवा ॥ आतां धरीन सत्य माधवा ॥ माझ्या जनकाचा यज्ञठेवा ॥
त्याचें दैवत करीन ॥ ८ ॥ ऐसी बोलोनियां मात ॥ दक्षिण हस्तें धरिला चक्रहस्त ॥ घेवोनियां उडों जों पाहात ॥ तों देवें वाम
चरण झाडिला ॥ ९ ॥ चरणांबुज झाडितां देव ॥ दुरी जावोनि पडे पार्थिव ॥ पुनः धरोनियां धैर्यभाव ॥ पाचारिलें अर्जुना ॥ १०॥
कृष्णआज्ञेंकरूनि पार्थ ॥ मारिता झाला बाण शत ॥ ते ताम्रध्वजाचे हृदयांत ॥ सपिच्छ तेव्हां बुडाले ॥ ११ ॥ महावीर तो ताम्र-
केत ॥ उडोनियां अकस्मात ॥ पार्थ आणि रमानाथ ॥ धरिले दोघे दों हस्तकीं ॥ १२ ॥ उडोनियां गेला गगनातें ॥ तों देवकी-
सुतें हाणीतला लातें ॥ तिघेही कोसळले भूमीतें ॥ परम मूर्च्छा पावले ॥ १३ ॥ परी तो सावध झाला सत्वर ॥ तों अश्व पावले
नगरद्वार ॥ मग उरलें सैन्य घेवोनि समग्र ॥ ताम्रध्वज परतला ॥ १४ ॥ त्या रत्नपुरासमीप ॥ घातले असती यागमंडप ॥ तेथें
बैसला पुण्यदीप ॥ मयूरध्वज आनंदें ॥ १५ ॥ करीं यागकंकण बांधिलें ॥ कृष्णाजिन प्रावरण केलें ॥ हस्तीं मृगशृंग घेतलें ॥
असिपत्रव्रतेंसीं ॥ १६ ॥ ऐसा राजा पवित्र ॥ मुखें जपत नामस्तोत्र ॥ तों अश्वद्वयेंसीं युक्त पुत्र ॥ देखोनियां काय बोले ॥ १७ ॥
अद्यापि वर्ष नसे भरलें ॥ तों मध्येंचि कां अश्व आणिले ॥ दुजें अश्वरत्न तुवां धरिलें ॥ तें कवण रायाचें मज सांगें ॥ १८ ॥ ऐकोनि
बोले ताम्रध्वज ॥ अश्वमेध करितो धर्मराज ॥ त्याचा हय हा कपिध्वज ॥ गरुडध्वज राखिती ॥ १९ ॥ कृष्णात्मज बभ्रुवाहन ॥
हंसध्वजादि सर्व सैन्य ॥ करिती सर्व रक्षण ॥ तो श्यामकर्ण आणिला म्यां ॥ २० ॥ तेथें युद्ध झालें दारुण ॥ हय आणिला त्यांस
जिंकोन ॥ तें तुह्मांस सांगेल प्रधान ॥ समूळ कथन झालें तें ॥ २१ ॥ मग बोले मयूरध्वजाचा प्रधान ॥ राया युद्ध झालें दारुण ॥
मूर्च्छित पाडिलें सकळ सैन्य ॥ बभ्रुवाहनासमवेत ॥ २२ ॥ मग सरसावले कृष्णार्जुन ॥ तयांसीं बहुत समरांगण ॥ होतां मारिलें
आपुलें सैन्य ॥ सकळही कृष्णार्जुनें ॥ २३ ॥ तेही मूर्च्छित पाडिले ॥ तों अश्व नगरासी आले ॥ त्यांपाठीं सैन्य उरलें ॥ घेऊनी आह्मी

१ आनंदस्वरूप. २ नाश. ३ सोन्याचे ठिकाणीं. ४ पांचजन्य नामक शंख ज्याच्या हातांत आहे अशा. ५ हरिणाजिन. ६ अर्जुन. ७ कृष्ण.

परतलों ॥ २४ ॥ सद्गुरु वाक्येंकरून ॥ छेदी सच्छिष्याचें अज्ञान ॥ मग निजस्वरूप भोगी आपण ॥ अक्षयधामीं बैसोनि ॥ २५ ॥ तेवीं सकळ सैन्य जिंकोन ॥ विजयी झाला तव नंदन ॥ घेवोनियां श्यामकर्ण ॥ निजनगरीं प्रवेशला ॥ २६ ॥ सावध होवोनि कृष्णार्जुन ॥ पुढें काय करितील पूर्ण ॥ हें तों न कळे विंदाण ॥ मयूरध्वज राजया ॥ २७ ॥ राव ह्मणे पुत्रा पापिष्ठा ॥ काय तुवां केल्या मर्कटचेष्टा ॥ कैसें सोडिलें वैकुंठपीठा ॥ तया नरासमवेत ॥ २८ ॥ तूं तों पंढ वीर खरा ॥ विमुख झालासी हरि आणि नरा ॥ प्राकृत हरि आणिला घरा ॥ मूर्ख पुत्रा कृतघ्ना रे ॥ २९ ॥ पतिरहित पतिव्रता ॥ दैवें पतिसंग झाला अवचिता ॥ तों तयेसी निद्रा येतां ॥ अंतर पडे सुखासी ॥ ३० ॥ तया हरीविण माझा याग ॥ सर्वथाही नव्हे सांग ॥ जरी आणितासी श्रीरंग ॥ तरी सार्थक होतें जन्माचें ॥ ३१ ॥ कीं स्नान करितां गंगाजळीं ॥ पापियाची बैसली दांतखिळी ॥ नातरी निधान देखिलिया वेळीं ॥ नेत्रीं अंधारी जेवीं दाटे ॥ ३२ ॥ बळें घालितां अमृत मुखीं ॥ तें कांजी ह्मणोनियां थुंकी ॥ कीं परीस लाधला हातीं ॥ तो पाषाण ह्मणोनि उडविला ॥ ३३ ॥ तैसे सोडोनि नरनारायण ॥ कां रे आणिला श्यामकर्ण ॥ जळो तुझें मूर्खपण ॥ दुष्टा वदन न दाखवीं ॥ ३४ ॥ तोडोनियां तुळसीवन ॥ कंटकवृक्ष लाविसी आणोन ॥ दवडोनियां चंदन ॥ एरंड कासया आणिला ॥ ३५ ॥ टाकूनियां चंपकमाळा ॥ धत्तूरपुष्प बांधिलें गळां ॥ तैसा देव तुवां त्यजिला ॥ पशु आणिला कासया रे ॥ ३६ ॥ सहस्रवदनशयन[४] हरि सोडिला ॥ चतुष्पाद आदरिला ॥ आग लागो तुझिया मूर्खपणाला ॥ कुळांगार कुपुत्र तूं ॥ ३७ ॥ जयाकारणें योगेश्वर ॥ करिती नाना साधनप्रकार ॥ तथापि त्यांस नव्हे गोचर ॥ तो तुवां कैसा दवडिला ॥ ३८ ॥ तूं भक्तपुत्र ह्मणोन ॥ त्यांहीं तुज दिधला मान ॥ नाहीं तरी त्यां त्रिभुवन ॥ न पुरेल एका शरातें ॥ ३९ ॥ ऊठ कुपुत्रा चांडाळा ॥ तें स्थळ दावीं रे मजला ॥ पार्थासहित कृष्णाला ॥ प्रार्थोनि आणीन आनंदें ॥ ४० ॥ अश्वाचें काय कारण ॥ यागदीक्षा मी सांडीन ॥ परी नरनारायणां[५] आणीन ॥ पावन मंदिर करावया ॥ ४१ ॥ तों इकडे वृत्तांत काय झाला ॥ कृष्णार्जुन सावध होऊनि ते वेळां ॥ ह्मणती अश्व ताम्रध्वजें नेला ॥ चला वेगें त्या स्थळीं ॥ ४२ ॥ श्रीहरि ह्मणे पार्थासी ॥ अश्व नेला रत्नपुरासी ॥ तो अलभ्य आतां आह्मांसी ॥ जेवीं अज्ञाना ईश्वर ॥ ४३ ॥ जो कां अजेय इंद्रासी ॥ तो मयूरध्वज हा परियेसीं ॥ तेथें जाऊं त्वरेंसीं ॥ सत्व याचें पाहावया ॥ ४४ ॥ सकळ सैन्य येईल मागून ॥ पुढें जाऊं आपण दोघेजण ॥ मग स्वरूपें पालटोन ॥ कृष्णार्जुन चालिले ॥ ४५ ॥ तों देखिलें रत्नपुर ॥ दुजें ओतिलें इंद्रनगर[६] ॥ तेथिंच्या वर्णनीं विचार ॥ सहस्रवदना होतसे ॥ ४६ ॥ भोंवतें शोभे उद्यान[७] ॥ जें नंदनवनासमान ॥ नद नदी त्यांसमान ॥ सरोवरें असंख्य ॥ ४७ ॥ कनकवर्ण[८] दुर्गप्राकार[९] ॥ तेणें भेदलें अंबर ॥ परिघ तो पंचम सागर ॥ नेणों धरेसी वेष्टिला

१ पुत्र. २ घोडा. ३ पेज, लापशी. ४ शेषशायी. ५ अर्जुनाला आणि कृष्णाला. ६ अमरावती. ७ बाग. ८ सोन्यासारखे पिंवळे. ९ किल्ल्यांचे तट.

॥ ४८ ॥ नगरीं गृहांच्या ज्या पंक्ती ॥ अमरभैवनां लाजविती ॥ पाचमंदिरांची दीप्ती ॥ देखोनि गैभस्ति अस्त पावे ॥ ४९ ॥ घरो-
घरीं वेदाध्ययन ॥ शास्त्रचर्चा पुराणश्रवण ॥ कोणी करिती हरिकीर्तन ॥ देहभाना सांडोनि ॥ ५० ॥ कोणी करिती द्विजपूजनें ॥
घरोघरीं तुळसीवृंदावनें ॥ आदरें करिती व्रताचरणें ॥ कृष्णालागीं पावावया ॥ ५१ ॥ तया नगरींचे सकळ जन ॥ धार्मिक सुशीळ
सत्यवचन ॥ निष्कपटी जितेंद्रिय पूर्ण ॥ कळाप्रवीण सर्वही ॥ ५२ ॥ वेदांतशास्त्रीं निपुण ॥ नित्य करिती कथामृतपान ॥ द्वैताद्वैत
मारून ॥ करिती भजन हरीचें ॥ ५३ ॥ धनाढ्य वैश्रवणासमान ॥ वीर काळासी करिती दीन ॥ क्षमा पृथ्वीसमान ॥ चंद्राऐसे
आल्हादी ॥ ५४ ॥ घरोघरीं पतिव्रता नारी ॥ सत्यवादी परोपकारी ॥ ऐसी देखोनि ती नगरी ॥ कृष्णार्जुन संतोषले ॥ ५५ ॥
सकळ पुऱ्यांमाजी हें रत्न ॥ ह्मणोन रत्नपुरी अभिधान ॥ तेथें वसे गुप्तधन ॥ योगियांचें जें पार्था ॥ ५६ ॥ ऐशा नगरीचा जो
राजा ॥ कोण वर्णील त्याच्या तेजा ॥ तो अत्यंत भक्त माझा ॥ दानशूर रणशूर पैं ॥ ५७ ॥ जरी जळेंवीण होईल सागर ॥
निस्तेज होईल दिनकर ॥ परी तो राजा सत्वधीर ॥ निजसत्व तें न सोडी ॥ ५८ ॥ शेष सोडील भूमंडळ ॥ दहन होईल शीतळ ॥
भंगोन जाईल भूगोळ ॥ परी राव सत्वातें न सोडी ॥ ५९ ॥ नानापरी छळितां जाण ॥ तो न कदा सोडी धर्माचरण ॥ मज न
वर्णवे त्याचें महिमान ॥ चाल तुज दावितों ॥ ६० ॥ जो प्राणदानीं उदार ॥ होवोनि न मोडी विप्रोत्तर ॥ ऐसें रायाचें सत्व
थोर ॥ तें तुज प्रत्यक्ष दावितों ॥ ६१ ॥ ऐसें बोलोन नारायण ॥ आपण झाला वृद्ध ब्राह्मण ॥ पुढें शिष्य अर्जुन ॥ हात धरून
चालवी ॥ ६२ ॥ ऐसे गुरुशिष्य दोघेजण ॥ जाती राजमंदिरालागून ॥ नगरीं जातां सकळ नमन ॥ करिते झाले तयांतें ॥ ६३ ॥
ऐसें हिंडतां तये स्थळीं ॥ दोन प्रहर रात्री झाली ॥ नाना जातींच्या दीपावळी ॥ जळती तेथें कर्पूरादिक ॥ ६४ ॥ सुवर्ण दीप
अपार ॥ नगरीं उरला नसे अंधार ॥ तों कौतुक वर्तलें थोर ॥ तें श्रवणीं परिसिजे ॥ ६५ ॥ एक विलासी पुरुष ॥ करावया रति-
विलास ॥ समीप बैसोनि कांतेस ॥ काय वचन बोलत ॥ ६६ ॥ ती अत्यंत लावण्यरूप ॥ दोनी भागीं कर्पूरदीप ॥ तिचें स्वरूप
शोभलें अमूप ॥ ऐसें देखोनि बोलत ॥ ६७ ॥ कनकवर्ण गौरांगे ॥ तुझीं म्यां देखिलीं सर्वांगें ॥ परी जी तृप्ति कृष्णसंगें ॥ नव्हे
येथें ती तृप्ति ॥ ६८ ॥ तंव कांता बोले चतुरा ॥ मी कृष्णरूपचि सुंदरा ॥ माझ्या दर्शनें अवधारा ॥ काममोक्ष होईल ॥ ६९ ॥
माझ्या नेत्रीं आहे कृष्णस्थान ॥ त्याच रीतीं हृदयीं पूर्ण ॥ सर्वांग कृष्णावांचोन ॥ नसेचि जाण प्राणेश्वरा ॥ ७० ॥ मग पति ह्मणे
विलासकुशले ॥ तुवां माझें वचन पाळिलें ॥ आतां तें आठवलें अबले ॥ कैसें मैथुन करावें ॥ ७१ ॥ तंव रमणी बोले कामलं-
पटा ॥ सोडीं सोडीं माझ्या ओंठा ॥ जे उच्चारिती वैकुंठपीठा ॥ क्षतें त्यांतें कां करिसी ॥ ७२ ॥ जेवीं प्रवाळांचे अंकुर ॥ तेवीं

१ देवमंदिरांना. २ सूर्य. ३ कुबेराप्रमाणें. ४ नांव. ५ सूर्य. ६ अग्नि. ७ कानांनीं. ८ अत्यंत. ९ स्त्री.

माझे जाण अधर ॥ करिती कृष्णनामोच्चार ॥ त्यांतें क्षतें अमंगळ हीं ॥ ७३ ॥ कृष्णमुखी माझें कुचयुगल ॥ त्यातें मर्दिसी कां तूं सबळ ॥ भल्यासी पीडितां तात्काळ ॥ पतन होत तयांचें ॥ ७४ ॥ तंव रमण बोलिला विलासिनी ॥ येहीं संग्रहिलें मन्मथालागुनी ॥ ते मर्दन केल्यावांचोनी ॥ मन्मथातें न सांडिती ॥ ७५ ॥ ऐसें तयाचें वचन ॥ ऐकोनियां नरनारायण ॥ कृष्णनामें पावन मैथुन ॥ आसन शयन कृष्णनामें ॥ ७६ ॥ कृष्ण ह्मणे अर्जुनास ॥ पाहा दंपत्याचा ज्ञानप्रकाश ॥ जयांचा ब्रह्ममय विलास ॥ श्रवणपुटीं ऐकिला कीं ॥ ७७ ॥ ऐसीं नानापरीचीं वचनें ॥ शिष्यगुरू ऐकती कर्णें ॥ परस्परें हास्यवदनें ॥ दोघेजण चालती ॥ ७८ ॥ मग झालिया प्रातःकाळ ॥ पार्थासहित गोपाळ ॥ दृष्टीं पाहावया भूपाळ ॥ यज्ञमंडपीं प्रवेशले ॥ ७९ ॥ नाना देशींचे भूपती ॥ यागमंडपीं बैसले असती ॥ नेणों सुरवरांच्या पंक्ती ॥ स्वर्गाहोनि उतरल्या ॥ ८० ॥ नाना देशींचे मुनिवर ॥ जे विद्येचे केवळ सागर ॥ तेजें दिसती जैसे दिनकर ॥ यज्ञमंडपीं रायाच्या ॥ ८१ ॥ जेथें मृगमदाचा परिमळ ॥ कर्पूर चंदन शीतळ ॥ देखतांचि हरे मनोमळ ॥ ऐसें यज्ञस्थळ देखिलें ॥ ८२ ॥ यावरी द्विजभूपतीचें संभाषण ॥ होईल राया अमृतासमान ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ सावधान परिसावें ॥ ८३ ॥ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ८४ ॥ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके श्रीकृष्णार्जुनपुरप्रवेशो नाम पंचचत्वारिंशोध्यायः ॥ ४५ ॥ ॥ अध्याय ॥ ४५ ॥ ॥ ओव्या ॥ ८४ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ त्यानंतर परीक्षितिसुता ॥ काय वर्तली तेथें कथा ॥ ती चित्तीं करूनि एकाग्रता ॥ सावधान परिसावी ॥ १ ॥ राजा बैसला यज्ञस्थानीं ॥ समीप विप्रांचिया श्रेणी ॥ श्यामकर्णद्वय उभे अंगणीं ॥ तें चक्रपाणि पाहातसे ॥ २ ॥ समर्थापासोनि आपली संपत्ती ॥ सोडवावया न चले युक्ती ॥ ती देखतां खेद उपजे चित्तीं ॥ कृष्णार्जुनां तेवीं झालें ॥ ३ ॥ मग देखतांचि यजमान ॥ आशीर्वाद देती ब्राह्मण ॥ राया तुज असो कल्याण ॥ पुत्रपौत्रांसमवेत ॥ ४ ॥ तुझा यज्ञ श्रवणीं ऐकोन ॥ मी धांवत आलों दुरोन ॥ या बाळशिष्यासहवर्तमान ॥ अत्यंत कष्टलों वृद्धपणीं ॥ ५ ॥ ऐकतां द्विजवाणीसरिता ॥ मग नृपेंद्र झाला बोलता ॥ सच्छिष्यासह तुह्मां देखतां ॥ तेणें पावन झालों मी ॥ ६ ॥ आपण येतांच आशीर्वादोत्तर ॥ बोलिलां स्वामी कीं सत्वर ॥ तें ऐकतां अंतरें ॥ भय पावलें माझें कीं ॥ ७ ॥ नमस्काराआधीं ब्राह्मण ॥ जरी देईल आशीर्वचन ॥ तरी शाप नलगे दारुण ॥ कुलक्षय करावया ॥ ८ ॥ ऐसें बोलोनि त्वरित ॥ विप्रासी घाली दंडवत ॥ पडिला भूमीं नृपनाथ ॥ चरणारविंद स्पर्शोनि ॥ ९ ॥ मग अत्यंत तो वृद्ध ब्राह्मण ॥ कांपत कांपत उठोन ॥ करद्वयें उचलोन ॥ उठविलें राजेंद्रा ॥ १० ॥ तो अभिनव देखिला ब्राह्मण ॥ राव त्यासी करी प्रश्न ॥ कोठोनि झालें आगमन ॥ आणि मनोगत निवेदावें ॥ ११ ॥ काय जी आपलें कार्यजात ॥ तेणें माझे कर्ण करावे तृप्त ॥ स्वामींनीं केलें मज पुनीत ॥ एकोत्तरशत कुळेंसीं ॥ १२ ॥ म्यां देखिले बहुत धरामर ॥ परी आपलें तेज अगोचर ॥ ऐकोनि वाक्यसुधाकर ॥ मम चित्तचकोर निवाला ॥ १३ ॥ देखोनि स्वामिपादारविंद ॥ पळोनि गेला संसारखेद ॥ दग्ध झालें पापवृंद ॥ धन्य झालों मी स्वामिया ॥ १४ ॥ स्वामिचरणकमळ प्रफुल्ल ॥ देखोनि मम चित्त भ्रमर केवळ ॥ मकरंद सेवोनि झालें दोंदिल ॥ तेथोनियां न उठवे ॥ १५ ॥ आरक्त देखोनि चरणांस ॥ भाविला तो कीं मधुरस ॥ मन जडलें तयास ॥ तेथोनियां ढळेना ॥ १६ ॥ नखामाजी चंद्ररेखा ॥ पाहाती चकोर मम नेत्र देखा ॥ अत्यंत पावले हरिखा ॥ त्या शशांका निंदिती ॥ १७ ॥ मजवर केली जी करुणा ॥ वारंवार वंदीं चरणा ॥ मज काय असे जी आज्ञा ॥ ती द्विजवरा बोलिजे ॥ १८ ॥ ऐसें ऐकोनि नृपवचन ॥ तयाप्रति बोले तो ब्राह्मण ॥ राया नमस्काराआधीं आशीर्वचन ॥ द्यावें लागतें साक्षेपें ॥ १९ ॥ जरी आपली असे विज्ञापना ॥ तरी प्रथम द्यावें आशीर्वचना ॥ यावेगळें नमस्काराविना ॥ आशीर्वचन न द्यावें ॥ २० ॥ ऐसें ऐकोनि द्विजोत्तर ॥ हर्षला तो नृपवर ॥ मज द्यावें जी प्रत्युत्तर ॥ काय मनोगत स्वामींचें ॥ २१ ॥ कांहीं संशय न धरावा मनीं ॥ मनोगत सांगावें मजलागुनी ॥ धनीं किंवा पंचप्राणीं ॥ इच्छा असेल ती सांगा ॥ २२ ॥ ऐसी ऐकतां मात बरवी ॥ कृष्णविप्र अति लाघवी ॥ आंगोळीनें शिष्यास खुणावी ॥ ऐसा दाता ह्मणोनि ॥ २३ ॥ मग रायाप्रति वचन ॥ बोलता झाला तो ब्राह्मण ॥ तें

१ चित्ताचें स्वास्थ्य. २ पंक्ती. ३ द्विजवचनरूप नदी. ४ अंतःकरण. ५ पवित्र. ६ ब्राह्मण. ७ पापसमूह.

ऐकावें सावधान ॥ श्रोतेजनीं श्रवणीं ॥ २४ ॥ विप्र ह्मणे रायातें ॥ मी ज्यानिमित्त आलों येथें ॥ तें ऐकावें नृपनाथें ॥ क्लेश चित्ता न मानुनी ॥ २५ ॥ मी धर्मनगरींचा ब्राह्मण ॥ अत्यंत असे वृद्धपण ॥ एक होता जी नंदन ॥ तो घेवोनि येत होतों ॥ २६ ॥ सांप्रत वस्ती द्वारकेसी ॥ जात होतों धर्मयागासी ॥ विलंब जाणोनि समासीसी ॥ येथें आलों तांतडीं ॥ २७ ॥ तव पुरोहित कृष्णशर्मा ॥ अत्यंत असे धर्मात्मा ॥ तयासी कन्या एक असे उत्तमा ॥ ऐसें कर्णीं ऐकिलें ॥ २८ ॥ तुवां आरंभिलें यागाचरण ॥ हें आह्मांसीं विदित पूर्ण ॥ तूतें करावें अवलोकन ॥ कन्या मागावी पुरोहिताची ॥ २९ ॥ यागीं संपादोन धन ॥ येथेंचि मेळवावी सून ॥ कार्यद्वयातें साधून ॥ घेऊनि नंदन निघावें ॥ ३० ॥ तुझा पुरोहित दयाळ ॥ मम पुत्रासी कन्या देईल ॥ ह्मणोनियां आपला बाळ ॥ संगें घेऊन येत होतों ॥ ३१ ॥ ऐसी सांगोनियां मात ॥ मग तो विप्र करी अश्रुपात ॥ स्फुंदस्फुंदोनि रडत ॥ शिष्याकडे विलोकी ॥ ३२ ॥ भूप प्रार्थी द्विजवरा ॥ कां सोडितां जी अश्रुधारा ॥ काय झालें तुमच्या कुमरा ॥ मजलागीं तें सांगावें ॥ ३३ ॥ नेत्र पुसोनि द्विजवर ॥ सद्गद बोले उत्तर ॥ विवाहकार्या निजपुत्र ॥ तव नगरा आणितां ॥ ३४ ॥ तों पैल वनीं ओढवला घात ॥ सिंह पातला अकस्मात ॥ पाहा क्रोधयुक्त गर्जत ॥ देखोनियां कांपलों मीं ॥ ३५ ॥ माझा पुत्र तो तरुण ॥ निर्दयें धरिला धांवून ॥ पुत्राचें करावया मोचन ॥ उद्योग म्यां आरंभिला ॥ ३६ ॥ मुखें धांवा करावा पूर्ण ॥ तों बोबडी वळली माझी जाण ॥ ईश्वरस्तवन करितां विघ्न ॥ पूर्वकर्म आड आलें ॥ ३७ ॥ त्यासी दुःखाचा अनुभव असता ॥ तरी तो शीघ्र धांवता ॥ तो आनंदमय सर्वथा ॥ नसे त्यासी दुःख ठावें ॥ ३८ ॥ भयाभीत झालें मन ॥ न घडे ईश्वरनामोच्चारण ॥ ह्मणोनियां नारायण ॥ मजलागीं न पावला ॥ ३९ ॥ मज दुःख झालें थोर ॥ तें जाणतो एक ईश्वर ॥ एकुलता एक कुमर ॥ तोही धरिला पंचाननें ॥ ४० ॥ आणखी नव्हे पुत्रजनन ॥ माझें झालें वृद्धपण ॥ मी सिंहासी करीं प्रार्थन ॥ परी तो कदा नायके ॥ ४१ ॥ मजदेखतां पुत्रातें ॥ शरीरास केलीं क्षतें ॥ पुच्छें मारीत तयातें ॥ दंत काढोनि भेडसावी ॥ ४२ ॥ मग माझें दुःख पाहोन ॥ द्रवला तो पंचानन ॥ काय बोलिला वचन ॥ तें ऐकें राजेंद्रा ॥ ४३ ॥ ऐक आतां द्विजोत्तमा ॥ तूं कां व्यर्थ करिसी श्रमा ॥ पुत्र गेलिया निजधामा ॥ मग सर्वथा फिरेना ॥ ४४ ॥ पुत्रावांचोनि सद्गति ॥ नाहीं ऐसीं शास्त्रें बोलती ॥ तरी तूं जावूनि गृहाप्रति ॥ पुत्रउत्पत्ति कराची ॥ ४५ ॥ आह्मी प्राणिघातक स्वभावें ॥ मनुष्यमात्र भक्षावे ॥ आह्मांपुढें न बैसावें ॥ चिरकाळ द्विजवरा ॥ ४६ ॥ मग मी त्यासी बोलिलों वचन ॥ माझा देह करीं भक्षण ॥ परी सोडीं मम नंदन ॥ वंशवृद्धीकारणें ॥ ४७ ॥ मी वृद्ध बहुसाल ॥ आतां गर्भ केवीं धरेल ॥ माझी अंगनां वृद्ध केवळ ॥ कामवासनेरहित आह्मी ॥ ४८ ॥ पुत्रावांचोनि एक क्षण ॥ न राहेच माझा प्राण ॥

१ हस्तनापुरचा. २ पुत्र. ३ घाईनें. ४ गोष्ट. ५ मोकळीक. ६ सिंहानें. ७ स्त्री.

लोक निंदितील मजकारण ॥ अपुत्रिक ह्मणोनि ॥ ४९ ॥ मग सिंह बोले उत्तर ॥ तूं तो असती वृद्ध फार ॥ तपें दग्धलें[1] तव शरीर ॥ मांसही अल्प असेना ॥ ५० ॥ आह्मांस पाहिजे मांसलें[2] ॥ मुखें घ्यावया कीं कवळ ॥ तेणें माझा क्षुधानळ ॥ कांहीं एक शमेल ॥ ५१ ॥ जरी भक्षूं तुह्मां तिघांसीं ॥ तरी मृत्युआज्ञा नाहीं आह्मांसी ॥ जितुकी आज्ञा परियेसीं ॥ तितुकेंचि कार्य कीजे ॥ ५२ ॥ तूं तों असती चिरंजीव ॥ तुझा कैसा घ्यावा जीव ॥ याचा खुंटला आयुष्यभाव ॥ ह्मणोनि यातें धरियेलें ॥ ५३ ॥ व्याघ्र सिंह आणि वृकें[3] ॥ आह्मी मृत्यूचे सेवक ॥ त्याचे आह्मी आज्ञाधारक ॥ त्याची आज्ञा पाळावी ॥ ५४ ॥ मग मी त्यासी बोलिलों वचन ॥ कांहीं मेळवीन भिक्षाधन ॥ तेणें मनुष्य विक्रीत घेऊन ॥ तुजला देईन मांसल ॥ ५५ ॥ ऐसा ऐकतां माझा बोल ॥ मजवरी उगारिलें लांगूलें[4] ॥ दाढा करकरां खावोनि विक्राळ ॥ विशाळ मुख पसरिलें ॥ ५६ ॥ जें सामान्य मनुष्यमांस ॥ तयासी मी न करीं स्पर्श ॥ जे असती पुण्यपुरुष ॥ त्यांसी आह्मी भक्षितों ॥ ५७ ॥ मग मी तया पुसिली मात ॥ कोण्या उपायें सोडिशील सुतें[5] ॥ तेंचि सांगें यथार्थ ॥ तुजलागीं तें देईन ॥ ५८ ॥ तेणें मज सांगितलें कांहीं ॥ तें तुजपासीं आहे पाहीं ॥ तें मागतां लवलाहीं ॥ तुझेनि आह्मां न देववे ॥ ५९ ॥ तंव नृप ह्मणे द्विजा निर्धारीं ॥ सिंहासनसभेअंतरीं ॥ आणिक एक नृसिंह असे अवधारीं ॥ तो तंव भक्तां रक्षितसे ॥ ६० ॥ ऐकोनि बोले ब्राह्मण ॥ पैल तुझें रे उपवन[6] ॥ तेथें सिंहें मागितलें जें जाण ॥ तें न देववे तुझेनि ॥ ६१ ॥ मग विप्र बोले शिष्या ॥ हा काय पुरवील माझी आशा ॥ चाल पाहूं आणिक देशा ॥ कोणी दाता असेल ज्या स्थळीं ॥ ६२ ॥ प्रत्यक्ष धरिला माझा सुत ॥ यासी वाटे सर्व अनृतँ[7] ॥ असत्यवचनें जल्पत ॥ नृसिंहापुढें सिंह कैंचा ॥ ६३ ॥ मग रायें जोडोनि कर ॥ प्रार्थिला तो वृद्ध विप्र ॥ ह्मणे मागाल जें सत्वर ॥ तें मी देईन आतांचि ॥ ६४ ॥ हास्य करोनि वदे द्विज ॥ तें मी सांगों कैसें तुज ॥ लोक हांसतील सहज ॥ पुत्र मरो परी मज न मागवे ॥ ६५ ॥ आणिक एक नृपवरा ॥ भूपें भरली वसुंधरा[8] ॥ परी संतुष्ट करी द्विजवरां ॥ ऐसा राजा दुर्लभ ॥ ६६ ॥ एक भागीरथीचा जलकण ॥ सकळ पापांचें करी दहन ॥ वापी[9] कूपांचें जीवन ॥ काय करावें राजेंद्रा ॥ ६७ ॥ पृथ्वी भरली पाषाणें ॥ परी क्वचित् सांपडती रत्नें ॥ नातरी असिजे सर्व जनें ॥ परी हरिभक्त दुर्लभ ॥ ६८ ॥ द्यावयातें धनसंपत्ती ॥ अनेक आहेत भूपती ॥ परी पुरवी याचकतृप्ती[10] ॥ ऐसा नरपति दुर्लभ ॥ ६९ ॥ अहा रे सगुण तनया ॥ सकळ विद्यावरुणालेया[11] ॥ कैसा पावलासी क्षया ॥ श्वापदमुखेंकरोनि ॥ ७० ॥ मातापितृवचनामृत ॥ तेणें असती सदा तृप्त ॥ निगमागमजळांत ॥ पोहसी नित्य मतिबळें ॥ ७१ ॥ राजा ह्मणे स्वामी ॥ तव मनोगत न जाणों आह्मी ॥ सांगतां न देऊं तरी श्रमी ॥ व्हावें विप्रा सावकाश ॥ ७२ ॥ रायासी बोले ब्राह्मण ॥ सिंहें मागितलें कठीण ॥ न मागतां अपुत्रिक

---

१ वाळून गेलें. २ धष्टपुष्ट. ३ लांडगे. ४ शेपटी. ५ पुत्र. ६ बगीचा. ७ खोटें. ८ पृथ्वी. ९ विहिरी. १० याचकांची इच्छा. ११ विद्यांच्या समुद्रा.

जाण ॥ कैसा राहूं नरेंद्रा ॥ ७३ ॥ राव ह्मणे द्विजकुळमणी ॥ काहीं शंका न धरावी मनीं ॥ जें मागाल तें तुह्मालागोनी ॥ सत्व-
रचि देईन ॥ ७४ ॥ मग रायासी बोले द्विजवर ॥ ऐक सिंहाचें उत्तर ॥ तेणें मागितलें तुझें शरीर ॥ परी म्यां कैसें मागावें ॥ ७५ ॥
जरी मागावें शरीर ॥ तरी पुण्यवंत तूं थोर ॥ नाना पुण्यें पवित्र ॥ अनेक दानीं वाढलें ॥ ७६ ॥ तो ह्मणे मयूरकेताचें शरीर ॥
जरी आणसील सत्वर ॥ तरी तुझा हा कुमर ॥ न भक्षीं मी सर्वथा ॥ ७७ ॥ मी त्यासी बोलिलों उत्तर ॥ राव परोपरी थोर ॥
मागितल्या देईल [१]कलेवर ॥ यांत संशय असेना ॥ ७८ ॥ याचकवृत्तीनें जाण ॥ मी त्यातें देह मागेन ॥ परी न मारीं मम नंदन ॥
मृगपति सत्य हें ॥ ७९ ॥ त्रिपाद दिधली भूमि दान ॥ त्याचा याचक झाला वामन ॥ मग इतरांचा [२]पाड कोण ॥ बळीपरीस
ज्ञानाविषयीं ॥ ८० ॥ पहा तेजस्वी [३]गभस्ति ॥ किरणें ओडवीं दक्षिणेप्रति ॥ हें विप्राचें स्वकर्म निश्चितीं ॥ प्रतिग्रह घेणें जो ॥ ८१ ॥
देणार पाहिजे उदार पूर्ण ॥ मागतांचि देतां समाधान ॥ आशा भंगलिया जाण ॥ वाटे मरण याचकां ॥ ८२ ॥ पुनः सिंह बोले
उत्तर ॥ दाता एक महाथोर ॥ दधीचीनें अस्थिपंजर ॥ इंद्राकारणें दीधला ॥ ८३ ॥ कवच शरीराचें भानुनंदनें [४] ॥ दिधलें तें इंद्रा-
कारणें ॥ शिबिरायें कपोताकारणें ॥ मांस छेदोनि दीधलें ॥ ८४ ॥ तैसाचि तो मयूरकेत ॥ भूमंडळीं असे विख्यात ॥ पूर्ण करील
मनोरथ ॥ यांत नसे अनमान ॥ ८५ ॥ जे सत्यवादी नृपवर ॥ त्यांसी काय प्रिय शरीर ॥ तेंही द्विजकार्यीं सत्वर ॥ अर्पावेंचि आनंदें
॥ ८६ ॥ पुत्रें दुःखित तूं विप्र ॥ राजा असे कीं उदार ॥ तो देईल शरीर ॥ हा निश्चय सिंह बोले ॥ ८७ ॥ तयासी पुत्र प्रबळ ॥
आणि राज्यही केलें चिरकाळ ॥ तुवां जाऊनि तात्काळ ॥ याचना तेथें करावी ॥ ८८ ॥ देऊ न देऊ यजमान ॥ विप्रें[५] करावें याच-
कपण ॥ ऐकोन ऐसें तयाचें वचन ॥ सहशिष्य मी पातलों ॥ ८९ ॥ पुत्रशोकें संतप्त ॥ मी दीन झालों बहुत ॥ ज्यापासोनि प्राप्त
सुत ॥ तोचि उपाय करावा ॥ ९० ॥ जरी त्याचें आणिसील शरीर ॥ तरीच सोडीन तव पुत्र ॥ त्याविरहित सा[६]चार ॥ न रक्षीं
पुत्र तुझा मी ॥ ९१ ॥ जें दुःख झालें आपुले चित्तीं ॥ तें येऊन सांगावें रायाप्रति ॥ तो करो कीं न करो निश्चितीं ॥ दुर्बळें
उगेंचि असावें ॥ ९२ ॥ पूर्वी होता रामचंद्र ॥ मरण पावला विप्रपुत्र ॥ आणोनि दिधला सत्वर ॥ निजपुरुषार्थेंकरोनि ॥ ९३ ॥ मी
पुत्रार्थी ब्राह्मण ॥ तुज आलों रे शरण ॥ तुवां श्रीरामचंद्र होऊन ॥ पुत्र माझा सोडवावा ॥ ९४ ॥ ऐसें ऐकतां विप्रोत्तर ॥ भूप
झाला प्रेमें निर्भर ॥ तुवां येथें असावें स्थिर ॥ स्व[७]कलेवर मी देतों ॥ ९५ ॥ यागीं द्विज हे अपार ॥ अनेक मिळाले धनुर्धर ॥
सर्वांदेखतां शरीर ॥ विप्रकार्जीं अर्पीन ॥ ९६ ॥ मज करावया उपकार ॥ क्षण एक रहावें स्थिर ॥ देतों स्वामीस कलेवर ॥ मग
पुत्र आपुला आणावा ॥ ९७ ॥ ऐसें ऐकोनि वचन ॥ विप्र पावला समाधान ॥ जय राजया तुजकारण ॥ निरंतर असो रे ॥ ९८ ॥

१ शरीर. २ सामर्थ्य. ३ सूर्य. ४ कर्णानें. ५ ब्राह्मणानें. ६ खरोखर. ७ स्वतांचें शरीर.

मग पुत्र केला राज्यपाळ ॥ रायें आणविलें गंगाजळ ॥ शालिग्रामशिळाजळ ॥ त्यांत तुळसी घातल्या ॥ ९९ ॥ राव सुस्नात झाला ॥ शुभ्र वस्त्र नेसला ॥ तुळसीमाळा घालोनि गळां ॥ बोलता झाला सर्वांसी ॥ १०० ॥ तुह्मीं सकळ साह्य व्हावें ॥ मज सद्गती मेळवावें ॥ तुह्मां प्रार्थितों मी भावें ॥ दुर्वाक्य न बोलावें ब्राह्मणा ॥ १ ॥ जें ज्यासी प्रिय पूर्ण ॥ तेणेंचि करावें समाधान ॥ कांहीं न करावें क्रूर भाषण ॥ हरिरूप द्विजातें ॥ २ ॥ स्त्री पुत्र बंधु सुहृद ॥ यांहीं करोनि चित्त शुद्ध ॥ तोषवावा क्षितिविबुध[1] ॥ शरीरार्ध देऊनि ॥ ३ ॥ याचा मज झाला उपकार ॥ सत्कारणीं वेंचविलें शरीर ॥ या दानें चक्रधर ॥ संतुष्ट हो कां मजलागीं ॥ ४ ॥ कृमिकीटकांचा ग्राम ॥ हें शरीर असे अधम ॥ स्थिर नव्हे जलबुद्बुद[2] परम ॥ किंवा विलसित[3] चपळेचें[4] ॥ ५ ॥ कलभकर्णाग्रापरी[5] चपळ ॥ किंवा कमळपत्रावरील जळ ॥ तैसें हें शरीर चंचळ ॥ तें उपयोगीं लावावें ॥ ६ ॥ आजी सुकृततरु फळला ॥ अमृताचा मेघ वोळवला ॥ आनंदाचा दिन उगवला ॥ भाग्यें भेटला द्विजवर्य ॥ ७ ॥ आजिपर्यंत पाळिल्याचें ॥ परम सार्थक झालें देहाचें ॥ विप्रकाजीं समर्पणें याचें ॥ झालें असे महद्भाग्यें ॥ ८ ॥ ना तो सिंह असे भगीरथ ॥ विप्रागमन जाह्नवी सत्य ॥ देहधारा करोनि पुनीत ॥ पूर्वज सगर उद्धरिले ॥ ९ ॥ आनंद झाला माझे मनीं ॥ जो अनुपम त्रिभुवनीं ॥ कां तो त्रैलोक्यचिंतामणी ॥ मज प्राप्त जाहला ॥ ११० ॥ नातरी देवोनि वराटिका[6] ॥ मी लाधलों दिव्य मौक्तिका ॥ कांजी देवोनि कूपिका ॥ अमृताची पावलों ॥ ११ ॥ म्यां देवोनि धत्तूर ॥ घेतला कल्पतरुवर ॥ परम दयाळु रमावर ॥ अनाथनाथ श्रीहरि ॥ १२ ॥ जन्ममरणाचिये आवर्तीं ॥ फिरत होतों चिरकालवृत्ती ॥ ऐसें जाणोनि कमलापती ॥ कृपाळु झाला मजलागीं ॥ १३ ॥ आतां तुवां एक करावें ॥ शीघ्र शरीर कर्वतावें ॥ अथवा सगळें देह न्यावें ॥ विप्रराया अविलंबें ॥ १४ ॥ छेदोनियां हें शरीर ॥ संतुष्ट करावा कीं द्विजवर ॥ बहुत झाला उशीर ॥ द्विजकार्याकारणें ॥ १५ ॥ तुह्मीं व्हावें निःशंक ॥ माझें पहावें कौतुक ॥ विप्ररूपें रमानायक ॥ शरीरार्धें तुष्टेल ॥ १६ ॥ आतां कर्वतें छेदोनि स्वशरीर ॥ विप्रासी देईल नृपवर ॥ तें पुढिले प्रसंगीं कथासार ॥ एकाग्रचित्तें परिसावें ॥ १७ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें एकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ११८ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके श्रीकृष्णमयूरध्वजसंभाषणं नाम षट्चत्वारिंशोऽध्यायः ॥ ४६ ॥ ॥ ओव्या ॥ ११८ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

१ ब्राह्मण. २ पाण्याचा बुडबुडा. ३ चमकणें. ४ विजेचें. ५ हत्तीच्या छाव्याच्या कानांप्रमाणें. ६ कवडी.

## अध्याय ४७.



वृद्ध ब्राह्मण रूपी श्रीकृष्ण.
शुद्धमती.
मयुरध्वज.
ताम्रध्वज.
श्री कृष्ण मयूरध्वजास आनंदानें भेटतात.
राजे.
अर्जुन.
ताम्रध्वज
प्र.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जनमेजय ह्मणे मुनिभूषणा ॥ या दिव्य पूर्वजकथारसायना ॥ श्रवणद्वारें करितां प्राशना ॥ जाय दारुण भवरोग ॥ १ ॥ ऐसें ऐकतां राजवचन ॥ जन सकळ झाले कंपायमान ॥ कालरूप हा ब्राह्मण ॥ छळों आला रायातें ॥ २ ॥ उदंड देखिले ब्राह्मण ॥ मागती गज वाजी रथ धन ॥ परी अद्यापि कोणी प्राणदान ॥ न मागितलें या लोकीं ॥ ३ ॥ सत्यवादी अति प्रिय ॥ सुशील वदान्य जितेंद्रियें ॥ ऐसा भूप आह्मांसी निश्चय ॥ न मिळेल आतां कल्पांतीं ॥ ४ ॥ पूर्वीं बळीचिये घरीं ॥ विप्रवेषें आला हरी ॥ तेणें छळोनि नानापरी ॥ पाताळीं त्यातें घातलें ॥ ५ ॥ तेवीं याचे यागीं निर्धारीं ॥ विप्ररूपें आला काय हरी ॥ परी तो बळी रक्षिला सहपरिवारीं ॥ याचिया संहारीं कां पडिला हा ॥६॥ संतोषोनि मयूरकेतनें ॥ द्विजांसी दिधलीं सकळ दानें ॥ मग सभामंडपीं येऊन ह्मणे ॥ कर्वत वेगीं पाचारा ॥ ७ ॥ तों पुत्रें कर्वता आणविलें ॥ स्तंभद्वयातें रोविलें ॥ मग नृपें सर्वांसी विनविलें ॥ सावधान ऐकावें ॥ ८ ॥ तुह्मां सर्वांचे पुण्येंकरून ॥ द्विजकाजीं शरीर अर्पीन ॥ तुह्मां सांगतों पल्लव पसरून ॥ दुर्वाक्य विप्रा न बोलावें ॥ ९ ॥ अनंतकोटि ब्रह्मांडनायक ॥ त्याचे रोमरंध्रीं चतुर्दश लोक ॥ तोचि हा द्विज निःशंक ॥ तुह्मीं जाणोनि असावें ॥ १० ॥ तुह्मी जरी अवाच्य वदाल ॥ तरी हा विप्र तात्काळ जाईल ॥ माझे मनोरथतरूचें गोड फळ ॥ नासोनि जाईल सर्वथा ॥ ११ ॥ जेवीं दुग्धें घट भरिला ॥ त्यामाजी कांजीबिंदु पडिला ॥ तो तात्काळ नासी तयाला ॥ तेवीं होईल एखादें ॥ १२ ॥ मग पद्मासन घालोनि बैसला ॥ धैर्यस्तंभासी असे टेंकला ॥ अंतरीं स्मरिलें वासुदेवाला ॥ मग पाचारिलें द्विजातें ॥ १३ ॥ करूनि तयाचें चरणक्षालन ॥ यथोक्त केलें द्विजपूजन ॥ ह्मणे घ्यावें शरीरार्ध दान ॥ श्रीनारायणप्रीत्यर्थ ॥ १४ ॥ ह्मणोनि धैर्यस्तंभीं टेंकला ॥ दुकूलेंगुणीं स्तंभीं बांधिला ॥ मुखें स्मरोनि हरिलीला ॥ कर्वत ठेविला निजशिरीं ॥ १५ ॥ देखोनि सर्वां आलें रुदन ॥ मग आवरिती धैर्येंकरून ॥ विमुख जाईल ब्राह्मण ॥ मग राव कोपेल आह्मांवरी ॥ १६ ॥ तथापि नावरे मोहभडका ॥ हाहाकार करिती धडका ॥ जेवीं कुरंगिणी वनीं देखा ॥ शब्द करिती आक्रोशें ॥१७॥ शुद्धमती नामें नृपमहिषी ॥ ती विनवीतसे रायासी ॥ माझ्या ऐकावें वचनासी ॥ कृपा करोनि स्वामिया ॥ १८ ॥ स्त्री पुरुषाचें अर्ध शरीर ॥ ऐसें बोले श्रुतिशास्त्र ॥ तरी माझें घ्यावें कलेवर ॥ विप्रकाम पुरवावया ॥ १९ ॥ जरी तुह्मी घाल अर्ध शरीर ॥ तरी तें चतुर्थांश झालें निर्धार ॥ मम गात्र तुमचें कलेवर ॥ अर्ध संपूर्ण जाणावें ॥ २० ॥ ऐसा जो कां शास्त्राचार ॥ तो तुह्मीं त्यजिला समग्र ॥ आतां देऊनि माझें शरीर ॥ विप्रकुमर सोडवावा ॥ २१ ॥ यापरी ऐकावें जी वचन ॥ सजीव द्यावें जीवदान ॥ निर्जीवदानें पंचानन ॥ सर्वथा तृप्त होईना ॥ २२ ॥ प्राणनाथापुढें नारी ॥ मरण पावावी निर्धारीं ॥ तरी तिचा वास वैकुंठनगरीं ॥ होतो ऐसें ऐकिलें म्यां ॥ २३ ॥ ऐसें शुद्धमतीचें वचन ॥

१ संसारसंबंधी व्याधि. २ घोडे. ३ दाता. ४ इंद्रियें जिंकिलीं आहेत ज्यानें असा. ५ वस्त्राच्या दोरीनें. ६ हरिणी. ७ राजाची स्त्री. ८ शरीर.

ऐकतां घाबरला ब्राह्मण ॥ मग मयूरकेतासीं भाषण ॥ काय करिता जाहला ॥ २४ ॥ जरी विपुलहस्तें श्रीहरी ॥ पूजिला असेल जन्मांतरीं ॥ अनंत पुण्यें पवित्र नारी ॥ तुज ऐसी पाविजे ॥ २५ ॥ धन्य जीचें उत्तम मन ॥ धन्य धन्य तुझें सत्वमहिमान ॥ तुझें देखोनि उत्तमाचरण ॥ आत्माराम तुष्टला ॥ २६ ॥ तरी स्त्रीवंत जें वामशरीर ॥ तें माझेनि न नेववे साचार ॥ आपुलें देशी दक्षिण-शरीर ॥ तरीच सुटेल पुत्र माझा ॥ २७ ॥ स्वशरीरीं तुझी कीर्ति ॥ स्त्रीशरीरीं अपकीर्ति ॥ भयेंकरून स्वयुवती ॥ रायें दिधली ह्मणतील ॥ २८ ॥ ऐसें बोलतां तो द्विज ॥ तयाप्रति बोले ताम्रध्वज ॥ वंदोनि विप्रपादांबुज ॥ सिद्धवाक्यार्थ सांगतसे ॥ २९ ॥ जय जय निगमागमपाळका ॥ सकळ धरामरकुळटिळका ॥ धन्य करावें मज बाळका ॥ सकळांग दान घेवोनी ॥ ३० ॥ पिता पुत्र हा ऐक्यविचार ॥ श्रुतिशास्त्रांचा हा निर्धार ॥ तरी सर्वांग घेवोनि कुमर ॥ सिंहापासोनि सोडवावा ॥ ३१ ॥ ऋणत्रयापासोनि निर्मुक्त ॥ पुत्रें पिता करावा हा वेदार्थ ॥ तरी या देहव्याजें सर्वांसहित ॥ घेऊनि पिता मुक्त करीं ॥ ३२ ॥ पुष्ट माझें शरीर ॥ घेऊन सिंह होईल संतुष्ट फार ॥ आनंदें सोडील तुझा कुमर ॥ सत्य जाण द्विजवर्या ॥ ३३ ॥ भीष्म आणि राघवेश ॥ पितृवाक्यें पावले यश ॥ तेवीं घेऊन तरुण देहास ॥ द्यावें मज यश स्वामिया ॥ ३४ ॥ ऐसें बोलतां ताम्रध्वज ॥ त्वरें बोले उत्तर द्विज ॥ तुवां जाणोनि शास्त्रगुज ॥ उत्तम वाक्य बोलिलासी ॥ ३५ ॥ धन्य धन्य तूं पुत्र ॥ केला कुळाचा उद्धार ॥ तुवां जन्मांतरीं रमावर ॥ उत्तम भावें पूजिलासी ॥ ३६ ॥ तुझी देखोनि उत्तम मति ॥ माझी निवाली चित्तवृत्ति ॥ धन्य माता शुद्धमति ॥ ऐसें प्रसवली पुत्ररत्न ॥ ३७ ॥ परी त्या सिंहाचें ऐसें वचन ॥ स्त्री पुत्र दोघें मिळोन ॥ राजदेह द्यावा कर्वतोन ॥ दक्षिणांग भक्षावया ॥ ३८ ॥ तरीच पुत्र देईन ॥ तें वचन न करावें अप्रमाण ॥ लोक ह्मणती सत्य जाण ॥ तेंचि करणें आह्मांसी ॥ ३९ ॥ ऐसें ऐकोनि द्विजोत्तर ॥ नृपें वारिला आपुला पुत्र ॥ स्त्रीपुत्रांहातीं कर्वत तीव्र ॥ दिधला तेव्हां नृपवरें ॥ ४० ॥ तें देखोनियां सकळ जन ॥ ह्मणती द्विज नव्हे हा काळ पूर्ण ॥ केवढें कठिण याचें मन ॥ ह्मणोनि रुदन करिताती ॥ ४१ ॥ तंव तो विप्र बोले शिष्यासी ॥ चाल ऊठ जाऊं वनासी ॥ रायाचे एवढे आकांतासी ॥ कोण घेईल या दाना ॥ ४२ ॥ तंव नृप सकळां विनवित ॥ ह्मणे न करावे जी अश्रुपात ॥ माझा पुरवावा मनोरथ ॥ विप्र संतुष्ट करूनि ॥ ४३ ॥ मग विप्र स्वस्थ बैसला ॥ स्त्रीपुत्रें कर्वत घेतला ॥ ओढितां करपत्रें तयाला ॥ मोह झळंबे मानसीं ॥ ४४ ॥ राजा ह्मणे हो सुंदरी ॥ नित्य कंकण तुझे करीं ॥ तें रतिरंगाचिये अवसरीं ॥ माझे अंगीं लागतसे ॥ ४५ ॥ तेणें अत्यंत होतसे सुख ॥ तैसाचि या कर्वतीं हरिखें ॥ मज होतसे तूं निःशंक ॥ कर्वतीं देह पैं माझा ॥ ४६ ॥ हा विप्र नव्हे श्रीकृष्ण ॥ शिष्य नव्हे तो अर्जुन ॥ या दोघांपुढें मस्तक छेदून ॥ सत्वर द्यावें अर्धांग ॥४७॥ तंव लोक दंतें ओष्ठ चाविती ॥

१ डावें आंग. २ खरोखर. ३ उजवें आंग. ४ ब्राह्मणश्रेष्ठा. ५ श्रीकृष्ण. ६ मनकामना. ७ खोटें. ८ कर्वत. ९ आनंद.

वस्त्राआड कर चोळिती ॥ वस्त्रें मुख झांकोन रडती ॥ येती काकुळती नृपवर्या ॥ ४८ ॥ असो बरें ह्मणोनि नृपयुवती ॥ मस्तक हातें कर्वती ॥ मग नृप बोले द्विजाप्रति ॥ तें वाक्य ऐकें जनमेजया ॥ ४९ ॥ कोपें नृसिंहें स्तंभ भेदून ॥ प्रल्हादपिता[1] विदारिला जाण ॥ त्याचपरी निर्दय करूनि मन ॥ मज स्त्रीपुत्रें कर्वतावें ॥ ५० ॥ ऐसें ऐकतां उभयतां ॥ छेदितीं झालीं नृपनाथा ॥ परी दोघें मुखीं मौन धरितां ॥ उठते झाले गुरुशिष्य ॥ ५१ ॥ तंव राव विनवी स्वामी ॥ कां जी उठतां क्रोधें तुह्मी ॥ येरू ह्मणे मुकें दान आह्मी ॥ सर्वथा न घेऊं राजेंद्रा ॥ ५२ ॥ स्त्रीपुत्रें आपुले वदनीं ॥ रामनामाची लावावी ध्वनी ॥ उच्चारितां मग घेऊं आह्मी ॥ अन्य नको सर्वथा ॥ ५३ ॥ राव ह्मणे स्त्रीपुत्रांतें ॥ गावें सुखें रामनामातें ॥ जेणें सुख होय ब्राह्मणातें ॥ तेंचि सुखें आचरा ॥ ५४ ॥ ऐसें ऐकतां नृपवचन ॥ दोघें गीत गाती जाण ॥ तें ऐकोनि बोले ब्राह्मण ॥ भिन्न भिन्न गावें रे ॥ ५५ ॥ ओंवीचें गीत गातसे राणी ॥ ह्मणे जगद्वंद्या चक्रपाणी ॥ जन्मोजन्मीं धनी ॥ ऐसाचि द्यावा मजलागीं ॥ ५६ ॥ जेणें द्विजकार्या शरीर ॥ अर्पिलें कीं समग्र ॥ सेविलें कैवल्यमंदिर[2] ॥ निजानंदें करूनि ॥ ५७ ॥ पुत्र ह्मणे देवाधिदेवा ॥ ऐसाचि पिता मज द्यावा ॥ जन्मोजन्मीं केशवा ॥ न विसंबो[3] हा मजलागीं ॥ ५८ ॥ स्वदेहाची आशा सोडिली ॥ विप्रकामना पूर्ण केली ॥ दानपुण्यें दवडिलीं ॥ विप्रदरिद्रें दिगंता ॥ ५९ ॥ कांता ह्मणे अहो स्वामी ॥ एकटेचि जातां तुह्मी ॥ भवनदीचिया[4] धामीं ॥ मजलागीं कां लोटिलें ॥ ६० ॥ आतां मजला न धरवे धीर ॥ कां राहिलें व्यर्थ हें शरीर ॥ अहा रे स्वामी जगदीश्वर ॥ पावें सत्वर मजलागीं ॥ ६१ ॥ पुत्र ह्मणे शिबि चक्रवर्ती ॥ स्वमांस दिधलें कपोताप्रति ॥ त्याची कीर्ति स्मरूनि चित्तीं ॥ देह दिधला कीं ब्राह्मणा ॥ ६२ ॥ कांता बोले जी जिवलगा ॥ सत्वधीर नसे तुजऐसा या जगा ॥ तरी कां टाकिलें माझिया संगा ॥ कां त्रास उपजला ॥ ६३ ॥ पुत्र ह्मणे राजा हरिश्चंद्र ॥ तैसाचि राजा रामचंद्र ॥ त्यांची कीर्ति आठवोनि अंतर ॥ स्वशरीर विप्रा अर्पिलें कीं ॥ ६४ ॥ मग सुमति बोले गीतवाणी ॥ स्वसार्थक केलें जी नृपचूडामणी ॥ मज टाकिलें कीं दीनावाणी ॥ हें कैसें मनीं आवडलें ॥ ६५ ॥ पुत्र बोले अहा ताता ॥ तूं दातयांमाजी अतिदाता ॥ वैकुंठपति रमाकांता ॥ निजदेह त्वां दिधला ॥ ६६ ॥ यावरी माझी वांछा[5] पुरवीन ॥ देह करूनि कृष्णार्पण ॥ स्वर्गधामीं मी येईन ॥ मज टाकोन न जावें ॥ ६७ ॥ ऐसे आठवोन रायाचे गुण ॥ राम कृष्ण नामें उच्चारून ॥ आकंठपावेतों शिर कर्वतितां पूर्ण ॥ नवल एक वर्तलें ॥ ६८ ॥ तंव रायाचें जें वामनेत्रकमळ ॥ तें अश्रु स्रवलें ते वेळ ॥ तें द्विजें देखतांचि तात्काळ ॥ शिष्याप्रति बोलत ॥ ६९ ॥ ह्मणे ऊठ रे शिष्या चाल सत्वर ॥ क्रोधें बोले द्विजवर ॥ याचें कासया दान घ्यावें शरीर ॥ अमंगळ लोभिष्ठाचें ॥ ७० ॥ अरे राजया कृपणा ॥ मी न घेंचि तुझिया दाना ॥ दुःखें करिसी रुदना ॥ व्यर्थ गेलें ह्मणोनि ॥ ७१ ॥

---

१ हिरण्यकशिपु. २ मोक्ष. ३ अंतर पडो. ४ संसाररूप नदीच्या. ५ मनोरथ.

दाता ह्मणविसी आपणातें ॥ रडकें दान देसी द्विजातें ॥ शास्त्रनिषिद्ध या दानातें ॥ देत्या घेत्या बद्धक ॥ ७२ ॥ वांचो मरो मम नंदन[1] ॥ सुखें त्यासी मारो पंचानन[2] ॥ मजही नलगे स्वर्गभुवन ॥ अपुत्रिक मज ह्मणोत लोक ॥ ७३ ॥ वाम नेत्रें करिसी रुदन ॥ तेणें झालें अपवित्र दान ॥ मजसारिखा ब्राह्मण ॥ कैसा घेईल दानातें ॥ ७४ ॥ ऐसें बोलोनि ब्राह्मण ॥ क्रोधें शिष्यातें आसडोन[3] ॥ विप्र निघाला तेथोन ॥ यजमानातें सोडोनि ॥ ७५ ॥ जातां देखोन द्विजपति ॥ रायातें बोले शुद्धमति ॥ तें ऐकावें एकाग्र चित्तीं ॥ जैमिनि ह्मणे जनमेजया ॥ ७६ ॥ ह्मणे सत्यव्रता महाबुद्धि ॥ वदान्यशिरोमणि[4] गुणनिधि ॥ विप्र चालिला कीं सत्वनिधि ॥ शोधोनियां स्वामिया ॥ ७७ ॥ देहार्धदानाचा याचक ॥ फिरवावा जी द्विजनायक ॥ हा गेलिया सकळिक ॥ निष्फळ झालें कृत-कर्म ॥ ७८ ॥ विमुख गेलिया अतिथि ॥ जगीं होईल अपकीर्ति ॥ वाक्य ऐकोनि नृपति ॥ भार्येप्रति खुणावित ॥ ७९ ॥ ह्मणे आणीं कागद लेखणी ॥ लिहितों मी जें अंतःकरणीं ॥ प्रार्थोनि द्विजशिरोमणी ॥ राहावीं तूं वल्लभे[5] ॥ ८० ॥ सुमतीनें द्विजाकारण ॥ प्रार्थोनि राहाविलें ते क्षण ॥ मग दऊत लेखणी आणोन ॥ करीं कागद दिधला ॥ ८१ ॥ नृपति लिहीत तये क्षणीं ॥ स्वामी ऐकावी विनवणी ॥ कां उदक आलें वामलोचनीं ॥ त्याचा अभिप्राय जाणावा ॥ ८२ ॥ दक्षिणांग झालें पवित्र पूर्ण ॥ वामांग सांडिलें ह्मणोन ॥ करूं लागलें तें रुदन ॥ सत्य जाण द्विजवर्या ॥ ८३ ॥ जरी तूं जासील विमुख ॥ तरी होईल मज परम दुःख ॥ कर्वतघातें हरिख ॥ मजला झाला द्विजेंद्रा ॥ ८४ ॥ ऐसें वृत्त जाणोन ॥ संतोषला नारायण ॥ आत्मरूप प्रकट करून ॥ प्रसन्न होऊन माग ह्मणे ॥ ८५ ॥ लावण्यें कोटी रतिपति ॥ त्या तेजें लोपला दिनपति[6] ॥ जें न वर्णवे भुजंगपति ॥ ऐसें रूप प्रग-टविलें ॥ ८६ ॥ जो निगमागमवल्लीचा[7] कंद ॥ जो योगिहृदयारविंदमिलिंद ॥ भक्तमनोरथाचा आनंद ॥ प्रगट गोविंद तो झाला ॥ ८७ ॥ प्रेमें धांवोनि जगज्जीवन ॥ मयूरध्वजासी दिधलें आलिंगन ॥ शिष्याचा झाला अर्जुन ॥ तोही येवोन भेटला ॥ ८८ ॥ इंद्रासहित सुरवर ॥ करिती पुष्पवृष्टि अपार ॥ दुंदुभिनादें गर्जे अंबर ॥ नृत्य करिती देवांगना ॥ ८९ ॥ गंधर्वगणयक्षमुनिश्रेणी ॥ जयजयकारें उठती ध्वनी ॥ नीरांजनें घेवोनि नितंबिनी ॥ ओंवाळिती ते काळीं ॥ ९० ॥ देवें अमृतदृष्टीं विलोकितां पूर्ण ॥ शरीर झालें देदीप्यमान ॥ आनंद झाला संपूर्ण ॥ सकळ जनांकारणें ॥ ९१ ॥ नाना वाद्यें वाजती ॥ आनंदली ऋषिपंक्ति ॥ ह्मणती धन्य धन्य हा नृपति ॥ सत्वें आगळा पाहिला ॥ ९२ ॥ देव ह्मणे मयूरध्वजा ॥ लाविलीस कीर्तिध्वजा ॥ आतां यजमान तूं माझा ॥ मी आश्रित तुझा कीं ॥ ९३ ॥ तुझा सुपुत्र ताम्रध्वज ॥ तेणें अतिशय केलें झुंज ॥ वीर मोहिला कपिध्वज ॥ मग गरुडध्वजाही मोहिलें ॥ ९४ ॥ हा तों असे पुरुषार्थी ॥ रणीं केली परम ख्याती ॥ जिंकिलें दोघां निश्चितीं ॥ मज आणि अर्जुनातें ॥ ९५ ॥

१ माझा मुलगा. २ सिंह. ३ धिक्कारून. ४ दात्यांमध्यें श्रेष्ठ. ५ स्त्रिये. ६ सूर्य. ७ वेद व स्मृतिरूप वेलीचा.

धन्य राया ही शुद्धमती ॥ इणें जिंकिली अरुंधती ॥ त्रैलोक्य व्यापोनि इची कीर्ति ॥ भेदीत गेली सत्यलोकीं ॥ ९६ ॥ धन्य तुझे नगरींचे जन ॥ ज्यांसी पाळिसी प्राणाहून ॥ सकळांचें जाण शुद्ध मन ॥ ऐसें कळलें मजलागीं ॥ ९७ ॥ देहार्धदानीं तूं उदार ॥ झालासी सांडोनि राज्यभार ॥ ऐसा तुझा भक्तिसागर ॥ म्यां दाविला अर्जुना ॥ ९८ ॥ यावरी अश्वद्वय घेऊन ॥ धर्मयाग करीं कां पूर्ण ॥ यागभोक्ता मीच जाण ॥ तुझे येथें तृप्त झालों ॥ ९९ ॥ माझ्या कृपावलोकनमात्रें ॥ अभंग झालीं तव गात्रें ॥ नामें घेसी जीं मुखपात्रें ॥ तीं मज बहु आवडती ॥ १०० ॥ ऐकोनियां हरिवचन ॥ संतोषला मयूरकेतन ॥ मग कृष्णातें करोनि वंदन ॥ काय वचन बोलिला ॥ १ ॥ भूप ह्मणे देवाधिदेवा ॥ तुवां चरण दाविले केशवा ॥ जें शरीर माझें माधवा ॥ तें त्या स्थानीं असावें ॥ २ ॥ अंतर व्यापोनि बाहेरी ॥ सबाह्य असावें श्रीहरी ॥ आतां यज्ञक्रियाकुंसरी ॥ कासया उरलीसे स्वामिया ॥ ३ ॥ तुज मागणें हेंचि जाण ॥ निरंतर असावें हेंचि पूर्ण ॥ पुत्रकलत्रजनांसहवर्तमान ॥ माझे हृदयीं नांदावें ॥ ४ ॥ यज्ञफळातें घेऊन ॥ त्या पुण्यासहवर्तमान ॥ माझे हृदयीं करीं प्रवेशन ॥ हेंच मागणें तुज देवा ॥ ५ ॥ साक्षात् भेटलासी नारायण ॥ याउपरी यागाचें नसे कारण ॥ केलिया हांसतील सर्व जन ॥ जे ब्राह्मण जाणते ॥ ६ ॥ साक्षात् सोडोनि अग्निसंग ॥ कां सेवावे स्फुलिंग ॥ देखोनि जाह्नवीजलतरंग ॥ कोण मृगजळातें सेवील ॥ ७ ॥ साक्षात् तूं नारायण ॥ याग करूं कवणाकारण ॥ ऐसा संशय धरितां जाण ॥ होईल बंधन यमाचें ॥ ८ ॥ कृष्णार्जुनांतें विमुख ॥ पुत्रा तूं झालासी रे मूर्ख ॥ परी उदेला माझा भाग्यार्क ॥ तेणें सफळ सर्व झालें ॥९॥ तुज म्यां देखिलें पुरुषोत्तमा ॥ इतकेनि पावलों सर्व कामा ॥ मजला नलगे कैवल्यधामा ॥ जावयासी प्रयत्न ॥ ११० ॥ जय गोपीहृदयराजहंसा ॥ सकळयादवकुळावतंसा ॥ निजजनदुरिताचळविध्वंसा ॥ विश्वतारका तुज नमो ॥ ११ ॥ जन्ममरणाचिया श्रेणी ॥ येथोनि वारीं चक्रपाणी ॥ ह्मणोनि माथा ठेविला चरणीं ॥ श्रीकृष्णाचे तेधवां ॥ १२ ॥ ऐसें करोनि स्तवन ॥ मग सिंहासनीं हरि बैसवून ॥ षोडशोपचारें पूजा करून ॥ स्तव करीत मयूरध्वज ॥ १३ ॥ हातीं घेऊनि उदक ॥ ह्मणे म्यां साहा याग केले संपूर्ण देख ॥ ते तुज समर्पिले प्रतिग्राहक ॥ प्रतिगृह्णामि बोलें श्रीहरि ॥ १४ ॥ मग पार्थाचें केलें पूजन ॥ तोषविला वस्त्रालंकारेंकरून ॥ मग श्रीकृष्ण आणि मयूरकेतन ॥ रणमंडळा पातले ॥१५॥ दृष्टिमात्रें नारायणें ते वेळे ॥ उठविलीं सर्वही दळें ॥ सैनिक येवोनि भेटले ॥ सर्वही नृप मयूरध्वजा ॥ १६ ॥ मग श्यामकर्ण आणोन ॥ राज्य गृह पुत्र सर्वही धन ॥ करिता झाला कृष्णार्पण ॥ आनंदेंकरून मयूरकेत ॥ १७ ॥ मग कृष्ण बोले हास्यमुख ॥ राया धर्मकार्यासी आह्मां हरिख ॥ तरी तुह्मी आणि पार्थ अश्वाचे रक्षक ॥ होऊनियां चलावें ॥ १८ ॥ बरवें ह्मणोनि मयूरध्वज ॥ पुनः वंदिला कपिध्वज ॥ ह्मणे

१ राजा. २ यज्ञकर्मांत पडून कुशलता राहिली नाहीं. ३ यज्ञाचें. ४ ठिणग्या. ५ मोक्षाला.

जी पार्थ आज्ञा करील मज ॥ ते मी वंदीन मस्तकीं ॥ १९ ॥ ऐकोनि ऐसें भाषण ॥ पुढें सोडिला श्यामकर्ण ॥ मागें चालिलें सकळ सैन्य ॥ परमानंदेंकरूनियां ॥ १२० ॥ ऐसें मयूरध्वजाचें आख्यान ॥ जे करितील श्रवण पठन ॥ तयांसी प्रसन्न नारायण ॥ होऊनि मुक्ति देईल ॥ २१ ॥ पुढें हय सारस्वतपुरा जातील ॥ त्यांतें वीरवर्मा धरील ॥ तें आख्यान अति रसाळ ॥ श्रोतेजनीं परिसावें ॥ २२ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ श्रवणें होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १२३ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके मयूरध्वजशरीरकर्तनाद्याख्यानसमाप्तिर्नाम सप्तचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४७ ॥ अध्याय ॥ ४७ ॥ ॥ ओव्या ॥ १२३ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जमिनि ह्मणे जनमेजया ॥ भारतवंशजह्रुतनया ॥ श्रवणमात्रें त्रय[1] ताप लया ॥ निजसामर्थ्यें नेतसे ॥ १ ॥ रायासी बोले मुनिवर ॥ अश्व पावले सारस्वतपुर ॥ तयांतें देखोनि हेर ॥ वेगें राया जाणविती ॥ २ ॥ जेथें षट्शास्त्रें धर्म चतुष्पाद ॥ विप्र पढती सांग वेद ॥ जनांमुखीं गोविंद ॥ परमानंदें वसतसे ॥ ३ ॥ तेथें वीरवर्मा नामें नृपति ॥ नेणों दुजा अमरपति ॥ ज्याचे गृहीं दक्षिणाधिपति[2] ॥ गृहजामात[3] राहिला ॥ ४ ॥ दूत राया जाणविती कथन ॥ कृष्णार्जुनांचे आले श्यामकर्ण ॥ ते तुह्मां करवावया श्रवण ॥ धांवोनियां पातलों ॥ ५ ॥ कृष्णार्जुन त्यांतें रक्षिती ॥ समागमें सकळ पृथ्वीपती ॥ हें ऐकोनि भूपति ॥ मनामाजी संतोषला ॥ ६ ॥ ह्मणे धरा रे श्यामकर्ण ॥ गृहा आले नरनारायण ॥ दर्शनें होईन पावन ॥ सार्थक झालें जन्माचें ॥ ७ ॥ पांच पुत्र पाठविले सबळ ॥ त्यांचीं नामें ऐका प्रांजळ ॥ सुशीळ सरळ सुरभ कुवळ ॥ पांचवा रसाळ जाणावा ॥ ८ ॥ पांचही बैसोनि रथावरी ॥ धनुष्य बाण घेऊनि करीं ॥ मानूनि परदळ तृणापरी ॥ अश्व घेऊनि चालिले ॥ ९ ॥ जों नगरीं करावें प्रवेशन ॥ तों पाठीसीं दाटला बभ्रुवाहन ॥ तेणें पाचारिले पांचजण ॥ समरांगणालागोनि ॥ १० ॥ शंखनाद केला थोर ॥ परम कोपला पार्थपुत्र ॥ शरधारीं शत्रुदळभार ॥ तृणापरी जाळीतसे ॥ ११ ॥ तें युद्ध अति दारुण ॥ कनकचित्र सोडिती बाण ॥ त्या पांचजणीं मिळोन ॥ बभ्रुवाहन वेढिला ॥ १२ ॥ भिडोनि गेले समोर ॥ युद्ध मांडिलें घोरांदर ॥ केशधरणी झाली अतिक्रूर ॥ मुष्टिप्रहार मल्लयुद्धादिक ॥ १३ ॥ पदाती मारिले असंख्यात ॥ गज मारिले मदोन्मत्त ॥ अश्व मारिले समस्त ॥ अयुत रथी संहारिले ॥ १४ ॥ ऐसें बभ्रुवाहनें निजबळें ॥ तयां पांचांतें पळविलें ॥ सैन्य अवघें आटिलें ॥ जैसें तृण अग्निसंगें ॥ १५ ॥ जेवीं योगी निर्मळचित्तें ॥ सहज जिंकी पंच विषयांतें ॥ तैसें बभ्रुवाहनें पांचांतें ॥ निजशौर्यें जिंकिलें ॥ १६ ॥ तंव यम जो गृहजामात ॥ तो रायाप्रति बोलत ॥ पार्थात्मजें केला निःपात ॥ मज आज्ञा द्यावी आतां ॥ १७ ॥ ऐसें बोलोनि रविनंदन ॥ सक्रोधें आला धांवोन ॥ पार्थसैन्याचें कंदन ॥ करीत चालिला निजबळें ॥ १८ ॥ यमधर्म क्रोधें त्वरित ॥ पार्थसैन्यातें मारित ॥ जे कां असती गृहजामात ॥ ते आपपर न विचारिती ॥ १९ ॥ श्वशुराची पडली भीड थोर ॥ आपुले पुत्राचे मारीत वीर ॥ ऐसें करूं लागला दक्षिणेश्वर ॥ मग इतरांची कथा काय ती ॥ २० ॥ श्वशुरें बरें ह्मणावें ह्मणोन ॥ पार्थसैन्याचें करीत कंदन ॥ निजसैन्य भंगलें देखोन ॥ पार्थ कृष्णाप्रति बोले ॥ २१ ॥ नररूपी हा महाशूर ॥ करितो सैन्याचा संहार ॥ हा कोण असे गा वीर ॥ मजलागीं निवेदीं ॥ २२ ॥ ऐकोनियां पार्थवचन ॥ तयाप्रति बोले जगज्जीवन ॥ हा तों यम रविनंदन ॥ उभा राहिला तुजपुढें ॥ २३ ॥ हा वीरवर्म्यानें प्रार्थिला ॥ गृहजामात करून ठेविला ॥ ह्मणोनि तुमचा स्नेह सोडिला ॥ मारूं लागला सैन्यातें ॥ २४ ॥ ऐकोनियां कृष्णवाणी ॥

१ आधिदैविक, आधिभौतिक व आध्यात्मिक असे तीन प्रकारचे ताप. २ यम. ३ घरजांवई.

तयासी पुसे गांडीवपाणी[1] ॥ अपूर्व सांगतां जी करणी ॥ नृपगृहीं यम कैंचा ॥२५॥ ऐकोनियां पार्थवचन ॥ बोलता झाला नारायण ॥ पार्था ऐकें सावधान ॥ पूर्वकथा सांगतों ॥ २६ ॥ मालिनी नामें राजसुता ॥ झाली लावण्यगुणसरिता ॥ मानव पति नये तियेच्या चित्ता ॥ जाणोनि पिता तयेसी बोले ॥ २७ ॥ पिता ह्मणे गुणनिलये ॥ मानव वर तुझे मना नये ॥ तरी कोण वरिसी तनये ॥ मजलागीं सांगावें ॥ २८ ॥ ऐकोनियां पित्याची वाणी ॥ बोलती झाली मालिनी ॥ मज तूं देईं यमालागुनी ॥ अन्य विचार न करावा ॥ २९ ॥ पावोनि यमधर्माचे चरण ॥ तयाचें मी करीन सेवन ॥ जे पुण्यवंत येतील जन ॥ त्यांचें दर्शन घेईन मी ॥ ३० ॥ तुह्मी होईल परमकीर्ति ॥ सर्वत्र होईल महाख्याति ॥ मानव कां नये चित्तीं ॥ तेंही सांगतें निजगुज ॥ ३१ ॥ जरी वरीन मानव वर ॥ तरी तो मरण पावे सत्वर ॥ मग पुरुष तो वैश्वानर[2] ॥ तयासी संग करावा कीं ॥ ३२ ॥ एकासी देवोनि अंगसंग ॥ मग दुजयाचा घडेल प्रसंग ॥ यालागीं माझा मनोभंग ॥ धर्मचरण इच्छितसे ॥ ३३ ॥ आधीं मानवा भोगावें ॥ मग पावकासी सेवावें ॥ तेथोनियां यमें दंडावें ॥ हें करावें कासया जी ॥ ३४ ॥ निजपतीतें वंचोनि[3] ॥ परपुरुषीं करिती गमन ॥ त्यांतें दंडी रविनंदन ॥ नरकीं पतन करितसे ॥ ३५ ॥ तरी केलिया नाथें[4] ॥ सर्वही चुकतील अनर्थ ॥ ऐसा माझा मनोरथ ॥ पूर्ण करावा पितया तुवां ॥ ३६ ॥ म्यां तयाचें करितां सेवन ॥ तो मज रक्षील पापापासून ॥ ऐसिया विचारें पुण्य गहनें[5] ॥ तुजही घडेल जी ताता ॥ ३७ ॥ मानवासी केलिया कन्यादान ॥ तें पुण्य पृथ्वीदानासमान ॥ हा साक्षात् यमधर्म ॥ समर्पितां यास पुण्य अगाध ॥ ३८ ॥ ऐसें माझें मनोगत ॥ तुवां पुरवावें समस्त ॥ ऐकतां नंदिनीची मात ॥ वीरवर्मा संतोषला ॥ ३९ ॥ राव विचारित चित्तीं ॥ धन्य ही कन्या महामति ॥ इनें तों विचारसरितापति ॥ मंथोनि काढिला परम हा ॥ ४० ॥ आतां निजसुता रविनंदना ॥ अर्पील तो नृपभूषणा ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपणा ॥ सावधान ऐकावें ॥ ४१ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ४२ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके अश्ववीरवर्मराज्यप्रवेशो नाम अष्टचत्वारिंशोध्यायः ॥ ४८ ॥ ॥ अध्याय ॥ ४८ ॥ ओव्या ॥ ४२ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥

१ अर्जुन. २ अग्नि. ३ फसवून. ४ पति. ५ मोठें.


अध्याय ४९.
यमराज
नारद.
वीरवर्मा राजा
नारद
मालिनी व तिच्या सख्या.

श्रीगणेशाय नमः ॥  ॥ जैमिनि ह्मणे गा भारता ॥ पुढें वर्तली कैसी कथा ॥ ती एकाग्र चित्तें आतां ॥ नृपवर्या परिसावी ॥ १॥ सुतावचन ऐकोनि नृपती ॥ स्रविता झाला दक्षिणाधिपती ॥ अहोरात्र निश्चिती ॥ अनुष्ठानीं बैसला ॥ २ ॥ वीरवर्म्याची नंदिनी ॥ लावण्यलतिका मालिनी ॥ तीही तत्पर धर्मआराधनीं ॥ द्विजवाक्यें जाहली ॥ ३ ॥ दिवसेंदिवस होतां तरुण ॥ मनोभावें करी आराधन ॥ तें यमातें वर्तमान ॥ नारदमुखें जाणवलें ॥ ४ ॥ नारदें विचारिलें मनीं ॥ ही अत्यंत रूपवंत मालिनी ॥ इचा निश्चय रविनंदनीं ॥ परी कोण जावोनि सांगेल ॥ ५ ॥ ही श्रम करिते दारुण ॥ परम निर्दय रविनंदन ॥ सर्व जाणे जनांचें आचरण ॥ इयेसी कां मंदावला ॥ ६ ॥ तरी मी धर्मकार्य करीन ॥ यमधर्माप्रति सांगेन ॥ आपणा न घडे कन्यादान ॥ तरी घडवणें इतरांचें ॥ ७ ॥ स्वयें न करवे आचरण ॥ तरी साह्य करावें दुजयालागून ॥ जरी न करवे अन्नदान ॥ तरी दावावें सदन अन्नाचें ॥ ८ ॥ ऐसा मनीं करोनि विचार ॥ नारद चालिला सत्वर ॥ पावोनि रविसुतनगर ॥ सभेमाजी प्रवेशला ॥ ९ ॥ यमें देखतां नारदातें ॥ साष्टांगें वंदिलें तयातें ॥ पूजा उपचारें संतुष्ट चित्तें ॥ उत्तमासनीं बैसविला ॥ १० ॥ मग नारद बोले यमासी ॥ तूं सर्व मनोगतें जाणसी ॥ परी मालिनीच्या श्रमांसी ॥ कां न जाणसी यमधर्मा ॥ ११ ॥ सत्यव्रत धर्मपरायण ॥ त्वदर्थ करिते अनुष्ठान ॥ अहोरात्र करित स्तवन ॥ तव प्राप्ति व्हावयातें ॥ १२ ॥ रूपें तरी मदनमोहिनी ॥ मृगनयनी विशाल तरुणी ॥ शशिवदना चारुहासिनी ॥ अनुपम जी त्रिलोकीं ॥ १३ ॥ पराशा करावी सफळ ॥ हें तों भल्यास उचित केवळ ॥ मनुष्यरूप घेवोनि सोज्वळ ॥ स्वसैन्येंसीं तेथें जावें ॥ १४ ॥ तें रम्य सारस्वतपुर ॥ जेथें चतुष्पाद धर्म पवित्र ॥ सकळ जन धर्माचरणीं तत्पर ॥ पाप अणुमात्र नसे तेथें ॥ १५ ॥ तेथें करूनि तुवां गमन ॥ तें नगर करावें जी पावन ॥ ऐसें ऐकतां नारदवचन ॥ मग रविनंदन काय बोले ॥ १६ ॥ ह्मणे नारदा ऐक वचन ॥ तुवां तेथें करावें गमन ॥ वैशाखशुद्ध द्वादशीस येऊन ॥ वरीन ऐसें सांगावें ॥ १७ ॥ ऐसें यमधर्मवाक्य ऐकून ॥ नारद चालिला तेथून ॥ रायाप्रति वृत्तांतकथन ॥ सांगता झाला तयाचें ॥ १८ ॥ नारद ह्मणे वो मालिनी ॥ तव करग्रहणालागुनी ॥ यम येतसे दुश्चित्त मनीं ॥ न व्हावें तुवां यावरी ॥ १९ ॥ तेणें नेम केला मजसीं ॥ वैशाखशुद्ध द्वादशीसीं ॥ येवोनियां परिवारेंसीं ॥ पाणिग्रहण करील ॥ २० ॥ ऐकतां नारदमुनीची गोष्टी ॥ संतुष्ट झाली ती गोरटी ॥ परमानंद वाटला पोटीं ॥ आणि संतोषला वीरवर्मा ॥ २१ ॥ यम विवाहकार्यालागीं उदित ॥ मग रोग पाचारिले अष्टोत्तरशत ॥ ते त्याचे वऱ्हाडी निश्चित ॥ अग्रगण मिरवती ॥ २२ ॥ ते पराक्रमी महास्थूळ ॥ जे सर्वांसी अति प्रबळ ॥ समीप पातले सकळ ॥ स्वामिआज्ञेंकरोनि ॥ २३ ॥ जो सर्व रोगांचा नायक ॥ ज्याचा सर्व जनांसी धाक ॥ तो क्षयरोग प्रमुख ॥ यमधर्म त्यातें अनुवादे ॥ २४ ॥ धर्म ह्मणे क्षयरोगा ॥ ब्रह्महत्यादिक दुःसंगा ॥ धातुपुष्टीसी करिसी भंगा ॥ ऐक विचार माझा तूं ॥ २५ ॥ म्यां विवाह मांडिला यथार्थ ॥ तरी तूं अनंत

रोगांसहित ॥ सारस्वत नगरांत ॥ तुवां जावें वेगेंसीं ॥ २६ ॥ तंव क्षयरोग बोले वचन ॥ आह्मांसी तेथें नव्हे प्रवेशन ॥ आह्मां-
लागीं संस्थान ॥ कदापि नोहे ते स्थानीं ॥ २७ ॥ तेथींचे जन द्विजसेवक ॥ राजयासह धर्मिष्ठ लोक ॥ वेदध्वनीनें निष्टंक ॥ माझे
कर्ण जातील ॥ २८ ॥ तेथें होमधूम्र पावन ॥ त्या नगरामाजी परिपूर्ण ॥ तेणें जातील माझे नयन ॥ तेथें प्रवेश करवे मज कैसा
॥ २९ ॥ माझा पुत्र प्रमेहनायक ॥ तो छिद्रप्रिय मूत्रनाशक ॥ जो गुणी मजसमान देख ॥ तेणें कोठें राहावें ॥ ३० ॥ तरळा नामें
माझी कामिनी ॥ तयेची अद्भुत असे करणी ॥ क्षणमात्रें करी जीवहानी ॥ ही तेथें कैसी राहील पैं ॥ ३१ ॥ पंडुरोग माझा बंधु ॥
जो अपार दुःखाचा सिंधु ॥ तयाची धाप नामें वधू ॥ जी करीत कंठरोधन ॥ ३२ ॥ तियेचा पुत्र जलोदर ॥ जो पित्याहून गुण-
सागर ॥ तयासी कोठें करावें स्थिर ॥ तये नगरीं सांग पां ॥ ३३ ॥ राजा धर्मकार्यीं अति रत ॥ जेथें जनांचें पुण्य बहुत ॥ जेथें
रविपुत्र तूं कुंठित ॥ तेथें आमची गणना काय असे ॥ ३४ ॥ जेथें स्वामीची न चाले सत्ता ॥ तेथें भृत्यांची काय कथा ॥ जेथें
चंचुप्रवेश नसे दुरिता ॥ तेथें ही रोगसरिता काय सरे ॥ ३५ ॥ व्रणरोगादि माझे गण ॥ तूं जयांसी देतोसी सन्मान ॥ ते तेथें
पावती अपमान ॥ मग आह्मीं काय करावें ॥ ३६ ॥ ज्या व्रणाचीं रूपें अष्टोत्तरशत ॥ अरुचि त्याची प्रिया विख्यात ॥ ज्याचा
भगेंद्र रोग असे सुत ॥ तेणें कोठें राहावें जी ॥ ३७ ॥ जे गुरुस्त्रियेसीं करिती गमन ॥ त्यांचे शिश्नमूळीं ज्याचें स्थान ॥ तयासी
सर्वथा नव्हे प्रवेशन ॥ तया नगरीं धर्मराया ॥ ३८ ॥ जे गुरुइच्छेतें नुलंघिती ॥ ऐसी तेथें जनवृत्ती ॥ त्याहूनि शुद्ध तो नरपती ॥
तेथें कैसें राहावें ॥ ३९ ॥ एकाग्र करूनियां मानस ॥ करोनि धर्मरसाची मूस ॥ ते सारस्वतपुरी सावकाश ॥ ओतिली जी विरिं-
चीनें ॥ ४० ॥ काम क्रोध मद मत्सर ॥ दंभ लोभ अहंकार ॥ शिंवेसी येतां दंडप्रहार ॥ करिती तेथें श्वपचादिक ॥ ४१ ॥ जेथें
चतुर्वाद्यांचा गजर ॥ सप्रेम जेथें नामोच्चार ॥ तेथें पापरोगांचा केर ॥ कैसा पडेल स्वामिया ॥ ४२ ॥ त्रयोदशविध हा स्फोटक ॥
ज्याचा भगेंद्र असे जनक ॥ क्रोध आणि अरोचक ॥ दोघे पुत्र पैं त्याचे ॥ ४३ ॥ शूलरोग शतत्रय ॥ यांसी कैंचें तेथें आलय ॥ हे
तेथें जातां होईल यांचा क्षय ॥ मग कैसें जी करावें ॥ ४४ ॥ धनुर्वातादिक महावीर ॥ तंतुरोगादि विस्तार ॥ कर्णशूलादि भया-
सुर ॥ कैसे जय पावती तेथें ॥ ४५ ॥ अति दुष्ट नेत्ररोग ॥ परम बलाढ्य शिरोरोग ॥ अति विख्यात मुखरोग ॥ कोणे स्थळीं हे
ठेवावे ॥ ४६ ॥ वल्मीक आणि गंडमाळा ॥ सन्निपाताचा सर्व मेळा ॥ अपस्माराचा सर्व पाळा ॥ कोठें राहेल सांगावें ॥ ४७ ॥ हे
तों मुख्य सैनिक वीर ॥ यांहूनि असती रोग अपार ॥ भिन्न भिन्न करितां रोगोच्चार ॥ कथेसी विस्तार होईल कीं ॥ ४८ ॥ तुझें
वचन ऐकोन ॥ कां तेथें न करूं गमन ॥ परी तेथें नव्हे प्रवेश जाण ॥ ह्मणोनि क्षीण झालों कीं ॥ ४९ ॥ ऐसें ऐकोनि रोगवचन ॥
तयांप्रति बोले रविनंदन ॥ तुह्मी नररूपें घेऊन ॥ तया नगरीं प्रवेशावें ॥ ५० ॥ स्वरूपें धरा सुंदर ॥ लेवोनि वस्त्रालंकार ॥ ऐसिया

प्रकारें तें नगर ॥ वेगें तुह्मी प्रवेशा ॥ ५१ ॥ जैसा येथें करितां वास ॥ तैसाच तेथें करावा सावकाश ॥ मग आपुलिया वैभवास ॥ पापी जीवांस दावावें ॥ ५२ ॥ पापियां करावें पीडन ॥ पुण्यात्मयां करावें वंदन ॥ शुभ रूपांतें धरून ॥ तेथें वास करावा ॥ ५३ ॥ सर्वांप्रति बोले वचन ॥ यथायोग्य पाहोनि आचरण ॥ देईन तुह्मांसी स्थान ॥ चला तुह्मी सर्वही ॥ ५४ ॥ जेणें ब्रह्महत्या केली दारुण ॥ तो नरक भोगी जाण ॥ मग जन्मे नरलोकीं येऊन ॥ तेथें राहावें क्षयरोगें ॥ ५५ ॥ क्षयें व्यापिला जो नर ॥ तेणें कोटी जपावा शिवपंचाक्षर ॥ ब्राह्मणांस दानें द्यावीं यथाशास्त्र ॥ मग क्षयें त्यास सोडावें ॥ ५६ ॥ चोवीस निष्कांचा सुवर्णपुरुष ॥ करून द्यावा ब्राह्मणास ॥ आणि करावें महारुद्रास ॥ होमेंसहित आनंदें ॥ ५७ ॥ क्षयरोगी असतां वित्तहीन ॥ तेणें सोमवारीं पूजावा ईशान ॥ मासमात्र करितां गौतमीस्नान ॥ तो क्षयापासोनि होय निर्मुक्त ॥ ५८ ॥ जे पुण्यवंत असती नरनारी ॥ तेथें असावें भृत्यापरी ॥ तुझे रमणीस स्थळ निर्धारीं ॥ नेमोनि देतों तें ऐक ॥ ५९ ॥ कुमरांसी जे विषूचिका ॥ ती तों तुझी नायिका ॥ ही होतसे कोण्या पातका ॥ तेंही आधीं सांगेन ॥ ६० ॥ देवास देवविलें वित्त ॥ त्यातें जो हरी मदोन्मत्त ॥ जो ओढी विप्र पात्रस्थ ॥ तेथें तव प्रिया असों द्यावी ॥ ६१ ॥ पुत्रबंधुविप्रांवांचून ॥ एकला भक्षी मिष्टान्न ॥ तव प्रिया त्याच्या देहीं समाधान ॥ पावोनि असो सर्वदा ॥ ६२ ॥ जो नित्य करील अन्नदान ॥ तैसेंचि देईल क्षीरदान ॥ मग तयाचे वंदोनि चरण ॥ तया नरातें सोडावें ॥ ६३ ॥ तव पुत्राचें ऐक स्थान ॥ जो मातृगोत्रासीं करी गमन ॥ नरनारी ऐसें गृहगमन ॥ परस्परें जी जाया बरवी ॥ ६४ ॥ तेथें तव पुत्र प्रमेह प्रबळ ॥ सुखें राहेल चिरकाळ ॥ जो सुवर्ण चोरील सर्वकाळ ॥ तन्मूत्रछिद्रीं राहावें ॥ ६५ ॥ तो सुवर्णसिकता देईल पळ ॥ जरी देवासी सुवर्णभूषणें करील ॥ तरी तेथोनि प्रमेहें काढावा पळ ॥ सर्वथा तेथें न राहावें ॥ ६६ ॥ पळप्रमाण सुवर्ण-कमळ ॥ करूनि विप्रासी देईल ॥ तो मूत्रस्थळापासोनि सुटेल ॥ मग तेथें न राहावें ॥ ६७ ॥ सपत्नीक पंडुरोगास ॥ स्थान सांगतों मी तयास ॥ जो करी शिवलिंगच्छेदास ॥ आणि सर्वस्वा अपहारी ॥ ६८ ॥ परभाग्योदय देखोन ॥ जो मानी दुःख दारुण ॥ तेथें धापेसहवर्तमान ॥ पंडुरोगें असावें ॥ ६९ ॥ पाहोनि शास्त्रोक्त लक्षण ॥ भावें करील महिषीदान ॥ जपापुष्पें करावें पूजन ॥ सर्षप-पिण्याक देऊनि ॥ ७० ॥ तीर्थीं अथवा गंगातीरीं ॥ त्रिवार विष्णुसहस्रजप करी ॥ मग तयातें सांडोनि दुरी ॥ पंडुरोगें पळावें ॥ ७१ ॥ वापी कूप सरोवर ॥ यांचा करील जो जीर्णोद्धार ॥ तयातें सोडोनि सत्वर ॥ पळे तेथोनि बंधुजाया ॥ ७२ ॥ संग्रहणी नामें तुझी भगिनी ॥ तयेसी स्थान देतों पाहुनी ॥ जो हरी धर्मद्रव्यालागुनी ॥ तेथें इणें असावें ॥ ७३ ॥ वस्त्रें कांचन भूषण ॥ जो विप्रासी देईल दान ॥ ऐसा शुद्ध झालिया जाण ॥ तेथोनि तियेनें पळावें ॥ ७४ ॥ जळोदरालागीं स्थान ॥ म्यां योजिलें असे पाहून ॥ जो आदरें करी गर्भपतन ॥ त्याचे देहीं तो वसो ॥ ७५ ॥ जे मज मान्य असती बहुत ॥ ऐसे व्रण अष्टोत्तरशत ॥ तेही

तयाचे देहीं राहोत ॥ निरंतर जाण पां ॥ ७६ ॥ तो जरी करील तुळापुरुषदान ॥ तरी जळोदरें करावें गमन॥ जरी करील अर्ध-प्रसूत गोदान ॥ तरी व्रणें मग पळावें ॥ ७७ ॥ आतां अरुचीलागीं जाण ॥ म्यां योजिलें असे स्थान ॥ जो रसांचें करील तस्कर-पण ॥ तेथें तियेनें असावें ॥ ७८ ॥ तेणें दिधलिया रसदान ॥ देईल वस्त्रें कांचन ॥ मग अरुचीनें पलायन ॥ सर्वथा जाण करावें ॥ ७९ ॥ आतां भगेंद्रालागीं स्थान ॥ मी सांगतों ऐक सावधान ॥ जो करी सर्वस्त्रियांसी गमन ॥ तेथें तेणें असावें ॥ ८० ॥ जरी सुवर्णकर्दळी करील ॥ फळें भूषित होईल ॥ ऐसें ब्राह्मणासी देईल ॥ मग त्या भगेंद्रें पळावें ॥ ८१ ॥ जरी करील विश्वासघात ॥ तेथें राहे तो सन्निपात ॥ जरी तो शिवालय करील त्वरित ॥ तरी सन्निपात निरसेल ॥ ८२ ॥ जो परनिंदा करी नर ॥ तेथें राहे अतिसार ॥ लिंगप्रतिष्ठा केलिया सत्वर ॥ त्या नरा सोडोनि पळावें ॥ ८३ ॥ उत्तम देखोनि पुरुष ॥ जो तयाचा करील द्वेष ॥ स्थान योजिलें तें खोकल्यास ॥ मरणांत पीडा जो करी ॥ ८४ ॥ जरी तो देईल भूमिदान ॥ सर्व ब्राह्मणांचें करील स्तवन ॥ मग तेणें त्या नरा सोडून ॥ त्वरें दुरी पळावें ॥ ८५ ॥ अधिक जेवी जो ब्राह्मण ॥ त्याचा द्वेष करी मलिन ॥ तेथें अरोचक असो पूर्ण॥ अन्न तयातें जिरों नेदी ॥ ८६ ॥ जरी तो नाना प्रकारचीं अन्नें ॥ करूनि करील विप्रसंतर्पणें ॥ तें देखोनि पलायनें ॥ अरोचकें करावें ॥ ८७ ॥ जे शूळरोग तीन शत ॥ तयांसी हीं स्थानें मी देत ॥ जे अधिक शब्दशरें विंधित ॥ सुहृदविप्रमित्रांसी ॥ ८८ ॥ जे मुख्या जनांतें पीडिती ॥ निरपराधें शस्त्रें छेदिती ॥ सामर्थ्य असोनि आशा भंगिती ॥ शूळें तेथें राहावें ॥ ८९ ॥ जरी ते करितील बंधननिर्मुक्त ॥ पक्षी सोडवितील पंजरस्थ ॥ आणि जे तस्करापासोनि सोडवित ॥ निजबळेंकरूनियां ॥ ९० ॥ गोब्राह्म-णांचें पाळण ॥ यथाशक्ति करिती जे जन ॥ ऐसिया पुरुषांतें देखोन ॥ शूळें शतत्रयीं पळावें ॥ ९१ ॥ जो न साहे परोदयातें ॥ उचकीस अवकाश होय त्यातें ॥ जरी तो करील लक्षहोमातें ॥ तरी त्यातें सोडावें ॥ ९२ ॥ जो करी परसुतावलोकन ॥ तें धनुर्वा-तांचें स्थान ॥ तो जरी करील रविवारीं तैलदान ॥ तरी धनुर्वातें मग सोडावें ॥ ९३ ॥ जो न करी हरिकथाश्रवण ॥ जे नायकती साधुस्तवन ॥ कपाळशूळें जाऊन ॥ तया स्थळीं राहावें ॥ ९४ ॥ जे देतील तिळदान ॥ आणि कपिलेचें गोदान ॥ ऐसे देखोनि शुद्ध जन ॥ महाशूळें पळावें ॥ ९५ ॥ जे करिती परधनहरण ॥ आणि इच्छिती परदारागमन ॥ जे करपात्रीं भक्षिती अन्न ॥ तें स्थान नेत्ररोगाचें ॥ ९६ ॥ जरी ते करितील अन्नदाना ॥ सुवर्णघट देतील दक्षिणा ॥ ऐसिया पुरुषां देखोनि जाणा ॥ मग नेत्ररोगें पळावें ॥ ९७ ॥ श्रीशैल सोमनाथ ॥ जो काशीमाजील विश्वनाथ ॥ ऐसियांलागीं देखतां त्वरित ॥ पळोनि जाइजे नेत्ररोगें ॥ ९८ ॥ जो कधीं न करी साधूचें स्तवन ॥ जो सदा परनिंदापरायण ॥ पैशुन्य सदा ज्याचें वचन ॥ तें स्थान सदा मुखरोगाचें ॥ ९९ ॥ जरी तो करील साधुस्तवन ॥ नित्य करील हरिस्मरण ॥ तो देईल जरी श्वेतवृषभ दान ॥ तरी मुखरोगें पळावें ॥ १०० ॥ महा रक्षोनि

ठेविती धन ॥ ठेविलें हरी तत्क्षण ॥ तें न दे तयालागून ॥ तेथें गलांडें रहावें ॥ १ ॥ जरी तो पावोनि पश्चात्ताप ॥ विप्रां धन देईल अमुप ॥ झाला जाणोनि निष्पाप ॥ मग गलांडादिकीं पळावें ॥२॥ श्रोत्रिय ब्राह्मणा जो मारी ॥ नसतां दोष मुखें उच्चारी॥ कुष्ठरोगें जावोनि झडकरी ॥ तयाचे शरीरीं असावें ॥ ३ ॥ जरी तो श्रोत्रियाचें करील स्थापन ॥ मुखें करील हरिकीर्तन ॥ जरी करील सूर्यआराधन ॥ कुष्ठें तेथून पळावें ॥ ४ ॥ जो परास देतां अन्नकवळ ॥ काढी तो महाखळ ॥ देवउपकरणां हरील ॥ गंडमाळांचें स्थान तें ॥ ५ ॥ जो करील विद्यादान ॥ शिवालयीं बांधील घंटा पूर्ण ॥ जरी करील रत्नदान ॥ तरी गंडमाळा तेथून पळतील ॥ ६ ॥ वदान्य संतुष्ट नर देखोन ॥ जो क्रोधें होय मूर्च्छायमान ॥ तें अपस्माराचें स्थान ॥ शीतरोगासमवेत ॥ ७ ॥ जरी तो करील अर्घ्यप्रदान ॥ कृच्छ्र धेनु देईल दान ॥ आणि करील अग्निसेवन ॥ तरी अपस्मार जाईल ॥ ८ ॥ जे नर अधम मंद मती ॥ क्रोधें ब्रह्मसूत्रातें तोडिती ॥ तेथें करावी हो वस्ती ॥ सर्व तापें झडकरी ॥ ९ ॥ जरी ते सुवर्णसूत्र करिती ॥ देवब्राह्मणांला समर्पिती ॥ ऐसियांतें देखोनि पळती ॥ सर्व ताप तेथोनि ॥ ११० ॥ जो दंभाचारें करी धर्माचरण ॥ तेथें राहो गजकर्ण ॥ जरी तो रवितीर्थीं करील स्नान ॥ तरी तें गजकर्ण पळेल ॥ ११ ॥ विश्वासघातादि जे दोष ॥ जाणोनि जे करितील पुरुष ॥ शिरपीडादि रोग सावकाश ॥ तेथें राहोत चिरकाळ ॥ १२ ॥ तो जरी करील सूर्यआराधन ॥ आणि करील विप्रभोजन ॥ तो शुद्ध पुरुष देखोन ॥ शिरोरोगें पळावें ॥ १३ ॥ अनंत कर्में अनंतरोग ॥ त्यांतें सांगेल कोण सांग ॥ सांगतां वाढेल ग्रंथरंग ॥ ह्मणोनि संक्षेपें सांगितलें ॥१४॥ सर्व रोगांचें उपशमन ॥ शीघ्र करील सूर्यआराधन ॥ करावें हरिकथाश्रवण ॥ विश्वास ठेवोनि विप्रवचनीं ॥१५॥ ऐशीं आपुलिया वदनें ॥ सर्व रोगांचीं सांगितलीं स्थानें ॥ जरी सविस्तर जया ऐकणें ॥ तरी कर्मविपाकीं पाहावें ॥ १६ ॥ ऐसिया रोगांसी संगें घेऊन ॥ लग्नासी निघे रविनंदन ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ सावधान ऐकावें ॥ १७ ॥ इति श्रीजैमिनिकथा अश्वमेधरसायन ॥ जे कर्णपात्रें करितील प्राशन ॥ त्यांचा भवरोग हरे दारुण ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ११८ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके सर्वरोगसहितयमागमनं नाम एकोनपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ४९ ॥ अध्यायः ॥ ४९ ॥ ओव्या ॥ ११८ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे नृपनाथा ॥ ऐकें पूर्वजांची कथा ॥ हरी संसाररोगव्यथा ॥ श्रवणरसायनेंकरोनि ॥ १ ॥ असा घेवोनि भृत्यमेळा[1] ॥ यम निघाला सारस्वतपुराला ॥ राजकन्या वरावयाला ॥ पावला जेथें नारदमुनि ॥ २ ॥ देखतांचि सारस्वतनगर ॥ ऐकिला हरिनामगजर ॥ रोग होवोनि भयातुर ॥ दश दिशा पळताती ॥ ३ ॥ धीर धरोनि खद्योतसेना ॥ भेटों आली जेवीं तपना[2] ॥ तरी ते अरुणोदयें नासे जाणा ॥ कैंची भेटी मग सूर्या ॥ ४ ॥ नातरी गौतमीं सिंहस्थीं स्नान ॥ करितां पळती दोष दारुण ॥ तेवीं देखतां सारस्वतपट्टण ॥ रोग पळाले भयभीत ॥ ५ ॥ ते इंदिरापतीचे भक्त ॥ दानोदकें सिंधु केला रिक्तें[3] ॥ ऐसा पुण्यश्लोक विख्यात ॥ तेथें यमधर्म लग्नासी पातला ॥ ६ ॥ सारस्वत नगर देखोन ॥ धर्मराज पावला समाधान ॥ तों भृत्य करिती पलायन ॥ न मिळे स्थान ह्मणोनि ॥ ७ ॥ यमें देखिली मालिनी ॥ होमशाळेमाजी स्थिरासनीं ॥ यमधर्म योजोनि मनीं ॥ आहुती हुताशनीं[4] समर्पित ॥ ८ ॥ नारदादि मुनींचे चरण ॥ भावें पूजितसे अनुदिन ॥ यम पावला समाधान ॥ मग रायाप्रति बोलत ॥ ९ ॥ मग रायासी ह्मणे सावधान ॥ मी यमधर्म झालों प्रसन्न ॥ काय मागतोसी वरदान ॥ तेंचि देतों तुजलागीं ॥ १० ॥ तुझें देखोनि उत्तमाचरण ॥ मज बहुत झालें समाधान ॥ परी जवळी असे तुज मरण ॥ ह्मणोनि वर मज मागें ॥ ११ ॥ वीरवर्मा बोले यमासी ॥ तूं जरी जामात मज लाधलासी ॥ तरी वर मागणें तुजसी ॥ धिक्कार असो मजलागीं ॥ १२ ॥ जे कुळीं अधर्मी पूर्ण होती ॥ ते नर कन्याधनातें इच्छिती ॥ कल्पपर्यंत नरकीं पचती ॥ तैसा मी नोहें कुलाधम ॥ १३ ॥ रायासी यम ह्मणे तूं दाता ॥ मी धर्मराज असें प्रतिग्रहीता ॥ त्या तुज मी आशीर्वाद देतां ॥ निषेधिता कोण मानी ॥ १४ ॥ तंव वीरवर्मा बोले वचन ॥ जे समयीं मज होईल मरण ॥ त्या वेळीं होय हरिस्मरण ॥ हाचि वर मागतों ॥ १५ ॥ जनांमाजी असे निंद्याचरण ॥ परी जेणें जोडती हरिचरण ॥ तें अवश्य करावें आपण ॥ भय सोडोनि जनांचें ॥ १६ ॥ मग यमधर्म बोले नृपातें ॥ मी तों कल्पपर्यंत न सोडीं तूतें ॥ जोंवरी तूं पाहासी कृष्णातें ॥ तोंवरी परदळातें[5] वारीन ॥ १७ ॥ ऐसें बोलतां यम वचन ॥ मग नृपें केलें पाणिग्रहण ॥ तेथें पावोनि समाधान ॥ गृहजामातपणें[6] राहिला ॥ १८ ॥ तरी तो हा जाण रविनंदन ॥ पार्थाप्रति बोले जगज्जीवन ॥ रायासी झालिया मम दर्शन ॥ यम जाईल निजस्थाना ॥ १९ ॥ तों वीरवर्मा सिद्ध होत ॥ मम दर्शनीं उत्कंठित ॥ येतसे सकळ वीरांसमवेत ॥ होईं सावध तूं आतां ॥ २० ॥ मयूरकेत बभ्रुवाहन ॥ ताम्रध्वज कर्णनंदन ॥ प्रद्युम्नादि वीरगण ॥ युद्ध करोत पैं त्यासी ॥ २१ ॥ तेथें युद्ध होईल दारुण ॥ चतुरंग सेनेचें होईल पतन ॥ तुह्मी आह्मी उभे ठाकून ॥ कौतुक पाहूं तयाचें ॥ २२ ॥ ऐसें बोलत असतां नारायण ॥ तों वीरवर्मा आला धांवून ॥ अर्जुनाप्रति वचन ॥ काय बोलता जाहला ॥ २३ ॥ स्थिर होईं रे पार्था ॥ शरण जाईं

१ सेवकांचा समुदाय. २ सूर्याला. ३ रिकामा. ४ अग्नींत. ५ शत्रुसैन्याला. ६ घरजांवई होऊन.

रमाकांता ॥ माझे शर साहें आतां ॥ संग्राम सर्वथा न सोडीं ॥ २४ ॥ ऐसें बोलोनियां वचन ॥ सप्त बाणीं विंधिला अर्जुन ॥ बाणवृष्टीनें जनार्दन ॥ आच्छादिला क्षणमात्रें ॥ २५ ॥ पांच पांच बाणेंकरून ॥ वीरें वीर मूर्च्छित केले संपूर्ण ॥ बभ्रुवाहनादि सैन्य ॥ मयूरकेतही पाडिला ॥ २६॥ सक्रोध तेव्हां पार्थ वीर ॥ शरें सर्व व्यापिलें अंबर ॥ मुखें बोले उत्तर ॥ सोड सोड रे अश्वातें ॥ २७ ॥ वीरवर्मा बोले वीरांतें ॥ सावध रक्षा रे हयातें ॥ आतां कृष्णार्जुनांतें ॥ युद्ध करणें लागेल ॥ २८ ॥ मग कृष्णासहित गुडाकेश ॥ बाणें आच्छादिला निःशेष ॥ करीत सिंहनादघोष ॥ बलाहक जेवीं आकाशीं ॥ २९ ॥ मदांध झालिया नयन ॥ निज-स्वरूप होय अदर्शन ॥ तेवीं नृपें सोडोनि मार्गण ॥ नरनारायण झांकिले ॥ ३० ॥ तयाचें तें लाघव देखून ॥ सव्यसाची सोडीत बाण ॥ निमेषमात्रेंकरून ॥ निरसिलें बाणजाळ ॥ ३१॥ मग पार्थें दिव्य बाण ॥ सोडोनियां हृदयीं पूर्ण ॥ भेदिलें तेणें छिन्नभिन्न ॥ हृदय झालें तयाचें ॥ ३२ ॥ वीरवर्म्यानें तेच क्षणीं ॥ साठ बाणें गांडीवपाणी ॥ शतबाणें कैवल्यदानी ॥ हनुमंतही शतें विंधिला ॥ ३३ ॥ नृपें सोडोनियां बाणजाळ ॥ भ्रमविलें सकळ दळ ॥ जेवीं देखोनि मोहबळ ॥ जन्ममरणें जग भ्रमे ॥ ३४ ॥ ऐसा त्याचा पराक्रम ॥ स्वयें देखोनि पुरुषोत्तम ॥ पार्थाप्रति कैवल्यधाम ॥ काय वचन बोलत ॥ ३५ ॥ माझा पराक्रम हरला यासी ॥ म्यां जिंकिलें बहुतांसी ॥ तयापरी वीरवर्म्यासी ॥ माझेनि कदा न जिंकवे ॥ ३६ ॥ कर्णरथाचें चक्र भूमिगत ॥ करोनि केला तयाचा घात ॥ याचें चक्र ग्रासावया समर्थ ॥ धरणी नोहे जाण पां ॥ ३७ ॥ म्यां शिशुपाळाचें शिरकमळ ॥ सुदर्शनें छेदिलें तत्काळ ॥ तैसें याचें कंठनाळ ॥ चक्राचेनि न छेदवे ॥ ३८ ॥ बळें कनकाद्रीवरी सुमन ॥ मारितां नव्हे कंपायमान ॥ तैसें माझें सुदर्शन ॥ पुष्पप्राय यासी ॥ ३९ ॥ जे तुवां सोडोनि शर ॥ उडविलें जयद्रथाचें शिर ॥ नेवोनि टाकिलें समुद्रतीर ॥ ते शर येथें न चालती ॥ ४० ॥ तुवां खांडववन जाळिलें ॥ ऐरावतासी खालीं आणिलें ॥ ज्या शरें भीष्मादिक मारिले ॥ ते शर येथें तृणा-सम ॥ ४१ ॥ आतां हनुमंतें एक करावें ॥ निज पुच्छा वाढवावें ॥ गुंडाळोनि रथातें उडवावें ॥ नेवोनि टाकावें महार्णवीं ॥ ४२ ॥ ऐसें करील हनुमंत ॥ तरीच हा शमेल प्रस्तुत ॥ नाहीं तरी करील घात ॥ सर्व वीरांचा एकदांचि ॥ ४३ ॥ मग बोले हनुमान ॥ तें नव्हे कीं अशोकवन ॥ जंबूमाळ्याचा प्राण ॥ नव्हे घेणें ये स्थळीं ॥ ४४ ॥ जानकीतें त्रासिलें चित्तीं ॥ ती नव्हे ही राक्षस-जाती ॥ हा तों अतिबलाढ्य नरपती ॥ यासी कवणें झुंजावें ॥ ४५ ॥ तैं मी होतों तरुण ॥ रामचंद्राचे दयेंकरून ॥ आतां आलें वृद्धपण ॥ आणि हा तो काळाचा सासरा ॥ ४६ ॥ ऐसें बोलतां वातात्मज ॥ तयाप्रति बोले रामाग्रज ॥ कां तूं आंग चोरिसी सहज ॥ धर्मकार्यालागोनि ॥ ४७ ॥ तुह्मी आह्मी सर्व मिळोन ॥ धर्मकार्या असावें सावधान ॥ शतोपायेंकरून ॥ सिंधूमाजी रथ

१ बाणांनीं. २ आकाश. ३ अर्जुन. ४ मेघ. ५ बाण. ६ मोक्ष देणारा (श्रीकृष्ण). ७ पृथ्वी. ८ फूल. ९ मोठ्या समुद्रांत.

टाकीं ॥ ४८ ॥ ऐकोनियां हरिवचन ॥ संतोषला वातनंदन ॥ अकस्मात त्याचा रथ घेऊन ॥ आकाशपंथें उडाला ॥ ४९ ॥ तों वीरवर्मा काय करी ॥ कृष्णार्जुनांतें धरिलें करीं ॥ उडतां उडतां अंबरीं ॥ हनुमंतासी बोलत ॥ ५० ॥ हनुमंतासी बोले नृपनाथ ॥ तूं तों माझा नेतोसी रथ ॥ मी तुझा रथ कृष्णार्जुनांसहित ॥ घेऊनि आलों सरिसाचि ॥ ५१ ॥ तूं जेथें जेथें नेसील माझा रथ ॥ मीही हा रथ नेईन तेथ ॥ आतां न सोडीं कृष्णपार्थ ॥ परम भाग्यें लाधलों ॥ ५२ ॥ कष्टें साधिलिया तपकोटी ॥ स्वप्नीं नव्हे ज्याची भेटी ॥ तो सांपडला कृष्ण किरीटी ॥ कैसा सोडूं तयांतें ॥ ५३ ॥ क्षीरसागरामाझारी ॥ शेषमंचक अरुवारी ॥ विरहिणी असे रमा सुंदरी ॥ नित्य चिंतित वल्लभा ॥५४॥ हा पार्थभक्तीनें भुलला ॥ सोडिली कीं ते वेल्हाळा ॥ मी आतां भेटवितों तिजला ॥ विरहव्यथा हरावया ॥५५॥ आकाशीं शोभे जैसा तपन ॥ तैसा चंद्र न शोभे जाण ॥ येथें असे गुप्त कारण ॥ तें विचक्षण जाणती ॥ ५६ ॥ तरी तो शर्वरीवल्लभ ॥ मी पराक्रमें करीन सुलभ ॥ मग तो शोभवील नभ ॥ स्वकिरणमंडळानें पैं ॥ ५७ ॥ ऐकोनियां नृपवचन ॥ मग बोले वायुनंदन ॥ तुझें वाढविलें महिमान ॥ स्वभक्त ह्मणोन श्रीकांतें ॥ ५८ ॥ तूं तों अससी पराधीन ॥ वृथा करिसी बळाभिमान ॥ स्वमुखें बोलसी जाण ॥ आत्मपौरुष कासया ॥ ५९ ॥ जो वानी स्वपौरुष ॥ त्यातें न ह्मणावें सत्पुरुष ॥ अहंपण न माने देवास ॥ कासया रे जल्पसी ॥ ६० ॥ मग वीरवर्मा कपीतें बोलत ॥ माझा रथ न्यावयासी होसी समर्थ ॥ म्यां दोघे करीं दिधले असतां घात ॥ साहें माझे मुष्टीचा ॥ ६१ ॥ रथासह नृपनाथ ॥ हनुमंता मारीत मुष्टिघात ॥ तों पडत पडतां रामदूत ॥ काखेमाजी दाटला ॥ ६२ ॥ मग धांवोनि रमानाथ ॥ नृपहृदयीं मारिली लात ॥ तेणें मूर्च्छा तो पावत ॥ परी तिघांतें न सोडी ॥६३॥ वीरवर्मा सावध झाला ॥ पार्थरथातें धरूनि बोलिला ॥ ह्मणे म्यां एकें धरिलें तिघांला ॥ तिघांनीं मजला न धरवे ॥ ६४ ॥ एक तिघांतें जिंकी प्रबळ ॥ तिघांचें कोठें गेलें बळ ॥ या वचनाचे कल्लोळ ॥ वीर काय जाणा तुह्मी ॥ ६५ ॥ यमें मज सांगितलें मरण ॥ तें कोठें गेलें पळोन ॥ झालें श्रीकृष्णदर्शन ॥ आतां जन्ममरणा आंचवलों ॥ ६६ ॥ तोंवरीच जन्ममरणकथा ॥ जोंवरी न देखिलें देवकीसुता ॥ धणीवरी सिंधुजामाता ॥ देखतां मरण हरपलें ॥ ६७ ॥ म्यां श्यामकर्ण धरिले ॥ सर्व वीर मूर्च्छित पाडिले ॥ तिघांजणांतें तोषविलें ॥ पराक्रम दावूनि ॥६८॥ ऐसी ऐकोनि नृपोक्ति ॥ पार्थासी बोले रमापति ॥ सहस्र वर्षें युद्धांतीं ॥ न पावे हा पराभव ॥६९॥ श्यामकर्ण नगरीं नेले ॥ पहा वीर मूर्च्छित पाडिले ॥ आह्मांलागीं तोषविलें ॥ भुजाबळ दावूनि ॥७०॥ मग बोले सुभद्रापति ॥ तुज तोषविलें चित्तीं ॥ ऐसा बलाढ्य नृपति ॥ मजला तो न जिंकवे ॥ ७१ ॥ अनंत ब्रह्मांडांचा धनी ॥ विश्वव्यापका चक्रपाणी ॥ तुजला प्रिय जो जनीं ॥ तो मज दुर्बळा न जिंकवे ॥ ७२ ॥ मग वीरवर्मा बोले उत्तर ॥ अर्जुना तूं हें

१ आकाशांत. २ लक्ष्मी. ३ सुंदरी. ४ सूर्य. ५ चंद्र. ६ आकाश. ७ मारुति. ८ श्रीकृष्णाला. ९ पोटभर.

जिंकिसी चराचर ॥ त्रैलोक्य जिंकोनि समग्र ॥ देवालागीं तोषविसी ॥ ७३ ॥ ऐसें बोलोनि वचन ॥ रथावरी ठेविले धनुष्यबाण ॥ वंदोनियां कृष्णार्जुन ॥ भूमीवरी उतरला ॥ ७४ ॥ हनुमंतासी वंदोन ॥ तिघां दिधलें आलिंगन ॥ तिघे पावले समाधान ॥ तों सकळ सैन्य उठिलें ॥ ७५ ॥ तोषोनियां नृपनाथ ॥ नगरा नेले कृष्णपार्थ ॥ सकळ सैन्यासमवेत ॥ षोडशोपचारें पूजिले ॥ ७६ ॥ पांच दिवस युद्ध झालें ॥ साहावे दिनीं आतिथ्य केलें ॥ वस्त्रभूषणीं गौरविले ॥ सर्वही राव सैन्येंशीं ॥ ७७ ॥ अष्ट प्रकार मुक्ताफळें ॥ अनंत रत्नें सोज्वळें ॥ पार्थासी समर्पिलीं भूपाळें ॥ जीं शेषा न वर्णवती ॥ ७८ ॥ एकवीस सहस्र शुभ्र गज ॥ सहस्र श्यामकर्ण सतेज ॥ सहस्र नारी तेजःपुंज ॥ पार्थाकरीं समर्पिल्या ॥ ७९ ॥ मग नृप बोले हस्त जोडून ॥ म्यां सर्व राज्य केलें कृष्णार्पण॥ तन मन धनेंसीं शरण ॥ यादवेंद्रासी निघालों ॥ ८० ॥ यावरी अश्व तेथोनि निघाले ॥ वीरवर्म्यादिक सकळ चालिले ॥ पुढें नद लागतां श्यामकर्ण गेले ॥ खुर न भिजतां जळावरूनि ॥ ८१ ॥ तो महानद अद्भुत ॥ लहरिया आकाशीं उसळत ॥ तेथें दिग्गजाऐसीं क्रीडत ॥ जळचरें जयामाजी ॥ ८२ ॥ अनेक उसळती कल्लोळमाळा ॥ आठवा अर्णवचि भासला ॥ ऐसा नयनीं देखतां बोलिला ॥ पार्थवीर वीरवर्म्यातें ॥ ८३ ॥ पार्थ ह्मणे नरपुंगवा ॥ अपार आणवोनि नावा ॥ दळभार उतरवावा ॥ परतीरालागोनि ॥ ८४ ॥ बरवें ह्मणोनि नृपनाथ ॥ नौका आणविल्या अनंत ॥ परतीरा नेलें समस्त ॥ सकळ सैन्य उतरोनि ॥ ८५ ॥ यावरी राव चंद्रहास ॥ श्यामकर्ण नेईल वीरेश ॥ तो पुढिले प्रसंगीं इतिहास ॥ सावधान ऐकावा ॥ ८६ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ८७ ॥ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके वीरवर्मयुद्धाख्यानं नाम पंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५० ॥ ॥ अध्याय ॥ ५० ॥ ओव्या ॥ ८७ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ मुनि ह्मणे कुरुकुळटिळका ॥ ऐकें कथा कल्पलतिका ॥ येथूनि वर्णन पुण्यश्लोका ॥ चंद्रहासनृपतीचें ॥ १ ॥ श्यामकर्ण गेले पुढारां ॥ तया चंद्रहासाचिया नगरा ॥ मागलिया सैनिक वीरां ॥ अदृश्य ते जाहले ॥ २ ॥ अविद्येचे मोहनेंकरून ॥ अदृश्य होय स्वधननिधान ॥ कीं अस्ता पावतां तपन[1] ॥ अदृश्य होय पदार्थ ॥ ३ ॥ कीं अहंकाराचें स्फुरण ॥ हृदयस्थाचें होय अदर्शन ॥ तेवीं अदृश्य झाले श्यामकर्ण ॥ देखत देखत सकळ वीरां ॥ ४ ॥ मनोजवें[2] अश्व धांवती ॥ किंकटा शब्दें गर्जती ॥ रथ-चक्रें जीं घडघडिती ॥ नेणों प्रळयींचे मेघ काय ॥ ५ ॥ चंद्रबिंबाकार विचित्रें ॥ आकाशीं दाटलीं तीं छत्रें ॥ माजी चामरें उडती पवित्रें ॥ नेणों गंगांबुकल्लोळ ॥ ६ ॥ नाना वाद्यांचा होत ध्वनी ॥ नाद मावूं न शके गगनीं ॥ तळीं दडपला सहस्रफणी[3] ॥ दिग्गज-कर्णीं बधिरता ॥ ७ ॥ ना तें सैन्य ग्रहगण ॥ तेणें धराकाश भूषित जाण ॥ अर्जुन तो निशारमण ॥ सेनाकिरणें वेष्टिला ॥ ८ ॥ सर्वांउपरी तो यदुपुंगव ॥ अढळ शोभे जेवीं ध्रुव ॥ त्याच्या आधारें नृप सर्व ॥ फिरती धरा मेरूसी ॥ ९ ॥ कृष्णार्जुन वृषकेत ॥ हंसध्वज पार्थसुत ॥ प्रद्युम्न वीरवर्मा मयूरकेत ॥ मागें येती दळभारें ॥ १० ॥ रजें न दिसे अंशुमाळी ॥ कीं ते न दिसे रविकिरणा-वळी ॥ धुळीवस्त्रें तनु झांकली ॥ लज्जायमान ह्मणोनि ॥ ११ ॥ होतां भूपतिसंघट्टणी ॥ भूमीस पडती मुगुटमणि ॥ जेवीं पुण्य सरतां स्वर्गींहूनि ॥ रिचेंवती तळीं मानव ॥ १२ ॥ चालतां गजमद स्रवती ॥ तेणें आर्द्र झाली क्षिती ॥ पुढें पदाती चालती ॥ घर्मे क्षिति ओलावत ॥ १३ ॥ असो संकट पडलें सकळांसी ॥ ह्मणती कोणीं नेलें अश्वांसी ॥ कीं भेदोनियां धरणीसी ॥ पाताळभुवनीं ते गेले ॥ १४ ॥ वीर पाहाती आकाश उजु ॥ तों येतां देखिला तेजःपुंजु ॥ जो ब्रह्मयाचा आत्मजु ॥ नामें विख्यात नारद ॥ १५ ॥ जयाचें सर्वत्र गमन ॥ सदा तुष्ट जयाचें मन ॥ सुरासुरांचें मुगुटभूषण ॥ जयाचे चरणीं रुळत ॥ १६ ॥ खांदीं ब्रह्मविणा वाहे ॥ मुखें हरि-नाम गात आहे ॥ त्यातें देखोनि लवलाहें ॥ करिती नमन पार्थादी ॥ १७ ॥ पार्थ ह्मणे नारदमुनि ॥ आपलें येणें झालें कोठूनि ॥ आमचे श्यामकर्ण दोनी ॥ काय नयनीं पाहिले ॥ १८ ॥ नारद ह्मणें पार्थासी ॥ अश्व गेले कुंतलपुरासी ॥ ते अलभ्य आतां तुह्मांसी ॥ शीघ्र नगरा परतावें ॥ १९ ॥ कुंतलपुराचा अधीश ॥ नाम ज्याचें चंद्रहास ॥ ज्याचा धाक कळिकाळास ॥ दुर्धरपणें लागलासे ॥ २० ॥ तुज जयाचा भरंवसा ॥ तो त्याचे पासंगा नये सहसा ॥ जांबूनदापुढें[8] गुंडाकेशा ॥ केवीं शोभे पितळ ॥ २१ ॥ तुह्मी खद्योत[10] तो दिनकर ॥ तुह्मी मृग तो मृगेश्वर[11] ॥ तुह्मी थिल्लर तो सागर ॥ हेंही न घडे परी असो ॥ २२ ॥ ज्याचे कीर्तितरंगिणी- ॥ माजी तेजस्वी झाला तरणी ॥ उडुपें[12] झाला उडुपणी ॥ पुष्कर झाला पुष्कर ॥ २३ ॥ जयाचे कोपारुणदृकोण ॥ देखोनि कोण न सेवी कोण ॥ करीं घेतां कोदंड जाण ॥ कोण दंडी तयासी ॥ २४ ॥ सुरगण त्या सुखकाळीं ॥ तयाची कीर्तिमुक्तावळी ॥ त्याच्या गुणसूत्रमेळीं ॥

---

१ सूर्य. २ मनाच्या वेगानें. ३ शेष. ४ पडतात. ५ पृथ्वी. ६ पुत्र. ७ राजा. ८ सोन्यापुढें. ९ अर्जुना. १० काजवे. ११ सिंह. १२ चंद्र.

गुंफादरीं संतुष्ट ॥ २५ ॥ छिद्र नसे कीर्तिमुक्ताफळासी ॥ अंत नसे गुणसूत्रासी ॥ तेणें हारी नये तो सुरगणांसी ॥ सहसा झाली पैं लज्जा ॥ २६ ॥ जो वैष्णवांमाजी मुगुटमणि ॥ नित्य ध्यातसे चक्रपाणि ॥ कुंतलेशें तया राज्य देऊनि ॥ आपण गेला तपातें ॥ २७ ॥ दुष्टबुद्धिप्रधाननंदिनी ॥ जेणें वरिली कौतुकें करोनि ॥ कुलिंदें पाळिलें त्यालागोनि ॥ केरळाधिपाचा पुत्र जो ॥ २८ ॥ त्यासी प्रसन्न रमावर ॥ तेणें पावला कुंतलपुर ॥ जयासमान धनुर्धर ॥ चराचरीं असेना ॥ २९ ॥ तुझे दळीं जे नरपती ॥ ज्याची सोळावी कळा न पावती ॥ ऐकतां ऐसी नारदभारती ॥ पार्थ झाला विस्मित ॥ ३० ॥ पार्थ ह्मणे मुनिनाथा ॥ अपूर्व गोष्टी सांगतां ॥ तया पुण्यश्लोकाची कथा ॥ सविस्तर सांगा जी ॥ ३१ ॥ पार्थासी ह्मणे नारद ॥ तुह्मांसी तो झाला खेद ॥ असित्रतीं धर्मतनय अभेद ॥ आणि अश्व तुमचे हरपले ॥ ३२ ॥ श्रोतयांचें मन दुश्चित ॥ गोड न लागेचि कथामृत ॥ रोगें व्यापिला जो निश्चित ॥ मिष्टान्न तया नावडे ॥ ३३ ॥ चिंतोर्मिरहित जरी श्रोता ॥ आशाराक्षसीयुक्त वक्ता ॥ तेथींची जी भगवत्कथा ॥ तिचें सुख काय सांगूं ॥ ३४ ॥ पार्थ ह्मणे नारदासी ॥ समयासमय पाहोनि कथेसी ॥ वक्ता मिळालिया परियेसीं ॥ कथा तेव्हांचि परिसावी ॥ ३५ ॥ युद्धासन्नद्ध दोनीं दळें ॥ तेव्हां स्मरोनि कृष्णचरणकमळें ॥ म्यां गीतामृत ऐकिलें ॥ तेव्हां समय कासयाचा ॥ ३६ ॥ जेवीं विद्युल्लताझळाळ ॥ तेवीं आयुष्य चंचळ ॥ समागमें लागला काळ ॥ तरी कथा केव्हां ऐकावी ॥ ३७ ॥ संसारकार्यापासोनि ॥ कधीं रिकामा न होय प्राणी ॥ सावध बैसोनि अचळासनीं ॥ कथा ऐकेल हें न घडे ॥ ३८ ॥ करितां संसारकाम ॥ क्षणभरी आठवावा राम ॥ तेणें हरेल भवभ्रम ॥ येथें संदेह नसेचि ॥ ३९ ॥ तरी न धरितां अवकाश ॥ प्राशन करावा सुधारस[1] ॥ प्रपंचधंद्यापासोनि प्राण्यास ॥ अवकाश कल्पांतीं असेना ॥ ४० ॥ यानिमित्त नारदमुनि ॥ कथामृत घालावें कानीं ॥ न कळे कृतांताची[2] करणी ॥ केव्हां काय होईल ॥ ४१ ॥ नारद ह्मणे सुभद्रापति ॥ कथा ऐकें स्वस्थचित्तीं ॥ पूर्वीं होता केरलाधिपति ॥ सुधार्मिक नामें विख्यात ॥ ४२ ॥ धर्मज्ञानें राज्य करी ॥ प्रजा पाळी पुत्रापरी ॥ तंव त्यासी तनय हा निर्धारीं ॥ मूळ नक्षत्रीं जन्मला ॥ ४३ ॥ कित्येक दिवसांनंतर ॥ शत्रूनें वेष्टिलें त्याचें नगर ॥ जेवीं अशक्त झालिया शरीर ॥ कफादि रोग वेष्टिती ॥ ४४ ॥ तो सुधार्मिक नृपभूषण ॥ समरांगणीं पावला मरण ॥ रमणीनें केलें सहगमन ॥ परलोका ती गेली ॥ ४५ ॥ मातृपितृरहित बाळ ॥ धात्री[3] करी प्रतिपाळ ॥ तिनें पळोनि सेविलें हें कुंतल ॥ भिक्षा मागोनि पोट भरी ॥ ४६ ॥ स्वकष्टें मेळवी कण ॥ बाळाचें करी पोषण ॥ तीही प्रारब्धेंकरून ॥ पावली मरण अल्पकाळें ॥ ४७ ॥ हा तीन वर्षांचा बाळ ॥ कोठें नसे प्रतिपालनस्थळ ॥ परी त्यावरी भगवंत दयाळ ॥ ह्मणोनियां वांचला ॥ ४८ ॥ तो बाळ मूळीं जन्मला ॥ ह्मणोनि पितृमूळीं संचरला ॥ यालागीं त्याचा पाश तुटला ॥ केवळ उरला एकला कीं ॥ ४९ ॥

१ अमृत. २ काळाची. ३ दाई.

परम सुलक्षणयुक्त ॥ मातृपितृरहित ॥ सर्व प्रकारें बाळ अनाथ ॥ जाणोनि करिती जन कृपा ॥ ५० ॥ बाळांसवें करी क्रीडन ॥ अनाथ जाणोनि देती भोजन ॥ कोणी आंगडें टोपी जाण ॥ देती आपुले बाळांचीं ॥ ५१ ॥ देव झालिया दयाळ ॥ कोणेपरी करी प्रतिपाळ ॥ तोचि झालिया प्रतिकूळ ॥ मग कोण रक्षी तयातें ॥ ५२ ॥ जनबाळांसीं खेळत ॥ स्वगुणें जनां रंजवित ॥ पुत्रापरी आवडत ॥ चंद्रहास जनांतें ॥ ५३ ॥ कोणी स्त्रिया अभ्यंग[1] घालिती ॥ कोणी गंधें चर्चिती ॥ कोणी अळंकार देती ॥ ऐसे वाढविती नगरलोक ॥ ५४ ॥ जे दिनीं तो न पडे दृष्टीसी ॥ तो दिन अमंगळ वाटे सर्वांसी ॥ घरोघरीं नारी शोधिती त्यासी ॥ न देखतां खेद करिती ॥ ५५ ॥ मायबापें दोघें मेलीं ॥ परी अनंत मायबापें झालीं ॥ ऐसा दयाळ वैनमाळी[2] ॥ आपला पाळी भक्तराज ॥ ५६ ॥ खेळतसे बाळकोत्तम ॥ तों तयासी सांपडला शालग्राम ॥ त्यावरी बाळें प्रेम ॥ प्राणाहूनि ठेविलें ॥ ५७ ॥ तंव पोरें ह्मणती चंद्रहासासी ॥ या गोटीनें कां न खेळशी ॥ येरू ह्मणे पंचप्राणांसी ॥ जडोनि ठेविला स्वामी माझा ॥ ५८ ॥ गोट्या देखिल्या अपार ॥ पाषाणादिक सुंदर ॥ परी सतेज वर्तुळ मनोहर ॥ ऐसा नाहीं देखिला ॥ ५९ ॥ गोट्या जगीं असती अनेक ॥ त्या खेळतां पावती दुःख ॥ इचा खेळ अधिक ॥ जेणें जिंके त्रिभुवन ॥ ६० ॥ खेळतां पडेल संकट ॥ तेव्हां इणें खेळेन नीट ॥ इणें जय पावोनि वरिष्ठ ॥ सर्वांमाजी होय तो ॥ ६१ ॥ ऐसी करी बाळलीला ॥ तेणें रंजवी तो सकळां ॥ परी जीवें प्राणें न सोडिला ॥ तो शालग्राम शिवनाभी ॥ ६२ ॥ भलत्या उदकें घालीत स्नान ॥ भलतेंचि वाहे तया पान ॥ भलतें अन्न करोनि अर्पण ॥ मग आपण भोजन करी ॥ ६३ ॥ करोनि निजवदन संपुट[3] ॥ त्यामाजी घातला वैकुंठपीठ ॥ नित्य त्याचे ओष्ठपुट ॥ रामनामें उच्चारिती ॥ ६४ ॥ ऐशियापरी तो बाळक ॥ नगरांत खेळतां देख ॥ जेवीं कांचनमणींमाजी मौक्तिक ॥ तैसा भासे जनदृष्टीं ॥ ६५ ॥ तो कोणी एके दिवसीं ॥ स्वेच्छा खेळतां बाळांसीं ॥ दुष्टबुद्धीचे गृहासी ॥ अवचित गेला एकला ॥ ६६ ॥ तों त्याचे गृहीं प्रयोजन ॥ भोजनासी आले ब्राह्मण ॥ जे साक्षात् वेदोनारायण ॥ तपोविद्येचे सागर ॥ ६७ ॥ अर्घ्यपाद्यादि पूजाविधान ॥ त्यांचें करीत प्रधान ॥ त्यांसी देत मिष्टान्न ॥ त्यांमाजी बाळ तो बैसला ॥ ६८ ॥ षड्रस[4] चतुर्विध अन्न ॥ सेवोनि तृप्त झाले ब्राह्मण ॥ देवोनि तांबूल दक्षिणादान ॥ वस्त्रालंकारें तोषविले ॥ ६९ ॥ संतुष्ट झालिया द्विजगण ॥ प्रधानासी देती आशीर्वादवचन ॥ तुझे मनोरथ संपूर्ण ॥ सकल होतील निर्धारें ॥ ७० ॥ ऐशा मंत्राक्षता मंत्रोन ॥ प्रधानपुत्र हाचि ह्मणोन ॥ बाळकासी दिधलें आशीर्वचन ॥ सकळ द्विजवरीं तेधवां ॥ ७१ ॥ तों तेथें आला प्रधान ॥ तयासी पुसती ब्राह्मण ॥ हा तव पुत्र सुलक्षण ॥ राजचिह्नीं मंडित[5] ॥ ७२ ॥ मग प्रधान बोले विप्रांसी ॥ बाळकें ऐशीं बहुत घरोघरासी ॥ मी नेणें ययासी ॥ कोणाचा पुत्र कोठील ॥ ७३ ॥ ऐकोनि

---

१ आघोळ. २ श्रीकृष्ण भगवान्. ३ ठेवण्याची जागा. ४ मधुर, तिखट, तुरट, आंबट, खारट आणि कडू हे सहा रस ज्यांत आहेत असें. ५ शोभिवंत.

विप्र बोलती ॥ याचीं लक्षणें उत्तम असती ॥ हा होईल कीं नरपति[1] ॥ येथें संदेह असेना ॥ ७४ ॥ तूं याचा करीं प्रतिपाळ ॥ हा तव संपत्ति रक्षील ॥ ऐकोनि ऐसा मुनींचा बोल ॥ चित्तीं व्याकुळ तो झाला ॥ ७५ ॥ आशीर्वाद दिधला ह्मणोन ॥ दुःखित झालासे प्रधान ॥ ह्मणे हें काय बोलिले वचन ॥ संपत्ति रक्षील माझी हा ॥ ७६ ॥ तरी करोनि माझा घात ॥ हा होईल संपत्तिनाथ ॥ ऐसा विप्रवचनार्थ ॥ मजलागीं समजला ॥ ७७ ॥ तरी करावा याचा घात ॥ चुकवावा पुढील अनर्थ ॥ बाळ ह्मणोनि रक्षितां येथ ॥ होईल स्वामी वैभवा ॥ ७८ ॥ ऋणशेष अग्निशेष ॥ रोगशेष शत्रुशेष ॥ यांच्या उपेक्षणें होय नाश ॥ ऐसें सांगती जनीं सज्ञानी ॥ ७९ ॥ अग्नि ह्मणों नये लहान ॥ ऋण उपेक्षूं नये स्वल्प ह्मणोन ॥ वैरी ह्मणों नये अल्पजन ॥ हे निःशेष करितां बरें ॥ ८० ॥ ऐसें विचारोनि निश्चितीं ॥ अंत्यजें[3] पाचारी शीघ्रगती ॥ तयांसी बोले दुष्टबुद्धि घाती ॥ तें ऐकें अर्जुना तूं ॥ ८१ ॥ प्रधान ह्मणे पशुघ्नांसी ॥ बाळ न्यावें महा अरण्यासी ॥ याच्या करावें शिरश्छेदासी ॥ बाळ ह्मणोनि न सोडावा ॥ ८२ ॥ याचें करूनि हनन ॥ करांगुळी मज आणा खूण ॥ मी पावतां समाधान ॥ धन अपार पावाल तुह्मी ॥ ८३ ॥ ऐकोनियां प्रधानबोल ॥ संतोषले ते चांडाळ ॥ प्रातःकाळीं खेळतां बाळ ॥ एकटा देखोनि तो नेला ॥ ८४ ॥ निर्भय तयां बाळ बोले ॥ तुह्मीं मज कोठें चालविलें ॥ तिहीं उत्तर दिधलें ॥ वनामाजी नेतसों ॥ ८५ ॥ तंव तें भयानक वन ॥ जेथें पक्षी नसती जाण ॥ सिंह व्याघ्र दारुण ॥ कंटक बहुत दाटले ॥ ८६ ॥ ऐसें देखोनियां वन ॥ बाळ करी हास्यवदन ॥ ह्मणे सर्वत्र रक्षिता नारायण ॥ जनीं विजनीं काय चिंता ॥ ८७ ॥ मग प्रकाशली असिलें[4]ताधार ॥ झळकत दावूं लागले ते दुराचार ॥ तें देखतां नृपकुमर ॥ मरणसमय जाणवला ॥ ८८ ॥ भगवच्चरणीं अति विश्वास ॥ परी बाळभाव न सोडी त्यास ॥ देखोनियां त्या शस्त्रांस ॥ अश्रु नेत्रीं आणिले ॥ ८९ ॥ मग पैशुघ्न[3] ह्मणती बाळा ॥ तूं आठवीं आपुले देवाला ॥ आह्मी मारितों तुजला ॥ या शस्त्रधारेंकरूनि ॥ ९० ॥ बाळस्वभावेंकरून ॥ तयासी आलें रुदन ॥ सर्वेचि होऊनि सावधान ॥ ह्मणे मी कां भ्रम पावलों ॥ ९१ ॥ सकळ जन दुर्घटवनीं ॥ मारिता रक्षिता चक्रपाणी ॥ तयावांचोनियां कोणी ॥ मारिता रक्षिता नसेचि ॥ ९२ ॥ हा काळपर्यंत रक्षिलें ॥ आतां काय देवा उपेक्षिलें ॥ याचें गार्‍हाणें म्यां बाळें ॥ तुजविण कोणा सांगावें ॥ ९३ ॥ मायबापें मारितां बाळाला ॥ जळचि मारितां जळचरांला ॥ राजा पीडितां सर्व जनांला ॥ तरी कवणातें सांगावें ॥ ९४ ॥ माता पिता गणगोत ॥ माझें सर्व तूं अनंत ॥ तूं माझे वदनांत ॥ तूतें पुसोनि प्राण सोडितों ॥ ९५ ॥ जेणें जिंकिले सर्व गडी ॥ त्यातें न विसंबे अर्धघडी ॥ ज्याच्या दर्शनें अनंत कोडी ॥ हरती सांकडीं[5] भक्तांचीं ॥ ९६ ॥ मग ती कराब्जीं[6] ठेवोनि शिळँ[7] ॥ सावध होऊनि पाहे बाळ ॥ ह्मणे कां उशीर लाविलासी ये वेळ ॥ अन्याय देखिला



१ राजा. २ हयगय करण्यानें. ३ चांडाळ. ४ तरवारीची धार. ५ संकटें. ६ हस्तरूप कमळांत. ७ शाळिग्राम.

काय माझा ॥९७॥ तूंचि पाळोनि मारिशी ॥ तरी मग बाहावें[1] कवणाशी ॥ मायबाप हृषीकेशी ॥ मज मारविशी चांडाळकरें ॥९८॥ प्रऱ्हाद ध्रुव मत्तगज ॥ ऐसे रक्षिले कीं सहज ॥ तरी मजविषयीं अधोक्षजें[2] ॥ कां रे निष्ठुर जाहलासी ॥ ९९ ॥ अपराधी ह्मणोनि मारविसी ॥ तरी कां उरल्या दोषराशी ॥ मी तों नाचरलों पापासी ॥ बाळभावें जगदीशा ॥१००॥ तूं मजवीण होशील परदेशी ॥ आणि वनीं एकटा फिरसी ॥ येथें राहशील कीं उपवासी ॥ भय पावसी श्वापदांचें ॥ १ ॥ तरी आधीं तूतें गिळून ॥ मग मी पावेन कीं मरण ॥ ऐसें ऐकतां भक्तवचन ॥ लाघव[3] केलें ईश्वरें ॥ २ ॥ अकृत्रिम भक्तीचें सूत्र ॥ प्रेमभावें विचित्र ॥ आपुला भक्त तेव्हां सत्वर ॥ रक्षिला पार्था श्रीवरें ॥ ३ ॥ देवें पैशुन्यांसी[4] केलें मोहन ॥ ते घेऊं लागले बाळकगुण ॥ ह्मणती बाळ हें सुलक्षण ॥ वचनें याच्या निवालों ॥४॥ दीर्घबाहु विशाळनयन ॥ शुकनासिक सुहास्यवदन ॥ मुखें करीत हरिस्मरण ॥ ऐकतां चांडाळ आह्मी उद्धरलों ॥ ५ ॥ दयासागर जगज्जीवन ॥ भक्तसंगें उद्धरले पैशुन्य ॥ मोहनमिषें नारायण ॥ तयांमाजी प्रवेशला ॥ ६ ॥ ऐसा बाळ हा सुलक्षण ॥ कां व्यर्थ मारवी प्रधान ॥ तरी तो आह्मांहोनि चांडाळ पूर्ण ॥ दुष्टबुद्धि वाटतसे ॥ ७ ॥ जन्मांतरीं केले पापाचळ[5] ॥ ह्मणोनि आह्मी झालों चांडाळ ॥ तों बाळवधीं झालों दयाळ ॥ परी तो चांडाळ द्रवला नाहीं ॥ ८ ॥ मग चांडाळ ह्मणती त्या बाळा ॥ भिऊं नको ये वेळां ॥ आह्मी सोडोनि देतों तुजला ॥ वाम पादांगुळी देईं आह्मां ॥ ९ ॥ तो चांडाळ दुष्टबुद्धि ॥ त्यातें दाखवूं त्रिशुद्धि[6] ॥ तूं खेद न पावें बुद्धी ॥ ह्मणोनि छेदिती षष्ठांगुळीतें ॥ ११० ॥ ते अशुभ अंगुळी घेऊनि करीं ॥ पशुघ्न येऊनि झडकरी ॥ पाहोनियां एकांत अवसरीं ॥ तया दुष्टास दाखविती ॥ ११ ॥ तेणें संतुष्ट झाला प्रधान ॥ ह्मणे म्यां लटिकें केलें विप्राशीर्वचन ॥ मग देऊनियां अपार धन ॥ त्या चांडाळां तोषविलें ॥ १२ ॥ दुष्टसंगें भक्तअवगुण हरला ॥ प्रधान पापें लिप्त झाला ॥ परी देवाची जे लीला ॥ अघटित न कळे तयासी ॥ १३ ॥ आतां कुलिंद येईल वनासी ॥ तो घेऊनि जाईल चंद्रहासासी ॥ तें पुढिले प्रसंगासी ॥ सावधान ऐकावें ॥१४॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ११५ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके चंद्रहासाख्यानं नाम एकपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५१ ॥

॥ अध्याय ॥ ॥ ५१ ॥ ॥ ओव्या ॥ ११५ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥

१ हांक मारावी. २ हे श्रीकृष्णा. ३ कौतुक. ४ चांडाळ. ५ पापपर्वत. ६ खरोखर.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ नारद ह्मणे गा पार्था ॥ एकाग्र करूनियां चित्ता ॥ ऐकें परम पावन ही कथा ॥ चंद्रहास रायाची ॥ १ ॥ निरंजनवनीं तया बाळें ॥ ह्या तुझ्या मित्रा चिंतिलें ॥ ह्मणोनि तयातें न वधिलें ॥ सदय झाले चांडाळ ॥ २ ॥ बाळ वृद्ध अथवा तरुण ॥ विप्र क्षत्रिय वैश्य शूद्रजन ॥ जो मनीं करील वासुदेवस्मरण ॥ त्यातें नारायण रक्षिता ॥ ३ ॥ येथें नलगे उत्तम याति ॥ नलगे शास्त्रज्ञानव्युत्पत्ति ॥ सद्भावें चिंतितां निजचित्तीं ॥ त्यातें रमापति पावतो हा ॥ ४ ॥ पांचा वर्षांचें तें बाळ ॥ चंद्रहासें स्मरतां गोपाळ ॥ सदय होवोनि चांडाळ ॥ आली वेळ निवारिली ॥ ५ ॥ ऐसी ऐकतां भक्तस्तुति ॥ रोमांच आले रमापति ॥ सद्भावें चिंतितां निजचित्तीं ॥ प्रेमाश्रू पीतांबरें पुसित ॥ ६ ॥ आंगोळी छेदिली यानंतरें ॥ तेथोनि रक्त पाझरे ॥ तें देखोनि नृपकुमरें ॥ रुदन मांडिलें आक्रोशें ॥ ७ ॥ ह्मणे दीनदयाळा जगज्जीवना ॥ भक्तवत्सला करुणाघना ॥ संकटनाशका नारायणा ॥ कां मज दीना उपेक्षिलें ॥ ८ ॥ तुझें करितां मनीं चिंतन ॥ सर्व दुःखाचें होय निरसनं[1] ॥ मजविषयीं तुवां निष्ठुरपण ॥ कां हो धरिलें दयार्णवा ॥ ९ ॥ ऐसे बाळशब्द ऐकोनि ॥ वेगें धांवोनि आल्या हरिणी ॥ बाळकातें वेष्टोनि ॥ स्नेहेंकरोनि राहाती ॥ १० ॥ मोह पावोनि [2]कुरंगिणी ॥ हुंगिती त्या बाळालागोनि ॥ मुखांतूनि [3]रसना काढूनि ॥ चाटिती रक्त अंगुळीचें ॥ ११ ॥ आमुचा स्वामी अप्रमाण ॥ गेला आपुल्यास टाकोन ॥ मृगीपाठीं गेला धांवोन ॥ ह्मणोनि चेवला स्वर्गींचा ॥ १२ ॥ वहनें विरहित झाला ॥ ह्मणोनि स्वर्गींहोनि हा पडिला ॥ तरी या स्थळीं याजला ॥ वनामाजी संरक्षूं ॥ १३ ॥ मुख नव्हे हा रोहिणीधव[4] ॥ अश्रू नव्हती अमृतस्राव ॥ ऐसा धरिला भाव ॥ तया हरिणींनीं ॥ १४ ॥ खगवधू रुदन करिती ॥ मोहें पक्षच्छायें उष्ण निवारिती ॥ आहाशब्दें आक्रोश करिती ॥ वनदेवता अतिदुःखें ॥ १५ ॥ शुकसारिकांच्या मुखेंकरून ॥ कुंजरवधू करिती रुदन ॥ सरोवरीं बक दुःखित होऊन ॥ समीप वत्सातें न धरिती ॥ १६ ॥ बाळकदुःखेंकरून ॥ जळचरीं सोडिलें जीवन ॥ स्थळचरीं त्यजिलें तृण ॥ अवघीं झालीं तटस्थ ॥ १७ ॥ दरींतूनि निघती उलूक[5] ॥ भूमीवरी फणा आपटिती दंदशूक[6] ॥ पारावतें[7] करिती शोक ॥ शुक[8] साळया आक्रंदती ॥ १८ ॥ त्या बाळाचें दुःख देखोन ॥ द्रवेना याचें हृदय कठिण ॥ ह्मणोनि काय ते पाषाण ॥ भक्षिती दुःखें पक्षी ते ॥ १९ ॥ तंव पारधी खेळावया नृपति ॥ अकस्मात आला कुलिंदाधिपति ॥ हिंडतां तो त्या वनाप्रति ॥ दृष्टीं देखलें तें बाळक ॥ २० ॥ रुदन करी तें बाळक ॥ दीनवाणी वनीं देख ॥ तें रायाचे दृष्टीं एकाएक ॥ पडियेलें तेधवां ॥ २१ ॥ तो श्रीराम असे जपत ॥ दृष्टीं आणिकांतें न पाहात ॥ ऐसा बाळ अद्भुत ॥ विस्मित झाला देखतां ॥ २२ ॥ मग अश्वावरूनि उतरून ॥ बाळाजवळी येवोन ॥ वस्त्रपल्लवें नेत्र पुसोन ॥ आंगोळीचें रक्त पुसिलें ॥ २३ ॥ आपण जाणूनि अपुत्रिक ॥ दयाळु झाला रमानायक ॥ ह्मणोनि दिधला हा बाळक ॥ या दुर्घट वनामाझारी ॥ २४ ॥

१ नाश. २ हरिणी. ३ जीभ. ४ चंद्र. ५ घुबडें. ६ सर्प. ७ पारवे. ८ पोपट.

जरी पुसों माता पिता वंश ॥ तरी यासी सर्वही हृषीकेश ॥ निजपदीं स्थापावें बाळास ॥ ह्मणोनि आशा उपजली ॥२५॥ बाळासी पुसे राव ते क्षणीं ॥ कोठें तुझीं रे जनक जननी ॥ येरू ह्मणे चक्रपाणी ॥ माता पितर पैं माझा ॥२६॥ मग रायें बाळ उचलिला ॥ अश्वावरी बैसविला ॥ आपण अश्वारूढ झाला ॥ शीघ्र पावला नगरासी ॥ २७ ॥ बहुत दिन पारधी खेळलों ॥ नाना श्वापदां वरपडा झालों ॥ परी आजि कृष्णमृगबाळ पावलों ॥ परम भाग्येंकरोनि ॥ २८ ॥ याचें पाळणेंकरूनि मज ॥ प्रसन्न होईल अधोक्षज ॥ सद्गति पावतील पूर्वज ॥ याचे पुण्येंकरोनि ॥ २९ ॥ दत्त कृत्रिम अथवा विक्रीत ॥ सहोदर[1] अथवा कन्याजात[2] ॥ कुंडें[3] गोळें[4] स्वयें प्राप्त ॥ क्षेत्रज पौरुषज बोलिजे ॥ ३०॥ ऐसी धर्मशास्त्रीं नीति ॥ दशविध पुत्र वर्णिले असती ॥ त्यांमाजी स्ववीर्यज श्रेष्ठ ह्मणती ॥ त्याच्या अभावीं हे नव ॥ ३१ ॥ हा माझा पुत्र स्वयंप्राप्त ॥ ह्मणोनि वारंवार आलिंगित ॥ हा पुरवील मनोरथ ॥ पूर्वजांचे निजपुण्यें ॥ ३२ ॥ ऐसा तोषोनि चित्तीं ॥ हर्षें पुष्ट झाला कुलिंदाधिपति ॥ वेगें पावला चंदनावती ॥ मग तो अंतरगृहीं प्रवेशला ॥ ३३ ॥ नामें विख्यात मेधावती जनीं ॥ पतिव्रता नृपकामिनी ॥ तीतें ह्मणे चक्रपाणी ॥ प्रसन्न झाला आह्मांतें ॥ ३४ ॥ तिनें अंकीं बैसविला ॥ सुखी झाली ती वेल्हाळा ॥ हरिभक्तांग स्पर्शतां तिजला ॥ पान्हा आला ते समयीं ॥ ३५ ॥ मग तो कुलिंदाधिपराव ॥ करिता झाला उत्साव ॥ पाचारिला द्विजसमुदाव ॥ अनेक दानें द्यावया ॥ ३६ ॥ परम उत्साहें नृपवरें ॥ नामकर्म[5] आरंभिलें त्वरें ॥ अन्नदानीं संतुष्ट समग्रें ॥ करूनि गौरविले वस्त्राभरणीं ॥ ३७ ॥ तंव तयासी ह्मणती गणक[6] ॥ अति सुलक्षणिक बाळक ॥ हा सकळांचा हरील शोक ॥ जगविख्यात होईल ॥३८॥ हा मुखें जिंकितो चंद्रास ॥ ह्मणोनि याचें नाम चंद्रहास ॥ याचे दर्शनें कोणास ॥ पाप नुरे सर्वथा ॥ ३९ ॥ हा अत्यंत होईल कृष्णभक्त ॥ भावें सेवील साधुसंत ॥ जिंकोनियां समुद्रवलयांकित ॥ धरा[7] भोगील निजबळें ॥ ४० ॥ मग कुलिंदें आपला सुत ॥ वस्त्राभरणीं केला मंडित ॥ चंद्रापरी वृद्धि पावत ॥ शौर्य वीर्य तयाचें ॥ ४१ ॥ न पिके ती पिके धरणी ॥ प्रजा संतुष्ट असती मनीं ॥ गाई झाल्या दुग्धदोहनी ॥ झाले देश निरुपद्रव ॥ ४२ ॥ तया हरिभक्ताचिया सहवासें ॥ निष्पाप झालीं लोकमानसें ॥ वेदशास्त्रांचेनि घोषें ॥ आकाश सर्व दुमदुमित ॥ ४३ ॥ सप्त वर्षांचा झाला बाळ ॥ विद्यारंभ करवी नृपाळ ॥ येणें त्यजूनियां सकळ ॥ दोन अक्षरें धरिलीं हरि ऐसीं ॥४४॥ देखोनि कोपला पंतोजी ॥ ह्मणे हा बाळक मूर्ख जी ॥ शिकविलें नाणीं मनामाजी ॥ आणि भलतेंचि बोलसी रे ॥ ४५ ॥ हरि हीं दोनीं अक्षरें ॥ जीवीं धरिसी अत्यादरें ॥ न वदसी अन्य अक्षरें ॥ तरी ताडन पावसी ॥४६॥ येरू ह्मणे जी गुरुदेवा ॥ हा तों आमुचा मूळ ठेवा ॥ खटपटींत जीव घालावा ॥ काय कारण उमजावें ॥ ४७ ॥ हरिद्वयअक्षरांवांचोनि ॥ अन्य अक्षर निघतां मुखांतूनि ॥ अन्याय होईल मजलागोनि ॥ मी तों चाकर



१ सख्खा भाऊ. २ मुलीचा मुलगा. ३ पति असतां जारापासून झालेला. ४ पति मेल्यावर जारापासून झालेला. ५ नांव ठेवण्याचा विधि. ६ जोशी. ७ पृथ्वी.

स्वामीचा ॥ ४८ ॥ जेणें अभ्यासिला विद्यासागर ॥ झाला चतुर वैरागर ॥ परी न करितां हरिनामोच्चार ॥ तरी तो चांडाळ मानव कीं ॥ ४९ ॥ ऐकोनि गुरु कोपला ॥ नाना वर्ण उच्चार करविता झाला ॥ वेतांटी घेऊन ते वेळां ॥ ताडन करावया उदित ॥ ५० ॥ मग चंद्रहास भयें कांपत ॥ हळूच गुरूप्रति बोलत ॥ हें मी न ह्मणें जी निश्चित ॥ जिव्हा तेथें न प्रवर्ते ॥ ५१ ॥ मी करीन हरिनामोच्चारण ॥ अन्य शास्त्रांचें नसे कारण ॥ जेथें नसे हरिस्मरण ॥ तेंचि जाण कुशास्त्र ॥ ५२ ॥ करितां वेदशास्त्राध्ययन ॥ तेणें वाढे देहाभिमान ॥ हरिनाम तोडी भवबंधन ॥ यालागीं मी तें जपतसें ॥५३॥ जेथें न घडे नामोच्चार ॥ तो व्यर्थ कासया शास्त्रपसार ॥ बळेंचि वाढविती संसार ॥ ह्मणोनियां न घेईं मी ॥ ५४ ॥ वेदशास्त्रांतें पढती ॥ जगीं अहंता वाढविती ॥ वाद करूनि जय पावती ॥ तेथें इच्छिती मानधन ॥ ५५ ॥ ते सर्वही अल्पमती ॥ कण सांडोनि भूस घेती ॥ सुधा सांडोनि कांजी पिती ॥ अंतीं जाती अधःपांता ॥ ५६ ॥ पार्थासी ह्मणे विधिनंदन ॥ ऐसें बोलतो नंदन ॥ सकळ पातकांचें निरसन ॥ होय ज्याचिया कथाश्रवणें ॥ ५७ ॥ मग तो गुरु कोपला ॥ चंद्रहास पित्यासमीप नेला ॥ रागें तयाप्रति बोलिला ॥ चंद्रहासचरित्र ॥ ५८ ॥ ह्मणे नृपा ऐक उत्तर ॥ हा तुझा पुत्र अति सुंदर ॥ परी यास झाला भूतसंचार ॥ तेणें भ्रमिष्ठ जाहला ॥ ५९ ॥ अहोरात्र हरिहरि ॥ हाचि मुखीं निजध्यास निर्धारीं ॥ म्यां तो वर्जिला परोपरी ॥ परी न ह्मणे अन्याक्षर ॥ ६० ॥ मी जो जो यासी करितों यत्न ॥ तो तो करितो हा अयत्न ॥ ह्मणतो हरि ऐसें रत्न ॥ वर्णांमाजी असेना ॥ ६१ ॥ मग कुलिंद बोले वचन ॥ महाभाग्यें पावलों नंदन ॥ त्यासी न करावें ताडन ॥ रक्षीं प्राणापलीकडे ॥ ६२ ॥ पिशाच हो कां मूर्खपण ॥ परी मी याचें करीन पालन ॥ ऐसें बोलोनि निवारण ॥ केलें अक्षरपाठकाचें ॥ ६३ ॥ याचें चरित्र नेत्रीं पाहातां ॥ परम समाधान वाटतें चित्ता ॥ एकादशीदिन प्राप्त होतां ॥ अन्नस्वीकार न करी हा ॥ ६४ ॥ या बाळावांचोनि भोजन ॥ मी न करींच संपूर्ण ॥ अलोलिक स्थिति देखोन ॥ समाधान मी पावें ॥ ६५ ॥ तुह्मीं यावें घरीं आमुचे ॥ निमित्त करूनि शिकविण्याचें ॥ जैसें मानस या मुलाचें ॥ तैसाचि वर्तों द्यावा बाळक ॥ ६६ ॥ मग विप्र आपुले गृहासी गेला ॥ राव मनीं संतोषला ॥ अष्टवर्ष प्राप्त त्याला ॥ मेखलाबंधन नृप करी ॥ ६७ ॥ विधियुक्त मौंजीबंधन ॥ रायें केलें अपार धनदान ॥ विप्रांलागीं वांटोन ॥ नृप करीत उत्साह ॥ ६८ ॥ ह्मणे राव प्रधानासी ॥ बाळें तारिलें आह्मांसी ॥ याचें वचन ऐकतां मानसीं ॥ परम संतोष वाटतो ॥६९॥ एकचि विष्णुभक्त असावा सुत ॥ काय करावे अनंत ॥ सर्पिणीसी होती बहुत ॥ विषें मारिती जनातें ॥ ७० ॥ श्वान सूकर बहुत ॥ तेही शुद्ध स्थळ मलिन करित ॥ सिंहिणीतें एकचि सुत ॥ परी गजकुंभांतें विदारी ॥ ७१ ॥ म्यां केलें व्रताचरण ॥ किंवा केलें पंचाग्निसाधन ॥ तेणें हरिपदध्यानपरायण ॥ पुत्रनिधान पावलों ॥ ७२ ॥ मग त्या

१ छडी. २ मीपणा. ३ अमृत. ४ नरकवासाला. ५ नारद. ६ मुंज. ७ कुत्रे. ८ डुकर. ९ हत्तीचीं गंडस्थळें.

पुत्राचा व्रतबंध करूनि ॥ घातला वेदाध्ययनालागूनि ॥ वेदाभ्यास आनंदोनि ॥ करीतसे नृपात्मज ॥ ७३ ॥ हृदयीं धरोनि हरिस्मरण ॥ सांग केलें वेदाध्ययन ॥ या वेदश्रवणेंकरून ॥ संतुष्ट हो कां हरि माझा ॥७४॥ श्रुति स्मृति शास्त्रांतरीं ॥ प्रभु माझा असे हरी ॥ हरीवीण चराचरीं ॥ अन्य वस्तु असेना ॥७५॥ ऐसा वेदाभ्यास करून ॥ धनुर्वेद शिकला संपूर्ण ॥ अस्त्रें साधिलीं दारुण ॥ नृपात्मजें तेधवां ॥ ७६ ॥ स्वस्थ करूनि हृदयांगण ॥ त्यामाजी श्रीहरि स्थापोन ॥ सूक्ष्म दृष्टीतें लावून ॥ नियमासनीं बैसला ॥ ७७ ॥ भक्तिचाप करीं घेऊन ॥ तयासी लावी सत्वगुण ॥ त्यावरी तें शर मन ॥ लावोनियां लक्षित ॥ ७८ ॥ जो लिंगदेह जनांतें पीडित ॥ तो जनार्दनलक्ष भेदित ॥ यापरी लक्ष भेदोनि नृपसुत ॥ प्रवीण झाला सर्वास्त्रीं ॥ ७९ ॥ जे आपणा न जाणती जाण ॥ तयांचें करितो अदर्शन ॥ ह्मणोनि नाम जनार्दन ॥ लक्ष येणें भेदिलें ॥ ८० ॥ शरीरनिषंगा[1]पासूनि ॥ स्वयें निघाले पंचबाण ॥ ते सकळ एक होऊन ॥ लक्ष जनार्दन भेदिलें ॥८१॥ जयावरी मन असे श्रीहरीचें ॥ काय पार्था आश्चर्य त्याचें ॥ नेणवे पुण्य जन्मांतरींचें ॥ काय तेणें केलें असे ॥ ८२ ॥ हृदयीं धरोनि गोविंद ॥ सांग अभ्यासिला धनुर्वेद ॥ मग श्रीगुरुचरणारविंद ॥ वंदितसे आनंदें ॥ ८३ ॥ जेणें ऐसें लक्ष भेदिलें पूर्ण ॥ काय हो त्यासी व्हावें उ[2]त्तीर्ण ॥ जरी ओंवाळावे जिवें गुरुचरण ॥ तरी हरिलें पूर्वीं जीवपणा ॥ ८४ ॥ तथापि आत्मभावें वंदन ॥ त्यासी करी समर्पण ॥ ह्मणोनि सर्वात्मभावें पूजन ॥ करिता झाला गुरूचें ॥८५॥ सर्वेंद्रियदुष्टवाजीगजमर्दन ॥ विद्या शिकला संपूर्ण ॥ मत्तकुंजरवशीकरण ॥ तीही विद्या शिकला पैं ॥८६॥ मनं[3]अश्वीं बैसणें चंचळ ॥ ती विद्या आकर्षिली प्रबळ ॥ मग पितयालागीं तो बाळ ॥ काय बोलता झाला ॥ ८७ ॥ सहस्रपाद म्यां हरि देखिला ॥ ह्मणोनि न करी हरी भ्रमला ॥ जिहीं मुख्य न देखिला ॥ ते अश्वभ्रमणें फिरती ॥ ८८ ॥ यापरी तो नृपनंदन ॥ सर्व विद्येंत झाला निपुण ॥ दिवसेंदिवस यौवन ॥ पावला तो नृपात्मज ॥ ८९ ॥ यावरी तो चंद्रहास ॥ जो करील कीर्तिघोष ॥ तो पुढिले अध्यायीं सौरस ॥ अत्यादरें श्रवण करावा ॥ ९० ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ श्रवणें होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥९१॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके चंद्रहासाख्यानं नाम द्विपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५२ ॥ ॥ अध्याय ॥ ५२ ॥ ॥ ओव्या ॥ ९१ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥

---

१ शरीररूपी बाणांच्या भात्यापासून. २ उतराई. ३ मनोरूपी घोड्यावर.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ऐसी ही भक्तकथा पावन ॥ ऐकोनि सुखावे सुभद्रारमण[1] ॥ मग वंदोनि नारदचरण ॥ काय वचन बोलिला ॥ १ ॥ पार्थ ह्मणे नारदमुनी ॥ धन्य धन्य तुमची वाणी ॥ केवळ ब्रह्मसुखाची खाणी ॥ वाटे श्रवणीं ऐकतां ॥ २ ॥ धन्य धन्य तो स्वामी देश ॥ जेथें चंद्रहासही हरिभक्तेश ॥ ज्याचे कथामृतें विशेष ॥ अत्यंत उल्हास श्रवणपात्रा ॥ ३ ॥ हृदयीं धरोनि गोविंद ॥ जेणें अभ्यासिला धनुर्वेद ॥ तयाचें केव्हां चरणारविंद ॥ पाहीन ऐसें वाटतें ॥ ४ ॥ अनंत जन्मींचें पुण्याचरण ॥ गांठीस असेल संपूर्ण ॥ तरीच होय हरिभक्तदर्शन ॥ अन्यथा कैंचें पापियां ॥ ५ ॥ हरिभक्त ध्रुवबाळ ॥ आकाशीं स्थापिला अढळ ॥ बळीनें सेविलें पाताळ ॥ आमचा पितामह गेला स्वर्गीं ॥ ६ ॥ श्रीरामभक्त बिभीषण ॥ तो लंकेमाजी असे जाण ॥ कृष्णभक्त तूं विधिनंदनं[2] ॥ सर्वत्र गमन असे कीं ॥ ७ ॥ सर्वव्यापक श्रीहरी ॥ जो असे सकळांतरीं ॥ त्या भक्ताचा संग लौकरी ॥ काय प्रयत्नें होईल ॥ ८ ॥ चंद्रहास-कथा सुरवाड[3] ॥ सुधेसमॉन[4] असावी गोड ॥ परी हें मज दिसे वाड ॥ उघडी कवाड मुक्तीचें ॥ ९ ॥ असो पावोनि तारुण्यास ॥ काय करिता झाला चंद्रहास ॥ तो भक्तकथासाररस ॥ श्रवणपात्रीं घालावा ॥ १० ॥ नारद ह्मणे पार्था ॥ चित्तीं करूनि एकाग्रता ॥ ऐकें चंद्रहासाची कथा ॥ जेणें भवरोगव्यथा दूर होय ॥ ११ ॥ पंधरा वर्षांचा चंद्रहास ॥ विनविता झाला पितयास ॥ ह्मणे आज्ञा द्यावी बाळास ॥ दिग्विजयाकारणें ॥ १२ ॥ तव चरणप्रतापेंकरून ॥ जिंकीन सकळ भूपगण ॥ ऐकोनियां आत्मजवचन ॥ कुलिंद बोले पुत्रातें ॥ १३ ॥ एकाएकीं पुत्रराया ॥ कैसा जिंकिसी सर्व रायां ॥ जे कळिकाळातें विलया ॥ निजप्रतापें लाविती ॥ १४ ॥ जरी वासुदेवप्रता-पेंकरून ॥ तूं जिंकिशील भूपगण ॥ परी सावध होवोनि वचन ॥ ऐकें माझें सुपुत्रा ॥ १५ ॥ कुंतलेश्वराचा प्रधान ॥ दुष्टबुद्धि त्याचें अभिधान[6] ॥ तेणें माझें सर्व राज्य हरून ॥ शत ग्राम ठेविले मज ॥ १६ ॥ ऐसे जे बलिष्ठ नृपती ॥ ते मजलागीं पीडिती ॥ तूं सुपुत्र जाणोनि निश्चितीं ॥ ठायींचे ठायीं विराले ते ॥ १७ ॥ ऐकोनि पितृवचनास ॥ संतुष्ट झाला चंद्रहास ॥ मनीं स्मरोनि जगदीश ॥ दिग्विजया चालिला ॥ १८ ॥ जे जे बलाढ्य नृपती ॥ ते ते ऐकतां चंद्रहासकीर्ति ॥ सन्मुख येऊनि भेटती ॥ करभार देवोनियां ॥ १९ ॥ ऐकतां हरीचें स्मरण ॥ विरोनि[7] जाती पातकें गहन ॥ तेवीं आला ऐकतां कुलिंदनंदन ॥ राजे विराले सर्वही ॥ २० ॥ पंचरथेंसीं कुलिं-दसुत ॥ सर्व राजे जिंकोनि त्वरित ॥ कीर्तिध्वज अद्भुत ॥ उभारिला धरेवरी[8] ॥ २१ ॥ हय रथ आणि कुंजर[9] ॥ द्रव्य रत्नें वस्त्रें अपार ॥ ऐसा देवोनि करभार ॥ रायाप्रति पूजिती ॥ २२ ॥ चंद्रहास ह्मणे राज्यभारें मातूं नका ॥ रामनाम विसरूं नका ॥ क्षात्रधर्म टाकूं नका ॥ ऐसें आज्ञापी समस्तां ॥ २३ ॥ ऐसे सकळ राजे जिंकोन ॥ मेळविलें शत अक्षौहिणी सैन्य ॥ सुवर्ण मुक्ताफळांचीं जाण ॥ अनंत शकटें चालती ॥ २४ ॥ विजयी होऊनि नंदन ॥ आला ऐसें ऐकतां वचन ॥ सकळ सैन्य घेऊन ॥ पुत्रासन्मुख पिता आला

१ अर्जुन. २ ब्रह्मदेवाचा पुत्र. (नारद.) ३ सुकाळ. ४ अमृतासारखी. ५ थोर, मोठें. ६ नांव. ७ नाहींशीं होऊन. ८ पृथ्वीवर. ९ हत्ती.

॥ २५ ॥ माता धांवली मेधावती ॥ सदीपपात्र घेवोनि हातीं ॥ पुत्रमुखातें ओंवाळून सती ॥ निंबलोण करीत ॥ २६ ॥ कुलिंदनगरी चंदनावती ॥ पितया वंदोनि प्रवेशे त्वरिती ॥ सर्वही जन आनंदती ॥ नाहीं दुःख कोणातें ॥ २७ ॥ जनकजननीकारण ॥ शिबिकेमाजी बैसवोन ॥ पुढें चालिलें सकळ सैन्य ॥ मिरवत तेधवां ॥ २८ ॥ पितयाचिया पादुका ॥ करीं घेवोनि पुत्र निका ॥ सर्वें चालिले पितृभक्त देखा ॥ मर्यादेनें ते समयीं ॥ २९ ॥ ह्मणे लक्ष्मी आणि नारायण ॥ तैसे वंद्य तुमचे चरण ॥ उभयतांचे प्रसादेंकरून ॥ दिग्विजय म्यां केला ॥ ३० ॥ पितृभक्तिसमान व्रत ॥ कांहीं नसे त्रिभुवनांत ॥ पितृभक्तें अच्युत ॥ उभा केला विटेवरी ॥ ३१ ॥ पितृभक्त भीष्मदेव ॥ जिंकिता झाला मनोभव[१] ॥ जयास समाधानें रमाधव ॥ पावला कीं समरांगणीं ॥ ३२ ॥ ऐसा मिरवत चालिला ॥ तो पौरजनस्त्रियांनीं देखिला ॥ चतुष्पथ[३] सेनेनें भरला ॥ विजयश्रीनें मंडित ॥ ३३ ॥ मदनस्त्रियेनें हेलावत ॥ अमृतकरास्य[४] सुस्मित ॥ देखोनि पौरजनयोषितांचें चित्त ॥ मोहिलें जाण लावण्यें ॥ ३४ ॥ सखीसी बोलती वचन ॥ हा चंद्रहास मनमोहन ॥ याचें करितां पूजन ॥ मन आमचें निवेल ॥ ३५ ॥ तंव सखी बोलिली गुज ॥ कैसी गे तुवां सांडिली लाज ॥ बाळवेष नृपात्मज ॥ त्यातें पाहासी कामदृष्टीं ॥ ३६ ॥ सर्वत्र तो धर्मिष्ठ पुरुष ॥ त्यातें नव्हे कामलेश ॥ असो ऐशापरी सर्वांस ॥ आवडे तो नृपति ॥ ३७ ॥ पितृआदि सुहृन्मित्र ॥ तयांस वंदी तो कमळनेत्र ॥ ज्याचें ऐकतां चरित्र ॥ सकळ जन संतोषती ॥ ३८ ॥ मग पाहोनि सुदिन ॥ सकळ राव पाचारोन ॥ विप्र मिळाले अगण्य ॥ अभिषेकिती तयातें ॥ ३९ ॥ नगरलोक नानापरी ॥ उत्साह करिती घरोघरीं ॥ चंदनसडे धरणीवरी ॥ रंगमाळा घालिती ॥ ४० ॥ मृगमद[५]मिश्रित केशर ॥ चंदनचूर्ण उधळिती अपार ॥ चंद्रहासकीर्ति मनोहर ॥ घरोघरीं लोक करिती ॥ ४१ ॥ एकत्र होवोनि नगरजन ॥ करिती चंद्रहासाचें पूजन ॥ वस्त्रालंकारें जाण ॥ राव तयातें तोषवी ॥ ४२ ॥ चंद्रहास आज्ञापी सर्वांतें ॥ ऐका माझिया वचनातें ॥ सर्वीं करावें उत्साहातें ॥ एकादशीव्रत प्राप्त होतां ॥ ४३ ॥ जो हें व्रत न करी ॥ तो जाणावा माझा वैरी ॥ त्या दुष्टातें बाहेरी ॥ अन्य ग्रामीं घालवीन ॥ ४४ ॥ प्राप्त झालिया हरिदिन ॥ पापाग्नि होतो लीन ॥ त्या दिनीं सेवील जो अन्न ॥ त्यातें रौरव[६] न सोडी ॥ ४५ ॥ हरिभक्तिपरायण ॥ पक्षद्वयीं करावें उपोषण ॥ रात्रौ करावें जागरण ॥ तेणें नारायण संतुष्ट ॥ ४६ ॥ आयुष्य जलबुद्बुदसम[७] ॥ जाणोनि चिंतावा पुरुषोत्तम ॥ जेणें प्राप्त होय कैवल्यधाम[८] ॥ ऐसें सर्वीं करावें ॥ ४७ ॥ आधींच अमंगळ शरीर ॥ पाहातां केवळ अस्थिपंजर ॥ रक्तमांसविकार ॥ जेथें संचार कृमींचा[९] ॥ ४८ ॥ मुळींच शरीरगृह रचिलें ॥ जें कां अस्थीनें उभारिलें ॥ स्थळोस्थळीं शिरांनीं बांधिलें ॥ आणि लिंपिलें रक्तमांसें ॥ ४९ ॥ नवद्वारें मोकळें ॥ जें कामक्रोधें वेष्टिलें ॥ मदवृश्चिकें व्यापिलें ॥ आणि मोहभुजंग सेवित ॥ ५० ॥ नानारोगांचें अधिष्ठान ॥ जें काळानळाचें इंधन ॥ जें सकळ पापाचें भाजन ॥

१ पंचारती. २ काम. ३ चवाठा. ४ चंद्राप्रमाणें ज्याचें मुख असा. ५ कस्तूरीनें मिश्रित. ६ नरक. ७ पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणें. ८ मोक्ष. ९ किड्यांचा.

जन्ममरणाचें अंकिलें ॥ ५१ ॥ ऐसें पावोनि शरीर ॥ जो हरिवंदनीं नव्हे तत्पर ॥ जो एकादशीव्रत न करी नर ॥ तो रौरवाचा अधिकारी ॥ ५२ ॥ बोलतां ऐसें चंद्रहास ॥ तोचि तयांसी झाला उपदेश ॥ मग सर्वही जन हृषीकेश- ॥ भजनीं उल्हास पावती ॥ ५३ ॥ सुवर्णरत्नें मुक्तराशी ॥ देता झाला पौरजनांसी ॥ दीन अनाथ दुर्बळांसी ॥ बरवेपरी पैं रक्षित ॥ ५४ ॥ विशेषें करी द्विजपालन ॥ गृहें दिधलीं बांधोन ॥ तयांसी करून वर्षासन ॥ यज्ञादि कर्मीं योजिलें ॥ ५५ ॥ वापी कूप तडाग आराम ॥ सहस्र शिवालयें केलीं परम ॥ धर्मशाळा करविल्या उत्तम ॥ आणि योगेश्वरांचे मठ ते ॥ ५६ ॥ स्थळोस्थळीं केलीं धर्मदानें ॥ ठायीं ठायीं विप्रसदनें ॥ प्रतिग्रामीं अन्नदानें[1] ॥ चंद्रहासें करविलीं ॥ ५७ ॥ ऐसी ऐकोनि तयाची कीर्ति ॥ देशोदेशींचे लोक येती ॥ चंद्रहासाची चंदनावती ॥ विस्तारली शतगुणें ॥ ५८ ॥ विप्र क्षत्रिय वैश्य शूद्र ॥ घेवोनि स्त्री पुत्र पौत्रें[2] ॥ येथें येवोनि विचित्र ॥ गृहें करोनि राहिले ॥ ५९ ॥ अष्टादश प्रजांचे भेद ॥ सर्वही पावती आनंद ॥ निशिदिनीं गोविंद- ॥ नामस्मरणीं रत सदा ॥ ६० ॥ सत्पात्र आलें ऐसें जाणोन ॥ तयांसी दान देत कृष्णार्पण ॥ तयां याचकांचें दरिद्रविपिन ॥ हरोनि करी कुबेराऐसे ॥ ६१ ॥ ऐसा पुत्र देखोनि सुखकंद ॥ माता पिता करिती आनंद ॥ मग पुत्राप्रति बोले कुलिंद ॥ तें सावधान ऐकावें ॥ ६२ ॥ पिता पुत्राप्रति बोले वचन ॥ कुंतलेशास नियुतें[3] सुवर्ण ॥ प्रतिवर्षीं करभार समर्पण ॥ करितों मी सुपुत्रा ॥ ६३ ॥ स्वामित्व मिरवी दुष्टबुद्धि ॥ त्यासी देतों द्रव्यनिधि ॥ तत्पत्नीस तदर्थ सद्बुद्धि ॥ प्रतिवर्षीं देतसों ॥ ६४ ॥ तरी तें सत्वर पाठवावें धन ॥ तेणें पावेल समाधान ॥ येथोनियां साठी योजन ॥ कुंतलापुर आहे कीं ॥ ६५ ॥ त्या कुंतलापुरांत पाहीं ॥ गालवपुरोहितासहित मही ॥ राज्य करितो नृप तोही ॥ दुष्टबुद्धीसमवेत ॥ ६६ ॥ ऐसें ऐकतां पितृवचन ॥ चंद्रहास पावला समाधान ॥ जें नृपमंत्रिस्त्रियेचें धन ॥ तें सर्व गालव स्वीकारी ॥ ६७ ॥ खेंचर उष्ट्र आणि शकट ॥ कनकें भरिले घनदाट ॥ मणिमुक्ताफळें दुकूलें[4] चोखट ॥ कस्तूरीचंदनकेशरेंसीं ॥ ६८ ॥ कुंजरें[5] अश्व मनोरम ॥ सर्वें देवोनि रथोत्तम ॥ समागमें सेवकोत्तम ॥ दुष्टबुद्धीकडे पाठविले ॥ ६९ ॥ विज्ञप्तीसहित सुंदर पत्र ॥ स्वहस्तें लिहिलें अतिपवित्र ॥ सेवकहस्तीं देवोनि सुपुत्र ॥ पाठविता झाला ते काळीं ॥ ७० ॥ घेवोनि सकळ वस्तुजात ॥ सेवक चालिले त्वरित ॥ श्रीहरीचें नाम गात ॥ कुंतलापुरा चालिले ॥ ७१ ॥ ग्रामासमीप नदी देखिली ॥ तेथें स्नानसंध्या असे सारिली ॥ एकादशीचे संध्याकाळीं ॥ हरिपूजन पैं केलें ॥ ७२ ॥ ऐसा सारोनि नित्यनेम ॥ नगरीं प्रवेशले वीरोत्तम ॥ सत्वर पावले सचिवधाम[6] ॥ द्रव्यशकट[7] घेवोनियां ॥ ७३ ॥ मुखें करिती हरिनामोच्चार ॥ प्रधानासी करिती नमस्कार ॥ तुलसीमाळामंडित शरीर ॥ शिरीं मंजुऱ्या खोंविल्या ॥ ७४ ॥ तयांचें पाहोनियां चिह्न ॥ प्रधानें ठेविलें त्यांसी दूषण ॥ मनीं दुष्ट विचार करून ॥ तयांप्रति अनुवादे ॥ ७५ ॥ तुम्ही कुलिंदा इच्छितां मरण ॥

१ अन्नसत्रें. २ नातू. ३ एक लक्ष. ४ पीतांबर, पाटाव इत्यादि. ५ हत्ती. ६ प्रधानाचें घर. ७ द्रव्य भरलेले गाडे.

ह्मणोनि केलें तुळसीधारण ॥ अमंगळरूपें आमचें सदन ॥ कां रे तुह्मी प्रवेशलेती ॥ ७६ ॥ ऐकोनि सेवक बोलती वचन ॥ तयाच्या शत्रूंसी असो जी मरण ॥ कुलिंदरायाचें कल्याण ॥ मुनिजन सर्व इच्छिती ॥ ७७ ॥ चंद्रहास तयाचा तनय ॥ तेणें करोनि दिग्विजय ॥ तुह्मांवरी करोनि चित्त सदय ॥ धन अपार पाठविलें ॥ ७८ ॥ वस्त्रें भूषणें आणि धन ॥ केशर कस्तूरी चंदन ॥ पट्टदुकूलीं[1] शकटें भरून ॥ तुह्मांलागीं पाठविलीं ॥ ७९ ॥ अश्व रथ आणि कुंजर ॥ तुह्मांसी पाठविले जी अपार ॥ तें सकळ देखोनि प्रधानवर ॥ चित्तीं आश्चर्य करीतसे ॥ ८० ॥ मग सेवकांप्रति बोले प्रधान ॥ यांसी द्यावें सत्वर भोजन ॥ आचारी बांहे त्यांलागून ॥ परी ते प्रार्थिल्या नव जाती ॥ ८१ ॥ तों आचारी सांगती प्रधानासी ॥ ते सर्वथा न येती भोजनासी ॥ ऐकोनि कोपला प्रधान त्यांसी ॥ निष्ठुरमनें बोलत ॥ ८२ ॥ परम मत्त झाला कुलिंद ॥ त्याचे सेवक हे मतिमंद ॥ त्यांसीं दुष्ट लागला छंद ॥ गर्वें परान्न न भक्षिती ॥ ८३ ॥ कुलिंदातें शृंखळाबंधन ॥ करूनि त्याचें हरीन धन ॥ करीन गर्वमोचन ॥ मजला तुह्मी न जाणा रे ॥ ८४ ॥ ऐकोनियां प्रधानाची मात ॥ कुलिंदसेवक बोलती त्वरित ॥ आह्मी नसों जी धनगर्वित ॥ न घेऊं अन्न हरिदिनीं ॥ ८५ ॥ मार्गीं स्पर्श झाला कृतघ्ना ॥ ह्मणोनि योग घडला सचैलस्नाना ॥ त्यांत एकादशीचे दिना ॥ अन्नस्पर्श सर्वथा न करवे ॥ ८६ ॥ ऐसें ऐकोनि दूतवचन ॥ सक्रोध झाला प्रधान ॥ पोटभर मिळों लागलिया अन्न ॥ आतां नियम आठवले ॥ ८७ ॥ कैंचें एकादशीव्रत ॥ स्वप्नीं आह्मां नसे श्रुत ॥ तुळसीपुष्पें घेतलीं बहुत ॥ याचा निःपात[2] करीन मी ॥ ८८ ॥ ऐसा सचिवकुळभूषण ॥ नाना परी करीत निर्भर्त्सन[3] ॥ ह्मणे प्रातःकाळीं जाऊन ॥ कुलिंदातें धरावें ॥ ८९ ॥ कुंतलेशा पुसे दुष्टमति ॥ जातों कुलिंददेशाप्रति ॥ मदनपुत्र हा तुह्मांप्रति ॥ कार्यभागासी ठेविला ॥ ९० ॥ राजाज्ञा घेवोनि सिद्ध झाला ॥ चंदनावतीतें चालिला ॥ तों विषया कन्या जनकाला ॥ काय विनवी तेधवां ते ॥ ९१ ॥ राजकार्यभागीं व्यग्र चित्त ॥ सर्वदा असतें निश्चित ॥ आणि गमन मांडिलें जी त्वरित ॥ परदेशाप्रति जावया ॥ ९२ ॥ ऐसी बोलोनि संकेतवाणी[4] ॥ मौनें राहिली सचिवनंदिनी[5] ॥ यौवनें केली बालत्वा हानी ॥ ऐसें जनकें देखिलें ॥ ९३ ॥ जनक पावला वचनखूण ॥ मग तियेचें करूनि समाधान ॥ मनोजवअश्वावरी बैसोन ॥ शीघ्र चालिला भूलेंसीं ॥ ९४ ॥ दों दिवशीं चंदनावती ॥ सत्वर पावला दुष्टमती ॥ नगर देखोनि मग चित्तीं ॥ परमाश्चर्य करीतसे ॥ ९५ ॥ पूर्वीं होतें हें महावन ॥ आतां झालें वसतिस्थान ॥ ऐसें आश्चर्य मानोनि प्रधान ॥ नगरासमीप तो आला ॥ ९६ ॥ ऐकोनि कुलिंद पावला हरिख ॥ तयासी निघाला सन्मुख ॥ सवें घेवोनि कुळदीपक ॥ दुष्टबुद्धीसी भेटला ॥ ९७ ॥ पुत्रेंसहित करूनि नमन ॥ आदरें गृहासी आणिला प्रधान ॥ तयाचें करूनियां पूजन ॥ हस्त जोडोनि उभा ठेला ॥ ९८ ॥ मग नृपासी बोले प्रधान ॥ तुह्मांसी कधीं झाला हा नंदन ॥ नाहीं कळविलें आह्मांकारण ॥



१ पट्ट–शालीआदिक, दुकूल–रेशमी पीतांबर आदि उंची वस्त्रें. २ हांका मारी. ३ संहार. ४ सहेतुक. ५ प्रधानकन्या ( विषया ).

कां हो चोरिला मजलागीं ॥ ९९ ॥ ऐकोनियां सत्य वचन ॥ कुलिंद आनंदें बोले जाण ॥ हा नव्हें औरस नंदन ॥ मजलागीं प्राप्त जाहला ॥१००॥ मी गेलों होतों पारधीसी ॥ तंव हा देखिला अरण्यवासी ॥ कुंतलपुर योजनत्रयेंसीं ॥ होतें तेथोनि प्रधाना ॥ १ ॥ त्या वनीं म्यां बाळ देखिला ॥ षडंगुलिच्छेदें भुलला ॥ पांचां वर्षांचा मज सांपडला ॥ औरसाहोनि विशेष ॥ २ ॥ हरिभक्त चंद्रहास ॥ दिग्विजय झाला यास ॥ हा पुत्र माझा हरिदास ॥ सत्य जाण तूं प्रधाना ॥ ३ ॥ नारद ह्मणे किरीटी ॥ भय झालें प्रधानाचे पोटीं ॥ परी योजिली कपटरहाटी ॥ अंतर्दृष्टीकरोनि ॥ ४ ॥ ह्मणे हरिभक्तांमाजी उत्तम ॥ तोचि कुमर हा निःसीम ॥ ओळखीमाजी आला परम ॥ विप्रवाक्यें जो अर्चिला ॥ ५ ॥ अंतरीं करी विचार ॥ असत्य नव्हे मुनिउत्तर ॥ हाचि तो कुमर निर्धार ॥ आतां तरुण जाहला ॥ ६ ॥ चांडाळीं प्रतारणा केली ॥ अंगुळी मज दाविली ॥ आतां झाला परम बळी ॥ कैसा यासीं ओंटावा ॥ ७ ॥ हा माझे संपत्तीचें रक्षण ॥ करील ऐसें विप्रवचन ॥ मजला असती दोघे नंदन ॥ मदन आणि अनिळ ॥ ८ ॥ हा तों संपत्तीचा होईल स्वामी ॥ तरी ते काय करितील असोनि धामीं ॥ हा तों दिसतो पराक्रमी ॥ तें सत्य होईल द्विजवाक्य ॥ ९ ॥ जें होवोनि गेलें कार्य ॥ त्यातें मनीं न चिंतिती आर्य ॥ चिंतितां चिंतितां अकार्य ॥ पुढें येवोनि ठाकलें ॥ ११० ॥ जें झालें तें झालें ॥ आतां पुढें पाहिजे विचारिलें ॥ जें मुनि वाक्य बोलिले ॥ तेंचि करणें असत्य ॥ ११ ॥ ऐसी दुष्ट बुद्धि धरूनि ॥ बाह्य बोले अमृतवाणी ॥ ह्मणे धन्य कुलिंदा तूं जनीं ॥ ऐसा पुत्र लाधलासी ॥ १२ ॥ देखोनि नेत्रीं चंद्रहास ॥ मजही झाला परम हर्ष ॥ आनंदें पूर्ण माझें मानस ॥ अति दोंदिल जाहलें ॥ १३ ॥ ऐसें बोले उत्तर ॥ जेवीं मधूनें माखिला क्षुर ॥ कीं शर्करेनें खड्गधार ॥ चाटितां खांडी जिव्हेतें ॥ १४ ॥ कीं कूपमुख तृणें आच्छादिलें ॥ किंवा विष गुळें लेपिलें ॥ ऐसा वाक्य बोले चांगलें ॥ परी घातक विषाहोनि ॥ १५ ॥ पीत मनोहर वृंदावन ॥ वरी चांगलें आंत कडवट पूर्ण ॥ कीं विषमिश्रित मिष्टान्न ॥ भक्षितां प्राण हरील कीं ॥ १६ ॥ मनीं एक वचनीं एक ॥ कार्य करिती आणिक ॥ ऐसें खळजनांचें कौतुक ॥ संत एक धन्य सर्वत्रां ॥ १७ ॥ आतां येथोनि पुढें चंद्रहास ॥ जावोनि वरील विषयेस ॥ तो पुढिले प्रसंगीं सौरस ॥ सावधान ऐकावा ॥ १८ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥११९॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके चंद्रहासाख्यानं नाम त्रिपंचाशत्तमोध्यायः॥ ५३ ॥ अध्याय ॥५३॥ ओव्या ॥ ११९ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥

---

१ आपल्यापासून जाहलेला. २ पायाचें साहावें बोट तोडल्यानें. ३ कांहीं वेळ चिंतन करून. ४ ठार करावा. ५ गृहामध्यें.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ विधिसुत ह्मणे पार्था ॥ ऐकें पुण्यश्लोकाची कथा ॥ जेणें हरे पापव्यथा ॥ भावें पडतां श्रवणरंध्रीं ॥ १ ॥ अगाध कुबुद्धीचा सागर ॥ पुनः झाला तो चिंतातुर ॥ आतां कैसा करूं विचार ॥ ह्मणोनि चित्तीं व्याकुळ तो ॥ २ ॥ सत्य होईल मुनिवचन ॥ हा कोणें योगें पावेल मरण ॥ येथें मारितां कुलिंदनंदन ॥ तरी मरण मजलाही ॥ ३ ॥ हा आहे पराक्रमी ॥ होईल माझे संपत्तीचा स्वामी ॥ आक्रांत होईल माझिये धामीं ॥ रमणीबाळांलागोनि ॥ ४ ॥ हा तों दिसे बळवंत ॥ योद्धे यापासीं विख्यात ॥ येथेंचि करतील माझा घात ॥ मग मदन अनिळा मारितील ॥ ५ ॥ हा तों विचार नव्हे बरा ॥ आणिक योजावें विचारा ॥ जो दुर्बुद्धीचा थारा ॥ युक्तीस न्यूनता नसेचि ॥ ६ ॥ विचारयुक्तिवैभवें ॥ जें कंठीं धरिलें सदाशिवें ॥ तें यासी देवोनि मारावें ॥ हा उपाय सुचला पैं ॥ ७ ॥ समुद्र मथितां स्पष्ट ॥ तेथोनि निघालें काळकूट[3] ॥ घेऊं धांवे सर्वांचा घोट ॥ शिव नीलकंठ जेणें केला ॥ ८ ॥ हाचि बरवा उपाय ॥ येणेंचि मरेल कुलिंदतनय ॥ ऐसा करूनि निश्चय ॥ चंद्रहासा पाचारिलें ॥ ९ ॥ माझें गूढ कार्य असे भलें ॥ तें तुवां पाहिजे सिद्धीस नेलें ॥ येरू अवश्य ह्मणे ते वेळे ॥ स्वामी आज्ञा करावी ॥ १० ॥ ह्मणे मंषी[4] पत्र लेखनी ॥ शीघ्र देईं मजलागोनी ॥ इष्टार्थ त्यांत लिहोनी ॥ हातीं देईन तूमच्या ॥ ११ ॥ ऐकतां आणोनि पुढें ठेविलें ॥ मग पत्रलेखन आरंभिलें ॥ तें सावधानें पाहिजे ऐकिलें ॥ नारद ह्मणे सुभद्रापति ॥ १२ ॥ स्वस्ति श्रीरस्तु मदना ॥ तुज हो आयुष्यवर्धना ॥ सावध होवोनियां मना ॥ गुह्यार्थसूचना वाचिजे ॥ १३ ॥ पत्रलेख समजावया कारण ॥ तूं तंव अससी प्रवीण ॥ गुह्यार्थ बरवा जाणोन ॥ शीघ्र कार्य करावें ॥ १४ ॥ बरवा विचारीं पत्रार्थ ॥ चंद्रहास माझा अहित ॥ माझ्या संपत्तीचा स्वामी निश्चित ॥ होईल ऐसें जाणावें ॥ १५ ॥ रूप आणि वित्तकुळ ॥ विद्या पराक्रमी सुशीळ ॥ विचारूनि तुवां सकळ ॥ याचें कार्य करीं आधीं ॥ १६ ॥ जीवीं धरोनि कार्य करावें ॥ शीघ्र विष यातें द्यावें ॥ कोणासी कळों न द्यावें ॥ सावधपणें संपादीं ॥ १७ ॥ शीघ्र मदना शत्रूकारणें[5] ॥ पार्वतीशकंठभूषण[6] समर्पणें ॥ विलंब तुवां न करणें ॥ आधीं साधणें हें कार्य ॥ १८ ॥ काळ वेळ न पाहावी ॥ निजकार्यीं दृष्टी द्यावी ॥ वडीलपणाची ठेवी बरवी ॥ त्वांचि करावी अति शीघ्र ॥ १९ ॥ मिष्टान्नभोजनीं आसनीं शयनीं ॥ तांबूलचर्वणीं उदकपानी ॥ वस्त्रदानीं चंदनलेपनीं ॥ सावधान असावें ॥ २० ॥ जरी हें श्रुत होईल रायासी ॥ तरी कार्य नासेल परियेसीं ॥ चोरोनि आप्तजनांसी ॥ हें कार्य आधीं साधावें ॥ २१ ॥ ऐसें पत्र लिहून ॥ त्यावरी केलें मुद्रिकाचिन्ह[7] ॥ मग चंद्रहासा पाचारून ॥ करीं दिधलें तयाचे ॥ २२ ॥ ह्मणे हें महत्कार्य बरवें ॥ तुवां कुंतलपुरा शीघ्र जावें ॥ हें पत्र नेवोनि द्यावें ॥ मदनहस्तीं एकांतीं ॥ २३ ॥ तुवां त्वरा करावी ॥ माझी मुद्रा न फोडावी ॥ जरी फोडितां यमपदवी ॥ पाविजे ऐसें शास्त्र वदे ॥ २४ ॥ जे भेद मानिती हरिहरांसी ॥ ती तुज प्राप्त होईल पापराशी ॥

---

१ नारद. २ गृहामध्यें. ३ काळकूट नांवाचें विष. ४ शाई. ५ शत्रु. ६ विष. ७ मोहोर.

जरी तूं मध्येंच फोडिसी ॥ न फोडितां पावसी सन्मान ॥ २५ ॥ अश्वारूढ व्हावें वेगें ॥ चौघे सेवक घ्यावे संगें ॥ माझें महत्कार्य अनुरागें[1] ॥ शीघ्र करावें चंद्रहासा ॥ २६ ॥ बरवें ह्मणोनि कुलिंदपुत्र ॥ वहनारूढ झाला सत्वर ॥ प्रधाना वंदोनि अति शीघ्र ॥ पितयातें नमस्कारी ॥ २७ ॥ वंदिले जनकाचे चरण ॥ मातेस केलें नमन ॥ तिनें करोनि नीराजन ॥ आशीर्वचन दीधलें ॥ २८ ॥ दधिदूर्वांकुरतिलक ॥ भाळीं[2] रेखिले सम्यक ॥ आलिंगोनि निजबाळक ॥ काय वचन बोलत ॥ २९ ॥ तुज मार्गीं असो कल्याण ॥ तुज रक्षो नारायण ॥ भुजद्वयातें जनार्दन ॥ वक्षःस्थळीं हृषीकेश ॥ ३० ॥ माधव रक्षो उदरातें ॥ पद्मनाभ रक्षो नाभीतें ॥ नरसिंह रक्षो कुक्षीतें ॥ कमलदलाक्ष कटी रक्षो ॥ ३१ ॥ जंघाद्वयातें मधुसूदन ॥ जानुद्वयातें यज्ञनारायण ॥ गुह्यातें दामोदर पूर्ण ॥ सहस्राक्ष रक्षो चरणांतें ॥ ३२ ॥ कमलपत्राक्ष रक्षो नयनांतें ॥ त्रिविक्रम रक्षो सर्व देहातें ॥ सवें घेवोनि पत्नीतें ॥ शीघ्र येईं पुत्रराया ॥ ३३ ॥ स्वस्त्री घेऊनि ये सांगातें ॥ स्वयें प्राप्त झालासी रायातें ॥ तैशी दिव्य कांता स्वरूपातें ॥ समान ऐसी प्राप्त होऊ ॥ ३४ ॥ ऐकोनि जननीचें वचन ॥ प्रदक्षिणा करूनि केलें वंदन ॥ मग करोनि अश्वारोहण ॥ केलें गमन शीघ्रत्वें ॥ ३५ ॥ चौघां भृत्यांसीं नृपकुमरें ॥ निघतां देखिलीं वधूवरें ॥ हरिद्राकुंकुमांकित शरीरें ॥ वस्त्रालंकारें साजिरीं ॥ ३६ ॥ सन्मुख धेनु देखिली ॥ प्रथमप्रसूती ती शोभली ॥ सद्भावें ती वंदिली ॥ नृपात्मजें तेधवां ॥ ३७ ॥ तंव वनरक्षकीं देखिलें ॥ तेणें पक्व दाडिमीफळा दिधलें ॥ कोणी येवोनि मार्गीं पूजिलें ॥ कमळमाळें करोनि ॥ ३८ ॥ कोणी धांवोनियां सत्वर ॥ गळां घालिती पुष्पहार ॥ ऐसा चंद्रहास सुंदर ॥ नवरत्नमाळा कंठीं शोभे ॥ ३९ ॥ यापरी कुलिंदकुळदीप ॥ आला कुंतलपुरासमीप ॥ तंव क्रीडावन देखिलें सुरूप ॥ नंदनवनासारिखें ॥ ४० ॥ हस्ती आणि हस्तिणी ॥ भ्रमर भ्रमरी प्रीतींकरूनि ॥ गृहास्थाश्रम अवलंबोनि[6] ॥ तेथें असती चिरकाळ ॥ ४१ ॥ जें ब्रह्मयाचें वहन ॥ त्याचें तये स्थानीं राहण ॥ रम्य जाणोनि वन ॥ सकुटुंबेंसीं राहात ॥ ४२ ॥ वसंत स्त्रियेंसीं नांदत ॥ पालाशपत्र कुसुमांकित ॥ तमाल कुंडलमंडल शोभत ॥ आम्रपल्लव अधरोष्ठ ॥ ४३ ॥ ॥ तेथें वसंत असे प्रगट ॥ वृक्ष फळपुष्पें लवत उत्कट ॥ कोमल मंजुरीयांचे थाट ॥ रँसाळतरूसी शोभती ॥ ४४ ॥ त्यावरी बैसोनि कोकिळा ॥ पंचमस्वर आलापी मंजुळा ॥ जे ऐकतां चतुर अबळा ॥ कामानळें व्यापिजे ॥ ४५ ॥ पुंनाग बकुल चंपक ॥ करवीर मोगरा अशोक ॥ चंदनादि वृक्ष अनेक ॥ पुष्पफळें डोलती ॥ ४६ ॥ जाई जुई मालती ॥ पुष्पभारें लवल्या शेवंती ॥ नाना पुष्पलता जाती ॥ वनामाजी फूलल्या ॥ ४७ ॥ दिव्य पक्षियांचे पाळे ॥ शब्द करिती स्वलीळें ॥ श्वापदें धांवती बळें ॥ ऐसें रम्य वन अत्यंत ॥ ४८ ॥ ऐसा उत्साह पाहोन ॥ संतोषला कुलिंदनंदन ॥ हरिचरित्रें सज्जन ॥ जेवीं समाधान पावतो ॥ ४९ ॥ तैसा चंद्रहास पावोनि समाधान ॥ तेथें करूनियां स्नान ॥ मग मांडिलें हरिपूजन ॥ परम आवडींकरोनि ॥ ५० ॥

१ प्रीतीनें. २ कपाळावर. ३ विष्णु. ४ सेवकांसह. ५ बाग. ६ आश्रय करून. ७ आम्रवृक्षाला. ८ समुदाय.

हरीसी पुष्पें समर्पोन ॥ स्वयें करीत फळभक्षण ॥ सेवकीं हयातें धुवोन ॥ तृण टाकोनि बांधिलें ॥५१॥ मग तरुतळीं घालोनि आ-
स्तरण ॥ सेवकांसी राव बोले विचक्षण ॥ दिव्य फळें आणा शोधून ॥ वनामाजी हिंडोनियां ॥५२॥ कुलिंदपुत्रें तांबूलचर्वण ॥ करूनि निद्रा
केली पूर्ण ॥ निद्रार्णवीं निमग्न ॥ दोन प्रहर जाहला ॥ ५३ ॥ तों तेथें नवल वर्तलें अर्जुना ॥ कुंतलेशाची दिव्यकन्या ॥ चंपकमा-
लिनी परम धन्या ॥ प्रधानाची विषया नामें ॥ ५४ ॥ दोघींचें लावण्य[1] अगाध ॥ स्वरूपतेज अमर्याद ॥ तें न वर्णवेचि विशद ॥
सहस्रवदनाकारणें ॥५५॥ मनें भावूं मदनवधू रती ॥ ती तंव भासे तयांची दूती[2] ॥ रंभा उर्वशी लोक वर्णिती ॥ त्या सरी[3] न पावती
अंगुष्ठा ॥ ५६ ॥ वनीं प्रगटला वसंत ॥ जाणोनि चालिल्या हिंडत ॥ सेवा करावया कन्या शत ॥ पुढें मागें चालती ॥ ५७ ॥
पुष्पें घ्यावयाकारणें ॥ झाल्या उत्कंठित मनें ॥ गायन करिती मधुरस्वनें[4] ॥ त्वरें त्या वना पातल्या ॥ ५८ ॥ त्यां सर्वां त्रयोदश
वर्षें ॥ ज्यांस मान दिधला रतीशें ॥ तारुण्याच्या उत्कर्षें ॥ परम शोभा पावल्या ॥ ५९ ॥ यौवनभरें अतिचंचळ ॥ स्तन उमटले
नवबिल्वफळें[5] ॥ कौस्तुभ वस्त्रें अति सोज्वळ ॥ चंचळ पैलव[6] हृदयींचे ॥ ६० ॥ कंठीं रम्य मुक्ताहार ॥ नाना अळंकारें सुंदर ॥ नृत्य
करिती मनोहर ॥ नूपुरें[7] चरणीं शब्द करिती ॥ ६१ ॥ होवोनियां सुस्मितवदन ॥ मार्गीं करिती रम्य गायन ॥ तांबूलचर्वणें अधर
पूर्ण ॥ प्रवाळवर्ण विराजती ॥ ६२ ॥ कोणी जातीच्या हस्तिनी ॥ कोणी असती त्या शंखिनी ॥ कित्येक असती चित्रिणी ॥ दोघी
पद्मिनी श्रेष्ठ त्यांत ॥ ६३ ॥ ऐशा त्या मृगलोचना ॥ सर्व पावल्या क्रीडावना ॥ लुब्ध होऊनि कोकिळस्वना ॥ लाजवोनि गाती
कलशब्दें[4] ॥ ६४ ॥ पुष्पाशा धरोनि मनीं ॥ धांवती कन्या सेवकिनी ॥ बोलताती विनोदवाणी ॥ एकमेकीं लागोनियां ॥ ६५ ॥
एकली जाऊं नको वनाप्रति ॥ पुष्पाशा धरूनियां चित्तीं ॥ यौवन असे तुझें निश्चितीं ॥ माझी गोष्टी ऐकावी ॥ ६६ ॥ मुक्ताढ्य
कुचकुंभ हृदयावरी ॥ अत्यंत शोभती तुझे सुंदरी ॥ येथें मिळालिया नरकेसरी ॥ विदारण करील ॥ ६७ ॥ ऐशा परस्परें विनोद
करिती ॥ नाना पुष्पांतें तोडिती ॥ जाई जुई आणि मालती ॥ घेती सेवंती स्वानंदें ॥ ६८ ॥ बकुल चंपक मोगरा ॥ सर्वही
शोधिती त्या सुंदरा ॥ स्वहस्तें गुंफोनियां हारा ॥ कंठीं घालिती निजकरें ॥ ६९ ॥ चंपकतरूचीं सुमनें ॥ अंगकांतीनें दिसती
मलिनें ॥ त्यांची मलिनता देखोनि अलीनें ॥ अद्यापि त्याग केला कीं ॥ ७० ॥ दाळिंबपुष्पें देखोनि ॥ विषयेतें बोले मालिनी ॥
कौतुक पाहें गे नयनीं ॥ निज खूण ओळखें ॥ ७१ ॥ आधीं पुष्प मग फळ ॥ ऐसा यांचा विचार सकळ ॥ तुझे ठायीं विपरीत
केवळ ॥ पुष्पावीण फळें उरीं ॥ ७२ ॥ ऐकोनियां ऐसें वचन ॥ विषया बोले हास्यवदन ॥ हा वनस्पतिधर्म जाण ॥ स्त्रीलतेचा
वेगळा ॥ ७३ ॥ मग पुष्पांची करविली शय्या ॥ पहुडली तेथें विषया ॥ तों मालिनी बोले विनया ॥ ऐकें पार्था तें उत्तर ॥ ७४ ॥

---

१ सौंदर्य. २ दासी. ३ तुलना. ४ गोड स्वरानें. ५ नव्या बेलफळाप्रमाणें. ६ पदर. ७ पायांतील पैंजणें.

ह्मणे पुष्पशय्येवरी चंपकांगी ॥ निजों नको गे ऊठ वेगीं ॥ वनीं असेल कोणी भोगी[1] ॥ तो तुजला देखेल ॥ ७५ ॥ पुनः बोले नृपनंदिनी[2] ॥ सुधांशु[3] शोभे तुझे वदनीं ॥ पद्मनेत्रे उरोजस्तनीं ॥ स्वयंभ लिंगें उगवलीं ॥ ७६ ॥ येथें येवोनि रतिपति ॥ यांतें स्थापील निश्चितीं ॥ त्यांचा पूजक नसे या अर्थी ॥ स्वसामर्थ्यें मर्दावया ॥ ७७ ॥ मृगमद[4]केशरचंदन ॥ विचित्र लेपें लेपोन ॥ त्रिकाळ करील जो पूजन ॥ ऐसा पाहिजे पूजक ॥ ७८ ॥ ज्यासी नसे आळस ॥ पूजा करील सुरस ॥ ऐसा तो पूजक पुरुष ॥ तयासी तूं वश करीं ॥ ७९ ॥ तुझा लवतो वाम नयन ॥ काग बोलतो मधुर स्वन ॥ बहुधा प्राप्त तुजलागोन ॥ या लिंगद्वयाचा पूजक ॥ ८० ॥ ऐसें चंपकमालिनीचें वचन ॥ ऐकोनि विषया करी हास्यवदन ॥ जेवीं मित्रोदयीं पंद्मिनी[5] जाण ॥ विकासलीया उभयतां ॥ ८१ ॥ ह्मणे पुष्पशय्या पुरे करा ॥ रविताप झाला शरीरा ॥ चला जाऊं सरोवरा ॥ सेवूं कमळमाळांतें ॥ ८२ ॥ ऐसें वचन ऐकोन ॥ सर्वेही चालिल्या तेथोन ॥ हंसांचें दाविती गमन ॥ कित्येक दाविती गजांचें ॥ ८३ ॥ कोणी कुचमंडळीं प्रहारा ॥ परस्परें करिती सुंदरा ॥ तुटोनि पडती मौक्तिकहारा ॥ मग उतरती तेथोनि ॥ ८४ ॥ कोणी पुष्पांतें घेऊनि ॥ राजकन्येतें देती धांवोनि ॥ कोणी विषयेतें आणूनि ॥ पुष्पें देती आनंदें ॥ ८५ ॥ कोणी पुष्पांचे चंद्रसूर्य करिती ॥ शिरीं दुभागीं बांधिती ॥ ऐसी वनक्रीडा करोनि युवती ॥ जळक्रीडेसी चालिल्या ॥ ८६ ॥ आला देखोन कामिनीगणं[6] ॥ हंसहंसिणींस होत पतन ॥ नूपुरांचा ऐकोनि स्वंन[7] ॥ कोकिळांनीं मौन धरिलें ॥ ८७ ॥ शीतळ तें मनोहर जळ ॥ कामिनी करितील डहुळ ॥ विशेष पुष्पवती कन्याकुळ ॥ ह्मणोनि व्याकुळ मीनं[8]कुळें ॥ ८८ ॥ कौस्तुभरंगें रंगलीं ॥ कार्पासवस्त्रें मृदू चांगलीं ॥ कन्यांनीं ठेवोनि सरोवरपाळीं ॥ जलक्रीडेसी चालिल्या ॥ ८९ ॥ अति सूक्ष्म मृदु अंबंरें[9] ॥ उडवावया सामर्थ्य नाहीं समीरें ॥ देखोनियां लावण्यशरीरें ॥ वात निश्चल जाहला ॥ ९० ॥ उदकीं प्रवेशल्या त्या नारी ॥ कलश भरूनि निर्मळ शरीरीं ॥ विविध क्रीडा नानापरी ॥ परस्परें त्या करिती ॥ ९१ ॥ समुद्रीं एक सुधाकर ॥ सरोवरीं अनंत मुखचंद्र ॥ रुळताती मुक्ताहार ॥ तेणें रत्नाकरत्व पावलें तें ॥ ९२ ॥ परस्परें करिती जळसिंचन ॥ तेणें हार कुचकुंकुम जाय धुपोन ॥ जळ टाकितां उडवोन ॥ नेणों मौक्तिकें पडताती ॥ ९३ ॥ करताडणाचिये ध्वनी ॥ तेणें जलबिंदु उडती गगनीं ॥ ते मेघआशा धरोनि मनीं ॥ चातक आले उदकार्थ ॥ ९४ ॥ तें प्राशितां चातक ॥ ह्मणती नव्हे हें मेघोदक ॥ नियमभंग झाला ह्मणोनि शोक ॥ करिताती ते पक्षी ॥ ९५ ॥ तरी कोणाचाही नेमभंग ॥ स्त्रिया करिती अव्यंग ॥ जरी यांवरी ठेविला अनुराग ॥ तरी ते नेमभ्रष्ट पैं होती ॥ ९६ ॥ स्त्री नेमाचळाची कुं[10]लिशदेवता ॥ कीं ती नेमगजावरी सिंहकांता ॥ नेमसिंधुलागीं तं[11]त्वतां ॥ काय दुहिता अगस्तीची ॥ ९७ ॥ ऐसी जलक्रीडा संपादोन ॥ परिधान करिती आत्मवसन ॥ यथास्थानीं लेवोनि भूषण ॥

१ सर्प, विषयी पुरुष. २ मालिनी. ३ चंद्र. ४ कस्तूरी. ५ कमलिनी. ६ स्त्रियांचा समुदाय. ७ नाद, शब्द. ८ माशांचा समुदाय. ९ वस्त्रें. १० वज्रदेवता. ११ खरोखर.

अंगीं चंदन चर्चिती ॥ ९८ ॥ सर्व शृंगारांतें करोन ॥ विषया सरोवरतीरीं पाहे अवलोकून ॥ तों अकस्मात दृष्टीलागोन ॥ साश्व[१]
राजसुत देखिला ॥ ९९ ॥ षोडशवर्षी मनोहर ॥ निमासुर सुकुमार ॥ निद्रामुद्रेंत चतुर ॥ नवीन अंकुर श्मश्रूचे ॥ १०० ॥ ललाटीं
शोभे कस्तूरीटिळक ॥ विशाळ नयन सरळ नासिक ॥ नेणों निद्रित सिंहबाळक ॥ ऐसा नेत्रीं देखिला ॥ १ ॥ देखोनि नृपात्मजसु-
धाकर ॥ तेथोनि दृष्टीचा पसर ॥ लुब्धले विषयेचे नेत्रचकोर ॥ अन्य पदार्थी न संचरे ॥ २ ॥ मधु देखोनि मक्षिका ॥ तन मन
प्राणेंसीं लुब्धका ॥ तेवीं दुष्टबुद्धीची कन्यका ॥ चंद्रहासा लुब्धली ॥ ३ ॥ आतां सर्वांची दृष्टी चोरून ॥ विषया तेथें करील गमन ॥
तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ सावधान परिसावें ॥ ४ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय
चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १०५ ॥ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके चंद्रहासाख्यानं नाम चतुःपंचाशत्त-
मोऽध्यायः ॥ ५४ ॥ ॥ अध्याय ॥ ५४ ॥ ॥ ओव्या ॥ १०५ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥

१ घोड्यासहित.

# अध्याय ५५.



श्रीगणेशाय नमः ॥  ॥ नारद ह्मणे सुभद्रापति ॥ ऐकें चंद्रहासकथाभागीरथी ॥ सावध ऐकतां चित्तीं ॥ तेणें तूं होसी निष्पाप ॥१॥ जळक्रीडा करोनि समस्ता ॥ निजगृहासी चालिल्या वनिता ॥ परी ते न जाय प्रधानदुहिता ॥ चंद्रहासमोहें गुंतली ॥ २ ॥ मार्गी अनेक समागमें जातां ॥ तों एकें द्रव्यनिधि देखिला अवचिता ॥ तो सर्वांसी वंचोनें राहे तत्वतां ॥ तैशी विषया ते राहिली ॥ ३ ॥ ऐसा सुंदर पुरुष त्यागून ॥ पुढें करूं कीं न करूं गमन ॥ जरी सांग न घडे याचें दर्शन ॥ तरी हा जन्म निरर्थक ॥ ४ ॥ चालतां नूपुरांचे झणत्कार ॥ जेणें सावध होईल राजकुमर ॥ ह्मणोनि तीं काढिलीं सत्वर ॥ आच्छादोनि ठेवित ॥ ५ ॥ जेथें अति वाचालत्व घडे ॥ तेथें निजसुखासी अंतर पडे ॥ जेथें निःशब्दत्व जोडे ॥ तेथें आतुडे निजसुख ॥ ६ ॥ मग पुरंध्रीसखी पाचारून ॥ तिचे करीं दिधलें चरणभूषणें ॥ दुकूलें चरणद्वय वेष्टून ॥ पद टाकित निःशब्दें ॥ ७ ॥ जैसी हंसी कलहंसाप्रति ॥ स्नेहें चाले मंदगती ॥ तेवीं विषया निजरमणाप्रति ॥ हळू हळू जातसे ॥ ८ ॥ अनेकशास्त्रवाचाळता ॥ टाकोनि पावे निःशब्दता ॥ तो जेवीं पावे ब्रह्मरूपता ॥ तेवीं अमात्यदुहिता पावली ॥ ९ ॥ तों जवळी देखिला अश्व सुंदर ॥ तो भक्षितसे दूर्वांकुर ॥ त्या हरीसी करूनि नमस्कार ॥ पार्थना करी तयाची ॥ १० ॥ ह्मणसी कां केली हरीची प्रार्थना ॥ तरी अश्वस्वभाव ऐसा जाणा ॥ पारखें देखोनियां स्वना ॥ करील ह्मणोनि प्रार्थिला ॥ ११ ॥ प्राणपीयूषें केलें शयन निःसंग ॥ तूं शब्द करूं नको तद्वियोग ॥ ऐसें बोलोनि सवेग ॥ पावली ते चंद्रहासाजवळी ॥ १२ ॥ क्षणक्षणां करी विलोकन ॥ लावण्यरूपीं जडलें मन ॥ तों पीडा देऊं लागला मदन ॥ ह्मणे काय शयन करूं येथें ॥ १३ ॥ भागला मार्गीं येतां रमण ॥ ह्मणोनि येथें केलें शयन ॥ भार तरी चरणांवर घालोन ॥ ते श्रम परिहारूं कीं ॥ १४ ॥ मुखीं उमटले घर्मांबुकण ॥ पुसों यांतें पल्लवेंकरून ॥ किंवा घालूं शीतळ पवन ॥ वस्त्रांचलेंकरूनि ॥ १५ ॥ यापरी ते मृगनेत्रा ॥ वारंवार पाहे रमणवक्त्रा ॥ तों अकस्मात देखिलें पत्रा ॥ वस्त्रपल्लव सुटले ते ॥ १६ ॥ तें युक्तीनें घेतलें उचलोन ॥ तोंवरी देखिलें मुद्राचिह्न ॥ उकलोन पाहे तों लेखन ॥ तातहस्तींचें ओळखिलें ॥ १७ ॥ लिखितें ते आनंदली ॥ आद्यंत पत्र वाचों लागली ॥ बाळपणीं निपुण झाली ॥ सर्व विद्येनें विषया ते ॥ १८ ॥ स्वस्ति श्रीरस्तु मदना ॥ तुज हो आयुष्यवर्धना ॥ सावधान करोनियां मना ॥ गुह्यार्थसूचना वाचिजे ॥ १९ ॥ पत्र वाचावया कारण ॥ तूं तंव असती कळाप्रवीण ॥ गुह्यार्थ बरवा जाणोन ॥ शीघ्र कार्य करावें ॥ २० ॥ बरवा विचारीं पत्रार्थ ॥ चंद्रहास माझा अहित ॥ हा माझे संपत्तीचा निश्चित ॥ स्वामी होईल हें जाणावें ॥ २१ ॥ रूप वित्त आणि कुळ ॥ विद्या पराक्रम आणि शीळ ॥ न विचारितां तूं सकळ ॥ कार्य आधीं साधीं याचें ॥ २२ ॥ जीवीं धरूनि कार्य कीजे ॥ शीघ्र विष यातें दीजे ॥ हें कोणासी कळों न दीजे ॥ विलंब न कीजे सुपुत्रा ॥ २३ ॥ जरी तूं आळस धरिसी ॥

१ चोरुन, लपवून. २ नूपुरें ( पैंजण ). ३ प्रधानकन्या ( विषया ). ४ खिंकाळणें. ५ पदरानें. ६ प्रियकराच्या मुखाला. ७ शत्रु.

तरी विलंब होईल निश्चयेंसीं ॥ सावधान वेगेंसीं ॥ आधीं कार्य हें करीं ॥ २४ ॥ काळ वेळ न पाहावी ॥ निजकार्यी दृष्टि द्यावी ॥ संपत्तीची ठेव बरवी ॥ करीं हें कार्य साधोनि ॥ २५ ॥ मिष्टान्नभोजनीं शयनीं ॥ तांबूलचर्वणीं उदकपानीं ॥ वस्त्रदानीं चंदनलेपनीं ॥ इतुकिया स्थळीं न विसंबें ॥ २६ ॥ जरी श्रुत होईल नृपासी ॥ तरी कार्य नासेल परियेसीं ॥ चोरोनि आप्तजनांसी ॥ कार्य आधीं साधावें ॥ २७ ॥ ऐसें आद्यंत पत्र वाचोन ॥ परम पावली समाधान ॥ पत्रार्थ तो जाणोन ॥ पुन्हा अवलोकन करीतसे ॥ २८ ॥ सर्व अर्थ परम चतुर ॥ येथेंचि कां पडलें अंतर ॥ ऐसा मनीं करित विचार ॥ तों सुचलें तियेचे मानसीं ॥ २९ ॥ ह्मणे मजयोग्य मिळाला पति ॥ हर्ष झाला तयाचे चित्तीं ॥ उल्हासें चाचरली मति ॥ ह्मणोन काना चूकला ॥ ३० ॥ असो लिहिणारापासोन चुकी ॥ तरी वाचणारा पाहिजे विवेकी ॥ मी तों आहें त्याची लेंकी ॥ पितृहस्तदोष[1] वारीन ॥ ३१ ॥ हें पत्र वाचील मदन ॥ तरी विष घेईल याचा प्राण ॥ मग मजही मरण ॥ जाणवेल सहजचि ॥ ३२ ॥ थोडकेंचि पडलें अंतर ॥ एके कान्याचा असे फेर ॥ उपेक्षिलिया अनर्थ थोर ॥ होईल ऐसें वाटतें ॥ ३३ ॥ उत्तम रांधिलें मिष्टान्न ॥ परी त्यांत पडिला विषकण ॥ तें स्वल्प काय करील ह्मणोन ॥ भक्षितां प्राण नासेल कीं ॥ ३४ ॥ भरला असतां दुग्धघट ॥ त्यामाजी कांजी पडतां थेंबट ॥ तो तत्काळ नासे स्पष्ट ॥ तैसें येथें होईल ॥ ३५ ॥ जरी मी दुजा करीन विचार ॥ तरी नासेल कार्य समग्र ॥ काना देतांचि सत्वर ॥ सकळ विघ्नें नासती ॥ ३६ ॥ काना देतां सत्वर ॥ शुद्ध होईल लेख समग्र ॥ ऐसें विचारोनि सत्वर ॥ अंजन[3] काढिलें नेत्रींचें ॥ ३७ ॥ काढी नखें नेत्रकाजळ ॥ माजी मेळविलें निर्मळ जळ ॥ काना दिधला तात्काळ ॥ यथार्थ जैसा नोळखे ॥ ३८ ॥ पुन्हा तैसेंच गुंडाळोन ॥ वस्त्र तयाचें घेऊन ॥ त्यांत तें दृढ बांधोन ॥ आपण तेथून चालिली ॥ ३९ ॥ वारंवार मुख पाहे जाण ॥ परी मन न निघे तेथून ॥ तों पुढें सख्यांनीं देखोन ॥ उपहांस[4] करिती तयेतें ॥ ४० ॥ मग तयेसी ह्मणे सखीकदंब[5] ॥ कां तुवां लाविला गे विलंब ॥ ढळला दिसे धैर्य-स्तंभ ॥ नरकेसरी देखोनियां ॥ ४१ ॥ देखोनि सोडिलें त्यासी ॥ अथवा तेणें सांडिलें तुशीं ॥ कीं निद्रित देखोनि तुवां त्यासी ॥ लोकभयें आलीसी ॥ ४२ ॥ तों नगरांतून वधूवरें ॥ वाजत येती देखती पुढारें ॥ मग विषयेप्रति बोलती उत्तरें ॥ तूंही ऐसीच मिरवसी ॥ ४३ ॥ ऐसें बोलोनि तयेसी ॥ सर्वही गेल्या नगरासी ॥ चटपट लागली विषयेसी ॥ विरहज्वरेंकरूनियां ॥ ४४ ॥ तिनें त्यागिलें अन्नपान ॥ वारंवार करी त्याचें ध्यान ॥ चंद्रहास आठवतां पूर्ण ॥ पीडी मदन तियेसी ॥ ४५ ॥ तों येरीकडे चंद्रहास ॥ पूर्ण करोनि निद्राविलास ॥ प्रक्षाळोनि मुखचंद्रास ॥ टिळक भाळीं रेखिला ॥ ४६ ॥ करोनि तांबूलचर्वण ॥ करिता झाला तो अश्वा-रोहण ॥ चौघे सेवक घेऊन ॥ नगरप्रवेश तेणें केला ॥ ४७ ॥ देखोनि नगररचना ॥ परमानंद झाला मना ॥ तेथील नृप सुभद्रारमणा ॥

१ बापाच्या हातून झालेली चुकी. २ हयगय केली असतां. ३ काजळ. ४ थट्टा. ५ सख्यांचा समूह.

योगसाधनीं नित्य रत ॥ ४८ ॥ गालवगुरुवचनरत्नें ॥ राव मनोमंदिरीं ठेवीत यत्नें ॥ ध्यानबळें साही[1] सपत्नें ॥ केलीं बापुडीं देशोधडी ॥ ४९ ॥ चंद्रहास कुलिंदनंदन ॥ दर्शनें नरनारींस पडे मोहन ॥ सर्वांसी रूपगुणें ओढोन ॥ पावला भुवन प्रधानाचें ॥ ५० ॥ अश्वावरून उतरला ॥ द्वारपाळासी बोलिला ॥ माझें वचन द्वारपाळा ॥ मदनासी सांगावें ॥ ५१ ॥ चंद्रहास कुलिंदनंदन ॥ दुष्टबुद्धीचें पत्र घेऊन ॥ चौघां दूतांसहित जाण ॥ द्वारीं उभा राहिलासे ॥ ५२ ॥ शिरीं वंदोन आज्ञावचन ॥ द्वारपाळीं केलें गमन ॥ मदनाप्रति सांगती वचन ॥ जें चंद्रहासें निवेदिलें ॥ ५३ ॥ प्रथमें सांगितलें दुजायासी ॥ त्यानें सागितलें तिजयासी ॥ तृतीयें कथिलें चौथ्यासी ॥ तेणें पांचव्यासी सांगितलें ॥ ५४ ॥ पंचमें सांगितलें साहाव्यासी ॥ षष्ठें निवेदिलें सप्तमासी ॥ तेणें ऐकतां वचनासी ॥ जावोनि उभा ठाकला ॥ ५५ ॥ विवेक त्याचें अभिधान[2] ॥ भक्तियष्टिका[3] हातीं धरून ॥ मदनासी करूनि नमन ॥ चंद्रहासागमन निवेदिलें ॥ ५६ ॥ अनुपम तें सभास्थान ॥ तेथें बैसलासे मदन ॥ दक्षिणभागीं ब्राह्मण ॥ वेदशास्त्री गणक जे ॥ ५७ ॥ सदा कृष्णगुण वर्णिती ॥ ज्यांचे वचनीं होय विश्रांति ॥ तैसे कविजन शोभती ॥ दक्षिणभागीं मदनाचे ॥ ५८ ॥ मध्यें बैसलासे मदन ॥ चामरें व्यंजनें[4] शोभायमान ॥ ऐसा प्रधाननंदन ॥ प्रसन्न वदनें अनुवादे ॥ ५९ ॥ ह्मणे कां आलासी विवेका ॥ येरू ह्मणे जी विनंति ऐका ॥ अत्यंत प्रिय मी तव जनका ॥ सेवादानें तुष्टवीं ॥ ६० ॥ ज्यासी वसे आगतस्वागत ॥ तोचि पुरुष योग्य होत ॥ जे दुष्ट कंटक निश्शंक ॥ त्यांतें तुह्मी न माना ॥ ६१ ॥ तरी ऐकावें मम बोला ॥ चंद्रहास येथें आला ॥ जनकें पत्र दिधलें तुह्मांला ॥ तें घेवोन आला राजपुत्र ॥ ६२ ॥ जो जगाचें करी पालन ॥ जो योगियांचें ध्यान ॥ त्याचा निपुण भक्त पूर्ण ॥ चंद्रहास महावीर ॥ ६३ ॥ तव जनकाचें मजला भय ॥ क्रोध करितां कांपे हृदय ॥ ह्मणोनि कोणी येतां हरिप्रिय ॥ तो तुजला निवेदितों ॥ ६४ ॥ ऐसें ऐकोनियां मदन ॥ तोषें पावला समाधान ॥ सर्व सभा सवें घेऊन ॥ दर्शनालागीं निघाला ॥ ६५ ॥ तयासी करूनि वंदन ॥ प्रेमें दिधलें आलिंगन ॥ करांबुज[5] धरोन ॥ सभास्थानीं आणिला ॥ ६६ ॥ वरासनीं[6] बैसवून ॥ बरवें करीत पूजन ॥ मग त्याप्रति मदन ॥ कुशल प्रश्न बोलतसे ॥ ६७ ॥ कुशल सुखी कीं कुलिंद ॥ माता असे कीं स्वानंद ॥ नगरीं वसत कीं मुनिवृंद[7] ॥ वेदाध्ययनें चालती कीं ॥ ६८ ॥ स्वधर्मीं असती कीं वैश्यशूद्र ॥ धनें पूजितां कीं द्विजवर ॥ सकळ प्रजा सुखें निर्भर ॥ पीडा कांहीं नसे कीं ॥ ६९ ॥ श्रीहरि चिंतोनि मानसीं ॥ नित्यार्चनें तुष्ट सौवर्णधनेंसीं ॥ काय कार्यनिमित्तें आलासी ॥ तें मजपासीं निवेदावें ॥ ७० ॥ ऐसें मदनवाक्य ऐकोन ॥ चंद्रहास तोषला जाण ॥ अंतरीं स्मरोन नारायण ॥ तयाप्रति बोलत ॥ ७१ ॥ तुह्मांऐसा आप्त असतां सांग ॥ क्षणें करील विपत्तीचा भंग ॥ मनोमानस जोडी श्रीरंग ॥ भुक्तिमुक्तींस सेवित ॥ ७२ ॥ जयासी साधुसंगति ॥ त्याचें अकल्याण नव्हे कल्पांतीं ॥ नित्य प्रसन्न

१ कामक्रोधादि षड्रिपु. २ नांव. ३ भक्तिरूप काठी. ४ पंखे. ५ हस्तकमल. ६ श्रेष्ठ आसनावर. ७ मुनिसमूह.

तया श्रीपति ॥ घरीं राबती अष्ट सिद्धी ॥ ७३ ॥ हें पितृलेखन पत्र घ्यावें ॥ तें एकांतीं वाचावें ॥ अति गूढ कार्य तें करावें ॥ पितृआज्ञेंकरूनि ॥ ७४ ॥ चंद्रहासातें करीं धरून ॥ उठोनि चालिला मदन ॥ पाहोनियां एकांत स्थान ॥ जेथें अभक्त खळ नसे ॥ ७५ ॥ जेथें असती अनेक जन ॥ परी जे असती भगवद्भक्तिपरायण ॥ आपुलेंही असे शुद्ध मन ॥ तरी तो एकांत जाणावा ॥ ७६ ॥ तूं तरी अससी कृष्ण-भक्त ॥ पितृसेवनीं आसक्त ॥ श्रेष्ठ पराक्रमी जगविख्यात ॥ मन स्वच्छ भंग नसे ॥ ७७ ॥ ऐसिया हरिभक्तातें चोरून ॥ काय करूं मी पत्र वाचून ॥ वाचितां महामूर्खपण ॥ मजहोनि नसे वरिष्ठ ॥ ७८ ॥ पवित्र माझे सभाजन ॥ या सकळांदेखतां पत्र वाचीन ॥ ऐसें बोलोनियां मदन ॥ सभेमाजी येवोनि बैसे ॥ ७९ ॥ घडघडां पत्र वाचीत जाणा ॥ ह्मणे तातें मज लिहिली सूचना ॥ स्वस्ति असो तुज मदना ॥ विषया द्यावी चंद्रहासा ॥ ८० ॥ रूप विद्या कुळशील ॥ हें न विचारावें केवळ ॥ माझा मार्ग न पाहावा तात्काळ ॥ लग्न करावें त्वरेंसीं ॥ ८१ ॥ सभासद ह्मणती मदना ॥ हे बरवी लिहिली सूचना ॥ परी संदेह वाटे आमुचे मना ॥ याचें विवरण सांगावें ॥ ८२ ॥ कुळ शीळ न पाहावें ॥ परी तें पाहिलें असेल सचिवें ॥ आणि काळातें न लक्षावें ॥ शरीर अस्थिर ह्मणोनि ॥ ८३ ॥ नृपासी न कळवीं झणीं ॥ त्याची कन्या चंपकमालिनी ॥ ते अंवरीच असे अजुनी ॥ ते ऐकतां नेईल वरा ॥ ८४ ॥ शंकर-पार्वतीसमान ॥ जोडा शोभेल पूर्ण ॥ ऐसें लिहिलें मज जाण ॥ निजतातें निर्धारें ॥ ८५ ॥ माझी वाट न पाहणें ॥ हेंही उचितचि लिहिणें ॥ आपणासी पराधीनपणें ॥ अवकाश नसे याकरितां ॥ ८६ ॥ ऐसा पत्रार्थ वाचिला ॥ सकळ सभासदां मानला ॥ ह्मणती वंश पावन केला ॥ तव जनकें वाटतें ॥ ८७ ॥ ऐसें पत्र वाचोन ॥ परम संतोषला तो मदन ॥ नवल कर्माचें विंदान ॥ मृत्तिका सुवर्णमय झाली ॥ ८८ ॥ मदन ह्मणे म्यां जें चिंतिलें ॥ तेंचि ईश्वरें घडविलें ॥ तो प्रसन्न झालिया सकळें ॥ अघटित घडवीतसे ॥ ८९ ॥ अन्नोदक पुष्प फळ ॥ हरिभक्तां अर्पितां अनंत फळ ॥ मग कन्यादानाचें फळ ॥ न वर्णवे दशशतवदना[३] ॥ ९० ॥ तंव इकडे काय वर्तली कथा ॥ सप्तखणांचे गोपुरीं सचिवदुहिता[४] ॥ अन्नोदकरहिता ॥ कामें मोहित पडलीसे ॥ ९१ ॥ सखियांसहित तेथोन ॥ चंद्रहासाचें करीत विलोकन ॥ ह्मणे हाचि वर देईं मजलागून ॥ गौरीरमणा[५] महेशा ॥ ९२ ॥ जय मूळपीठवासिनी ॥ भक्तकामलतिके भवानी[६] ॥ मी अनन्य शरण तुजलागुनी ॥ पुरवीं मनोरथ माझा हा ॥ ९३ ॥ तुजप्रीत्यर्थ व्रत करीन ॥ भाद्रपदशुद्ध तृतीया जाण ॥ हरितालिका अभिधान ॥ तेंचि व्रत आचरेन मी ॥ ९४ ॥ अहोरात्र उपोषण ॥ रात्रौ बरवें पूजन ॥ गंधाक्षता पक्वान्न ॥ धूप दीप यथासांग ॥ ९५ ॥ पुष्पहार उत्तम ॥ बळिपूजा सुवर्णप्रतिमा करीन ॥ पाचारोनि द्विजोत्तम ॥ यथासांग पूजीन मी ॥ ९६ ॥ निराहार उपोषण ॥ रात्रौ करीन जागरण ॥ वारंवार करीन वंदन ॥ तुजलागीं जननीये ॥ ९७ ॥ ऐसी विषया बोलत वचन ॥

१ कुमारिका. २ खरोखर. ३ शेषाला. ४ प्रधानकन्या ( विषया ). ५ पार्वतीपते शंकरा. ६ पार्वती.

तों सखी आली धांवोन ॥ तव मनोरथ जाण पूर्ण ॥ चिंता सोडीं शुभानने ॥ ९८ ॥ हास्य करोनि चंपकमालिनी ॥ जें बोलिली तुज लागोनि ॥ वक्षःस्थळ भेदोनि लिंगें दोन्ही ॥ स्मरें रतीं घडलीं जीं ॥ ९९ ॥ तयांचें करावया पूजन ॥ प्रार्थी कोणी विचक्षण ॥ जो वनीं देखिला कुलिंदनंदन ॥ तोचि वीर तूं पावसी ॥ १०० ॥ पति पावतां चंद्रहास ॥ अपार भोगिसी तूं रतिविलास ॥ ऐसा सखीवचनें संतोष ॥ परम पावली विषया ते ॥ १ ॥ तयेसी झाला संतोष ॥ तो न वर्णवेचि निःशेष ॥ समर्थ नव्हे महदाकाश ॥ सांठवावया तयासी ॥ २ ॥ मग करोनियां अधोवदन ॥ अंगुष्ठनखें करी भूमिखनन ॥ अति नम्र होवोनि वरगुण ॥ काय विषया मागतसे ॥ ३ ॥ पुढें दोघांचें पाणिग्रहण ॥ होईल उत्साहवर्धन ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अति रसाळ परिसावें ॥ ४ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १०५ ॥ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके चंद्रहासाख्यानं नाम पंचपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५५ ॥ ॥ अध्याय ॥ ५५ ॥ ओव्या ॥ १०५ ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥   ॥ ऐकोनि मुनिवरवाणी ॥ संतोषला गांडीवपाणि ॥ पुनः विनवी कर जोडोनि ॥ तें ऐकें जनमेजया ॥ १ ॥ वृत्रारितनय बोले मुनि ॥ पुढें कैसी झाली करणी ॥ ती सांगावी कृपा करोनि ॥ कृष्णभक्तचरित्र ॥ २ ॥ यानंतर तो हरिभक्त मदन ॥ पितृपत्रार्थ मनीं आणून ॥ करिता झाला पाणिग्रहण ॥ चंद्रहासविषयेचें ॥ ३ ॥ चंदनावतीहून राजनंदन ॥ कुंतलापुर पावलिया जाण ॥ विष्णुभक्त परम पावन ॥ देवें विंदान तें केलें ॥ ४ ॥ मदनें वाचोनियां पत्र ॥ पाचारिले विप्र पवित्र ॥ सिद्धांतवक्ते जे चतुर ॥ ऐसे ऋषी पाचारिले ॥ ५ ॥ तयांसी पुसे मदन ॥ चंद्रहासविषयेचें लग्न ॥ कधीं निघतें पाहून ॥ सत्वर मज निवेदा ॥ ६ ॥ गणक ह्मणती मदना ॥ तृतीय एकादश गुरु शुक्र जाणा ॥ या उभयतांचे स्थानां ॥ शुभसूचना सांगती ॥ ७ ॥ याचे महद्भाग्यें-करून ॥ आजि आहे गोरज लग्न ॥ मुखें पुच्छें ऊर्ध्व करून ॥ गायी येती जे समयीं ॥ ८ ॥ स्वगृहातें लक्षिती ॥ वत्सातें स्मरोनि धांवती ॥ त्रिविध गुणें गोप धांवती ॥ गोठणीं गायी जे समयीं ॥९॥ तुझ्या महद्भाग्यें जाण ॥ झालें चंद्रहासाचें आगमन ॥ ह्मणोनि सर्वदोषविहीन ॥ आजचि लग्न निघालें ॥ १० ॥ वराहादि ऋषिगण ॥ तेही पावले उत्तम लग्न ॥ ऐसें ऐकतांच मदन ॥ हर्षें निर्भर जाहला ॥ ११ ॥ परम पावला समाधान ॥ दोहींकडे कर्ता आपण ॥ पतिव्रता स्त्रीसीं आज्ञावचन ॥ देता झाला सत्वर ॥ १२ ॥ विषयेसी घाला मंगलस्नान ॥ तैसेंचि चंद्रहासालागून ॥ मग सुवर्णकलश[1] आणोन ॥ नवीन सूत्रें वेष्टिले ॥ १३ ॥ पंचपल्लव[2] घालोन आंत ॥ आणि अशोकें केलें वेष्टित ॥ नरनारी मिळाल्या समस्त ॥ लग्नसोहळियाकारणें ॥ १४ ॥ केशरचंदन अंगीं चर्चून ॥ बोले चंद्रहासासी मदन ॥ तुह्मीं करावें मंगलस्नान ॥ ह्मणोनियां प्रार्थिला ॥ १५ ॥ पतिव्रताहस्तोदकें ॥ मंगलस्नान करावें निकें ॥ बरवें ह्मणोनि भक्तनायकें ॥ अभ्यंगातें सारिलें ॥ १६ ॥ सुस्नात केला चंद्रहास ॥ रत्नपाटीं बैसविलें त्यास ॥ मग मदन मधुपर्कास ॥ करिता झाला तेधवां ॥ १७ ॥ घालोनियां शुद्ध जीवन[3] ॥ प्रक्षाळिले आधीं चरण ॥ मग गंधमाल्यें वस्त्राभरण ॥ देता झाला तयासी ॥ १८ ॥ साधिला गोरज अंशें[4] ॥ उभा केला चंद्रहास ॥ अंतःपट धरिला विषयेस ॥ सन्मुख उभें करोनि ॥ १९ ॥ ओंपुण्याहं ह्मणोनियां जाण ॥ लाविलें उभयतांचें लग्न ॥ मग करीत कन्यादान ॥ गोत्र पुसे चंद्रहासा ॥ २० ॥ हरिरूपी कुलिंद मम पिता ॥ पितामह जाण अच्युता ॥ प्रपितामह स्मरें अनंता ॥ मी हरीवांचोनि दुजें नेणें ॥२१॥ आधारशक्ति कुलिंदरमणी ॥ तीचि माझी आदिजननी ॥ सुरासुरमातेचा धनी ॥ त्याचें नाम मम गोत्र ॥ २२ ॥ ऐकोनि तोषला मदन ॥ स्वगोत्रोच्चार करून ॥ यथासांग कन्यादान ॥ अर्पिलें तें तयापरी ॥ २३ ॥ उदक घेवोनि बोले मदन ॥ म्यां यासी केलें कन्यादान ॥ या दानें लक्ष्मीनारायण ॥ संतुष्ट असो सर्वदा ॥ २४ ॥ ऐसें झालें पाणिग्रहण ॥ केलें कुंकुमहरिद्रालेपन ॥ मग बोहलियावरी बैसवून ॥ हुताशन[5] तृप्त केला ॥ २५ ॥

---

१ सोन्याच्या घागरी. २ पिंपळ, उंबर, पायरी, आंबा आणि वड यांचे पल्लवांचा जो समुदाय तो. ३ उदक. ४ मुहूर्त. ५ अग्नि.

केलें सप्तपदीगमन ॥ केलें सप्त ऋषींचें दर्शन ॥ करोनि सकळ द्विजवंदन ॥ शोभती अत्यंत वधूवरें ॥ २६ ॥ मग येवोनि पतिव्रता-मंडळी ॥ कुंकुमतिलक लाविती भाळीं ॥ पुष्पाक्षता आणि फळीं ॥ ओंटी भरिती वधूची ॥ २७ ॥ संतुष्ट होवोनि मदन ॥ देता झाला अमित धन ॥ अमित महिषी गोदान ॥ वरदक्षिणा दिधली ॥२८॥ नाना रत्नें मुक्ताफळें ॥ नाना वस्त्रें सोज्ज्वळें ॥ कर्पूर चंदनादि परिमळें ॥ द्रव्यें दिधलीं अपार ॥ २९ ॥ गज[1] वाजी[2] आणि रथ ॥ जामातास समर्पिले बहुत ॥ दासदासी समर्पित ॥ सालंकार सवस्त्रें ॥ ३० ॥ देश ग्राम दिधले बहुत ॥ मग हस्त जोडोनि प्रार्थित ॥ चंद्रहासासारिखा जामात ॥ त्यासी हें स्वल्प दिधलें ॥ ३१ ॥ पंचप्राण शिरकमळ ॥ हेंही मी पुढें अर्पीन सोज्ज्वळ ॥ आणि हें घ्यावें राज्य सकळ ॥ पुत्रपौत्रीं नांदावया ॥ ३२ ॥ विप्रांसी बोले सचिवपुत्र ॥ सकळीं शोभवावें मंडपांतर ॥ तुह्मांस समर्पितों वस्त्रालंकार ॥ अन्नदानासहित पैं ॥ ३३ ॥ करोनि विप्रांचें पूजन ॥ मग चंद्रहासा घेवोनि मदन ॥ विषयेसहित भोजन ॥ करिता झाला स्वपंक्तीं ॥ ३४ ॥ मग केलें तांबूलचर्वण ॥ क्षणैक विश्रांति घेऊन ॥ रात्री सरतां प्राप्त अरुण ॥ उदयीं प्रातःस्मरण मांडिलें ॥ ३५ ॥ मग तो सचिवकुळदीप ॥ करवीत चित्रमंडप ॥ चित्रें काढोनि अमुप[3] ॥ भिंती रमणीय पैं केल्या ॥ ३६ ॥ केलें चंदनोदकें मार्जना ॥ ध्वजपताकाआरोहणा ॥ तेथें नाचती नृत्यांगना ॥ नाना वाद्यें वाजती ॥ ३७ ॥ उसळती ऊर्ध्व जळयंत्रें[4] ॥ नाचताती कळापात्रें[5] ॥ भाटबंदिजनवक्रें ॥ वंशावळी वाखाणिती ॥ ३८ ॥ चंद्र-हास उदेला तो तपन ॥ त्याचें होतांच दर्शन ॥ पळोन गेलें तिमिरअज्ञान[6] ॥ प्रफुल्ल झालीं मुखांबुजें ॥ ३९ ॥ वधूवरीं केलें मंगळ-स्नान ॥ हरिद्राकुंकुमलेपन ॥ पतिव्रता सुवासिनी येऊन ॥ नीरांजनें ओंवाळिती ॥ ४० ॥ वस्त्रें नेसलीं उत्तम ॥ शिरीं मुगुट बांधिला कुसुम ॥ केशरकस्तूरीमळवट पूर्ण ॥ करिती पूजा तयांची ॥ ४१ ॥ मंडपीं बैसले ब्राह्मण ॥ वेदज्ञ शास्त्रज्ञ प्रवीण ॥ गजाश्वदानें मदन ॥ देता झाला तयांसी ॥ ४२ ॥ अपार दिधलीं गोदानें ॥ तैशींच वस्त्रें आभरणें ॥ देवोनियां मुक्तें रत्नें ॥ याचकजन सुखी केले ॥ ४३ ॥ दरिद्रदावाग्निज्वाळा ॥ जाळीत होत्या द्विजांला ॥ त्या मदनें दूर केल्या ॥ द्रव्यमेघ वर्षोनि ॥ ४४ ॥ वैद्य गायक नर्तक ॥ वीणा मृदंगादि वादक ॥ वेश्या भाँट अनेक ॥ आले तेथें मागावया ॥ ४५ ॥ टाळ मृदंग पृष्ठीं बांधून ॥ जे करिती ऊर्ध्व वंशारोहण ॥ जे अधोर्ध्व करिती उड्डाण ॥ तेही आले मागावया ॥ ४६ ॥ मुखांतूनि काढिती अग्निज्वाळा ॥ आणि जे करिती इंद्र-जाळा ॥ इत्यादि आले ते सकळा ॥ मंडपद्वारीं मागावया ॥ ४७ ॥ जे पुराणोक्त राजे वर्णिती ॥ त्यांस सूत ऐसें बोलिजेती ॥ वर्तमान रायातें स्तविती ॥ ते जाणावे मागध ॥ ४८ ॥ जे राजे जिंकिती समरांगण ॥ त्यांचे प्रबंध करिती जे वर्णन ॥ त्यांतें बोलिजे बंदिजन ॥ तेही आले मंडपासीं ॥ ४९ ॥ नाना देशींचे आले मल्ल ॥ जे मल्लयुद्धकर्तें कुशल ॥ जे सर्व विद्येनें अनुकूल ॥ ते वस्त्रें धनें

१ हत्ती. २ घोडे. ३ बहुत, अनेक. ४ कारंजीं. ५ कळसूत्री बाहुल्या. ६ अज्ञानरूपी अंधकार. ७ स्तुतिपाठक. ८ नाड्यावर चढणारे भोरपी. ९ गारोडी.

तोषविले ॥ ५० ॥ कौतुक पहावयालागोन ॥ जे जे आले नागरिकजन ॥ तयांसी वस्त्राभरणें धन ॥ देवोनि मदनें गौरविलें ॥ ५१ ॥ धष्ट पुष्ट मनोहर ॥ सकळ लोकां आनंद थोर ॥ परम शोभलें कुंतलापुर ॥ लज्जित शक्रपुर झालें ॥ ५२ ॥ अनुक्रमेंकरूनि मदन ॥ सविनय वचनें बोलोन ॥ आप्त संबंधी सुहृज्जन ॥ वस्त्रालंकारें गौरविले ॥ ५३ ॥ चंद्रहास विष्णुभक्त ॥ प्रधानाचा झाला जामात ॥ आणि मदनाऐसा पुरुष विख्यात ॥ उत्साहकर्ता असेना ॥ ५४ ॥ तेथें दैन्यदरिद्र कैंचें ॥ मनोगत पुरविलें साचें ॥ तयासी उपमा द्यावयाचें ॥ नसे अन्य त्रिभुवनीं ॥ ५५ ॥ विधिनंदन[1] ह्मणे पार्था ॥ अघटित घडवी हरिसत्ता ॥ प्राणियाची पाहें लटकी अहंता ॥ मी कार्यकर्ता ह्मणवीतसे ॥५६॥ यासी विष देऊनि मारणें ॥ ऐसें पुत्रा लिहिलें प्रधानें ॥ तें अन्यथा करविलें नारायणें ॥ करविलें लग्न त्याहस्तें ॥५७॥ अनंत ब्रह्मांडांचा गोसावी ॥ अघटित घडवी लाघवी ॥ तयाची सत्ता अन्यथा भावी ॥ ऐसा दुर्जन कोण असे ॥५८॥ प्राणी असोन पराधीन ॥ वृथा धरी देहाभिमान ॥ ह्मणे मी निश्चयें कार्य करीन ॥ तरी तें अन्यथा हरि करी ॥५९॥ हरिचरणीं ठेवावा भाव ॥ तोचि सर्व कार्यांचा करील निर्वाह ॥ तया विमुख झालिया हा जीव ॥ नव्हे सर्वथा कार्यसिद्धि ॥ ६० ॥ यापरी त्या चंद्रहासाचा ॥ विवाहोत्साह झाला साचा ॥ यावरी प्रसंग कथेचा ॥ निश्चळ मनें ऐकावा ॥ ६१ ॥ पुढें चंदनावतीस प्रधान ॥ कुलिंदप्रजेस करील पीडन ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ सावधान परिसावें ॥६२॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें[2] ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ६३ ॥ इति श्रीमन्महाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके चंद्रहासाख्यानं नाम षट्पंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५६ ॥ अध्याय ॥ ५६ ॥ ओव्या ॥ ६३ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

१ नारद. २ मीपण.


अध्याय ५७.
दुष्ट०
ग्रामवासी यांस सेवक मारतात.
कुलिंदराजास दुष्टबुद्धीनें कैदेंत घातलें.
दुष्टबुद्धि प्रधान
धनरक्षक सर्प.
दुष्टबुद्धि प्रधान
दानधर्म नेणारांस मारितो.
दुष्टबुद्धीस स्त्रिया आरती करतात.
दुष्टबुद्धि
मदन.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ नारद ह्मणे वृत्रारिसुता ॥ इकडे चंदनावतीसी वर्तली कथा ॥ ती तुवां ऐकावी रे आतां ॥ चित्त करोनि एकाग्र ॥ १ ॥ चंद्रहास गेलियावर ॥ दुष्टबुद्धि तो दुराचार ॥ मेला जाणोनि कुलिंदकुमर ॥ प्रळय थोर आरंभिला ॥ २ ॥ कुलिंदरायातें धरोनि ॥ दृढ शृंखळा घातल्या चरणीं ॥ सेवक नगरांत पाठवोनि ॥ प्रजापीडन मांडिलें ॥ ३ ॥ देहात्मवादी जे नर ॥ न जाणती ते परमेश्वर ॥ शाश्वत मानोनि संसार ॥ स्वेच्छा आचरण करिताती ॥ ४ ॥ कंठीं बांधोनि दृढ शिळा ॥ उदकीं बुडवीत वेळोवेळां ॥ अग्नि दावोनियां सकळां ॥ द्रव्य मागे प्रजांतें ॥ ५ ॥ बळेंचि प्रजानासिकबिळीं ॥ उदकें आणोनि रिचविलीं ॥ प्रजा पीडिल्या ते वेळीं ॥ ऐसिया तेणें पापिष्ठें ॥ ६ ॥ कुलिंदासी ह्मणे प्रधान ॥ मज दारुणातें न जाणसी पूर्ण ॥ या कुपुत्राश्रयेंकरून ॥ गर्विष्ठ जाहलासी धनमदें ॥ ७ ॥ मजला सेवकांहातीं पाठविलें धन ॥ तूं धरोनि राहिलासी अभिमान ॥ तुज हें केलें रे शासन ॥ मतिमंदा दुरात्मया ॥ ८ ॥ तेही सेवक मदोन्मत्त ॥ दिल्हें अन्न परि न भक्षित ॥ गर्विष्ठ होवोनि सांप्रत ॥ व्रतें दानें आरंभिलीं ॥ ९ ॥ हठेंकरोनि माझें वित्त ॥ कां नासिलें रे बहुत ॥ आत्मनगरीं शिवालयें येथ ॥ काय ह्मणोनि बांधिलीं ॥ १० ॥ धर्मशाळा मठ वापी कूप ॥ तडागादिक अमूप ॥ नगरबाह्यप्रदेशासमीप ॥ कोठें होतीं रे या नगरीं ॥ ११ ॥ कोठें गेले ते पाथरुट ॥ कोठें गेले ते शिल्पकारांचे थाट ॥ जिहीं माझें द्रव्य उत्कृष्ट ॥ दुराचारियें हरियेलें ॥ १२ ॥ ऐसें कुलिंदातें निर्भर्त्सून ॥ दृढ केलें तयातें बंधन ॥ मग लोभी सेवका पाचारून ॥ काय वचन बोलत ॥ १३ ॥ तृष्णावधू सवें घेऊन ॥ तूं या चंदनावतीचें करीं रक्षण ॥ ऐसें तया आज्ञापून ॥ आपण चालिला निजनगरा ॥ १४ ॥ नगरींचे सर्व ब्राह्मण ॥ ह्मणती हा दुष्ट करील अपमान ॥ ह्मणोनि स्त्रीपुत्रांसहवर्तमान ॥ पलायन तिहीं केलें ॥ १५ ॥ ह्मणती वांचलिया प्राण ॥ मेळवूं पुढें अपार धन ॥ सर्व संपत्ति टाकोन ॥ विप्र गेले वनांतरीं ॥ १६ ॥ परम संतोषला दुष्टमति ॥ ह्मणे भली दंडिली चंदनावती ॥ याचा पुत्र तो दुष्कृति ॥ मारिला असेल मदनानें ॥ १७ ॥ जावोनि झाले तीन दिवस ॥ एक दिन लागला जावयास ॥ द्वितीय दिनीं प्राणनाश ॥ पावला असेल विषयोगें ॥ १८ ॥ मी एका प्रहरें त्वरें जाईन ॥ कृतकृत्य पाहीन तो मदन ॥ ऐसा मनीं विचार करून ॥ शिबिकारोहणीं आरूढे ॥ १९ ॥ मत्स्यभक्षक महाबळी ॥ चार चार ठेविले स्थळोस्थळीं ॥ तयांचे स्कंधीं शिबिका दिधली ॥ वेगें चला ह्मणतसे ॥ २० ॥ वेत्रदंड करीं घेऊन ॥ वाहकांसी करी ताडन ॥ शीघ्र शीघ्र करा गमन ॥ वारंवार ह्मणतसे ॥ २१ ॥ वाहक परम कंपायमान ॥ तयासी बोलती वचन ॥ आह्मी तों शीघ्र करितों गमन ॥ वृथा ताडन कां करिसी तूं ॥ २२ ॥ काय नहुषकुळीं जन्मलासी ॥ परी ते आह्मी नव्हे तापसी ॥ तुज देवोनि शापासी ॥ सर्प आह्मांसीं न करवे ॥ २३ ॥ नातरी शरासनापासोन बाण ॥ कीं पक्षी आक्रमिती गगन ॥ तैसे धांवती कैवर्तक पूर्ण ॥ भयभीत होवोनियां ॥ २४ ॥ जेवीं सुटतां समीर ॥ जाहाज समुद्रीं धांवे थोर ॥ तैसे धांवती ते धीवर ॥ शिबिका स्कंधीं घेवोनियां ॥ २५ ॥ यापरी तो पापचेष्टित ॥ परम संतोष मानित ॥ तों पुढें कौतुक झालें अद्भुत ॥

तें सावधान परिसावें ॥ २६ ॥ तों वाटे उभा ठाकला महाव्याळ ॥ फणेनें उचलीत नभमंडळ ॥ पुच्छें स्पर्शोनि भूतळ ॥ मनुष्य-
वाचा बोलत ॥ २७ ॥ तुझें जें सुवर्णघटवित्त ॥ तें मी राखीत होतों अगणित ॥ तें मदनें वेंचिलें समस्त ॥ ह्मणोनियां मी चालिलों
॥ २८ ॥ ऐसें बोलोनियां व्याळ ॥ तेणें सेविलें पाताळ ॥ गूढअर्थाचा तो बोल ॥ मंदमतीसी खोंचला ॥ २९ ॥ जो विषयांध झाला
पूर्ण ॥ तो विसरे हरिस्मरण ॥ कीं हरिजनमुखींचें कीर्तन ॥ न करी श्रवण खळ जैसा ॥ ३० ॥ दंतें अधरोष्ठ चावून ॥ वाहकांतें
करी ताडन ॥ ग्रामास गेलिया तुमचे चरण ॥ छेदीन जाणा निर्धारें ॥ ३१ ॥ ऐसा करीत तयांसी मार ॥ प्रहरांत पावला कुंत-
लापुर ॥ तंव मंगळतूर्यांचे घोष थोर ॥ नगरामाजी ऐकिले ॥ ३२ ॥ वैरी मारिला चंद्रहास ॥ ह्मणोनि आनंद झाला मदनास ॥
त्या उत्साहें मंगलतूर्यांस ॥ आज्ञा केली मम पुत्रें ॥ ३३ ॥ मग शिबिकेंतूनि उतरला ॥ पदें एकलाचि धांवला ॥ वस्त्राभरणीं देखता
झाला ॥ सूत मागध बंदिजन ॥ ३४ ॥ तयासी बोलती बंदिजन ॥ धन्य तव उदरींचें रत्न ॥ सुपुत्र जन्मला मदन ॥ बरवें प्रयोजन
तेणें केलें ॥ ३५ ॥ दीर्घायु असो चंद्रहासास ॥ तैसेंचि असो मदनास ॥ जेणें तोषविलें आह्मांस ॥ भगिनीविवाह करोनि ॥ ३६ ॥
ऐकोनियां ऐसें वचन ॥ क्रोधें तप्त झाला प्रधान ॥ जो घेईल चंद्रहासाचें अभिधान ॥ त्याचें छेदीन शिर पैं ॥ ३७ ॥ ऐसें बोलत
चालिला प्रधान ॥ तों पुढें पाहिले ब्राह्मण ॥ जे गंधमाल्यें शोभायमान ॥ वस्त्रालंकारीं गौरविले ॥ ३८ ॥ कोणासी दिधलें रथदान ॥
कोणासी दिधलें अश्वदान ॥ कोणासी देऊनि गोदान ॥ वस्त्रें भूषणें दिधलीं ॥ ३९ ॥ तयासी वाटे चंद्रहास ॥ मारूनि मदनें केला
उल्हास ॥ परी धीर न धरवे त्यास ॥ मग विप्रांस पुसतसे ॥ ४० ॥ मदनें उल्हास केला पूर्ण ॥ किंनिमित्त केलें तुमचें पूजन ॥ तें
सांगा रे मजलागून ॥ जेणें श्रवण सुखावती ॥ ४१ ॥ ऐकोनियां विप्र बोलती ॥ तुज कल्याण हो कां दुष्टमति ॥ चंद्रहास जामात
सुकृती ॥ पूर्वभाग्यें पावलासी ॥ ४२ ॥ मदनें केलें ऊर्जित ॥ भाग्य वाढलें यथास्थित ॥ कीर्ति झाली विख्यात ॥ मदनाऐसा
नसे दाता ॥ ४३ ॥ द्विजवचनें तो कोपला ॥ जेवीं अनळ घृतें शिंपिला ॥ कीं पुच्छीं भुजंग ताडिला ॥ किंवा पेटला दावाग्नि ॥४४॥
कीं प्रल्हादमुखीं नामवाणी ॥ ऐकतां हिरण्यकश्यपालागूनि ॥ धडके जेवीं क्रोधाग्नि ॥ तेवीं तो विप्रांवरी कोपला ॥ ४५ ॥ ऐसा
झाला क्रोधें दीप्त ॥ ब्राह्मणांतें दंड उगारित ॥ तुह्मांसी मारीन रे निश्चित ॥ कोठें पळाल मजपुढें ॥ ४६ ॥ वस्त्रालंकार सर्व धन ॥
टाकोनि पळती ते ब्राह्मण ॥ पदोपदीं पावती पतन ॥ शिरीं शिखा मुक्त झाल्या ॥ ४७ ॥ परिधानवस्त्रें फिटलीं ॥ धांवतां यज्ञोपवीतें
गळालीं ॥ धांपा भरतां पोटें चोळिलीं ॥ श्वासोच्छ्वासें मूर्छित ॥ ४८ ॥ तों पुढें गायक देखिले ॥ जे वस्त्रालंकारीं गौरविले ॥
ते प्रधाना देखोनि बोलिले ॥ कीं राज्य शोभे चंद्रहासा ॥ ४९ ॥ ऐकतां ऐशा वचना ॥ तयांचा दंडें फोडिला वीणा ॥ मृदंग टाळ
वंश जाणा ॥ चूर्ण केलें तयांचें ॥ ५० ॥ ते पळोनि मिळाले एके स्थळीं ॥ ह्मणती यासी तों झडपणी झाली ॥ पुत्रें करणी बरवी

केली ॥ तो राग काढिला आह्मांवरी ॥ ५१ ॥ तों पुढें चालिला सकोप ॥ द्वारीं पाहिला दिव्य मंडप ॥ कनकपात्रीं पंचविध दीप ॥ ओंवाळूं आल्या सुवासिनी ॥ ५२ ॥ चंपककुसुमगौर वनिता ॥ हरिद्राकुंकुमचर्चिता ॥ त्या दुष्टबुद्धीतें ओंवाळितां ॥ सक्रोध पुसे तयांतें ॥ ५३ ॥ कासयाचा पुत्रें उत्साह केला ॥ अलभ्य काय लाभ झाला ॥ ऐकोनियां प्रधानबोला ॥ काय बोलती सुवासिनी ॥ ५४ ॥ मृगलोचना बोलती वचन ॥ तेणें सर्व कुळ केलें पावन ॥ चंद्रहास जामात जोडोन ॥ पुनीत केलें वडिलांतें ॥ ५५ ॥ एकोनि बोले प्रधान ॥ काय भ्रांत झाला मदन ॥ किती तरी वेंचिलें धन ॥ तें मजलागीं सांगावें ॥ ५६ ॥ सुस्मित बोलती वनिता ॥ ऐसें कां बोलतां जी ताता ॥ तयानें दिधली विषया दुहिता ॥ जामात जोडला चंद्रहास ॥ ५७ ॥ रामें कनकपुर रावणा ॥ मारोनि दिधलें बिभीषणा ॥ तेथें भांडारगृहाची विचारणा ॥ दिल्हें न दिल्हें कोण करी ॥ ५८ ॥ तेवीं विषयेऐसें कन्यारत्न ॥ दिधलें आतां पुसतां धन ॥ दक्षिणेवांचोनि कन्यादान ॥ मूर्खही न देती निर्धारें ॥ ५९ ॥ ऐकतां कोपला प्रधान ॥ ह्मणे मतिभ्रष्ट झाला कीं मदन ॥ किंवा पत्रार्थ चुकला पूर्ण ॥ कीं पत्रचि न पाहिलें ॥ ६० ॥ मग कामिनींचा धिक्कार करून ॥ पुढें चालिला तो प्रधान ॥ तों वधूवरें देखिलीं सुलक्षण ॥ पल्लवीं ग्रंथी दिधल्या ॥ ६१ ॥ कुंकुमहरिद्रालेपन ॥ सर्वांगीं लाविलें चंदन ॥ शिरीं पुष्पें शोभायमान ॥ करीं कंकणें शोभती ॥ ६२ ॥ किंवा तीं लक्ष्मीनारायण ॥ किंवा भवानीशंकर सुलक्षण ॥ तद्रूप वधूवरां देखोन ॥ क्रोधें तप्त तो झाला ॥ ६३ ॥ क्रोधें झाले आरक्त नयन ॥ जेवीं घृतें शिंपिला हुताशन ॥ तेवीं क्रोधयुक्त प्रधान ॥ सप्तमद्वारीं पैं आला ॥ ६४ ॥ तों तेथें विवेक द्वारपाळ ॥ हातीं भक्तियष्टिका सोज्ज्वळ ॥ तयाचें नमन नेघे खळ ॥ क्रोधांधा विवेक कासया ॥ ६५ ॥ वधूवरां देखिलें नयनीं ॥ सर्वांगीं पेटला क्रोधाग्नि ॥ घर्म कंप आला त्यालागूनि ॥ सुकोनि गेले ओष्ठ ते ॥ ६६ ॥ तों सपत्नीक चंद्रहास ॥ नमस्कारीत श्वशुरास ॥ तों कांहीं संतोष न वाटे त्यास ॥ निजशत्रु ह्मणोनियां ॥ ६७ ॥ जेवीं बाळमृगा देखोन ॥ व्याघ्र न पावे समाधान ॥ कीं मंजुळ शुकवाणी ऐकून ॥ मार्जार धांवे भक्षावया ॥ ६८ ॥ गारोडियें विषदंत करोनि भंग ॥ पेटारींत घातला भुजंग ॥ त्याचा कांहीं क्रोधतरंग ॥ न चले तैसा तो झाला ॥ ६९ ॥ तों धांवोनि आला मदन ॥ तेणें वंदिले पितृचरण ॥ तयासी दुष्ट प्रधान ॥ काय वचन बोलत ॥ ७० ॥ हे दुरात्मिया काय केलें ॥ माझें मन कीं पोळविलें ॥ त्यातें नानापरी निर्भर्त्सिलें ॥ मग पुत्र बोले तयासी ॥ ७१ ॥ ह्मणे तुमचें पत्र वाचिलें ॥ सर्वार्थातें विलोकिलें ॥ मग भगिनीतें समर्पिलें ॥ चंद्रहासाकारणें ॥ ७२ ॥ अनेक वस्त्रें हिरण्य धन ॥ महिषी गजाश्व रथ गोदान ॥ दासी दास केले समर्पण ॥ देश ग्राम दिधले ॥ ७३ ॥ मणि मुक्ताफळें म्यां समर्पिलीं ॥ नाना अलंकारभूषणें वाहिलीं ॥ सर्व भांडारें रिक्त केलीं ॥ पाहोनि मग क्रोध करावा ॥ ७४ ॥ नाना देशींचे ब्राह्मण ॥ द्रव्यें केलें कुबेरासमान ॥ तुमच्या नांवासारखें केलें लग्न ॥ कां राग वृथा करितां जी ॥ ७५ ॥ आधींच क्रोधाग्नि पेटला ॥ त्यामाजी कर्पूर

टाकिला ॥ आणि घृततैलघटें शिंपिला ॥ तेवीं झाला दुष्टबुद्धि ॥ ७६ ॥ ऐकोनि बोले कटकटा ॥ हस्तें पिटीत ललाटा ॥ तूं कीटक आलासी माझिया पोटा ॥ ह्मणोनि रागें कांपत ॥ ७७ ॥ आतां तूं सेवीं दारुण वन ॥ नातरी करीं भिक्षाटन ॥ प्रावरण करूनि कृष्णाजिन ॥ दंड हातीं घेईं रे ॥ ७८ ॥ पित्याप्रति बोले मदन ॥ आश्चर्य काय वनाभिगमन ॥ पितृवाक्यें रघुनंदन ॥ वनवासा तो गेला ॥ ७९ ॥ वनासी गेला दाशरथि ॥ त्याची अद्यापि गाजे कीर्ति ॥ तैसा मी जाईन वनाप्रति ॥ आज्ञा करितां आपण ॥ ८० ॥ पितृवचन वंदोनि शिरीं ॥ भीष्म झाला ब्रह्मचारी ॥ तेणें कामसुखाचा दैन्यगिरी ॥ वैराग्यवज्रें खंडिला ॥ ८१ ॥ पुरूनें आपुलें तरुणपण ॥ पितयासी दिधलें संपूर्ण ॥ तयाऐसें वनाभिगमन ॥ नव्हे कठिण जी ताता ॥ ८२ ॥ परी काय माझा अन्याय झाला ॥ म्यां काय विवाह हीन केला ॥ ह्मणोनि स्वामीस कोप आला ॥ तरी आणिक देतों धनवस्त्रें ॥ ८३ ॥ एक मजला अन्याय घडला ॥ सपत्नीक कुलिंद न पाचारिला ॥ आतां जावोनि चंदनावतीला ॥ मीं त्यासी प्रार्थोनि आणितों ॥ ८४ ॥ आपण पत्र लिहिलें तांतडी ॥ न पहावी काळ वेळ परवडी ॥ जवळींच निघाली लग्नघडी ॥ ह्मणोनि अंतर पडिलेंसे ॥ ८५ ॥ पत्राप्रमाणें लग्न केलें ॥ यथाशक्ति धनधान्य वेंचिलें ॥ सकळ विश्व आनंदविलें ॥ तुमचें वैभव वेंचोनि ॥ ८६ ॥ येरू बोले सक्रोध उत्तर ॥ कोठें माझें तें आणीं रे पत्र ॥ बरवें ह्मणोनि सुपुत्र ॥ दिधलें पत्र पितृकरीं ॥ ८७ ॥ तेणें पत्र वाचोनि पाहिलें ॥ ह्मणे ब्रह्मलिखित घडोनि आलें ॥ माझें कपाळ असे फिरलें ॥ ह्मणोनि झालें विपरीत ॥ ८८ ॥ जें होऊं नये तें झालें ॥ व्यर्थ पुत्रा निर्भर्त्सिलें ॥ जामातसर्पासी पाजिलें ॥ कन्याक्षीर हें माझें ॥ ८९ ॥ मी तों बुद्धीचा सागर ॥ आणिक विचारीन घात थोर ॥ सर्वोपायें कुलिंदकुमर ॥ निश्चयेंसीं मारीन ॥ ९० ॥ ह्मणोनि क्रोधाग्नि विझविला ॥ संतोषें बोले मदनाला ॥ म्यां तुझा चित्ताशय पाहिला ॥ परी तूं क्षमाशील सुपुत्रा ॥ ९१ ॥ मग दंभाचार धरोनि ॥ गौरविलें जामाताला गोनि ॥ मदनासी ह्मणे विवाहकरणी ॥ परम पवित्र केली तुवां ॥ ९२ ॥ पत्रीं लिहोनि गूढार्थ ॥ शीघ्र पाठविला कुलिंदसुत ॥ दैवें झालें विवाहकृत्य ॥ सर्वथा नव्हे मी कर्ता ॥ ९३ ॥ स्वपुत्रातें समजाविलें ॥ वस्त्राभरणीं गौरविलें ॥ चतुर्थ दिनातें संपादिलें ॥ पूर्ण झालें विवाहकृत्य ॥ ९४ ॥ अनंत विश्वांचा मायबाप ॥ त्या हरीचा सत्यसंकल्प ॥ अन्यथा करील पापरूप ॥ ऐसा कोण असे त्रिभुवनीं ॥ ९५ ॥ श्रीनारायणाचे कृपाबळें ॥ तेणें सिद्धीसी लग्न नेलें ॥ सकळ विश्व आनंदलें ॥ एका दुष्टबुद्धीवांचोनि ॥ ९६ ॥ यावरी मरणोपाय चंद्रहासा ॥ दुष्टबुद्धि योजील कैसा ॥ तें पुढिले प्रसंगीं कथारसा ॥ बोलणें आहे सावध ॥ ९७ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेधगंगा ॥ श्रवणें पातकें जाती भंगा ॥ दर्शन करवील आत्मलिंगा ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ९८ ॥ इति श्रीमहाभा० जैमिनिकृते आश्वमे० चंद्रहासाख्यानं नाम सप्तपंचाशत्तमोध्यायः ॥ ५७ ॥ अध्याय ॥ ५७ ॥ ओव्या ॥ ९८ ॥ श्रीकृष्णा०

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ श्रीकृष्णचरणारविंदमिलिंद ॥ पार्थाप्रति बोले नारद ॥ अभिनवलीला गोविंद ॥ कैसा खेळ दाखविला ॥ १ ॥ मग तो दुष्टबुद्धि चिंतावला ॥ मनामाजी विचार केला ॥ म्यां तों लिहिलें या शत्रूला ॥ विष द्यावें ह्मणोनि ॥ २ ॥ त्या अर्थाचा झाला अनर्थ ॥ दैवें घडलें विपरीत ॥ रिपु झाला कीं जामात ॥ यावरी कैसें करावें ॥ ३ ॥ मजसारिखे पुत्र न झाले ॥ केवळ कुळांगार जन्मले ॥ विशेष जामाताभरीं भरले ॥ निजहित नाठवती ॥ ४ ॥ आतां कोणता उपाय करूं ॥ कवणें उपायें यास मारूं ॥ आतां कैसा धीर धरूं ॥ शत्रु सबळ झाला कीं ॥ ५ ॥ विषया विधवा होऊ निश्चित ॥ परी मी मारीन जामात ॥ असत्य करीन मुनिभाषित ॥ निजबुद्धीचे वैभवें ॥ ६ ॥ नारद ह्मणे पार्थालागून ॥ पहा प्रधान कुलक्षण ॥ आपल्या नासिकातें छेदून ॥ वैरिया अपशकुन दावित ॥७॥ कैसें त्याचें मनोगत ॥ विचारिला आत्मघात ॥ परघातें संतोषत ॥ अद्भुत महिमा मोहाचा ॥ ८ ॥ अग्निमहिमा नेणे पतंग ॥ दग्ध करी आपुलें अंग ॥ मत्स्य गळासी मांसतरंग ॥ देखोनियां झोंबतो ॥ ९ ॥ परी त्या दोघांसी नसे ज्ञान ॥ नसे वेदशास्त्रपठन ॥ स्वजाती न सांगे हितवचन ॥ ह्मणोनि अन्याय नसे त्यांचा ॥ १० ॥ त्याचि परी हा मूर्ख जाण ॥ करूनि वेदशास्त्रश्रवण ॥ स्वप्रचीत विप्रवाक्य प्रमाण ॥ असतां अनर्थीं पडतो हा ॥ ११ ॥ प्रत्यक्ष विषाचें झालें अमृत ॥ जो शत्रु तो झाला जामात ॥ ऐसी लीला करी भगवंत ॥ जाणोनि मोहें भुलला ॥ १२ ॥ कन्या विधवा होऊ निश्चित ॥ परी मी मारीन जामात ॥ ऐसा दृढ केला निश्चितार्थ ॥ मग पाचारिलें चांडाळां ॥ १३ ॥ एकांतीं त्यांतें पाचारून ॥ तयांप्रति बोले वचन ॥ ह्मणे तुह्मीं चंडीदेवाल्यीं जाऊन ॥ माझी आज्ञा करावी ॥ १४ ॥ नगराबाहेर चंडिकास्थान ॥ तेथें असावें सावधान ॥ हातीं खड्ग घेऊन ॥ दोहीं कोणीं दडावें ॥ १५ ॥ संध्याकाळीं साचार ॥ तेथें पूजा घेऊनि येईल जो नर ॥ तुह्मीं न करितां विचार ॥ शिर त्याचें छेदावें ॥ १६ ॥ जैसें पूर्वीं मजला ठकविलें ॥ तैसें आतां न करा वहिलें ॥ अर्ध वैभव देईन आपुलें ॥ वाहातों आण मदनाची ॥ १७ ॥ ऐकोनियां ऐसा बोल ॥ परम संतोषले चांडाळ ॥ गुप्त जाऊनि चंडिकास्थळ ॥ तृतीय प्रहरीं सेविलें ॥ १८ ॥ तो दुष्टबुद्धीचा सागर ॥ चंद्रहासा बोले उत्तर ॥ तें ऐकावें सादर ॥ नारद ह्मणे पार्थासी ॥ १९ ॥ चंद्रहासा तूं जामात ॥ परिसें एक माझी मात ॥ माझा कुळधर्म त्वरित ॥ तुह्मीं करावा जावोनि ॥ २० ॥ विवाह झालियानंतर ॥ चंडिकेसी करावा नमस्कार ॥ करावा पूजापुरस्कार ॥ एकटेंचि जाऊनि ॥ २१ ॥ तरी संध्याकाळीं संध्या करून ॥ घेवोनि गंधाक्षताचंदन ॥ एकाकी करावें गमन ॥ नगराबाह्य वनप्रदेशीं ॥ २२ ॥ सद्भावें करावें पूजन ॥ निश्चळ मनेंसीं ध्यान ॥ तेणें होईल संतान ॥ ऐसी आमुची कुळोत्पत्ति ॥ २३ ॥ ऐकोनियां श्वशुरवचन ॥ चंद्रहास पावला समाधान ॥ ह्मणे आज्ञा मज प्रमाण ॥ ऐसा निष्कपट तो हरिभक्त ॥ २४ ॥ ज्याचे मनीं दैव-

१ कुळाला लांच्छन लावणारे. २ आपला अनुभव. ३ देवीच्या देवळांत. ४ खरोखर. ५ एकत्र्यानेंच. ६ श्रीकृष्ण भगवान्.

कीतनय ॥ तो कळिकाळापासोनि निर्भय ॥ त्यासी चांडाळ करितील काय ॥ वंदी पाय यम त्याचे ॥ २५ ॥ भक्तिकवच निर्मळ ॥ सबाह्याभ्यंतरीं तमाळनीळ ॥ त्यासी न बाधी काळ वेळ ॥ टळेल अनर्थ भलतेपरी ॥ २६ ॥ मनीं निर्मत्सर कुलिंदपुत्र ॥ संध्यावंदन करोनि पवित्र ॥ हातीं घेवोनि पूजापात्र ॥ श्रीहरि स्मरोनि चालिला ॥ २७ ॥ असो तेथें झालें कौतुक ॥ कुंतलाधीशें पाचारिला गालवादिक ॥ तयाप्रति निवेदी तात्काळिक ॥ आपुलें अरिष्ट तेधवां ॥ २८ ॥ भूप ह्मणे जी गालवमुनि ॥ अरिष्टें उदेलीं मजलागूनि ॥ तीं सावधान ऐकोनि ॥ विचार त्यांचा मज सांगा ॥ २९ ॥ भूलोकीं राज्य करितां ॥ मज न वाटे सुखवार्ता ॥ माझे देहाची अवस्था ॥ पुढें दुस्तर वाटते ॥ ३० ॥ मज भासे निःसंशय ॥ माझा आला अंतसमय ॥ मज सांगा जी उपाय ॥ तेणें सुख पावेन ॥ ३१ ॥ मज सांगा जी अरिष्टाध्याय ॥ मी करीन त्याचा उपाय ॥ मग सहजचि होईन निर्भय ॥ तुमचे पाय चिंतितां ॥ ३२ ॥ रायासी बोले गालवमुनि ॥ दत्तात्रेयें योजिलें ध्यानीं ॥ सांगितलें ऋषींलागोनि ॥ तेंचि तुह्मांस सांगतों ॥ ३३ ॥ मृत्यूतें सुचविती स्पष्टें ॥ ऐसीं अनंत देहारिष्टें ॥ त्यांमाजी जीं वरिष्ठें ॥ तींच स्पष्ट सांगेन ॥ ३४ ॥ देवमार्ग[1] ध्रुव आणि शुक्र ॥ छाया अरुंधती आणि चंद्र ॥ हे पाहातां नव्हती गोचर ॥ वर्षायु तो जाणावा ॥ ३५ ॥ सूर्य चंद्र आणि ज्वलन[3] ॥ यांचे जयासी न दिसती किरण ॥ त्याचें आयुष्य उरलें पूर्ण ॥ अकरा मासपर्यंत ॥ ३६ ॥ वांति मूत्र आणि पुरीष ॥ हें सुवर्ण रौप्य दिसे ज्यास ॥ स्वप्नीं किंवा जागृतीस ॥ तया मास दहा वांचणें ॥ ३७ ॥ प्रेतें पिशाचें गंधर्वनगरें ॥ हीं नित्य होती सामोरें ॥ वृक्ष दिसती सुवर्णाकारें ॥ तो नव मास वांचेल ॥ ३८ ॥ कृश स्थूळ स्थूळ कृश ॥ अकस्मात वाटे ज्यास ॥ स्वभाव होय विनाश ॥ तो अष्ट मास वांचे कीं ॥ ३९ ॥ धुळींत किंवा कर्दमीं[4] जाण ॥ जयाचा अर्ध उमटे चरण ॥ पूर्वापर होय विलक्षण ॥ तो सप्त मास न वांचे ॥ ४० ॥ गृध्र[5] काक[6] अथवा कपोत ॥ काद्रवेय[7] अथवा उलूक[8] ॥ स्पर्शे कपाळ अथवा मस्तक ॥ तो नर षण्मास न वांचे पैं ॥ ४१ ॥ धुळी वर्षे किंवा काकपंक्ती ॥ पाठी लागोनि नरा न सोडिती ॥ तो नर पांच मासांअंतीं ॥ मरेल ऐसें जाणावें ॥४२॥ अभ्र नसतां आकाशीं ॥ जो पाहे विद्युल्लतेसी ॥ तीन मासांतरें त्यासी ॥ मरण होय निर्धारें ॥ ४३ ॥ जो निरभ्रीं विद्युल्लता ॥ दक्षिणेस पाहे तत्वतां ॥ तो नर दोन मासांतां ॥ पावेल मरण जाणावें ॥ ४४ ॥ जळामाजी इंद्रधनुष्य ॥ अकस्मात पाहे पुरुष ॥ त्याचें एक मासचि आयुष्य ॥ उरलें ऐसें जाणावें ॥ ४५ ॥ घृतीं तैलीं जळीं दर्पणीं ॥ अशिर[9] तनु देखे नयनीं ॥ तो नर पक्षार्ध वांचोनि ॥ मरण पावे निर्धारें ॥ ४६ ॥ अजागंध अथवा शवगंध ॥ जयाचे देहीं उमटे दुर्गंध ॥ तो पक्षार्ध वांचोनि मतिमंद ॥ मरणातें पावेल ॥ ४७ ॥ स्नान करितां वक्षःस्थळ ॥ प्राशन करितां शेषजळ ॥ ज्याचें शुष्क होय तात्काळ ॥ तो नर वांचे दश दिन ॥ ४८ ॥ रीस वानरीं बैसोन ॥ पाहे जो दक्षिणेचें

१ चंद्रहास. २ आकाशगंगा. ३ अग्नि. ४ चिखलांत. ५ गिधाड. ६ कावळा. ७ सर्प. ८ घुबड. ९ मस्तकवांचून.

गमन ॥ ऐसें जो देखे स्वप्न ॥ तया मृत्यु तात्काळ ॥ ४९ ॥ रक्तकाषायांबरधरा ॥ हांसत गातसे सुंदरा ॥ करीं धरोनि दक्षिणे नरा ॥ नेतसे स्वप्नीं तो न वांचे ॥ ५० ॥ नग्न वेडेंसें हास्यवदन ॥ नानापरींचें करी भाषण ॥ स्वप्नीं देखे ऐसें विंदान ॥ तोही नर न वांचे ॥ ५१ ॥ पादादि मस्तकपर्यंत ॥ पंकामाजी बुडाला निश्चित ॥ स्वप्नीं आपणास ऐसें देखत ॥ तात्काळ मरण तयासी ॥ ५२ ॥ अग्नि केश आणि अंगार ॥ त्यांसहित भक्षी कॅलेवर[1] ॥ ऐसें स्वप्न जया दुर्धर ॥ पाहतां तो नर न वांचे ॥ ५३ ॥ कराळ विकटास्य कृष्ण ॥ ऐसे पुरुष मारिती शस्त्रेंकरून ॥ तैसेंचि स्वप्नीं मारिती पाषाण ॥ तोही नर न वांचे ॥ ५४ ॥ परनेत्रींचे बुबुळीं शरीर ॥ जयासी नव्हे[2] गोचर ॥ जागृतीं ऐसें पाहे नर ॥ तो मरण पावे निश्चयें ॥ ५५ ॥ आपुले कर्ण हस्तें झांकून ॥ तो कर्णघोष नायके जाण ॥ मस्तकीं यूका[3] पडती पूर्ण ॥ पंचम दिनीं तो मरे ॥ ५६ ॥ जो देववृंदाचें[4] न करी पूजन ॥ गुरुनिंदा करीत पूर्ण ॥ मातापित्यांचा करी अपमान ॥ करी जामाताचा सत्कार ॥ ५७ ॥ योगी ज्ञानी आणि पंडित ॥ जे वडील पूज्य समर्थ ॥ इतुकियांचा अपमान करी निश्चित ॥ तो नर अल्पायुषी जाणिजे ॥५८॥ जो नृपाश्रयेंकरून ॥ भंगीत देवविप्रसदन ॥ जो सुखासनीं करीत ध्यान ॥ तयासी विघ्न जे करिती ॥ ५९ ॥ ज्ञानवंता करीत विघ्न ॥ योगियाचें करिती विदारण ॥ द्विजाचें करिती उत्थापन ॥ तेचि जाणावे अल्पायुषी ॥ ६० ॥ ऐसें जाणोनि दुश्चिन्ह ॥ नरें व्हावें सावधान ॥ वेगें करावें आत्मचिंतन ॥ वैराग्यें करोनियां ॥ ६१ ॥ निःसंग निराहार जितक्रोध ॥ जितेंद्रिय आणि चित्त शुद्ध ॥ विषयत्यागें आत्मबोध ॥ साधनचतुष्टयेंकरोनि ॥ ६२ ॥ चित्त करावें तदाकार ॥ जैसें जळीं सैंधव टाकितां सत्वर ॥ तें समरसें एकाकार ॥ ऐसें ऐक्य करावें ब्रह्मीं ॥ ६३ ॥ ऐसा ऐकोनि अरिष्टाध्याय ॥ रायासी झाला वैराग्योदय ॥ राजयाचा निश्चय ॥ राज्यत्यागीं जाहला ॥ ६४ ॥ मग ह्मणे गालवमुनीसी ॥ मी आतां न करीं राज्यासी ॥ शीघ्र जावोनि तपासी ॥ आत्महित साधीन ॥६५॥ तरी धनी करूनि राज्यासी ॥ मग गमन करीन तपासी ॥ ऋषि ह्मणे ऐक निश्चयेंसीं ॥ चंद्रहास करीं जामात ॥ ६६ ॥ तयासी आपुली कन्या देऊन ॥ मग तूं तपासी करीं गमन ॥ रायें मान्य करूनि वचन ॥ मदनालागीं पाचारिलें[5] ॥ ६७ ॥ शिरीं वंदोनि नृपचरण ॥ मग बोलता झाला मदन ॥ काय आज्ञा मज कारण ॥ नृपवरें सांगावी जी ॥ ६८ ॥ राजा ह्मणे सत्वर ॥ चंद्रहास आणावा वर ॥ चंपकमालिनी उपवर ॥ तयालागीं द्यावी आतां ॥ ६९ ॥ ऐसी राजाज्ञा होतां जाण ॥ सत्वर धांवला मदन ॥ तों इकडे चंद्रहास पूजा घेऊन ॥ निघाला चंडिकेचे पूजेसी ॥ ७० ॥ तों दिनकर[6] पावला अस्तमान ॥ चंद्रहासें केलें मंगलस्नान ॥ तयासी पुसे मदन ॥ कोठें गमन योजिलें ॥ ७१ ॥ तेणें समूळ श्वशुरवचन ॥ सांगितलें मदनाकारण ॥ कुळधर्म तुमचा जाण ॥ मजलागीं निवेदिला ॥ ७२ ॥ येरू ह्मणे नृप कुंतलेश ॥ उत्कंठित तुमच्या दर्शनास ॥ ह्मणे

१ शरीर. २ दिसत नाहीं. ३ उवा. ४ देवसमुदायाचें. ५ बोलाविलें. ६ सूर्य.

शीघ्र आणा चंद्रहासास ॥ विष्णुभक्त धर्मिष्ठ जो ॥ ७३ ॥ तरी तुह्मीं घ्यावें राजदर्शन ॥ मी करावया जातों चंडिकापूजन ॥ कांहीं न करावा अनुमान ॥ सत्वर गमन करावें ॥७४॥ स्वयें अश्वावरूनि उतरला ॥ सत्वर बैसविलें तयाला ॥ दिधलें अमित भृत्यांला ॥ राजचिह्नित तेधवां ॥ ७५ ॥ तोचि अश्व तेचि दूत ॥ घेवोनि चालिला कुलिंदसुत ॥ परमानंदेंसीं त्वरित ॥ राजभवन पावला ॥७६॥ येरीकडे पूजापात्र ॥ घेवोनि चालिला प्रधानपुत्र ॥ अति लाघवी तो कमलावर ॥ न कळे चरित्र तयाचें ॥ ७७ ॥ अघटित घडवी कर्मचतुर ॥ तयाचें न कळे ब्रह्मसूत्र ॥ ज्याचा संकल्पसेतु पवित्र ॥ भेदूं न शके [२]विरंचि ॥ ७८ ॥ त्वरें जावोनि चंद्रहास ॥ भावें वंदिला कुंतलेश ॥ तेणें देखोनि हरिभक्तास ॥ आनंदला अंतरीं ॥७९॥ राजा ह्मणे गालवास ॥ विष्णुभक्त हा चंद्रहास ॥ आजी ऐसिया सत्पात्रास ॥ कन्यादान मी अर्पीन ॥ ८० ॥ ऋषि ह्मणे कुंतलेशा ॥ हेंचि प्रिय करीं रमेशा ॥ हा सद्बुद्धि योग्य ईशा ॥ राज्यभाराकारणें ॥ ८१ ॥ मग चंद्रहासाची पूजा करूनि ॥ समर्पिली चंपकमालिनी ॥ सर्व राज्य दान देवोनि ॥ चतुरंग सैन्य दिधलें ॥ ८२ ॥ त्याग केला [३]वसनांचा ॥ राव नग्न झाला साचा ॥ आश्रय केला जगदीशाचा ॥ राव चालिला तपोवना ॥ ८३ ॥ सर्वसंगनिर्मुक्त ॥ कुंतलेश झाला त्वरित ॥ योगसिद्धि पावोनि निश्चित ॥ झाला [४]कैवल्या अधिकारी ॥ ८४ ॥ सत्य लोकीं जे जे विषय ॥ ते ते भासले वमनप्राय ॥ निर्वासन करूनि हृदय ॥ झाला ब्रह्ममय निर्धारें ॥८५॥ सकळ देखे चराचर ॥ गुणमय पाशें बद्ध समग्र ॥ अगाध अविद्यासागर ॥ तयामाजी बुडताती ॥८६॥ स्त्री पुत्र बंधु गृह धन ॥ हेचि जलग्राह दारुण ॥ हे तयातें नेती ओढून ॥ दुःखें आक्रंदन करीतसे ॥८७॥ अज्ञानपंकीं जे बुडाले ॥ ते विषयजलचरें तोडिले ॥ [५]मोहगर्तेमाजी पडिले ॥ विवेकांगें भंगोनियां ॥८८॥ तयांचा करावया उद्धार ॥ कोणी न धांवे समोर ॥ ऐसें दुःखमय चराचर ॥ देखत राजा योगबळें ॥८९॥ देखे चराचर सर्व बद्ध ॥ मी एक त्यामाजी भाग्यबद्ध ॥ ऐसा तयासी झाला बोध ॥ योगबळेंकरूनियां ॥ ९० ॥ सर्व बद्ध मी एक मुक्त ॥ हाही ज्ञानाभिमान निश्चित ॥ तरी याचाही योगबळें घात ॥ आत्मरूपार्थ साधिल्या ॥९१॥ मग साधोनि ज्ञानाभ्यास ॥ निरसुनियां मायाविलास ॥ नृप पावला कैवल्यसुखास ॥ जेथें नसे जन्ममरण ॥ ९२ ॥ जेवीं सागरीं मिळे [६]लवण ॥ तेवीं झालें ऐक्यपण ॥ तैसा राजा पावोनि विज्ञान ॥ ब्रह्मसदनीं नांदत ॥ ९३ ॥ मग गालवें तो चंद्रहास ॥ अभिषेकोनि केला राज्याधीश ॥ मग चंपकमालिनी तयास ॥ यथासांग दिधली ॥ ९४ ॥ ऐशापरी कुलिंदनंदन ॥ पावला स्त्री राज्य धन ॥ तों येरीकडे अनुसंधान ॥ काय झालें तें ऐकावें ॥ ९५ ॥ पूजापात्र घेवोनि मदन ॥ गेला करावया चंडिकापूजन ॥ तों मार्गीं झाले अपशकुन ॥ तेही पार्था ऐकावे ॥ ९६ ॥ शिरीं बैसला [७]उलूक येऊन ॥ पूजापात्र झालें पतन ॥ उगेच मुखनयनांतून ॥ रक्तप्रवाह सूटले ॥ ९७ ॥ दोघे भांडती मार्जार ॥ तें देखे अमात्य-



१ सेवकांना. २ ब्रह्मदेव. ३ वस्त्रांचा. ४ मोक्षाला. ५ मोहरूपी खाड्यांत. ६ मीठ. ७ घुबड.

पुत्र ॥ पुढें मार्ग रोधिला सत्वर ॥ कृष्णसर्पें तयाचा ॥ ९८ ॥ ऐसे देखोनि अपशकुन ॥ काय बोले तो मदन ॥ चंद्रहासास असो कल्याण ॥ जो जामात जनकाचा ॥ ९९ ॥ ऐसें बोलोनि ते वेळां ॥ शीघ्र चंडिकालयीं पावला ॥ अधोवदनें प्रवेशला ॥ तों भाळीं झाला द्वारघात ॥ १०० ॥ तेणें शब्द झाला दारुण ॥ तों चांडाळ झाले सावधान ॥ एकमेकांतें खुणावून ॥ ह्मणती आला अल्पायुषी ॥ १ ॥ सुवेष सुंदर मदन ॥ करितांचि चंडिकापूजन ॥ तया देखोनि पशुघ्नं[१] ॥ तांतडीनें धांवले ॥ २ ॥ असिलता[२] घेऊनि करीं ॥ घालिती मदनाचे अंगावरी ॥ मग तो मदन प्रार्थना करी ॥ भयभीत चंडिकेची ॥ ३ ॥ ऐकें चंडिके ममोत्तर ॥ मी तों नव्हे महिषासुर ॥ नव्हे शुंभ निशुंभ असुर ॥ आणि रक्तबीज नव्हे मी ॥ ४ ॥ मी तों आलों पूजनासी ॥ तूं कां माझा घात करिसी ॥ माझी विनंति परियेसीं ॥ जिविंत न मागें तुजपासीं ॥ ५ ॥ महिषासुरकंठीं चरण ॥ देवोनि वधिला त्यालागून ॥ तैसेंच मज वधोन ॥ मुक्तिसदन देइंजे ॥ ६ ॥ बाहुद्वयशिरोरत्न ॥ चंद्रहासासी समर्पीन ॥ हें तों माझें पूर्ववचन ॥ सत्य झालें साक्षी तूं ॥ ७ ॥ ऐसें बोलोन वचन ॥ मुखें करीत हरिस्मरण ॥ चंडिकेपुढें प्राणार्पण ॥ करिता झाला आनंदें ॥ ८ ॥ ऐसें ऐकोन चांडाळ ॥ भयें झाले व्याकुळ ॥ आतां होईल जनकोलाहल ॥ ह्मणोन तेथोन पळाले ॥ ९ ॥ याकारणें सुभद्रापति[३] ॥ जे पराचें दुष्ट चिंतिती ॥ तेचि आपला घात पावती ॥ या दुष्टबुद्धीचियापरी ॥ ११० ॥ जे जे अनिष्ट चिंतिती पूर्ण ॥ तेंचि तयांचें अकल्याण ॥ ज्याचा सहाकारी नारायण ॥ त्याचें पाॅमर काय करिती ॥ ११ ॥ आकाश करीन मी काळें ॥ ह्मणे तोचि माखेल काजळें ॥ तेवीं दुजया अरिष्ट[४] चिंतिलें ॥ तों त्या अरिष्टें वारिलें त्यासी ॥ १२ ॥ ह्मणोनि सकळांचें कल्याण ॥ होय तें चिंतावें जाण ॥ त्यांत हरिभक्तासी शरण ॥ अनन्यभावें असावें ॥ १३ ॥ मी असत्य करीन द्विजवचन ॥ ह्मणोनि केले नाना प्रयत्न ॥ परी सत्यसंकल्प करावया अप्रमाण ॥ ऐसा कोण समर्थ असे ॥ १४ ॥ आधीं चुकविलें चांडाळमरण ॥ दुजें चुकविलें विषपान ॥ विषयेऐसें कन्यारत्न ॥ प्राप्त झालें अनायासें ॥ १५ ॥ तृतीयें मरणातें पाठविला ॥ तो मार्गींच स्त्री आणि राज्य पावला ॥ ऐसी हरीची अभिनव लीला ॥ वांचविला निजभक्त ॥ १६ ॥ आतां हरिभक्त चंद्रहास ॥ स्वभक्तीनें उठवील मदनास ॥ ते पुढिले अध्यायीं कथा सुरस ॥ सावधान ऐकावी ॥ १७ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ११८ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके चंद्रहासाख्यानं नाम अष्टपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५८ ॥ ॥ अध्याय ॥ ५८ ॥ ओव्या ॥ ११८ ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

१ चांडाळ. २ तरवार. ३ अर्जुना. ४ दुष्ट.

# अध्याय ५९.


चंद्रहास व चंपकमालिनी
यांची वरात.
देवी.
चंद्रहास आपलें
शिर कापीत आहे.
चंद्रहास कुलिंदराजास
(पित्यास) भेटतो.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ पार्थासी ह्मणे ब्रह्मनंदन[1] ॥ ऐकें पुढील कथानुसंधान ॥ मरण पावलिया तो मदन ॥ काय वर्तलें त्या नगरीं ॥ १ ॥ चंद्रहास तें राज्य पावोनि ॥ स्त्री घेऊनि आला चंपकमालिनी ॥ शुभ्र गजावरी बैसोनि ॥ रात्रौ चालिला उत्साहें ॥ २ ॥ दुष्टबुद्धीसी करावया नमस्कार ॥ त्वरें चालिला कुलिंदकुमर ॥ नाना वाद्यांचा करीत गजर ॥ ह्मणे मदनही भेटेल ॥ ३ ॥ सेवक वेगें धांवत ॥ जावोनि प्रधानातें सांगत ॥ नवा नृप झाला जी तव जामात ॥ या कुंतलापुराचा ॥ ४ ॥ शुभ्र गजावरी बैसोनि ॥ पुढें घेतली चंपकमालिनी ॥ जामात येतो भेटीलागोनि ॥ ऐकतां झाला सक्रोध ॥ ५ ॥ दूतांसी बोले मतिमंद ॥ तुमचा छेदीन रे शिरकंद ॥ काय बोलतां सानंद ॥ अन्य राजा ह्मणोनि ॥ ६ ॥ सकळ नृपकुळदिनकर[2] ॥ जो राजा आमुचा कुंतलेश्वर ॥ त्यावेगळा कोणता खळ निष्ठुर ॥ राव झाला बोलतां ॥ ७ ॥ मग दूत ह्मणती स्वामी ॥ अनृतवादी[3] नव्हेंत आह्मी ॥ प्रत्यक्ष पहा जी तुह्मी ॥ समीप आला कुलिंदपुत्र ॥ ८ ॥ तों शुभ्र गजावरी बैसोनि ॥ चंद्रहास चंपकमालिनी ॥ येतां देखोनि प्रधानें नयनीं ॥ मृतप्राय तो झाला ॥ ९ ॥ तों समीप आला चंद्रहास ॥ गजावरूनि उतरे पुण्यपुरुष ॥ जावोनि वंदी श्वशुरास ॥ आलिंगन दिधलें ॥ १० ॥ मग तयासी पुसे प्रधान ॥ केलें कीं चंडिकापूजन ॥ यथासांग पूजा करून ॥ आलेत कीं तोषोनि ॥ ११ ॥ चंडिकेचे पूजेलागून ॥ मज वाटे न केलें गमन ॥ केलें कुळधर्माचें छेदन ॥ मज ऐसें वाटलें ॥ १२ ॥ येरू ह्मणे पूजा घेऊन ॥ मी जात होतों त्वरेंकरून ॥ तों मार्गीं भेटला मदन ॥ तेणें मज वारिलें ॥ १३ ॥ तुह्मां पाचारितो कुंतलेश ॥ तुह्मीं जावें त्या स्थानास ॥ मी पूजितों चंडिकेश ॥ ऐसें बोलोनि तो गेला ॥ १४ ॥ मग म्यां राजदर्शन घेतलें ॥ तेणें कन्यादान मज दिधलें ॥ सकळ सैन्येंसीं राज्य समर्पिलें ॥ आपण गेला वनासी ॥ १५ ॥ ऐसें ऐकोनियां वचन ॥ आहाशब्दें करी रुदन ॥ ऊर्ध्व हस्त करून ॥ आक्रोश करीत चालिला ॥ १६ ॥ परपतनाकरितां गर्ता[4] ॥ तेथें आपणचि पडे तत्वतां ॥ ह्मणोनियां कोणाच्या घाता ॥ प्रवर्तूं नये कोणींही ॥ १७ ॥ पराचें न चिंती कल्याण ॥ पूतना घ्यावया हरीचा प्राण ॥ तों तिचें होय अकल्याण ॥ जातां आपणचि निमाली[5] ॥ १८ ॥ पडत झडत अंधकारीं ॥ एकटा जातसे निर्धारीं ॥ परम पापी दुराचारी ॥ दुष्टबुद्धि अत्यंत तो ॥ १९ ॥ शंकरापासोनि पावला वर ॥ त्याचेच शिरीं ठेवूं पाहे कर ॥ तो पापी मेला भस्मासुर ॥ ती गत झाली दुष्टासी ॥ २० ॥ तो पापिया धांवत ॥ तंव वायु सुटला अद्भुत ॥ चिताभस्में नेत्र भरत ॥ तया दुष्टबुद्धीचे ॥ २१ ॥ वेताळ कंकाळ[6] भूतगण ॥ तया प्रधानासी देखोन ॥ ह्मणती पापी हा आह्मांहोन ॥ कोण येतो पहा पां ॥ २२ ॥ तों त्यांमाजी प्रेत बोले एक ॥ हा पापी मजहोनि अधिक ॥ म्यां तीन शत हत्या देख ॥ केल्या उत्तम विप्रांच्या ॥ २३ ॥ मजहोनि माझा सहोदर ॥ जो करी परधनापहार ॥ पांचशें जनांचा केला संहार ॥ पथिकांचा निर्धारें ॥ २४ ॥ तंव अन्य प्रेत बोले

१ नारद. २ राजांच्या कुळाला सूर्याप्रमाणें. ३ खोटें बोलणारे. ४ डबका, खांच. ५ मेली. ६ भयंकर.

हांसोन ॥ मजहोनि पापी तो कवण ॥ परी आह्मांसी भय दारुण ॥ हिरण्यकश्यपरिपूचें ॥ २५ ॥ आह्मी दारुण भूतगण ॥ प्राणिमात्रांचा घेऊं प्राण ॥ परी आमचा संहार होय पूर्ण ॥ हरिस्मरण ऐकतां ॥ २६ ॥ तुह्मां आह्मांहूनि अधिक ॥ महापापी हा प्रधान देख ॥ याचे दर्शनें पाप अधिक ॥ ह्मणोनियां ते पळाले ॥ २७ ॥ भगवद्भक्ताचा द्वेष करी ॥ आणि साधूंतें संहारी ॥ तो भूतप्रेतपिशाचांमाझारीं ॥ अति अपवित्र जाणावा ॥ २८ ॥ तों प्रधान शोकातुर ॥ मार्गीं देखोनि अंधकार ॥ जळतीं चिताकाष्ठें सत्वर ॥ करीं घेवोनि चालिला ॥ २९ ॥ वेगीं चिताभवन त्यागोन ॥ तो पावला चंडिकास्थान ॥ तों पुत्र पडिलासे विदारून ॥ छिन्नभिन्न जाहला ॥ ३० ॥ वस्त्र झालें रक्तांबर ॥ भिन्न पडिलें कमळशिर ॥ जो समरांगणीं महाशूर ॥ धर्मिष्ठ तो मदन कीं ॥ ३१ ॥ नेणों पर्वतचि पडिला ॥ कीं देवीप्रसाद तो भंगिला ॥ कीं काश्मीरलिंग तो भंग केला ॥ दुष्ट पाखांडी मिळोनियां ॥ ३२ ॥ कीं मनोरथैशैल खचला ॥ कीं वंशवृक्ष उपडिला ॥ ऐसा पुत्र देखिला ॥ मग रडों लागला प्रधान ॥ ३३ ॥ चिताकाष्ठ टाकोन ॥ पुत्रासी देत आलिंगन ॥ मग दोनी हस्तें उचलोन ॥ काय करीत विलाप ॥ ३४ ॥ ऊठ पुत्रा वाचीं पत्रास ॥ वर पाठविला चंद्रहास ॥ त्यासी वेगीं देईं विषयेस ॥ वस्त्राभरणेंकरूनियां ॥ ३५ ॥ म्यां हृदय करोनि कठिन ॥ तुझें केलें निर्भर्त्सन ॥ परी क्रोधाचा लेश तुजलागोन ॥ आला नसे पुत्रराया ॥ ३६ ॥ ऊठ कां रे निजलासी ॥ नाना देशींचे तपोराशी ॥ ब्राह्मण आले तुजपाशीं ॥ रथाश्वदानें घ्यावया ॥ ३७ ॥ विष्णुभक्त सुशीळ ॥ चंद्रहास तो केवळ ॥ त्याच्या घातें पावलों फळ ॥ पुत्रशोक मज झाला ॥ ३८ ॥ वैष्णवद्रोहकाचें हृदय ॥ अत्यंत असे निर्दय ॥ मी सकळ दुष्टांचें आलय ॥ माझीं कां नव्हती शतखंडें ॥ ३९ ॥ तूं हरिभक्तिपरायण ॥ नित्य करिसी हरिस्मरण ॥ सर्वदा पूजिसी ब्राह्मण ॥ तुज हें दुर्मरण कां झालें ॥ ४० ॥ तव प्रसादें चंद्रहास ॥ झाला कुंतलापुराधीश ॥ तुवां त्यानिमित्त दिधलें जीवास ॥ ऐसा परोपकारी तूं ॥ ४१ ॥ मदना तूं पावलासी मरण ॥ आतां चंद्रहासाचें प्रिय करील कोण ॥ वस्त्राभरणें आणि धन ॥ कोण देईल तयासी ॥ ४२ ॥ तुज देखतां मरण ॥ मी तों सर्वथा न ठेवीं प्राण ॥ हाहाकारें करी रुदन ॥ नानाविलापें तेधवां ॥ ४३ ॥ ऐसा प्रधान पापरूप ॥ नानाप्रकारें करितां विलाप ॥ मग धरूनि पश्चात्ताप ॥ चंडिकेप्रति अनुवादे ॥ ४४ ॥ मदनपुत्र तुझे भजनीं ॥ सावधान निशिदिनीं ॥ त्याचें फळ त्यालागुनी ॥ प्राप्त केलेंस वाटतें ॥ ४५ ॥ तुवां मदनाचा घेतला प्राण ॥ मीही येथेंचि देतों जीवदान ॥ ऐसें बोलोनि वचन ॥ स्तंभीं मस्तक ताडिलें ॥ ४६ ॥ कनकस्तंभा लागतां जाण ॥ मस्तक झालें छिन्नभिन्न ॥ रक्त वाहोनि तेथून ॥ गेला प्राण तयाचा ॥ ४७ ॥ जेथें पडिला होता मदन ॥ तेथेंचि पडिला प्रधान ॥ ऐसें दोघांचें मरण ॥ कळलें नाहीं नगरांत ॥ ४८ ॥ प्रातःकाळ झालिया देख ॥ उगवला दिनेनायक ॥ तेथें पातले पूजक ॥ चंडीपूजन करावया ॥ ४९ ॥

१ नरसिंहाचें. २ स्मशानभूमि. ३ स्फटिकलिंग. ४ मनोरथरूपी पर्वत. ५ गृह, स्थळ. ६ स्वीकारून. ७ बोले. ८ सूर्य.

ते देवालयीं प्रवेशले ॥ तों दोघे मृत्यु पावले ॥ पुढें जावोनि ओळखिले ॥ तों प्रधान आणि तत्पुत्र ॥ ५० ॥ प्रधान आणि मदन ॥ यांचें कोणीं केलें छेदन ॥ अनाथापरी दुर्मरण ॥ यांतें केवीं जाहलें ॥ ५१ ॥ एकदांचि मरण ॥ कैसे पावले दोघेजण ॥ हा तों नूतन रायाचा गुण ॥ झाला ऐसें वाटतें ॥ ५२ ॥ मग ते करीत शोक ॥ त्वरें आले चंडीपूजक ॥ पाहोनियां नरनायक ॥ तयालागीं सांगती ॥ ५३ ॥ ह्मणती नृपवरा चंद्रहासा ॥ थोर अनर्थ झाला परिसा ॥ सहपुत्रेंसीं कैसा ॥ प्रधान मरण पावला ॥ ५४ ॥ जैसें तस्कराचें करिती भेदन ॥ तैसें केलें छिन्नभिन्न ॥ हें कर्म गहन करून ॥ कोणें टाकिलें चंडिकालयीं ॥ ५५ ॥ ऐसा ऐकोनि समाचार ॥ चंद्रहास झाला चिंतातुर ॥ ह्मणे कैसा झाला विचार ॥ कोणें अनर्थ केला हा ॥ ५६ ॥ ही अंतःपुरांत गेली मात ॥ ऐकतांचि झाला वज्रपात ॥ नानापरी आक्रंदत ॥ उर शिर ताडोनि ॥ ५७ ॥ नगरीं झाला हलकल्लोळ[1] ॥ सर्वत्र झाला गदारोळ[2] ॥ अवघे करिती कोल्हाळ ॥ प्रधानपुत्राकारणें ॥ ५८ ॥ एक ह्मणती नवा राजा ॥ याचाचि गुण झाला ओजा[3] ॥ हा पुढें कैसी प्रजा ॥ पाळील आह्मांलागोनि ॥ ५९ ॥ एक ह्मणे दुष्ट चिन्ह सत्य ॥ प्रथमग्रासीं[4] झाला मक्षिकापात ॥ पुढें न विचारावा अनर्थ ॥ अदृष्ट फिरलें सकळांचें ॥ ६० ॥ कुंतलेशासी होता अतिप्रिय ॥ अतिविवेकी प्रधानतनय ॥ कोणें केला दोघांचा क्षय ॥ परमाश्चर्य वाटतें ॥ ६१ ॥ पसरली चहूंकडे मात ॥ सकळ झाले कंपित ॥ मग चंद्रहास दुःखित ॥ एकटाचि चालिला ॥ ६२ ॥ चंडिकालया पावला ॥ वेगें त्यामाजी प्रवेशला ॥ तों सपुत्र प्रधान देखिला ॥ मरण पावले शस्त्रघातें ॥ ६३ ॥ मग वंदोनि चंडिकेसी ॥ ह्मणे कां मारिलें या दोघांसी ॥ आतां घे माझिया अवदानासी[5] ॥ ह्मणोनि सन्मुख बैसला ॥ ६४ ॥ तेथें चतुष्कोण कुंड खणोन ॥ त्यामाजी हुताशन[6] स्थापोन ॥ मांडिलें घोर हवन ॥ तिलाज्य मिश्रित तेधवां ॥ ६५ ॥ मग शरीरमांस छेदून ॥ त्याचें टाकीत अवदान ॥ अवदानें तृप्त पूर्ण ॥ वैष्णवशक्ति जगदंबा ॥ ६६ ॥ रक्तमांस सर्व सरलें ॥ शिर अस्थिमात्र उरलें ॥ मग शिर छेदों आरंभिलें ॥ हातीं शस्त्र घेवोनियां ॥ ६७ ॥ ह्मणे शक्तिरूपें श्रीहरि ॥ व्यापक असे चराचरीं ॥ त्याचीच शक्ति ही निर्धारीं ॥ कर्मसाक्षी जगाची ॥ ६८ ॥ तयानिमित्त शिर छेदोन ॥ पूर्ण करितों अवदान ॥ संतुष्ट हो कां नारायण ॥ निजशक्तिसहित ॥ ६९ ॥ ह्मणोनि खड्ग घेऊनि ॥ तेणें ठेविला कंठस्थानीं ॥ तों प्रगटली भवाँनी[7] ॥ तया निवारी निजहस्तें ॥ ७० ॥ ह्मणे चंद्रहासा सावधान ॥ कां रे करिसी आत्महनन ॥ पापी परम हा प्रधान ॥ आत्मपापें निमाला ॥ ७१ ॥ परम भक्त हा मदन ॥ सुशील आणि शुद्धमन ॥ तेणें फेडिलें कीं ऋण ॥ स्वसादानीं[8] बोलिलें जें ॥ ७२ ॥ तूं नको करूं आत्महनन ॥ माग झालें मी प्रसन्न ॥ तुज दोन वर देईन ॥ मागें आतां झडकरीं ॥ ७३ ॥ सावधान चंद्रहास ॥ पाहता झाला स्वरूपास ॥ तों अनंत सूर्यांचा प्रकाश ॥ देवी देखिली जगदंबा ॥ ७४ ॥

---

१ कोलाहल, हाहाकार. २ भयंकर ओरड. ३ निश्चयें. ४ भोजनारंभीं पहिल्याच घांसांत माशी पडणें. ५ आहुतीस. ६ अग्नि. ७ पार्वती. ८ बहिणीच्या दानानें.

वारंवार करी नमन ॥ तैसेंच करीत चरणसेवन ॥ चंडिका ह्मणे वरदान ॥ मागें राया झडकरी ॥ ७५ ॥ मग चंद्रहास झाला बोलता ॥ तूं वैष्णवी शक्ति तत्वतां ॥ प्रसन्न झालीस आतां ॥ तरी दोन वर देइंजे ॥ ७६ ॥ जन्मजन्मांतरीं हरिभक्ति ॥ अक्षय देईं चिच्छक्ति ॥ कदापि न टळो चित्तवृत्ति ॥ हरिचरणांपासोनि ॥ ७७ ॥ दुजा वर मज द्यावा ॥ सपुत्र प्रधान उठवावा ॥ स्वभक्त-महिमा वाढवावा ॥ कृपाकटाक्षेंकरोनि ॥ ७८ ॥ ऐसें ऐकतां बोले शक्ति ॥ अचळ होईल हरिभक्ति ॥ सर्वत्र होईल कीर्ति ॥ तारक होशील सर्वांतें ॥ ७९ ॥ आद्यंत सर्व चरित्र ॥ जे श्रवण करितील पवित्र ॥ ते पुनीत होतील सर्वत्र ॥ अंतीं पावतील विष्णुपदा ॥ ८० ॥ तुज पुत्र होतील विख्यात ॥ अत्यंत ते हरिभक्त ॥ तव स्मरणें सर्व दुरित ॥ पळोनि जाईल जनांचें ॥ ८१ ॥ विशेष कलि-युगामाझारीं ॥ जीं श्रवण करितील नरनारी ॥ तीं तरोनियां संसारसागरीं ॥ हरिमंदिर पावतील ॥ ८२ ॥ तव चरित्रश्रवणपठनें ॥ निर्मळ होतील जनांचीं मनें ॥ तयावरी दया करिजे नारायणें ॥ मुक्तिसदना नेवोनि ॥ ८३ ॥ पुनः बोले त्रिपुरसुंदरी ॥ पुढें येईं झडकरी ॥ कृपाहस्त ठेवोनि शिरीं ॥ ज्ञानविज्ञान प्रकाशिलें ॥ ८४ ॥ ह्मणे क्षणमात्र झांकीं नयन ॥ आतांच उठतील दोघेजण ॥ येरें झांकितांचि नयन ॥ इच्छामात्रें उठविले ॥ ८५ ॥ जी अनंत ब्रह्मांडांची स्वामिनी ॥ तिची अघटित असे करणी ॥ तिणें सजीव केले दोनी ॥ हें आश्चर्य नव्हे तिचें ॥ ८६ ॥ दोघे तात्काळ उठले ॥ पूर्वींच्या परीस अधिक शोभले ॥ किंवा निद्रित उठिले ॥ ऐसे देखिले चंद्रहासें ॥ ८७ ॥ ऐसें वरदान देवोनि ॥ अदृश्य झाली ती भवानी ॥ पुष्पवृष्टि आकाशींहूनि ॥ चंद्रहासावरी झाली ॥ ८८ ॥ मग तो कुलिंदाचा कुमर ॥ श्वशुरासी करी नमस्कार ॥ तैसाचि आलिंगिला तो पुत्र ॥ प्रधानाचा तेधवां ॥ ८९ ॥ मग चंद्रहास बोले प्रधानासी ॥ अज्ञोनि कां भ्रमलासी ॥ हरिमाया जाण ही ऐसी ॥ लटिकें जन्ममरण योजित ॥ ९० ॥ जें आधीं जन्मलेंचि नाहीं ॥ तें मरण पावेल काई ॥ मध्येंच भासलें जें कांहीं ॥ तेंही सर्व अशाश्वत ॥ ९१ ॥ जेथें मृगजळ भासलें ॥ तें काय स्थळ ओलें झालें ॥ मग तेथेंच आटलें ॥ तें काय झालें शुष्क पैं ॥ ९२ ॥ घटीं मठीं बिंबलें आकाश ॥ त्या घटमठांचा होतां नाश ॥ आकाशीं राहे अवकाश ॥ सदोदित व्याप्त जो ॥ ९३ ॥ आपली छाया विष्ठेवरी ॥ पडतां कोण दुःख करी ॥ मग तीच पडतां पालखीवरी ॥ कोण पावेल सुखातें ॥ ९४ ॥ स्वप्नीं केलें पाप अद्भुत ॥ ह्मणोनि घेतो प्रायश्चित्त ॥ आणि स्वप्नपुण्यें पुनीत ॥ कोण झाला सांग पां ॥ ९५ ॥ हें जग अविद्योजनित ॥ मृगजळ प्रायश्चित्त ॥ सत्य अज्ञानियां भासत ॥ यातें संत न देखती ॥ ९६ ॥ झालें मेलें मिथ्या जाण ॥ आत्म्यावीण दुजें कवण ॥ नग झालियाही कनकपण ॥ न मोडे तैसा जगदात्मा ॥ ९७ ॥ श्रीहरीवांचोनि नसे कांहीं ॥ तेथें जन्ममरण कैंचें काई ॥ ह्मणोनि सर्वभावें हरिपायीं ॥ शरण असावें सद्भावें ॥ ९८ ॥ ऐसें भगवद्भक्तमहिमान ॥



१ पुण्यवान्. २ परिपूर्ण होऊन राहिलें. ३ पोकळी. ४ मायेपासून झालेलें. ५ दागिना. ६ सोनेपणा.

सजीव केले दोघेजण ॥ आश्चर्य पावले जन ॥ देखोनि कौतुक तयाचें ॥ ९९ ॥ ऐसा राव हरिभक्त ॥ व्यसन नसेचि किंचित ॥ मग श्वशुरशालकांसमवेत ॥ नगरप्रवेश पैं केला ॥ १०० ॥ ऐसें ऐकतां कथन ॥ संतुष्ट झाला अर्जुन ॥ मग नारदासी प्रश्न ॥ त्यावरी करिता जाहला ॥ १ ॥ चंद्रहासकथा ऐकतां ॥ धणी न पुरेचि चित्ता ॥ परी कुलिंदाची वार्ता ॥ कैसी झाली यावरी ॥ २ ॥ नारद ह्मणे कुंतीसुता ॥ ऐकें कुलिंदाची वार्ता ॥ चंद्रहास दवडोनि तत्वतां ॥ अत्यंत पीडिला प्रधानें ॥ ३ ॥ पश्चात्तापें तापला ॥ कुलिंद मनीं विचारिता झाला ॥ आतां मी सोडीन देहाला ॥ हरिस्मरण करोनि ॥ ४ ॥ जो निवारी जन्ममरण ॥ तयालागीं मी स्मरेन ॥ तात्काळ तुटेल बंधन ॥ जें केलें कां प्रधानें ॥ ५ ॥ अत्यंत पावोनि खेद ॥ वारंवार आठवी गोविंद ॥ देवाप्रति बोले सानंद ॥ देहीं उदास होवोनि ॥ ६ ॥ भगवद्भक्तिपरायण ॥ तुवां जो दिधला नंदन ॥ तोही मज अंतरला पूर्ण ॥ आतां मातें तारावें ॥ ७ ॥ सत्पुत्रें होय सद्गति ॥ ऐसी गर्जे वेदश्रुति ॥ तो पुत्र निमाला रमापति ॥ आतां मज सोडवी ॥ ८ ॥ ऐसें बोलोनियां वचन ॥ सह परिवार घेऊन ॥ अग्नीमाजी प्रवेशन ॥ करूं आदरी तेधवां ॥ ९ ॥ तें देखोनि प्रधानदूत ॥ तेथील रक्षका जाणवित ॥ कुलिंद परिवारासमवेत ॥ अग्निप्रवेश करीतसे ॥ ११० ॥ ऐसा ऐकतां निरोप ॥ तंव तो रक्षक पापरूप ॥ तयासी झाला पश्चात्ताप ॥ मग निवारित कुलिंदातें ॥ ११ ॥ याचा मारिला असेल नंदन ॥ सर्वही हरिलें दुष्टबुद्धीन ॥ मज ठेविलें रक्षण पूर्ण ॥ परी यातें केवीं मरों द्यावें ॥ १२ ॥ ऐसा करोनि विचार ॥ तयातें वारिलें सत्वर ॥ आपण जावोनि समोर ॥ करी समाधान तयाचें ॥ १३ ॥ नको करूं अग्निप्रवेश ॥ घेईं आपुले राज्यास ॥ सम जावितों मी दुष्टबुद्धीस ॥ जावोनियां यावरी ॥ १४ ॥ ऐसा नानापरी विनविला ॥ अग्निप्रवेश थांबविला ॥ तो पुत्रवर्तमानार्थ राहिला ॥ निशिदिनीं चिंतातुर ॥ १५ ॥ आठवीत हरिपादारविंद ॥ निशिदिनीं तो कुलिंद ॥ तों इकडे दुष्टबुद्धीसी ज्ञान विशद ॥ चंद्रहासें सांगितलें ॥ १६ ॥ सांगोनियां दिव्यज्ञान ॥ सन्मार्गीं लाविला तो प्रधान ॥ मदनासी सर्वे घेऊन ॥ दळभार सिद्ध करविला ॥ १७ ॥ लागले वाद्यांचे गजर ॥ चंद्रहास निघाला सत्वर ॥ मातापिता चिंतातुर ॥ असतील ह्मणोनियां ॥ १८ ॥ पुढें दूत पाठविले ॥ तिहीं कुलिंदासी जाणविलें ॥ कुंतलेशें राज्य दिधलें ॥ तव पुत्रालागोनि ॥ १९ ॥ चंद्रहास राज्य पावला ॥ प्रधानरायांचा जामात झाला ॥ ऐसें ऐकतां हर्ष झाला ॥ मातापितयांलागोनि ॥ १२० ॥ ह्मणे पावलासी तूं श्रीधरा ॥ धन्य केलें माझिया कुळा ॥ तों ग्रामासमीप पातला ॥ चंद्रहास स्वसैन्येंसीं ॥ २१ ॥ सामोरा कुलिंद जावोन ॥ पुत्र आलिंगिला धांवोन ॥ येरें वंदोनि दोघेजण ॥ चरणीं माथा ठेविला ॥ २२ ॥ मग सकळ प्रजांकारणें ॥ अपार दिधलीं धान्यें धनें ॥ चंदनावती शतगुणें ॥ वसविली ती तेधवां ॥ २३ ॥ मग तेथें ठेवोनि एक नायक ॥ मातापिता घेऊनि सैनिक ॥ कुंतलापुरा आला हरिख ॥ न मायेचि त्रिभुवनीं ॥ २४ ॥ प्रधानपट्ट दिधला मदना ॥ तो करीतसे सकळ

१ सासरा व मेहुणा यांसहवर्तमान. २ तृप्तता. ३ अर्जुना. ४ पुत्र. ५ स्पष्ट. ६ चंद्रहासानें. ७ प्रधानकीचीं वस्त्रें.

शासनें ॥ तंव विषया रायासंगें नंदना ॥ पद्माक्ष नामें प्रसवली ॥ २५ ॥ मकरध्वज तनय ॥ चंपकमालिनीसी झाला गुणालय ॥ महाभक्त ते यदुराय ॥ निशिदिनीं चिंतिती ॥ २६ ॥ नारायणभक्ताचा महिमा ॥ ऐसा ऐकें पांडवोत्तमा ॥ शालग्राम शिळा उत्तमा ॥ त्याचें माहात्म्य यापरी ॥ २७ ॥ ज्यापासीं असे शालग्राम ॥ द्वादशचक्रेंसीं उत्तम ॥ त्यातें न सोडी पुरुषोत्तम ॥ पार्था महासंकटीं ॥ २८ ॥ लोक तारावयाकारणें ॥ दोन रूपें धरिलीं नारायणें ॥ एक शालग्रामशिला जाणें ॥ दुजें रूप तें संन्यासी ॥ २९ ॥ दुस्तर संसारसागर ॥ तरूं इच्छी जरी सत्वर ॥ तरी शालग्रामशिला सादर ॥ नित्य पूजीं महाराजा ॥ १३० ॥ स्कंधीं शालग्राम घेऊन ॥ ग्रामांतरा करील गमन ॥ तेणें चराचर वाहिलें जाण ॥ ऐसें महिमान तयाचें ॥ ३१ ॥ विष्णूची भक्ति परम ॥ चक्रेंसहित शालग्राम ॥ विप्रां देतां नरोत्तम ॥ तेणें भूमिदान दिधलें ॥ ३२ ॥ अर्चिला पूजिला स्तविला ॥ अथवा सद्भावें आठविला ॥ तरी पवित्र करी पापियाला ॥ पुण्यात्मया काय सांगों ॥ ३३ ॥ नैमिषारण्यीं प्रयाग परम ॥ कीं गंगासागरसंगम ॥ याहोनि शतगुणें उत्तम ॥ शालग्रामउदक ॥ ३४ ॥ अनंत जन्मींचीं पापें दारुण ॥ जेणें केलीं असतील गहन ॥ तीं शालग्रामाचें करितां अर्चन ॥ भस्म होतील सर्वही ॥ ३५ ॥ निर्माल्य विष्णुशिळेचें ॥ कुंकुम चंदन पुष्प साचें ॥ स्पर्श करितां देहाचें ॥ सार्थक होईल निर्धारें ॥ ३६ ॥ शालग्रामाचें निर्माल्य ॥ शिरीं धरिती तुळसीमाल्य ॥ ते पावले पूर्ण कैवल्य ॥ हरिरूपचि जाणावे ॥ ३७ ॥ शालग्रामा निवेदिलें अन्न ॥ त्याचें करील जो भोजन ॥ तो मुक्त सर्व पापांपासून ॥ विष्णुलोकीं पूज्य होय ॥ ३८ ॥ शालग्रामशिलास्पर्शन ॥ जे प्रतिदिनीं करितील जन ॥ तेणें दिधलें दिव्यान्न ॥ पितृअतिथिद्विजांसी ॥ ३९ ॥ शालग्रामशिळेसमीप ॥ पुस्तक वाची जो सुखरूप ॥ तो जरी असेल पापरूप ॥ तरी तो पवित्र जाहला ॥ १४० ॥ शालग्रामशिळा जेथें ॥ सकळ तीर्थें वसती तेथें ॥ सह कमळा आणि दैवतें ॥ घेवोनि वसे श्रीहरि ॥ ४१ ॥ शालग्रामाचें पूजन ॥ जेणें केलें भक्तींकरून ॥ तेणें आब्रह्म भुवन ॥ पूजिलें जाण चराचर ॥ ४२ ॥ अंतकाळीं ज्याचे वदनीं ॥ पडे शालग्रामशिळेचें पाणी ॥ तो पापी जरी मरण पावोनि ॥ उत्तम गति पावेल ॥ ४३ ॥ बंधु तव जाण हृषीकेशी ॥ पुण्यतिथि जाण द्वादशी ॥ विष्णुपादोदकतुलनेसी ॥ भुवनत्रयीं असेना तीर्थ ॥ ४४ ॥ दर्शनें हरी पाप समूळ ॥ ऐसें तें तुलसीदळ ॥ दीर्घ मंजरीसी सुंदर ॥ अर्पितां हरि संतोषतो ॥ ४५ ॥ केसर किंवा गलितपत्र ॥ येणें शोभविती जे हरीचें गात्र ॥ नामें घेवोनियां जे पवित्र ॥ त्यांचा महिमा न वर्णवे ॥ ४६ ॥ शालग्रामाचा महिमा ॥ वर्णूं न शके जो का ब्रह्मा ॥ तो तुज वीरोत्तमा ॥ संक्षेपेंची जाविणला ॥ ४७ ॥ शालग्रामार्चनें सुरस ॥ राज्य पावला चंद्रहास ॥ तो या नगरीचा अधीश ॥ हयहर्ता तुझे अर्जुना ॥ ४८ ॥ ऐकोनियां चंद्रहासआख्यान ॥ संतुष्ट झाला श्वेतवाहन ॥ म्हणे सत्संगतीवांचून ॥ न घडे लाभ सुखाचा ॥ ४९ ॥



१ राजकार्य. २ मोक्ष.

ऐसें चंद्रहासाख्यान ॥ पार्थासी सांगे विधिनंदन ॥ मग तेथोनि केलें गमन ॥ नारदस्वामीनें ऊर्ध्वपंथें ॥ १५० ॥ सत्संगतीचा लाभ ॥ राया जाण दुर्लभ ॥ त्याच्या संगें पद्मनाभ ॥ प्राप्त होय जनांतें ॥ ५१ ॥ संतुष्ट झाला श्वेतवाहन ॥ ह्मणे धन्य भक्तनिधान ॥ मग सकळ वीर घेऊन ॥ कुंतलापुरा चालिला ॥ ५२ ॥ जनमेजयासी ह्मणे जैमिनि ॥ पावन होइंजे या आख्यानीं ॥ भावें इच्छा श्रवणपठनीं ॥ ते सकळ सुख पावती ॥ ५३ ॥ चंद्रहास वीर गहन ॥ तो पुढें धरील श्यामकर्ण ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ सावधान परिसावें ॥ ५४ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १५५ ॥ इति श्रीमन्महाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके चंद्रहासाख्यानं नाम एकोनषष्टितमोऽध्यायः ॥ ५९ ॥ ॥ अध्याय ॥ ५९ ॥ ओव्या ॥ १५५ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे गा भारता ॥ ऐकें पुण्यश्लोकाची कथा ॥ चित्तीं करूनि एकाग्रता ॥ सावधान परिसावें ॥१॥
मग झाला प्रातःकाळ ॥ पुढें चालिलें अश्वयुगल ॥ तों देखिलें नगर ॥ हरिभक्ताचें तेधवां ॥ २ ॥ पद्माक्ष आणि मकरध्वज ॥ तिहीं
देखिले हयराज ॥ धरोनि आणिले तेजःपुंज ॥ पाहतां विस्मय वाटला ॥ ३ ॥ पत्राभिप्राय वाचितां ॥ हर्ष झाला परम चित्ता ॥
दोघांनीं अश्व धरूनि तत्वतां ॥ वेगें आणिले रायापाशीं ॥ ४ ॥ ते देखोनि तुरंगोत्तम ॥ राव संतोषला परम ॥ ह्मणे आजि झाला संगम ॥
महद्भाग्यें कृष्णाचा ॥५॥ मी बाळपणापासून ॥ ज्याचें करितों चिंतन ॥ तो नरासह नारायण ॥ पाहतां दोष हरतील ॥ ६ ॥ जो अनंत ब्रह्मां-
डांचा धनी ॥ ज्याचें पादोदक देवतटिनी ॥ तो सकळ देवांचा मुगुटमणी ॥ त्यासी नयनीं पाहेन मी ॥ ७ ॥ संतोषोनि चंद्रहास ॥
बोलता झाला मकरध्वजास ॥ धर्मरायाचे अश्व आह्मांस ॥ प्राप्त झाले निर्धारें ॥ ८ ॥ वर्षपर्यंत क्लेश थोर ॥ रक्षण करितां धनुर्धर ॥ ऐसी
कीर्ति अपार ॥ ऐकिली पार्थकृष्णांची ॥ ९ ॥ संवत्सर झाला सांग ॥ धरितां अंतरेल धर्मयाग ॥ आह्मीं केला यागभंग ॥ ऐसी वार्ता
फांकेल पैं ॥ १० ॥ तरी तूं बंधूसहवर्तमान ॥ अश्वांचें करीं संरक्षण ॥ मागों आलिया कृष्णार्जुन ॥ मग तयांस समर्पणें ॥ ११ ॥
आह्मांसी सुकृताचें प्रयोजन ॥ कायकरावे हे श्यामकर्ण ॥ होईल वासुदेवदर्शन ॥ इतुकेनें सर्व सार्थक ॥ १२ ॥ मी पार्थासीं युद्ध करीन ॥
तोषवीन जनार्दन ॥ तुह्मीं नेवोनि श्यामकर्ण ॥ अश्वशाळेंत बांधावे ॥१३॥ ऐसें बोलोनि वचन ॥ सिद्ध केलें सकळ सैन्य ॥ चंद्रहास
हर्षेंकरून ॥ नगराबाहेर निघाला ॥ १४ ॥ तों येरीकडे महारथी ॥ पार्थ कृष्ण एक्या रथीं ॥ दुरोनि देखिला भक्त पंथीं ॥ स्वसैन्येंसीं
येत चंद्रहास ॥ १५ ॥ श्रीकृष्णनिर्माल्य तुळसीदळ ॥ तेणें शोभे शिरकमळ ॥ ओष्ठपुटें जपे निर्मळ ॥ श्रीहरिनामाष्टक ॥ १६ ॥
वयोवृद्ध तपोवृद्ध ॥ परमभक्त ज्ञानवृद्ध ॥ ज्यासी असे विज्ञानबोध ॥ विष्णुभक्तिप्रसादें ॥ १७ ॥ ऐसा देखोनि कृष्णभक्त ॥ परम
संतोषला तो पार्थ ॥ ह्मणे मी आजि झालों कृतार्थ ॥ जन्मसार्थक जाहलें ॥ १८ ॥ हा बाळपणापासोनि वैष्णव ॥ अत्यंत शुद्ध याचा
भाव ॥ याचे चित्तांबुजीं रमाधव ॥ भृंगरूपें सदा वसे ॥ १९ ॥ ज्यातें रक्षी हृषीकेश ॥ तो हा देखिला चंद्रहास ॥ आतां
गोत्रवधाचा दोष ॥ उरला नाहीं आह्मांतें ॥ २० ॥ हरिभक्ताचें होतां दर्शन ॥ होय कोटिकुलोद्धारण ॥ गंगादि सर्व तीर्थीं स्नान ॥
केलें पुण्य जोडेल ॥ २१ ॥ यावरी चंद्रहास देखतां वनमाळी ॥ चतुर्भुज झाला तात्काळीं ॥ शंखचक्रादि आयुधें शोभलीं ॥
पीतवसनमंडित ॥ २२ ॥ ऐसा भूमिस्थ वनमाळी ॥ देखोनि कुलिंदात्मजें उडी टाकिली ॥ तांतडीं सप्रेम धांव घेतली ॥
वंदावया कृष्णचरण ॥ २३ ॥ वंदितांचि कृष्णचरण ॥ देवें दिधलें आलिंगन ॥ ते वेळे देव भक्त आपण ॥ ऐक्य झाले समरसें ॥ २४ ॥
मग देव ह्मणे रे पार्था ॥ ऊठ भेटें माझिया भक्ता ॥ भोगीं वेगें सुखसरिता ॥ भक्तालिंगनेंकरोनि ॥ २५ ॥ ऐकोनि पार्थ बोलत ॥
ह्मणे कां बोलतां विपरीत ॥ तुमचा कोणता वचनार्थ ॥ सत्य मानावा यावरी ॥ २६ ॥ निर्गुण जरी आपला धर्म ॥ सर्वथा न सोडावा

स्वधर्म ॥ परधर्म असल्याही उत्तम ॥ जाणोनियां न करावा ॥ २७ ॥ आपुले धर्में होय मरण ॥ तरी तेंचि जाणावें कल्याण ॥ राज्य प्राप्त परधर्में जाण ॥ परी सर्वथाही न करावा ॥ २८ ॥ भीष्मयुद्धाचे काळीं ॥ हेंचि बोधिलें वनमाळी ॥ आतां येथें विपरीत बोली ॥ कां हो आली स्वामिया ॥ २९ ॥ रायासी देवोनि आलिंगन ॥ मग युद्ध कैसें करूं दारुण ॥ हा हरिभक्त वृद्ध ह्मणोन ॥ वंदितों चरण मी याचे ॥ ३० ॥ मग कृष्ण ह्मणे रे पार्था ॥ बोलसी सत्य वचनार्था ॥ परी जेणें होय तुझिया हिता ॥ तेंचि मज सांगणें ॥ ३१ ॥ करितां भक्तांचें वंदन ॥ तेणें होय महापुण्य ॥ भक्तां देतां आलिंगन ॥ कपिलासहस्रदानफळ ॥ ३२ ॥ चंद्रहास आणि मी माधव ॥ हा काय दुजा धरिसी भाव ॥ मद्रूपचि हा पार्थिव ॥ ह्मणोनियां आलिंगीं ॥ ३३ ॥ या थोर धर्मापुढें ॥ काय स्वधर्म बापुडें ॥ जें मी सांगेन कोडें ॥ तेंचि करणें अर्जुना ॥ ३४ ॥ मग कृष्णचि मानोनि भक्तवर ॥ पार्थें केला नमस्कार ॥ भक्तालिंगनें पांडुपुत्र ॥ परम अंतरीं निवाला ॥३५॥ मग चंद्रहास बोले पार्थासी ॥ मी करूं आलों जी युद्धासी ॥ परी हा लाघवी हृषीकेशी ॥ याचा भाव मी जाणें ॥ ३६ ॥ येथें युद्धासी लागतील षण्मास ॥ तेथें होईल यागविध्वंस ॥ ऐसें जाणोनि हृषीकेश ॥ समाधान केलें जी ॥ ३७ ॥ तरी हरीचें जेणें समाधान ॥ तेणेंचि आमुचें धर्माचरण ॥ ऐसें बोलोनि कृष्णचरण ॥ वारंवार वंदित ॥ ३८ ॥ यापरी झालें समाधान ॥ हें पुत्रद्वया झालें श्रवण ॥ ते घेवोनि आले श्यामकर्ण ॥ भेटले कृष्णार्जुनांतें ॥ ३९ ॥ मग परमोत्साहेंकरून ॥ नगरीं नेले श्रीकृष्णार्जुन ॥ कृतार्थ केला मदन ॥ पुत्रपौत्रांसमवेत ॥ ४० ॥ जेणें देखिला रमावर ॥ त्याचा झाला उद्धार ॥ यापरी कुंतलापुर ॥ चंद्रहासें उद्धरिलें ॥ ४१ ॥ मग पूजावया माधव ॥ रायें पाचारिला गालव ॥ त्यातें देखोनि केशव ॥ लोटांगण घातलें ॥ ४२ ॥ गालवें देखोनि हरिरूप ॥ आलिंगिलें ते सुखरूप ॥ जैसा निर्वातस्थानीं दीप ॥ तैसें ध्यानीं स्थापिलें ॥ ४३ ॥ मग चंद्रहासें केलें पूजन ॥ अपार वेंचिलें निजधन ॥ नाना वस्त्राभरणेंकरून ॥ नरनारायण पूजिले ॥ ४४ ॥ प्रद्युम्नादि सकळ वीर ॥ पूजिले रावही समग्र ॥ देवोनि वस्त्रालंकार ॥ सकळ वीर गौरविले ॥४५॥ त्रिरात्री तेथें क्रमोन ॥ गालवमुनीची आज्ञा घेऊन ॥ निघता झाला यदुनंदन ॥ सकळ सैन्यासमवेत ॥ ४६॥ मग चंद्रहासें राज्य आपुलें ॥ श्रीकृष्णचरणीं समर्पिलें ॥ तेणें तत्पुत्रांसी दिधलें ॥ अर्जुनआज्ञेंकरोनि ॥ ४७॥ त्या चंद्रहासदर्शनेंकरून ॥ सकळां झालें समाधान ॥ विशेषें तोषला अर्जुन ॥ भक्त निपुण जाणोनि ॥ ४८ ॥ हें चंद्रहासाचें आख्यान ॥ जे भक्तीनें करितील श्रवण ॥ ते पुत्रपौत्रीं नांदोन ॥ अंतीं पूज्य होती वैकुंठीं ॥ ४९ ॥ अचळ लाभेल कृष्णभक्ती ॥ अंतीं पावेल तो मुक्ती ॥ त्याची होईल सत्कीर्ति ॥ भुवनत्रयामाझारी ॥ ५० ॥ हें दिव्य भक्तचरित्र ॥ येणें शोभवितील जे आपुलें वक्त्र ॥ जे करितील तृप्त श्रोत्र ॥ अतिपवित्र होतील ॥५१॥ यावरी दोनी श्यामकर्ण ॥ उत्तरसमुद्रीं करितील गमन ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अति रसाळ परिसावें ॥५२॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥५३॥ इति श्रीमहा० जैमिनि०आश्वमे०चंद्रहासाख्यानसमाप्तिर्नाम षष्टितमोऽध्यायः॥६०॥ अध्याय ॥६०॥ ओव्या॥५३॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ मग कुरुकुलारविंदतरणी ॥ तो जनमेजय चूडामणी ॥ भावें जोडोनि उभय पाणी[1] ॥ करी विनवणी जैमि-
नीतें ॥ १ ॥ स्वामी केवळ ब्रह्मगिरी ॥ त्वन्मुखगंगाद्वारकुहरीं ॥ चंद्रहासकथा गोदावरी ॥ जगदुद्धारा प्रगटलीसे ॥ २ ॥ माझा
मनोभाव तो गौतममुनि ॥ आळस विस्मृति गोहत्या त्यालागूनि ॥ झाली होती तयेची धुणी ॥ करोनि निष्पाप तो झाला ॥ ३ ॥
तथापि मजवरी दया करावी ॥ ती अद्वयपुरसागरा चालवी ॥ सकलेंद्रियजनावळी तारावी ॥ श्रवणस्नानेंकरूनियां ॥ ४ ॥ मग
तेथोनि श्यामकर्ण ॥ पुढें कोठें करिते झाले गमन ॥ तें मज शिष्यासी परमाख्यान ॥ कृपा करूनि सांगिजे ॥ ५ ॥ मग नृपासी
ह्मणे मुनिभूषण ॥ तुझा प्रश्न हा निशारमण[2] ॥ उगवतां मन्मुख चंद्रकांतपाषाण ॥ द्रवे संपूर्ण स्वानंदें ॥ ६ ॥ आतां सावध करूनि
मनाचें मन ॥ करावे सर्वांगाचे कान ॥ श्राव्य तेंचि व्हावें आपण ॥ ऐसें श्रवण करावें ॥ ७ ॥ तया कुंतलपुरापासून ॥ पुढें चालिले
श्यामकर्ण ॥ मागें चालती कृष्णार्जुन ॥ सकळ रायांसमवेत ॥ ८ ॥ करितां पृथ्वीचें पलाटन ॥ हय गेले उत्तरसमुद्रालागून ॥ भोज-
कोटनगरातें लंघून ॥ पुढें श्यामकर्ण चालिले ॥ ९ ॥ तेथें दुंदुभि नामा दैत्यनाथ ॥ राज्य करितसे अतिसमर्थ ॥ त्याचा वर्णावया
पुरुषार्थ ॥ मज तों सामर्थ्य असेना ॥ १० ॥ जो हरिहरब्रह्मादिदेवां ॥ सर्वथा अजेय तो कुरुपुंगवा ॥ तेथें मानवांचा कोण केवा ॥
ऐसा बलाढ्य तो दैत्यनाथ ॥ ११ ॥ तयासी मुखें असती तीन शत ॥ तीन सहस्र असती हस्त ॥ सेनासमुद्र तो असंख्यात ॥ जेवीं
भूमिगत परमाणु[3] ॥ १२ ॥ जेणें सकळ सैन्यातें वधून ॥ वेगें धरूनि कृष्णार्जुन ॥ रथासहित वायुनंदन ॥ मगरतोंडीं टाकिले ॥ १३ ॥
ऐसा तो अगाध बळोदधी ॥ पांडवसेना ही महानदी ॥ तयासी मिळालिया महायुद्धीं ॥ उरली नाहीं नाममात्रें ॥ १४ ॥ ऐसें
ऐकतां मुनिवचन ॥ मनीं चमत्कारला नृपनंदन ॥ ह्मणे अद्भुत सांगतां जी कथन ॥ तरी तें सविस्तर सांगावें ॥ १५ ॥ तरी तो
दुंदुभि असे जी कवण ॥ आणि कवणाचा असे नंदन[4] ॥ मगर सांगितला तो कवण ॥ तेंही कथन सांगावें ॥ १६ ॥ मग मुनि ह्मणे
गा भारता ॥ ऐक चित्तीं करूनि एकाग्रता ॥ ही तों भविष्यपुराणींची कथा ॥ अगस्तिवसिष्ठसंवाद ॥ १७ ॥ तया उत्तरार्णवातें[5]
लक्षून ॥ वेगें चालिले श्यामकर्ण ॥ तयांमागें कृष्णार्जुन ॥ सकळ सैन्येंसीं चालिले ॥ १८ ॥ अपार चालिलें पार्थदळ ॥ [illegible] व्याप्त
दिशामंडळ ॥ नभीं[6] लोपलें सूर्यमंडळ ॥ छत्रध्वजपताकेंकरून ॥ १९ ॥ जेवीं क्षीराब्धीचे कल्लोळ ॥ तेवीं चामरें शोभती सा[illegible]वळ ॥
छत्रकळस रत्नमय उज्वळ ॥ देखोनि लोपती कविगुरू ॥ २० ॥ मेघडंबराचिया श्रेणी[7] ॥ अपार दाटल्या त्या गगनीं ॥ अनंत
वाद्यांच्या ध्वनीं ॥ झालें शब्दमय आकाश ॥ २१ ॥ नादें डळमळिलें आकाश ॥ तळीं दडपला भुजंगेश ॥ ऐसा चालिला तो सुभ-
द्रेश ॥ सकळ रायांसमवेत ॥ २२ ॥ ऐसा चालिला दळभार ॥ वेगें पावला मेरुपाठार ॥ तों तेथें असे अंधकार ॥ सूर्यदर्शन तेथें

१ हात. २ चंद्र. ३ धुळींतले बारीक कण. ४ पुत्र. ५ उत्तरेकडील समुद्राला. ६ आकाशांत. ७ पंक्ती.

नाहीं ॥ २३ ॥ ऐसा देखोनि अंधार ॥ खळबळिला दळसागर ॥ कृष्णार्जुनादि सकळ वीर ॥ झाले चिंतातुर ते समयीं ॥ २४ ॥ ह्मणती पुरला आयुष्यप्रांत ॥ कीं क्षोभला भगवंत ॥ कीं काळें पाचारिले समस्त ॥ मरावया ये स्थानीं ॥ २५ ॥ ऐसें दुःख होतां सकळांस ॥ तों सैन्य पावलें तळवटास ॥ पुढें वन देखिलें उद्धस[1] ॥ कोटियोजनें प्रमाण ॥ २६ ॥ मग कृष्णें पाचारोनि सकळ वीर ॥ तयांप्रति बोलतसे उत्तर ॥ पुढें कोटियोजनें नाहीं नीर ॥ ऐसें उद्धस वन आहे ॥ २७ ॥ पुढें होईल प्राणसंदेह ॥ ह्मणोनि करावा जळसंग्रह ॥ ऐसें ऐकतां वीरसमूह ॥ भयें कांपती थरथरां ॥ २८ ॥ तंव चंद्रहास ह्मणे चक्रपाणी ॥ तूं कां भेडसाविसी वी[illegible]णी ॥ गंगोदक आहे तव चरणीं ॥ तें काय आह्मां उपेक्षील ॥ २९ ॥ जवळी असतां जगज्जीवन ॥ काय तृषा बाधील आह्मां[illegible]न ॥ तथापि तव आज्ञा प्रमाण ॥ करूं जीवनसंग्रहातें ॥ ३० ॥ संगें घेऊनि नृपमेळा ॥ पावन करिसी या भूमंडळा ॥ जिंकोनियां सकळ नृपाळां ॥ यश अर्जुना समर्पिसी ॥ ३१ ॥ ऐसी तव अवतारलीला ॥ आह्मी जाणतों दयाळा ॥ तथापि तव वचनामृताला ॥ आह्मीं चातक ऊर्ध्वमुखी ॥ ३२ ॥ ऐसें बोलतां नृपवर ॥ मार्ग क्रमिती दुस्तर ॥ मार्गीं दाटला अंधकार ॥ दुःखें सैन्य आकळिलें ॥ ३३ ॥ तेरा सहस्र योजनें गिरिवर ॥ ऊंच चढतां श्रमला दळभार ॥ जळेंवीण होऊं पाहे संहार ॥ मुखासी खरेंसी[2] दाटल्या ॥ ३४ ॥ एक ह्मणती नव्हे हा यागं[3] ॥ पूर्ण लागला क्षयरोग ॥ किंवा उदेला कर्मभोग ॥ जो जन्मांतरींचा सांठवला ॥ ३५ ॥ नातरी नव्हे हा अश्वमेध ॥ केवळ भोगवीतसे अपराध ॥ पदोपदीं दुःख अगाध ॥ आह्मां सकळां देतसे ॥ ३६ ॥ एक ह्मणती आपुले सदनीं ॥ भोगीत होतों दिव्य कामिनी ॥ तों विघ्नरूप हा गांडीवपाणी[4] ॥ आह्मां सकळां भेटला ॥ ३७ ॥ ऊंच करोनियां माना ॥ वीर पाहती दिशागगना ॥ तों आच्छादिती नयना ॥ भूरुहवस्त्रेंकरूनि ॥ ३८ ॥ आतां अंतरलें कुटुंब ॥ पुढें पातले दुःखकदंब[5] ॥ वाटे न करूनियां विसंब ॥ मृत्यु सकळांसी पातला ॥ ३९ ॥ एक स्त्रीपुत्रांतें आठविती ॥ एक विपत्तीतें स्मरती ॥ एक वानिती निजसंपत्ती ॥ मुकलों ह्मणती सर्वथा ॥ ४० ॥ पाणी पाणी करीत चालिले ॥ कित्येक चतुरंगदळ आटों लागलें ॥ अंधारीं चालतां निर्बुजले ॥ दिवसा दीप लाविती ॥ ४१ ॥ ऐसा चालतां दळभार ॥ दुःखें उल्लंघिला मार्ग दुस्तर ॥ तीन मासां सुरनदीचें तीर ॥ पावते झाले अतिकष्टें ॥ ४२ ॥ दृष्टीं देखतां सुरनदीचें तीर ॥ झाला मार्गश्रमपरिहार ॥ आनंदले सकळ वीर ॥ दृष्टीं दिवाकर[6] पाहतां ॥ ४३ ॥ ह्मणती पुरला होता अंत ॥ परी कृपाळु झाला भगवंत ॥ तेणेंचि वांचविलें जीवित ॥ परम संकटापासोनि ॥ ४४ ॥ काय गर्भागारीं राहून निघालों ॥ किंवा कारागृहापासोनि सुटलों ॥ कीं यमयातनेपासोनि मुक्त झालों ॥ ऐसें ह्मणती भूपाळ ॥ ४५ ॥ ठायीं ठायीं उतरलें कटक ॥ यथायुक्ति दिधले विनकँ[7] ॥ पुनः जन्म झालें ह्मणती सकळिक ॥ कृष्णपार्थादि ते समयीं ॥ ४६ ॥ प्राशन करितां

---

१ ओसाड. २ धांपा टाकणें, फेंस येणें. ३ यज्ञ. ४ अर्जुन. ५ दुःखांचा समुदाय. ६ सूर्य. ७ तंबू.

ज्ञानार्क ॥ जो मातला अज्ञानतमपंक ॥ त्यातें हरावया पातला ॥ ७० ॥ खांदीं वाहिला ब्रह्मवीणा ॥ मुखें करीत नामस्मरणा ॥ तेणें पाहिली ती सेना ॥ मृतप्राय चिंतेनें ॥ ७१ ॥ आला जाणोनि नारदमुनि ॥ नृपांसमवेत उठला चक्रपाणि ॥ वंदन करोनियां वरासनीं ॥ बैसवोनि पूजिला उपचारें ॥ ७२ ॥ तंव देव बोले जी ब्रह्मनंदना ॥ कोठोनि येणें झालें या वना ॥ येरें वंदोनि यदुकुळभूषणा ॥ काय वचन बोलतसे ॥ ७३ ॥ नारद ह्मणे जी गोपाळा ॥ धन्य आजिचा दिवस उगवला ॥ धणीवरी देखिलें चरणकमळा ॥ जें ब्रह्मादिकां अलभ्य ॥ ७४ ॥ तरी आश्चर्य वाटे रमानायका ॥ म्लानता येतसे शशांका ॥ उदयाद्री वेंघतां दिननायका ॥ सकळ तारकांसमवेत ॥ ७५ ॥ तेवीं तूं नृपांसमवेत मुरारि ॥ कां बैसलासी चिंतासमुद्रीं ॥ तुझी माव न कळे श्रीहरि ॥ आह्मां समस्तां लागूनि ॥ ७६ ॥ तुज काय मांडलें दुस्तर ॥ तें मज सांगावें सविस्तर ॥ ऐसें ऐकतां इंदिरावर ॥ काय उत्तर बोलतसे ॥ ७७ ॥ तव चरणप्रसादबळें ॥ अर्जुनें जिंकिलीं हीं नृपकुळें ॥ पुढें एक दुर्घट ओढवलें ॥ तें कैसें निस्तरेल जी ॥ ७८ ॥ अश्व येथोनि पुढें गेले ॥ उत्तरसमुद्रीं असती पावले ॥ वीर मार्ग शोधीत चालिले ॥ तों आडवा लागला कनकाद्रि ॥ ७९ ॥ तो उंच तेरासहस्र योजनें ॥ लंघितां श्रमलीं नृपकुळभूषणें ॥ तों पुढें देखिलें वन नयनें ॥ जें कोटियोजनें उद्वस ॥ ८० ॥ कष्टें लंघितां उद्वस वन ॥ कित्येक दळ आटलें जाण ॥ तीन मास न देखिला तपन ॥ तों कष्टें सुरनदी पावलों ॥ ८१ ॥ नयनीं पाहतां देवतटिनी ॥ विश्रांति पावली नृपश्रेणी ॥ तों परम भय उपजलें मनीं ॥ तें न सांगवे हृदयींचें ॥ ८२ ॥ मागील उणें काढिलें श्रीरंगें[1] ॥ मी बहुत श्रमलों या अर्जुनाचे संगें ॥ ताम्रध्वज जिंकितां मागें ॥ तेव्हां सकळांगें चूर्ण झालीं ॥ ८३ ॥ सवेंचि वीरवर्मा पावला ॥ तेणें आकाशमार्गीं रथ टाकिला ॥ तिघांचाही प्राणांत मांडिला ॥ परि वांचलों पूर्वसुकृतें ॥ ८४ ॥ सांगतां दुःखाचिया राशी ॥ विषाद येईल अर्जुनासी ॥ तें असो ओढवलें तयासी ॥ उपाय कांहीं सुचेना ॥ ८५ ॥ तया भयाचा परिहार ॥ तुह्मी सांगा जी सत्वर ॥ ऐसें बोलोनि कमळावर ॥ धरी चरण नारदाचे ॥ ८६ ॥ आतां काय बोलेल नारद ॥ तो पुढिले प्रसंगीं [illegible] ॥ तोचि ऐकावा सावध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ८७ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते दुंदुभ्याख्यानं नाम एकष[illegible]तमोध्यायः ॥ ६१ ॥ अध्याय ॥ ६१ ॥ओव्या ॥ ८७ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥

[1] श्रीकृष्ण.

गंगाजळ ॥ विरोन गेले दुःखाचळ ॥ पळोनि गेला मनोमळ ॥ पानोदकें गंगेच्या ॥ ४७ ॥ सकळीं केलें गंगास्नान ॥ सारिलें सुस्वाद भोजन ॥ मग आदरिलें शयन ॥ शिबिरामाजी आपलाले ॥ ४८ ॥ तों उगवला सहस्रकिरण ॥ जागृत झाले नृपगण ॥ अंतरीं[1] स्मरोनि रमारमण ॥ गंगास्नानासी पैं गेले ॥ ४९ ॥ सारोनियां नित्यनेम ॥ वस्त्रें घेवोनि उत्तम ॥ वंदावयातें पुरुषोत्तम ॥ भूप सकळ चालिले ॥ ५० ॥ तों करोनियां संध्यास्नान ॥ शिबिरामाजी बैसला जनार्दन ॥ राव पाहाती हरिमुख निरखून ॥ तो चिंतातुर बैसला ॥ ५१ ॥ चिंतावर्तीं[2] पडिला अनंत ॥ ह्मणे केवीं जिंकेल हा दैत्यनाथ ॥ जो हरिहरांसी अजेय समर्थ ॥ न वर्णवे पुरुषार्थ[3] जयाचा ॥ ५२ ॥ वीरांसी ह्मणे वैकुंठपीठ ॥ पुढें ओढवलें संकट ॥ मार्ग तंव असे अति दुर्घट ॥ होतील कष्ट चालतां ॥ ५३ ॥ बारा योजनें तुटला कडा ॥ भोंवता समुद्राचा असे वेढा ॥ केवीं सैन्य चालेल पुढां ॥ ह्मणोनि वेडा जाहलों मी ॥ ५४ ॥ येथोन बारा [illegible] योजन ॥ आहे भोजकोटपट्टण ॥ चतुर्दश शत गांवें पूर्ण ॥ आहे वस्ती नगराची ॥ ५५ ॥ तेथें राजा दैत्यनाथ ॥ दुंदुभिनामें अति विख्यात ॥ तयासी तीन सहस्र असती हस्त ॥ मुखें जयाचीं तीन शतें ॥ ५६ ॥ जो देवां दैत्यां प्रळयकाळ ॥ जो हरिहरादिकां प्रबळ ॥ ऐसा तो दैत्य महासबळ ॥ करील कवळ सकळांचा ॥ ५७ ॥ ऐसें ऐकतां श्रीहरिवचन ॥ सर्व भूप झाले म्लानवदन ॥ ह्मणती निरसलें गर्भव्यसन ॥ तंव दुसरें पुढें ओढवलें ॥ ५८ ॥ यत्नें निरसिला पंडुरोग ॥ तों पुढें पातला क्षयरोग ॥ आमचा झाला हृदयभंग ॥ वाक्य श्रीरंग बोलतांचि ॥ ५९ ॥ कोटि योजनें विस्तीर्ण वन ॥ उलंघितां श्रमलों उदकेंवीण ॥ तेथें वांचले आमुचे प्राण ॥ पूर्वपुण्येंकरोनि ॥ ६० ॥ तों पुढें आणिक संकट ॥ दैवें ओढवलें दुर्घट ॥ जेथें चिंतावला वैकुंठनाथ ॥ ह्मणोनि ओखटें[4] वाटलें ॥ ६१ ॥ औषधें करावें रोगहरण ॥ तों औषधासी ग्रासों धांवे मरण ॥ कर्णधारबळें[5] सागरतरण ॥ करावें तोचि बुडतसे ॥ ६२ ॥ आमुचा कर्णधार तो रमावर ॥ याच्या बळें तरावा भवसागर ॥ तंव तोचि झाला चिंतातुर ॥ तेथें आमुचा विचार कायसा ॥ ६३ ॥ जळप्रवाहीं बुडतां नर ॥ कष्टें पावे पैलतीर ॥ तों त्याचे शरीरीं पाषाण थोर ॥ येवोनि पडे अवचितां ॥ ६४ ॥ नातरी अशक्त पंगु नर ॥ तेणें कष्टें उलंघिला गिरिवर ॥ तोंचि तेथें सुटला प्रचंड समीर[6] ॥ तेणें पडिला भूमीसी ॥ ६५ ॥ तो न्याय आह्मां घडला ॥ वाटे आयुष्याचा अंत पुरला ॥ ऐसा सकळ नृपांचा मेळा ॥ असे पडिला चिंतावर्तीं ॥ ६६ ॥ जेवीं अस्तासी जातां तरणी[7] ॥ सहज म्लानता येत कमळिणी ॥ नातरी निशाकांत राहुवदनीं ॥ पडतां होय निस्तेज ॥ ६७ ॥ तेवीं विस्मित भूपश्रेणी[9] ॥ म्लानत्व पावला चक्रपाणि ॥ तों अकस्मात नारदमुनि ॥ गगनमार्गें उतरला ॥ ६८ ॥ जरी तो ह्मणूं अपर रविबिंब ॥ तरी तो उष्ण तेजाचा कदंब ॥ नातरी ह्मणों निशापति[8] स्वयंभ ॥ तरी हा निष्कलंक दिसताहे ॥ ६९ ॥ ऐसा नानापरी करितां तर्क ॥ तों समीप पातल

---

१ अंतःकरणामध्यें. २ चिंतारूपी भोंवऱ्यांत. ३ पराक्रम. ४ भयकारक. ५ नावाड्याच्या सहायानें. ६ वायु. ७ सूर्य. ८ चंद्र. ९ राजमंडळी.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे गा भारता ॥ पुढें कैसी चालिली कथा ॥ ती न्यावी जी श्रवणपंथा ॥ अत्यादरेंकरूनि ॥१॥ नारद सांगेल सुखकल्लोळ ॥ ह्मणोनि ऐकों बैसले भूपाळ ॥ तों तेणें केलें दुःखाकुळ ॥ महद्भयपोटीं घालोनि ॥ २ ॥ नारद ह्मणे जी वैकुंठपीठा ॥ तुवां आरंभिल्या बाळचेष्टा ॥ कां रे लागसी मृत्यूच्या वाटा ॥ असतां आयुष्य अमोलिक ॥ ३ ॥ मागें जिंकिले जे जे भूपती ॥ ते ते मज मृगांसमान भासती ॥ पुढें आहे मृगाधिपति ॥ तो सुभद्रापतीतें न जिंकवे ॥ ४ ॥ तेथील समूळ आख्यान ॥ तुज मी सागेन संपूर्ण ॥ तें तुवां ऐकावें सावधान ॥ सकळ रायांसमवेत ॥ ५ ॥ आधीं तों हा उत्तरसागर ॥ स्वरूपें दिसे भयंकर ॥ त्याचिया तरंगांचा पसर ॥ पाहातां सुरनर कांपती ॥ ६ ॥ तेथें असती दोन मगर ॥ नेणों काजळाचे गिरिवर ॥ चोवीस सहस्र वर्षें परिकर ॥ दोघेही क्रोधें भांडती ॥ ७ ॥ बारा योजनें तुटला कडा ॥ भोंवता असे समुद्राचा वेढा ॥ ऐकतां नर होतसे वेडा ॥ जो देखतांचि भय वाटे ॥ ८ ॥ तेथें भोजकोटनामें नगर ॥ तें चौदा शत योजनें सविस्तर ॥ अत्यंत उंच दुर्गप्राकार ॥ तो मनपवना न वेंधवे ॥ ९ ॥ तेथें दुंदुभिनामा दैत्य असे राजा ॥ तयासी तीन सहस्र असती भुजा ॥ आणि तीन शत मुखें खग-ध्वजा ॥ असती त्यासी भयंकर ॥ १० ॥ तेथें अमित असे दळभार ॥ नेणों एकवटले चतुःसागर ॥ तयातें झुंजावया सुर नर ॥ समर्थ नव्हती रणामाजी ॥ ११ ॥ तेणें वाळीसारिखा परम शूर ॥ युद्धीं केला अतिजर्जर ॥ रावणासारिखा महा झुंजार[1] ॥ तोही संग्रामीं पळविला ॥१२॥ जे जे वीर नांवाथिले[2] ॥ ते ते येणें सर्व जिंकिले ॥ ऐसें ऐकतांचि कांपिन्नले ॥ सकळ वीर पार्थेंसीं ॥ १३ ॥ तेथें तुवां ह्या श्रीहरि ॥ कां चालविल्या पिपीलिकांच्या[3] हारी ॥ तुज काय ह्मणावें हरि ॥ यांच्या छंदें[4] नाचसी तूं ॥ १४ ॥ तूं ह्मण-विसी बलाढ्य[5] पार्थ ॥ हा तयासी पाहावया नव्हे समर्थ ॥ जों उदेला नाहीं दिननाथ[6] ॥ तोंवरी खद्योत[7] शोभतसे ॥ १५ ॥ तोंवरी अंधकाराचा महिमा ॥ जों सहस्रकर नसे व्योमा ॥ तोंवरी गुणकर मेघश्यामा ॥ मग या वीरोत्तमा कोण देखे ॥ १६ ॥ येणें कौर-वांतें वधिलें ॥ आणि इंद्राचें वन[8] जाळिलें ॥ येणें शंकरातें जिंकिलें ॥ इतुकियानें हा वीर काय ॥ १७ ॥ येणें जे जे जिंकिले नृपगण ॥ ते ते तयासी तृणासमान ॥ नातरी झंझावातें उडे तृण ॥ तयासमान तो यासी मानी ॥ १८ ॥ ऐसिया तया दैत्यनाथा ॥ तूं समान करिसी या पार्था ॥ याविषयीं देतसें दृष्टांता ॥ ऐक अच्युता सावधान ॥ १९ ॥ येर अश्वांसीं उच्चैःश्रवा ॥ अश्वजाती ह्मणोनि काय तुळावा ॥ नातरी वनकुंजरांसमान मानावा ॥ ऐरावत काय इंद्राचा ॥ २० ॥ नातरी इळी पळी आडकिता ॥ यांसीं काय तुळावी खड्गलता ॥ चंदनकाष्ठ चढे देवमाथां ॥ तयासीं एरंड समान काय ॥ २१ ॥ नातरी पाच पिरोज वैडूर्यमणी ॥ ते काय समता ये पाषाणीं ॥ नातरी कनकवस्त्रालागुनी ॥ रंगटें[9] उपमा केवीं पावे ॥ २२ ॥ नातरी देवांगना उर्वशी रंभा ॥ तिणेंसीं सम

---

१ लढवय्या. २ नांवाजलेले. ३ मुंग्यांच्या ओळी. ४ आळेप्रमाणें. ५ पराक्रमी. ६ सूर्य. ७ काजवा. ८ खांडववन. ९ जुनें जाडें भरडें वस्त्र.

काय नरवल्लभा ॥ कीं जो नर आवडे पद्मनाभा ॥ काय क्षुद्र प्राणी तयासम ॥ २३ ॥ अति पवित्र गंगाजीवन ॥ कर्मनदीनीर सेविती जन ॥ वस्तु एक परी अंतर गहन ॥ ह्मणोनि सज्ञान बोलती ॥ २४ ॥ जेथें न चाले पार्थमहिमा ॥ तेथें नृप काय मेघ-श्यामा ॥ तेणें तोडरियांच्या प्रतिमा ॥ रेखोनि पायीं बांधिल्या ॥ २५ ॥ ऐसा तयाचा पुरुषार्थ ॥ सांगत असतां देवर्षिनाथ ॥ तों कोपें खवळला पार्थ ॥ येर कांपत थरथरां ॥ २६ ॥ पार्थ ह्मणे जी नारदमुनि ॥ नेणां काय माझी प्रतापकरणी ॥ म्यां वैतनं-दना जिंकोनि ॥ ध्वजस्तंभीं ठेवियेला ॥ २७ ॥ म्यां इंद्र जिंकोनि ऐरावत ॥ आणोनि संपादिलें जननीव्रत ॥ शरें केला सोपानपंथ ॥ परम कौतुकें आकाशीं ॥ २८ ॥ म्यां केलें सुभद्राहरण ॥ रणीं जिंकिले यादवगण ॥ म्यां आपले भुजाबळेंकरून ॥ रणीं जिंकिलीं नृपकुळें ॥ २९ ॥ मजसीं करावया संग्राम ॥ नाहींच जन्मला वीरोत्तम ॥ हें काय नेणे हा पुरुषोत्तम ॥ अद्भुत पराक्रम पैं माझा ॥ ३० ॥ ऐसें श्वेतवाहन बोलिला ॥ तों नारद खदखदां हांसला ॥ ह्मणे काय सांगसी प्रताप आगळा ॥ जेवीं स्वप्नींचे मनोरथ ॥ ३१ ॥ बभ्रुवाहन आणि ताम्रध्वज ॥ मयूरध्वज आणि हंसध्वज ॥ इतुकियां देखतां लाज ॥ कैसी न वाटे तुजलागीं ॥ ३२ ॥ तोंवरीच सांगसी सुखसोहळा ॥ जों दुंदुभि न देखिला डोळां ॥ तूं कां भुललासी रे गोपाळा ॥ कां अंतरसी कुटुंबातें ॥ ३३ ॥ तुवां माझें वचन ऐकावें ॥ सदा आनंदमय असावें ॥ शीघ्र द्वारावतीये परतावें ॥ स्त्रीपुत्रपौत्रांसमवेत ॥ ३४ ॥ तुज सोळा सहस्र असती कांता ॥ त्यांवेगळ्या असती अष्ट वनिता ॥ साठ लक्ष कुमर आणि दुहिता ॥ तुझ्या कुटुंबा पार नाहीं ॥ ३५ ॥ हा कुळ-क्षय कां आदरिला ॥ कां कुटुंबाचा वीट मानिला ॥ कां लागलासी अर्जुनाच्या बोला ॥ अंत तो पुरला नृपांचा ॥ ३६ ॥ जो दुंदुभीस मारील भला ॥ ऐसा वीर नाहीं कीं जन्मला ॥ हे सकळ नृपती रणमंडळा ॥ शांत होतील ऐसें वाटतें ॥ ३७ ॥ वृषकेतु आणि बभ्रुवाहन ॥ अनिरुद्ध हा तव नंदन ॥ चंद्रहासादि नृपगण ॥ रणमंडळीं पडतील ॥ ३८ ॥ मागें शिशुपाळादि दैत्यनाथ ॥ ते तुवां मारिले असंख्यात ॥ परी येथें न चले तव पुरुषार्थ ॥ हा लोकत्रयासी अजेय ॥ ३९ ॥ सप्त समुद्रादिक भूमंडळ ॥ जिंकोनि जिंकिलें पाताळ ॥ इंद्रादिकां देवोनि पळ ॥ स्वर्गीं ठाणें घातलें ॥ ४० ॥ सिद्ध गंधर्व यक्ष किन्नर ॥ यातें आठवितें कीं चराचर ॥ ऐसा दुंदुभीचा पराक्रम थोर ॥ ऐकोनि नृपवर घाबरले ॥ ४१ ॥ मी तुज येतों काकुळती ॥ येथोनि परतावें श्रीपति ॥ नातरी समवेत-भूपती ॥ काळवदनीं पडशील ॥ ४२ ॥ ऐकोनियां नारदाच्या बोला ॥ देव अत्यंत मानवला ॥ ह्मणे भला वृत्तांत सांगितला ॥ कृपा करूनि स्वामिया ॥ ४३ ॥ पार्थ प्रद्युम्न बभ्रुवाहन ॥ अनुशाल्व यौवनाश्व वृषकेतन ॥ वीरवर्मा चंद्रहास सहनंदन ॥ तैसाचि प्रवीर पाचारिला ॥ ४४ ॥ हंसध्वज आणि ताम्रध्वज ॥ वीरनायक नीलध्वज ॥ हे सर्व पाचारोनि गरुडध्वज ॥ तयांसी काय वचन बोलत ॥ ४५ ॥

१ मानवांच्या स्त्रिया. २ मारुतीला. ३ गजगौरीव्रत. ४ अर्जुन. ५ विशेष. ६ स्त्रिया. ७ कन्या ८ पराक्रम.

युद्धा मिसळतां दैत्यनाथ ॥ अत्यंत करील अनर्थ ॥ मजसहित मृत्युपंथ ॥ पाववील ऐसें मज वाटे ॥ ४६ ॥ अनेक गुणाच्या राशी ॥ एक मोह विभांडी क्षणार्धेंसीं ॥ कीं क्रोध संचरतां मानसीं ॥ तपांचिया कोटी विनाशी तो ॥ ४७ ॥ नातरी चौसष्ट कळांचा मेळा ॥ एकली आशा करी विकळा ॥ तेवीं तो एक तुह्मां आह्मांला ॥ ग्रासील जाण क्षणार्धें ॥ ४८ ॥ ऐकतां बभ्रुवाहन कोपला ॥ ह्मणे रणीं मी मर्दीन जी तयाला ॥ माझा पराक्रम तमाळनीळा ॥ असे देखिला स्वनेत्रीं ॥ ४९ ॥ ऐकोनि हांसला विधि-सुत ॥ तूं शूर अससी रे अद्भुत ॥ परी तुझाही न चाले पुरुषार्थ ॥ तया दैत्यनाथाचियापुढें ॥ ५० ॥ जरी दैत्यगुरु झाला तेजाळ ॥ तरी तो लोपवील काय चंद्रमंडळ ॥ नातरी क्षोभलें नदीचें जळ ॥ तरी न जिंकवे जळनिधीतें ॥ ५१ ॥ तंव ताम्रध्वज बोले आपण ॥ म्यां भूमंडळींचे जिंकोनि नृपगण ॥ केले सहा अश्वमेध पूर्ण ॥ त्या मजपुढें तो काय ॥ ५२ ॥ मग बोले दिवाकरात्मजसुत ॥ मी रणीं जिंकीन जी दैत्यनाथ ॥ रथीं बैसोनि द्वारकानाथ ॥ पाहोत कौतुक पैं माझें ॥ ५३ ॥ तयासी बोले द्रुहिणबाळ ॥ हें तुझें बोलणें निष्फळ ॥ जेवीं जांबूनदापुढें पितळ ॥ सर्वथा शोभा न पावे ॥ ५४ ॥ मग मुनीस पुसे जगज्जीवन ॥ सांगा जी दुंदुभीचें जन्मकथन ॥ तो कवणाचा असे नंदन ॥ तयासी वरदान कवणाचें ॥ ५५ ॥ चोवीस सहस्र वर्षें संपूर्ण ॥ सागरीं युद्ध करिती दारुण ॥ ते कवण स्थळींचे मीन ॥ कृपा करूनि सांगिजे ॥ ५६ ॥ तयासी ह्मणे मुनिकुळटिळक ॥ देवा तूं सर्वज्ञांचा नायक ॥ मजलागीं पुससी हें कौतुक ॥ वाटे नवल जगदीशा ॥ ५७ ॥ तथापि तुवां केला प्रश्नादर ॥ तरी तुज सांगतों सविस्तर ॥ याचें जन्मकथन समग्र ॥ ऐकें रायांसमवेत ॥ ५८ ॥ पूर्वीं दैत्यकुळीं अति थोर ॥ दैत्य झाला जी तारकासुर ॥ तेणें जिंकिलें चराचर ॥ आणि सुरवरही जिंकिले ॥ ५९ ॥ देव केले देशधडी ॥ तिहीं वळविली समुद्रथडी ॥ तेथेंही तेणें टाकूनि उडी ॥ केलीं बापुडीं देवकुळें ॥ ६० ॥ ऐसें जिंकोनि चराचर ॥ अवघा आपणचि झाला साचार ॥ बळें घेऊनि अमरपुर ॥ करीत राज्य त्रिलोकींचें ॥ ६१ ॥ तयासी असे जी वरदान ॥ शिवपुत्रहस्तें पूर्ण मरण ॥ दाक्षायणीवियोगें ईशान ॥ पूर्ण विधुरअवस्था भोगीतसे ॥ ६२ ॥ ती दीर्घकाळें गोरटी ॥ जन्मली हिमनगाचे पोटीं ॥ तिनें साधोनि तपाच्या कोटी ॥ वेगीं धूर्जटी वरियला ॥ ६३ ॥ देखोनियां दैत्यपीडा ॥ देव विनविती चंद्रचूडा ॥ ह्मणती हा मारावा दैत्य गाढा ॥ पुत्रोत्पादन करोनि ॥ ६४ ॥ शिवमृडानी अनंत काळ ॥ भोगिती रतिरसकल्लोळ ॥ तेणें गर्भ न धरीच वेल्हाळ ॥ मग देवीं अग्नि पाठविला ॥ ६५ ॥ सुरतकाळीं येतां ज्वलन ॥ शिवें दिधलें रेतदान ॥ तें तेणें करितां प्राशन ॥ तो गर्भ संभवला अग्नीसी ॥ ६६ ॥ गर्भदुःख न साहे दहन ॥ तेणें गंगोदकीं टाकिला नेऊन ॥ तेथें उपजला षडानन ॥ शरस्तंभीं शिवपुत्र ॥ ६७ ॥ अतिपराक्रमी तो शिवसुत ॥ शीघ्र झाला जी विख्यात ॥ तेणें संग्राम

१ नाश करी. २ नारद. ३ शुक्र. ४ समुद्रातें. ५ वृषकेतु. ६ नारद. ७ सोन्यापुढें. ८ मासे. ९ शंकर. १० अग्नि.

करोनि बहुत ॥ तारकासुरा मारिलें ॥ ६८ ॥ तयाचा पुत्र तो गजासुर ॥ तोही बलाढ्य झाला थोर ॥ तेणें पीडिलें चराचर ॥ देखोनि शंकर कोपला ॥ ६९ ॥ सर्वे घेवोनि वीरभद्रासी ॥ संग्राम शिवें केला त्यासीं ॥ हरें तो वधितां सायासीं ॥ तेणें शिवासी स्तवियेलें ॥ ७० ॥ तयासी हा झाला होता दुंदुभिसुत ॥ तों पितयाचा मांडिला अंत ॥ त्या वेळीं स्तविला उमाकांत ॥ वर मागितला पुत्रातें ॥ ७१ ॥ ऐसें द्यावें जी वरदान ॥ पुत्र करावा शतत्रयवदन ॥ तीन सहस्र भुजा पूर्ण ॥ द्याव्या स्वामी युद्धार्थ ॥ ७२ ॥ एकशत मुखें कुंजरांचीं ॥ एकशत मुखें मनुष्यांचीं ॥ एकशत मुखें अश्वांचीं ॥ ऐसा शतत्रयमुखीं शोभत ॥ ७३ ॥ हरिहरादिकां सर्वां अजेय ॥ ऐसा करावा माझा तनय ॥ बरवें ह्मणोनि कैलासनिलय ॥ वधिता झाला तयातें ॥ ७४ ॥ तो हा दुंदुभि महावीर ॥ शिववरें झाला बळसागर ॥ तयाच्या दृष्टीं हें चराचर ॥ तृणप्राय भासतसे ॥ ७५ ॥ तयासी झुंजे ऐसा वीर ॥ या दळीं नाहीं साचार ॥ सकळांमाजी धनुर्धर ॥ तोही नये पासंगा तयाचे ॥ ७६ ॥ तो वीर परम विख्यात ॥ तुझां सर्वांचा करील अंत ॥ ह्मणोनि ऐकावी माझी मात ॥ तेथें सर्वथा नव जावें ॥ ७७ ॥ ऐसें दुंदुभीचें जन्मकथन ॥ ऐकतां भूप झाले म्लानवदन ॥ अंतरीं संतोषला जनार्दन ॥ परम बलाढ्य ह्मणोनियां ॥ ७८ ॥ आतां पुढिले प्रसंगीं जाण ॥ मुनि सांगेल मीनआख्यान ॥ तें अति रसाळ निरूपण ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ७९ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ दुंदुभिआख्यान अगाध ॥ द्विषष्टितमोऽध्याय गोड हा ॥ ८० ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते दुंदुभ्याख्यानं नाम द्विषष्टितमोऽध्यायः ॥ ६२ ॥ अध्याय ॥ ६२ ॥ ॥ ओव्या ॥ ८० ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ व्यासचरणारविंदमधुकर ॥ जनमेजयासी बोले उत्तर ॥ ह्मणे ऐकावें विरंचिकुमर[1] ॥ कथा सांगे हरीसी ॥ १ ॥ संतोषें बोले विधिनंदन ॥ देवा व्हावें सावधान ॥ ऐकावें मगराख्यान ॥ सकळ भूपांसमवेत ॥ २ ॥ कोणे एके अवसरा ॥ स्नानसंध्येचिया विचारा ॥ मी चालिलों पूर्वसागरा ॥ प्रातःकाळीं उठोनियां ॥ ३ ॥ तों पूर्वेसी उदेला अंशुमाळी[2] ॥ तेणें नाशिली तिमिरावळी[3] ॥ विहंगम कूजेंती वृक्षडाहाळीं ॥ धेनू बाहाती वत्सांतें ॥ ४ ॥ ऐसा प्रातःकाळ जाणून ॥ समुद्रतीरा आलों धांवून ॥ जळीं रिघोनियां स्नान ॥ विधियुक्त सारिलें ॥ ५ ॥ स्नान करोनि निघालों बाहेर ॥ परिधान केलें शुक्लांबर ॥ करोनि तव नामोच्चार ॥ द्वादश टिळे रेखिले ॥ ६ ॥ हृदयीं स्मरोनि तव चरण ॥ एकाग्र केलें तेथें मन ॥ मग आरंभिलें संध्यावंदन ॥ गायत्रीमंत्र विधियुक्त ॥ ७ ॥ तों अद्भुत झालें नवल ॥ अकस्मात खळबळलें सिंधुजळ ॥ तेथोनि निघाला विक्राळ ॥ महामत्स्य ते काळीं ॥ ८ ॥ तो लांब असे शत योजन ॥ आणि द्वादश गांवें रुंद जाण ॥ बत्तीस योजनें मुख पूर्ण ॥ देखतां भयभीत मी झालों ॥ ९ ॥ मुख पसरोनि आला जवळी ॥ मस्तक ठेविला चरणकमळीं ॥ प्रार्थिता झाला मंजुळबोलीं ॥ मी शिष्य स्वामी तुमचा जी ॥ १० ॥ गायत्रीमंत्राचा उपदेश ॥ मज करावा जी सावकाश ॥ तेणें होईल दुरितनाश ॥ ऐसें ऐकतां आश्चर्य मज वाटलें ॥ ११ ॥ हा तंव नीचयोनि मकर ॥ पवित्र गायत्रीमंत्र साचार ॥ तेणें होईल पापसंहार ॥ केवीं कळलें पैं यासी ॥ १२ ॥ हा तंव अपवित्र कुयोनि मीन ॥ यासी कैसें देऊं मंत्ररत्न ॥ न देऊं तरी माझें भक्षण ॥ करील पूर्ण क्षणांत ॥ १३ ॥ करूं नये तेंही करावें ॥ परी आपलें शरीर वांचवावें ॥ मग तें हरिभक्तीस लावावें ॥ ऐसियातें पाप असेना ॥ १४ ॥ मार्गीं भेटला महातस्कर ॥ तो करूं लागला जरी संहार ॥ तेथें बोलोनि असत्योत्तर ॥ आत्मशरीर वांचवावें ॥ १५ ॥ ऐसा निश्चय करूनि पूर्ण ॥ जवळी बैसविला पाचारून ॥ मस्तकीं ठेविला करनलिन[6] ॥ आतां मंत्र सांगावा ॥ १६ ॥ तों मकर हांसोनि बोले सहज ॥ मजला सांगा आतां मंत्रराज ॥ परी म्यां अभ्यासिला जो सबीज ॥ तो स्वामींनीं ऐकावा ॥ १७ ॥ तुह्मी करितां जप त्याचा ॥ तो माझे कर्णीं पडिला साचा ॥ जरी व्यत्यय असेल वर्णस्वरांचा ॥ तरी तोचि सांगा सद्गुरु ॥ १८ ॥ वेगें करोनि मंत्रोच्चार ॥ यथोक्त मंत्र आणि स्वर ॥ ऐकतां कांपलें माझें अंतर ॥ अकार्य झालें ह्मणोनि ॥ १९ ॥ जेवीं कुयोनीमाजी पडे ब्रह्मबीज ॥ पडतां अपवित्र होय सहज ॥ नातरी होतां कृषीची अवोज ॥ पेरितां नासे बीज पहा ॥ २० ॥ हें तों अकार्य मोठें झालें ॥ मजपासोनि अंतर पडिलें ॥ परी उपायांतरीं पाहिजे केलें ॥ हरण वेगें या मंत्राचें ॥ २१ ॥ यासी करीन मी चिंतातुर ॥ सहज मग विसरेल मंत्रोच्चार ॥ कां सकळ विद्येचा होय संहार ॥ चित्तीं चिंतांकुर उगवल्या ॥ २२ ॥ जेवीं कांजी पडतां बिंदुमात्र ॥ घट भरोनि नासे क्षीरँ ॥ तेवीं सर्व सुखांचा संहार ॥ चिंता करीत क्षणमात्रें ॥ २३ ॥ जो चिंतावर्णवामाजी पडला ॥ तो परपारासी नसेचि गेला ॥ माजी विश्रांति ध्यावया तयाला ॥

---

१ नारद. २ सूर्य. ३ अंधकारसमूह. ४ शब्द करितात. ५ पापाचा संहार. ६ हस्तकमल. ७ दूध.

मध्य बेट तें असेना ॥ २४ ॥ जो चिंतावनामाजी भरला ॥ तो भ्रांतिलांसीनें ग्रासिला ॥ तो दुर्गतीतें सहज पावला ॥ नाहीं आला निजधामा ॥ २५ ॥ ऐसा चिंतेचा महिमा ॥ तुज ठाउका असे पुरुषोत्तमा ॥ हा पीडितसे पुरुष धामा ॥ विश्रांतिधामा येऊं नेदी ॥ २६ ॥ तुजही कुटुंबाची चिंता ॥ अनिवार असे अच्युता ॥ तिच्या योगें तूं अनंता ॥ काष्ठप्राय झालासी ॥ २७ ॥ वडील स्त्री अति चंचळ ॥ दुजी तों असे तोंडाळ ॥ काम पुत्र तो खळाचा खळ ॥ सकळ जगातें पीडितो ॥ २८ ॥ उदधीमाजी निद्रास्थान ॥ तेथें जळचरांचें भय दारुण ॥ आत्मशक्तीहोनि आगळें वाहन ॥ त्यासी भक्षण सर्पाचें ॥ २९ ॥ ऐसी तव कुटुंबाची चिंता ॥ तुजही नावरे सर्वथा ॥ तेथें मानवांची कोण कथा ॥ जे अज्ञानपडळें मोहिले ॥ ३० ॥ मग मी बोलिलों तयास ॥ तुज करावया मंत्रोपदेश ॥ मी आलोंसें या स्थळास ॥ अन्य प्रयोजन मज नाहीं ॥ ३१ ॥ तूं माझा झालासी शिष्यवर ॥ आतां माझें ऐकावें उत्तर ॥ येरू ह्मणे मी तव असें किंकर ॥ आज्ञा सत्वर करा जी ॥ ३२ ॥ उत्तरसमुद्राचें मज स्नान ॥ दहा सहस्र वर्षें अंतरलें जाण ॥ तेथें असे वडवानळ मीन ॥ तेणें अवरोध केला असे ॥ ३३ ॥ तो उत्तरसमुद्रींचा मीन ॥ बलाढ्य आणि विस्तीर्ण ॥ तेणें धरिलासे अभिमान ॥ तुज मारीन ह्मणतसे ॥ ३४ ॥ तूं पूर्वसमुद्रींचा विख्यात ॥ नाम तरी असे धूमकेत ॥ तयाचा मोडीं गर्वपर्वत ॥ स्वबळवज्रें करोनियां ॥ ३५ ॥ ऐसें ऐकतां माझें वचन ॥ सक्रोध झाला तो मीन ॥ ह्मणे तुमच्या प्रसादेंकरून ॥ हरीन गर्व तयाचा ॥ ३६ ॥ मग वंदोनि मम चरणांसी ॥ मीन चालिला उत्तरसिंधूसी ॥ तों पुढें पर्वत आला तयासी ॥ तेणें झाला मार्गरोध ॥ ३७ ॥ तयाच्या दाढा विक्राळा ॥ बारा गांवें कडा कापिला ॥ तेथोनि वेगें चालिला ॥ मीन पावला तो ठाव ॥ ३८ ॥ समुद्रीं केला हलकल्लोळ ॥ तों क्रोधें उठिला विक्राळ वडवानळ ॥ मग दोघांसीं झालासे मेळ ॥ दारुण युद्ध मांडलें ॥ ३९ ॥ क्रोधें संग्राम करितां ॥ परस्परें नाटोपती सर्वथा ॥ कोणी नसे त्यांसी सोडविता ॥ विरोध सहसा शमेना ॥ ४० ॥ त्यांचें युद्ध होतां सबळ ॥ शत गांवें आटलें सिंधुजळ ॥ तीन शतें लांब निर्जळ ॥ समुद्रजठर जाहलें ॥ ४१ ॥ दोघे भांडती समुद्रजळीं ॥ चोवीस सहस्र वर्षें झालीं ॥ गायत्रीमंत्राची पडली भुली ॥ ऐकोनि वनमाळी हांसतसे ॥ ४२ ॥ ते दोघे पहावे मीन ॥ आणि पहावें भोजकोटपट्टण ॥ सकळ वीरांचा अभिमान ॥ दुंदुभिप्रतापें हरावा ॥ ४३ ॥ हाचि आशय धरून ॥ सकळांसी बोले नारायण ॥ ऐकिलें हें मगराख्यान ॥ चला पाहूं तयांसी ॥ ४४ ॥ आज्ञा केली दळभारा ॥ वेगें पालाणा रे अश्ववरां ॥ शीघ्र चालवावें मत्त कुंजरां ॥ चालवा पुढें रथथाटी ॥ ४५ ॥ तों दोनी श्यामकर्ण पातले ॥ ते षोडशोपचारें पूजिले ॥ वस्त्राभरणीं गौरविले ॥ पुढें सोडिले स्वानंदें ॥ ४६ ॥ झाला शंखवाद्यांचा ध्वनि ॥ तो नाद न माये गगनीं ॥ टाळी भरली दिशांचे कानीं ॥ तळीं सहस्रफणी डळमळिला ॥ ४७ ॥ उभारिल्या आतपत्रश्रेणी ॥ तिहीं लोपला तो दिनमणि ॥ चामरें शोभती मार्गीं दोनीं ॥ नेणों तरंग गंगेचे ॥ ४८ ॥ पुढें भूपाळा झाला नारदमुनि ॥ तयासी मार्ग पुसे चक्रपाणि ॥

१ विवशी, जखीण. २ समुद्रामध्यें. ३ गरुड. ४ सेवक. ५ मोठा ध्वनि. ६ हांका. ७ हत्तींना. ८ रथांचा समुदाय. ९ अबदागिरें. १० चवऱ्या.

मागें चालतसे वीरश्रेणी ॥ जे रणरंगीं अति शूर ॥ ४९ ॥ आणिक चालिला दळभार ॥ नेणों लोटला दक्षिणसागर ॥ परी पाहातां दिसे निःसार ॥ देवें उपेक्षिला ह्मणोनि ॥ ५० ॥ नारद दावितसे गोपाळा ॥ त्या मत्स्यें हा कडा कापिला ॥ तें आश्चर्य वाटलें सकळां ॥ ऐसा बळिया मत्स्यराज ॥५१॥ अवघड मार्ग देखिला पुढां ॥ बारा योजनें तुटलासे कडा ॥ सैन्याचा होतसे रगडा ॥ वीर वेडा लागले ॥ ५२ ॥ अपार सैन्य जी भारता ॥ बारा गांवें रुंदी जातां ॥ कीं ती चालिली सैन्यसरिता ॥ दैत्यसिंधूतें मिळावया ॥ ५३ ॥ तों वीर झाले चिंतातुर ॥ परस्परें करिती विचार ॥ आतां पुढें मांडला जी संहार ॥ या अश्वमेधप्रसंगें ॥ ५४ ॥ सीमा पुरली आयुष्याची ॥ कायसी चिंता कुटुंबाची ॥ नगरी तया यमधर्माची ॥ सेवावी लागेल सर्वथा ॥ ५५ ॥ सर्वीं आतां एक करावें ॥ श्रीकृष्णपादांबुज न सोडावें ॥ आपलें जीवित्व न मानावें ॥ प्रपंचा द्यावें तिळोदक ॥ ५६ ॥ मग ऐसिया सुखापुढें ॥ कायसें भवभय बापुडें ॥ कळिकाळासी लावूं वेडें ॥ पाडूं दांताडें दुंदुभीचें ॥५७॥ ध्वजाग्रीं बैसला वायुसुत[1] ॥ तो सभोंवता मार्ग पाहात ॥ कांहीं न दिसे ह्मणत ॥ सैन्य चालतां झडझडां ॥ ५८ ॥ तों अस्ता गेला दिनमणि ॥ चालतां झाली सैन्यदाटणी ॥ तथापि गिरिपाठारींहूनि ॥ सैन्य उतरलें वेगेंसीं ॥ ५९ ॥ ठायीं ठायीं उतरलें कटक ॥ अपार दिधले जी विनॅक ॥ त्यांमाजी बैसले धरानायक ॥ मार्गश्रमें अतिकष्टी ॥६०॥ कृष्णें पाचारिले सकळ वीर ॥ तयांसीं करितसे विचार ॥ हें तों ब्रह्मारण्य असे थोर ॥ येथें जागतां बरवें असे ॥६१॥ हा तों परकीय देश गहन ॥ येथें असावें सावधान ॥ म्यां झांकिलिया नयन ॥ निजात्मधन जाईल ॥६२॥ ऐसें ऐकतां सकळ वीर ॥ निशीं सावधान समग्र ॥ स्थळोस्थळीं ठेविले राखणार ॥ शत्रुमर्दनीं क्रूर जे ॥६३॥ तीन लक्ष फिरती अश्वभार ॥ दोन लक्ष फिरती कुंजर ॥ पांच लक्ष ते धनुर्धर ॥ सैन्य रक्षिती सभोंवते ॥ ६४ ॥ बत्तीस सहस्र रणमोहरीं ॥ वाजताती सैन्याभीतरीं ॥ अन्य वाजंत्र्यांचिया गजरीं ॥ वाटे अंबरें पडेल ॥६५॥ घिरट्या घालिती जागेकर ॥ सावध जागा रे चार प्रहर ॥ बरवें ओळखा आपपर ॥ ऐसें सकळां सांगती ॥ ६६ ॥ जेथें असती महा तस्कर ॥ तेथें केवीं येईल क्षुद्र चोर ॥ होतसे हरिनामाचा गजर ॥ वीर चौफेर जागती ॥६७॥ ऐसें जागत असतां दळ ॥ तों शीघ्र झाला प्रातःकाळ ॥ कृष्ण-आज्ञा घेवोनि विरंचिबाळ[2] ॥ गेला काशीस्नानातें ॥६८॥ वेगें उठोनि पुरुषोत्तम ॥ आपला सारिला नित्यनेम ॥ मग आज्ञा करीत मेघश्याम ॥ चला ह्मणे निजसैन्यासीं ॥ ६९ ॥ ध्वजाग्रीं बैसविला कपिवर ॥ सारथि झाला जगदुद्धार[3] ॥ मध्यें बैसला अर्जुन धनुर्धर ॥ ती शोभा अपार न वर्णवे ॥ ७० ॥ तों हनुमंतासी ह्मणे वनमाळी[4] ॥ पुढें बरवा मार्ग न्याहाँळीं ॥ जेणें सैन्य चाले सुखमेळीं ॥ या दुर्घट वनामाजी ॥७१॥ तंव तयासी ह्मणे प्लवंगम ॥ मार्ग न दिसे झाला दिशाभ्रम ॥ मज वाटती परम श्रम ॥ भ्रमउद्भव होतसे ॥ ७२ ॥ मागें उडालों मी सागर ॥ वन भंगोनि मारिले वनचर ॥ रावणा त्रासोनि जाळिलें नगर ॥ युद्धीं निशाचरें मारिले ॥ ७३ ॥ ऐसी केली

१ नाश. २ मारुति. ३ तंबू. ४ आकाश. ५ नारदमुनि. ६ श्रीकृष्ण. ७ पहा. ८ वानर ( मारुति ). ९ राक्षस.

श्रीरामसेवा ॥ तेव्हां कष्ट झाले नसती जीवा ॥ आतां कष्ट होती माधवा ॥ नेणों कैसें होईल ॥७४॥ ऐसें बोलतां अंजनीसुत ॥ प्रत्युत्तर देई रमाकांत ॥ कां धीर सोडिसी रे अकस्मात ॥ काय हा पार्थ बुडविसी ॥ ७५ ॥ तुझा धरोनि भरंवसा ॥ आह्मी आलों या परदेशा ॥ कूपा[1]माजी घालोनि कैसा ॥ कां रे कापिसी दोरीतें ॥७६॥ तुझी धरोनियां कांस ॥ तरूं इच्छितों युद्धसमुद्रास ॥ मध्येंचि जरी सोडिसी आह्मांस ॥ तरी मरण जीवासी रोकडें ॥ ७७ ॥ निर्वाणींचा तवाश्रय ॥ ह्मणोनि आह्मी होतों निर्भय ॥ त्या तुवां हें धरिलें भय ॥ तरी येथेंचि आह्मी मेलों ॥७८॥ तुझेचि आश्रयें श्रीराम ॥ अत्यंत पावला विश्राम ॥ तुवांचि मेळवोनि प्लवंगम ॥ नेला राम लंकेसी ॥ ७९ ॥ तुवांचि सीताशुद्धि आणिली ॥ शिळा तारिल्या समुद्रजळीं ॥ कनक[2]पुराची केली होळी ॥ आणि दे[3]शमौळी विटंबिला ॥ ८० ॥ युद्धीं निशाचरें मारिलीं ॥ सीता रामासी भेटविली ॥ ऐसी तुवां ख्याति केली ॥ ती आह्मीं ऐकिली संतमुखें ॥८१॥ ऐसा तूं बलाढ्य विशेषीं ॥ ह्मणोनि लागलों कांसेसी ॥ आह्मां नको करूं परदेशी ॥ क्षणीं उपेक्षिसी आह्मांतें ॥ ८२ ॥ जरी माता मारील बाळकातें ॥ जरी जळ संहारील मीनातें ॥ राजा हरील सर्वस्वातें ॥ तरी कोणासी तें सांगावें ॥८३॥ काय तुवां ऐसें बोलावें ॥ या भयें द्वारावतीसी मीं जावें ॥ पार्थें अश्वमेधातें सोडावें ॥ हांसें व्हावें रायांचें ॥८४॥ घडों नये ती गोष्ट घडली ॥ ती सर्वथा पाहिजे सिद्धी नेली ॥ मध्यें सांडितां नव्हे भली ॥ हांसें होईल जगामाजी ॥ ८५ ॥ आतां मरावें कीं मारावें ॥ हेंचि सर्वी आदरावें ॥ धैर्य सर्वथा न सोडावें ॥ बलाढ्यत्व द्यावें सर्वांसी ॥८६॥ ऐसें बोलतां रमाकांत ॥ खदखदां हांसे वायुसुत ॥ अत्यंत होवोनि विस्मित ॥ कपि बोलत देवासी ॥ ८७ ॥ ह्मणे अघटितघटनाकर्मचतुरा ॥ हें काय बोलिलासी दामोदरा ॥ थिल्लराश्रयेंकरूनि सागरा ॥ काय श्लाघ्यता घडेल ॥८८॥ नातरी खद्योताश्रयें दिन[4]मणि ॥ काय श्रेष्ठत्व मानील मनीं ॥ नातरी मशकाश्रयें निर्भय मनीं ॥ महाकाळ वागेल ॥ ८९ ॥ तो काय झाला जी खरा ॥ सेवकां गौरविसी दातारा ॥ भ्रूसंकेतें चराचरा ॥ करिसी स्थित्यंतपाळण ॥९०॥ ऐसा तूं लीलाविग्रही भगवान ॥ कवणा नकळे महिमान ॥ भावें तुज यावें शरण ॥ निजस्वार्थालागोनि ॥ ९१ ॥ ऐसे दोघे बोलत बोलत ॥ वनोपवनें उल्लंघित ॥ तों सैन्य पावलें जी त्वरित ॥ काळनदीतीरासी ॥९२॥ ती देखतां काळनदी ॥ भयें कांपली वीरमांदी ॥ सोळा गांवें तयेची रुंदी ॥ खोली कूर्मपृष्ठीपर्यंत ॥ ९३ ॥ ऐसी ती काळनदी भयानक ॥ देखोनि भियालें तें कटक ॥ ठायीं ठायीं दिधले विनक ॥ यथायोग्य ते काळीं ॥९४॥ पुढें येईल विधिनंदन ॥ तो सांगेल नदीचें आख्यान ॥ सैन्य उतरवील वायुनंदन ॥ निजपुच्छेंकरूनियां ॥९५॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ आहे रसाळ सुधेसमान ॥ तेंचि ऐकावें सावधान ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥९६॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ दुंदुभिआख्यान अगाध ॥ त्रिषष्टितमाध्याय गोड हा ॥९७॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते दुंदुभ्याख्यानं नाम त्रिषष्टितमोऽध्यायः ॥६३॥ अ० ॥६३॥

---

१ विहिरीमध्यें. २ लंकेची ३ रावण. ४ सूर्य.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ भरतकुलारविंदतरणि ॥ जनमेजय पुसे जैमिनि ॥ माझा पूर्वज गांडीवपाणि ॥ कैसा तो नदी तरला ॥१॥ नदी तरावयाची चिंता ॥ सर्वथा नसे वीरपार्था ॥ जो समुद्रातें झाला बांधिता ॥ तो असे ज्याचे ध्वजाग्रीं ॥ २ ॥ आणि ज्याचें करितां नामस्मरण ॥ भवसिंधु तरिजे संपूर्ण ॥ तो रथीं लक्ष्मीरमण ॥ काय तें तरण नदीचें ॥ ३ ॥ आधींच गोड भारताख्यान ॥ त्यावरी तुझें लाघवी प्रश्नकथन ॥ तेणें लागलें अमृतासमान ॥ जेवीं घृत शर्करा क्षीरासीं ॥ ४ ॥ मग नृपासी बोले जैमिनि ॥ धन्य राया तुझी वाणी ॥ कथाक्षीरभोक्ता या जनीं ॥ तुजवांचोनि दिसेना ॥ ५ ॥ आतां होवोनि सावधान ॥ भावें ऐकावें पूर्वजाख्यान ॥ तों अकस्मात आला विधिनंदन ॥ गंगास्नान करोनि ॥ ६ ॥ तयासी पुसे जगज्जीवन ॥ सांगावें काळनदीचें कथन ॥ येरू ह्मणे ऐका सावधान ॥ सकळ रायांसमवेत ॥ ७ ॥ नारद ह्मणे चक्रपाणि ॥ कालिका नामें यमाची नंदिनी ॥ रूपें लावण्यचातुर्यखाणी ॥ नसे त्रिभुवनीं दुजी ऐसी ॥ ८ ॥ ती दिवसेंदिवस झाली उपवर ॥ तयेला यमें आणिले वर ॥ एकही तिच्या मना नये निर्धार ॥ आणि निर्भर्त्सी तयांतें ॥ ९ ॥ तों क्रोध आला दक्षिणानाथा ॥ तेणें शापिली ती दुहिता ॥ पापिष्ठे होईं घोर सरिता ॥ उत्तरसमुद्रगामिनी ॥ १० ॥ ऐसा पितृशाप ऐकतां ॥ सक्रोध झाली यमदुहिता ॥ तिणें शापिला निज पिता ॥ तूंही निर्दय होसील ॥ ११ ॥ ती ही कालिका यदुनाथा ॥ पितृशापें झाली घोरसरिता ॥ तोही निर्दय झाला समस्तां ॥ कन्याशापेंकरूनियां ॥ १२ ॥ ती ही कालिकानदी थोर ॥ यमोद्भवा महाघोर ॥ इचा केवीं पावाल पार ॥ नेणवे जी मज कांहीं ॥ १३ ॥ इसी सर्वदा नाहीं उतार ॥ नाहीं नाव ना कर्णधार ॥ मज बरवा न दिसे विचार ॥ बुडेल कीं दळभार इजमाजीं ॥ १४ ॥ आतां तुह्मीं एक करावें ॥ शीघ्र द्वारकेसी जावें ॥ या दुराग्रहातें सोडावें ॥ तरीच मज बरवें वाटे ॥ १५ ॥ नातरी एक करावें ॥ या अंजनीसुतातें प्रार्थावें ॥ तो आपले निजबळप्रभावें ॥ सैन्य नेईल परतीरा ॥ १६ ॥ हें वचन मानलें कृष्णनाथा ॥ जवळी पाचारिलें प्राणनाथसुता ॥ ह्मणे तूं होईं सकळांसी तारिता ॥ या कालनदीमाझारीं ॥ १७ ॥ या कालनदीचा ओघ कैसा ॥ केशही तुटोनि जाय सहसा ॥ तेथें मनुष्य कीटक कायसा ॥ मज तों महाभय वाटे ॥ १८ ॥ या कालनदीमाजी जे पडिले ॥ ते पुनः नाहीं परतले ॥ इणें जे नर बुडविले ॥ ते नेले तळातळा ॥ १९ ॥ ह्मणोनियां प्लवंगमनाथा ॥ होईं तूं सकळांचा प्राणदाता ॥ उपकारपुष्पें तुरंबीं माथां ॥ जग हें भरीं कीर्तीनें ॥ २० ॥ ही कालनदी अति दुस्तर ॥ इयेमाजी नौका वायुकुमर ॥ कृष्णादिक झाले कर्णधार ॥ हा यशसागर विस्तारीं ॥ २१ ॥ हांसोनि बोले अंजनीबाळ ॥ तुजपुढें तो मशक काळ ॥ तें तूं कालनदीचें जलकल्लोळ ॥ देखोनि लटिका कां भीसी ॥ २२ ॥ तूं लीलालाघवी हृषीकेशी ॥ निजभक्तमहिमा वाढविसी ॥ तव कृपाबळें सकळ सैन्यासी ॥ नेईन परपारा क्षणार्धें ॥ २३ ॥ ऐसें

१ भरतकुलरूपी कमलाला सूर्य. २ नारद. ३ मुलगी. ४ यमाला. ५ भयंकर नदी. ६ नावाडी. ७ मारुतीला. ८ हे मारुते. ९ मायाचक्रचालक.

बोलोनि पवनसुत ॥ पुच्छ लांबविलें अद्भुत ॥ बारा योजनें रुंद गणित ॥ चोवीस गांवें लांबी ते ॥ २४ ॥ ऐसा काळनदीस पुच्छाचा पुरा ॥ सेतु केला ते अवसरां ॥ कृष्णें आज्ञा केली सर्व वीरां ॥ चला पैलपारा सत्वर ॥ २५ ॥ मग क्षणामाजी अवधारा ॥ सैन्य पावलें परतीरा ॥ आनंद झाला सकळ वीरां ॥ कपीश्वरातें वर्णिती ॥२६॥ संतोष मानिला कुंतीसुतें ॥ थोर यश घेतलें हनुमंतें ॥ सैन्य चालिलें संतोषचित्तें ॥ भोजकोट नगरासी ॥२७॥ छत्र ध्वज पताका शोभती ॥ नाना वाद्यें वाजती ॥ पुढें श्यामकर्ण चालती ॥ मागें दळभार येतसे ॥ २८ ॥ ध्वजाग्रींहूनि कपीश्वर ॥ ह्मणे हें भोजकोट नगर ॥ चौदाशत गांवें तयाचा विस्तार ॥ तेथें राजा दुंदुभी ॥ २९ ॥ नगरासभोंवत्या रक्षणार्थ ॥ चौकिया ठेविल्या अनंत ॥ त्या देखोनि भयभीत ॥ वीर बोलती पार्थाचे ॥ ३० ॥ पार्थात्मज[2] आणि कर्णनंदन[3] ॥ पुढें दोघे करिती गमन ॥ तिहीं सैन्य देखिलें दुरोन ॥ काळचक्रासारिखें ॥ ३१ ॥ त्या सैन्याचा अधिनाथ ॥ ध्रुवमंडळ नामें विख्यात ॥ तयाचे वीर आले धांवत ॥ तिहीं धरोनि अश्व नेले ॥ ३२ ॥ तें वृषकेतें देखोनि डोळां ॥ वेगीं दळेंसीं धांवला ॥ सवेंचि बभ्रुवाहन लोटला ॥ मनोवेगें निजसैन्येंसीं ॥ ३३ ॥ दोहीं सैन्यां झाली मिळणी ॥ वर्षों लागले अमित बाणीं ॥ वीरांची झाली झोटधरणी[4] ॥ येरयेरां नाटोपती ॥ ३४ ॥ बाण सुटती सणसणा ॥ शस्त्रें वाजती खणखणा ॥ वीर धांवती दणदणा ॥ तेणें क्षिती[5] दणाणिली ॥ ३५ ॥ अश्व गज रथ पदाती ॥ परस्परें मिसळले नेणों किती ॥ मारितां आप पर नोळखती ॥ शस्त्रें खोंचिती वर्मस्थानीं ॥ ३६ ॥ तेथें मातला कोलाहल ॥ वाहे शोणितांचा[6] खळाळ ॥ क्रोधें खवळलें उभय दळ ॥ घुमों लागली रणभूमी ॥ ३७ ॥ वीरें वीर पाडिले रणीं ॥ रक्तें न्हाणिली ती धरणी[7] ॥ वीरमुखकमळश्रेणी[8] ॥ पडती अवनीं शरघातें ॥ ३८ ॥ तों पार्थदळभार मोडला ॥ हें वृषकेतें देखोनि डोळां ॥ क्रोधें मारीत चालिला ॥ अमित बाण ते समयीं ॥ ३९ ॥ तैसाचि उठिला बभ्रुवाहन ॥ वर्षों लागला अमित[9] बाण ॥ शरें व्याप्त केलें गगन ॥ न दिसे तपन[10] कवणासी ॥ ४० ॥ मारीत चालिले दोघे वीर ॥ वर्षती बाणांचा पूर ॥ सैन्यीं सुटला हाहाकार ॥ दुंदुभीची सेना पळतसे ॥ ४१ ॥ ऐसा ऐकोनि कोलाहल ॥ कोपें धांवला तो ध्रुवमंडळ[11] ॥ जेवीं खवळला महाकाळ ॥ तसा मारीत चालिला ॥ ४२ ॥ ध्रुवमंडळ ह्मणे अरे वीरा ॥ तुह्मी कां धांवतां सैरावैरा ॥ आतां साहावें माझिया शरा ॥ ह्मणोनि लोटला दोघांवरी ॥ ४३ ॥ लागतां तयाचे दारुण बाण ॥ दोघे पडिले मूर्च्छा येऊन ॥ सैन्य करीतसे पलायन ॥ भयेंकरोनि पार्थाचे ॥ ४४ ॥ ऐसा जय घेवोनि ध्रुवमंडळ ॥ शीघ्र पावला निजस्थळ ॥ वीरां बोलतसे बोल ॥ न्यावे श्यामकर्ण नगरांत ॥ ४५ ॥ हे तों पांडवांचे श्यामकर्ण ॥ दाखवावे दैत्येशालागून ॥ हें सकळ सांगोनि वर्तमान ॥ अश्वशाळेसीं बांधावे ॥ ४६ ॥ बरवें ह्मणोनि सेवकगण ॥ घेवोनि गेले श्यामकर्ण ॥ तों इकडे काय झालें कथन ॥ तें श्रवणीं

१ अर्जुनानें. २ बभ्रुवाहन. ३ वृषकेतु. ४ धांदल. ५ पृथ्वी. ६ रक्ताचा. ७ पृथ्वी. ८ वीरांच्या मुखरूपी कमलांची पंक्ति. ९ अनंत. १० सूर्य. ११ दुंदुभीचा सेनापति.

अवधारा ॥ ४७ ॥ भंगोनि आलें जें पार्थदळ ॥ तें कृष्णापासीं बोलिलें विकळ ॥ युद्ध केलें जी तुंबळ ॥ पार्थात्मजें आणि वृषकेतें ॥ ४८ ॥ वीरें वीर पाडिले रणीं ॥ सकळांस झाली झोटधरणी ॥ शोणितें न्हाणिली अवनी ॥ वीरश्रेणी आटल्या ॥ ४९ ॥ पळों लागलें दैत्यदळ ॥ देखोनि धांवला ध्रुवमंडळ ॥ नेणों साक्षात तो काळ ॥ निजसैन्येंसीं धांवला ॥ ५० ॥ तेणें सोडोनि अमित शर ॥ वेगें भंगिला दळभार ॥ अवनीस लोटला रक्तपूर ॥ वीरें वीर निमाले ॥ ५१ ॥ सोडोनियां शरसंधान ॥ आच्छादिलें सकळ सैन्य ॥ कर्णात्मज आणि बभ्रुवाहन ॥ रणीं पाडिले मूर्च्छित ॥ ५२ ॥ दोंनी घेवोनि श्यामकर्ण ॥ शीघ्र पावला तो निजस्थान ॥ ऐसें ऐकतां नंदनंदन ॥ ह्मणे दारुण ओढवलें ॥ ५३ ॥ कृष्ण आणि हनुमंत ॥ परस्परें बोलती मात ॥ हा तों ओढवला आकांत ॥ कैसें आतां करावें ॥ ५४ ॥ हनुमंत ह्मणे वनमाळी ॥ तयासीं करणें हातोफळी ॥ ऐसा वीर आमुचे दळीं ॥ नाहीं हें काय कृष्णा तुह्मी नेणां ॥ ५५ ॥ ऐकोनि कोपला परंतप ॥ ह्मणे तुह्मी नेणा माझा प्रताप ॥ म्यां जिंकोनियां सप्तद्वीप ॥ जिंकिले सर्व धरापती ॥ ५६ ॥ तों कोधें बोले कृष्णपुत्र[1] ॥ मी तयाचा करीन एक कवळ ॥ कां पार्था होसी विकळ ॥ या वनचराच्या शब्दानें ॥ ५७ ॥ क्रोधें बोले कामकुमर[2] ॥ मीच करीन त्याचा संहार ॥ काय करितां विचार ॥ चला सकळ युद्धासी ॥ ५८ ॥ तेथोनि चालिला दळभार ॥ होत वाद्यांचा गजर ॥ छत्रचामरांचे भार ॥ तिहीं दिनकर[3] लोपला ॥ ५९ ॥ ऐसें चालिलें सकळ दळ ॥ तों पुढें देखिला ध्रुवमंडळ ॥ तेथेंचि थोकले सकळ ॥ जेवीं गंगाजळ शैलरोधें[4] ॥ ६० ॥ वातात्मजा बोले वनमाळी ॥ तूं सावधान न्याहाळीं ॥ येरू ह्मणे सिंधुजळकल्लोळीं ॥ दाटलें दिशा अंबर ॥ ६१ ॥ पाहातां उत्तर दिशेकडे ॥ दिसती सिंधुतरंगांचे हुडे ॥ ज्यांतें देखतां भ्रांति पडे ॥ कळिकाळाचिये मानसीं ॥ ६२ ॥ दिसतें भोजकोट नगर ॥ चौदाशत गांवें सविस्तर ॥ जयासी खंदक असे सागर ॥ दुर्गप्राकार[5] गगनचुंबी ॥ ६३ ॥ तेथींची पाहातां रचना ॥ सुखाचीं दोंदें निघती नयना ॥ जी न वर्णवे सहस्रवदना[6] ॥ ती काय वनचरा वर्णवे ॥ ६४ ॥ विश्वकर्म्याचें तपफळ ॥ काय नगररूपें गोठलें सकळ ॥ चातुर्यसरितेचे कल्लोळ ॥ काय तेथेंचि आटले ॥ ६५ ॥ न सांगवे नगरस्वरूप ॥ माजी असे दिव्य सभामंडप ॥ येथें बैसला दैत्यकुळदीप ॥ दुंदुभि नामे प्रतापी ॥ ६६ ॥ तया सभामंडपाची रचना ॥ पाहातां टक पडे सहस्रनयना ॥ सकळ वेंचोनि चातुर्यधना ॥ विश्वकर्म्यानें रचिला जो ॥ ६७ ॥ तो बत्तीस योजनें[8] विस्तृत ॥ सोळा गांवें रुंद निश्चित ॥ कनकबद्ध रत्नखचित ॥ उंचपणें आकाश लोटी ॥ ६८ ॥ खांब उथाळीं तुळवट ॥ कड्या किलचा अडवट ॥ अवघे नवरत्नजडित स्पष्ट ॥ पायऱ्या प्रगट सूर्यकांताच्या ॥ ६९ ॥ कनकरत्नेंकरूनि खचित ॥ अवघें सभांगण लखलखित ॥ जळीं स्थळाचा भ्रम करित ॥ स्थळीं भ्रम होत जळाचा ॥ ७० ॥ ऐसिया मंडपीं सुलक्षण ॥ बत्तीसखणी सिंहासन ॥ त्यावरी बैसला आपण ॥

---

१ प्रद्युम्न. २ अनिरुद्ध. ३ सूर्य. ४ दगडांच्या बांधानें. ५ मारुतीला. ६ किल्ल्याचा तट. ७ शेषाला. ८ योजन=चार कोस.

दुंदुभि राजा तेथींचा ॥ ७१ ॥ तीन सहस्र जयासी भुजा ॥ तीन शतें मस्तकें वोजा ॥ ऐसा भोजकोट नगरींचा राजा ॥ बैसलासे सिंहासनीं ॥ ७२ ॥ शिरीं तीन शत छत्रें शोभती ॥ तितकींच चामरें उडती ॥ अवघीं कनकदंडें विराजती ॥ कळस जिंकिती सहस्रकरा ॥ ७३ ॥ जेवीं नभमंडळीं चंद्रबिंब ॥ ऐसा दुंदुभि शोभे स्वयंभ ॥ भोंवते नृपांचे कदंब ॥ नेणों नक्षत्रें उगवलीं ॥ ७४ ॥ मुख्य सहस्र नृपावळी ॥ ती दुंदुभिमूर्तिप्रभावळी ॥ ज्याच्या तेजें लाजोनि अंशुमाळी ॥ वाटे पावे अस्तमाना ॥ ७५ ॥ रूपें जिंकी रतिवल्लभा ॥ ऐसी शोभे नृपसभा ॥ मध्यें कनककर्दळीचा गाभा ॥ दुंदुभि आपण शोभत ॥ ७६ ॥ पुढें हय उभे दशकोटी ॥ तैशाचि उभ्या कुंजरथाटी ॥ तदर्ध उभ्या रथांचिया कोटी ॥ तेथें पायदळा कोण गणी ॥ ७७ ॥ तेथें नसे चिंतेची वार्ता ॥ ह्मणोनि करिती नाना कथा ॥ पुढें नृत्यांगना नाचती बहुता ॥ नखाग्रीं ज्यांचे देवांगना ॥ ७८ ॥ मृगमद केशर कर्पूर ॥ तयांचा सुगंध उठिला अपार ॥ नाना वाद्यांचा होत गजर ॥ भाट गर्जती मेघापरी ॥ ७९ ॥ ऐसिया सभेंत विराजमान ॥ दुंदुभि बैसला सुलक्षण ॥ सेवक घेवोनि श्यामकर्ण ॥ गेले दुंदुभिजवळिकें ॥ ८० ॥ दैत्यें देखतां श्यामकर्ण ॥ सुखें दोंदील झाले नयन ॥ ह्मणे धन्य निर्मिता चतुरानन ॥ जेणें हयरत्नें निर्मिलीं ॥ ८१ ॥ दुंदुभि तयांसी पुसे आपण ॥ हे कोणाचे आणिले श्यामकर्ण ॥ भृत्य ह्मणती भाळपत्र वाचून ॥ वर्तमान जाणावें ॥ ८२ ॥ तों वेगें पुरोहित उठिला ॥ तेणें पत्रार्थ ध्यानासीं आणिला ॥ मग घडघडां वाचों लागला ॥ दैत्यापुढें संतोषें ॥ ८३ ॥ स्वस्तिश्री कुरुकुळभूषण ॥ कुंजरपुराधीश धर्मनंदन ॥ तयासी घडली गोत्रवधकल्पना जाण ॥ ह्मणोनि मांडिला अश्वमेध ॥ ८४ ॥ ह्मणोनि अश्व दिधला सोडोनि ॥ सवें रक्षण गांडीवपाणि ॥ असे त्याचा सारथि चक्रपाणि ॥ तो वीर-चूडामणि सवें असे ॥ ८५ ॥ जयासी असेल बळाचा गर्व ॥ तेणेंचि धरावा हा अश्व ॥ युद्ध करोनि सुभद्राधव ॥ निजप्रतापें सोडवील ॥ ८६ ॥ हें न होय तरी पार्थासी शरण ॥ होऊनि पूजावा श्यामकर्ण ॥ करभार देऊनि कोटि सुवर्ण ॥ मग रक्षण हयां करावें ॥ ८७ ॥ ऐसा ऐकोनि पत्रार्थ ॥ खदखदां हांसला दैत्यनाथ ॥ तुह्मांसी कैसे झाले हय प्राप्त ॥ सैन्य कितीक ह्मणे सांगा ॥ ८८ ॥ सेवक ह्मणती दैत्यनाथा ॥ अपार आहे सैन्यसरिता ॥ त्यांतून आले उभयतां ॥ महारणप्रतापी ॥ ८९ ॥ जयाचा पितामह दिवाकर ॥ जयाचा जनक कर्णवीर ॥ तो वृषकेतु परम शूर ॥ तैसाचि वीर बभ्रुवाहन ॥ ९० ॥ यौवनाश्व आणि प्रवीर ॥ अनुशाल्वादि महाशूर ॥ संगें विराजे दळ अपार ॥ बळसागर दिसती पैं ॥ ९१ ॥ ऐसें सैन्य येत मागें ॥ पुढें धांवले वीर दोघे ॥ त्यांपुढें अश्व हे चालती वेगें ॥ जे वस्त्राभरणीं पूजिले ॥ ९२ ॥ ते आमुचे वीरीं देखिले ॥ अश्वदर्शनीं चित्तीं भुलले ॥ बळें धरोनि आणिले ॥ नेऊनि दिधले ध्रुवमंडळा ॥ ९३ ॥ धरिले देखोनि श्यामकर्ण ॥ दोघे वीर धांवले प्रलयाग्न ॥ वृषकेतु आणि बभ्रुवाहन ॥ तिहीं दारुण युद्ध

१ सोन्याच्या दांड्यानें. २ सूर्याला. ३ समुदाय. ४ राजांची पंक्ति. ५ मदनाला. ६ कस्तूरी. ७ ब्रह्मदेव. ८ अर्जुन. ९ श्रीकृष्ण.

केलें ॥ ९४ ॥ मग तो ध्रुवमंडळ उठावला ॥ तेणें संहारिलें त्यांचे दळा ॥ वृषकेतु बभ्रुवाहन पाडिला ॥ मूर्च्छायमान क्षणांत ॥ ९५ ॥
आज्ञा दिधली आह्मांलागून ॥ हे राया दाखवावे श्यामकर्ण ॥ वेगें आह्मी आलों घेऊन ॥ इतुकें कथन पैं झालें ॥ ९६ ॥ ऐसें
दूतवाक्य ऐकतां दुंदुभी ॥ हांसे जेवीं वाजे रणदुंदुभी ॥ प्रतिशब्द न माये नभीं ॥ हातें टाळिया पीटित ॥ ९७ ॥ मग दुंदुभि
तयांतें पुसे ॥ तें सैन्य कितीक रे असे ॥ ऐकतां बोलती सेवक संतोषें ॥ दैत्याधीशा परिसावें ॥ ९८ ॥ तें सैन्य नेणवे अपार ॥
वाटे लोटला दक्षिणसागर ॥ तथापि त्याचा होईल संहार ॥ तूं कुंभकुमर पावतांचि ॥ ९९ ॥ ध्वजाग्रीं असे हनुमंत ॥ रथीं सारथि
भगवंत ॥ मध्यें बैसला सुभद्रानाथ ॥ भोंवतीं शोभे नृपावळी ॥ १०० ॥ ऐसें ऐकतां भृत्यबोला ॥ पुनः दैत्यराजा हांसिन्नला ॥
नेणों प्रळयकाळींचा गडगडिला ॥ नभमंडळीं बलाहक ॥ १ ॥ आतां आपलें थोरपण ॥ स्वमुखें बोलेल दुंदुभि आपण ॥ पांडवांसी
देईल दूषण ॥ बळाभिमानेंकरोनियां ॥ २ ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ आहे गोड सुधेसमान ॥ तेंचि ऐकावें सावधान ॥ ह्मणे श्रीधर
श्रोतयां ॥ ३ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ दुंदुभिआख्यान अगाध ॥ चतुःषष्टितमोऽध्याय गोड हा ॥ १०४ ॥
इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते दुंदुभ्याख्यानं नाम चतुःषष्टितमोध्यायः ॥ ६४ ॥ ॥ अध्याय ॥ ६४ ॥ ॥ ओव्या ॥
॥ १०४ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ मग हांसोनि बोले दैत्यनाथ ॥ ह्मणे हें केवढें कौतुक अद्भुत ॥ सहस्रकरापुढें[1] खद्योत[2] ॥ मिरवीन ह्मणे निजतेजा ॥ १ ॥ नातरी मुखवातें[3] उडे जो तूळ[4] ॥ तो ह्मणे मी जिंकीन प्रळयानिळ[5] ॥ कीं मातला जंबुकाचा[6] बाळ ॥ तो मारीन ह्मणे केसँरीतें[7] ॥ २ ॥ तोचि न्याय येथें घडला ॥ येथें काय ह्मणोनि पाथ आला ॥ स्वयें सर्पमुखीं येवोनि पडिला ॥ पार्थदर्दुर[8] मज वाटे ॥ ३ ॥ श्रवणीं पडतां माझें नाम ॥ धाकें चळचळां कांपे यम ॥ इंद्र सोडोनियां गृहाश्रम ॥ गेला कोठें कळेना ॥ ४ ॥ माझ्या प्रतापनिजतेजें ॥ लाजोनि जाइजे दिनराजें ॥ तेव्हां नृपनक्षत्रावळी सहजें ॥ लोपोनि होइजे निस्तेज ॥ ५ ॥ माझ्या प्रतापानळाची ज्वाळा ॥ लागोनि कूर्मराज संतापला ॥ ह्मणोनि उदकीं दडोनि ठेला ॥ अद्यापि नये बाहेरी ॥ ६ ॥ माझी कीर्ति दाटोनि प्रबळ ॥ तिणें विश्व केलें हें धवळ ॥ जवळी असतांही भूतपाळ ॥ न दिसे तेणें गौरीसी ॥ ७ ॥ इंद्र शोधितसे ऐरावत ॥ कीं हिमगिरि शोधित भूनाथ ॥ कीं क्षीरनिधि पाहे रमाकांत ॥ कोठें हरपला ह्मणोनि ॥ ८ ॥ कीर्तिहंसिनी गेली सत्यलोका ॥ ती विधिवाहनासीं रमली देखा ॥ येतां नभीं आडखळे ऐका ॥ तो चंद्र झाला या लोकीं ॥ ९ ॥ कीर्ति बळेंचि गेली पाताळा ॥ तिणें सहस्रफणी धवल केला ॥ तिणेंचि भागीरथीजळाला ॥ शुभ्रता केली दुग्धवत ॥ १० ॥ माझी ऐकतांचि आरोळी ॥ बैसलीं दिग्गजांचीं टाळीं ॥ ब्रह्मांडगोळ चेंडूफळी ॥ खेळेन ऐसा बलाढ्य मी ॥ ११ ॥ माझा ऐकतां चापटणत्कार ॥ शीतज्वरें कांपे वैश्वांनर[9] ॥ तृणापरी उडती गिरिवर ॥ बाणपिच्छवायु लागतां ॥ १२ ॥ माझा ऐकतां रथघडघडाट ॥ होय अमरस्थळाचें कूट ॥ चालतां धरणी होय पीठ ॥ कष्ट होती नागराजा ॥ १३ ॥ माझ्या प्रतापें सिंधु होता शोषिला ॥ तो रिपुस्त्रियानेत्राश्रूनें पूर्ण केला ॥ तेणें क्षारता आली तयाला ॥ तें नेणोनि ह्मणती द्विजमूत्र ॥ १४ ॥ माझा लागतां कनकमुगुट ॥ होय महाकाळाचा हृदयस्फोट ॥ त्या मानवांचा मज भरितां घोट ॥ क्षणही एक न लागे ॥ १५ ॥ माझा सैन्यरेणु जो उडाला ॥ तेणें सागरीं चिखल केला ॥ येतां त्या पंकें चंद्र माखला ॥ तो पंक ह्मणती कलंक ॥ १६ ॥ माझे शतकोटी असती अश्ववर ॥ सत्तरकोटी महाकुंजर[10] ॥ साठ कोटी रथपरिवार ॥ गणील कोण पदातींतें ॥ १७ ॥ इतकें सैन्य माझे घरचें ॥ जें घोट भरी कळिकाळाचें ॥ एऱ्हवीं मांडलिक नृपांचें ॥ गणितां त्याचे कोण गणक ॥ १८ ॥ जो गृहभक्षक घडघडाट ॥ तयासी पापड होय कपाट ॥ जो सिंधुपानीं अतिउद्भट ॥ त्यासी थिल्लर तें आचमन ॥ १९ ॥ तेवीं हस्तिनावतीचा तो माळी ॥ मजसी घेईन ह्मणतो हातोफळी ॥ एवढी भुली तयासी पडली ॥ ईश्वरमाया घडवित ॥ २० ॥ येथें अठरा कोटी जनबाळकें ॥ बिदोबिदीं खेळती कौतुकें ॥ तींच करतील पार्थसैन्य भातुकें ॥ हें काय त्यातें न कळे हो ॥ २१ ॥ काळयवनापुढें काढिला पळ ॥ तो सारथि त्याचा गोपाळ ॥ जरासंधापुढें मथुरास्थळ ॥ टाकोनि द्वारका वसविली ॥ २२ ॥

---

१ सूर्यापुढें. २ काजवा. ३ फुंकरानें. ४ कापूस. ५ प्रलयकाळचा वायु. ६ कोल्ह्याचा. ७ सिंहाला. ८ अर्जुन हाच कोणी एक बेडूक. ९ अग्नि. १० मोठे हत्ती.

पर्णभक्षकांमाजी श्रेष्ठ ॥ ताम्रमुखी तो मर्कट ॥ या दोघांच्या बळें पार्थ नीट ॥ काय बलाढ्य जाहला ॥ २३ ॥ जरी अपार आली टोळसेना ॥ तरी ती अग्नि भेटतां दिसेना ॥ नातरी तृणें रोधिल्या दहना[1] ॥ नाश कोणाचा अवधारा ॥ २४ ॥ जें नायकवे जें न बोलवे ॥ तेंचि कौतुक घडोनि आलें दैवें ॥ हें आठवोनि किती हांसावें ॥ ऐसें दैत्यपुंगवें बोलिजेलें ॥ २५ ॥ माझे बाणां उपोषण पडिलें ॥ त्यांसी हे वीर पारण्यासी आले ॥ तयांचिया क्षुधानळें ॥ तृप्ति होइजे सर्वार्थी ॥ २६ ॥ श्यामकर्ण बांधा जा अश्वशाळे ॥ पाहूं चला युद्धाचे सोहळे ॥ ह्मणोनि सकळां सुचविलें ॥ सिद्ध व्हावें ह्मणोनि ॥ २७ ॥ आज्ञा दिधली सेवकजनां ॥ सैन्य पालाणा रे पालाणा ॥ घाव दिधला निशाणा ॥ हडबड झाली सकळांसी ॥ २८ ॥ छप्पन्न कोटी रथपरिवार ॥ साठ कोटी मत्त कुंजर[2] ॥ शत कोटी अश्वभार ॥ पायभारां मीत[3] नाहीं ॥ २९ ॥ एक लक्ष खड्गाभरणें ॥ तितुकींच शोभती ओडणें ॥ दोन लक्ष तूणीर[4] बाणें ॥ भरोनि बांधित पाठीसी ॥ ३० ॥ तीन लक्ष शक्ति सबळ ॥ अठरा लक्ष त्रिशूळ ॥ चौदा लक्ष गदा सोज्ज्वळ ॥ इतर हातेरां मीत नाहीं ॥ ३१ ॥ तीन लक्ष वाजंतरें ॥ सैन्यामाजी वाजती गजरें ॥ तेणें दिग्गजकर्णटाळें ॥ बधिर झालें अखंड ॥ ३२ ॥ एक लक्ष शोभती छत्रें ॥ दोन लक्ष चामरें विचित्रें ॥ शिबिका[5] पंचलक्ष कनकसूत्रें ॥ ज्या बांधिल्या हो स्थळोस्थळीं ॥ ३३ ॥ वीस सहस्र वेत्रधार[6] ॥ वीरांसी करिती हाकार ॥ लक्ष भाँट[7] करिती गजर ॥ धाडी पुढें लक्ष गाती ॥ ३४ ॥ इतुकें सैन्य दुंदुभीचें ॥ यावेगळें मांडलिकांचें ॥ नगराबाहेर निघालें साचें ॥ धाकें दचकला महाकाळ ॥ ३५ ॥ सैन्यधुळी जी उडाली ॥ तिणें बुडोनि गेला अंशुमाळी[8] ॥ पंकें[9] झाला समुद्रजळीं ॥ दिग्गजादि गण न दिसती ॥ ३६ ॥ ऐसें सैन्य दाटलें नगरांत ॥ मग प्रधान रायासी विनवित ॥ दारवटे उघडावे कीं त्वरित ॥ सैन्य बाहेर जावया ॥ ३७ ॥ चौदा शत वेशी तया नगरा ॥ शत शतें खिडकिया अवधारा ॥ तितुक्या उघडितां दळभारा ॥ झाला अवकाश जावया ॥ ३८ ॥ नगराबाहेरी सैन्य आलें ॥ मग तयाचें गणित आरंभिलें ॥ तें सावधान पाहिजे ऐकिलें ॥ जैमिनि ह्मणे जनमेजयातें ॥ ३९ ॥ तेरा शत मुख्य प्रधान ॥ पांच शत मांडलिकगण ॥ सिंहासनाधिकारी नृपजन ॥ तीन शतें वेगळे ॥ ४० ॥ शत कोटी अश्वस्वार ॥ सत्तर कोटी मत्त कुंजर ॥ साठ कोटी रथपरिकर ॥ पायभारां मीत नाहीं ॥ ४१ ॥ छत्र ध्वज चामरें पताका ॥ गणित झालें कोटी देखा ॥ चाळीस लक्ष आल्या शिबिका ॥ सुखासनें लक्ष गणित ॥ ४२ ॥ वाजंतरें आणि भाट ॥ गणित झालें लक्ष साठ ॥ ऐसें गणित झालें घनदाट ॥ भरावया घोट सकळांचा ॥ ४३ ॥ रत्नखचित त्या परिवारा ॥ बरव्या घातल्या असती पांखरा ॥ त्यांचिया तेजें दिनकरा ॥ मंदता आली सहजचि ॥ ४४ ॥ ऐशीं लक्ष मत्त भद्रजाती[10] ॥ पाईं कनकशृंखळा शोभती ॥ रत्नखचित अंबरें दिसती ॥ जेवीं गगनोदरीं विमानें ॥ ४५ ॥ पंच रंगांच्या पत्रवल्ली ॥

१ अग्नीला. २ हत्ती. ३ गणती. ४ बाणांचे भाते. ५ पालख्या. ६ छडीदार. ७ स्तुतिपाठक. ८ सूर्य. ९ चिखल. १० हत्ती.

अत्यंत शोभती गजभाळीं ॥ गंडस्थळें शोभती अलिकुळीं[1] ॥ अंकुश त्यांवरी कनकाचे ॥ ४६ ॥ घंटा वाजती त्या अनेक ॥ शब्दें लाजले बलाहक[2] ॥ रथ चालिले जैसे अर्क[3] ॥ पार्थाधिकार हरावया ॥ ४७ ॥ चंद्रापरी छत्रें शोभती ॥ जडित मुक्तें नक्षत्रपंक्ती ॥ कळशीं गुरुकवी झळकती ॥ जाण सुरनदी[4] पताका त्या ॥ ४८ ॥ दणाणिलीं सप्तपाताळें ॥ उसळलीं सप्त सागरांचीं जळें ॥ डळमळिलीं धरेचीं मौळें ॥ मेरुसहित अवधारा ॥ ४९ ॥ तो दुंदुभि रथावरी बैसला ॥ तों स्वर्गीं कोलाहलरव झाला ॥ इंद्र सिंहासनाखालीं पडला ॥ अष्ट दिक्पाळांसमवेत ॥ ५० ॥ छत्तीस योजनें रथविस्तार ॥ दाहा सहस्र योजिले हयवर ॥ शत योजनें ध्वज थोर ॥ भैरवाष्टक शोभे त्या अग्रीं ॥ ५१ ॥ अष्ट भैरव तेथें सकळ ॥ तिहीं देखिलें पांडवदळ ॥ मग हांसोनि बोलती बोल ॥ दुंदुभीसी ते वेळीं ॥ ५२ ॥ तेथें पांडवांचें सर्व सैन्य ॥ देखिलें अल्प जाण ॥ जेवीं मध्यान्हकाळीं धेनुगण ॥ वृक्षातळीं बैसती ॥ ५३ ॥ ऐसियासीं युद्ध करणें ॥ जगीं होय लाजिरवाणें ॥ ह्मणोनि सेनापतीस आज्ञा देणें ॥ तो संहारील समस्तां ॥ ५४ ॥ तंव बोले प्रधान चंद्रबिंब ॥ फोडोनि द्यावा सिंधूचा तुंब ॥ तेणें बुडवावा सैन्यकदंब ॥ राया समूळ पार्थाचा ॥ ५५ ॥ तयासी बोले दैत्यभूषण ॥ ह्मणे बोलिलासी अयोग्य वचन ॥ म्यां सागरासीं जावें शरण ॥ धिग् जिणें तेणें माझें ॥ ५६ ॥ श्रेष्ठाचा हा उत्तम गुण ॥ धर्मयुद्ध करावें दारुण ॥ बळें जिंकावे शत्रुगण ॥ परी कपट न करावें ॥ ५७ ॥ कपट केलें वैकुंठपीठें[5] ॥ जयद्रथ मारिला कपटें ॥ आणि जरासंध मारिला हटें ॥ कपटविद्येंकरूनि ॥ ५८ ॥ सिंधुपुत्र तो जालंधर ॥ कपटें केला त्याचा संहार ॥ भीष्मद्रोणादि कर्ण वीर ॥ हे कपटेंकरूनि निर्दाळिले ॥ ५९ ॥ जन्मापासोनि आजिवरी ॥ कृष्णें कपटेंचि मारिले वैरी ॥ ही त्यासचि करणी साजिरी ॥ आह्मांकारणें अति निंद्य ॥ ६० ॥ पूर्वावतारीं कपटमेळीं ॥ मारोनि टाकिला वीर वाळी ॥ पूर्वाभ्यासें हा वनमाळी ॥ येथेंही कपट करील ॥ ६१ ॥ त्या कृष्णाची करणी आपण ॥ सर्वथा न करावी जाण ॥ येथें जो करील कपटगण ॥ छेदीन शिर तयाचें ॥ ६२ ॥ येरीकडे कथानुसंधान ॥ हळू हळू येतसे पांडवसैन्य ॥ द्वादश योजनें भूमिप्रमाण ॥ देखोनि सेना थोकली ॥ ६३ ॥ तंव हनुमंतासी ह्मणे रमावर ॥ दिसेना कांहीं तें नगर ॥ येरू ह्मणे पसरला दैत्यसैन्यसागर ॥ तेणें कांहींच दिसेना ॥ ६४ ॥ चहूंकडे पसरली सेना ॥ तेणें नगर कोठें दिसेना ॥ यासीं करावया समरांगणा ॥ सामर्थ्य कोणा नाहींच ॥ ६५ ॥ तुमच्या सैन्याच्या चतुर्गुण[6] ॥ सैन्य लोटलेंसे दारुण ॥ देखतांचि जातील वीरप्राण ॥ ऐसें मज वाटतें ॥ ६६ ॥ तंव चंद्रहास बोलिला मांत[7] ॥ हा अतिपराक्रमी दैत्यनाथ ॥ यासीं करितां युद्धार्थ ॥ ऐसा वीर कोणी नाहीं ॥ ६७ ॥ तंव कृष्णासी ह्मणे वातकुमर[8] ॥ जवळी आलासे दळभार ॥ घाबिरे झाले सकळ वीर ॥ धाकें कांपती थरथरां ॥ ६८ ॥ घाबरा होऊनि वनमाळी[9] ॥ बैसला मेघमंडळपोकळीं ॥ सर्व वीर पाचारिले[10] जवळी ॥ तयांचीं नामें

१ भ्रमरपंक्तींनीं. २ मेघ. ३ सूर्य. ४ गंगा. ५ श्रीकृष्णानें. ६ चौपट. ७ गोष्ट. ८ मारुति. ९ श्रीकृष्ण. १० बोलाविले.

अवधारा ॥ ६९ ॥ सहपुत्र यौवनाश्व कर्णनंदन ॥ अनुशाल्व सात्यकी बभ्रुवाहन ॥ अनिरुद्ध वीरवर्मा प्रद्युम्न ॥ हंसध्वज कृतवर्मा ॥ ७० ॥ नीलध्वज ताम्रध्वज ॥ चंद्रध्वज आणि मकरध्वज ॥ जवळी बैसवोनि कपिध्वज ॥ बोले गरुडध्वज सर्वांसी ॥ ७१ ॥ जवळी आला दैत्यनाथ ॥ यांसीं कैसी करावी मात ॥ ती सांगावी सावचित्त ॥ चित्तीं भय पावों नका ॥ ७२ ॥ तों आधीं बोले कृष्ण-सखा ॥ कां भेडसाविसी यदुनायका ॥ तव प्रसादें दैत्यनायका ॥ मारीन ऐसें जाणावें ॥ ७३ ॥ मग सर्व बोलती नृपवर ॥ कां देवा होसी चिंतातुर ॥ आह्मी तुझे सकळ किंकर ॥ जिंकों यातें रणांगणीं ॥ ७४ ॥ तूं जरी उपेक्षिसील आह्मांतें ॥ तरी सर्व पावूं मरणातें ॥ तूं जरी देसील बळातें ॥ तरी दैत्यातें निवटूं कीं ॥ ७५ ॥ सत्य सत्य यदुकुळटिळका ॥ आह्मी सर्व काष्ठपुतळिका ॥ जैसें नाचविसी यदुनायका ॥ तैसें नाचूं ये काळीं ॥ ७६ ॥ हरीस ह्मणती सर्व भूप ॥ पूर्वींच केला जी संकल्प ॥ धर्मार्थ वेचूं प्राण-दीप ॥ तेणें त्वत्पद पावों आह्मी ॥ ७७ ॥ अनंतकोटि ब्रह्मांडनायक ॥ त्या तुजपुढें दैत्य मशक ॥ आतां पुढेंचि जावें निःशंक ॥ उतरूं जवळ नगराच्या ॥ ७८ ॥ ऐकतां तोषला इंदिरावर ॥ तों पुढें चालिला दळभार ॥ पंचवीस सहस्र वेत्रधार ॥ फुटों न देती रायातें ॥ ७९ ॥ लंघोनि उपवनें चौदा शत ॥ मध्यें उतरला कृष्णनाथ ॥ समरभूमी पावोनि समस्त ॥ सिद्ध झाले संग्रामा ॥ ८० ॥ आतां पुढें रणमंडळ ॥ शिष्टाई करील प्रांजळ ॥ ती पुढिले प्रसंगीं कथा रसाळ ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ८१ ॥ इति श्रीधर्मा-श्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ दुंदुभिआख्यान अगाध ॥ पंचषष्टितमोध्याय गोड हा ॥ ८२ ॥ इति श्रीमहाभारते आश्व-मेधिके जैमिनिकृते दुंदुभ्याख्यानं नाम पंचषष्टितमोऽध्यायः ॥ ६५ ॥ अध्याय ॥ ६५ ॥ ओव्या ॥ ८२ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

१ वृषकेतु.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ यानंतर ह्मणे जैमिनि ॥ कथा ऐकावी नृपचूडामणि ॥ नगरासमीप सैन्य उतरोनि ॥ काय करितें पैं झालें ॥ १ ॥ सकळ वीरांसी चक्रचूडामणि ॥ सिद्ध झाला गांडीवपाणि ॥ जो अनंत ब्रह्मांडांचा धनी ॥ तो चक्रपाणि सन्निध ॥ २ ॥ जो उडे शैतयोजनें सागर ॥ तो ध्वजाग्रीं देत भुभुकार ॥ चंद्रहासादि नृपवर ॥ आले सर्व युद्धासी ॥ ३ ॥ झाले रणतुरांचे गजर ॥ तेणें दणाणिलें अंबरँ ॥ तों दैत्यसैन्यामाजी विचार ॥ काय झाला अवधारा ॥ ४ ॥ दुंदुभि निजरथावरी उभा ॥ राहोनि पाहे कटकैंशोभा ॥ तों अवचितां देखिलें पद्मनाभा ॥ जो कैवल्यगाभा मूर्तिमंत ॥ ५ ॥ ह्मणे आजि पुण्यतरूसी फळ आलें ॥ कीं पूर्वसुकृतें धांवणें केलें ॥ ह्मणोनि म्यां देखिलीं कृष्णपाउलें ॥ जन्मोनि झालें सार्थक ॥ ६ ॥ ज्याचा वेद तो श्वास ॥ चरणीं असे गंगावास ॥ नामें होय भवभ्रमविध्वंस ॥ तो जगन्निवास देखिला म्यां ॥ ७ ॥ आणि भक्तचक्रचूडामणि ॥ तो म्यां देखिला गांडीवपाणि ॥ ज्याच्या कार्यालागीं चक्रपाणि ॥ झाला प्राणी उदार ॥ ८ ॥ ध्वजाग्रीं बैसला हनुमंत ॥ हा तो रुद्र मूर्तिमंत ॥ तयाच्या दर्शनें मी पुनीत ॥ झालों कृतार्थ संसारीं ॥ ९ ॥ ऐसा भक्तिरंगें रंगला ॥ परी दैत्यभावें गर्वाथिला ॥ मग समीप पाचारोनि रणमंडळा ॥ शिष्टाईतें पाठवित ॥ १० ॥ दैत्य बोले प्रधानासी ॥ जावोनि बोलावें श्रीकृष्णासी ॥ तूं कां पार्थवचनें भुललासी ॥ कां कुटुंबातें अंतरसी पैं ॥ ११ ॥ तुज असे बहुत गोतवळा ॥ आणि सोळा सहस्र अबला ॥ असती पुत्र कन्या तुजला ॥ ह्मणोनि मजला कृपा आली ॥ १२ ॥ ऐकोनि माझा पुँरुषार्थ ॥ भयें पळतील कृष्णपार्थ ॥ ऐसा साधोनि कार्यार्थ ॥ शीघ्र येईं प्रधाना ॥ १३ ॥ बरवें ह्मणोनि रणमंडळ ॥ शीघ्र प्रवेशला परदळ ॥ सैन्यामाजी झाला कोलाहल ॥ दैत्य आला ह्मणोनि ॥ १४ ॥ सकळ सैन्य देखोनि डोळां ॥ अंतरीं रणमंडळ निवाला ॥ नेत्रीं देखतां वीरमंडळा ॥ कांहीं भियाला ते समयीं ॥ १५ ॥ मग साष्टांग वंदोनि श्रीकृष्णचरण ॥ त्यानंतर नमीत नृपगण ॥ उभा ठाकला कर जोडून ॥ लक्षोनि चरण निजदृष्टीं ॥ १६ ॥ समीप बैसवोनि सैन्यनाथ ॥ तयासी बोले श्रीकृष्णनाथ ॥ येथें येणें झालें किमर्थ ॥ तें मज निश्चित सांगावें ॥ १७ ॥ येरू ह्मणे मायाविलासचतुरा ॥ वचन ऐकें परमेश्वरा ॥ पावावया प्रपंचपारा ॥ मुख्यार्थ जाणोनि मी आलों ॥ १८ ॥ तथापि दुंदुभीचें वचन ॥ तुवां ऐकावें सावधान ॥ हे ऐकोत नृपगण ॥ गांडीवँपाणिसमवेत ॥ १९ ॥ संग्रामाआधीं सामस्थिति ॥ करावी ऐसी राजनीति ॥ हें सकळ भूभुंज जाणती ॥ तूं तरी नेणसी राज्यभावा ॥ २० ॥ जें अविवेकें कार्य केलें ॥ तें विवेकें पाहिजे निवारिलें ॥ तें तुह्मांसी जाणवावया वहिलें ॥ मज पाठविलें दैत्यरायें ॥ २१ ॥ दुंदुभीचा युद्धपुरुषार्थ ॥ माऊं न शके ब्रह्मांडांत ॥ हें काय नसे जी तुह्मांसी श्रुत ॥ ह्मणोनि येथें आलेती ॥ २२ ॥ जयाच्या प्रतापाँनळाच्या ज्वाळा ॥ लागोनि कूर्मराज तो पोळला ॥ वरी विधिलोक तप्त झाला ॥ तो काय

१ अर्जुन. २ चारशें कोस. ३ आकाश. ४ सैन्याची शोभा. ५ स्त्रिया. ६ पराक्रम. ७ अर्जुनासहवर्तमान. ८ राजे. ९ प्रतापरूपी अग्नीच्या.

मानवा न जाळी ॥ २३ ॥ ज्या दुंदुभीचें ऐकतां नाम ॥ उभाचि प्राण सोडी यम ॥ तयासीं करावया संग्राम ॥ वीर जन्मलाच पैं नाहीं ॥ २४ ॥ जेणें निःक्षत्रिय केली वसुंधरा ॥ जो ईश्वरावतार खरा ॥ तया परशुरामा अंबरा ॥ जेणें उडविलें शरघातें ॥ २५ ॥ तो कोठें जाऊन पडला देखा ॥ हें ठाऊकें नसे दैत्यनायका ॥ तेथें या नृपांचा कोण लेखा ॥ तुह्मीच विचारा मानसीं ॥ २६ ॥ जो सप्तमावतार दाशरथि ॥ त्याहोनि आन नसे पुरुषार्थी ॥ जो सिंधु उतरोनि शिळापंथीं ॥ वेगें गेला कनकपुरा ॥ २७ ॥ जेणें कुंभकर्ण वीर मारिला ॥ सवेंचि रणीं रावण वधिला ॥ ऐसा हा प्रतापसोहळा ॥ जगीं मिरविला श्रीरामाचा ॥ २८ ॥ काशीहूनि थोर नसे तीर्थ ॥ कीं मातेहूनि आन नसे दैवत ॥ गायत्रीमंत्राहूनि पुनीत ॥ आन मंत्र नसे ब्रह्मांडीं ॥ २९ ॥ अन्नासमान नसे दान ॥ कीं व्रत नसे एकादशीसमान ॥ तेवीं दशरथनंदनासमान ॥ आन नाहीं धनुर्धर ॥ ३० ॥ ज्यापुढें शिंगे न चढे आन युद्ध ॥ ऐसा श्रीरामचंद्र प्रसिद्ध ॥ तेणें ऐसाचि केला अश्वमेध ॥ अश्व सोडिला प्रदक्षिणे ॥ ३१ ॥ तोही फिरत फिरत येथें आला ॥ देखोनि दैत्यनाथें धरिला ॥ तो सोडवावया श्रीराम आला ॥ सोडूनि दीक्षा बंधूसी ॥ ३२ ॥ मग युद्ध करावयाचा समय ॥ जाणोनि दैलें धाडिला विधितनयें ॥ तेणें बरव्यापरी तो रघुराय ॥ सुनीतिवचनें बोधिला ॥ ३३ ॥ ह्मणे श्रीरामा त्रैलोक्यनाथा ॥ तुझा अनिवार असे पुरुषार्था ॥ परी तो सर्वही होईल वृथा ॥ या दुंदुभीसीं भिडतां ॥ ३४ ॥ तुवां सेतु बांधिला सागरजळीं ॥ केली राक्षसकुळाची होळी ॥ आणि रणीं निवटिला दशमौळी ॥ पुत्रपौत्रांसमवेत ॥ ३५ ॥ सोडिली त्या नवग्रहांची बिडी ॥ देव सोडविले तेहेतीस कोटी ॥ ऐसी जी जयश्रीची गुढी ॥ हा तो मोडील क्षणार्धें ॥ ३६ ॥ अग्नि सर्वांसी असे जाळित ॥ परी तो जळें होतसे शांत ॥ तेवीं तुझा सर्वही पुरुषार्थ ॥ व्यर्थ करील हा दुंदुभि ॥ ३७ ॥ जरी विशेषें प्रबळ असे व्याळ ॥ परी तो भीताहे पाहतां नकुळ ॥ तेवीं हा दैत्यराज महाबळ ॥ हें तूं जाणसी स्वामिया ॥ ३८ ॥ ह्मणोनियां श्रीरामचंद्रा ॥ विवेकचतुरा गुणसमुद्रा ॥ माझ्या ऐकोनियां उत्तरा ॥ शीघ्र गमन करावें ॥ ३९ ॥ ऐकोनि श्रीराम क्रोधावला ॥ वेगें धांवोनि रणासी आला ॥ मग श्रीगुरु वसिष्ठ धांविन्नला ॥ तेणें वारिलें तयातें ॥ ४० ॥ तो जावोनि भेटला रायासी ॥ बरें बोधिलें दुंदुभीसी ॥ मग सोडोनि दिधलें श्यामकर्णासी ॥ मग उभयतांसी सख्य केलें ॥ ४१ ॥ जेथें श्रीरामाची गति ॥ ऐसी तेथें पार्थ किति ॥ ऐसें जाणोनि श्रीपति ॥ विचार चित्तीं करावा ॥ ४२ ॥ तूं आमुचा पूज्य होसी ॥ ह्मणोनि सांगतों हितासी ॥ भुलों नको पार्थवचनासी ॥ हा तों भ्रमें भुललासे ॥ ४३ ॥ जरी वंध्यासुताचें लग्न ॥ क्लीवनंदिनीसी लागेल पूर्ण ॥ तेथें करील मंत्रपठण ॥ भीष्मनंदन निजमुखें ॥ ४४ ॥ लग्नोत्साह गंधर्वनगरीं ॥ मृगजळें न्हाणितील नवरानवरी ॥ गगनकुसुमांचें शिरीं ॥ बाशिंग छायेनें बांधिलें ॥ ४५ ॥ बांधोनि वेगें आला अंध ॥ तेणें आणिलें



१ पृथ्वी. २ पर्वा. ३ राम. ४ शिखराला. ५ नारद. ६ सर्प. ७ मुंगूस.

कांसवीचें दुग्ध ॥ मुका गातसे गीतप्रबंध ॥ ऐके वृंदें बधिरांचें ॥ ४६ ॥ शुक्तिकारजताचीं भूषणें ॥ तीं लेइलीं गोजिरवाणें ॥ चित्रस्थ साखरेचीं वाणें ॥ घरोघरीं देतसे ॥ ४७ ॥ तेंही घडों शके एक वेळे ॥ परी हा दैत्य न जिंकवे कदाकाळें ॥ ह्मणोनि जाणावें विवेकबळें ॥ चतुरें आपुलें निजहित ॥ ४८ ॥ तुज सोळा सहस्र स्त्रिया असती ॥ त्यांवेगळ्या आठ पट्ट युवती ॥ तव वियोगें ह्यांची गति ॥ कैसी होईल विचारीं ॥ ४९ ॥ पार्थादि सर्व नृपांच्या वनिता ॥ त्या सेवितील वैधव्यव्यथा ॥ ह्मणोनि असल्या आयुष्यें आतां ॥ कां मरूं पाहतां दैत्यबाणें ॥ ५० ॥ दैत्यप्रतापें सिंधु शोषिला ॥ तो रिपुस्त्रीनेत्राश्रूनें पूर्ण केला ॥ आतां शत्रुस्त्रियाशोकजळाला ॥ ठाव उरला नाहीं जी ॥ ५१ ॥ याकारणें श्रीकृष्णनाथा ॥ तुह्मीं येथोनि जावें आतां ॥ नाहीं तरी मृत्यूच्या पंथा ॥ सर्व लागतील वाटतें ॥ ५२ ॥ ऐकोनि रणमंडळाची मात ॥ क्रोधें कोपला वायुसुत ॥ जेवीं पावक पावोनि घृत ॥ वाढे तैसा वाढला ॥ ५३ ॥ ह्मणे हें काय बोलिलासी वचन ॥ जें ऐकतां पोळले माझे श्रवण ॥ तूं आलासी रे दूत होऊन ॥ ह्मणोनि क्षमा तुज केली ॥ ५४ ॥ माझा स्वामी दाशरथि ॥ त्रैलोक्यामाजी जो पुरुषार्थी ॥ जेणें कुबेर याचक केले अर्थी ॥ वानिती निगम कीर्ति ज्याची ॥ ५५ ॥ ज्याचा ऐकतां पुरुषार्थ ॥ शिर डोलवी कैलासनाथ ॥ तो तुवां मानिला अशक्त ॥ जळो वचनार्थ तुझा रे ॥ ५६ ॥ तोचि राम हा कृष्णनाथ ॥ त्याचे सेवेसी आहे पार्थ ॥ या दोघांचा मी सेवक समर्थ ॥ दावीन पुरुषार्थ दैत्यासी ॥ ५७ ॥ जरी सागर मातला जळें प्रबळ ॥ तरी अगस्तीपुढें तो निर्बळ ॥ जरी तिमिरें दाटलें निराळ ॥ वारी तात्काळ अंशुमाळी ॥ ५८ ॥ जरी शरीरें असती थोर गिरी ॥ परी वज्र त्यांचें चूर्ण करी ॥ कुंजरांसारिखे थोर शरीरी ॥ ते लघु अंकुशें आवरिले ॥ ५९ ॥ तेवींच जाण हे कृष्णपार्थ ॥ लहान परी अगाध पुरुषार्थ ॥ तेथें मशकप्राय दैत्यनाथ ॥ कां तूं वानिसी यांपुढें ॥ ६० ॥ वाढी करोनियां पुच्छाची ॥ मोळी बांधिली राक्षसांची ॥ समुद्रजळीं बुडविली साची ॥ ती ख्याति माझी नायकिली ॥ ६१ ॥ जेथें आपल्या शरधारीं ॥ करील दैत्यदेहांचीं कांडोरीं ॥ त्यांच्या रक्तमांसें निर्धारीं ॥ देईल रणीं भूतबळी ॥ ६२ ॥ ऐसें वचन रणमंडळा ॥ जावोनि सांगें दुंदुभीला ॥ शीघ्र यावें संग्रामाला ॥ विलंब सहसा न करावा ॥ ६३ ॥ ऐकोनि पार्थ तयासी बोले ॥ जा तूं पुरवूं तयाचे युद्धसोहळे ॥ ऐसेचि सर्व नृपांचे मेळे ॥ पुरुषार्थ बोलिले तयासी ॥ ६४ ॥ येरू ह्मणे न चुके कर्मरेखा ॥ मग नमिलें यदुनायका ॥ जावोनि तैसेंचि दैत्यनायका ॥ सांगता झाला रणमंडळ ॥ ६५ ॥ दैत्य ऐकतां कोपला ॥ जेवीं अग्नि घृतें सिंचिला ॥ कीं भुजंगम पदें ताडिला ॥ तैसा कोपला दैत्यनाथ ॥ ६६ ॥ रणकर्कश आणि काळकेत ॥ सुधर्मा सुवर्मा धूम्रकेत ॥ रणराज गजराज वज्रकेत ॥ वज्रदंत रणकर्मा ॥ ६७ ॥ ऐसे दश दळाधिपती ॥ पाचारोनि बोले नृपति ॥ तुह्मीं होवोनि सावध चित्तीं ॥ दळभारव्यूह रचावा ॥ ६८ ॥ साठी करावे

१ मेळा. २ शिंपीवर चकाकणाऱ्या रुप्याचीं. ३ स्त्रिया. ४ पराक्रमी. ५ वेद. ६ शंकर. ७ अंधकारानें. ८ आकाश. ९ सूर्य. १० हत्तीसारखे. ११ सर्प.

दळभार ॥ एकेक भाराचा विस्तार ॥ तुह्मां सांगतों सविस्तर ॥ सावधान परिसावें ॥ ६९ ॥ कोटी अश्व तदर्ध कुंजर ॥ तदर्धें करावे रथभार ॥ कोटिद्वय पदाती साचार ॥ एक्या भारीं ही संख्या ॥ ७० ॥ ऐसे साठी भार रचिले ॥ सकळ वीर सिद्ध झाले ॥ इतुके भार एकासी नेमिले ॥ तया रणमंडळालागोनि ॥ ७१ ॥ दुंदुभि ह्मणे रणमंडळा ॥ हे भार घेवोनि जाईं रणमंडळा ॥ बळें जिंकीं तूं सकळ नृपाळां ॥ कृष्णार्जुनांसहित पैं ॥ ७२ ॥ इतुकें सैन्य सिद्ध झालें ॥ तेथोनि हनुमंतें देखिलें ॥ मग वीरांप्रति बोलों आदरिलें ॥ दैत्यदळभार लोटला ॥ ७३ ॥ तों पार्थदळही सावध झालें ॥ बळें तयावरी लोटलें ॥ रणतुरीं आकाश दुमदुमिलें ॥ दोन्ही सैन्यांचे ते काळीं ॥ ७४ ॥ सन्मुख ठेलीं दोनीं दळें ॥ नेणों महाकाळें मुख पसरिलें ॥ छत्रध्वजपताकीं शोभलें ॥ वरी पाहिलें निजदृष्टीं ॥ ७५ ॥ ध्वजाग्रीं शोभे प्लवंगम ॥ रथापुढें बैसला मेघश्याम ॥ रथीं बैसला पार्थ वीरोत्तम ॥ शोभा न वर्णवे तयाची ॥ ७६ ॥ मागें युद्धें झालीं अपारें ॥ स्वयें केलीं असती धनुर्धरें ॥ परी हें अनारिसें निर्धारें ॥ दिसोनि आलें सकळांसी ॥ ७७ ॥ आतां दोन्ही दळभार ॥ होतील रणालागीं सादर ॥ येथोनि वीररससागर ॥ मातेल थोर जाणावा ॥ ७८ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ दुंदुभिआख्यान अगाध ॥ षट्षष्टितमाध्याय गोड हा ॥ ७९ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते दुंदुभिआख्याने रणमंडळकृष्णादिसंवादो नाम षट्षष्टितमोऽध्यायः ॥ ६६ ॥ अध्याय ॥ ६६ ॥ ॥ ओव्या ॥ ७९ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ श्रीव्यासचरणारविंदभृंग ॥ सकलविद्याकुलाचलशृंग ॥ ह्मणे आतां युद्धप्रसंग ॥ सावध ऐकें जनमेजया ॥१॥ भावें नमोनि श्रीकृष्णचरण ॥ तैसाचि वंदोनि श्वेतवाहन[1] ॥ वेगें उठावला बभ्रुवाहन ॥ निजसैन्येंसीं ते काळीं ॥ २ ॥ टाकीत चालिला अमित बाण ॥ तेणें व्यापिलें सकळ सैन्य ॥ बाणांधकार पडिला पूर्ण ॥ छायारमण[2] लोपला ॥ ३ ॥ दैत्यसैन्याचा संहार ॥ अत्यंत झाला ते वेळ ॥ तें देखोनि धांवला रणमंडळ ॥ परम शूर ते काळीं ॥ ४ ॥ ह्मणे भला भला रे वीरराजा ॥ बापा पराक्रम देखिला तुझा ॥ आतां पाहें संग्राम माझा ॥ ह्मणोनि बाण वर्षत ॥ ५ ॥ दोघेही वीर बळाथिले ॥ परस्परें दृष्टि मेळविते झाले ॥ अमित बाण वर्षों लागले ॥ नाना जातींचे विचित्र ॥ ६ ॥ एकमेकांसी पाचारिती ॥ एकमेकांतें हाणिती ॥ एकमेकांचें सैन्य संहारिती ॥ नाना शस्त्रें घालुनी ॥ ७ ॥ स्वारांवरी धांवती स्वार ॥ कुंजरांवरी धांवती कुंजर ॥ रथींवरी लोटती रथी थोर ॥ पायदळेंसीं पदाती ॥८॥ घडी एक संग्राम झाला ॥ शोणिताचा[3] पूर लोटला ॥ तेणें वाहोनियां नेला ॥ प्रेतमेळा क्षणमात्रें ॥९॥ रणमंडळासी बोले बभ्रुवाहन ॥ बरा रे संग्राम केला दारुण ॥ आतां होवोनि सावधान ॥ साहें बाण पैं माझे ॥ १० ॥ ऐसें बोलोनियां आकर्ण ॥ चाप ओढोनि सोडिला बाण ॥ तो स्तनावरी भेदतां पूर्ण ॥ रणमंडळ खालें पडला ॥ ११ ॥ सारथि पाहे रणमंडळा ॥ तो तंव अचेतन पडिला ॥ मग रथीं वाहोनियां नेला ॥ जेथें असे दैत्यनाथ ॥ १२ ॥ मूर्च्छित देखोनि रणमंडळ ॥ भयें पळों लागलें दैत्यदळ ॥ विजयी होवोनियां बाळ ॥ चित्रांगदेचा परतला ॥ १३ ॥ तों सन्मुख धांवोनि वृषकेत ॥ बभ्रुवाहनासी क्षेम देत ॥ ह्मणे केला भला पुरुषार्थ[4] ॥ या दैत्यवरा पळविलें ॥ १४ ॥ मूर्च्छित देखोनि रणमंडळ ॥ क्रोधें दुंदुभि बोले बोल ॥ न भरतां एक घटिका पळ ॥ कां रे पळ काढिला ॥ १५ ॥ तों येरीकडे कर्णनंदन[5] ॥ बाण वर्षत धांवला दारुण ॥ तेणें आच्छादिलें गगन ॥ न दिसे पितामह तयासी ॥१६॥ वेगें होवोनि रथारूढ ॥ तेव्हां धांवला चंद्रचूड ॥ तेणें वाहोनि कोदंड[6] ॥ बाण प्रचंड सोडीतसे ॥ १७ ॥ तों दोघां झाली समदृष्टी ॥ परस्परें करिती बाणवृष्टी ॥ सकळ दळ होतसे कष्टी ॥ बाणघातेंकरोनियां ॥ १८ ॥ परस्परें बाणघर्षण ॥ होतांचि पडे हुताशन[7] ॥ तेणें जळों लागलें सैन्य ॥ उभयतांचें ते काळीं ॥ १९ ॥ जेवीं वंशांसीं[8] वंश घांसतां ॥ तेथोनि अग्नि पडे अवचिता ॥ तो स्ववंशावळी होय जाळिता ॥ तेवीं झालें उभय सैन्यीं ॥ २० ॥ कर्णात्मजासी ह्मणे चंद्रचूड ॥ तूं वीर होसी प्रचंड ॥ आतां तुझें छेदीन कोदंड ॥ एक्याचि बाणेंकरूनि ॥ २१ ॥ ह्मणोनि सोडिला तीक्ष्ण बाण ॥ तंव येरें केलें दृढसंधान ॥ मध्येंचि त्याचें केलें खंडन ॥ मोडिला जैसा इक्षुदंड[9] ॥ २२ ॥ खड्गघातें रथाचें चूर्ण ॥ करोनि केलें अश्वकंदन ॥ गजशुंडा छेदोन ॥ कर्णात्मजें विखुरल्या ॥ २३ ॥ देखोनि वृषकेताचा पुरुषार्थ ॥ दैत्य कोपलासे अद्भुत ॥ आतां मी तुझा करीन रे घात ॥ ह्मणोनि शर योजिले ॥ २४ ॥ ह्मणे तुवां जावोनि

१ अर्जुन. २ सूर्य. ३ रक्ताचा. ४ पराक्रम. ५ वृषकेतु. ६ धनुष्य. ७ अग्नि. ८ वेळूशीं. ९ ऊंस.

भद्रावती ॥ जिंकिला यौवनाश्वनृपति ॥ श्यामकर्ण आणिला निश्चितीं ॥ ती युक्ति येथें न चाले ॥ २५ ॥ आणि तुज असे गर्व ॥ कीं म्यां जिंकिला अनुशाल्व ॥ तो [1]काकतालीयन्यायें गौरव ॥ तुजला देवें दिधला ॥ २६ ॥ आतां होईं रे सावध ॥ मी तरी बळसिंधु असें अगाध ॥ मजसीं करावया युद्ध ॥ समर्थ नव्हसी बाळका ॥ २७ ॥ ऐसें बोलत असतां चंद्रचूड ॥ तों तयाचें चंड कोदंड ॥ वृषकेतें करोनि दुखंड ॥ भूमीवरी पाडिलें ॥ २८ ॥ सवेंचि शर सोडोनि चौधारी ॥ रथींचे मारिले अश्व चारी ॥ ध्वज छेदोनि पृथ्वीवरी ॥ एक्या बाणें टाकिला ॥ २९ ॥ कर्णात्मज ह्मणे चंद्रचूडा ॥ आतां होईं सावध मूढा ॥ ह्मणोनि बाण काढिला कुऱ्हाडा ॥ तो तयासी अनिवार ॥ ३० ॥ वेगें आदळला हृदयावरी ॥ रथींहूनि पडिला धरे[2]वरी ॥ हाहाकार झाला सैन्यामाझारी ॥ सारथी तयातें पळवित ॥ ३१ ॥ तयाची देखोनि ती अवस्था ॥ सैन्य पळालें त्याचें दिगंता ॥ जयश्री आली कर्णसुता ॥ हर्षें चालिला फिरोनि ॥ ३२ ॥ पार्थात्मज कर्णनंदन ॥ स्नेहें भेटती दोघेजण ॥ तें देखोनि नरनारायण ॥ समाधान ते पावले ॥ ३३ ॥ पाठी थापटिली दोघांची ॥ सर्वही स्तुति करिती त्यांची ॥ भली ओज केली युद्धाची ॥ पूर्वरंगीं वीर हो ॥ ३४ ॥ व्यथित देखोनि चंद्रचूड ॥ दुंदुभि कोपला प्रचंड ॥ दांतें चावोनि ओष्ठखंड ॥ स्वयें रथारूढ तो झाला ॥ ३५ ॥ सवें अश्व पांच कोटी ॥ तितुक्या कुंजरांच्या [3]थाटी ॥ चार कोटी रथांच्या दाटी ॥ पायदळ असंख्यात ॥ ३६ ॥ ऐसा सैन्यसिंधु उचंबळला ॥ तो येतां हनुमंतें देखिला ॥ युद्धावेशें असे फुगला ॥ वेगें केला भुभुक्कार ॥ ३७ ॥ पार्थासी ह्मणे होईं सावधान ॥ क्रोधें दुंदुभि आला आपण ॥ मग कृष्णासहित नृपगण ॥ झाले सावध युद्धासी ॥ ३८ ॥ तंव वातात्मज आवेशला ॥ ह्मणे धरूनि आणीन दुंदुभीला ॥ मग तो आकाशीं उडाला ॥ नाहीं देखिला कोणीही ॥ ३९ ॥ त्याचा अभिप्राय तो कैसा ॥ [4]खग समुद्रींहून नेत मासा ॥ सैन्यसागरांतूनि तैसा ॥ वेगें नेईन दुंदुभि ॥ ४० ॥ तों रमावल्लभें ऊर्ध्व पाहिलें ॥ [5]नभीं हनुमंतातें देखिलें ॥ मग तयातें बोलों आदरिलें ॥ आतांचि तुवां ऐसें न करावें ॥ ४१ ॥ तुझा निर्वाणींचा रे भरंवसा ॥ आतांचि कां गेलासी आकाशा ॥ आह्मांसी सांडोनि सहसा ॥ तुवां दूर देशा नव जावें ॥ ४२ ॥ तुवां बैसोनि ध्वजाग्रीं ॥ नेत्रीं पाहावी [6]युद्धकुसरी ॥ वीर भंगलिया सहपरिवारीं ॥ मग आपली परी दावावी ॥ ४३ ॥ ऐसें बोलतां गरुडध्वज ॥ वेगें उतरला कपिराज ॥ [7]अधिष्ठोनि पार्थरथध्वज ॥ कौतुक पाहे युद्धाचें ॥ ४४ ॥ सर्व वीर झाले सावधान ॥ दारुण करूं ह्मणती युद्धकंदन ॥ आटूं दैत्यबळसिंधु गहन ॥ आपुलिया बाणप्रतापें ॥ ४५ ॥ बकुळध्वज आणि ताम्रध्वज ॥ तिसरा तो मयूरध्वज ॥ तिघे लोटले तेजःपुंज ॥ शत अक्षौहिणी दळभारेंसीं ॥ ४६ ॥ नाना वाद्यांचिया गजरें ॥ बधिर झालीं कर्णद्वारें ॥ तिघे वीर मिळाले एकसरें ॥ सैन्य निजशरें झांकिती ॥ ४७ ॥ गजढाळा आंदोळती ॥ रथध्वज पताका शोभती ॥ छत्र चामरें झळकती ॥

१ कावळा बसण्याची व ढाळी मोडण्याची वेळ एक येणें तो. २ पृथ्वीवर. ३ समूह. ४ पक्षी. ५ आकाशांत. ६ लढाईचें चातुर्य. ७ बसून.

वीर मारिती अतिनिकरें ॥ ४८ ॥ ऐसा दळीं[1] जाहला हाहाकार ॥ देखोनि धांवला दुंदुभि वीर ॥ अपार सोडोनियां शर ॥ बाणजाळ वारिलें ॥ ४९ ॥ तिघीं देखिलें दुंदुभीतें ॥ ह्मणती हा संहारील महाकाळातें ॥ तरी याचें भय नसे आह्मांतें ॥ बाणें यातें संहारूं ॥ ५० ॥ मग तिघे झाले तिहींकडे ॥ सायक[2] सोडिती ते निधाडे ॥ येरू ह्मणे यांसी काय लागलें वेडें ॥ वृथा मरूं पाहाती ॥५१॥ दैत्य बोले गा ताम्रध्वजा ॥ म्यां पराक्रम देखिला तुझा ॥ आतां साहें रे बाण माझा ॥ ह्मणोनि चापा हात घाली ॥ ५२ ॥ दीड सहस्र धनुष्यें करीं ॥ तितुके शर लाविले तीक्ष्णधारी ॥ कानाडी ओढोनि एकसरीं ॥ त्या तिघांवरी सोडिले ॥ ५३ ॥ तिघीं केलें शरसंधान ॥ बाणीं बाणांचें केलें खंडण ॥ तेणें भियालें तयाचें मन ॥ ह्मणे हे वीर प्रौढीचे ॥ ५४ ॥ वीर वीररसें मातले ॥ दैत्यसैन्य आच्छादिलें ॥ शक्ति तोमर वर्षों लागले ॥ गदा पट्टिश त्रिशूळेंसीं ॥ ५५ ॥ ऐसा त्यांचा पराक्रम देखिला ॥ दैत्य मनामाजी संतोषला ॥ मग तयांसी बोलता झाला ॥ तें राया परियेसीं ॥ ५६ ॥ भला भला रे ताम्रध्वजा ॥ मागें ऐकिला पराक्रम तुझा ॥ रथासहित पार्थ खगध्वजा ॥ गगनोदरीं टाकिलें ॥ ५७ ॥ ऐसें तुझें बळ आगळें ॥ हें म्यां पूर्वींच ऐकिलें ॥ परी येथें अल्प तें वहिलें ॥ राखें आपणातें ये काळीं ॥ ५८ ॥ ह्मणोनि बाण सोडिला प्रचंड ॥ तो तेणें केला तात्काळ दुखंड[3] ॥ शरें छेदिलें दैत्यकोदंड ॥ ताम्रध्वजें ते काळीं ॥ ५९ ॥ मग दैत्य चढला क्रोधमदा ॥ हातीं घेतली विस्तीर्ण गदा ॥ तेणें करीतसे चेंदा ॥ रथाश्वगजपदातींचा ॥ ६० ॥ दैत्य ताम्रध्वजासी असे ह्मणत ॥ हा बाण घेईल तुझें जीवित ॥ सूर्यतेजाहून अधिक लखलखित ॥ देखतां नेत्र झांकोळती ॥ ६१ ॥ तो देखिला अनिवार बाण ॥ वारितां हृदयीं लागला पूर्ण ॥ तेणें पावला तो पतन ॥ रथाखालीं पडियेला ॥ ६२ ॥ आणि दुजा शर तेजःपुंज ॥ सोडोनि मारिला बकुलध्वज ॥ मयूरध्वजासी ह्मणे दैत्यराज ॥ पात्र झालासी तूं शोकासी ॥ ६३ ॥ पुत्रशोकें अति तापला ॥ शक्ति तोमर वर्षों लागला ॥ तेणें संग्राम दारुण केला ॥ सोडोनियां पुत्रमोह ॥ ६४ ॥ मग दैत्य ह्मणे मयूरध्वजा ॥ तुवां संग्राम केला वोजा ॥ आतां भेटों जाईं पुत्रराजा ॥ ह्मणोनि शक्ति टाकिली ॥ ६५ ॥ ती शक्ति आली गर्जत ॥ वारितां लागला चपेटधात ॥ तेणें मयूरकेत झाला पूर्ण मृत ॥ भूमीवरी पडिलासे ॥ ६६ ॥ जेवीं योगियांमाजी महावीर ॥ विज्ञानखड्ग सतेज धार ॥ तेणें त्रिगुणांचा[4] कीजे संहार ॥ तैसे तिघेही संहारिले ॥ ६७ ॥ तिघांचा होतां संहार ॥ सैन्यांत झाला हाहाकार ॥ पळों लागला दळभार ॥ घायाळ लोक उरले जे ॥ ६८ ॥ तें देखिलें कृष्णार्जुनें ॥ तयांसी विनविलें कर्णनंदनें[5] ॥ आज्ञा द्यावी मजकारणें ॥ दैत्यनाथासी झुंजावया ॥ ६९ ॥ आज्ञा घेवोनि चालिला वृषकेत ॥ सवेंचि उठावला पार्थसुत[6] ॥ तयामागें धांवला मन्मथ[7] ॥ घेवोनि अनिरुद्ध पाठीसी ॥ ७० ॥ ऐसे चौघे वीर चालिले ॥ नेणों चार सागर एकवटले ॥ बाणवर्षाव करूं लागले ॥ जेवीं मेघ पर्वतावरी ॥७१॥

---

१ सैन्यामध्यें. २ बाण. ३ दोन तुकडे. ४ सत्व, रज आणि तम यांचा. ५ वृषकेतूनें. ६ बभ्रुवाहन. ७ प्रद्युम्न.

बाणीं व्यापिलें गगन ॥ अंधकार पडिला संपूर्ण ॥ मोडली आपपरांची खूण ॥ ऐसे भांडती ते काळीं ॥ ७२ ॥ मेघमंडळीं जेवीं विद्युलता ॥ तेवीं झळकती खड्गलता ॥ त्यामाजी करिती शक्तिघाता ॥ ऐशा मारा पेटले ते ॥ ७३ ॥ तें देखोनि दैत्य धांवला त्वरें ॥ पाहे तंव भांडती लेंकुरें ॥ ह्मणे म्यां यांसी न झुंजावें खरें ॥ तरी हे सकळां मारितील ॥ ७४ ॥ माझे दृष्टीं दिसती हे बाळ ॥ परी हे सकळ दळाचे काळ ॥ ह्मणोनि वारून वीरमंडळ ॥ आपण युद्धा पुढें चालिला ॥ ७५ ॥ कृष्णार्जुनांचे सकळ वीर ॥ मजवेगळ्यांचा करितील संहार ॥ हें जाणोनि आपले वीर ॥ न धाडी कोणी युद्धासी ॥ ७६ ॥ तंव चौघे चहूंकडे झाले ॥ नाना शर वर्षों लागले ॥ चौघेही वीर बळाथिले ॥ नाहीं भियाले दैत्यासी ॥ ७७ ॥ कर्णी नालीक शिलीमुख शर ॥ वत्सदंत क्षुरप्र चंद्राकार ॥ ऐसिया बाणांचे प्रकार ॥ सोडिते झाले ते समयीं ॥ ७८ ॥ गदा पट्टिश आणि तोमर ॥ शक्ति पाश परिघ मुद्गर ॥ प्रास शूल नानाप्रकार ॥ टाकिते झाले ते काळीं ॥ ७९ ॥ दैत्यें संधान केलें ॥ तें क्षणमात्रें सर्व निवारिलें ॥ जेवीं अंधकाराचीं पडळें ॥ निवारी क्षणें रवि जैसा ॥ ८० ॥ पांचांची होतसे झोटधरणी ॥ रक्तें न्हाणिली ती धरणी[1] ॥ वाहों लागली रक्ततटिनी[2] ॥ गेले वाहोनि प्रेतदेह ॥ ८१ ॥ दैत्यें घेवोनि सहस्र गदा ॥ करीत रथगजांचा चेंदा ॥ पूर्ण पावोनियां रणमदा ॥ सैन्यसंहार मांडिला ॥ ८२ ॥ एकाचे चरण मोडिले ॥ एकाचे हस्त छेदिले ॥ एका मध्येंचि द्विभाग केलें ॥ एकाचें छेदिलें भुजद्वय[3] ॥ ८३ ॥ पांचहीजण आरोळ्या देती ॥ तेणें दश दिशा कांपती ॥ दिग्गजांचीं आंतडीं तुटती ॥ तळीं मरती सर्पकुळें ॥ ८४ ॥ ऐसे वीर ते भांडती ॥ कोणी कोणा नाटोपती ॥ घ्या घ्या मारा मारा ह्मणती ॥ बाण सोडिती असंख्य ॥ ८५ ॥ घायें गडबडां लोळती ॥ कोणी जीवनेंवीण[4] चडफडती ॥ एक ते शवांमाजी शिरती ॥ प्राणभयेंकरोनियां ॥ ८६ ॥ चौघे चहूंकडे ठेले ॥ मध्यें दैत्यातें कोंडिते झाले ॥ तेव्हां पंचायतन[5] शोभलें ॥ रणदेव्हारां ते काळीं ॥ ८७ ॥ ऐसा संग्राम तो झाला ॥ सर्वथाही तो न जाय वर्णिला ॥ दैत्यनाथ संतोषला ॥ त्यांचा पराक्रम देखोनि ॥ ८८ ॥ हे वयें दिसताती लघु बाळ ॥ परी माझ्या जीवाचे झाले काळ ॥ यांतें उपेक्षितां सकळ दळ ॥ क्षणें नाशितील पैं माझें ॥ ८९ ॥ अग्नि ह्मणों नये लहान ॥ स्वल्प ह्मणों नये जी ऋण ॥ वैरी ह्मणों नये बळहीन ॥ हे निःशेष करितां बरें ॥ ९० ॥ मग पार्थात्मजासी बोले बोला ॥ तुवांचि मारिलें रणमंडळा ॥ या कर्णात्मजें मारिला ॥ चंद्रचूड वीर माझा ॥ ९१ ॥ परी हे वीर दिसती कृष्णाकृती ॥ मज कृष्णपुत्रचि भासती ॥ यांहीं केली संग्रामख्याती ॥ कृष्णवीर्याचेनि नवल काय ॥ ९२ ॥ तुह्मां दोघांचा करितां संहार ॥ पार्थ होईल दृष्टिगोचर ॥ त्यातें मारितां इंदिरावर[6] ॥ पडेल दृष्टीं अनायासें ॥ ९३ ॥ चहोंकडोनि येती सायक[7] ॥ घाबरा झाला दैत्यनायक ॥ जेवीं सहस्रकरें[8] शोभे अर्क ॥ तैसा बाणांकित शोभला ॥ ९४ ॥ बाणें खिळिलें शरीर सकळ ॥

१ पृथ्वी. २ रक्तनदी. ३ दोन हात. ४ पाण्यावांचून. ५ पांचांचा समुदाय. ६ श्रीकृष्ण. ७ बाण. ८ सूर्य.

तेणें दैत्य झाला व्याकुळ ॥ मग भयें स्मरे तो तात्काळ ॥ अष्टभैरवांतें मानसीं ॥ ९५ ॥ स्मरतांचि पावले अष्टभैरव ॥ तिहीं पसरिलीसे माव ॥ अभिनव त्या मायेचें वैभव ॥ मोहिले वीर चौघेही ॥ ९६ ॥ आतां न करावा जी उशीर ॥ उपेक्षितां करितील दळसंहार ॥ परी येरयेरांचा दुःखसागर ॥ न पाहाती ऐसें करावें ॥ ९७ ॥ मग दैत्यें सोडिले चारी बाण ॥ त्यांसी करावया नसे निवारण ॥ तेजें वडवानलासमान ॥ कीं तें वदन काळाचें ॥ ९८ ॥ तयांचा लागतां पिच्छवात ॥ उलथोनि पडिले महापर्वत ॥ थरथरां भूमंडळ कांपत ॥ तळीं दडपत सहस्रफणी[1] ॥ ९९ ॥ येतां देखोनि अनिवार बाण ॥ घाबिरे झाले चौघेजण ॥ वारितां वारितां पंचप्राण ॥ घेऊन गेले चौघांचे ॥ १०० ॥ कीं तो अभिनव कुंभोद्भव[2] जाण ॥ केलें चतुःसमुद्रांचे प्राशन ॥ किंवा रणभूमीतें तापवून ॥ गेले अस्तमाना चतुर्भानू ॥ १ ॥ दैत्य वीरश्रीनें मातला ॥ त्या सुखगर्वें असे फुगला ॥ उभा राहोनि लक्षिता झाला ॥ कृष्णार्जुनांचें आगमन ॥ २ ॥ तों दळभार अवघा मोडला ॥ भयें दश दिशा पळोन गेला ॥ तों घायाळ सांगती पार्थाला ॥ चौघे वीर निमाले कीं ॥ ३ ॥ तें ऐकोनि कृष्णार्जुन ॥ अत्यंत झाले मूर्च्छायमान ॥ कटा कटा ह्मणती झाले मग्न ॥ पुत्रमरणशोकाब्धींत ॥ ४ ॥ समुद्रवलयेचें भूषण ॥ तैसे वीर होते चौघेजण ॥ तयांचें ऐकोनि निधन[3] ॥ नये मरण कां आह्मां ॥ ५ ॥ कृष्णार्जुनमुखेंदु कोमाइले ॥ पुत्रशोकें नेत्र द्रवों लागले ॥ ते काळीं चंद्रहासादि वीर भले ॥ विनवूं लागले तयांसी ॥ ६ ॥ या मृत्युलोकींचा बडिवार ॥ जयासी झालासे आकार ॥ त्याचा जी होईल संहार ॥ येथें संशय असेना ॥ ७ ॥ तूं तो देहातीत मुकुंद ॥ का लटिका करिसी पुत्रखेद ॥ मज आज्ञा द्यावी निखेदें ॥ दैत्यमद हरावया ॥ ८ ॥ मारुति ह्मणे श्रीकृष्णनाथा ॥ मज तों बरें न दिसे आतां ॥ हा दैत्य नाटोपे सर्वथा ॥ करील घाता सर्वांच्या ॥ ९ ॥ तथापि न सांडावा पुरुषयत्न ॥ बळेंचि मारावा हा बळसंपन्न ॥ जेणें नेली आमुचीं रत्न ॥ वीर सकळ अमूल्य ॥११०॥ मग सावध होऊनि चक्रपाणि ॥ संबोधिला गांडीवपाणि[5] ॥ क्षत्रियधर्माची हानि ॥ तूं कां करिसी धनुर्धरा ॥ ११ ॥ सावध होऊनि श्वेतवाहन ॥ अत्यंत झाला कोपायमान ॥ या दैत्येश्वरांचें मर्दन ॥ आतांचि करीन निजबळें ॥ १२ ॥ मग कृष्ण ह्मणे सकळ वीरां ॥ हा तों अनर्थ झाला खरा ॥ आतां पुढिलिया निस्तारा ॥ सांगा मिळोनि सकळही ॥ १३ ॥ चंद्रहास वीरवर्मा ॥ हंसध्वज सात्यकी कृतवर्मा ॥ यौवनाश्व आणि प्रवीर नामा ॥ नीलध्वज अनुशाल्व ॥ १४ ॥ इत्यादि वीर पाचारून ॥ त्यासीं विचार पुसे कृष्ण ॥ आतां कैसें करावें समरांगण ॥ तो मज विचार सांगावा ॥ १५ ॥ चंद्रहास ह्मणे जी माधवा ॥ हा दळभार अष्टधा विभागावा ॥ अष्ट दिशांसी राहोनि कोंडावा ॥ ऐसा करावा विचार ॥ १६ ॥ मध्यें राहावें तुह्मी हृषीकेशी ॥ आह्मी उठावा देऊं तयासी ॥ ऐसिया विचारें आह्मांसी ॥ साध्य होईल दुंदुभि ॥ १७ ॥ ऐकोनि हांसला वातनंदन[6] ॥ ह्मणे काय हें बोलिलेती वचन ॥

---

१ शेष. २ अगस्ति. ३ मरण. ४ सुखानें. ५ अर्जुन. ६ मारुति.

तयासी प्रसन्न भृगुनंदन[1] ॥ शुक्र कुळगुरु सर्वस्वें ॥ १८ ॥ आणिक प्रसन्न यासी शंकर ॥ त्याच्या वरें हा अभयवीर ॥ ह्मणोनि कोणाचा विचार ॥ तेथें न चाले सर्वथा ॥ १९ ॥ याचा पिता गजासुर ॥ जेणें सहस्र वर्षें केला समर ॥ परी त्यासी मारावया शंकर ॥ सर्वथा समर्थ न झाला ॥ १२० ॥ वीरभद्र आणि शंकर ॥ मिळोनि मारितां गजासुर ॥ अंतीं स्तवितां गौरीवर[2] ॥ प्रसन्न झाला तयासी ॥ २१ ॥ माझिया पुत्रा देईं वरदान ॥ कोणापासोनि यासी नसावें मरण ॥ अजेय करीं सर्वांपासोन ॥ तूं चर्म प्रावरण करीं माझें ॥ २२ ॥ बरवें ह्मणोनि श्रीशंकर ॥ त्याहूनि अनंत दिधले वर ॥ ह्मणोनि अजिंक्य हा असुर ॥ सर्वांलागीं जाणावा ॥ २३ ॥ परशुरामासारिखा वीर ॥ येणें जिंकिला न लागतां उशीर ॥ माझा स्वामी रघुवीर ॥ येणें पाठविला समाधानें ॥ २४ ॥ ऐसा हा दैत्य पराक्रमी ॥ न जिंकवेचि संग्रामीं ॥ यास्तव विचार करावा तुह्मीं ॥ जेणें साधे निजकार्य ॥ २५ ॥ ऐसें ऐकतां वचन ॥ उगे राहिले कृष्णार्जुन ॥ आतां पुढें कथानुसंधान ॥ सावधान ऐकावें ॥ २६ ॥ पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अत्यंत रसाळ असे जाण ॥ तें ऐकावें सावधान ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ २७ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ दुंदुभिआख्यान अगाध ॥ सप्तषष्टितमाध्याय गोड हा ॥ १२८ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते दुंदुभ्याख्यानं नाम सप्तषष्टितमोध्यायः ॥ ६७ ॥ ॥ अध्याय ॥ ६७ ॥ ओव्या ॥ १२८ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥छ॥ ॥छ॥

१ शुक्र. २ पार्वतीपति शंकर.

# अध्याय ६८.



श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जेमिनि ह्मणे गा भारता ॥ ऐकें पूर्वजांची दिव्य कथा ॥ एकाग्र करूनियां चित्ता ॥ होईं वचनार्थी सादर ॥ १ ॥ मग कर जोडोनियां वीरवर्मा ॥ विनवीतसे पुरुषोत्तमा ॥ मज पाठवा जी संग्रामा ॥ बळें जिंकीन दुंदुभीतें ॥ २ ॥ मज वीरवर्म्यापुढें ॥ कायसें दैत्य तें बापुडें ॥ करोनि सोडीन तें वेडें ॥ बाणजाळेंकरोनियां ॥ ३ ॥ आज्ञा घेऊनि तो उठिला ॥ वेगें रथारूढ झाला ॥ घाव निशाणीं दिधला ॥ सर्व वाजती रणतुरें ॥ ४ ॥ काहळ मृदंग शंख भेरी ॥ दुदुंभी दमामे रणमोहरीं ॥ जेंगटें सनया नानापरी ॥ सैन्यामाझारी वाजती ॥५॥ बत्तीस अक्षौहिणी दळभार ॥ घेऊनि चालिला तो वीर ॥ आपुल्या पराक्रमाचा विस्तार ॥ दाविता झाला कृष्णापुढें ॥ ६ ॥ दळेंसीं चालिला वीरवर्मा ॥ सैन्यधुळीनें व्यापिलें व्योमा[1] ॥ तळीं भार झाला शेषकूर्मा ॥ ऐसा गजभार चालिला ॥ ७ ॥ कीं कुंजररूपें[2] पर्वत ॥ धांवती तयाच्या कटकांत[3] ॥ कीं त्या विमानांसारिखे दिव्यरथ ॥ ध्वजपताकेंसीं शोभती ॥ ८ ॥ ऐसा वीरवर्मा तो लोटला ॥ येतां दैत्यरायें तो देखिला ॥ तोही वेगें रथारूढ झाला ॥ बळें उठावला तयावरी ॥ ९ ॥ दोहीं दळां झाली भेटी ॥ दोघे वीर विख्यात सृष्टीं ॥ करिते झाले शरवृष्टि ॥ परस्परें अनिवार ॥ १० ॥ भैरव सांगती रायासी ॥ वीरवर्मा आला जी रणासी ॥ यम जामात जयासी ॥ सावध वेगें होइंजे ॥ ११ ॥ मग रथारूढ वीर दुंदुभि ॥ वाजत्या झाल्या रणदुंदुभी ॥ तो प्रतिशब्द न माये नभीं ॥ ऐसे झाले वाद्यशब्द ॥ १२ ॥ चौदा कोटी अश्वस्वार ॥ तितुकेचि चालिले कुंजर[2] ॥ दश कोटी रथ परिवार ॥ पायभारा[4] मिति नाहीं ॥ १३ ॥ वीरवर्मा निजदळेंसीं मिसळला ॥ बाणजाळ वर्षों लागला ॥ वीर घायाळ केले ते वेळां ॥ पळों लागले दशदिशां ॥ १४ ॥ वीरवर्मा वीर अद्भुत ॥ शर सोडीतसे अमित ॥ जेवीं मेघधारा वर्षत ॥ शैलाग्रीं त्यापरी ॥ १५ ॥ स्वारांवरी लोटती स्वार ॥ कुंजरांवरी कुंजर ॥ रहंवरांवरी रहंवर ॥ द्वंद्वसंग्राम होतसे ॥ १६ ॥ ऐसा वीरवर्म्याचा पुरुषार्थ ॥ ध्वजाग्रीं पाहोनि हनुमंत ॥ श्रीकृष्णासी असे सांगत ॥ वीरें वीर पाडिले जी ॥ १७ ॥ वीरवर्मा वीर उद्भट[6] ॥ मारिले रथगजांचे थाट ॥ वाट केलीसे सपाट ॥ आपुला रथ चालावया ॥ १८ ॥ मग क्रोधें खवळला दैत्यवर ॥ धांवोनि आला नृपासमोर ॥ मारोनि मार्गण[7] ते अपार ॥ बोलता झाला रायासी ॥१९॥ दुंदुभि ह्मणे वीरवर्म्यातें ॥ तूं बहुत जाणसी यमाचीं मतें ॥ जामातपणें सांगीतलीं तूतें ॥ परी तीं येथें न चालती ॥ २० ॥ मी तों अंतकाचा अंतक ॥ कळिकाळासी माझा धाक ॥ मजपुढें दिससी तूं रंक ॥ नेणसी माझा पराक्रम ॥ २१ ॥ आतां होवोनि सावधान ॥ साहें साहें माझे बाण ॥ ह्मणोनि केलें शरसंधान ॥ तें तात्काळ नृपें निवारिलें ॥ २२ ॥ पंधरा शतें चापें ओढून ॥ तितुके सोडिले दिव्य बाण ॥ पुढें झाले ते अनंतगुण ॥ लक्ष शतलक्षेंसीं ॥ २३ ॥ वीरवर्मा वीर बरवा ॥ न धरोनि सायकांची परवा ॥ शरें शर वारूनि दैत्यपुंगवा ॥ मारिता झाला शरघातें

१ आकाश. २ हत्ती. ३ सैन्यामध्यें. ४ पायदळाला. ५ गणती. ६ मोठा पराक्रमी. ७ बाणविशेष.

॥ २४ ॥ सर्वेंचि शिलीमुख शर सोडिला ॥ तो दैत्यस्तनावरी भरिला ॥ तेणें दैत्यराज भांबावला ॥ भ्रमित झाला क्षणमात्र ॥ २५ ॥ सावध होवोनि दीड सहस्र ॥ गदा घेता आला असुर ॥ गदाघातें नृपदळभार ॥ चूर्ण केला क्षणमात्रें ॥ २६ ॥ गज तुरंगम रथ ॥ यांचा संहार केला बहुत ॥ मग तो सिंहनादें गर्जत ॥ शक्ति तोमरादि वर्षतसे ॥ २७ ॥ वीरवर्म्यानें सोडोनि बाण ॥ सर्व गदांचें केलें चूर्ण ॥ रथाश्व सर्व मारून ॥ ध्वजही पाडिला भूतळीं ॥ २८ ॥ मग नृपें टाकिलें यमास्त्र ॥ बाण टाकोनियां विचित्र ॥ तेणें ताडिलें दैत्यगात्र ॥ यमास्त्र तेणें निवारिलें ॥ २९ ॥ पंधरा शत तोमर टाकिले ॥ ते मध्येंच नृपें छेदिले ॥ सर्वही व्यर्थ होवोनि गेले ॥ जेवीं मनोरथ दरिद्रियांचे ॥ ३० ॥ आग्नेयास्त्र सोडोनि नृपवरें ॥ जाळिलीं असुरांचीं छत्रचामरें ॥ भस्म झालीं हो रणतुरें ॥ मग तेणें वरुणास्त्रें विझविलीं ॥ ३१ ॥ नृपें सोडिलें वायुअस्त्र ॥ दैत्यें घातलें पर्वतास्त्र थोर ॥ येरू वज्र सोडी अनिवार ॥ उभय दळांतें भंगित ॥ ३२ ॥ दुंदुभि झाला क्रोधायमान ॥ चारी लक्ष सोडिले बाण ॥ त्यांचेंही केलें खंडण ॥ त्या सारस्वतपुराधीशें ॥ ३३ ॥ मग ह्मणे वीरवर्मा रणधीर ॥ याचा करावा वेगें संहार ॥ ह्मणोनि आवेशला थोर ॥ दैत्यराज ते समयीं ॥ ३४ ॥ मग तेणें काढिला निर्वाण बाण ॥ जेवीं प्रळयाग्नीसमान ॥ तेजें भरलेंसे गगन ॥ पर्वत उडती शरवातें ॥ ३५ ॥ तो शर चालिला गर्जत ॥ तेजें दश दिशा उजळत ॥ बाणदर्शनें कांपला धराकांत ॥ वारितां हृदयांत संचरला ॥ ३६ ॥ वीरवर्मा पडिला रणीं ॥ प्राण सोडिला तेच क्षणीं ॥ हाहाकारें वर्तली वाणी ॥ पांडवदळीं तेधवां ॥ ३७ ॥ समरीं पडिला नृपनाथ ॥ ही यमास कळली मात ॥ तो धांवोनि आला त्वरित ॥ महाक्रोधें युद्धासी ॥ ३८ ॥ तों मार्गीं भेटला ब्रह्मसुत ॥ तो यमधर्मासी बोलत ॥ तुवां सर्वथा न जावें तेथ ॥ दवडावया आपुल्या भ्रमासी ॥ ३९ ॥ तो हरिहरां जिंकितां अवघड ॥ मग तुमचा तेथें कोण पाड ॥ मी तुह्मां सांगतों उघड ॥ सर्वथा तेथें नव जावें ॥ ४० ॥ ऐकोनियां नारदवचन ॥ विवेकें फिरला तो शमन ॥ तें कृष्णार्जुनांसी वर्तमान ॥ कळतां लोटले दुःखाब्धी ॥ ४१ ॥ मग त्या भूपांसी दचक बैसला ॥ ह्मणती सर्वांचा अंत पुरला ॥ जो जो वीर संग्रामा गेला ॥ तो तो निमाला रणांगणीं ॥ ४२ ॥ आतां कासया व्हावें कष्टी ॥ होणार न चुके परमेष्ठी ॥ येथोनि पुढें काय काय दृष्टीं ॥ पडेल आतां न कळे तें ॥ ४३ ॥ मग कृष्णचरणारविंद नमून ॥ अनुशाल्व निघाला तेथून ॥ पुढें चतुरंग सैन्य घेऊन ॥ चालिला वेगें रणांगणीं ॥ ४४ ॥ नाना वाद्यें हो वाजती ॥ छत्र ध्वज पताका शोभती ॥ वीर आनंदें गर्जती ॥ कोठें ह्मणती दुंदुभि तो ॥ ४५ ॥ अनुशाल्व ह्मणे दुंदुभीतें ॥ शीघ्र करीं संग्रामातें ॥ मी निश्चयें मारीन तूतें ॥ कोठें पळसी सांग आतां ॥ ४६ ॥ दुंदुभि ह्मणे रे बाजटा ॥ जो तूं शब्द बोलसील तो खोटा ॥ जो वीर असतो मोठा ॥ तो तंव सर्वथा न बोले ॥ ४७ ॥ मागां जे जे वीर आले ॥ ते कोणते जय

१ घोडा. २ दुंदुभीचीं. ३ वीरवर्म्यानें. ४ नारद. ५ यम. ६ ब्रह्मदेव. ७ वाचाळा.

घेवोनि गेले ॥ मग वीरें वीरांतें विंधिलें ॥ मनोवेगें त्या काळीं ॥ ४८ ॥ अनुशाल्व योद्धा प्रबळ ॥ सोडोनि अमित बाणजाळ ॥
भेदिले वीरें वीर सकळ ॥ केले विकळ निजशस्त्रीं ॥ ४९ ॥ शक्ति नाराच भल्ल सायक ॥ वीरें सोडिले ते अनेक ॥ तेणें निर्दाळि-
लें से कटक ॥ भोजकोटाधिपतीचें ॥ ५० ॥ हातीं घेवोनियां गदा ॥ अश्व रथ गजांचा करीत चेंदा ॥ दैत्यराव करीतसे खेदा ॥
ह्मणे हाही वीर अति बळी ॥ ५१ ॥ जरी सर्प झाले प्रचंड ॥ तयांसी भक्षितसे गरुड ॥ ऐसें बोलोनि छेदिलें कोदंड ॥ अनुशाल्वें
दुंदुभीचें ॥ ५२ ॥ मग तो दैत्य होवोनि सकोप ॥ दुजें करीं घेतलें चाप ॥ बाण सोडिले जी अमूप ॥ येतां तेणें निवारिले ॥ ५३ ॥
दोघे आवेशें भांडती ॥ येरयेरां नाटोपती ॥ सिंहनादें गर्जती ॥ टाळीं बैसती सर्वांचीं ॥ ५४ ॥ जैसा छेदिजे इक्षुदंड ॥ तैसे वीर
पडती दुखंड ॥ ते दोघे वीर असती प्रचंड ॥ दाविती उदंड रणभेदा ॥ ५५ ॥ तंव तेथें रक्तप्रवाह लोटला ॥ तेणें प्रेतमेळा वाह-
वला ॥ ठायीं ठायीं मांसपंक झाला ॥ तेथें रुतती गजाश्व ॥ ५६ ॥ वीर धांवती हो तवकें ॥ परी तयां रोधिलें मांसपंकें ॥ बुडती त्या
रथांचीं चाकें ॥ कांहीं केल्या न चालती ॥ ५७ ॥ ऐसा संग्राम तो पातला ॥ वीरें वीर धरणीं पाडिला ॥ मग दुंदुभि कोपला ॥
ह्मणे विलंब न भला ययासी ॥ ५८ ॥ ह्मणे वीरा होईं सावधान ॥ साहीं माझे रुद्रबाण ॥ येरें सोडितांच खंडण ॥ करूनि खंडिलें
तें चाप ॥ ५९ ॥ अनुशाल्वें एक बाण सोडिला ॥ दैत्य गगनोदरीं उडविला ॥ शैलप्राय धरणीं आपटिला ॥ दैत्य लाजला रणा-
माजी ॥ ६० ॥ रागें ओष्ठ चावोनि दंतीं ॥ तेणें सोडिली निर्वाणशक्ति ॥ तेजें लोपविला दिनपति ॥ नयन झांकती वीरांचे ॥ ६१ ॥
ती अनिवार शक्ति चालिली ॥ वेगें हृदयावरी आदळली ॥ अनुशाल्वाची शांति झाली ॥ मग ती शिरली पृथ्वींत ॥ ६२ ॥ ऐसा
अनुशाल्व तो पाडिला ॥ दळीं हाहाकार वर्तला ॥ पांडवदळभार पळों लागला ॥ कोणी रक्षिता नसे त्यासी ॥ ६३ ॥ तों दुंदुभि
वीरश्रीनें शोभला ॥ बळगर्वमदें असे फुगला ॥ भाट बंदिजनीं असे स्तविला ॥ गाती पवाडे संतोषें ॥ ६४ ॥ तों कृष्णार्जुनांसी हें
कळलें ॥ ह्मणती थोर ओखटें झालें ॥ सकळ वीरांचें मानस भियालें ॥ अनुशाल्ववार्ता ऐकूनि ॥ ६५ ॥ मग हंसध्वज ह्मणे मेघ-
श्यामा ॥ मज आज्ञा द्यावी जी संग्रामा ॥ मी दंडीन त्या दैत्याधमा ॥ तुझ्या प्रतापें स्वामिया ॥ ६६ ॥ ऐसें बोलोनियां नृपगणा ॥
घाव दिधला निशाणा ॥ तेणें हडबडिली दैत्यसेना ॥ आणि दिग्गज कांपिन्नले ॥ ६७ ॥ लागले रणतुरांचे गजर ॥ तेणें दणाणिलें
अंबर ॥ दिशा झाल्या धूलिधूसर ॥ नभीं दिनकर दिसेना ॥ ६८ ॥ वेगें दळामाजी भरला ॥ शरघायें मारित चालिला ॥ तेथें
कोलाहल थोर झाला ॥ अंतक आला ह्मणोनि ॥ ६९ ॥ तों पुढें गजावळी देखिली ॥ ती गदाघायें विध्वंसिली ॥ मागुती देवोनि
आरोळी ॥ कुंजर लोटिती पुढें पुढें ॥ ७० ॥ एकातें धरोनियां चरणीं ॥ बळें आपटीतसे धरणीं ॥ एक पुच्छासी कवळूनि ॥ नृपें

१ दुंदुभीचें. २ पुष्कळ. ३ ऊंस. ४ पर्वताप्रमाणें. ५ सूर्य. ६ पराक्रम. ७ वाईट. ८ आकाश.

धरणीं आपटिले ॥ ७१ ॥ ऐसाचि केला रथांचा चूर ॥ नाहींसा केला अश्वभार ॥ मग त्या पायदळाचा संहार ॥ केला तो मुखें न वर्णवे ॥ ७२ ॥ एक घायें अति कुंथत ॥ एक शरें पडले हुंबत ॥ एक पाणियावीण चडफडित ॥ ऐसे लोळती रणरंगीं ॥ ७३ ॥ ऐसा तो परम वीर गाढा ॥ करीत चालिला सैन्यरगडा ॥ शोणितें वाहती भडभडां ॥ प्रेतें चहूंकडे वाहती ॥ ७४ ॥ पुढें चालिला हंसध्वज ॥ रागें आरक्त झाला जेवीं गुंज ॥ दृष्टीं लक्षीतसे दैत्यराज ॥ दारुण युद्ध करावया ॥ ७५ ॥ तो दुंदुभीनें नृप देखिला ॥ क्रोधें तयावरी लोटला ॥ संतोषोनि माथा तुकविला ॥ ह्मणे भला केला संग्राम ॥ ७६ ॥ तुवां फार केला संहार ॥ बरा जाणसी युद्धप्रकार ॥ परी देखतां कस्तूरीमृग सुंदर ॥ नसे दया व्याघ्रासी ॥ ७७ ॥ मागां जे जे आले रणशूर ॥ तिहीं सेविलें यममंदिर ॥ तयांचा घ्यावया समाचार ॥ तुजलागीं पाठवितों ॥ ७८ ॥ मग गुणीं लावोनि तीक्ष्ण बाण ॥ आकर्ण ओढोनि सोडिला जाण ॥ तयाचें अर्धमार्गीं खंडन ॥ करूनि टाकिलें हंसकेतें ॥ ७९ ॥ सवेंचि सोडिले शत मार्गण ॥ त्यांचे पुढें झाले लक्षगुण ॥ लक्षांचे झाले कोटिप्रमाण ॥ त्यांचेंही खंडन नृप करी ॥ ८० ॥ दैत्य तयाप्रति बोले वचन ॥ बरें तूं जाणतोसी निवारण ॥ परी वारोनि सोडावयाचें लक्षण ॥ तूं न जाणसी अणुमात्र ॥ ८१ ॥ आतां होईं रे सावधान ॥ हा तूं छेदीं रे माझा बाण ॥ तों धनुष्यासहित हंसकेतन ॥ छेदिता झाला बाणातें ॥ ८२ ॥ सवेंचि शिलीमुख सोडिला ॥ तेणेंचि दैत्य आकाशीं उडविला ॥ तेणें यावें जों भूमंडळा ॥ तों रथ उडविला बाणघातें ॥ ८३ ॥ जैसा बहुरूपी कुशळ ॥ आकाशीं फिरवी काष्ठगोळ॥ तेवीं हंसध्वज दैत्यपाळ- ॥ शर कौतुकें उडवीतसे ॥ ८४ ॥ ऐसें तयाचें युद्धकौशल ॥ कृष्णार्जुनां सांगे वातबाळ ॥ ह्मणे हंसध्वजें दैत्य व्याकुळ ॥ निजलाघवें केला असे ॥ ८५ ॥ पतन होय जेवीं ताडफळा ॥ तेवीं भूमंडळीं दैत्य आपटला ॥ नृपातें देखोनि लाजिन्नला ॥ ह्मणे धन्य केला पुरुषार्थ ॥ ८६ ॥ मग दैत्य पावला महामदा ॥ करीं दीड सहस्र घेतल्या गदा ॥ त्या नृपावरी टाकिल्या एकदा ॥ तेव्हां आपदा फार झाली ॥ ८७ ॥ गदाघातें नृप मूर्च्छित ॥ पडला वेगीं हंसकेत ॥ देखोनि सुबुद्धि प्रधान त्वरित ॥ तयावरी उठावला ॥ ८८ ॥ परी मत्त केसरीपुढें ॥ काय करील शलभ बापुडें ॥ एकेचि शरें वाडेंकोडें ॥ मस्तक उडविलें आकाशीं ॥ ८९ ॥ सवेंचि सावध झाला हंसकेत ॥ पुनः संग्राम केला अद्भुत ॥ परम संतोषला दैत्यनाथ ॥ ह्मणे हा तों अति शूर ॥ ९० ॥ जरी याची पाहूं युद्धलीला ॥ तरी हा संहारील सकळ दळा ॥ याचा निःपात करितां भला ॥ वाटे मजला ये काळीं ॥ ९१ ॥ ह्मणोनि काढिला रुद्रबाण ॥ तो भैरवमंत्रें मंत्रून ॥ सोडितांचि भरलें गगन ॥ प्रळयाग्नि जैसा धगधगित ॥ ९२ ॥ तो अनिवार गर्जतसे शर ॥ तेणें झांकलें नृपाक्षकल्हार ॥ वेगें छेदोनि पाडिलें शिर ॥ जेथें होते कृष्णार्जुन ॥ ९३ ॥ तें शिरकमळ नेत्रीं देखतां ॥ सर्वांसी झालीसे दुःखसरिता ॥



१ कुंथत. २ रक्ते. ३ कानापर्यंत. ४ बाण. ५ बाणविशेष. ६ मारुति. ७ सिंहापुढें. ८ टोळ.

तयेची खोली गा नृपनाथा ॥ मज ती सर्वथा न सांगवे ॥ ९४ ॥ सर्वही बैसले तयेचे पाळीं ॥ कोणी कोणातें न बोले बोली ॥ पुनः मातली शोकाश्रुजळी ॥ सर्व सचिंत बैसले ॥ ९५ ॥ तंव सर्वही बोलती जी वनमाळी ॥ तुवां सर्वांची उपेक्षा केली ॥ ह्मणोनि हीं रत्नें बुडोनि ठेलीं ॥ दैत्यबळार्णवामाझारी ॥ ९६ ॥ तंव चंद्रहास आणि नीलध्वज ॥ प्रवीर कृतवर्मा वीरराज ॥ तैसाचि सात्यकी तेजःपुंज ॥ पांचही विनविती कृष्णातें ॥ ९७ ॥ कृपा करोनियां हृषीकेशी ॥ आह्मां आज्ञा द्यावी वेगेंसीं ॥ पांच मिळोनि मारूं दुंदुभीसी ॥ जेवीं पंचविषय प्राणांतें ॥ ९८ ॥ कृष्णाज्ञा घेऊनि पांचहीजण ॥ वेगें निघाले तेथून ॥ कृष्णें चंद्रहासासी पाचारून ॥ आपणापासीं राहविला ॥ ९९ ॥ चौदा कोटी सैन्य घेऊन ॥ पुढें चालिले वीरगण ॥ युद्ध करावया दारुण ॥ चौघेजण उदित ॥ १०० ॥ आतां चौघांचें युद्ध होईल दारुण ॥ तें पुढिले प्रसंगीं असे जाण ॥ तेंचि ऐकावें निरूपण ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ दुंदुभिआख्यान अगाध ॥ अष्टषष्टितमाध्याय गोड हा ॥ १०२ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके दुंदुभ्याख्यानं नाम अष्टषष्टितमोध्यायः ॥ ६८ ॥ ॥ अध्याय ॥ ६८ ॥ ओव्या ॥ १०२ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ छ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ राया होवोनि सावधान ॥ ऐकें पूर्वजकथानुसंधान ॥ पुढें चालिले चौघेजण ॥ दारुण युद्ध करावया ॥ १ ॥ चौघे वाजती ढोल नगारे दुंदुभी ॥ तो प्रतिशब्द न माये नभीं ॥ ऐकोनि कोपा चढला दुंदुभि ॥ वेगें धांवला संग्रामा ॥ २ ॥ चौघे झाले चहूंकडे ॥ मार मारूं लागले देहुडे ॥ पाडूं लागले दैत्यहुडे ॥ केलें दुर्घट महावीरीं ॥ ३ ॥ आधींच वीर ते रणधीर ॥ चहूंकडोनि सोडिती शर ॥ घाबरा केला तो असुर ॥ मग मनीं स्मरे कुळगुरूतें ॥ ४ ॥ स्मरण करितां गुरुचरण ॥ दैत्य बळावला पूर्ण ॥ जे जे सोडीत अमित बाण ॥ ते ते चौघे निवारिती ॥ ५ ॥ गगनींहोनि [१]बलाहक ॥ शैलावरी वर्षती उदक ॥ तेवीं चौघे वीर सायक ॥ अपार वर्षती दैत्यावरी ॥ ६ ॥ वीर सिंहनादें गर्जती ॥ धाकें कळिकाळ कांपविती ॥ देव विमानें पळविती ॥ ऐसा झाला वीरघोष ॥ ७ ॥ जेवीं लागतां [३]व्यजनानिळ ॥ सर्वथा न हाले कनकाचळ ॥ तेवीं शरघातें असुरपाळ ॥ नव्हे व्याकुल अणुमात्र ॥ ८ ॥ दीड सहस्र कर उचलोन ॥ तितुके लावी गुणीं बाण ॥ सोडिले त्या चहूंतें लक्षोन ॥ तिहीं तिळप्राय ते केले ॥ ९ ॥ दैत्य करी जें जें संधान ॥ तें तें व्यर्थ होय संपूर्ण ॥ दैत्य तयांच्या बाणेंकरून ॥ रक्तमय झाला सर्वांगीं ॥ १० ॥ वसंतकाळीं फुलला पळस ॥ तेवीं शोभा आली पांचास ॥ परी दैत्य झाला कासाविस ॥ बाणेंकरून चौघांच्या ॥ ११ ॥ तयांसी बोले दैत्याधिपति ॥ ही तों नव्हेचि राजनीति ॥ एकें भांडावें एकाप्रति ॥ ऐसी युद्धनीति बोलिली ॥ १२ ॥ जो अनंत कपट्यांमाजी कपटी ॥ आणि आपणा ह्मणवी जगजेठी ॥ त्याची तुह्मी शिकलेति परिपाटी ॥ तरी खळासी खळत्व करावें ॥ १३ ॥ जरी चिचुंदरी भक्षी लोहपात्रा ॥ तरी घारी घेयोनि गेली लेंकुरा ॥ तो न्याय येथें खरा ॥ शठासी शठत्व करावें ॥ १४ ॥ ह्मणोनि माया सोडिली भैरवी ॥ तिणें आंधळीं केलीं अघवीं ॥ ऐसा दैत्य तो अतिलाघवी ॥ मग निर्वाण बाण काढिले ॥ १५ ॥ एकदांच सोडिले चारी बाण ॥ तेजें प्रळयाग्निसमान ॥ गर्जनें लाजविती प्रळयघन ॥ ऐसे ते बाण चालिले ॥ १६ ॥ तयांचें करावें निवारण ॥ तरी ते झाले अंध पूर्ण ॥ ते लागतां चौघांचे प्राण ॥ घेऊनि गेले क्षणमात्रें ॥ १७ ॥ चौघे पडल्याची वार्ता ॥ वेगें श्रुत झाली पार्था ॥ मग अद्भुत वाढली [६]दुःखसरिता ॥ तये-माजी बुडाले सर्वही ॥ १८ ॥ मग कृष्णार्जुनांचीं [७]नेत्रनलिनें ॥ वर्षो लागलीं शोकजीवनें ॥ तें जाणोनि कुलिंदनंदनें ॥ केलें समाधान दोघांचें ॥ १९ ॥ ह्मणे मृत्युलोकींचा विचार ॥ मरण पावणें हा निर्धार ॥ तो प्राप्त झालिया दुःखसागर ॥ किमर्थ करणें स्वामिया ॥ २० ॥ अघटित घडविणार तव माया ॥ जिणें भुलविलें लोकत्रया ॥ तिच्या आधीन कां झालासी यदुराया ॥ रक्षीं धनंजया ये काळीं ॥ २१ ॥ मज आज्ञा द्यावी यदुनंदना ॥ मीही जाइन रणकंदना ॥ सवें दहा अक्षौहिणी घेऊनि सेना ॥ कृष्णाज्ञेनें निघाला ॥ २२ ॥ लागला रणवाद्यांचा गजर ॥ तेणें पूर्ण झालें गगनोदर ॥ वेगें लोटले रथाश्वकुंजर ॥ घ्या घ्या ह्मणोनि धांवती ॥ २३ ॥ महा बलाढ्य तो

१ मेघ. २ बाण. ३ पंख्याचा वारा. ४ सोन्याचा पर्वत. ५ दुंदुभि. ६ दुःखनदी. ७ नेत्रकमलें. ८ चंद्रहासानें. ९ अर्जुनाला.

चंद्रहास ॥ अति प्रिय जो श्रीकृष्णास ॥ त्याचा पराक्रम सकळांस ॥ बरवियापरी कळलासे ॥ २४ ॥ हा येथें पावलिया मरण ॥ शीघ्र येईल नारायण ॥ ऐसा मानोनि विश्वास पूर्ण ॥ सोडिले बाण कोटिसंख्या ॥ २५ ॥ चंद्रहासें करूनि संधान ॥ सर्व शरांचें केलें खंडन ॥ स्वयें सोडिले तीक्ष्ण मार्गण[1] ॥ तेणें तिळप्रमाण ते केले ॥ २६ ॥ ते दोघे बेलार्णव[2] अगाध ॥ दोघे महाप्रतापी प्रसिद्ध ॥ शस्त्रास्त्रांचें कठिण युद्ध ॥ करिते झाले दोघेही ॥ २७ ॥ परम खवळला चंद्रहास ॥ केला दैत्यसेनेचा विध्वंस ॥ मग मनीं पावलासे त्रास ॥ कां वृथा प्राण्यां मारावें ॥ २८ ॥ ज्यास मारावें तो मरेना ॥ हें कळों आलें माझिया मना ॥ तथापि स्वामिकार्जी आंगवणा[3] ॥ चोरूं नये कुळवंतें ॥ २९ ॥ ह्मणोनि त्या चंद्रहासें संग्राम ॥ सर्वांपरीस केला दुर्गम ॥ परी अनुकूळ नसतां सर्वोत्तम ॥ केले ते श्रम व्यर्थ होती ॥ ३० ॥ एक विजयश्रीनें वरिला ॥ दुजा विजयश्रीनें सोडिला ॥ त्यांचा वर्णावया युद्धसोहळा ॥ श्लाघ्यता न वाटे मानसीं ॥ ३१ ॥ काळस्वरूपी हा गोपाळ ॥ सदा जयासी असे अनुकूळ ॥ तो जिंकील हा ब्रह्मांडगोळ ॥ याचें आश्चर्य काय मानावें ॥ ३२ ॥ जयासी झाला तो प्रतिकूळ ॥ त्याच्या हारीचें काय नवल ॥ ऐसें बोलती शास्त्रकुशळ ॥ करणें बळाबळ काळाचें ॥ ३३ ॥ तथापि चंद्रहास वीरोत्तम ॥ अद्भुत करिता झाला संग्राम ॥ जेणें तोषे पुरुषोत्तम ॥ तें सावध ऐकें नृपेंद्रा[4] ॥ ३४ ॥ चंद्रहासें बाण सोडिला ॥ तेणें दैत्यरथ गगना नेला ॥ पुनः येऊं पाहे भूमंडळा ॥ तों आणिक नेला गगनासी ॥ ३५ ॥ येतां जातां येरझारी ॥ फेरे झाले जी शतवरी ॥ जेवीं प्राणी विसरोनि श्रीहरि ॥ जन्ममरणीं फिरतसे ॥ ३६ ॥ मनीं आठवितां रुद्रवरदान ॥ सावध झाला दैत्यभूषण ॥ केलें कोटी शरांचें संधान ॥ तें तिळप्राय केलें नृपें ॥ ३७ ॥ चंद्रहासें केलें एक नवल ॥ बाणें खिळिलें दैत्यकरकमळ ॥ तैशाचपरी मुखें सकळ ॥ शरें खिळोनि टाकिलीं ॥ ३८ ॥ दैत्य मनीं झाला भयभीत ॥ ह्मणे कोण हा याचा पुरुषार्थ ॥ शिवाचें वरदान व्यर्थ ॥ झालें ऐसें मज वाटे ॥ ३९ ॥ जेवीं केतकीचीं पत्रें ॥ एकेक उकलितां विचित्रें ॥ परिमळें भरती सर्व गात्रें ॥ तेवीं हा वीर बळावला ॥ ४० ॥ आतां काय करूं मी उपाव ॥ माझा जाऊं पाहतो जीव ॥ कोठें गेला तो गुरु भार्गव[4] ॥ जो सर्व संकटीं तारिता ॥ ४१ ॥ वृषकेतादि सर्व वीर ॥ ऐसे होते ते रणधीर ॥ परी रुद्राचें वरदान थोर ॥ ह्मणोनि रणीं न मानिले ॥ ४२ ॥ राया क्षत्रियांचा धर्म ॥ स्वशक्तीनें करावा संग्राम ॥ जयपराजयाचें काम ॥ ईश्वराधीन सर्वथा ॥ ४३ ॥ ऐसा मनीं धरोनि विश्वास ॥ संग्राम करितां चंद्रहास ॥ दैत्य होतसे कासाविस ॥ ह्मणे कैसें करावें हो ॥ ४४ ॥ ऐसें त्या चंद्रहासाचें कौतुक ॥ कृष्णासी सांगे कपिनायक ॥ ऐसा संग्राम अलोलिक ॥ कोण्या वीरें नसे केला ॥ ४५ ॥ ऐकोनि संतोषले कृष्णार्जुन ॥ परी अघटित रुद्रवरदान ॥ तेणें चंद्रहास पावेल मरण ॥ ऐसेंचि वाटे तयांसी ॥ ४६ ॥ रायां[5] ऐकें सावधान ॥ मग काय करी दैत्यनंदन ॥ करिता झाला शिव-



१ बाण. २ बळसागर. ३ पराक्रम. ४ शुक्र. ५ जनमेजया.

स्मरण ॥ तेणें वदनें मुक्त झालीं ॥ ४७ ॥ सत्य वाटली नामप्रचीती ॥ ह्मणोनि आवडी बैसली चित्तीं ॥ पुनः स्मरे पार्वतीपति ॥ तेणें हस्तबंधनें तुटलीं ॥ ४८ ॥ करितां शिवनामस्मरण ॥ तात्काळ तुटे भवबंधन ॥ तेथें तुटलें शरबंधन ॥ याचें आश्चर्य न वाटेचि ॥ ४९ ॥ संतोष झाला दैत्यनाथा ॥ ह्मणे धन्य धन्य याची माता ॥ जयेच्या गर्भागारीं तत्वतां ॥ ऐसा वीर हा जन्मला ॥ ५० ॥ चंद्रहासासी ह्मणे असुर ॥ धन्य धन्य तूं वीर झुंजणार ॥ अवघें हिंडतां चराचर ॥ ऐसा वीर न देखिला ॥ ५१ ॥ आतां होईं रे सावधान ॥ साहें साहें माझे बाण ॥ बरवा रक्षीं आपुला प्राण ॥ व्याकुळ झणीं होसी तूं ॥ ५२ ॥ ह्मणोनि काढिला रुद्रबाण ॥ जो द्वादशादित्य[२]समान ॥ तो देखतां वाटे आलें मरण ॥ ऐसें झालें सकळांसी ॥ ५३ ॥ बाण आलासे गर्जत ॥ तेणें दिङ्मंडळ कांपत ॥ येवोनि बैसला अकस्मात ॥ कंठनाळीं नृपाच्या ॥ ५४ ॥ किरीटकुंडलांसहवर्तमान ॥ तें शिर उडालें तेथून ॥ श्रीकृष्णचरणारविंद लक्षून ॥ आलें वेगें त्यापासीं ॥ ५५ ॥ शिर देखोन कृष्णार्जुन ॥ अत्यंत झाले शोकसंपन्न ॥ दोघांचें करावया समाधान ॥ एक मारुति उरलासे ॥ ५६ ॥ जिहीं करावें समाधान ॥ ते ते सर्व गेले निमोन ॥ अंतीं उरले तिघेजण ॥ आपआपणा आश्वासिती ॥ ५७ ॥ दैत्य अत्यंत सुखावला ॥ ह्मणे माझा पुनर्जन्म झाला ॥ विजयश्रीनें असे फुगला ॥ वर्णिती ज्यातें भाटबंदिजन ॥ ५८ ॥ रथीं बैसलासे नीट ॥ कृष्णार्जुनांची पाहे वाट ॥ बाहुकंड उद्धवली उद्धट ॥ केव्हां वैकुंठपीठ येईल ॥ ५९ ॥ ऐसें युद्ध झालें दिवस तीन ॥ शेवटीं वीर उरले तीन ॥ तेही झाले शोकसंपन्न ॥ वाटे परदेश ते काळीं ॥ ६० ॥ मग हनुमंतवचनेंकरून ॥ दोघे पावले समाधान ॥ तों पूर्ण झाला अस्तमान ॥ संध्यावंदनातें सारिलें ॥ ६१ ॥ कष्टें झाला प्रातःकाळ ॥ मग उठोनियां तमाळनीळ ॥ स्नानसंध्या करूनि सकळ ॥ पार्थापासीं तो आला ॥ ६२ ॥ चोवीससहस्र वर्षें सागरीं ॥ मीन भांडती निजमत्सरीं ॥ रथीं कपि पार्थ श्रीहरि ॥ त्याच्या मुखीं पडतील ॥ ६३ ॥ हेंचि पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ रसाळ आहे अति कथन ॥ तेंचि ऐकावें जी सावधान ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ६४ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ दुंदुभिआख्यान अगाध ॥ नवषष्टितमाध्याय गोडहा ॥ ६५ ॥ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते दुंदुभ्याख्यानं नाम नवषष्टितमोऽध्यायः ॥ ६९ ॥ ॥ अध्याय ॥ ६९ ॥ ॥ ओव्या ॥ ६५ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

१ खरोखर. २ बारा सूर्यांप्रमाणें.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ रायासी ह्मणे मुनिभूषण ॥ ऐकें पूर्वजांचें अनुसंधान ॥ कृष्णार्जुनें संध्यास्नान ॥ केलियानंतर काय झालें ॥ १ ॥ श्रीरामपदारविंदभ्रमर ॥ सीताशोकवनकुठार ॥ लंकापुरपतिसुतांतकर ॥ बोले सादर कृष्णाप्रति ॥ २ ॥ म्यां रामपदांबुज सेविलें ॥ शत योजनार्णवजळ लंघिलें ॥ सकळ हेमपुर विध्वंसिलें ॥ समरीं वधिले निशाचर ॥ ३ ॥ त्या मज संग्राम करावया ॥ दैत्येशबळगर्व हरावया ॥ आज्ञा द्यावी जी यदुराया ॥ हीच विनंति पैं माझी ॥ ४ ॥ इंदिरावदनसुधांशुचकोर ॥ कपीश्वराप्रति बोले उत्तर ॥ दुंदुभिबळगर्वाचें शिर ॥ पाडोनि येईं प्लवंगमा ॥ ५ ॥ आज्ञा घेऊन कपिकेसरी ॥ वेगें उडाला अंबरीं ॥ सक्रोध झाला अंतरीं ॥ नेणों ब्रह्मांडफळा भक्षील ॥ ६ ॥ तों गगनीं होता वृत्रारि ॥ सक्रोध कपि देखोनि चिंता करी ॥ हा दैत्यनाथ सहपरिवारीं ॥ नेईल लया वाटतें ॥ ७ ॥ तंव बृहस्पति बोले पाकशासना ॥ तूं कां व्यर्थ पडसी चिंतावना ॥ त्रैलोक्य जरी आलें समरांगणा ॥ तरी हा अजेय सर्वांसी ॥ ८ ॥ तों कपिवीरें शैल उपटिला ॥ तो कनकाचळाचा बंधु गमला ॥ उपटितां कांपली वसुंधरा ॥ अष्ट कुळाचळ डळमळिले ॥ ९ ॥ प्रचंड शैल घेवोनि करीं ॥ वेगें चालिला कपिकेसरी ॥ तो अष्टभैरवीं देखिला दुरी ॥ सांगती वेगें दैत्यराया ॥ १० ॥ प्रचंड शैल घेवोनि मारुति ॥ जवळी आला जी दैत्यपति ॥ सावध होऊनि तयाप्रति ॥ शरसंधान करावें ॥ ११ ॥ भैरव ह्मणती कपीश्वरा ॥ कां व्यर्थ धरिसी गर्वफुगारा ॥ हा तुझाही ग्रास करील खरा ॥ सरें माघारां अज्ञाना ॥ १२ ॥ दैत्यमस्तकीं पर्वत टाकिला ॥ तो तेणें पिष्ट करोनि सोडिला ॥ मग तयाप्रति दुंदुभि बोलिला ॥ तो मी नव्हें रे दशकंठ ॥१३॥ तुझें पर्वताचें झुंजणें ॥ आणि झाडें मोडोनियां टाकणें ॥ येथें न चाले मर्कटपणें ॥ चेष्टा कुचेष्टा पैं तुझ्या ॥ १४ ॥ तूं महा-प्रतापी कपिराया ॥ येथें आलासी पांडवकार्या ॥ तूं न पुरसी माझिया घाया ॥ तुझी घेईन पूर्णाहुती ॥ १५ ॥ ऐसें बोलून टाकिला बाण ॥ तो हनुमंतें करें केला चूर्ण ॥ ऐसे बाणामागें सोडीत बाण ॥ ते ते कपि पिष्ट करी ॥ १६ ॥ जें जें सज्ज करी संधान ॥ तें तें व्यर्थ करी हनुमान ॥ जेवीं अज्ञानाचें कर्माचरण ॥ देहाभिमानें व्यर्थ होय ॥ १७ ॥ रुद्रमंत्राक्षरें मंत्रोन ॥ दैत्यें टाकिला एक बाण ॥ तो अनिवार ऐसें जाणोन ॥ करी तो ओडण पर्वताचें ॥ १८ ॥ तें दैत्यें देखोनियां डोळां ॥ तेव्हां तो खदखदां हांसला ॥ मग त्या कपीनें शतयोजनें शिळा ॥ आणोनियां वरी टाकिली ॥ १९ ॥ ती शिळा येताहे निकट ॥ शरें केलें तयेचें पीठ ॥ मग तयासी बोलिला स्पष्ट ॥ या मर्कटचेष्टा सांडीं रे ॥ २० ॥ मग दैत्यपुंगव अति कोपला ॥ अनिवार रुद्रबाण काढिला ॥ तो हनु-मंतासीं भांडों लागला ॥ तोही भांडे तयासीं ॥ २१ ॥ बाणहनुमंतांचें युद्ध ॥ गगनीं झालें क्षणार्ध ॥ तें दैत्यें देखोनि झाला सक्रोध ॥ अन्य शर योजी चापासी ॥ २२ ॥ तो अनिवार शक्तिबाण ॥ समोर आलासे गर्जोन ॥ तो करतळें पिष्ट करून ॥

१ मारुति. २ रामाचें चरणकमल. ३ लंका. ४ राक्षस. ५ कृष्ण. ६ हे वानरा ( मारुते ). ७ आकाशांत. ८ इंद्र. ९ पृथ्वी. १० रावण. ११ दुंदुभि.

शिवशक्तिबाण टाकिला ॥ २३ ॥ मग गजात्मज[1] पावला क्रोधा ॥ पंचदशशत[2] घेतल्या गदा ॥ त्यावरी टाकितां अल्पही खेदा ॥ न पावे राया मारुति ॥ २४ ॥ शक्ति तोमर आणि गदा ॥ तयावरी टाकिल्या हो एकदा ॥ तेव्हां कपि पावला आपदा ॥ जर्जर झाला शस्त्रघातें ॥ २५ ॥ मग पुच्छें बांधोनि दैत्यासी ॥ सागरीं टाकितां तयासी ॥ तरी आपणचि दिधलें वरदानासी ॥ तें अन्यथा करूं नये ॥ २६ ॥ ह्मणोनि त्याच्या शस्त्रघातें ॥ क्लेश मानोनि प्रभंजनसुतें[3] ॥ अंधारी आलीसे नयनांतें ॥ कांहीं उपाय सुचेना ॥ २७ ॥ क्षणमात्रें झाला सावधान ॥ तेथोनि परतला जाण ॥ रामदूत भंगला जाणोन ॥ सुभद्रारमण[4] खेद करी ॥ २८ ॥ तें देखोनि इंदिराकांत[5] ॥ अत्यंत झालासे विस्मित ॥ जेणें पळविला हनुमंत ॥ तो करील अंत आमुचाही ॥ २९ ॥ पार्थासी ह्मणे वातनंदन ॥ आतां थोर ओढवलें व्यसन ॥ हा तों नव्हे आन दैत्यांसमान ॥ उपाय कैसा करावा ॥ ३० ॥ नारदें सांगितला जो अभिप्राव ॥ त्याचा मज आला अनुभव ॥ याचें अचाट बळवैभव ॥ न जिंकवे जाण आह्मांतें ॥ ३१ ॥ मग पार्थासी ह्मणे हनु-मान ॥ कां पावूं इच्छितोसी मरण ॥ जी गति पावले नृपगण ॥ तीचि गति होईल तिघां ॥ ३२ ॥ म्यां बहुतांसीं संग्राम केला ॥ लंका जाळोनि अखया मारिला ॥ ऐसा प्रताप देखिला ॥ नाहीं कोणाचा संग्रामीं ॥ ३३ ॥ आतां येथोनि मुरडावें ॥ सर्वथा यासीं न झुंजावें ॥ निजग्राम जवळी करावें ॥ तरीच बरवें होईल ॥ ३४ ॥ आहा आहारे प्लवंगमा[6] ॥ जिणें उचित केवीं रे आह्मां ॥ कैसें मुख दाखवावें धर्मा ॥ आणि त्या द्रौपदीकुंतींसी ॥ ३५ ॥ हें काय बोलिलासी रे अनुचित ॥ सर्व रायांचा करूनि घात ॥ आह्मां-लागीं नव्हे उचित ॥ येथोनियां जावया ॥ ३६ ॥ या दैत्याभेणें पळावें ॥ कोठें थोरपणा मिळवावें ॥ यासी सर्वथा झुंजावें ॥ मग होणार तें सुखें होऊ ॥ ३७ ॥ ऐसें श्रीकृष्ण बोलिला ॥ तो वृत्तांत पार्थें श्रवण केला ॥ पुनः कपीश्वर बोलों लागला ॥ तेंचि ऐकावें सावधान ॥ ३८ ॥ येथें करितां हो निर्वाण ॥ हस्तनापुरासी जाईल कवण ॥ धर्मरायासी वर्तमान ॥ सांगेल कवण स्वामिया ॥ ३९ ॥ मग कृष्ण ह्मणे अर्जुनासी ॥ कोणता विचार येतो मानसीं ॥ तो सत्य सांगा आह्मांसी ॥ तेंचि करूं अवश्य ॥ ४० ॥ ऐकोनि बोले धनुर्धर ॥ जो स्वामीनें केला विचार ॥ तोचि मज प्रमाण साचारँ[7] ॥ यासी अन्यथा असेना ॥ ४१ ॥ आणिक विचार न करावा ॥ निश्चयें संग्राम आदरावा ॥ पुढें होणार जें माधवा ॥ तें तों न चुके सर्वथा ॥ ४२ ॥ मागें युद्धें केलीं दारुण ॥ अनेक जिंकिले नृपगण ॥ परी येथींच्यासारिखें निर्वाण ॥ केलें नसे कोणींही ॥ ४३ ॥ ऐकोनि देव ह्मणे किरीटी ॥ ऐसें कोठें न झालें सृष्टीं ॥ हनुमंतासारिखा महाहटी ॥ तोही हिंपुटी[8] येथें झाला ॥ ४४ ॥ आतां रथा सज्ज करीं वहिलां[9] ॥ येणें थोर असे अपमान केला ॥ कैसें दाखवावें मुखकमळा ॥ त्या धर्मसभेमाझारीं ॥ ४५ ॥ कपीश्वराऐसा वज्रदेही ॥ तोही जर्जर

१ दुंदुभि. २ पंधराशें. ३ मारुतीनें. ४ अर्जुन. ५ कृष्ण. ६ हे वानरा ( मारुते ). ७ खरोखर. ८ कष्टी. ९ सत्वर.

झाला गदाधार्यी ॥ तो ह्मणे मज न चालवे पायीं ॥ झाला भारी मज खेद ॥ ४६ ॥ देव तयाची करीत प्रार्थना ॥ धीर धरीं रे वातनंदना[1] ॥ एक वेळां करूं समरांगणा ॥ सूड मागूं सर्वांचा ॥ ४७ ॥ आपले आणूं रे श्यामकर्ण ॥ आणि तयासी करूं रे निर्वाण ॥ हें तों आमुचें प्रतिज्ञावचन ॥ अन्यथा करील कोण यातें ॥ ४८ ॥ ऐसें वचन श्रीकृष्णाचें ॥ ऐकोनि मन संतोषलें कपीचें ॥ आनंदेंकरून ध्वजाग्राचें ॥ स्थान आपुलें शोभविलें ॥ ४९ ॥ मग वृत्रारीचा[2] जो पुत्र ॥ तोषें झाला प्रफुल्लनेत्र ॥ प्रसन्न देखिला रमावर ॥ वेगें रथारूढ तो झाला ॥ ५० ॥ अभेद्य कवच[3] घातलें शरीरीं ॥ रत्नमुगुट घातला शिरीं ॥ गांडीव चाप घेतलें करीं ॥ अक्षय तूणीर बांधिले ॥ ५१ ॥ मग मंदस्मित करोनि वक्र ॥ रथीं बैसला कोमलगात्र ॥ एके हातीं प्रतोद[4] विचित्र ॥ दुजे हातीं वाग्दोरे ॥ ५२ ॥ किरीट कुंडलें वनमाळा ॥ कांसे पीतांबर सोनसळा ॥ भाळीं केशराचा टिळा ॥ ऐसा सांवळा शोभतसे ॥ ५३ ॥ ध्वजीं मिरवे वायुनंदन ॥ रथीं शोभे श्वेतवाहन[5] ॥ पुढें शोभे जगज्जीवन ॥ अवाच्य शोभा तिघांची ॥ ५४ ॥ रथ चालिला घडघडाट ॥ तळीं होय पर्वतांचें पीठ ॥ दश अक्षौहिणी सर्व. सैन्याचा थाट ॥ वेगें उद्भट चालिला ॥ ५५ ॥ झाल्या रणतुरांच्या ध्वनी ॥ तो नाद न माये गगनीं ॥ थरथरां कांपतसे अवनी[6] ॥ तळीं सहस्रफणी[7] दडपला ॥ ५६ ॥ भैरव सांगती रायासी ॥ पार्थ आला जी युद्धासी ॥ मग हांसें आलें दैत्यरायासी ॥ वेगें झाला रथारूढ ॥ ५७ ॥ चौदा योजनें रथविस्तार ॥ अश्व योजिले बत्तीस सहस्र ॥ रथीं आठ ध्वज असती थोर ॥ तेथें वस्ति भैरवांची ॥ ५८ ॥ तीन शत वदनें परिवार ॥ तीन सहस्र शोभती कर ॥ ऐसा शोभला दैत्यवर ॥ नेणों गिरिवर चालिला ॥ ५९ ॥ रथ चालिला घडघडाट ॥ तेणें दणाणिलें कूर्मपृष्ठ ॥ भरावया सेनेचा घोंट ॥ दुंदुभि स्पष्ट चालिला ॥ ६० ॥ कृष्णार्जुन देखोनि डोळा ॥ दैत्य खदखदां हांसला ॥ जेवीं प्रळयांबुधीचा मेळा ॥ गर्जे तैसा गर्जतसे ॥ ६१ ॥ दोघीं केलें शरसंधान ॥ तेणें व्यापिलें गगन ॥ बाणें बाणांचें होतां घर्षण ॥ अग्नि तेथून पडतसे ॥ ६२ ॥ त्यासी पिच्छवारा हो झगटला ॥ त्याणें तो अधिक चेतला ॥ दोहीं दळांतें जाळूं लागला ॥ रथाश्व आणि पदातींतें ॥ ६३ ॥ अग्नि जाळीत दोनी कटकें[8] ॥ विझवूं ह्मणती रक्तोदकें ॥ तो अधिकचि वाढला तवकें ॥ गजशुंडोदकें तो विझविला ॥ ६४ ॥ पार्थें सोडिलें शस्त्र वह्नीचें ॥ जळों लागलें सैन्य दैत्याचें ॥ गजाश्वरथपदातींचें ॥ भस्म केलें क्षणमात्रें ॥ ६५ ॥ दशदिशा झाल्या तांबटा ॥ ज्वाळा लागती आकाशतटा ॥ देव पळाले बारा वाटा ॥ जे पाहात होते युद्धकौतुक ॥ ६६ ॥ अस्त्रतापें समुद्रजळीं ॥ जळचरें उकडोनियां मेलीं ॥ शस्त्रें तापतां तीं टाकिलीं ॥ रक्षा झाली शस्त्रांची ॥ ६७ ॥ हें देखोनि दैत्य कोपला ॥ वरुणास्त्र सोडिता झाला ॥ तों नभीं दाटल्या मेघमाळा ॥ माजी विद्युल्लता[9] तळपती ॥ ६८ ॥ वर्षों लागल्या उदकधारा ॥ त्यांमाजी पडों

---

१ मारुते. २ इंद्राचा ( अर्जुन ). ३ चिलखत. ४ चाबूक. ५ अर्जुन. ६ पृथ्वी. ७ शेष. ८ सैन्यें. ९ विजा.

लागल्या गारा ॥ पार्थसैन्य कांपे थरथरां ॥ रथाश्व जळीं पोहती ॥ ६९ ॥ खटखटा वाजती दांत ॥ सर्वांसी पीडितसे शीतें[1] ॥ चर्मवाद्यें भिजती समस्त ॥ बुडों लागला दळभार ॥ ७० ॥ ऊर्ध्व करोनि शुंडादंड ॥ कुंजर पोहती उदंड ॥ रथ तरों लागले प्रचंड ॥ जैशीं बेटें सिंधुमाजी ॥७१॥ ऐसें चतुरंग पार्थदळ ॥ उदकीं बुडों लागलें सकळ ॥ हें देखोनि पार्थ सबळ ॥ सोडिता झाला पवनास्त्र ॥ ७२ ॥ प्रचंड सुटला समीरें[2] ॥ तेणें उडविले दैत्यभार ॥ ध्वज पताका भंगल्या समग्र ॥ वस्त्रें उडती वीरांचीं ॥ ७३ ॥ देखोनि कोपला असुर ॥ पर्वतास्त्र सोडिलें दुर्धर ॥ तेणें पांडवदळभार ॥ चूर्ण झाला शैलपातें ॥ ७४ ॥ वज्रास्त्र सोडी पृथानंदन ॥ तेणें पर्वतांचें केलें चूर्ण ॥ सवेंच सोडी दैत्य भूषण ॥ अस्त्र दारुण सर्पाचें ॥ ७५ ॥ दैत्यें सोडितांच सर्पास्त्र ॥ तेणें डंखिला पार्थदळ-भार ॥ हें जाणोनि सुभद्रावर ॥ अस्त्र सोडित गरुडाचें ॥ ७६ ॥ आणि सोडिलें अस्त्र नकुळ ॥ तिहीं भक्षिलें सर्पकुळ ॥ ऐसे पर-स्परें अस्त्रकल्लोळ ॥ सोडिती वीर पराक्रमी ॥ ७७ ॥ दैत्येश ह्मणे अर्जुनासी ॥ तूं बळें पूर्वीं झुंजलासी ॥ रणीं भीष्म द्रोण-कर्णासी ॥ वधिलें तुवां कृष्णबळें ॥ ७८ ॥ आतां कळला रे तव पुरुषार्थ[3] ॥ आपणासी वीर ह्मणविसी व्यर्थ ॥ जरी साह्य नसता कृष्णनाथ ॥ तरी तूं अनाथ होतासी ॥ ७९ ॥ कृष्णासी बोले दैत्यशृंग[4] ॥ सोडीं या निर्बळाचा संग ॥ माझा सारथी होईं अभंग ॥ ऐकोनि हांसे श्रीहरि ॥ ८० ॥ तें ऐकोनि पार्थ कोपा चढला ॥ बाणें दैत्य गगनासी नेला ॥ तळीं येतां पुनः उडविला ॥ सूर्य दाखविला तयासी ॥ ८१ ॥ ऐशा येरझारा करितां ॥ फार कष्ट झाले दैत्यनाथा ॥ प्राणी धरोनि अहंता ॥ फिरे जैसा भवचक्रीं ॥ ८२ ॥ देखोनि पार्थपुरुषार्थ ॥ मनीं संतोषला दैत्यनाथ ॥ सवेंचि दाखविला गगनपंथ[5] ॥ पार्थशरें ते काळीं ॥ ८३ ॥ पक्व झालिया ताडफळ ॥ भूमंडळीं पडे तात्काळ ॥ तेवीं आदळतां दैत्यपाळ ॥ अवयव चूर्ण जाहले ॥ ८४ ॥ असुर चढला क्रोधमदा ॥ तीन सहस्र उचलिल्या गदा ॥ पार्थावरी घातल्या एकदा ॥ तेव्हां भयभीत तो झाला ॥ ८५ ॥ बाप योद्धा धनुर्धर ॥ एक्या शरें केला गदांचा चूर ॥ तेणें आनंदला दैत्यवर ॥ पार्थाप्रति बोलत ॥ ८६ ॥ आतां तुह्मी दोघे उरलेती ॥ कांहीं न चले संग्रामयुक्ति ॥ तुमची पुरली आयुष्यव्यक्ति ॥ कुटुंबमाया धरूं नका ॥ ८७ ॥ आतां व्हावें सावधान ॥ मजपासोनि रक्षावे प्राण ॥ करीं कुळ-देवतांचें स्मरण ॥ आठवीं चरण सद्गुरूचे ॥ ८८ ॥ चोवीस सहस्र वर्षें समुद्रोदरीं ॥ मत्स्य भांडती निजमत्सरीं ॥ जठराग्नि पेटला तयांचे उदरीं ॥ तो तुमच्या ग्रासें हरीन ॥ ८९ ॥ ऐसें बोलोनि आवेशला ॥ रथ मकरतोंडीं धरिला ॥ मग तयांसी बोलिला ॥ आतां जावें यमधामा ॥ ९० ॥ शतवेळां रथ भोंवंडिला ॥ आकाशपोकळीमाजी उडविला ॥ तेथेंही तो फिरों लागला ॥ चक्रापरी अवधारीं[6] ॥ ९१ ॥ ऐसा रथ फिरत फिरत ॥ गेला सूर्यमंडळापर्यंत ॥ तेथोनि पडिला अकस्मात ॥ समुद्रोदकामाझारी ॥ ९२ ॥

---

१ थंडी. २ वारा. ३ पराक्रम. ४ असुरश्रेष्ठ ( दुंदुभि ). ५ आकाशमार्ग. ६ ऐक.

जेथें मत्स्य होते भांडत ॥ तेथेंचि तो पडिला रथ॥आमिष जाणोनि अकस्मात ॥ टाकिला मीनें मुखामाजी ॥ ९३ ॥ पूर्वसागरींचा मीन पवित्र ॥ जेणें उच्चारिला गायत्रीमंत्र ॥ ह्मणोनि तिघेही वीर विचित्र ॥ तयाचे वदनीं प्रवेशले ॥ ९४ ॥ आधींच गायत्रीमंत्र थोर ॥ त्यावरी गुरु जोडला विधिकुमर ॥ त्याचे प्रतापें महारुद्र ॥ नरनारायण प्रवेशले ॥ ९५ ॥ रथाश्वांसहित तिघेजण ॥ सेविते झाले मीनवदन ॥ दंत घोड्यांस लागतील ह्मणोन ॥ दिधला कोंपर कपिरायें ॥ ९६ ॥ तिघे निमाले मीनवदनीं ॥ दळीं उरलें नसे कोणी ॥ उरले ते गेले पळोनि ॥ वनामाजी लपाले ॥ ९७ ॥ विजयी झाला दैत्यनाथ ॥ बळें भुजा वाहू पीटित ॥ ह्मणे मजसारिखा पुरुषार्थवंत ॥ त्रिजगतीं दुजा असेना ॥ ९८ ॥ निजदळेंसीं दैत्यभूषण ॥ नगराप्रति चालिला तेथून ॥ भाट बंदिजन करिती स्तवन ॥ पवाडे गाती तयाचे ॥ ९९ ॥ ईश्वरी मायेचा बडिवार ॥ कोणासी न कळे तिचा पार ॥ जाणावया हा निर्धार ॥ ऐसें दाविलें ईश्वरें ॥ १०० ॥ रायांसी होता बळाचा गर्व ॥ तो हरूनि मारविले सर्व ॥ आपुला उरला होता अहंभाव ॥ तोही देवें निवारिला ॥ १ ॥ आतां बळगर्वाच्या राशी ॥ गोठोनि राहिल्या दुंदुभीपासीं ॥ त्या हरावया हृषीकेशी ॥ पुढें विंदान करील ॥ २ ॥ तों संतोष झाला विधिनंदना ॥ ह्मणे बरवी झाली काळक्रमणा ॥ आतां सांगावयासी कथना ॥ जाणें घडेल द्वारकेसी ॥ ३ ॥ नारद द्वारकेसी जाईल ॥ ही वार्ता सकळां सांगेल ॥ मग सर्वांसी येथें आणील ॥ समुद्रतीरा अवधारा ॥ ४ ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ रसाळ आहे परम जाण ॥ तें ऐकावें जी सावधान ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ५ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ दुंदुभिआख्यान अगाध ॥ सप्ततितमाध्याय गोड हा ॥ १०६ ॥ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते दुंदुभ्याख्यानं नाम सप्ततितमोऽध्यायः ॥ ७० ॥ ॥ अध्याय ॥ ७० ॥ ॥ ओव्या ॥ १०६ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥



अध्याय ७१.
नारद
बलरामउग्रसेन इ०
बलराम.
दुंदुभि
ब्रह्मदेव
महादेव
गरुडावरबसून बलराम व कांहीं कृष्ण स्त्रिया
महादेव.
ब्र.
महादेव.
दुंदुभि

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जनमेजय ह्मणे मुनिनाथा ॥ पुढें कैसी वर्तली कथा ॥ ती मज सांगावी जी सर्वथा ॥ कृपासागरा स्वामिया ॥ १ ॥ रायासी ह्मणे मुनिभूषण ॥ ऐक पूर्वजकथानुसंधान ॥ मत्स्यवदनीं पडतां कृष्णार्जुन ॥ युद्धासी कोणीं उरलें नाहीं ॥ २ ॥ मुख्य धुर्य[1] पडलिया जाण ॥ मग कोण करील समरांगण ॥ निराश होवोनि दैत्यभूषण ॥ रथारूढ निघाला ॥ ३ ॥ छत्र ध्वज पताका शोभती ॥ नाना रणतुरें वाजती ॥ भाट बंदिजन गर्जना करिती ॥ त्यापुढें गाती पैंवाडे[2] ॥ ४ ॥ महोत्साहेंसीं असुरनाथ ॥ आला सभामंडपांत ॥ वस्त्राभरणीं वीर समस्त ॥ उरले त्यांसी गौरविलें ॥ ५ ॥ त्या भोजकोटनगरांत ॥ उत्साह केला जी बहुत ॥ सकळ झाले आनंदभरित ॥ कोणासी दुःख असेना ॥ ६ ॥ यावरी तो विरंचिसुत[3] ॥ ब्रह्मवीणा घेवोनि त्वरित ॥ हरिनामें गात नाचत ॥ वेगीं आला द्वारकेंत ॥ ७ ॥ जरी करूं द्वारकावर्णन ॥ तरी वर्णावया नसे समाधान ॥ कां मत्स्यींननीं पडिले कृष्णार्जुन ॥ ह्मणोनि त्वरा कथेची ॥ ८ ॥ मनोवेगें विधिनंदन ॥ सत्वर पावला सभास्थान ॥ उग्रसेनादिकीं अभ्युत्थान ॥ देवोनि नमन त्यासी केलें ॥ ९ ॥ तों मुनि श्वासोच्छ्वास टाकित मुखें ॥ वीणा टाकोनि दिधली दुःखें ॥ कांहींच वचन न बोले मुखें ॥ घाबरेपणें पहातसे ॥ १० ॥ तों यादव धरिती मुनिपाय ॥ सांगा स्वामी दुःख काय ॥ मग तयांसी बोले विधितनय[3] ॥ थोर अनर्थ जाहला ॥ ११ ॥ भोजकोट नाम नगरी ॥ आहे उत्तर समुद्राचे तीरीं ॥ तेथें दुंदुभि राजा राज्य करी ॥ जो कळिकाळासी अजेय ॥ १२ ॥ श्यामकर्ण फिरत फिरत ॥ तेथें गेले जी अकस्मात ॥ तेणें अश्व धरूनि नगरांत ॥ नेले असती निजबळें ॥ १३ ॥ तयासीं करावया युद्ध ॥ राजे धांवले प्रसिद्ध ॥ मग तयां सकळांचा वध ॥ केला दैत्यें शरघातें ॥ १४ ॥ मग धांवोनि गेले कृष्णार्जुन ॥ दैत्यासीं केलें युद्धकंदन ॥ रथासहित तिघे उचलोन ॥ मीनोदरीं तेणें टाकिले ॥ १५ ॥ तयांची सांगावया मात ॥ कोणीच वांचला नाहीं तेथ ॥ तें म्यां देखोनि निश्चित ॥ धांवलों तुह्मां सांगावया ॥ १६ ॥ ऐसी ऐकतां नारदबोली ॥ सर्व सभा ती गजबजिली ॥ सर्वांचीं मुखें कोमाइलीं ॥ हाहाकार आक्रोशें ॥ १७ ॥ आहा शब्दें ते यादव ॥ करिते झाले शोकार्णव[5] ॥ तयांसी संबोधी उद्धव ॥ ह्मणे ही माया तयाची ॥ १८ ॥ नारदोक्त हरीची वार्ता ॥ अंतःपुरांत फांकली तत्वतां ॥ ती ऐकोनि श्रीकृष्णवनिता ॥ देह टाकिती धरणीसी[6] ॥ १९ ॥ सत्यभामादि सर्व युवती ॥ दुःखें गडबडां लोळती ॥ हा हा शब्दें धाय मोकलिती ॥ तें श्रवणीं नृपति नायकवे ॥ २० ॥ मग उद्धव वारी सकळांतें ॥ कां हो करीत बैसलां शोकातें ॥ तुह्मी पाचारा गरुडातें ॥ तो तेथें तुह्मांतें नेईल ॥ २१ ॥ तेथें गेलियानंतर ॥ सर्वही कळेल समाचार ॥ येथें बैसोनि चिंतातुर ॥ शोकसमुद्र कां उचंबळितां ॥ २२ ॥ तो अचिंत्य अप्रमेय अप्रमाण ॥ तयासी तुह्मी भावितां मरण ॥ पूर्ण तुमचें हें मूर्खपण ॥ तो सोंगसंपादणी करीतसे ॥२३॥

१ मुख्य वीर. २ पराक्रम. ३ नारद. ४ माशाच्या तोंडांत. ५ शोकाचा समुद्र. ६ पृथ्वीवर.

तों सावध होवोनि रेवतीरमणें[1] ॥ करिता झाला गरुडस्मरण ॥ स्मरतांचि तो उरगाशन[2] ॥ कर जोडोनि उभा ठाके ॥ २४ ॥ मग तयासी ह्मणे हलपाणि ॥ मीनोदरीं पडिला चक्रपाणि ॥ यास्तव आह्मां सकळांतें घेऊनि ॥ समुद्रतीरा नेइंजे ॥ २५ ॥ सस्मित होवोनि खगेश्वरें ॥ विस्तीर्ण केलें कलेवरें[3] ॥ त्यावरी बैसविला कृष्णपरिवार ॥ आणि दळभारही घातला ॥ २६ ॥ मनोवेगेंकरूनि अंबर ॥ क्रमिता झाला तो खगेश्वर ॥ वनोपवनें लंघोनि सत्वर ॥ सागरतीरा पातला ॥ २७ ॥ तेथें उतरला परिवार ॥ जें स्थळ दावित ब्रह्मकुंमर ॥ येथेंचि बुडाला सर्वेश्वर ॥ पार्थहनुमंतांसमवेत ॥ २८ ॥ सत्यभामा ह्मणे हो रुक्मिणी ॥ येथेंचि बुडाले चक्रपाणि ॥ यासी काय करावी हो करणी ॥ ती मजलागोनी सुचेना ॥ २९ ॥ सोळा सहस्र श्रीकृष्णवनिता ॥ शोकाकुलित बैसल्या तत्वतां ॥ ह्मणती आहा जी प्राणनाथा ॥ ऐसें कैसें केलें जी ॥ ३० ॥ इतका तेथें वृत्तांत झाला ॥ तों नारद धांवोनि कैलासा गेला ॥ सर्व वृत्तांत पशुपतीला ॥ सांगता झाला दीनवदनें ॥ ३१ ॥ भोजकोटनामें नगरी ॥ आहे उत्तर समुद्राचे तीरीं ॥ तेथें दुंदुभि राजा राज्य करी ॥ तो सुरासुरां अजेय ॥ ३२ ॥ पांडवांचे श्यामकर्ण फिरत ॥ तेथें गेले अकस्मात ॥ तेणें अश्व धरोनि नगरांत ॥ नेले स्वामी निजबळें ॥ ३३ ॥ तयासीं करावया युद्ध ॥ राजे सावध झाले प्रसिद्ध ॥ परी तयां सकळांचा वध ॥ तेणें केला क्षणमात्रें ॥ ३४ ॥ मग धांवोनि गेले कृष्णार्जुन ॥ त्यांसीं युद्ध केलें दारुण ॥ तेणें रथासहित तिघेजण ॥ उचलूनि टाकिले समुद्रजळीं ॥ ३५ ॥ तयांची सांगावया मात ॥ कोणी उरला नाहीं तेथ ॥ तें देखोनियां अकस्मात ॥ सांगावया मी आलों ॥ ३६ ॥ आतां तुह्मीं एक करावें ॥ शीघ्र सागरतीराप्रति जावें ॥ त्या गजासुरपुत्रातें वधावें ॥ आणि सोडवावे कृष्णपार्थ ॥ ३७ ॥ बरवें ह्मणोनि शंकर ॥ घेता झाला परिवार ॥ मग त्याहीपुढें विधिकुंमर ॥ समुद्रातीरा तो आला ॥ ३८ ॥ नारद ह्मणे जी हँलधरा ॥ कां उगाचि राहिलासी महावीरा ॥ वधीं वेगें तया असुरा ॥ सूड घेईं बंधूचा ॥ ३९ ॥ शोक करिती कामिनी ॥ कैसा तूं बैसलासी हलपाणि ॥ आतां येईल शूलपाणि ॥ तो यश घेईल युद्धाचें ॥ ४० ॥ ऐकोनि क्रोधावला हलधर ॥ बळें घेवोनि दळभार ॥ युद्धा पाचारिला असुर ॥ तोही सत्वर सिद्ध झाला ॥ ४१ ॥ दोघे बळसिंधु अगाध ॥ होऊं लागलें महायुद्ध ॥ येरयेरांचा पूर्ण वध ॥ करूं इच्छिती सक्रोधें ॥ ४२ ॥ दोघेही गदायुद्धीं प्रबळ ॥ दोघेही धनुर्विद्येनें कुशळ ॥ शस्त्रयुद्ध केलें तुंबळ ॥ मग मल्लयुद्धीं मिसळले ॥ ४३ ॥ तयावरी घातला हो नांगर ॥ वरी बळें करी मुसळप्रहार ॥ दैत्यें सोडोनियां एक शर ॥ हल मुसळ उडविलें ॥ ४४ ॥ मग तयासी ह्मणे दैत्यबाळ ॥ तुझें मज पूर्वींच समजलें बळ ॥ सुभद्राहरणीं काढिला पळ ॥ पार्थापुढें जीवभयें ॥ ४५ ॥ त्या पार्थासी साह्य इंदिरावर ॥ त्या दोघांचा म्यां केला संहार ॥ ऐकोनि तूं आलासी हलधर ॥ हें नाम आपुलें खरें केलें ॥ ४६ ॥ आतां होईं सावधान ॥ साहें मज

१ बळराम. २ गरुड. ३ शरीर. ४ नारद. ५ महादेवाला. ६ नारद. ७ बळरामा. ८ श्रीकृष्ण.

हातींचा तीव्र बाण ॥ ह्मणोनि काढिला अद्भुत मार्गण[1] ॥ तो रुद्रमंत्रें मंत्रिला ॥ ४७ ॥ तो निवारिता नावरे बाण ॥ हृदयीं भरला संपूर्ण ॥ तेणें उडोनि रेवतीरमण ॥ बत्तीस योजनें दूर पडिला ॥ ४८ ॥ ऐसी झाली हलधराची गति ॥ जाणोनि धांवला खग-पति[2] ॥ तें पाहोनि दैत्यपति ॥ ह्मणे पांखरूं हें आलें ॥ ४९ ॥ दैत्य ह्मणे रे पांखरा ॥ तुवां मारावें त्या विखारां[3] ॥ पाठीसी वाहावें रमावरा ॥ युद्धविचारा नेणसी ॥ ५० ॥ ऐकोनि क्रोधावला गरुड ॥ पक्षें झडपिला तो वितंड ॥ चंचुपुटें विदारिले गंड ॥ चरणीं वक्षस्थळ ताडिलें ॥ ५१ ॥ रागें हृदय विदारीत नखें ॥ मुखें तोडीत चंचुमुखें ॥ दैत्य पडिला नखविखें ॥ शरीर हिरवें त्याचें झालें ॥ ५२ ॥ तयावरी सोडिलें दहनास्त्र ॥ पक्ष जाळोनि केला विचित्र ॥ भस्म झाले पक्षमात्र ॥ मांसकोथळा उरलासे ॥ ५३ ॥ दैत्यें सोडोनि एक शर ॥ कोथळा उडविला साचार ॥ ऐसा त्या दोघांचा संहार ॥ केला राया दुंदुभीनें ॥ ५४ ॥ पाहोनि दोघांच्या विध्वंसा ॥ नारद गेला कैलासा ॥ रागें बोले गिरिजेशा[4] ॥ कां जी विलंब लाविला ॥ ५५ ॥ गरुड आणि संकर्षण[5] ॥ करूं गेले जी समरांगण ॥ तयांचेंही केलें निर्दाळण ॥ क्षणमात्रें दैत्यरायें ॥ ५६ ॥ मग वृषभारूढ गौरीवर ॥ सवें घेवोनियां वीरभद्र ॥ आणि प्रमथादि परिवार ॥ घेवोनि आला वेगेंसीं ॥ ५७ ॥ तया शंकर ह्मणे रे असुरा ॥ तुवां पराक्रम केला बरा ॥ मारोनि सकळ नृप-वरां ॥ कृष्णार्जुनांतें उडविलें ॥ ५८ ॥ सवेंचि गरुडसंकर्षण ॥ यांसींही केलें तुवां निर्वाण[6] ॥ आतां मजसीं करीं समरांगण ॥ तरीच होसील पुरुषार्थी ॥ ५९ ॥ म्यां बहुत दैत्यांचा वध केला ॥ त्यांत तूं आहेसी रे उरला ॥ आतां तुज मारितां वहिला ॥ वारील कोण या काळीं ॥ ६० ॥ तंव दैत्य ह्मणे त्रिपुरारि[7] ॥ तूं पूर्ण अससी माझा वैरी ॥ माझा पिता सहपरिवारीं ॥ तुवांच मारिला गजासुर ॥ ६१ ॥ तारकासुर माझा आजा ॥ तवात्मजें मारिला वृषभध्वजा ॥ ह्मणोनि तूं पूर्ण वैरी माझा ॥ बरा आलासी तूं येथें ॥ ६२ ॥ तुवांचि वरदान दिधलें मातें ॥ ह्मणोनि म्यां जिंकिलें सकळांतें ॥ आतां मी जिंकीन रे तूतें ॥ क्षणमात्रें पार्वतीशा ॥६३॥ रायासी बोले ऋषि वचन ॥ पहा केवढें खळमहिमान ॥ ज्यापासोनि पावला वरदान ॥ त्यासीच मारावया उदित ॥ ६४ ॥ सर्पांसी पाजितां पय निर्मळ ॥ त्याचें तो करी विष तात्काळ ॥ नातरी याजक स्पर्शतां अनळ ॥ जाळी तया क्षणमात्रें ॥ ६५ ॥ जो खळासी करणें उपकार ॥ तोचि आपणा अपकार ॥ वरदान घेवोनि भस्मासुर ॥ शिवासीच भस्म करूं पाहे ॥ ६६ ॥ स्थळास्थळ जाणोनि उपकार ॥ करूं जाणती विवेकी नर ॥ हा तंव भोळानाथ उदार ॥ दिधलें वरदान दुष्टासी[8] ॥ ६७ ॥ तेवीं खळ तो दैत्य-नायक ॥ शंकरवरें झाला अजिंक्य ॥ त्यासीच मारीन ह्मणे देख ॥ येईं तात्काळ युद्धासी ॥ ६८ ॥ ऐकोनियां दैत्यवचन ॥ क्रोधा-वला उमारमण ॥ त्यावरी त्रिशूळ टाकिला जाण ॥ परी तो भैरवीं निवारिला ॥ ६९ ॥ शिवें पाशुपतास्त्र टाकिलें ॥ तेंही भैरवीं

१ बाण. २ गरुड. ३ सर्पांना. ४ शंकराला. ५ बळराम. ६ आणीबाणीचें युद्ध. ७ शंकरा. ८ दुष्टास.

व्यर्थ केलें ॥ सर्वेचि निजगणां पाचारिलें ॥ निर्वाण युद्ध करावया ॥ ७० ॥ या शंकरासी न यावें उणें ॥ ऐसें जाणोनि विधिनं-
दनें ॥ ह्मणोनि धांवणें केलें त्याणें ॥ सत्यलोकासी तेधवां ॥ ७१ ॥ नारद ह्मणे ताता स्वामी ॥ कां निश्चिंत बैसलां तुह्मी ॥ महा
अनर्थ झाला कर्मभूमीं ॥ तो काय तुह्मीं नायकिला ॥ ७२ ॥ तो सांगतां सविस्तर ॥ तरी कार्यासी होईल उशीर ॥ ह्मणोनि तुह्मां
संक्षेपेंकर ॥ सांगतों आतां परिसावें ॥ ७३ ॥ गजासुरसुतें निजबळें ॥ रणीं मारिलीं जी नृपकुळें ॥ शेवटीं कृष्णार्जुनांसीं जिंकिलें ॥
रथ टाकिला मकरग्रासीं ॥ ७४ ॥ त्याच्या धांवण्या आला बळदेव ॥ त्याचाही हरिला बळगर्व ॥ तें जाणोनि उमाधव ॥ आला
तोही पावेल ती पदवी ॥ ७५ ॥ तो जोंवरी नाहीं जिंकिला ॥ तोंवरी उपाय करीं वहिला ॥ ऐसें ऐकोनि सुतवचनाला ॥ विधि
गेला शिवापासीं ॥ ७६ ॥ ब्रह्मदेव विलोकी शिवासी ॥ तंव तो अत्यंत झाला क्रोधराशी ॥ उघडोनियां तृतीय नेत्रासी ॥ जाळीन
ह्मणे दुंदुभीतें ॥ ७७ ॥ शिवचरणा वंदीत विधि[4] ॥ ह्मणे हें काय करिसी दयानिधि ॥ तव वरदत्त पुत्र कीं त्रिशुद्धि ॥ कैसा जाळूं
पहासी ॥ ७८ ॥ जो वृक्ष वाढविला आपण ॥ स्वयें त्याचें न करावें खंडण ॥ अन्य हस्तें करावें पूर्ण ॥ हेंचि थोरां योग्य असे
॥ ७९ ॥ तव वरदानें अजेय ॥ सर्वत्रां असे दैत्यतनय ॥ याचा स्वयें करितां क्षय ॥ अयोग्य सर्वथा तुज असे ॥ ८० ॥ ऐसा
नानापरी संबोधिला ॥ भोळानाथ तो शांत झाला ॥ सस्मित होऊनियां वदला ॥ विधीप्रति ते समयीं ॥ ८१ ॥ जरी तो त्रिशूळ
पाशुपत ॥ माझें मज देईल त्वरित ॥ आणि सोडवील कृष्णपार्थ ॥ आणिक श्यामकर्णातें देईल ॥ ८२ ॥ तरी तयाचे पंचप्राण ॥
वांचतील यथार्थ जाण ॥ बरवें ह्मणोनि चतुरानन ॥ दैत्यापासीं पातला ॥ ८३ ॥ विधि ह्मणे गजासुरसुता ॥ व्यर्थ कां मुकतोसी
रे जीविता ॥ वेगें शरण जाय कैलासनाथा ॥ त्रिशूळ पाशुपत देऊनि ॥ ८४ ॥ अनंत ब्रह्मांडांचिया माळा ॥ जो जाळील उघ-
डितां डोळा ॥ ऐसियासीं युद्ध करावयाला ॥ सामर्थ्य कवणा असे रे ॥ ८५ ॥ ज्याणें दिधलें वरदान ॥ त्याचाचि ह्मणसी घेईन
प्राण ॥ ऐसा तूं कृतघ्न पूर्ण ॥ यश तुजला कधीं नये ॥ ८६ ॥ ऐसा नानापरी बोधिला ॥ आणोनि शिवचरणीं घातला ॥ श्याम-
कर्ण पाशुपत त्रिशूळा ॥ देता झाला शिवातें ॥ ८७ ॥ ऐसें करोनि समाधान ॥ मग ब्रह्मयासी पुसे नंदन ॥ मीनमुखांतूनि
मोचन ॥ कैसें होईल तिघांचें ॥ ८८ ॥ चोवीस सहस्र वर्षांचा अंत ॥ आतां झालासे विधि ह्मणत ॥ त्यांचाही विरोध झाला समाप्त ॥
आतां येथोनि सुटतील ॥ ८९ ॥ ऐसें ऐकतां ब्रह्मवचन ॥ नारद गेलासे धांवून ॥ जेथें होता रेवतीरमण ॥ तेथें त्वरें पावला तो
॥ ९० ॥ तो तेथें पडिलासे हुंबत ॥ तयासी बोले परमेष्ठिसुत ॥ धांवण्या आला भवानीकांत ॥ तोही तेणें जिंकिला ॥ ९१ ॥
आतां तुज मी सांगतों स्पष्ट ॥ कृष्णार्जुनें धरिली वैकुंठवाट ॥ तूंही तयांमागें जाईं नीट ॥ सोडीं आशा सकळांची ॥ ९२ ॥ ऐसें



१ नारदानें. २ थोडक्यांत. ३ महादेव. ४ ब्रह्मदेव. ५ हास्ययुक्त. ६ पुत्र ( नारद ). ७ बळराम. ८ नारद. ९ शंकर.

बोलोनियां उत्तरा ॥ नारद गेला सागरतीरा ॥ तों तेथें कृष्णवनिता सुंदरा ॥ विलाप करिती नानापरी ॥ ९३ ॥ तयांसी बोले विधिनंदन ॥ कासया तुह्मी करितां रुदन ॥ कांहीं करा परलोकसाधन ॥ मोक्षप्राप्तीकारणें ॥ ९४ ॥ आतां नव्हे सर्वथा कृष्णदर्शन ॥ तेणें केलें वैकुंठीं गमन ॥ तुह्मां पाठविलें निरोपवचन ॥ आपली गति विचारा ॥९५॥ ऐकोनियां नारदवचन ॥ सर्वांचे निघों पाहती प्राण ॥ दीर्घस्वरें करिती रुदन ॥ एकी धरणीं लोळती ॥ ९६ ॥ नानापरी विलाप करिती ॥ एकी हार तोडोनि टाकिती ॥ आह्मांलागोनि श्रीपति ॥ कां विसंबलासी स्वामिया ॥९७॥ कोणी उरशिरांतें ताडिती ॥ कोणी कुरळ कुंतळ[1] तोडिती ॥ कोणी वसनें[2] कंचुकी फाडिती ॥ कोणी काढिती अलंकार ॥ ९८ ॥ ह्मणती जन्मोनि द्रौपदीनें ॥ आमुचें घर घेतलें तिणें ॥ कधींही निजसुख नारायणें ॥ दिधलें नसे धणीवरी ॥ ९९ ॥ कधींही सुखशेजे नसे पहुडला ॥ तेव्हांचि गजबजोनि उठे वहिला ॥ ह्मणे द्रौपदीनें धांवा केला ॥ जावें लागे मज तेथें ॥१००॥ गलितवस्त्रें देव धांवती ॥ चालतां अडखळोनि पडती ॥ ऐसा कष्टविला आमुचा पति ॥ त्या बहिणपणा आग लागो ॥१॥ दिवस रात्र न पाहती कांहीं ॥ ताहान भूक विसरती पाहीं ॥ ऐसा कष्टविला क्षीराब्धिशायी[3] ॥ तिचें चेटक काय जाणों ॥ २ ॥ मग दुजी ह्मणे हो बाई ॥ ती तों कंवटाळीण मुळची पाहीं ॥ क्षणभरी धीर न धरिती शेषशायी ॥ शब्दासवें धांवती हो ॥३॥ ती तंव अवाच्य काय तुह्मी जाणा ॥ आपुल्या आवरोनि पांचजणां ॥ हात घालोनि आमुच्या निधाना ॥ अवाच्य वासना तयेची ॥ ४ ॥ परी पांचांतें वंचून ॥ शेजे कैसें भोगी हो निधान ॥ ऐसें तयेचें चतुरपण ॥ आणि थोरथोरां मानवे ती ॥ ५ ॥ जीत असतां ही भोगिला ॥ शेवटीं तिचेच कार्यीं प्राणास मुकला ॥ आग लागो तिच्या अश्वमेधाला ॥ आह्मां अंतरला प्राणपति ॥ ६ ॥ प्राणवल्लभा आमुची गति ॥ कैसी होईल यदुपति ॥ धाय मोकलोनियां रडती ॥ कैसा विसंबलासी प्राणेशा ॥ ७ ॥ आह्मांसी मायबाप नाहीं जाणा ॥ जयांचे घरीं करावी काळक्रमणा ॥ सर्व विषयीं आह्मां तूं यदुनंदना ॥ तुजवीण प्राण न वांचती ॥ ८ ॥ ऐसा विलाप करिती कामिनी ॥ तें दुरोनि पाहे नारदमुनि ॥ खदखदां तेव्हां हांसोनि ॥ ह्मणे बरव्या म्यां पारखिल्या ॥ ९ ॥ सर्वीं केला निश्चय पूर्ण ॥ आतां सर्वथा न ठेवावे प्राण ॥ सहज जवळी सिंधुजीवन ॥ येथें उड्या टाकाव्या ॥ ११० ॥ ऐसा कळलाव्या नारदमुनि ॥ मरणीं घातल्या कृष्णकामिनी ॥ आतां उड्या टाकितील समुद्रजीवनीं ॥ ऐसें पूर्ण समजलें ॥ ११ ॥ ऐसें जाणोनि मीनवदनीं ॥ घाबिरा झाला चक्रपाणि ॥ तो बाहेर येऊनि सर्व कामिनी ॥ रक्षील मारील दैत्यातें ॥ १२ ॥ हें पुढिलें प्रसंगीं निरूपण ॥ गोड असे अमृतासमान ॥ तें ऐकावें जी सावधान ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १३ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ मारिले दैत्य अगाध ॥ एकसप्ततितमोध्याय गोड हा ॥ ११४ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते दुंदुभ्याख्यानं नाम एकसप्ततितमोऽध्यायः ॥७१॥ अध्याय ॥७१॥ ओव्या ॥११४॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

१ केश. २ वस्त्र. ३ क्षीरसमुद्रांत निजणारा.

# अध्याय ७३.


स्त्रियांनीं दुंदुभीस मंगल स्नान घालितांच त्याचा संहार.
ब्राह्मणरूपी श्री कृष्ण.
गरुड.
शेष.
श्रीकृष्ण.
गरुड.
श्रीकृष्ण.
नारद
गरुड.
अर्जुन.
श्रीकृष्ण.
गरुड.
गरुड व सर्प यांचें युद्ध.
नारद.
श्रीकृष्ण
दुंदुभीचे पुत्र शरण येतात.
शि.
ब्र
श्यामकर्णा मागें सैन्य जात आहे.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जनमेजय जोडल्या करीं ॥ जैमिनीसी प्रार्थना करी ॥ श्रीकृष्ण कैसा आला बाहेरी ॥ ती अभिनव कथा सांगावी ॥ १ ॥ ऋषि ह्मणे ऐक एकचित्त ॥ मीनाननीं होते दिन सात ॥ रमणींचा देखोनि आकांत ॥ देव बाहेर निघाले ॥ २ ॥ उठोनि बैसला रमाकांत ॥ तों अर्जुन पडिलासे मूर्च्छित ॥ अर्धशरीरी देखिला हनुमंत ॥ कपिकोंपर मीनमुखीं ॥ ३ ॥ कृष्णें निजशक्ति चेतवून ॥ दोघे केले सावधान ॥ तयांसी बोले वचन ॥ आतां बाहेर निघावें ॥ ४ ॥ तंव बोलिजे वातकुमरें ॥ माझ्या कोंपराचेनि आधारें ॥ बाहेर निघावें जी सत्वरें ॥ रथासमवेत युक्तीनें ॥ ५ ॥ तूं अति सुकुमार मनमोहन ॥ तुज लागेल मीनदंशन ॥ ह्मणोनि कोंपर मुखीं जाण ॥ मत्स्याचिये दिधलासे ॥ ६ ॥ मग रथासहित नरनारायण ॥ निघाले सहित वातनंदन ॥ पुढें देखिलें अति विस्तीर्ण ॥ रम्य स्थान निर्मळ जळ ॥ ७ ॥ तेथें येऊनि तिघेजण ॥ करिते झाले शुद्ध स्नान ॥ चौं अश्वांतें धुवोन ॥ सुवस्त्रें परिधान पैं केलीं ॥ ८ ॥ किरीट कुंडलें वनमाळा ॥ देवें घातल्या आपले गळां ॥ आपाद सोडी वैजयंतीमाळा ॥ तिलक रेखिला केशरी ॥ ९ ॥ तोचि वेष करीत अर्जुन ॥ हातीं घेतले धनुष्यबाण ॥ मस्तकीं किरीट विराजमान ॥ अक्षय भाता पाठीशीं ॥ १० ॥ तों तेथें आला नारदमुनि ॥ सद्भावें वंदिला चक्रपाणि ॥ मग तयासी ह्मणे निर्जरतरणि ॥ सांगें वर्तमान कैसें तें ॥ ११ ॥ तुमचें देखोनि प्राणसंकट ॥ म्यां त्वरें धरिली द्वारकेची वाट ॥ तेथें जावोनियां स्पष्ट ॥ बळदेवासी सांगितलें ॥ १२ ॥ तेणें ऐकोनि वर्तमान ॥ सकळ झाले मूर्च्छायमान ॥ अंतःपुरींचें दुःखकथन ॥ सांगतां उरी नसे देवा ॥ १३ ॥ मग उद्धवें संबोधिलें सर्वांतें ॥ वेगीं पाचारिलें गरुडातें ॥ त्यावरी बैसवोनि परिवारातें ॥ वेगीं आलों सिंधुतीरा ॥ १४ ॥ देखोनि तव पतनस्थळ ॥ स्त्रियांनीं मांडिला कोलाहल ॥ तें सांगतां दुःखकल्लोळ ॥ माझ्या नयनीं उचंबळती ॥ १५ ॥ मग रामें आरंभिलें संग्रामासी ॥ दैत्यें बाणें उडविलें त्यासी ॥ तों गरुड उठावला वेगेंसीं ॥ तोही शराग्नीनें जाळिला ॥ १६ ॥ मग धांवोनि गेलों कैलासा ॥ धांवण्या आणिलें महेशा ॥ तोही वश्य झाला दैत्येशा ॥ जाणोनि सत्यलोका मग गेलों ॥ १७ ॥ धांवण्या आणिलें चतुराननां ॥ तेणें बोधिला दैत्यराणा ॥ पायां पडोनि दिधलें जाणा ॥ त्रिशूळ पाशुपत शिवाचें ॥ १८ ॥ दोघांचें करूनि समाधान ॥ मग समुद्रतीरा गेलों धांवून ॥ कांता जळीं देत होत्या प्राण ॥ त्या म्यां जावोनि निवारिल्या ॥ १९ ॥ तुमचें ध्यावया जी वर्तमान ॥ येत होतों मी धांवोन ॥ तों येथें झालें तुमचें दर्शन ॥ झालें पुनर्जन्म तिघांचें ॥ २० ॥ धन्य धन्य आजिचा दिवस ॥ पुनः दृष्टीं पाहिलें तिघांस ॥ बहुत वर्षें झालीं तुह्मांस ॥ परी ऐसें नाहीं घडलें कीं ॥ २१ ॥ हांसोनि बोले रमारमण ॥ बहुत श्रम झाले तुह्मांलागून ॥ मज जाणत असतां पूर्ण ॥ वृथा कां कामिनी कष्टविल्या ॥ २२ ॥ आतां दावावें तें स्थान ॥ जेथें पडिला संकर्षण ॥ बरें ह्मणोनियां चौघेजण ॥

१ माशाच्या तोंडांत. २ स्त्रियांचा. ३ मारुतीनें. ४ माशाचा दांत. ५ ब्रह्मदेवाला. ६ बळराम.

आकाशमार्गी चालिले[1] ॥ २३ ॥ मग देव चालिले समुद्रतीरा ॥ जेथें विलाप करीत होत्या सुंदरा ॥ तों दुरोन देखतां यदुवीरा ॥ जीव परतले सर्वांचे ॥ २४ ॥ तों देखिला बलभद्र ॥ दोघांसी झाला आनंदसमुद्र ॥ तों पुढें देखिला पक्षींद्र ॥ तोही कृपादृष्टीं वांचविला ॥ २५ ॥ जेवीं भानुविरहें[2] कमळवन ॥ रात्रीं होय जैसें म्लान संपूर्ण ॥ तेंचि प्रातःकाळीं विकासे जाण ॥ तैसें झालें सकळांसी ॥ २६ ॥ देवें पाहोनियां कृपायोगें ॥ केलीं सर्वांचीं शीतळ अंगें ॥ क्षेमालिंगन देवोनि वेगें ॥ केल्या सुखमय निजकांता ॥ २७ ॥ मग तो लीलालाघवी लवलाहें ॥ त्या रुक्मिणीसी शोधीत जाये ॥ तंव ती विदेहअवस्थेंत आहे ॥ देखोनि हरि संतोषला ॥ २८ ॥ ती स्थिर बैसोनि उत्तम स्थानीं ॥ लक्षीतसे निजवस्तु ध्यानीं ॥ तों पुढें देखिला चक्रपाणि ॥ सुस्मितवदनी जाहली ॥ २९ ॥ ती घालूं पाहे लोटांगण ॥ तों देवें दिधलें आलिंगन ॥ येरी करीतसे निंबलोण ॥ टाकीत ओंवाळून निजमूद ॥ ३० ॥ तो कृष्णदर्शनाचा आनंद ॥ वर्णितां भागलें शेषमुखवृंद ॥ तेथें चतुरानन[3] झाला मतिमंद ॥ मग प्राकृत जनांची मति काय ॥ ३१ ॥ कृष्णदर्शनाचें सुख अपार ॥ तें मनवाचेसीं नव्हे गोचर ॥ तव पूर्वजांचें भाग्य थोर ॥ तें सुख जयांचें खेळवणें ॥ ३२ ॥ मग देव बोले बळरामासी ॥ तुमच्या कृपेनें भय नसे कोणासी ॥ गरुडपृष्ठीं बैसवोनि सर्वांसी ॥ वेगें द्वारकेसी घेवोनि जावें ॥ ३३ ॥ श्रीहरि ह्मणे भुजंगारि[4] ॥ यांसी पाववोनि द्वारकापुरी ॥ मग पाताळासी जावोनि झडकरी ॥ अमृत वेगीं आणावें ॥ ३४ ॥ खगेंद्रें आज्ञा वंदोनि शिरीं ॥ सकळां बैसवोनि पृष्ठीवरी ॥ मनोवेग टाकोनियां दुरी ॥ द्वारकापुरी तो पातला ॥ ३५ ॥ तों हनुमंत विनवी श्रीहरीतें ॥ आह्मी जावों कीं यांसांगातें ॥ ऐसें ऐकतां रमेशवदनातें ॥ हांसें आलें ते काळीं ॥ ३६ ॥ ह्मणे लक्ष्मणप्राणदान शूरा ॥ हें काय बोलिलासी सीतांशोकहरा[5] ॥ मज शोधणें लागेल सकळ समरा- ॥ माजी भक्तरत्नें विखुरलीं ॥ ३७ ॥ जरी तयांसी जाऊं सांडून ॥ तरी बुडालें भक्तवत्सलपण ॥ माझ्या भक्तीचें अगाध महिमान ॥ तेंही बुडोन जाईल पैं ॥ ३८ ॥ मी त्याग करीन स्त्रीपुत्रांचा ॥ देहत्यागीन कायामनेंवाचा ॥ परी त्याग न करीं निजभक्तांचा ॥ प्रमाण त्यासी मातृचरण ॥ ३९ ॥ हें काय बळ असे दैत्याचें ॥ म्यां कौतुक दाविलें मायेचें ॥ महाकाळासी भय मशकाचें ॥ कोणी तरी देखिलें ॥ ४० ॥ मग पार्थासी वदे तो दयांबुनिधि ॥ तूं पृष्ठीसी तूणीर बांधीं ॥ भय पावों नको रे त्रिशुद्धि[6] ॥ रक्षिता तुजला मी आहें ॥ ४१ ॥ तंव धनुर्धर ह्मणे मुकुंदा ॥ मी निस्तरलों सर्व आपदा ॥ त्या तव प्रसादें गोविंदा ॥ बहुत मातें न बोलवे ॥ ४२ ॥ मग ह्मणे कनकपुरदाहकरा ॥ राघवारिसुतजीवनहरा ॥ तूं चिंतोनि रामपदंकल्हारा[7] ॥ निर्भय बैसें ध्वजाग्रीं ॥ ४३ ॥ मग पवनसुत संतोषला ॥ जावोनि ध्वजाग्रीं बैसला ॥ रथीं श्वेतवाहन असे शोभला ॥ देव बैसले धुरेसीं ॥ ४४ ॥ बळराम गेला द्वारकेसी ॥ देव चालिले दैत्यनगरासी ॥ तों दुरोनि देखिलें दैत्यसैन्यासी ॥ भयें देवासी कपि सांगे ॥ ४५ ॥



१ गरुड. २ सूर्याच्या विरहानें. ३ ब्रह्मदेव. ४ गरुडा. ५ मारुते. ६ खरोखर. ७ रामपदकमल.

सैन्य दिसतें दुंदुभीचें ॥ पाहातां धैर्य भंगलें साचें ॥ नवल लाघव दैत्यमायेचें ॥ यालागीं दुरोनि जावें जी ॥ ४६ ॥ हरि ह्मणे तुवां भय हरिलें रामाचें ॥ तो तूं भय धरिसी दैत्याचें ॥ न कळे वैभव काळाचें ॥ ह्मणोनि हांसे खदखदां ॥ ४७ ॥ हटेंचि भोजकोट-पुरासमीप ॥ वेगें आला द्वारकाधिप ॥ पार्थासी[1] ह्मणे तुह्मी सुखरूप ॥ येथें असावें दोघांनीं ॥ ४८ ॥ एकदां मरोन तिघे वांचलों ॥ कष्टें दुःखार्णव उतरलों ॥ पुनः या मरणस्थळासी आलों ॥ नेणों भ्रमलों पूर्वकर्में ॥ ४९ ॥ मी एकलाच पुढें जाईन ॥ त्या दुंदुभीतें संहारीन ॥ तुह्मी कौतुक पहा दुरोन ॥ ऐकोनि बोले कपि त्यातें ॥ ५० ॥ जेणें सर्व सैन्याचा भरला घोंट ॥ हें आपुले नेत्रीं देखिलें स्पष्ट ॥ जाणोनि पुनः तिची धरावी वाट ॥ हें तों कौतुक कर्माचें ॥ ५१ ॥ देव ह्मणे नलगे वैभव ॥ येथें पाहिजे बुद्धि-लाघव ॥ जेणें अनायासें दैत्यपुंगव ॥ मरेल ऐसें साधीन ॥ ५२ ॥ देवें सोडिलें निजथोरपण ॥ स्वरूपें झाला दिव्य ब्राह्मण ॥ भव्य धोत्रें नेसोन ॥ द्वादश टिळे रेखिले ॥ ५३ ॥ गळां रुद्राक्ष स्फटिक माळा ॥ भाळीं घवघवीत केशरटिळा ॥ पादुका शोभती चरणकमळा ॥ पीत पटोल प्रावरण ॥ ५४ ॥ अनामिकीं शोभलीं दर्भपवित्रें ॥ गळां उत्तरी शोभे नाममंत्रें ॥ पादपर्यंत रुळती शुद्ध धोत्रें ॥ करांगुळीं स्मरणी[2] फिरवित ॥ ५५ ॥ करीं कनकझारी शोभली ॥ तीवरी ठेविली कनकथाली ॥ वामनरूपें मूर्ति सांवळी ॥ चालिली भेटी दैत्याचिया ५६ ॥ दैत्याधिपति तो दुंदुभि ॥ विजयश्रियेच्या वाजती रणदुंदुभी ॥ तये विजयश्रीचा हर्ष नभीं ॥ न मायेसें त्या वाटे ॥ ५७ ॥ छत्र ध्वज पताका शोभती ॥ धवल चामरें वरी उडती ॥ नाना वाद्यें वाजती ॥ भाट[3] गर्जती दोनी भागीं ॥ ५८ ॥ त्यांसी देत अनंत उचित ॥ मनीं आनंदलासे बहुत ॥ वस्त्राभरणीं वीर समस्त ॥ गौरवीत असे निजहस्तें ॥ ५९ ॥ ऐसा आनंदें जात असतां ॥ विप्र देखे तों अवचिंतां[4] ॥ रथाखालीं उतरोनियां माथा ॥ ठेविला चरणीं द्विजाचे ॥ ६० ॥ ऊर्ध्व करोनि करनलिन[5] ॥ ह्मणे तुज असो पूर्ण कल्याण ॥ विजयश्रियेचा हर्ष देखोन ॥ आलों तुजला पहावया ॥ ६१ ॥ तंव दुंदुभि ह्मणे जी स्वामी ॥ कोठोनियां आलां तुह्मी ॥ तुमच्या दर्शनमात्रें आह्मी ॥ कृतार्थ झालों सर्वथा ॥ ६२ ॥ तेजें केवळ अपरसूर्य[6] ॥ अभंग तुमचें ब्रह्मचर्य ॥ कोणतें मनीं धरोनि कार्य ॥ आलेत स्वामी या ठाया ॥ ६३ ॥ द्विज ह्मणे राया परियेसीं ॥ माझें कुटुंब असे द्वारकेसी ॥ व्रतबंध करणें आहे पुत्रासी ॥ ह्मणोनि देशावरा निघालों ॥ ६४ ॥ तों धर्माचा अश्वमेध ऐकिला ॥ मी जात होतों धर्मनगराला ॥ तों तुह्मीं तयाचा सैन्यभंग केला ॥ राजे मारिले पृथ्वीचे ॥ ६५ ॥ आणि कृष्णार्जुन निमाले ॥ दाते कोणी नसती उरले ॥ आमुचे कर्मभोग फळा आले ॥ ऐसें झालें प्रारब्धें ॥ ६६ ॥ तरी तुजसारिखा शूर ॥ नाहीं तुजऐसा उदार ॥ सकळ नृपांचा अळंकार ॥ ह्मणोनि याचक मी आलों ॥ ६७ ॥ दैत्यराज ह्मणे द्विजपति ॥ काय मागणें जी असे चित्तीं ॥

१ अर्जुनाला. २ माळ. ३ स्तुतिपाठक. ४ एकाएकीं. ५ हस्तकमळ. ६ दूसरा सूर्य.

तें कृपा करोनि मजप्रति ॥ सांगा स्वामी देईन ॥ ६८ ॥ तयासी मागेल काय ब्राह्मण ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ आहे तें ऐकावें सावधान ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ६९ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ दुंदुभिआख्यान अगाध ॥ द्विसप्ततितमाध्याय गोड हा ॥ ७० ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते दुंदुभ्याख्यानं नाम द्विसप्ततितमोऽध्यायः ॥ ७२ ॥ अध्यायः ॥ ७२ ॥ ॥ ओव्या ॥ ७० ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जनमेजय जैमिनीतें ह्मणे ॥ त्यासी काय सांगीतलें ब्राह्मणें ॥ तें कृपा करूनि मज सांगणें ॥ सुधासमान वाक्य तुझें ॥१॥ जैमिनि ह्मणे गा भारता ॥ तूं भाग्यें मज मिळालासी श्रोता ॥ उत्साह होतो तुज सांगतां ॥ ऐक आतां सावधान ॥ २ ॥ दैत्यपुंगवासी द्विज ह्मणे ॥ मज पुत्राचा असे व्रतबंध करणें ॥ यालागीं मज संपादणें ॥ कांहींएक धन राया ॥ ३ ॥ जेणें व्रतबंध होय पूर्ण ॥ ऐसें द्यावें जी मज धन ॥ तो ह्मणे घे अपार धन ॥ पुरोनि उरेल कुटुंबासी ॥४॥ मग तयासी बोले ब्राह्मण ॥ ऐसें मी न घेईं अशुचि दान ॥ सकळ स्त्रियांसमवेत स्नान ॥ करूनि दान मज देईं ॥ ५ ॥ ऐसें बोलतां द्विजकुळदीप ॥ बरवें ह्मणोनि भोजकोटाधिप ॥ तेथेंचि देवविले मंडप ॥ जे कनकवस्त्रें मंडित ॥ ६ ॥ पाचारावया सकळ स्त्रियांसी ॥ धाडिला सौवीर दळेंसीं ॥ तो त्यांसी ह्मणे मंडपासी ॥ त्वरेनें यावें नृपआज्ञा ॥ ७ ॥ तंव तयासी लक्ष कामिनी असती ॥ ज्या स्वरूपें लाजविती रती ॥ दर्शनें निष्काम मूर्च्छित होती ॥ का गति कायसी सकामा ॥ ८ ॥ एकी गौर हंसगमना ॥ कोणी शरच्चंद्रवदना ॥ कित्येक असती पुष्पवर्णा ॥ कोणी गजगामिनी सुहास्य ॥ ९ ॥ कोणी चामीकरसमाना[2] ॥ एकी शुकनासिका पिकस्वना[3] ॥ एकी प्रफुल्लपंकजलोचना ॥ कुंदरदना[4] कित्येकी ॥ १० ॥ एकी कोमळ निंबस्तना ॥ एकी मन्मथमोहना ॥ एकी सुरतविचक्षणा ॥ चित्रिणी शंखिनी जातीच्या ॥ ११ ॥ ऐशिया नानापरींच्या अंगना ॥ शीघ्र बैसोन निघाल्या सुखासना ॥ पुढें वेत्रधारी करिती गर्जना ॥ अश्ववहना धांवती ॥ १२ ॥ भोंवतीं दासींचीं शतानुशतें ॥ हातीं घेवोनि चामरांतें ॥ सेवा जाणविती स्वामिनींतें ॥ ऐशिया प्रत्येक शत दासी ॥ १३ ॥ ऐशा त्या अंगना अनंत ॥ शीघ्र पातल्या मंडपाआंत ॥ सर्वी वेष्टोनि दैत्यनाथ ॥ बैसल्या यथोक्त वरासनीं ॥ १४॥ सभांबरीं तो दैत्यसुधाकर[5] ॥ भोंवता कामिनीनक्षत्रपरिवार ॥ रिपुपडळ घोर अंधार ॥ नेला दिगंता शौर्यबळें ॥ १५ ॥ चौकी आणिली रत्नखचित ॥ तिजवरी बैसला दैत्यनाथ ॥ कामिनी उठल्या त्या समस्त ॥ वल्लभा अभ्यंग करावया ॥ १६ ॥ आणिलीं तीनशतें रुक्मगंगाळें ॥ त्यांमाजी भरिलीं तप्त जळें ॥ तीं मिश्रित केलीं सुपरिमळें ॥ केशर कर्पूर कस्तूरीसीं ॥ १७ ॥ कनकपात्रें घेवोनि हातीं ॥ त्यावरी तप्तजळातें ओतिती ॥ कोणी चरणकमळांतें धुती ॥ एक मर्दिती करपृष्ठीं ॥ १८ ॥ रत्नखचित मांडिलासे पाट ॥ त्यावरी बैसविला तो द्विजश्रेष्ठ ॥ संकल्प ह्मणतसे घडघडाट ॥ स्नानकाळीं दैत्याच्या ॥ १९ ॥ तीनशतें उभ्या राहोनि नारी ॥ मर्दन करिती दैत्यशिरीं ॥ तीन सहस्र त्या उभ्या सुंदरी ॥ कर घांसती दैत्याचे ॥ २० ॥ वस्त्राभरणाचेनि झळाळे ॥ चपळ नासिकींचेनि मुक्ताफळें ॥ ऐसीं शोभेचीं स्त्रीफळें ॥ बरवें शोभलें सभांतर ॥ २१ ॥ अनंत पात्रीं जळ वर्षती ॥ जेवीं प्रळयांबु शैलावरी पडती ॥ स्नानोदकाच्या सरिता[6] वाहती ॥ वर्षाकाळीं नद्या जैशा ॥२२॥ मग लीलालाघवी तो भगवान ॥ जळीं प्रेरिता झाला

---

१ मुंज. २ सुवर्णासमान. ३ कोकिळेच्या शब्दाप्रमाणें आहे शब्द ज्यांचा अशा. ४ कुंदाच्या कळयांप्रमाणें ज्यांचे दांत आहेत अशा. ५ दैत्यरूपी चंद्र. ६ नद्या.

सुदर्शन ॥ तद्युक्त लागतां हो जीवन ॥ करकमळें नाश पावलीं ॥ २३ ॥ वृक्षापासोनि पक्क पर्णें गळती ॥ तेवीं शिरकमळेंही संपूर्ण पडती ॥ तें देखोनि सकळ युवती ॥ उर शिर ताडिती आक्रोशें ॥ २४ ॥ केवळ उरला मांसगोळा ॥ ऐसें देखोनि त्यास डोळां ॥ करित्या झाल्या जी कोलाहला ॥ तो नभमंडळा विदारी ॥ २५ ॥ ऐसा होतांचि कोलाहल ॥ द्विजें तेथोनि काढिला पळ ॥ लटिकाचि होतसे व्याकुळ ॥ ह्मणे आहा दाता निमाला ॥ २६ ॥ ऐसा लाघवी वनमाळी ॥ धांवोनि आला पार्थाजवळी ॥ ह्मणे म्यां कार्यसिद्धि साधिली ॥ दैत्य मारिला युक्तीनें ॥ २७ ॥ दोघांसी सांगे कपटविंदान ॥ मग तिहीं केलें रथारोहण ॥ करूनियां शंखस्फुरण[2] ॥ रणमंडळासी ते आले ॥ २८ ॥ आज्ञा होतांचि सर्पदमनां[3] ॥ कीं अमृतार्थ[4] जाईं पाताळभुवना ॥ तों तेथें जावोनि खगराणा ॥ करीत प्रार्थना शेषाची ॥२९॥ आद्यंत युद्धाचें कथन ॥ शेषासी सांगे भुजंगाशन ॥ ऐकतां शेष झाला सुखसंपन्न ॥ विनवीत आपण सर्पांसी ॥ ३० ॥ पार्थादि सर्व नृपगण ॥ दैत्ययुद्धीं पावले मरण ॥ त्यांचें करावया संजीवन ॥ कृष्णें अमृत याचिलें ॥ ३१ ॥ तदर्थ[5] आला तुमचा वैरी ॥ यासी सुधा द्यावी झडकरी ॥ नातरी करूनि सर्पबोहरी[6] ॥ अमृत घेऊनि जाईल ॥ ३२ ॥ समाधानपूर्वक देतां ॥ त्यांतचि आहे श्रेष्ठता ॥ अमृतावीण वांचवील कृष्ण तत्वतां ॥ परी गौरव देतो सुधेतें ॥ ३३ ॥ ऐसें ऐकतां शेषवचन ॥ सक्रोध झाले सर्पगण ॥ कां दुर्जनांचा हाचि गुण ॥ परोपकार न करावा ॥ ३४ ॥ नानापरी बोधिले दुर्जन ॥ परी ते न पावतीच समाधान ॥ जैसें श्वानपुच्छ[7] नळिके घालितां जाण ॥ नीट नव्हे कल्पांतीं ॥ ३५ ॥ तैसें नम्रत्वें मागतां न देती ॥ ह्मणोनि कोपला खगपति ॥ युद्धीं करोनि आपली ख्याति ॥ केलें हरण अमृताचें ॥ ३६ ॥ सविस्तर सांगूं अमृतहरण ॥ तरी सकळां द्यावया जीवदान ॥ रणीं उत्कंठित जगज्जीवन ॥ यास्तव संक्षेपें कथिलें जी ॥ ३७ ॥ बळें घेवोनियां अमृत ॥ वेगें खगपति आला रणांत ॥ तो देखोनि संतोषला अनंत ॥ क्षेम देत गरुडासी ॥ ३८ ॥ तें अमृत करीं घेऊन ॥ अनंतहस्तें केलें सिंचन ॥ तात्काळ उठविले नृपगण ॥ गजाश्वपदातींसमवेत ॥ ३९ ॥ निजोन उठती जेवीं नर ॥ तेवीं उठविला दळभार ॥ पूर्विल्यापरीस सतेज निर्धार ॥ झालासे सकळांसी ॥ ४० ॥ जो दृष्टिमात्रें करी संजीवन ॥ त्यासी अमृताचें काय कारण ॥ परी तें अवतारचरित्र गहन ॥ दाविलें जनां पाहिजे ॥ ४१ ॥ परस्परें देती आलिंगनें ॥ ह्मणती नवल केलें नारायणें ॥ सर्वीं केलीं शंखस्फुरणें ॥ नाना रणतुरें वाजती ॥ ४२ ॥ सकळ सैन्यासीं कृष्णार्जुन ॥ करिते झाले नगरलुंठन[8] ॥ चंद्रहासादि सकळ वीरगण ॥ अभर[9] केले संपत्तीनें ॥ ४३ ॥ चतुरंग सैन्य लुटिलें ॥ रुक्मरथ सर्व धन हरिलें ॥ हें नारदें देखोनि वहिलें[10] ॥ समुद्रतीरा चालिला ॥ ४४ ॥ तेथें पुत्र होते दुंदुभीचे ॥ पितयातुल्य पराक्रम साचे ॥ ज्यांचिया धाकें हृदय फुटे काळाचें ॥ जे अजेय भुवनत्रयीं ॥ ४५ ॥ रणधीर आणि रणदुर्धर ॥ नामें प्रसिद्ध असुरेश्वर ॥ तयांसी

---

१ पाणी. २ शंखवादन. ३ गरुडास. ४ अमृतासाठीं. ५ त्याकरितां. ६ सर्पांचा पराजय. ७ कुत्र्याचें शेंपूट. ८ शहराची लूट. ९ परिपूर्ण. १० सत्वर.

बोले विधिकुमर ॥ कां रे निश्चिंत बैसलेति ॥ ४६ ॥ कृष्णार्जुनें तुमचा पिता ॥ कपटें मारिला रे आतां ॥ नगर लुटोनि संपत्तिस-रिता ॥ निजसैन्यसागरा मेळविली ॥ ४७ ॥ त्यांचा सूड तुह्मांसी घेणें ॥ योग्य आहे रे पुत्रपणें ॥ हें न कराल तरी व्यर्थ जिणें ॥ भूमिभार जन्मलेति ॥ ४८ ॥ ऐसें ऐकतां नारदवचन ॥ दोघे झाले क्रोधायमान ॥ चोवीस लक्ष वीर घेऊन ॥ वेगें चालिले युद्धासी ॥ ४९ ॥ तों पुढें येवोनि विधिनंदन ॥ कृष्णार्जुनांसी सांगे वचन ॥ दुंदुभीचे पुत्र दोघेजण ॥ युद्धासी आले पळा रे ॥ ५० ॥ पित्याहून ते चतुर्गुण ॥ बळें असती वीर्यसंपन्न ॥ क्षणमात्रें घेतील तुमचे प्राण ॥ मग कोण वांचवील तुह्मांतें ॥ ५१ ॥ नारदासी श्रीहरि पुसे ॥ सर्व दळभार किती असे ॥ त्यांचा मुख्य चोवीस लक्ष दिसे ॥ येर दळभार कोण गणी ॥ ५२ ॥ तों प्लवंगम ह्मणे अर्जुना ॥ अपार आली दैत्यसेना ॥ तुह्मांवरी कोपला देवराणा ॥ दुसरें विघ्न आणविलें ॥ ५३ ॥ देव पाहे दैत्यकुमरभार ॥ तो मनीं कल्पवेना दुर्धर ॥ जाणोनि निजमायेचा प्रसर ॥ देवें घातला तयांवरी ॥ ५४ ॥ ह्मणोनि तयां पडिलें मोहन ॥ उगेचि आले कृष्णासी शरण ॥ तों चार्कोटला पाहे विधिनंदन ॥ रणकंदन नव्हे आतां ॥ ५५ ॥ म्यां तंव लाविली होती कळी ॥ परी कांहीं कार्यसिद्धि न झाली ॥ अतिलाघवी हा वनमाळी ॥ यापुढें न चाले विंदान ॥ ५६ ॥ देवें दोघांचें करूनि समाधान ॥ तेथील राज्य केलें तयां-धीन ॥ दोघे बंधु समागमें घेऊन ॥ पुढें दळभार चालिला ॥ ५७ ॥ तों ब्रह्मा आणि त्रिनयन ॥ तिहीं देखिले कृष्णार्जुन ॥ कृष्णें वंदिले शंकरचरण ॥ दिधलें आलिंगन परस्परें ॥ ५८ ॥ मग आद्यंत युद्धकथन ॥ दोघां सांगितलें संपूर्ण ॥ ऐकोनि हांसला वृषभ-वाहन ॥ लीलाचरित्र कृष्णाचें ॥ ५९ ॥ ऐसा तेथींचा सुखसोहळा ॥ ऐकोनि वर्णिला जी भूपाळा ॥ जो न वर्णवे सहस्रवदनालां ॥ तो केवीं वर्णवे एकवदनें ॥ ६० ॥ मुनिजनमानसहंसकुळा ॥ अति अप्राप्य भगवत्कळा ॥ ती खेळवणी तुझिया पूर्वजांला ॥ नेणवे कळा भाग्याची ॥ ६१ ॥ धन्य धन्य सकळ नृपगण ॥ ज्यांहीं देखिला वृषभवाहन ॥ तैसाचि देखिला हंसँवाहन ॥ खगवाहन तो सर्वेचि ॥ ६२ ॥ सर्वही झाले सुखसंपन्न ॥ सर्वही पावले समाधान ॥ तें जाणोनि विधिनंदन ॥ काय कृष्णाप्रति बोलत ॥ ६३ ॥ सात दिवस जयाचे मुखीं ॥ तिघे होतां अत्यंत सुखी ॥ त्यासी तैसेंचि टाकोनि दुःखी ॥ जाणें तुजला योग्य नव्हे ॥ ६४ ॥ तयांचें करावें उद्धरण ॥ मग पुढें करावें जी गमन ॥ कृष्ण गरुडासी देत आज्ञावचन ॥ जावोनि मीन तूं आणीं ॥ ६५ ॥ खगें वेगें ते आणिले मीन ॥ जळावेगळे नव्हती प्राणहीन ॥ जवळी असतां जगज्जीवन ॥ केवीं जीवहानि घडेल ॥ ६६ ॥ स्वमुखें मत्स्यांसी ह्मणे गोपाळ ॥ आतां विरोध सांडा रे सकळ ॥ स्वर्गाधिकारी वडवानळ ॥ केला धूमकेतुसंयोगानें ॥ ६७ ॥ धूमकेतूसी ह्मणे जनार्दन ॥ तुवां केलें गायत्रीमंत्रोच्चारण ॥ तेणें पवित्र झालासी ह्मणोन ॥ तव वदनीं आह्मीं वास केला ॥ ६८ ॥ देहांतीं तुज सत्यलोक ॥ प्राप्त होईल

१ नारद. २ चौपट. ३ मारुति. ४ चकित होऊन. ५ शंकर. ६ शेषाला. ७ ब्रह्मदेव.

सत्य ऐक ॥ अवधि उरली कांहींएक ॥ ती सरतां पावसी तूं गति ॥ ६९ ॥ मीन ह्मणति जी गोपाळा ॥ नेत्रीं पाहातां तव वदन-कमळा ॥ कृतार्थ झालों तमाळनीळा ॥ आतां गर्भवासा न घालावें ॥ ७० ॥ ऐसा ऐकतां मीनबोल ॥ अंतरीं द्रवला दयाळ ॥ देहांतीं मुक्तीच पावाल ॥ जा हो आतां निजस्थानां ॥ ७१ ॥ मग वंदोनि इंदिरावरा ॥ धूमकेतु गेला पूर्वसागरा ॥ वडवानळ तो उत्तरसागरा ॥ गेला कृष्णांघ्री वंदोनि ॥ ७२ ॥ आज्ञा घेवोनि श्रीशंकर ॥ हय अर्पोनि पावला कैलासशिखर ॥ चतुरानन पावला सत्वर ॥ पितया नमोनि सत्यलोका ॥७३॥ स्वेच्छागमन विधिनंदना ॥ जातसे वाजवीत ब्रह्मवीणा ॥ ह्मणे बरवी झाली काळक्रमणा ॥ पुढेंही ऐसी होईल ॥ ७४ ॥ मग पुढें सोडोनि श्यामकर्ण ॥ मागें चालिले कृष्णार्जुन ॥ सभोंवते सकळ नृपगण ॥ चालती राया भार त्यांचे ॥ ७५ ॥ आतां राया ते श्यामकर्ण ॥ कोण्या नगरा करितील गमन ॥ तेंचि मी सांगेन निरूपण ॥ पुढिलिये प्रसंगीं ॥ ७६ ॥ ऐसें हें दुंदुभीचें आख्यान ॥ भावें जे करितील श्रवण ॥ सर्व पातकांचें होईल दहन ॥ आणि हरि तुष्टेल तयांवरी ॥ ७७ ॥ ऐसें हें दुंदुभीचें आख्यान ॥ तुज म्यां सांगितलें संपूर्ण ॥ भविष्योत्तरपुराणींचें कथन ॥ कथा मथित निवेदिली ॥ ७८ ॥ विशेषें हें करितां श्रवण ॥ संग्रामीं विजय होय संपूर्ण ॥ या लोकीं होवोनि सुखसंपन्न ॥ देहांतीं पावती स्वर्गलोक ॥ ७९ ॥ श्रीधर विनवी श्रोतयांप्रति ॥ हें दुंदुभिआख्यान यथामति ॥ म्यां सांगितलें जी तुह्मांप्रति ॥ न्यून तें पूर्ण करावें ॥ ८० ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ दुंदुभिआख्यान अगाध ॥ समाप्त झालें येथें विविध ॥ कथा पुढें परिसा जी ॥ ८१ ॥ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके दुंदुभ्याख्यानं नाम त्रिसप्ततितमोऽध्यायः ॥ ७३ ॥ ॥ अध्याय ॥ ७३ ॥ ॥ ओव्या ॥ ८१ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जनमेजय ह्मणे जैमिनि ॥ सकळ वक्त्यांमाजी तूं शिरोमणि ॥ पुढें उघडीं कथेची खाणी ॥ कृपा करूनि स्वामिया ॥ १ ॥ मुनि ह्मणे नृपवरा ॥ कथा ऐकावी गा चतुरा ॥ सावधान श्रवण करा ॥ जी भवपारा नेणारी ॥ २ ॥ पुढें सोडिले श्यामकर्ण ॥ मागें चालिले कृष्णार्जुन ॥ तयांमागें नृपगण ॥ चालिले ते वेगेंसीं ॥ ३ ॥ लंघिती वनें उपवनें ॥ नाना गिरिपट्टणें ॥ तों मार्ग धरिला श्यामकर्णें ॥ हिरापट्टणींचा ते काळीं ॥ ४ ॥ वायव्यदिशे साजिरी ॥ हिरापट्टण नामें नगरी ॥ वर्णितां तयेची कुसरी ॥ अमरावती तुच्छ वाटे ॥ ५ ॥ तेथें राजा सैन्यपाळ ॥ जो समरांगणीं महाकाळ ॥ मूर्तिमंत प्रतापकल्लोळ ॥ अपार दळ तयाचें ॥ ६ ॥ मनोजळ अश्व कोटिशत ॥ तदर्ध कुंजर मदोन्मत्त ॥ तितुकेच असती महारथ ॥ पायभारा[1] मितें[2] नाहीं ॥ ७ ॥ ऐसा सैन्यपाळ बळोदधि ॥ खेळावया चालिला पारधी ॥ वनीं करोनि क्रीडाविधि ॥ स्वनगरासी परतला ॥ ८ ॥ त्यासी मार्गीं लागली नगरी ॥ नामें प्रसिद्ध सिंदुरगिरी ॥ तेथील राजा अवधारीं ॥ भानुकांत नामें विख्यात ॥ ९ ॥ चंद्रपुरगिरीचा एक नृपनाथ ॥ तो व्याही तयाचा चंद्रकांत ॥ चंद्रसेन होय तयाचा सुत ॥ तोचि जामात भानुकांत रायाचा ॥ १० ॥ त्याची कन्या मालिनी ॥ रूपें केवळ पद्मिनी ॥ जीतें देखतां धैर्यतटिनी ॥ आटोनि जाय क्षणार्धें ॥ ११ ॥ जिच्या अंगुष्ठप्रभेसीं ॥ तुळणा न पावे उर्वशी ॥ ती सकळ लावण्याची राशी ॥ उपमा कोणाची पैं द्यावी ॥ १२ ॥ रूपें अतिशय नृपदुहिता ॥ संगें सख्या घेवोनि समस्ता ॥ पूजावया शंकरें[3]व-निता ॥ शृंगारवना जातसे ॥ १३ ॥ त्या सकळ रूपें मनमोहना ॥ सकळ चातुर्यकळाप्रवीणा ॥ नवयौवना हंसगमना ॥ चंद्रवदना पद्माक्षी ॥ १४ ॥ एकी जातीच्या शंखिनी ॥ एकी जातीच्या चित्रिणी ॥ त्यांमाजी ती एक पद्मिनी ॥ शोभे मालिनी नृपकन्या ॥ १५ ॥ त्या कैशा शोभती सुंदरा ॥ वाटे भूमंडळासी आल्या तारा ॥ त्या सर्वांमाजी चंद्रतारा ॥ निष्कलंक मालिनी ॥ १६ ॥ त्यांचा देखोनि गमनविलास ॥ लाजोनि गेला राजहंस ॥ ऐकतां मधुर स्वनास ॥ पिकें[4] पळाले वनांतरीं ॥ १७ ॥ ज्यांचे मुखींचा परिमळ ॥ वेडाऊं इच्छी मलयानिळ ॥ करें वारिती त्या अलिकुळ[5] ॥ मुखसुवासा धांवती जे ॥ १८ ॥ ऐसिया त्या सुंदरा ॥ शीघ्र पावल्या सरोवरा ॥ वस्त्रें ठेवोनियां सत्वरा ॥ जळक्रीडा करिताती ॥ १९ ॥ करोनियां सुस्नान ॥ परिधान करूनि वसन[6] ॥ भाळीं कुंकुम रेखोन ॥ काजळ नयनीं रेखिलें ॥ २० ॥ पूजापात्र घेवोनि करीं ॥ मालिनी चालिली झडकरी ॥ वंदोनियां त्रिपुरसुंदरी ॥ मनोभावें पूजित ॥ २१ ॥ जिचिया चरणकल्हारीं[7] ॥ देवांगना होती भ्रमरी ॥ कबरीभारातें[8] वेधली ॥ निशा येवोनि सुखरूप ॥ २२ ॥ जिचे चरणीं मन ठेवितां ॥ प्राप्त होय सौभाग्यसरिता ॥ विध्वंस होय सकळ दुरिता ॥ ती मदनारिवनिता[9] वंदिली ॥ २३ ॥ ऐसी पूजोनि भवानी ॥ संतोष पावली मालिनी ॥ सख्यांसहित उपवनीं ॥ खेळावया निघाली ॥ २४ ॥ तों त्याच मार्गीं सैन्यपाळ ॥ उष्णें झालासे व्याकुळ ॥

---

१ पायदळाच्या संख्येला. २ गणती. ३ गौरीला. ४ कोकिळ. ५ भुंग्यांचा समुदाय. ६ वस्त्र. ७ चरणकमलीं. ८ केशांच्या समुदायाला. ९ पार्वती.

अंग करावया शीतळ ॥ शृंगारवना पातला ॥२५॥ तंव तयानें निजनयनीं ॥ खेळतां देखिली मालिनी ॥ मनोभावें नृपचूडामणि ॥ तयेलागीं वेधला ॥ २६ ॥ नृपें धाडोनि सेवका ॥ पाचारिली नृपकन्यका ॥ येरी देखोनि नृपनायका ॥ साशंकित जाहली ॥ २७ ॥ सख्यांसमवेत येवोनि ॥ समीप बैसली मालिनी ॥ तयेसी पुसे नृप वाणी ॥ तूं कवणाची कन्यका ॥ २८ ॥ सांगें जनकअभिधान ॥ आणि तुझें नाम कवण ॥ कुमारी कीं सुवासिनी जाण ॥ मजलागीं निवेदीं ॥ २९ ॥ ऐसें ऐकतां खेद चित्तीं ॥ अधोवदना अश्रु गळती ॥ भूलिंगासी लाविली गळती ॥ वाक्य न फुटे बोलावया ॥ ३० ॥ धैर्यें सावध होय वेल्हाळा ॥ ह्मणे तूं कां पुससी या बोला ॥ मी नृपसिंहाची असें बाळा ॥ अविचारपणें न बोलें ॥ ३१ ॥ पिता माझा भानुकांत ॥ श्वशुर माझा चंद्रकांत ॥ चंद्रसेन नामें विख्यात ॥ मम कांत महाबळी ॥ ३२ ॥ विख्यात ते असती चराचरीं ॥ काळासमान ते समरीं ॥ ते तिघेही माझे शिरीं ॥ असतां तूं कां बोलसी ॥ ३३ ॥ तंव देखोन तिच्या स्वरूपाला ॥ स्मरें व्यापिलें भूपाळा ॥ स्वधर्मातें तो चेवला ॥ बोलों लागला तयेतें ॥ ३४ ॥ पुढें घेतली मालिनी ॥ ह्मणे तूं होईं माझी कामिनी ॥ सात शत मम स्त्रियांत मुख्य राणी ॥ तुजला करीन गुणज्ञे ॥३५॥ माझिया संगें सुख ॥ अहोरात्र भोगीं विशेख ॥ ज्यातें इच्छी सुरनायक[३] ॥ तें सर्वही घरीं माझ्या ॥ ३६ ॥ बळें नेतां तुजलागून ॥ तरी मज येईल तस्करपण ॥ लोक बोलतील निंदावचन ॥ अविचारीं हा राहाटे ॥ ३७ ॥ माझें वचन ऐकावें ॥ पितयासी सांगोन पाठवावें ॥ सैन्यपाळराव वैभवें ॥ धरोनि नेतो मजलागीं ॥ ३८ ॥ तरी दळभारेंसीं धांवावें ॥ सैन्यपाळासी जिंकावें ॥ मजलागीं सोडवावें ॥ नातरी मज तो नेतो ॥ ३९ ॥ ऐसें बोलतां विपरीत ॥ तयेसी झाला वज्रपात ॥ परी कांहींच न चालत ॥ ह्मणे मरें रे पापिष्ठा ॥ ४० ॥ जैसी गारुडें[४] धरिली सर्पिणी ॥ तैसी अटकली ती कामिनी ॥ कांहींच न चाले करणी ॥ मग सांगातिणींसी बोलत ॥ ४१ ॥ जी ऐकिली तुवां दुरुक्ति ॥ ती जावोनि सांगें पितयाप्रति ॥ ह्मणावें रक्षीं आपुली कीर्ति ॥ कन्यारूपें वाढली जी ॥ ४२ ॥ सखी वेगें गेली स्फुंदत ॥ सांगे पितयास वृत्तांत ॥ तो ऐकतांच भानुकांत ॥ काळापरी खवळला ॥ ४३ ॥ ह्मणे जंबुक[५] मातला ॥ देखोनि सिंहाची नेत बाळा ॥ मरावया इच्छितो आपणाला ॥ जेवीं दीपका पतंग ॥ ४४ ॥ घाव दिधला निशाणा ॥ ह्मणे सैन्य पालाणा पालाणा ॥ रणतुरें वाजती नाना ॥ छत्र ध्वज पताका उभारिल्या ॥ ४५ ॥ राव बैसोनियां रथावरी ॥ घेतली शस्त्रास्त्रसामग्री ॥ छत्रांधकारें धरित्री[६] ॥ आच्छादिली तेधवां ॥ ४६ ॥ चित्रसेननामें प्रधान ॥ रायासी बोले येऊन ॥ युद्धा आधीं आपण ॥ शिष्टाईशीं पाठवावें ॥ ४७ ॥ कोणे देशींचा नृपवर ॥ संगें किती दळभार ॥ कां करितो बलात्कार ॥ ऐसा समाचार काढावा ॥ ४८ ॥ ऐसी ऐकोनियां मात ॥ प्रधानासी बोले भानुकांत ॥ तुवां जावोनि त्वरित ॥ तयालागीं बोधावें ॥ ४९ ॥ माझी प्रियकर कन्या

१ बापाचें नांव. २ सुंदरी. ३ इंद्र. ४ गारुड्यानें. ५ कोल्हा. ६ पृथ्वी.

मालिनी ॥ शीघ्र जावोनि तूं आणीं ॥ सचिव बोले रायालागुनी ॥ मम वचन ऐकावें ॥ ५० ॥ मी शीघ्र जाईन त्यापासीं ॥ बरवें बोधीन तयासी ॥ जरी सोडील कन्येसी ॥ तरी शीघ्र आणीन ॥ ५१ ॥ जरी तो नायके नृपाधम ॥ तरी करणें लागेल संग्राम ॥ तुह्मीं पत्र लिहोनि उत्तम ॥ चंद्रकांता पाठवावें ॥ ५२ ॥ बरवें ह्मणोनि भानुकांत ॥ प्रधान पाठविला त्वरित ॥ आपण लिहिता झाला लिखित ॥ चंद्रकांत रायासी ॥ ५३ ॥ स्वस्तिश्री राया चंद्रकांता ॥ पत्र लिहिलें संक्षेपतां ॥ तें पाहोनियां त्वरिता ॥ पत्रदर्शनीं निघावें ॥५४॥ सैन्यपाळ नृपाधम ॥ शृंगारवनीं आला परम ॥ तेणें कन्याललाम¹ ॥ ममोदरींची देखिली ॥५५॥ जी दक्षिणसागरींचें रत्न ॥ जी चंद्रसेनाची कांता उत्तम ॥ ती सैन्यपाळें धरिली परम ॥ नेऊं इच्छित स्वनगरा ॥५६॥ तुह्मी आह्मी मिळोन ॥ युद्ध करूं जी दारुण ॥ बळें सोडवूं कन्यारत्न ॥ जें कां माझें आवडतें ॥ ५७ ॥ यापरी लिहोनि लिखित ॥ दूत पाठविले त्वरित ॥ तों इकडे प्रधान जात ॥ तया वनामाझारी ॥ ५८ ॥ मनोवेगें सैन्यपाळा ॥ प्रधान जावोनि भेटला ॥ ह्मणे मी वंदितों तुह्मांला ॥ प्रधान असें भानुकांताचा ॥ ५९ ॥ जयजयाजी सैन्यपाळा ॥ शत्रुसागरवडवानळा ॥ ऐकावें मम वचनाला ॥ जें कां रायें निवेदिलें ॥ ६० ॥ तूं असोनि धर्मशीळ ॥ क्षात्रधर्मी अति सुशीळ ॥ परदारा² हरण केलियानें केवळ ॥ कलंक लागेल निजकुळा ॥ ६१ ॥ भानुकांत तो समर्थ ॥ परी तुज असे शरणागत ॥ त्याचें कन्यारत्न निश्चित ॥ हें कां तूं करिसी अयोग्य ॥ ६२ ॥ भानुकांत तव वनींचें झाड ॥ त्याचें कन्यारत्न हें सुरवाड ॥ याचा अभिलाष धरितां अवघड ॥ दिसोन येतें मज पुढें ॥ ६३ ॥ माणिक मोतीं हिरे कनक³ ॥ इच्या भारोभार देतों देख ॥ परी मालिनी सांडावी निःशंक ॥ नातरी होसी नरका विभागी ॥ ६४ ॥ ज्याची त्यासी देवोनियां ॥ यश संपादावें राया ॥ परदारा हरण केलिया ॥ यशश्रियांचें हरण होय ॥ ६५ ॥ द्रौपदीचा धरितां अभिलाष ॥ क्षोभोनियां आदिपुरुष ॥ कौरवकुळ केलें निःशेष ॥ तें तुज श्रवण असे कीं ॥ ६६ ॥ सीताहरणें दशानन⁴ ॥ सकुळ पावला कीं मरण ॥ त्यासी द्यावया तिलांजलिदान ॥ एक बिभीषण उरला भक्तराज ॥ ६७ ॥ गौतमस्त्रियेचेनि⁵ संगें ॥ वासवाअंगीं⁶ पडलीं भगें ॥ चंद्र व्यापिलासे क्षयरोगें ॥ गुरुपत्नीसी⁷ भोगितां ॥ ६८ ॥ सुंदोपसुंद महाशूर ॥ स्त्रीसंगें पावले संहार ॥ दुर्गंधायोगें पराशर ॥ तपश्चर्येसी आंचवला ॥६९॥ विश्वामित्र महाऋषि ॥ तो अनुसरतां भोगूं उर्वशी ॥ शेवटीं होऊनि श्वान⁸ देहासीं ॥ गेला स्वर्गासी निर्लज्ज ॥ ७० ॥ स्त्रियांसंगें नाडले किती ॥ हें तुज सर्व ठाउकें भूपति ॥ जाणोनियां नरकगति ॥ कदाकाळीं न पडावें ॥ ७१ ॥ अमृत ह्मणोनि विषफळ ॥ खातां मरण होय तात्काळ ॥ तेवीं परांगनासंग केवळ ॥ आत्मघातक जाणावा ॥ ७२ ॥ आतां सद्विवेक धरूनि ॥ उत्तम बुद्धि आठवोनि ॥ सोडोन द्यावी ही मालिनी ॥ तेणें पुत्रपौत्रीं नांदसी ॥ ७३ ॥ ऐसिया शब्दरत्नमाला ॥ अमोल

१ श्रेष्ठ कन्या. २ परस्त्री. ३ सोनें. ४ रावण. ५ अहल्येच्या. ६ इंद्राच्या शरीरीं. ७ तारेला. ८ कुत्रा.

दिधल्या सैन्यपाळा ॥ परी नायकेचि तो मातला ॥ अहंकारेंकरूनियां ॥ ७४ ॥ जेवीं कनककमळांची माळा ॥ काय साजे खरगळां ॥ केशर कस्तूरीचा टिळा ॥ श्वानकपाळीं न साजे ॥ ७५ ॥ चंद्रकिरणांचें अमृत ॥ तेणें व्याळ न होय शांत ॥ जे किडे मृत्तिका भक्षित ॥ तयां साकर कासया ॥ ७६ ॥ कीं कंटकभक्षकासी ॥ अर्पिलिया रंभाफळांसी ॥ तेवीं सैन्यपाळनृपाळासी ॥ सचिववाक्यें नावडती ॥ ७७ ॥ उगवलिया अमृतकर ॥ झोंपडींत दडती तस्कर ॥ कीं राजनीति सांगतां रांडपोर ॥ तिरस्कार करिती ज्यापरी ॥ ७८ ॥ मग येरूं बोले निर्वाणवाणी ॥ माझी हो कां सर्वस्वें हानि ॥ किंवा पडेन नरकपतनीं ॥ परी ही मालिनी न सोडीं ॥ ७९ ॥ भानुकांतें मातें वधून ॥ बळें न्यावें कन्यारत्न ॥ कीं मी तयांतें मारून ॥ अंगनारत्न वरीन हें ॥ ८० ॥ ऐसा दुष्ट शब्द पडतां कानीं ॥ प्रधान कोपोन बोले वाणी ॥ ह्मणे जो मृत्यें अवंतिलां प्राणी ॥ तो थुंकोनि टाकी अमृत ॥ ८१ ॥ तुझा समीप मृत्युकाळ आला ॥ ह्मणोनि दुर्बुद्धीनें वास केला ॥ ऐसें बोलोनि निघाला ॥ प्रधान वेगें तेथोनि ॥ ८२ ॥ मग सैन्यपाळें नृपनंदिनी ॥ ध्वजस्तंभीं बांधिली मालिनी ॥ पापकर्माची विचित्र करणी ॥ न टळेचि हरिहरां ॥ ८३ ॥ द्रुपदरायाची दुहिता ॥ पांडवकेसरींची जी वनिता ॥ ती सभेमाजी तत्वतां ॥ विटंबिली कौरवीं ॥ ८४ ॥ जनकरायाजी नंदिनी ॥ रामचंद्राची जी कामिनी ॥ ती राक्षसें ठेविली अशोकवनीं ॥ केवढी करणी कर्माची ॥ ८५ ॥ ज्याचा धाक चराचरीं ॥ त्या रावणाची स्त्री मंदोदरी ॥ ती विटंबिली कीं वानरीं ॥ केवढी गति कर्माची ॥ ८६ ॥ मग प्रधानें सर्व वृत्तांत ॥ भानुकांतासी केला श्रुत ॥ तो होवोनियां क्रोधयुक्त ॥ सैन्यासह निघाला ॥ ८७ ॥ चित्रसेन बोले उत्तर ॥ त्याचें सैन्य अति दुर्धर ॥ नर राक्षस वानर ॥ आणि अंकित राजे सर्व त्याचे ॥ ८८ ॥ येरू ह्मणे तया न वानावें ॥ प्राणांत तयासीं झुंजावें ॥ मारावें कीं मरावें ॥ परी सोडवावें मालिनीसी ॥ ८९ ॥ ऐसें बोलोनि भानुकांत ॥ बाहेर निघाला त्वरित ॥ सैन्य चालिलें अद्भुत ॥ त्याचें झालें गणित तीन कोटी ॥ ९० ॥ रथावरी बैसला तो भूपति ॥ नाना वाद्यें हो वाजती ॥ छत्र ध्वज पताका शोभती ॥ आयुधें झळकती वीरांचीं ॥ ९१ ॥ जेवीं पतंग धांवे दीपावरी ॥ कीं मत्स्य धांवे बँडिशावरी ॥ तेवीं राजा सहपरिवारीं ॥ सैन्यपाळावरी धांवला ॥ ९२ ॥ देखोनि सैन्यपाळ उठावला ॥ कीं तो नदीपतीच लोटला ॥ अद्भुत संग्राम मांडला ॥ शस्त्रास्त्रेंकरूनियां ॥ ९३ ॥ पायदळावरी पायदळ ॥ तेणें युद्ध केलें हो तुंबळ ॥ तें देखोनि वानरदळ ॥ तयावरी उठावलें ॥ ९४ ॥ वानरवीर ते भांडती ॥ भुभुकारें गर्जना करिती ॥ पुढें जावोनि दांत विचकिती ॥ भेडसाविती वीरांतें ॥ ९५ ॥ वानर धांवती चहूंकडे ॥ वर्षती शिळा पर्वत कडे ॥ वीर पाडिले निधडे ॥ शिळावृक्षेंकरूनि ॥ ९६ ॥ वानरां शस्त्रक्षतें होती ॥ तों तों अधिक दुणावती ॥ निटावले वीर यूथपती ॥ मुखें गर्जती रामनाम ॥ ९७ ॥

१ केळयाला. २ चंद्र. ३ चोर. ४ सैन्यपाळ. ५ आमंत्रित. ६ कन्या. ७ मासे मारण्याच्या गळावर.

अपार सोडितां शर ॥ कदा नाटोपती वानर ॥ मोडला देखोनि दळभार ॥ भानुकांत उठावला ॥ ९८ ॥ दाटलीं वानरांचीं दळें ॥
त्यांमाजी राक्षस मिसळले ॥ एकचि घनचक्र मांडलें ॥ पळाले वीर भानुकांताचे ॥ ९९ ॥ वीर सर्वही भंगले ॥ उरले ते पळोनि
गेले ॥ ऐसें देखोनियां वहिलें[1] ॥ मारीत चालिला भानुकांत ॥ १०० ॥ धांवले तेव्हां अश्वस्वार ॥ आणि लोटले वानर ॥ तैसेचि
धांवले मत्त कुंजरें[2] ॥ रायावरी एकदांचि ॥ १ ॥ घ्या घ्या ह्मणोनि धांवती ॥ रथी रायावरी लोटती ॥ परी तो महावीर भानुकांत
नृपति ॥ करीत चालिला संहार ॥ २ ॥ रथी नेटका भानुकांत ॥ वानरांतें संहारित ॥ नाना शस्त्रें वर्षत ॥ सिंहनादें गर्जोनियां
॥ ३ ॥ वृक्ष शिळा पाषाण ॥ नृपावरी टाकिती वानरगण ॥ येरू सोडोनियां बाण ॥ करीत चूर्ण तयांचें ॥ ४ ॥ रक्ताचे वाहती
ओहोळ ॥ तेणें वाहे प्रेतमळ ॥ वीरांसी झाला हलकल्लोळ ॥ महाप्रळयकाळ मांडला ॥ ५ ॥ ऐसें युद्ध करितां नृपाळ ॥ पळोनि
गेलें कपिदळ[3] ॥ लंघिती गिरिकंदर ॥ आपुले प्राण घेवोनियां ॥ ६ ॥ हें सैन्यपाळासी झालें श्रुत ॥ तेणें दैत्य पाठविले बहुत ॥
तयांमागें विख्यात ॥ राक्षसदळ चालिलें ॥ ७ ॥ दैत्य राक्षस मिळोन ॥ युद्ध करिते झाले दारुण ॥ येरू वर्षतसे बाण ॥ बैलाहक[4]
जेवीं आकाशीं ॥ ८ ॥ वीरां झाली झोटधरणी ॥ अशुद्धें[5] न्हाणिली धरणी[6] ॥ दैत्यगण आणि राक्षसश्रेणी ॥ रणांगणीं लोळती
॥ ९ ॥ तों एक राक्षस धांविन्नला ॥ तेणें नृपाचा रथ उचलिला ॥ भोंवंडोनियां भिरकाविला ॥ मग गर्जिन्नला सिंहनादें ॥ ११० ॥
पक्व फळ पडतां भूमंडळा ॥ तेवीं नृप भूमीवरी आपटला ॥ घातें मूर्च्छना पावला ॥ निचेष्टित झाला तेणें पैं ॥ ११ ॥ राजा
पडतां मूर्च्छायमान ॥ मग उठावला तो प्रधान ॥ वर्षों लागला दिव्य बाण ॥ वीरें वीर पाडिले ॥ १२ ॥ तों सौबळ नामें राक्षस ॥
क्रोधें धांवला युद्धास ॥ तेणें प्रधान केला कासाविस ॥ वृक्षपाषाणशस्त्रास्त्रीं ॥ १३ ॥ कोपोनियां प्रधान ॥ सोडिला चंद्रमुख बाण ॥
तेणें राक्षसाचे पंचप्राण ॥ घेवोनि गेला आकाशीं ॥ १४ ॥ रणीं पडतांच सौबळ ॥ पळों लागलें राक्षसदळ ॥ तें जाणोनि सैन्य-
पाळें ॥ खगराक्षसा पाठविलें ॥ १५ ॥ सवें सैन्य तेतीस कोटी ॥ घेऊनि धांवला उठाउठी ॥ प्रळयकाळींचा मेघ गडाडी ॥ तैसा
गर्जे सिंहनादें ॥ १६ ॥ दोघांसी झाली झोटधरणी ॥ रक्तें न्हाणिली मेदिनी ॥ अपार वीरांच्या पडल्या श्रेणी ॥ नानाअस्त्रेंकरू-
नियां ॥ १७ ॥ राक्षसें सोडोनियां बाण ॥ क्षणमात्रें मारिला तो प्रधान ॥ तों भानुकांत सावधान ॥ होऊनि युद्धासी मिसळला
॥ १८ ॥ भानुकांत करी संधान ॥ रुद्रमंत्रें बाण मंत्रून ॥ त्याचें क्षणामाजी खंडन ॥ करी राक्षस खगनामा ॥ १९ ॥ जें जें संधान
करी भानुकांत ॥ तें तें राक्षस करी व्यर्थ ॥ जेवीं दरिद्र्याचे मनोरथ ॥ प्रारब्ध करी निष्फळ ॥ १२० ॥ मग खग राक्षस धांवला ॥
रथ रायाचा उचलिला ॥ फिरवोनि गगनीं भिरकाविला ॥ राव पाडिला मूर्च्छित ॥ २१ ॥ राव पडतांच मूर्च्छित ॥ देखोनि सैन्य

१ सत्वर, लगेच. २ हत्ती. ३ वानरसैन्य. ४ मेघ. ५ रक्तानें. ६ पृथ्वी.

पळालें त्वरित ॥ ऐसा केला निःपात ॥ भानुकांत रायाचा ॥ २२ ॥ दळेंसीं राक्षस धांवला ॥ नगरासी वेढा घातला ॥ सभोंवता अग्नि लाविला ॥ घाबिरे केले नगरलोक ॥ २३ ॥ हें सैन्यपाळातें कळलें ॥ तेणें भानुकांता सांगोन पाठविलें ॥ ह्मणे अद्यापि आपुलें ॥ काय असे मनोगत ॥ २४ ॥ कांहीं असेल अनुमान ॥ तरी करावें समरांगण ॥ नाहीं तरी मालिनी घेऊन ॥ जावयासी आज्ञा देइंजे ॥ २५ ॥ ऐसें ऐकतां दूतवचन ॥ रायास झालें दुर्मरण ॥ ह्मणे आतां व्यर्थ वांचून ॥ भूमिभार पैं झालों ॥ २६ ॥ माझें पोटींचें कन्यारत्न ॥ दुष्ट नेतसे कीं धरून ॥ न सोडवे तें मजलागून ॥ व्यर्थ जिणें माझें कीं ॥ २७ ॥ नृप झाला अधोवदन ॥ कन्यादुःखें करी रुदन ॥ दूताप्रति न बोले वचन ॥ परमदुःखेंकरूनियां ॥ २८ ॥ दूत न पुसतां गेला ॥ जावोनि वृत्तांत सांगितला ॥ संतोष झाला सैन्यपाळा ॥ मग हाकारिलें सैन्यासी ॥ २९ ॥ सकळ वीर एकवटले ॥ खगें राक्षस पाचारिले ॥ रायें तयां गौरविलें ॥ वस्त्रालंकारेंकरूनि ॥ १३० ॥ मग रथीं बैसोनि झडकरी ॥ पुढें घेवोनि नृपकुमारी ॥ नाना वाद्यांचे गजरीं ॥ स्वनगरा चालिला ॥ ३१ ॥ स्वानंदें मार्ग क्रमितां ॥ दुर्धर झालें अवचितां ॥ त्याचि मार्गें नृपनाथा ॥ आले श्यामकर्ण पार्थाचे ॥ ३२ ॥ एकामागें एक येती ॥ वस्त्राभरणीं जे शोभती ॥ दर्शनें हरिली चित्तवृत्ति ॥ सकळ सैन्याची तेधवां ॥ ३३ ॥ हे अश्व असतील रायाचे ॥ साधन असे अश्वमेधाचें ॥ काय कारण धरावयाचें ॥ पुरले आमुचे मनोरथ ॥ ३४ ॥ जरी हे श्यामकर्ण धरावे ॥ दारुण युद्ध लागेल करावें ॥ आह्मीं सर्वीं मरावें ॥ मग काय घ्यावें रायाचें ॥ ३५ ॥ जय होईल सैन्यपाळाचा ॥ आणि प्राण जाईल आमुचा ॥ वियोग होईल स्त्रीपुत्रांचा ॥ तें कासया करावें ॥ ३६ ॥ ऐसा करितां निश्चय ॥ तों तेथें पातला विधितनय[1] ॥ तयांसी बोले सविनय ॥ कां रे अश्व धराना ॥ ३७ ॥ मी सांगेन रायासी ॥ मग तो दंडील तुह्मांसी ॥ ऐसें भय सांगतां तयांसी ॥ अश्व धरिले दूतांनीं ॥ ३८ ॥ श्यामकर्ण धरूनि चालविले ॥ वेगें रायासी भेटविले ॥ मग रायें सर्वां पाचारिलें ॥ अश्व दावावयाकारणें ॥ ३९ ॥ आले नरपती कपिपती ॥ धांवोनि आले राक्षसपती ॥ सर्वही अश्व पाहाती ॥ परी मनीं भयभीत ॥ १४० ॥ देखोनि त्यांचें ठाणमाण[2] ॥ सर्व पावले समाधान ॥ ह्मणती धन्य तो चतुरानन ॥ ऐसीं अश्वरत्नें निर्मिलीं ॥ ४१ ॥ मागें पुढें फिरवोन ॥ राव पाहे आपण ॥ कुंकुमचंदनेंकरून ॥ वस्त्राभरणीं पूजिले ॥ ४२ ॥ तों भाळीं कनकपत्र देखिलें ॥ तें सोडोनियां वाचिलें ॥ सैन्यपाळासी कळलें ॥ कीं हे श्यामकर्ण धर्माचे ॥ ४३ ॥ धर्मराया घडला गोत्रवध ॥ ह्मणोनि मांडिला अश्वमेध ॥ यास्तव श्यामकर्ण अति शुद्ध ॥ धरा[3]प्रदक्षिणे सोडिले ॥ ४४ ॥ ज्या नृपासी असेल आंगवण[4] ॥ तेणेंचि धरावे हे श्यामकर्ण ॥ तयांतें सोडवितील कृष्णार्जुन ॥ धर्मयुद्ध करूनि ॥ ४५ ॥ नाहीं तरी करावया नमस्कार ॥ यथाशक्ति द्यावा करभार ॥ सर्वे घेऊनि दळभार ॥

॥ ३ ॥

१ नारद. २ सौंदर्य. ३ पृथ्वीप्रदक्षिणेसाठीं. ४ सामर्थ्य.

अश्वरक्षण करावें ॥ ४६ ॥ ऐसा पत्रार्थ जाणून ॥ सैन्यपाळ करी हास्यवदन ॥ ह्मणे गौरवूं कृष्णार्जुन ॥ धर्मयुद्ध करूनि ॥ ४७ ॥ मग मालिनी आणि श्यामकर्ण ॥ दोघां ठेविलें दृढ रक्षण ॥ आपण झाला सावधान ॥ युद्ध दारुण करावया ॥ ४८ ॥ सकळां आज्ञापी सैन्यपाळ ॥ सिद्ध करा रे सकळ दळ ॥ युद्ध करणें असे तुंबळ ॥ कृष्णार्जुनांसीं ये काळीं ॥ ४९ ॥ पुढें उभे ठाकले नरपती ॥ मागें लोटले वानरपती ॥ तयांमागें राक्षसपती ॥ निजदळेंसीं[1] सन्निध ॥ १५० ॥ जेहीं सेविला दाशरथि ॥ तेचि महावीर वानरपती ॥ दांत विचकोनि भेडसाविती ॥ रणांगणीं वीरांतें जे ॥ ५१ ॥ रामनामें देती भुभुक्कार ॥ तेणें नादावलें अंबर ॥ मुखें पसरोनियां समोर ॥ पांडवसैन्य लक्षिती ॥ ५२ ॥ पाषाण वृक्ष पर्वत ॥ खलीलेनें कपी झेलित ॥ पुच्छें उभारोनियां नाचत ॥ वांकुल्या दाविती सैन्यपाळा ॥ ५३ ॥ एक बळी एक महाबळी ॥ काळासी घेऊं पाहती हातोफळी ॥ ऐसी वीरांची मंडळी ॥ उभी ठाकली युद्धासी ॥ ५४ ॥ एक विनविती रायासी ॥ कां हो आह्मां पुढें न पाठविसी ॥ पार्थसैन्य भक्षावयासी ॥ आज्ञा मागती राक्षस ॥ ५५ ॥ भयंकर राक्षसदळ ॥ ऊर्ध्व केश लंब स्थूळ ॥ दाढा दिसती विक्राळ ॥ देखतां मरण पाविजे ॥ ५६ ॥ ऐसें सिद्ध झालें दळ ॥ तेणें व्यापिलें भूमंडळ ॥ कीं तें लोटलें सिंधुजळ ॥ प्रळयकाळींचें मज वाटे ॥ ५७ ॥ ऐसें घेवोनि सकळ दळ ॥ उभा ठाकला सैन्यपाळ ॥ ह्मणे केव्हां येईल देवकीबाळ ॥ घेवोनि पोर कुंतीचा ॥ ५८ ॥ आतां युद्ध करितील कृष्णार्जुन ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ तें रसाळ आहे आख्यान ॥ श्रवण करावें सादरें ॥ ५९ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ सैन्यपाळआख्यान अगाध ॥ चतुःसप्ततितमाध्याय गोड हा ॥ १६० ॥ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते सैन्यपाळाख्यानं नाम चतुःसप्ततितमोऽध्यायः ॥ ७४ ॥ ॥ अध्याय ॥ ७४ ॥ ॥ ओव्या ॥ १६० ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ७ ॥

---

१ आपल्या सैन्यासह.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे गा भारता ॥ सावध ऐकें पुढील कथा ॥ दूतमुखें ती अश्ववार्ता ॥ कळों आली पार्थातें ॥ १ ॥ ध्वजाग्रीं होता हनुमंत ॥ तेणें सांगितला वृत्तांत ॥ ह्मणे सैन्यपाळ वीर अद्भुत ॥ तेणें श्यामकर्ण धरियेले ॥ २ ॥ तुमच्या सैन्याचे दशगुण ॥ त्याचें सैन्य असे दारुण ॥ करील त्रिभुवनाचें भोजन ॥ ऐसी क्षुधा तयाची ॥ ३ ॥ हा अंगदाचा ज्येष्ठ कुमर ॥ श्रीरामभक्तीं अति तत्पर ॥ मुखीं सर्वदा जपे रघुवीर ॥ तेणें विजयी सर्वदा ॥ ४ ॥ तुमचे दळींचे नृपती ॥ ते तयाचे पासंगा न येती ॥ जों न देखिला दिनपति ॥ तोंवरीच खद्योतप्रतिष्ठा ॥ ५ ॥ त्याचे वीर बळें अद्भुत ॥ काळाचे पाडूं शकती दांत ॥ ज्यांचा लागतां मुष्टिघात ॥ पर्वत होती पिष्ट पैं ॥ ६ ॥ आतां श्यामकर्णांची प्राप्ति ॥ अलभ्य कीं सुभद्रापति ॥ जेथें न चले काळाची युक्ति ॥ तेथें नराचा कोण लेखा ॥ ७ ॥ नरपती वानरपती ॥ तैसेचि असुरांचे पती ॥ ज्याच्या सैन्यांत नांदती ॥ जे रगडूं शकती काळातें ॥ ८ ॥ आमुचे सैन्याचा कवळ ॥ करूं शके तो भूपाळ ॥ ऐशिया अनंत वीरेंशीं सैन्यपाळ ॥ उभा ठाकला युद्धासी ॥ ९ ॥ ऐसें हनुमंताचें वचन ॥ ऐकोनि विराले नृपगण ॥ ह्मणती न चुकेच कीं मरण ॥ या सैन्यपाळापासूनि ॥ १० ॥ सत्य कुटुंबासी अंतरलों ॥ काळवदनीं सांपडलों ॥ येथोनि जरी पुनः वांचलों ॥ तरी भाग्या पार नाहीं ॥ ११ ॥ तंव कपीस बोले यदुनंदन ॥ हें तूं काय बोलसी वचन ॥ जेणें वीरश्रीचें होय पलायन ॥ ऐसें वचन काय बोलसी ॥ १२ ॥ सकळां रणीं जिंकावया ॥ राजे मिळाले वायुतनया ॥ तयांचे पोटीं न घालीं भया ॥ कपिराया सुजाणा ॥ १३ ॥ हे तों बलाढ्य नृपनायक ॥ यांचा काळासी असे धाक ॥ यांपुढें सैन्यपाळ मशक ॥ तूं कां त्या वाणिशी कपीश्वरा ॥ १४ ॥ वीर मिळोनि सकळिक ॥ युद्ध करितील अलोलिक ॥ उभय दळांचें रणकौतुक ॥ आह्मीं तुह्मीं पाहावें ॥ १५ ॥ पार्थ ह्मणे मारुतीसी ॥ काय भय संचरलें तव मानसीं ॥ स्वल्प धनंजय तृणराशी ॥ करी दग्ध क्षणमात्रें ॥ १६ ॥ अति सूक्ष्म सूर्यकळा ॥ परी निवारित तैमाला ॥ नातरी अपार सागरजळा ॥ चूळ केलें कुंभोद्भवें ॥ १७ ॥ तेवीं तव कृपेंकरून ॥ मी निवटीन शत्रुकानन ॥ हें कौतुक श्रीनारायण ॥ पाहेल कीं निजनेत्रीं ॥ १८ ॥ मग नृपांसी बोले पार्थ ॥ तुमचा काय इत्यर्थ ॥ राजे ह्मणती क्षात्रपुरुषार्थ ॥ सर्वथा आह्मी न सोडूं ॥ १९ ॥ धैर्यसदन न पाडावें ॥ पुरुषार्थवन न तोडावें ॥ मारावें कीं मरावें ॥ परी न सोडावे श्यामकर्ण ॥ २० ॥ ऐसें नृप दृढ बोलती ॥ परी अंतरीं भय पावती ॥ जेवीं खळ सांगे धर्मनीति ॥ परी अंतरीं नसे कीं ॥ २१ ॥ तेवीं भ्यालेपणाचे दुर्गुण ॥ लपवोनि बोलती शौर्यगुण ॥ ते यथार्थ मानोनि सुभद्रारमण ॥ सिद्ध झाला युद्धासी ॥ २२ ॥ युद्ध करावया तुंबळ ॥ खवळलें बभ्रुवाहनाचें दळ ॥ तों आकाशाहूनि विरंचिबाळ ॥ तात्काळ तेथें पातला ॥ २३ ॥ दुरोनि देखतां नारदमुनि ॥ साष्टांगें वंदी चक्रपाणि ॥ तैसाचि वंदी गांडीवपाणि ॥ सकळां रायांसमवेत ॥ २४ ॥ मग

१ दसपट. २ सूर्य. ३ अग्नि. ४ अंधकाराला. ५ अगस्तीनें. ६ शत्रुरूपी अरण्याला. ७ नारद.

संतोषोनि विधितनय ॥ पार्थासी पुसे कलहंप्रिय ॥ सैन्यांत गजबज काय ॥ कवण निमित्त व्हावया ॥ २५ ॥ तयासी बोले पृथानंदन ॥ सैन्यपाळें धरिले श्यामकर्ण ॥ त्यासीं करणें युद्ध कठिण ॥ ह्मणोनि सर्व भयभीत ॥ २६ ॥ सैन्यपाळा जिंकावें ॥ आणि श्यामकर्ण सोडवावे ॥ धर्मालागीं भेटावें ॥ संपूर्ण करावें यज्ञकार्य ॥ २७ ॥ ऐसें ऐकोनियां पार्थवचन ॥ नारद झाला हास्यवदन ॥ हा तुमचा उद्योग निष्फळ पूर्ण ॥ येथें संदेह न धरावा ॥ २८ ॥ ज्यातें कांपे थरथरां काळ ॥ तो अतिवीर सैन्यपाळ ॥ तुमचे सैन्याचा कवळ ॥ करील ऐसा मज वाटे ॥ २९ ॥ युद्धासी आलिया त्रिभुवन ॥ तथापि नाटोपे जाण ॥ शेवटीं हा नारायण ॥ समरांगणीं पळेल ॥ ३० ॥ नर वानर असुर ॥ त्रिविध ज्याचा दळभार ॥ नेणों पसरला सागर ॥ तेथें थिल्लर हें सैन्य ॥ ३१ ॥ तयापासोनि अश्व प्राप्त ॥ जरी होतील निश्चित ॥ जेवीं मुक्ताफळ सागरांत ॥ अंध जावोनि आणील ॥ ३२ ॥ गिरी वेंघेल पांगुळ ॥ कीं मुका गुरूसी जिंकील ॥ हेंही घडेल एकवेळ ॥ परी सैन्यपाळ न जिंकवे ॥ ३३ ॥ तोंवरी काळाचें महिमान ॥ जों न देखिला त्रिनयन[2] ॥ तोंवरी मदनाचें थोरपण ॥ जों गंगात्मज[3] न देखिला ॥ ३४ ॥ तोंवरीच पार्थ सबळ ॥ जों न देखिला सैन्यपाळ ॥ तो देखतां गर्वजाळ ॥ गळोनि पडेल सर्वांचें ॥ ३५ ॥ त्याचा प्रतापदिनकर ॥ शोषील शत्रुपंकसागर ॥ कोपें हरील गर्वांधकार ॥ तेथें खद्योत[4] काय कथा ॥ ३६ ॥ नारद ह्मणे हृषीकेशी ॥ तुवां अश्वमेध उपदेशिला यासी ॥ सकळ रायां मारावयासी ॥ पार्थासहित रणांगणीं ॥ ३७ ॥ तरी गजपुरा[5] तुह्मीं जावें ॥ रायां स्वस्थळा पाठवावें ॥ निजसदनीं तुवां सुखें असावें ॥ कुटुंबेंसीं पुत्रपौत्रीं ॥ ३८ ॥ जरी मागों ह्मणाल श्यामकर्ण ॥ तो नेदीच धरितां अभिमान ॥ संकटीं पडिलेत येवोन ॥ याग सर्वथा घडेना ॥ ३९ ॥ पाहा आतांचि रोकडें ॥ भानुकांतासी केलें वेडें ॥ खिळखिळीं केलीं त्याचीं हाडें ॥ मालिनी नेली जिंकोनि ॥ ४० ॥ कृष्णा तुझेचि हे खेळ ॥ यांसी भेटविला सैन्यपाळ ॥ रायांसमवेत पार्थकवळ ॥ घेतां उशीर त्यास नाहीं ॥ ४१ ॥ ऐसें ऐकतां पार्थ कोपला ॥ ह्मणे काय वानितां त्या मशकाला ॥ मी कृष्णबळें तयाला ॥ क्षणमात्रें जिंकीन ॥ ४२ ॥ मग त्यासी ह्मणे मुनिपुंगव[1] ॥ कासया धरितोसी रे बळगर्व ॥ हस्तकंकणाचा भाव ॥ दर्पण कासया पाहावया ॥ ४३ ॥ मी भक्त ह्मणोनि गर्व धरिसी ॥ हें न सोसेचि देवासी ॥ जें स्थान झालें गर्वासी ॥ तेथोनि हृषीकेशी पळेल ॥ ४४ ॥ मी शिवभक्त ह्मणतां रावण ॥ गर्वें गेला त्याचा प्राण ॥ गर्व धरितां दुर्योधन ॥ सहपरिवारें निमाला ॥ ४५ ॥ मी मुख्य कृष्णराणी ॥ गर्व धरितां रुक्मिणी ॥ ती कृष्णें दुर्वाक्येंकरूनि ॥ निर्भर्त्सिली स्वजाया ॥ ४६ ॥ मुख्य यादवें गर्व केला ॥ त्याचा मस्तक उडाला ॥ मग तो हयग्रीव झाला ॥ हें तूं पार्था काय नेणसी ॥ ४७ ॥ मी वज्रदेही ह्मणोन ॥ अहंता धरी हनुमान ॥ लिंग उपटितां पुच्छ तुटोन ॥ आदळला तो भूमीसी ॥ ४८ ॥ सत्यभामेनें जाण ॥ मज दिधला कृष्ण दान ॥ त्या मज उपजतां अभिमान ॥ नारायणें हरियेला

१ नारद. २ शंकर. ३ भीष्म. ४ काजवा. ५ हस्तिनापुराला.

॥ ४९ ॥ याकरितां न करीं अभिमान ॥ पदोपदीं विवेक करून ॥ सर्वांघटीं भगवान ॥ भरोनियां उरलासे ॥ ५० ॥ जो तव सन्निध नारायण ॥ तोचि त्याचेही देहीं पूर्ण॥ देवासी सर्व भक्त समान ॥ प्राण्यासी नयन जेवीं दोनी ॥५१॥ ऐसी ऐकतां नारदवाणी ॥ हांसोनि[1] बोले गांडीवपाणि ॥ माझा सारथि चक्रपाणि ॥ उणें पडों नेदीच कांहीं ॥५२॥ याचे प्रसादें सकळ ॥ जिंकिलें म्यां भूमंडळ ॥ तैसाचि आतां सैन्यपाळ ॥ जिंकणें लागेल कृष्णकृपें ॥५३॥ ऐसें बोलोनि सिद्ध झाला ॥ वेगें रथावरी बैसला ॥ भूपां सांगता झाला ॥ न सोडावा निजधर्म[2] ॥५४॥ रथीं बैसतां धनुर्धर ॥ वृषकेतु बभ्रुवाहन वीर ॥ सकळ राजेही सत्वर ॥ युद्धाकारणें निघाले ॥ ५५ ॥ कृष्णाचिया आज्ञेंकरून ॥ पाचारिले[3] सेवकजन ॥ ह्मणे सैन्यपाळा या रे पुसोन ॥ माझें वचन त्वरित ॥५६॥ तूं रणखांबातें रोंविशी ॥ किंवा सळमिसळ युद्ध करिशी ॥ किंवा द्वंद्वयुद्धातें येसी ॥ ऐसें तया पुसावें ॥५७॥ जें सांगितलें अर्जुनें ॥ तैसेंचि कथिलें सेवकजनें ॥ त्याचें प्रत्युत्तर दिधलें तेणें ॥ ऐसें सांगा अर्जुनासी ॥५८॥ रणखांब नलगे रोंवणें ॥ सकळ मिसळले युद्धाकारणें ॥ माझे एक वीरासी जिंकणें ॥ सकळ मिळोनि एकदा ॥५९॥ मज तों युद्धासी नाहीं येणें ॥ जो येईल तया पुसणें ॥ अथवा द्वंद्वयुद्ध करणें ॥ तुह्मां मानेल तयापरी ॥ ६० ॥ आधीं जिंका नरवर ॥ मग ते उठती वानर ॥ त्यांचा होतां संहार ॥ मग असुर भांडती ॥६१॥ तेही निमालिया पाठी ॥ मग मज येणें घडेल किरीटी[4] ॥ मज जिंकिलिया शेवटीं ॥ मग श्यामकर्ण पावाल ॥६२॥ ऐसा हा तुमचा मनोरथ ॥ अलभ्य समजावा मनांत ॥ जरी क्लीबेंनंदिनीतें[5] वंध्यांसुत[6] ॥ वरोनि वाढवील कुटुंबा ॥ ६३ ॥ ऐसी सैन्यपाळाची मात ॥ पार्थासी बंदिजन सांगत ॥ ऐकतां क्रोधें संतप्त ॥ सर्व राव उठावले ॥६४॥ घाव निशाणीं दिधला ॥ दळभार तों लोटला ॥ मग सैन्यपाळें पाचारिला ॥ भौमासननामें बळी ॥६५॥ भौमासना ह्मणे सैन्यपाळ ॥ तुवां पार्थसैन्य मर्दावें सकळ ॥ जिवंत धरोनि गोपाळ ॥ पार्थासमवेत आणावा ॥ ६६ ॥ तयासी भूप बोलत ॥ तुमचें कुळ भानुकांत ॥ तेणें क्षुधानळ शांत ॥ करोनि सुखी असावें ॥६७॥ तों असुर पुढें विनविती ॥ आह्मां धाडावें जी तयाप्रति ॥ जठरानळाची शांति ॥ आह्मी करूं नरमांसें ॥६८॥ तों विनवीत बानरदळ ॥ आमुचा पेटला जी क्षुधानळ ॥ आह्मां द्यावें विभागफळ ॥ कृपा करूनि स्वामिया ॥६९॥ मग तयांसी बोले नृपनाथ ॥ तुमचा विभाग तो चंद्रकांत ॥ तेथें क्षुधानळ तृप्त ॥ करूनि सुखी असावें ॥७०॥ ऐशियापरी सैन्यपाळें ॥ असुर वानर समजाविले ॥ भौमासनातें पाठविलें ॥ दारुण युद्ध करावया ॥७१॥ नृपाज्ञा वंदोनि शिरीं ॥ भौमासन निघाला झडकरी ॥ नाना वाद्यांचे गजरीं ॥ सकळ अंबर[7] कोंदलें ॥ ७२ ॥ समदृष्टी झाली उभय दळा ॥ उत्तम माजला रणसोहळा ॥ तो सावध ऐकावा ये वेळां ॥ मुनि ह्मणे रायातें ॥ ७३ ॥ अपार सुटले बाण ॥ तेणें व्यापिलेंसे गगन ॥ शरीं आच्छादिला तर्पन[8] ॥ बाणें अंधार पडियेला ॥७४॥ वीरां झाली केशधरणी ॥ अशुद्धें[9] न्हाणिली धरणी ॥ पडती वीरशिरांच्या

१ अर्जुन. २ क्षात्रधर्म. ३ बोलाविले. ४ हे अर्जुना. ५ नपुंसकाच्या मुलीला. ६ वांझेचा पुत्र. ७ आकाश. ८ सूर्य. ९ रक्तानें.

श्रेणी ॥ कामांकुशें जेवीं पद्में ॥७५॥ पायदळ पदातींसीं ॥ अश्व धांवती अश्वांसीं ॥ कुंजर भिडती कुंजरांसीं ॥ रथी रथियां भिडती ॥ ७६ ॥ टाकिती शिळा वृक्ष पाषाण ॥ तेणें रथांचें होय चूर्ण ॥ खड्गें गजशुंडा छेदून ॥ भूमीवरी टाकिती ॥ ७७ ॥ शक्ति शूळ तोमर गदा ॥ टाकोनि दळाचा करिती चेंदा ॥ वीर पावले रणमदा ॥ देहभाना विसरले ॥७८॥ शिरें उडताती गगनीं ॥ रक्तें वाहती मेदिनीं ॥ अश्वगजांचीं आंतडीं ओढोनि ॥ नेती त्वरें गृध्रराज ॥७९॥ ऐसें महारण मांडलें ॥ परी पांडवदळ तें भंगलें ॥ ऐसें जाणोनि धांवणें केलें ॥ अनुशाल्वें तेधवां ॥ ८० ॥ अनुशाल्वें केलें संधान ॥ सोडिले लक्षावधि बाण ॥ तेणें व्यापिलेंसे गगन ॥ न दिसे भूतळ तेधवां ॥ ८१ ॥ अनुशाल्वें प्रताप दाविला ॥ तेणें भौमासन मानवला ॥ तयासी ह्मणे रे भला भला ॥ दाविलासी पुरुषार्थ ॥ ८२ ॥ मागें तुवां युद्ध केलें ॥ तेणें कृष्णातें तोषविलें ॥ तें येथें न चाले वहिलें ॥ कासया वृथा करिसी श्रम ॥ ८३ ॥ ऐसें बोलोनियां जाण ॥ दोघे युद्ध करिती दारुण ॥ जेवीं प्रळयकाळींचे घन ॥ वर्षाव करिती शैलाग्रीं ॥ ८४ ॥ युद्ध मांडलें दारुण ॥ दोघां वीरीं माजविलें रण ॥ मग भौमासनें निर्वाण ॥ बाण एक योजिला ॥ ८५ ॥ तो आकर्ण[3] ओढोनि सोडिला ॥ तो गगन व्यापिता झाला ॥ वारितां वारितां कंठनाळा ॥ येवोनि बैसला तयाचे ॥ ८६ ॥ कंठीं लागतां निर्वाण शर ॥ तेणें आकाशीं उडालें शिर ॥ तें देखोनियां प्रवीर ॥ तयावरी धांविन्नला ॥ ८७ ॥ बाण सोडिले असंख्यात ॥ वीर पाडिले जी बहुत ॥ दळालागीं संहारित ॥ तीक्ष्ण बाणेंकरोनि ॥८८॥ मारीत चालिला दळभार ॥ करीत हयांचा संहार ॥ कुंजर पाडिले अपार ॥ केले रथ मोकळे ॥ ८९ ॥ वीर प्रवीर अति समर्थ ॥ संग्राम करीत अद्भुत ॥ भौमासनाचा दिव्य रथ ॥ तिळप्रमाण तो केला ॥ ९० ॥ मग त्यातें बोले भौमासन ॥ आतां रक्षीं आपुला प्राण ॥ साहें साहें रे ह्मणोन ॥ बाण वर्षत तयावरी ॥ ९१ ॥ सोडोनियां दिव्य शर ॥ उडविलें प्रवीराचें शिर ॥ सकळ दळाचा संहार ॥ केला क्षण न लागतां ॥ ९२ ॥ तें देखोनि धांवला सुवेग ॥ तयाचा न साहवे वेग ॥ चतुरंग[4] दळाचा भंग ॥ करिता झाला तेधवां ॥ ९३ ॥ भौमासनासी बोलत ॥ भला केला रे पुरुषार्थ ॥ ह्मणोन बाण वर्षत ॥ मिती[5] नाहीं तयांतें ॥ ९४ ॥ दोघे वीर महाप्रसिद्ध ॥ निर्वाणींचें करिती युद्ध ॥ दोघे बळसिंधु अगाध ॥ येरयेरां नाटोपती ॥ ९५ ॥ नाना शक्ति गदा तोमर ॥ टाकोनियां करिती संहार ॥ ऐसें युद्ध केलें एक प्रहर ॥ मग बोलतसे भौमासन ॥ ९६ ॥ तुवां युद्ध केलें रे दारुण ॥ परी रक्षीं आपुला प्राण ॥ एकेचि बाणें घेईन जाण ॥ सावधान असावें ॥ ९७ ॥ मग निर्वाणींचा एक बाण ॥ सोडिला ओढोनियां आकर्ण ॥ तो केवळ प्रळयाग्निसमान ॥ गर्जत गगनीं[6] चालिला ॥ ९८ ॥ वारितां वारितां घोर ॥ वेगें संचरला तो शर ॥ सुवेग पडला सत्वर ॥ रथाखालीं तेधवां ॥ ९९ ॥ हें देखोनि क्रोधभरी ॥ हंसकेत धांवला सत्वरी ॥ तेणें सुवेग घालोनि रथावरी ॥ नेला आपले दळांत ॥ १०० ॥

१ पृथ्वीवर. २ पराजय पावलें. ३ कानापर्यंत. ४ हत्ती, स्वार, रथ आणि पायदळ यांनीं युक्त सैन्य. ५ गणना. ६ आकाशांत.

मग नीळध्वज वीर अद्भुत ॥ भौमासनातें पाचारित ॥ तीक्ष्ण बाण वेगें वर्षत ॥ अति कोपेंकरूनियां ॥ १ ॥ शर सोडोनि अनेक ॥ भंगिता झाला अरिकटक ॥ भौमासनातें प्रचंड हांक ॥ फोडोनियां पाचारिलें ॥ २ ॥ दोघे महाक्रोधें भिडती ॥ येरयेरां नाटोपती ॥ शक्ति तोमर गदा वर्षती ॥ दंतें चाविती अधरांतें ॥ ३ ॥ शस्त्रास्त्रानें मारिती ॥ दाविती नाना युद्धगती ॥ येरयेरांतें विंधिती ॥ तीक्ष्ण शस्त्रें सोडोनियां ॥ ४ ॥ ऐसें युद्ध घोरांदर ॥ राया झालें अर्ध प्रहर ॥ मग नीळध्वजासी उत्तर ॥ भौमासन बोलिला ॥ ५ ॥ आतां होईं रे सावधान ॥ बाणें घेईन तुझा प्राण ॥ कंठनाळातें लक्षोन ॥ अर्धचंद्र बाण सोडिला ॥ ६ ॥ नेणों काळाचें वदन ॥ ऐसा चालिला तो बाण ॥ देखतां झांकले नृपनयन ॥ वेगें हृदयीं आदळला ॥ ७ ॥ हृदयीं लागतां बाणघात ॥ राव रथाखालीं पडत ॥ वेगें धांवोनि हंसकेत ॥ घालोनि रथीं तो नेला ॥ ८ ॥ ऐसा तयाचा पुरुषार्थ ॥ देखोनि बभ्रुवाहन धांवत ॥ बाणजाळ हो वर्षत ॥ जेवीं प्रळयीं जळधारा ॥ ९ ॥ तेणें केला सिंहनाद ॥ तों वाघरव झाला मंद ॥ सोडोनियां शरवृंद ॥ वीर केला विव्हळ पैं ॥ ११० ॥ शरें गाजविलें आकाशा ॥ वीर पळती दश दिशा ॥ सैन्याची केली दुर्दशा ॥ धरिती तृणें अधरपुटीं ॥ ११ ॥ भौमासनास ह्मणे पार्थसुत ॥ तुवां दाविला रे पुरुषार्थ ॥ जों उदेला नसे दिननाथ ॥ तों खद्योत विराजे ॥ १२ ॥ ऐसें बोलोनि बाण सोडिला ॥ तेणें रथ त्याचा गगना नेला ॥ वेगें उतरतां भूमंडळा ॥ पुनः नेला आकाशीं ॥ १३ ॥ खालीं येतांच उडवित ॥ ऐसे फेरे झाले अष्टोत्तरशत ॥ जेवीं विसरतां भगवंत ॥ प्राणी फिरे जन्ममरणावर्ती ॥ १४ ॥ मग मनीं भियाला तो भौमासन ॥ हा वीर दिसतो काळासमान ॥ घेईल आतां माझा प्राण ॥ ऐसें मज वाटतें ॥ १५ ॥ ह्मणोनि अस्त्रविद्या संपूर्ण ॥ दाविता झाला भौमासन ॥ परी तो महावीर बभ्रुवाहन ॥ निष्फळ करीत तेधवां ॥ १६ ॥ जें जें वर्षे बाणजाळ ॥ तें तें वारीत सकळ ॥ ऐसें दारुण युद्ध तुंबळ ॥ झालें चारी घटिकातें ॥ १७ ॥ मग बोले बभ्रुवाहन ॥ रक्षीं रे भौमासना आपुला प्राण ॥ ह्मणोनि सोडिला निर्वाण बाण ॥ काळास्त्र वरी स्थापोनि ॥ १८ ॥ गर्जत चालिला तो शर ॥ व्यापिलें तेजें सकळ अंबर ॥ भौमासनाचें वेगें शिर ॥ उडविलें तेव्हां गगनोदरीं ॥ १९ ॥ ऐसा मारिला तो भौमासन ॥ सात कोटी मारिलें सैन्य ॥ उत्तम वीर जे धैर्यसंपन्न ॥ पळते झाले तेधवां ॥ १२० ॥ सैन्यपाळासी सत्वर ॥ जाणवला तो समाचार ॥ मग दुजा पाठविला महाघोर ॥ वृक नामा वीर तो ॥ २१ ॥ तो प्रतापी असे अद्भुत ॥ ह्मणे कोठें दावा रे पार्थसुत ॥ मी तयाचा करीन निःपात ॥ एक्या बाणेंकरूनियां ॥ २२ ॥ तों पार्थात्मजें ते वेळे ॥ चहूं शरें अश्वांतें मारिलें ॥ एकें ध्वजस्तंभातें छेदिलें ॥ धनुष्य तोडिलें हातींचें ॥ २३ ॥ झाला वृक क्रोधायमान ॥ बाणें उडविला बभ्रुवाहन ॥ आकाशींहूनि पडतां जाण ॥ वृक ताडिला मुष्टिघातें ॥ २४ ॥ लागतां त्याचा मुष्टिघात ॥ वृक पडिला मूर्च्छागत ॥ सर्वेचि होवोनि

---

१ शत्रूचें सैन्य. २ पराक्रम. ३ बाणजाळ. ४ जन्ममरणरूपी भोंवऱ्यांत. ५ बभ्रुवाहनानें.

सावचित्त ॥ बाण गुणीं[1] लाविला ॥ २५ ॥ बाप[2] योद्धा तो निःशंक ॥ तीक्ष्ण बाण सोडिला एक ॥ तेणें बभ्रुवाहनाचा मस्तक ॥ छेदोनि नेला आकाशीं ॥ २६ ॥ रणीं निमाला निजसुत ॥ ऐकोनि क्रोधावला पार्थ ॥ तें देखोनि मयूरकेत ॥ वेगें धांवे सपुत्रेंसीं ॥ २७ ॥ दोघे झाले दोहींकडे ॥ शर मारिती रोकडे ॥ पाडिती वीरांचे चौकडे ॥ बाणजाळें असंख्य ॥ २८ ॥ जेवीं विवेक आणि ज्ञान ॥ स्वार्थपरमार्थसाधन ॥ उभय लक्षूनि लिंगभेदन ॥ करिते झाले वृकातें ॥ २९ ॥ हा एकला ते दोघेजण ॥ युद्ध करिती अति दारुण ॥ परी वृक करीत खंडण ॥ निजबाणें तयांचें ॥ १३० ॥ बभ्रुवाहनाचे द्विगुण[3] ॥ युद्ध केलें तिहीं दारुण ॥ परी नाहीं झाला कंपायमान ॥ महावीर वृकराज ॥ ३१ ॥ मग वृकें बाण योजिला ॥ नृसिंहमंत्रें मंत्रिला ॥ आकर्ण[4] ओढोनि सोडिला ॥ तो लागला दोघांसी ॥ ३२ ॥ एकदांचि दोघे पडिले ॥ नेणों चंद्र सूर्य कोसळले ॥ ते हंसध्वजें रथावरी घातले ॥ वेगें नेले स्वसैन्यांत ॥ ३३ ॥ ऐसें देखतां वृककर्मा ॥ वेगें धांवला वीरवर्मा ॥ तयासवें कृतवर्मा ॥ येवोनियां युद्ध करी ॥ ३४ ॥ नाना अस्त्रांचे भार ॥ सोडिती दोघे महावीर ॥ तें देखोनि वृकवीर ॥ रगडीत चालिला तयांतें ॥ ३५ ॥ ते दोघे हा एकला ॥ परी नाटोपेचि तयांला ॥ जर्जर केलें उभयतांला ॥ महावीरें वृकें तेव्हां ॥ ३६ ॥ नाना युद्धें केलीं तेणें ॥ नाना अस्त्रांचीं जाणे विंदानें ॥ परी अदृष्टें घेतलें उणें ॥ तेणें कांहींच चालेना ॥ ३७ ॥ मग काळमंत्रें शक्ति मंत्रिली ॥ दोघांवरी ती घातली ॥ ती मध्येंच वीरवर्म्यानें खंडिली ॥ परी ती धांवली दोहींकडे ॥ ३८ ॥ येवोनि बैसली कंठनाळीं ॥ दोघे पडिले भूमंडळीं ॥ ऐसा वृक महाबळी ॥ देत आरोळी तेधवां ॥ ३९ ॥ दोघे पडतां रणपंजरीं ॥ हंसध्वज धांवला सत्वरी ॥ तयां दोघांसी घालोनि रथावरी ॥ वेगें नेले स्वदळांत ॥ १४० ॥ मग चंद्रहास आणि मदन ॥ यौवनाश्व आणि हंसकेतन ॥ सात्यकी आणि कामनंदन ॥ मकरध्वज पद्माक्ष ॥ ४१ ॥ ऐसे आठजण उठावले ॥ युद्धालागीं प्रवर्तले ॥ नाना विद्या जपों लागले ॥ अष्ट दिशा रोधोनि[5] ॥ ४२ ॥ बाण वर्षती अचाट ॥ अष्टवसु जेवीं सुभट ॥ परी एकाच बाणें पिष्ट ॥ वृक करीत सर्वांचें ॥ ४३ ॥ मग वृकें काढिले आठ बाण ॥ अष्टदिग्पाळमंत्रें मंत्रून ॥ एकदांचि सोडितां जाण ॥ आठांलाही ते खोंचले ॥ ४४ ॥ जिव्हारीं लागतां बाण ॥ निमाले[6] तेव्हां आठही जण ॥ बाप योद्धा अति प्रवीण ॥ महाकाळ वृकनामा ॥ ४५ ॥ आठांचाही झाला निःपात ॥ मग धांवला वीर पार्थ ॥ त्यापुढें धांवला वृषकेत ॥ आटोपित वृकातें ॥ ४६ ॥ महावीर तो वृक जाण ॥ त्यासी पाचारी कर्णनंदन[7] ॥ ह्मणे होईं रे सावधान ॥ युद्ध करीं मजसीं आतां ॥ ४७ ॥ आला देखोनि वृषकेत ॥ येरू पंच बाणें विंधित ॥ ते छेदोनि पाडिले आणि शत ॥ बाण सोडी कर्णात्मज ॥ ४८ ॥ वृषकेतें सोडोनि शर ॥ वृक विरथ केला सत्वर ॥ दुजे रथीं बैसतां तो वीर ॥ तोही रथ छेदिला ॥ ४९ ॥ ऐसे रथामागें रथ ॥ चूर्ण करीतसे वृषकेत ॥ त्या

१ धनुष्याच्या दोरीला. २ महान् समर्थ. ३ दुप्पट. ४ कानापर्यंत. ५ व्यापून. ६ मृत्यु पावले. ७ वृषकेतु.

रथांचें ऐक गणित ॥ अष्टोत्तर[1]शत जाहलें ॥ १५० ॥ वृषकेताचा पराक्रम देखोनि ॥ वृक वीर संतोषला मनीं ॥ ह्मणे युद्धलाघव दावितो मजलागूनि ॥ बाळवेष परी महावीर ॥ ५१ ॥ मग वृकें सोडोनि एक बाण ॥ धनुष्य उडविलें छेदोन ॥ वृषकेतें अन्य घेतां पूर्ण ॥ तेंही वृकें छेदिलें ॥ ५२ ॥ मग क्रोधावला कर्णसुत ॥ वृकाचें धनुष्य छेदित ॥ मग वृक बोले सावचित्त ॥ बाळचेष्टा काय दाविशी ॥ ५३ ॥ मग काळमंत्रें मंत्रून ॥ वृकें सोडिला निर्वाणबाण ॥ गर्जनें गाजवीतसे गगन ॥ तेजें दिनकर[2] लोपला ॥ ५४ ॥ बाण नावरेचि ते काळीं ॥ येवोनि बैसला हृदयकमळीं ॥ वृषकेत पडिला भूमंडळीं ॥ पंचप्राणांरहित ॥ ५५ ॥ रथोदयाचळीं[3] उगवोनि ॥ शरकिरणें[4] शत्रुअवनि[5] ॥ तापवोनि कर्णात्मजतरणि[6] ॥ गेला वाटे अस्तमाना ॥५६॥ वृषकेत पडिला रणीं ॥ ऐकतां कोपला गांडीवपाणि[7] ॥ मग देवदत्त वाजवोनि ॥ वेगें वृक पाचारिला ॥ ५७ ॥ करीत चालिला बाणवृष्टि ॥ तेणें व्याप्त केली सृष्टी ॥ शत्रुदळाचिया कोटी ॥ गतप्राण त्या केल्या ॥ ५८ ॥ बाण योजणें सोडणें ॥ केव्हां करितो लाघवपणें ॥ हें न कळेचि वृकाकारणें ॥ ह्मणे धन्य वीर हा किरीटी ॥ ५९ ॥ मग वृक ह्मणे धन्य पार्था ॥ परी तूं फिरें मागें आतां ॥ व्यर्थ श्रम न करावा बहुता ॥ आणि आपुल्या श्रमा दवडूं नको ॥ १६० ॥ तुवां युद्धें केलीं अनंत ॥ वीर मारिले असंख्यात ॥ तें न चाले कीं येथें मत ॥ व्यर्थ श्रम पावसी ॥ ६१ ॥ मग पार्थ बोले तयातें ॥ तुवां मारिलें माझ्या वीरांतें ॥ परी रक्षीं आतां आपुल्या प्राणांतें ॥ वल्गना कासया करितोसी ॥६२॥ दारुण अर्जुनाचा मार ॥ वृकसैन्य पळों लागलें समग्र ॥ परी तो वृक दुर्निवार ॥ पार्थासी रणीं भिडतसे ॥ ६३ ॥ तों दहनास्त्र[8] सोडिलें अर्जुनें ॥ सकळ सैन्य जळों लागलें तेणें ॥ छत्रध्वजादि व्यजनें ॥ जळोनियां भस्म होती ॥ ६४ ॥ जळती नर आणि वानर ॥ भस्म होती अश्व कुंजर ॥ जिकडे तिकडे वैश्वानर[9] ॥ वृकसैन्यांत जाहला ॥ ६५ ॥ ऐसें देखोनियां वृक ॥ वरुणास्त्र सोडी निःशंक ॥ गगनाहून बलाहक[10] ॥ करी वृष्टि तेधवां ॥ ६६ ॥ क्षणमात्रें अग्नि विझविला ॥ पार्थें सोडिलें पवनास्त्राला ॥ येरें योजिलें पर्वतास्त्राला ॥ तों वज्रास्त्र पार्थें घातलें ॥ ६७ ॥ वृक पार्थासी बोले बोल ॥ तुजमधीं जें जें असेल कौशल ॥ तें तें मज दावीं रे सकळ ॥ शेवटीं मारीन तुजलागीं ॥ ६८ ॥ वानर राक्षसांतें ह्मणती उठा ॥ अर्जुन सांपडलासे एकटा ॥ रोधोनि तयाच्या सकळ वाटा ॥ मारावें आजी तयासी ॥ ६९ ॥ मग तयांसी बोलिलें सैन्यपाळें ॥ तुह्मी निश्चळमनें असा वहिलें ॥ तुमचीं येतील जेव्हां कुळें ॥ तेव्हांचि तुह्मीं उठावें ॥१७०॥ असो अनिवार तो अर्जुन ॥ बाणें व्यापिलें त्रिभुवन ॥ दाहा कोटी वीर महाप्रवीण ॥ निधडे मारिले वृकाचे ॥७१॥ सकोप पार्थवीर गाढा ॥ बाण सोडिला हो कुऱ्हाडा ॥ तेणें रथ उडवोनियां पुढां ॥ वृकाचा टाकिला क्रोश चारी ॥ ७२ ॥ सवेंचि वृक आला समरांगणा ॥ शरें विंधितसे अर्जुना ॥ अर्जुनें सावधानें ते क्षणां ॥ चाक्षुषी विद्या जपिन्नली

---

१ एकशें आठ. २ सूर्य. ३ रथरूपी उदयपर्वतावर. ४ बाणरूपी किरणांनीं ५ शत्रुरूपी भूमि. ६ वृषकेतरूपी सूर्य. ७ अर्जुन. ८ अग्न्यस्त्र. ९ अग्नि. १० मेघ.

॥ ७३ ॥ तो अकस्मात सोडिला बाण ॥ चहूंकडोनि येती मार्गण ॥ अष्टदिशांहून येती पूर्ण ॥ अध ऊर्ध्व पसरती ॥ ७४ ॥ तो अनर्थ देखोनि वृकें ॥ बाण सोडिला कौतुकें ॥ चाक्षुषी विद्या अतितवकें ॥ पराक्रमें शमविली ॥ ७५ ॥ मग पार्थासी बोले वृक आपण ॥ आतां वांचवी आपुला प्राण ॥ ह्मणोनि काढिला शक्तिबाण ॥ मंत्रोनि गुणीं लाविला ॥ ७६ ॥ रामनामाचा उच्चार ॥ करूनि सोडिला तो शर ॥ तेजें प्रकाशिलें अंबर ॥ दशदिशा उजळल्या ॥७७॥ तो शर पार्थें देखिला ॥ मध्येंचि छेदोनि पाडिला॥ अर्ध येवोनि आदळला ॥ हृदयावरी पार्थाचे ॥ ७८ ॥ तेणें मूर्च्छा पावोनि ॥ अर्जुन पडिला ते क्षणीं॥ पळों लागली पार्थवाहिनी ॥ हाहाकार जाहला ॥ ७९ ॥ मग वृक तेथोनि परतला ॥ स्वस्थळासी पातला ॥ इकडे कृष्णें उठविला ॥ दळभार सर्वही निजकृपेनें ॥ १८० ॥ मग कृष्णें पार्थ उठविला ॥ कृपादृष्टीनें उभा केला ॥ तंव तो परम आवेशला ॥ पहिल्याहूनि दशगुणें ॥ ८१ ॥ मग वृकें पाठविला दूत ॥ जावोनि आणा रे वृत्तांत ॥ मेला किंवा आहे जिवंत ॥ जावोनियां पाहा रे ॥ ८२ ॥ दूत येवोनि पाहाती ॥ तों सजीव सर्वही नरपती ॥ स्वानंदेंसीं सुभद्रापति ॥ युद्धवार्ता करीतसे ॥ ८३ ॥ हें पाहूनि चालिले दूत ॥ मग तयांसी बोले अनंत ॥ वृकासी सांगावी मात ॥ सकळ सैन्य उठविलें ॥ ८४ ॥ आतां झाला असे अस्तमान ॥ उदयीक उगवतांचि तपन ॥ युद्ध करावया अति दारुण ॥ यावें तुवां सकळ सैन्येंसीं ॥ ८५ ॥ वेगें जाऊनियां ते दूत ॥ निवेदिती सकळ वृत्तांत ॥ ऐकतां वृक झाला भय-भीत ॥ ह्मणे अघटित झालें हें ॥ ८६ ॥ सकळ वीर मारिले परम कष्टें ॥ ते उठविले वैकुंठपीठें ॥ आतां आह्मीं पळावें कोठें ॥ त्या श्रीकृष्णभयेंकरूनि ॥ ८७ ॥ चंद्रकांत आणि भानुकांत ॥ तेही येतील पार्थसैन्यांत ॥ तो पुढिले अध्यायीं इत्यर्थ ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ८८ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ सैन्यपाळआख्यान अगाध ॥ पंचसप्ततितमोध्याय गोड हा ॥ १८९ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते सैन्यपाळाख्यानं नाम पंचसप्ततितमोऽध्यायः ॥ ७५ ॥ अध्याय ॥ ७५ ॥ ओव्या ॥ ॥ १८९ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ रायासी ह्मणे जैमिनि ॥ अस्तमाना गेला दिनमणि[1] ॥ कैसी कथा वर्तली तेथोनि ॥ तीचि सादर[2] परिसिजे ॥ १ ॥ ऐकोनियां दूतवचनासी ॥ वृक चालिला स्वशिबिरासी ॥ तेव्हांचि राया सैन्यपाळासी ॥ वेगें जावोनि भेटला ॥ २ ॥ मनीं धरूनि दूतवचनासी ॥ आदरें सांगे रायापासीं ॥ ह्मणे सावध होवोनि मानसीं ॥ कृष्णवचनासी ऐकावें ॥ ३ ॥ ह्मणे सैन्यपाळा सांगावें ॥ प्रातःकाळीं रणासी यावें ॥ नाहीं तरी प्राणांतें वांचवावें ॥ श्यामकर्ण देवोनियां ॥ ४ ॥ तुवां केलें परदाराहरण ॥ तें तुज घडलें लांछन ॥ घेईन रे तुझा प्राण ॥ सकळ दळासहित पैं ॥ ५ ॥ जे कष्टें मारिले वीरगण ॥ ते कृष्णें सकळ केले सप्राण ॥ ते येवोनि आतां समरांगण ॥ करितील कैसें करावें जी ॥ ६ ॥ मग नृप तयासी झाला बोलता ॥ तुह्मीं न करावी चिंता ॥ मी जातों युद्धासी आतां ॥ कृष्णपार्थांसी जिंकावया ॥ ७ ॥ युद्धीं दावीन रे ख्याति ॥ जी[3]तेंचि धरीन तो श्रीपति ॥ मग काय तो सुभद्रापति ॥ अनायासेंच मरेल ॥ ८ ॥ तुह्मीं जावें शिबिराप्रति ॥ प्रभातीं उगवलिया गभस्ति ॥ घेवोनियां सेनासंपत्ति ॥ मग रणासी पैं जाईन ॥ ९ ॥ ऐकोनियां नृपवाक्यासी ॥ सर्वही गेले स्वस्थळासी ॥ संपादोनि भोजनासी ॥ मग सुखें निद्रा करिते झाले ॥ १० ॥ वानर आणि असुरगण[4] ॥ परस्परें करिती संभाषण ॥ पांडवसैन्याभोंवतें संरक्षण ॥ आजिचे रात्रीं ठेवावें ॥ ११ ॥ कोणी साह्य येतील यांसी ॥ किंवा ते पळोन जातील स्वनगरासी ॥ ह्मणोनि सभोंवतें त्यांसी ॥ बरवें रक्षण ठेवावें ॥ १२ ॥ तें मानलें उभयतांचे मना ॥ सभोंवतें ठेविती संरक्षणा ॥ मग पांडवसैन्यामाजी कथना ॥ काय झालें तें एका ॥ १३ ॥ राजे पुसोनि श्रीकृष्णासी ॥ गेले आपुलाले शिबिरासी[5] ॥ सारोनियां भोजनासी ॥ सुखशयनीं पहुडले ॥ १४ ॥ झाले युद्धीं श्रमातुर ॥ ठायीं ठायीं निजले वीर ॥ तों रात्र झाली एक प्रहर ॥ तंव काय अपूर्व वर्तलें ॥ १५ ॥ चंद्रकांत आणि भानुकांत ॥ सैन्य घेवोनियां अद्भुत ॥ साह्य करावया निश्चित ॥ पांडवसैन्यासन्निध पातले ॥ १६ ॥ तंव त्या रक्षणाइतीं हटकिलें ॥ तुह्मी कोणाचे कोण वहिले ॥ येरू तयांतें बोलते झाले ॥ तुह्मी कोण तें सांगा आह्मां ॥ १७ ॥ येरू ह्मणती आह्मी पांडवांचे ॥ रक्षणार्थ ठेविले साचे ॥ ये प्रहररात्रीं येथें तुमचें ॥ काय प्रयोजन तें सांगा ॥ १८ ॥ येरू ह्मणती ऐका मात ॥ आह्मी चंद्रकांत आणि भानुकांत ॥ साह्य करावया श्रीकृष्णपार्थ ॥ ह्मणोनि आलों या ठायां ॥ १९ ॥ चंद्रसेनाची कांता रत्न ॥ सैन्यपाळें नेली धरून ॥ ह्मणोनि प्रहररात्रीं गमन ॥ आमुचें झालें या ठायां ॥ २० ॥ तें दूतें कृष्णार्जुनांसी श्रुत केलें ॥ तिहीं तयांतें पाचारिलें ॥ मग ते सैन्यामाजी प्रवेशले ॥ भेटते झाले कृष्णार्जुनां ॥ २१ ॥ केलें उभयतांसी वंदन ॥ दिधलें प्रीतीनें आलिंगन ॥ मग आरंभिलें स्तवन ॥ दोघांनीं कर जोडोनियां ॥ २२ ॥ जयजयाजी रमानायका ॥ जयजयाजी भक्तपाळका ॥ सकल दुष्टजनसंहारका ॥ शरण आलों तुज भावें[6] ॥ २३ ॥ आमुची

---

१ सूर्य. २ लक्षपूर्वक. ३ जीवंत. ४ दैत्यसमूह. ५ छावणीमध्यें. ६ एकनिष्ठेनें.

कन्या मालिनी ॥ सैन्यपाळें नेली हरूनि ॥ जिंकोनि मातें समरांगणीं ॥ सर्व नगर विध्वंसिलें ॥ २४ ॥ ह्मणोनि तुह्मां आलों शरण ॥ सोडवावें जी कन्यारत्न ॥ करावें दुष्टाचें हनन ॥ भक्तरक्षण करावें ॥ २५ ॥ ऐकोनियां ऐसें स्तवन ॥ देव पावला समाधान ॥ तयांसी बोले अभयवचन ॥ कांहीं चिंता न करावी ॥ २६ ॥ तुह्मीं आह्मी मिळोन ॥ उदयीक करूं युद्ध दारुण ॥ सैन्यपाळातें मारून ॥ मालिनीतें सोडवूं ॥ २७ ॥ याविषयीं संदेह न धरावा ॥ विश्रांति घ्यावी स्वस्थ जीवा ॥ सेनानिवेशें[2] करावा ॥ आमुचे कटकासमीप ॥ २८ ॥ घेऊनि कृष्णाचें अभयवचन ॥ दोघे चालिले तेथून ॥ सेनेसमीप निवांतस्थान पाहून ॥ विनकें[3] दिधले आपुलाले ॥ २९ ॥ श्रम झाले मार्गे चालतां ॥ ह्मणोनि निजले स्वस्थचित्ता ॥ तों इकडे काय वर्तली कथा ॥ ती नृपनाथा श्रवण कीजे ॥ ३० ॥ धांवत गेले रक्षणाइत दूत ॥ तेहीं सैन्यापाळा जाणविली मात ॥ शरण आला भानुकांत चंद्रकांत ॥ आतांचि आले पांडवदळीं ॥ ३१ ॥ तुमचा भाग्योदय झाला ॥ सजामात भानुकांत आला ॥ धणी[4] बरवी सकळांला ॥ त्यांचे मांसाची होईल ॥ ३२ ॥ ऐसा ऐकतांचि समाचार ॥ आनंदला दैत्यभार ॥ तेथोनि चालिले सत्वर ॥ त्यांचा संहार करावया ॥ ३३ ॥ एक नागवेच नाचती ॥ एक तडातडां उडती ॥ आह्मांसी भक्ष्य आलें ह्मणती ॥ एक लोळती भूमीसी ॥ ३४ ॥ ह्मणती आमुचीं आलीं कुळें ॥ ह्मणोनि मुख पसरिलें ॥ एक ह्मणती गिळों सगळे ॥ कासया युद्ध पाहिजे ॥ ३५ ॥ एक शंख वाजविती ॥ एक आरोळ्या फोडिती ॥ एक दांत विचकिती ॥ ह्मणती खाऊं कडकडां ॥ ३६ ॥ राक्षस रायातें बोलत ॥ आमुचें कुळ तें भानुकांत ॥ आलें असे पार्थसैन्यांत ॥ ह्मणोनि तुह्मांसी सांगतों ॥ ३७ ॥ कपी रायातें विनवित ॥ आमुचें कुळ तें चंद्रकांत ॥ आलासे पुत्रासमवेत ॥ पांडवसैन्यामाझारी ॥ ३८ ॥ ऐकोनियां ऐशा बोला ॥ सैन्यपाळ हांसिन्नला ॥ मग तयांसी निरोप दिधला ॥ तंव ते चालिले शीघ्रत्वें ॥ ३९ ॥ तिहीं सैन्यांत पाठविले दूत ॥ पार्थालागीं सांगती मात ॥ चंद्रकांत आणि भानुकांत ॥ आमुचीं कुळें द्यावीं ॥ ४० ॥ त्या दोघांसी निवडावें ॥ आपुलें सैन्य बाहेर घालावें ॥ मग जें होणार त्यांचे दैवें ॥ तें सुखरूप होऊ कां ॥ ४१ ॥ नाहीं तरी तुमचें दळ ॥ नाश पावेल जी सकळ ॥ तें तुह्मांसी सांगतों प्रांजळ ॥ राग येऊं न द्यावा ॥ ४२ ॥ परानिमित्ता आपुला नाश ॥ योग्य नव्हे करणें तुह्मांस ॥ ह्मणोनि निवडा त्या दोघांस ॥ तरीच कल्याण तुह्मांसी ॥ ४३ ॥ ऐकोनि पार्थ बोले त्यांसी ॥ जें करणें असेल तुह्मांसी ॥ तें करावें परी सर्वथा या दोघांसी ॥ नेदूं आह्मांसी शरण आले ॥ ४४ ॥ जो आपलियास आला शरण ॥ त्याचें न करितां संरक्षण ॥ तरी पूर्वजां होय पतन ॥ नरकामाजी कल्पवरी[5] ॥ ४५ ॥ ऐसें ऐकोनि पार्थवचन ॥ दूत चालिले ते फिरोन ॥ सांगते झाले सर्व कथन ॥ राक्षसकपींसी तेधवां ॥ ४६ ॥ ऐकतां कपिराक्षस कोपले ॥ नेणों प्रळयाग्नीच

---

१ संशय. २ सैन्याचा तळ. ३ तंबू. ४ तृप्ति. ५ सौरमानाचीं ४३२०००००० वर्षें.

पेटले ॥ शिळा वृक्ष पाषाण गोळे ॥ वर्षते झाले सेनेवरी ॥ ४७ ॥ घ्या घ्या ह्मणोनि धांवती ॥ चहूंकडोनि सैन्य वेष्टिती ॥ शिबिरासी अग्नि लाविती ॥ प्रळय करिती तेधवां ॥ ४८ ॥ एकास आकाशा नेती ॥ एकातें भूमी आदळिती ॥ एका राक्षस गिळिती ॥ ऐसा प्रळय मांडिला ॥ ४९ ॥ पांडवसैन्य तें समस्त ॥ श्रमें होतें निद्राभूत ॥ आकांत देखोनि जागृत ॥ होऊनि दीपिका लाविल्या ॥ ५० ॥ चहूंकडे लाविल्या चंद्रज्योती ॥ तों वानर राक्षस येवोनि मारिती ॥ दीपिका विझविल्या सत्वरगती ॥ क्षण एक न लागतां ॥ ५१ ॥ घाबिरे वीर सकळ ॥ कुंजर सुटोनि काढिती पळ ॥ अश्व होवोनि उतावेळ ॥ पळताती चहूंकडे ॥ ५२ ॥ राक्षस टाकिती पाषाण बाण ॥ वानर टाकिती वृक्षपाषाण ॥ तेणें कित्येक सैन्य झालें चूर्ण ॥ त्या घायेंकरोनियां ॥ ५३ ॥ राक्षसांचे येती बाण ॥ वानर भिरकाविती पाषाण ॥ तेथें घर्षणें निघाला अग्न ॥ तो कटकांमाजी प्रवेशला ॥ ५४ ॥ तोचि अग्नि धांविन्नला ॥ शिबिरें मंडप जाळूं लागला ॥ भस्म झाल्या रथशाळा ॥ छत्रध्वजपताकादि ॥ ५५ ॥ जे भयें बाहेर पळाले ॥ ते राक्षसीं धरून नेले ॥ एक कुंजरांखालीं दडपले ॥ एक निमाले अश्वलत्तेनें ॥ ५६ ॥ एक निमाले पाषाणघायीं ॥ एक जळाले निजले ठायीं ॥ एक ओढीत नेती पायीं ॥ बाहेर नेवोनि भक्षिती ॥ ५७ ॥ अश्व गज रथांच्या थाटी ॥ बळें पळतां होय दाटी ॥ त्या रथचक्रांचे तळवटीं ॥ कित्येक वीर निमाले ॥ ५८ ॥ एक घाबिरे उठिले ॥ अश्वारूढ पळते झाले ॥ परी लगाम घालूं विसरले ॥ ते ढळोनि पडिले अग्नीमाजी ॥ ५९ ॥ एक उपलाणी बैसले ॥ पायबंद सोडूं विसरले ॥ तेणें गुंतोनि खालीं पडिले ॥ पायबंद बसती पाठीवरी ॥६०॥ जिकडे जिकडे धांवती ॥ तिकडे तिकडे अग्नि देखती ॥ आप आपणां नोळखती ॥ निजसुरें घाबिरे ते ॥ ६१ ॥ एक रथाखालीं मेले ॥ एक कुंजरपदातळीं दडपले ॥ आप आपणांस मारों लागले ॥ ऐसे कित्येक गेले यमलोका ॥ ६२ ॥ एक ह्मणती आह्मी चंद्रकांताचे ॥ एक ह्मणती भानुकांताचे ॥ एक ह्मणती पांडवांचे ॥ आह्मां कैसें नोळखा ॥६३॥ ऐसें त्या रात्रीच्या ठायीं ॥ पांडवदळ आदळलें पाहीं ॥ वृक्षपाषाणांचे घायीं ॥ सर्व वीर निमाले ॥ ६४॥ ही तों अवघी कृष्णलीला ॥ हें न कळेचि कवणाला ॥ राक्षसकपिरूपें खेळे खेळा ॥ पाहावया पार्थधैर्य ॥ ६५ ॥ पार्थ ह्मणे श्रीकृष्णासी ॥ आह्मीं ठेविलें या दोघांसी ॥ ह्मणोनि प्राप्त झाली ही विवसी ॥ पाहा सैन्य आटिलें ॥ ६६ ॥ राक्षसवानरीं मिळोन ॥ केलें सैन्याचें कंदन ॥ जळो यांचा पायगुण ॥ आह्मांकारणें भोंवला ॥ ६७ ॥ आतां कैसें जी करावें ॥ सैन्य तें केवीं रक्षावें ॥ ऐसें ऐकतां यदुपुंगवें ॥ विस्मित केलें मुखांबुज ॥ ६८ ॥ आहा रे गांडीवपाँणि ॥ ही अमंगळ काय वदसी वाणी ॥ जी ऐकतां दुरितश्रेणी ॥ घडती अपार पुरुषासी ॥६९॥ जे शत्रुभयें भियाले ॥ पाठीसी येऊन निघाले ॥ ते त्यागितां नव्हे भलें ॥ लोक हांसतील तुह्मांतें ॥ ७० ॥ कां रे आटली तव धैर्यसरिता ॥ कां रे स्वधर्म

१ हत्ती. २ सैन्यामध्यें. ३ मृत्यू पावले. ४ नाश. ५ श्रीकृष्णानें. ६ मुखकमल. ७ अर्जुना. ८ पापांचा समुदाय.

सोडिला पार्था ॥ काय बोलसी भयवार्ता ॥ क्षात्रधर्म सांडोनि ॥ ७१ ॥ कृतघ्न आणि विश्वासघाती ॥ जे शरणागतां उपेक्षिती ॥ तयां तिघांचे भारें क्षिती[1] ॥ बुडेल ऐसें शास्त्र वदे ॥ ७२ ॥ जे शरणागता उपेक्षिती ॥ ते कल्पपर्यंत रौरव भोगिती ॥ तेथोनि निघतां निश्चितीं ॥ कृमी होती विष्ठेंत ॥ ७३ ॥ एवढ्या पापांचिया राशी ॥ कैशा पार्था शिरीं घेसी ॥ मी कृष्ण असतां पाठीसी ॥ सर्व संकटीं रक्षिता ॥ ७४ ॥ मी संगें असतां सोडिसी धैर्य ॥ मजमागें करसील काय ॥ येणें तुज न मानितील आर्य ॥ ऐसें कदा न वदावें ॥ ७५ ॥ बरा धैर्यवंत कळलासी ॥ बरा शरणागता रक्षिसी ॥ उपटोनियां सुकृततरूसी[2] ॥ पापबीज पेरिसी हें ॥ ७६ ॥ ऐसें ऐकतां कृष्णवचन ॥ पार्थ झाला लज्जायमान ॥ ह्मणे देवा तुजविण संरक्षण ॥ कोण कर्ता मजलागीं ॥ ७७ ॥ ऐसें बोलोनि नमन ॥ पार्थें केलें देवाकारण ॥ कृष्ण ह्मणे कोप न धरून ॥ स्वस्थ असावें पार्थवीरा ॥ ७८ ॥ आतां झालें जें कांहीं ॥ यासी उपाय नसे पाहीं ॥ प्रातःकाळ झालियावरी पाहीं ॥ जिवंत धरणें सैन्यपाळ ॥ ७९ ॥ आतां जें विघ्न उदेलें ॥ तें उपायें पाहिजे निरसिलें ॥ यासी साह्य करितां भलें ॥ निजसामर्थ्यें रक्षावें ॥ ८० ॥ मग कृष्ण ह्मणे कपिकेसरी[3] ॥ तुवां साह्य व्हावें सत्वरी ॥ हें अरिष्ट निवारीं ॥ आह्मां सर्वां वांचवीं ॥ ८१ ॥ हनुमंत ह्मणे जगज्जीवना ॥ अमृत भीतसे कीं मरणा ॥ कीं शीतकर ह्मणे मज विंझणा ॥ घालोनि शीतळ करावें ॥ ८२ ॥ झाली अंधकाराची वस्ति ॥ तेणें भीतसे कीं गभस्ति[4] ॥ कीं आनंद ह्मणे मी दुःखावर्तीं ॥ पडिलों मज कोणी काढा ॥ ८३ ॥ तेवीं सकळांचें तूं मूळ ॥ कां बोलसी दुःखें व्याकुळ ॥ हें मृत्युग्रस्त सैन्य सकळ ॥ कोणा शरण जाईल ॥ ८४ ॥ तथापि सोंग संपादिसी ॥ मज रंकासी गौरव देसी ॥ पावोनि तव कृपा-प्रसादासी ॥ सौख्य सकळांसी करितों आतां ॥ ८५ ॥ मग पुच्छ सोडिलें तळीं ॥ राक्षस कपींची बांधिली मोळी ॥ कृष्णस्मरणें तात्काळीं ॥ कपिकेसरी उडाला ॥ ८६ ॥ कपिराक्षसांची मोळी ॥ ती घेवोनियां शिरकमळीं ॥ कपिकेसरी जातसे अंतराळीं ॥ सैन्यपाळा भेटावया ॥ ८७ ॥ एवढें हरिभृत्याचें बळ ॥ तो असोनि कां झाले व्याकुळ ॥ अभिनव मायाकल्लोळ[5] ॥ जनांसी गोपाळ दावितसे ॥ ८८ ॥ दुरोनि पाहतां कपिकेसरी ॥ सैन्यपाळ गजबजिला अंतरीं[6] ॥ जेवीं दूर्वादळ गणपतीचे शिरीं ॥ तेवीं मोळी वीरांची ॥ ८९ ॥ वेगें सैन्यपाळासी भेटोन ॥ त्यासी कपि बोले वचन ॥ तुवां राक्षस वानर धाडून ॥ माझा स्वामी कष्टविला ॥ ९० ॥ जरी तूं ह्मणसील कोण ॥ तरी ऐक माझें अभिधान[7] ॥ नामेंच कळेल स्वरूपज्ञान ॥ मग त्वां सावधान होइंजे ॥ ९१ ॥ जेणें रामपदांबुजधुळी ॥ निजभाळीं ती लाविली ॥ रामकाजीं तनु[8] समर्पिली ॥ मनोभावें प्राणेंसीं ॥ ९२ ॥ जो शत योजनें[9] सागर उडाला ॥ दशवदनातें दंड केला ॥ सीतेचा शोक हरिला ॥ तो वीर मी हनुमंत ॥ ९३ ॥ ऐसें एकतां वचन ॥ रायें घातलें लोटां-

१ पृथ्वी. २ पुण्यरूपी वृक्षास. ३ हे वानरश्रेष्ठ (मारुते). ४ सूर्य. ५ चमत्कारिक. ६ मनामध्यें. ७ नांव. ८ शरीर. ९ चारशें कोस.

गण ॥ देवोनि क्षेमआलिंगन ॥ वरासनीं बैसविला ॥ ९४ ॥ आसनीं बैसला महाबळी ॥ मस्तकीं तैसीच वीरमोळी ॥ जेवीं छत्र शोभे राजमौळी ॥ तैसिया परी शोभत ॥ ९५ ॥ वीर पुच्छबंधनीं चडफडिती ॥ नाना करुणेतें भाकिती ॥ सोडीं ह्मणोनि काकुळती येती ॥ ऐसें देखे सैन्यपाळ ॥ ९६ ॥ देखोनि उपजलें महाभय ॥ हा तों अंतकाचा अंतक होय ॥ सर्वांचा करील क्षय ॥ याचें वचन नायकतां ॥ ९७ ॥ रायें करद्वयातें जोडून ॥ तयाप्रति बोले वचन ॥ किंनिमित्त आगमन ॥ स्वामीचें झालें या स्थलीं ॥ ९८ ॥ आतां हे वीर कष्टती ॥ यांसी सोडावें जी त्वरितगति ॥ ऐसें ऐकतां मारुति ॥ सकळ वीर सोडिले ॥ ९९ ॥ तंव राव पुसे वर्तमान ॥ सांगा आगमनाची खूण ॥ कपि ह्मणे स्वामी अर्जुन ॥ कष्टविला कां रे निशीमाजी ॥ १०० ॥ मग सैन्यपाळ बोले वचन ॥ स्वामी तुमचा कैसा अर्जुन ॥ तें समूळ मजलागीं कथन ॥ सांगावें जी कपीश्वरा ॥ १ ॥ मारुति ह्मणे पण करून ॥ मज तेणें जिंकिलें जाण ॥ मजलागीं ध्वजस्तंभीं स्थापून ॥ अर्जुनें सृष्टि जिंकिली ॥ २ ॥ म्यांही त्यासी दिधलें भाष्यदान ॥ मी तुज सर्वथा न सोडीं जाण ॥ जेव्हां तुज पडेल निर्वाण ॥ तेव्हां समरांगणीं रक्षीन मी ॥ ३ ॥ जो माझा स्वामी श्रीराम ॥ तोचि हा जाण पुरुषोत्तम ॥ अवतरला भक्तकामकल्पद्रुम ॥ पार्थसारथ्य करावया ॥ ४ ॥ मजलागीं अर्जुनें ॥ जिंकोनि निजसामर्थ्यानें ॥ ध्वजाग्रीं स्थापोनि कृपेनें ॥ मजलागीं रक्षी तो ॥ ५ ॥ जो राम तोचि श्रीकृष्ण ॥ कोपलिया जाळील त्रिभुवन ॥ जी गति पावला रावण ॥ तीच गति तूं पावसी ॥ ६ ॥ अर्जुनें केला अभिमान ॥ ह्मणोनि देवें केला निरसन ॥ परी प्राप्त झालिया निर्वाण ॥ वेंचील प्राण अर्जुनासाठीं ॥ ७ ॥ खाऊनि जेऊनि मातले ॥ ते मर्कट तुवां भांडों धाडिले ॥ तैसेचि राक्षस माजले ॥ नोळखिलें रे अर्जुना ॥ ८ ॥ पार्थऐसा धनुर्धर ॥ न दिसे शोधितां चराचर ॥ ज्याच्या ध्वजाग्रीं निरंतर ॥ जोडोनि कर मी तिष्ठें ॥ ९ ॥ अर्जुना पडतां निर्वाण ॥ धांवतों मी आणि नारायण ॥ तुजलागीं म्यां जाणोन ॥ एवढे रात्रीं पातलों ॥ ११० ॥ तूं रामभक्त असती बरवा ॥ तुझाही क्षय न व्हावा ॥ ऐसें मानोनि आपुल्या जीवा ॥ ह्मणोनि रात्रीं येथें पातलों ॥ ११ ॥ मग राव बोले मारुतीसी ॥ तूं तव आह्मां पूज्य होसी ॥ जेणें सख्य होय उभयतांसी ॥ तेंचि करणें तुझे मनीं ॥ १२ ॥ मग मारुति बोले तयातें ॥ जरी तूं इच्छिसी युद्धातें ॥ तरी माझिया बळातें ॥ जाणत असेल तव सैन्य ॥ १३ ॥ म्यां केली रामसेवा ॥ हें ठाऊक असे तुझिया जीवा ॥ ऐसें जाणोनि युद्धभावा ॥ धरितोसी हें अपूर्व ॥ १४ ॥ ऐसें ऐकतां कपी राक्षस ॥ बोलती भयें रायास ॥ ब्रह्मांडाचा करील ग्रास ॥ मग पाड कोण आमुचा ॥ १५ ॥ जेणें आह्मां सर्वांची मोळी ॥ बांधोनि आणिली तुह्मांजवळी ॥ ऐसा वीर आहे पार्थदळीं ॥ तरी संग्राम न करावा ॥ १६ ॥ जेणें आणिला द्रोणाचळ ॥ वांचविला सुमित्रेचा बाळ ॥ आह्मांसारिखे प्रत्यक्ष काळ ॥

१ श्रेष्ठ आसनावर. २ रात्रीमध्यें. ३ मोठें संकट. ४ पर्वा. ५ द्रोण नांवाचा पर्वत. ६ लक्ष्मण.

जेणें पुच्छीं बांधिले ॥ १७ ॥ रायासी ह्मणे पवनात्मज ॥ जों सक्रोध झाला नाहीं गरुडध्वज ॥ जों निर्वाणास्त्र न टाकी पृथात्मज ॥ तोंवरी सख्य साधावें ॥ १८ ॥ राया तुवां एक करावें ॥ सवें श्यामकर्णातें घ्यावें ॥ कृष्णार्जुनातें भेटावें ॥ निष्कपटें जावोनियां ॥ १९ ॥ ऐसी ऐकोनियां कपिवाणी ॥ राव आनंदला ते क्षणीं ॥ मग श्यामकर्ण आणोनि ॥ मारुतीसी समर्पिले ॥ १२० ॥ सवेंचि मारुति बोलिला ॥ एक आठवलें रे मजला ॥ तव हिताचिया बोला ॥ ऐकसील तरी बोलतों ॥ २१ ॥ तूं तंव भक्तशिरोमणि ॥ कैसी करितोसी अविचारकरणी ॥ अधर्मातें करूनि ॥ बळेंचि मालिनी आणिली ॥ २२ ॥ जयेचा पिता भानुकांत ॥ श्वशुर जाण चंद्रकांत ॥ ते दोघे शरणागत ॥ आले जाण कृष्णासीं ॥ २३ ॥ कृष्णें तयांसी दिधलें अभयवचन ॥ मी आपला वेंचीन प्राण ॥ परी मालिनी सोडवीन ॥ हा निश्चय जाणिजे ॥ २४ ॥ यानिमित्त पांडवांचा ॥ संहार हो कां सर्वांचा ॥ परी मालिनी सोडवावयात्रा ॥ निश्चय केला श्रीवरें ॥ २५ ॥ सत्यसंकल्प श्रीहरि ॥ हें तूं जाणसी कीं निर्धारीं ॥ मालिनीनिमित्त ये अवसरीं ॥ तूं कां मरण पावसी ॥ २६ ॥ राया तूं तों गुणनिधि ॥ कां आठविली रे ही दुर्बुद्धि ॥ परांगनेच्या संबंधीं ॥ अनेक मरण पावले ॥ २७ ॥ तारेचे निमित्तें वाळी ॥ मरण पावला कीं आतुरबळी ॥ सीतेनिमित्त रावणाची होळी ॥ वंशासहित झाली कीं ॥ २८ ॥ द्रौपदीचा अभिलाष ॥ धरितां पावला दुर्योधन नाश ॥ परदाराअभिलाषदोष ॥ सांगतां राया न सरती ॥ २९ ॥ जो करी परदारागमना ॥ त्याच्या पापास नाहीं गणना ॥ तो पूर्वजांसहित जाणा ॥ महारौरवीं पचेल ॥ १३० ॥ याकरितां विचार ऐकावा ॥ परदारासेवनीं मनोदय नसावा ॥ स्वस्त्रियेसीं काम सारावा ॥ इंदिरावरा स्मरत जावें ॥३१॥ मी थोर दुजा सान ॥ हा न धरावा अभिमान ॥ सर्वथा न करावें पापाचरण ॥ काळ नसे एकरूप ॥ ३२ ॥ पिपीलिका अत्यंत सान ॥ हर्ष पाहोनियां जाण ॥ महा स्थूळ कुंजराकारण ॥ कर्णी जातांचि मारिती ॥ ३३ ॥ येचविषयीं नृपनाथा ॥ तुज सांगतों टिटवीची कथा ॥ चित्त करूनि एकाग्रता ॥ सैन्यपाळा ऐकावें ॥ ३४ ॥ टिटवीचें आख्यान ॥ पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ ती कथा ऐका सावधान ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ३५ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ सैन्यपाळआख्यान आगाध ॥ षट्सप्ततितमाध्याय गोड हा ॥ १३६ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते सैन्यपालाख्यानं नाम षट्सप्ततितमोऽध्यायः ॥ ७६ ॥ ॥ अध्याय ॥ ७६ ॥ ओव्या ॥ १३६ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

१ मारुति. २ खरोखर.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे परीक्षितिसुता ॥ सावध ऐकें पुढील कथा ॥ जी हनुमंत होय सागता ॥ सैन्यपाळा आदरें ॥ १ ॥ रायासी बोले वातनंदन ॥ तुज सांगतों आख्यान ॥ तें ऐकावें सावधान ॥ विवेकी मन करूनि ॥ २ ॥ टिट्वी नामें पक्षिणी ॥ होती सभर्तृका गर्भिणी ॥ प्रसूति झाली तिजलागुनी ॥ सागरतीरीं अवधारा ॥ ३ ॥ तंव कोणे एके अवसरीं ॥ ती चाऱ्यास गेली बाहेरी ॥ तों तिचीं पिलीं भक्षोनियां दर्दुरी[2] ॥ पळोनि गेली समुद्रांत ॥ ४ ॥ तें जाणोनियां सत्वरा ॥ धांवोनि आली सिंधुतीरा ॥ भेकी[2] पळोनियां सागरोदरा ॥ माजी गेली तेधवां ॥ ५ ॥ कांहीं न चाले समुद्रावरी ॥ रडत बैसली सुंदरी ॥ ह्मणे मारीन ती दर्दुरी ॥ काढीन पिलीं पोटींचीं ॥ ६ ॥ जरी तीं सजीव असतील ॥ तरी करीन प्रतिपाळ ॥ जरी मेलीं असतील ॥ तरी पुरीन स्वहस्तें ॥ ७ ॥ पक्षिणी मनामाजी भावी ॥ चंचुपुटें[3] तिची पाठी चिरावी ॥ पोटींचीं बाळें काढावीं ॥ जिवंत होती बहुत प्रयत्नें ॥ ८ ॥ आठवोनि बाळकांचें गुण ॥ आक्रोशें करीत ती रुदन ॥ करी उरशिरताडन ॥ लोळतसे धरणीवरी[4] ॥ ९ ॥ तंव तयेचा आला भ्रतार ॥ तो तयेसी बोले उत्तर ॥ कां हो करिसी आकांत थोर ॥ सांगें मजला वेल्हाळे ॥ १० ॥ येरी ह्मणे माझीं पिलीं ॥ अवधीं भेकीनें नेलीं ॥ धरूनि मारावी तों सिंधुजळीं ॥ पळोनि गेली स्वामिया ॥ ११ ॥ ऐसें ऐकतां प्रियेचें वचन ॥ पक्षी करीत दीर्घ रुदन ॥ मायेनें व्यापिला जाण ॥ पक्ष्यांमाजी मोह ऐसा ॥ १२ ॥ ऐकें नृपचक्रचूडामणि ॥ उंच नीच नानायोनी ॥ मोहें सर्वांचिया मनीं ॥ ठाणें केलें अक्षयी ॥ १३ ॥ त्यांमाजी स्त्रीदेहांत ॥ माया असे जी बहुत ॥ पुरुष विवेकें तत्क्षणांत ॥ आकर्षोनि विचार करी ॥ १४ ॥ मग पक्षी होवोनि सावधान ॥ प्रियेचें करी समाधान ॥ एकामागें एक जाण ॥ मरण लागलें सर्वांसी ॥ १५ ॥ तूं नको करूं रुदन ॥ मेलें[5] सर्वथा नये जाण ॥ जरी निमालें रडतां येतें पूर्ण ॥ तरी ठाव नसता लोकांसी ॥ १६ ॥ गेलें तें सर्वथा नये ॥ ह्मणोनि न रडावें प्राणप्रिये ॥ तिजलागीं पोटासी धरिता होये ॥ तों ती तयातें झिडकावित ॥ १७ ॥ ह्मणे तूं माझा पति नव्हसी ॥ नेणों शेजारी भाससी ॥ तूं काय माझें दुःख जाणसी ॥ सर परता येथोनियां ॥ १८ ॥ कठिण दुःख पाठीचें ॥ त्याहोनि विशेष पोटींचें ॥ तूं काय जाणसी साचें ॥ दया नाहीं तवांतरीं[6] ॥ १९ ॥ जरी बाळांचा असता पिता ॥ तरी या दुःखें दुखवता ॥ आणि दर्दुरीसी[7] जिवें मारिता ॥ बाळें काढिता उदरींचीं ॥ २० ॥ कष्टें नव मास वाहिलीं उदरीं ॥ आणि प्रसूतिकाळीं वेदना भारी ॥ त्या जाणे एक श्रीहरि ॥ इतरालागीं नेणवे ॥ २१ ॥ वेश्यापुत्राचा जनक ॥ त्याचें तयासी काय दुःख ॥ परी वेश्येसी होय परम दुःख ॥ पोटीं जन्मला ह्मणोनि ॥ २२ ॥ अनंत वेश्या अनंत लोक ॥ अनंत दुःखें अनंत शोक ॥ परी जयेचे पोटींचें तयेस दुःख ॥ तैसा न्याय जाहला ॥ २३ ॥ कोणी पति नसोनि विधवा ॥ तूं मज असतां त्याचि भावा ॥ असो मी घेईन सूड बरवा ॥ तया दर्दुरी दुष्टेचा ॥ २४ ॥ स्त्री केवळ विषाची

१ मारुति. २ बेडकी. ३ चोंचीनें. ४ पृथ्वीवर. ५ मरण पावलेलें. ६ तुझ्या अंतःकरणांत. ७ बेडकीला.

लता ॥ किंवा अविद्येची घोर सरिता ॥ जिचा वचनशर लागतां ॥ उरी न उरे नराची ॥ २५ ॥ जें अभेद्य असतें वज्रानें ॥ जें न भेदवे काळाच्यानें ॥ तें स्त्रीवचनबाणें ॥ चूर्ण होय क्षणांत ॥ २६ ॥ अकृत्रिम स्नेह कनकाचळ ॥ जो इंद्रकुलिशासी अढळ ॥ तो स्त्रीवचनकुलिशें तात्काळ ॥ चूर्ण होतो नरवर्या ॥ २७ ॥ ज्यासी नसे देहाभिमान ॥ ज्यासी नसेल मानापमान ॥ तो ऐकतांचि स्त्रीवचन ॥ होय साभिमान तात्काळ ॥ २८ ॥ ऐसा भ्रतार निर्भर्त्सोन ॥ समुद्रतीरा गेली धांवोन ॥ तेथें आक्रोशें करी रुदन ॥ बाळें बाळें ह्मणोनियां ॥ २९ ॥ मग मनीं केला विचार ॥ ह्मणे चंचूनें बाहेर काढावें नीरें[३] ॥ कोरडा करूनियां सागर ॥ बळें मारावें भेकीतें ॥ ३० ॥ तिचें चंचुपुटें पोट फाडीन ॥ माझीं बाळें मी काढीन ॥ तेव्हांचि पावेन समाधान ॥ ह्मणोनि यत्न करीतसे ॥ ३१ ॥ स्त्री अनृतजलाची वैतरणी ॥ जी अचाट मोहाची खाणी ॥ जी मायातृणाची जन्मधरणी ॥ ऐशा प्रकारें शोभत ॥ ३२ ॥ जी अति लोभाची लता ॥ जी अशौचाची थोर सरिता ॥ जी निर्दयगिरीची दरी तत्वतां ॥ ती जाण वनिता नृपवर्या ॥ ३३ ॥ ऐसा मनीं करूनि निश्चय ॥ चंचुपुटें भरोनि तोय ॥ भूमीवरी रिचवोनि जाय ॥ आणिक भरीत चंचुपुटीं ॥ ३४ ॥ ऐसी श्रमली येरझारीं ॥ तों दिवस उरला घटिका चारी ॥ तें उदक भरीत भरोवैरी ॥ परी ती न सोडी प्रयत्न ॥ ३५ ॥ बाळाशा धरूनि अंतरीं ॥ कष्टतां श्रम न मानी तिळभरी ॥ जरी ऐशा श्रमें भजेल श्रीहरि ॥ तरी प्राणिया काय उपेक्षील ॥ ३६ ॥ तंव आला तेथें तयेचा कांत ॥ उद्योग देखोनि झाला विस्मित ॥ मग प्रियेसी तो बोलत ॥ हें काय करितेसी वल्लभे ॥ ३७ ॥ येरी ह्मणे न बोलें मजसीं ॥ शेजारी तूं सत्य होसी ॥ मी कामिनी तुझी नव्हे ऐशी ॥ सत्य मानसीं धरावें ॥ ३८ ॥ माझीं निर्मोनि गेलीं पिलीं ॥ मी पडिलें दुःखजाळीं ॥ ह्मणोनि शरीर शोकाश्रुजळीं ॥ भिजवितें आकंठपात यातें ॥ ३९ ॥ जरी माझा पति असतासी ॥ तरी मज साह्य होतासी ॥ दोघें शुष्क करितों सागरासी ॥ जीवें मारितों भेकीतें ॥ ४० ॥ तयेसी ह्मणे तो रमण ॥ हें तों अगाध सागरजीवन ॥ सर्वथा न काढवे जाण ॥ वृथा प्राण कष्टविसी ॥ ४१ ॥ अगाध नारायणाचे गुण ॥ अगाध अर्णवींचें जीवन ॥ अगाध भारतश्रवणपुण्य ॥ अगाध गुहा मेरूच्या ॥ ४२ ॥ यांचा पाहीन ह्मणे जो अंत ॥ तो जाणावा परम पतित ॥ साध्य यत्न करावा निश्चित ॥ असाध्य यत्न करूं नये ॥ ४३ ॥ उंच वस्तु पुरुषासी नव्हे प्राप्त ॥ ती घ्यावया र्‍हस्व[११] उदित ॥ तयातें लोक उपहासित ॥ तैसें होईल आह्मांसी ॥ ४४ ॥ करीन ह्मणतां पृथ्वीचें वजन ॥ आणि मोजीन ह्मणतां सिंधुजीवन ॥ किती पांडें[१२] मोजीन ह्मणतां गगन ॥ लोक हांसती तयातें ॥ ४५ ॥ येरी ह्मणे असो आघवें ॥ परी माझें वचन ऐकावें ॥ सागर शोषोनि मारावें ॥ उभयतां मिळोनि भेकीसी ॥ ४६ ॥ [illegible] मायामय संसार ॥ वरी कामिनीमोहाचें उत्तर ॥ तेणें भ्रमला तो नर ॥ [illegible] ॥ ४७ ॥



१ निष्कपट. २ इंद्रवज्राला. ३ उदक. [illegible] ४ अशुद्धाचा. ५ गुहा. ६ त्वरेनें. ७ पति. ८ मरून. ९ बेडकीला. १० पति (टिटवा). ११ ठेंगणा. १२ वीस काठ्यांचें एक माप.

स्त्रीमोहतस्कर जाण ॥ घालोनि तें धन नेलें लुटोन ॥ केला दरिद्री तात्काळ ॥ ४८ ॥ अनेक जन्मांचा दृढ संस्कार ॥ तेणें प्रपंचीं लागे सत्वर ॥ परी विश्वंभराचा आदर ॥ ऐसा झडकरी न लागे ॥ ४९ ॥ असो दोघें जळ भरोनि चंचुभरी ॥ आणोनि रिचंविती[1] बाहेरी ॥ तों नारद पातला समुद्रतीरीं ॥ देखतां आश्चर्य पावला ॥ ५० ॥ नारद पुसतसे त्या दोघांतें ॥ कां बाहेर काढितां उद-कातें ॥ जें दुःख झालें असेल तुह्मांतें ॥ तें मजकारणें सांगावें ॥ ५१ ॥ खग[2] ह्मणती मुनि अवधारीं ॥ आमुचीं पिलीं होतीं समु-द्रतीरीं ॥ तीं भक्षिलीं असती दर्दुरीं ॥ त्यांसी सागरें पृष्ठीस घातलें ॥ ५२ ॥ ह्मणोनि काढितों आह्मी नीर ॥ कोरडा करितों सागर ॥ मग भेकीचा करूं संहार ॥ पिलीं आपुलीं घेवोनि ॥ ५३ ॥ ऐसें ऐकतां खगवचन ॥ विस्मित झाला विधिनंदन ॥ बाप भ्रमाचें विंदान ॥ केवढें सायास पक्षियांचे ॥ ५४ ॥ कृपा उपजली त्याचिया चित्ता ॥ ह्मणे तुह्मीं चिंता न करावी आतां ॥ मज श्रुत झाली ही वार्ता ॥ कैंचें दुःख तुह्मांसी ॥ ५५ ॥ मनीं तोषोनि द्रुहिणात्मज[3] ॥ आतां काळक्रमणा होईल मज ॥ बरवें सांपडलें बीज ॥ ह्मणोनि मनीं हांसतसे ॥ ५६ ॥ हनुमंत ह्मणे रायासी ॥ दुःख निवेदावें साधूसी ॥ तो तात्काळ तयासी ॥ उपायातें योजील ॥ ५७ ॥ साधुहृदय केवळ नवनीत ॥ परदुःख देखतां वितळत ॥ परोपकारीं निरंतर रत ॥ निश्चयेंसीं जाणावें ॥ ५८ ॥ नारद ह्मणे त्या पक्षियांसी ॥ येथें आणितों गरुडासी ॥ तो त्रासोनियां सागरासी ॥ भेकी तुह्मांसी देईल ॥ ५९ ॥ ऐसें बोलोनि नारद-मुनि ॥ मनोवेगें जातसे गगनीं ॥ तों मार्गीं भेटला त्यालागुनी ॥ तार्क्ष्यपुत्र[4] कागकेत ॥ ६० ॥ तो अनेक पक्ष्यांसीं फिरत ॥ खगा-[5]वांचोनि सर्वां भक्षित ॥ तेणें नारद अकस्मात ॥ धरोनि नेला भक्षावया ॥ ६१ ॥ नारदासी पुसे गरुडनंदन ॥ तूं कोणाचा अससी कोण ॥ कोठें करितोसी गमन ॥ तें मजलागीं सांगावें ॥ ६२ ॥ नारद ह्मणे तयातें ॥ तूं खगराज ह्मणविसी आपणातें ॥ परी सागरें गांजिलें पक्षियांतें ॥ त्यांतें काय उपेक्षिसी ॥ ६३ ॥ आपणा ह्मणविसी राजा ॥ कां न धरिसी पक्षिकुळाची लज्जा ॥ द्विज-[6]भावाचा पराक्रम तुझा ॥ कळोनि आला मजलागीं ॥ ६४ ॥ झालासी गरुडोदरीं निर्माण ॥ दुर्बळ मारावया ब्राह्मण ॥ जळो तुझें बळकटपण ॥ भूमिभार झालासी ॥ ६५ ॥ ईश्वरें देतां बळसंपत्ति ॥ जो न रक्षी स्वकुळाप्रति ॥ तो वंशीं कृमी निश्चितीं ॥ जन्मला ऐसें मज वाटे ॥ ६६ ॥ त्या पक्षियांचें दुःख ॥ गरुड नाशील आवश्यक ॥ त्यासी सांगावया सकळिक ॥ मी जात होतों लगबगां ॥ ६७ ॥ मार्गीं तुवां केलें विघ्न ॥ आणि करीन ह्मणसी भक्षण ॥ त्यावरी कोण पक्षियांचें धांवण ॥ करील मी येथें निमालियाँ[7] ॥ ६८ ॥ जेणें पक्षियांचा केला घात ॥ त्यावरी न चाले तुझा पुरुषार्थ ॥ जन्मोनि आयुष्य केलें व्यर्थ ॥ गरुडपोटीं अधमा रे ॥ ६९ ॥ ऐकोनि नारदाची मात ॥ क्रोधावला कागकेत ॥ ब्रह्मांड करील भस्मीभूत ॥ प्रळयाग्निवत खवळला ॥ ७० ॥ नारदासी ह्मणे क्रोध-

१ ओतिती. २ ते पक्षी ( टिटवी व तिचा पति ). ३ नारद. ४ गरुडाचा मुलगा. ५ पक्ष्यावाचून. ६ पक्षित्वाचा. ७ मृत्यु पावतां.

विकळ ॥ तें मज दाखवा जी स्थळ ॥ माझा वंश दुःखाकुळ ॥ जेथें केला समुद्रें ॥ ७१ ॥ बरवें ह्मणोनि नारदमुनि ॥ चालिला कागकेता घेऊनि ॥ सवें अपार पक्षिश्रेणी[1] ॥ चालतां दाटलें आकाश ॥ ७२ ॥ जेथें होतीं तीं दोघेंजण ॥ उपसीत होतीं सिंधुजीवन[2] ॥ तेथें आणिला तार्क्ष्यनंदन[3] ॥ टिटवीचे साह्यार्थ ॥ ७३ ॥ दोघांतें मुनि सांगे विचार ॥ कागकेतासी भेटावें सत्वर ॥ तयासी करावा नमस्कार ॥ अत्यंत करुणा भाकोनि ॥ ७४ ॥ मग त्या दोघांतें नेवोनि ॥ नारदें घातलें तयाचे चरणीं ॥ येरें क्षेमालिंगन देवोनि ॥ आश्वासोनि बैसविलें ॥ ७५ ॥ तिहीं आद्यंत वृत्तांत ॥ कागकेतासी केला श्रुत ॥ येरू ह्मणे भेकी[4] निश्चित ॥ प्राप्त झाली ऐसें जाणावें ॥ ७६ ॥ युद्धापूर्वीं शिष्टाई ॥ करावी ही राजनीति पाहीं ॥ ह्मणोनि कागकेतें लवलाहीं[5] ॥ दूत पाठविला सागरासी ॥ ७७ ॥ दूत सागरासी बोलत ॥ गरुड सर्व पक्षियांचा नाथ ॥ त्याचा पुत्र कागकेत ॥ त्याचा दूत मी असें ॥ ७८ ॥ टिटवीचीं जीं पिलीं ॥ तीं भेकीनें भक्षिलीं ॥ तीं तुवां पाठिसीं घातलीं ॥ तीं देईंजे सत्वर ॥ ७९ ॥ तरीच तुज होय कल्याण ॥ नाहीं तरी पावसी मरण ॥ ऐसें ऐकोनियां वचन ॥ सक्रोध सिंधु त्यासी बोले ॥ ८० ॥ क्रोधें सागर बोले त्यासी ॥ कां रे तूं मज भेडसाविसी ॥ मी सर्वथा नेदीं भेकीसी ॥ ऐसें कागकेता सांगावें ॥ ८१ ॥ मी देईन पोटींचें ॥ परी सर्वथा नेदींच पाठीचें ॥ मज भय नाहीं मरणाचें ॥ क्षणभंगुराचें जाण दूता ॥ ८२ ॥ क्षणभंगुर हें जीवित ॥ त्यानिमित्त न भंगीं पुण्यपर्वत ॥ जे त्यागिती शरणागत ॥ त्यांचे पूर्वजां[6] पतन नरकीं ॥ ८३ ॥ त्यास्तव ही भेकी शरणागत ॥ मी सर्वथा नेदींच यथार्थ ॥ ऐसें करीं रे तयासी श्रुत ॥ कांहीं संदेह धरूं नये ॥ ८४ ॥ जें करणें असेल तुजला ॥ तें आतांच दावीं करूनि मजला ॥ परी मी या शरणागताला ॥ सर्वथा नेदीं त्या सांगें ॥ ८५ ॥ तैसेंच येवोनियां दूतें ॥ आद्यंत सांगीतलें त्यातें ॥ येरू युद्धासी क्रोधचित्तें ॥ उठिला वेगें दँळेंसीं[7] ॥ ८६ ॥ कागकेत ह्मणे जलचरां ॥ तुह्मी आमुचें साह्य करा ॥ तीं ह्मणती आह्मी सागरा ॥ आधीन आहों सर्वही ॥ ८७ ॥ शोषितांचि सिंधुजीवन ॥ तात्काळ जातील आमुचे प्राण ॥ यास्तव त्याचे आह्मी ह्मणोन ॥ युद्ध करूं तुह्मांसी ॥ ८८ ॥ ऐकतांचि ऐसी मात ॥ क्रोधावला गरुडसुत ॥ युद्ध करावया अद्भुत ॥ उभा ठाकला स्वदळेंसीं ॥ ८९ ॥ मनुष्यरूपें तो सागर ॥ सवें घेवोन जळचरभार ॥ शस्त्रास्त्रेंसीं चापशर ॥ घेवोनि बैसला रथावरी ॥ ९० ॥ सागराचें युद्ध अस्त्रांचें ॥ पक्षियाचें युद्ध निजांगाचें ॥ परम आरंभिलें घोर साचें ॥ दोनीं दळें एकवटलीं ॥ ९१ ॥ गगनीं जावोनि ते क्षणीं ॥ कौतुक पाहे नारदमुनि ॥ पाहातां तटस्थ झाला नयनीं ॥ पातया पातें न लागेचि ॥ ९२ ॥ पक्षी मार करूं लागले ॥ चंचुपुटें विदारिते झाले ॥ पक्षवातें कित्येक उडविले ॥ जलचरपाळ तेधवां ॥ ९३ ॥ कोणी सगळेचि भक्षिले ॥ कोणी नखें विदारिले ॥ कोणी पक्षवातें झडपिले ॥ ते जावोनि पडिले दिगंता ॥ ९४ ॥

१ पक्ष्यांची पंक्ति. २ समुद्राचें पाणी. ३ कागकेत. ४ बेडकी. ५ सत्वर. ६ पितरांना. ७ सैन्यासह.

तैसींच जळचरें धांवती ॥ तींही स्वकंटकें पक्षियां मारिती ॥ कित्येक दंतेकरून तोडिती ॥ ऐसे संहारिती पक्षियांतें ॥ ९५ ॥ क्रोधें खवळला कागकेत ॥ पक्षें झडपिला सरितानाथ[1] ॥ चरणनखें विदारित ॥ मुखें तोडित मुखातें ॥ ९६ ॥ पक्षें रथ उडविला ॥ वेगें गगनासी नेला ॥ सवेंचि भूमीसी आदळिला ॥ सर्व झाला गात्रभंग ॥ ९७ ॥ धांवोनियां नदीरमण[1] ॥ मारिता झाला दिव्य बाण ॥ पक्षिसैन्य व्याकुळ पूर्ण ॥ निजबाणें केलें तेधवां ॥ ९८ ॥ तों कागकेत दारुण ॥ ग्रासिता झाला सकळ बाण ॥ मग सरितेश्वरें निर्वाण बाण ॥ काढोनि रुद्रमंत्रें मंत्रिला ॥ ९९ ॥ तो बाण भरला हृदयांत ॥ तेणें कागकेत पडिला मूर्च्छित ॥ मग मारित चालिला सरितानाथ ॥ पक्षिकुळातें तेधवां ॥ १०० ॥ खेचरें[2] आणि जळचर ॥ दोघां युद्ध झालें घोरांदर ॥ मग मूर्च्छित देखतां चिंतातुर ॥ झाला बाळ ब्रह्मयांचा[3] ॥ १ ॥ तों कागकेत सावध झाला ॥ चपळेपरी[4] धांविन्नला ॥ जळचरभार ग्रासों लागला ॥ संख्या नाहीं तयांतें ॥ २ ॥ सागरातें नखेंकरून ॥ विदारिता झाला गरुडनंदन ॥ हें नारदें देखोन ॥ विचार करीत तेधवां ॥ ३ ॥ ह्मणे सागराचा पुत्र जालंधर ॥ तयासी आणावें सत्वर ॥ ह्मणोनि पातला मुनीश्वर ॥ जालंधराजवळिकें ॥ ४ ॥ नारद बोले तयासी ॥ कां रे निश्चिंत बैसलासी ॥ खगें गांजिलें सागरासी ॥ पुत्र असोनि तुजऐसा ॥ ५ ॥ खगपुत्र तो बळसागर ॥ तेणें सागर केला जर्जर ॥ ऐसें ऐकतां जालंधर ॥ धांवला वीर युद्धासी ॥ ६ ॥ खगपुत्र आणि सिंधुपुत्र ॥ करिते झाले युद्ध घोर ॥ परस्परें नाटोपती महावीर ॥ परी तो असुर बळावला ॥ ७ ॥ तों नारद सांगे गरुडासी ॥ कां रे निश्चिंत बैसलासी ॥ सागरें त्रासिलें तव सुतासी ॥ कां तूं न धांवसी धांवण्या ॥ ८ ॥ ऐसें ऐकतां धांवला तो गरुड ॥ क्रोधावला वीर प्रचंड ॥ रणासी येवोनि सागरतुंड[5] ॥ करी दुखंड चंचुपुटें ॥ ९ ॥ चंचूनें तया मारित ॥ चरणनखें देह विदारित ॥ जालंधरासी पळवित ॥ पराक्रमें गरुड तो ॥ ११० ॥ ऐसा घायें जर्जर केला ॥ मानसीं भयभीत झाला ॥ सागर मरणप्राय देखिला ॥ मग चिंतावला विधिसुत[6] ॥ ११ ॥ आतां सागर हा मरेल ॥ मग सर्व जळें आटतील ॥ जळेंवीण विश्व आटेल ॥ मग कोपेल जगदात्मा ॥ १२ ॥ मग नारद गेला चंद्रापासीं ॥ ह्मणे खगें त्रासिलें तव पित्यासी ॥ तुज ऐसा पुत्र असोनि त्यासी ॥ ऐसी गति काय पाहासी तूं ॥ १३ ॥ धिग् रे तुझें पुत्रपण ॥ ऐसें ऐकतां नारदवचन ॥ चंद्र घेवोन आपुलें सैन्य ॥ वेगें धांवला युद्धासी ॥ १४ ॥ मग चंद्र आणि हरिवाहन[7] ॥ संग्राम करिती अति दारुण ॥ चंद्राचे शर विहंगम ॥ भग्न करीत नखाग्रें ॥ १५ ॥ ऐसे परस्परें भिडती ॥ परी अति बलाढ्य तो खगपति ॥ नखें विदारिला रोहिणीपति[8] ॥ आणि ताडिला चंचुपुटें ॥ १६ ॥ मग नारद ह्मणे गरुडासी ॥ मी जातसें कैलासासी ॥ कांहीं निरोप सांगणें असेल शंकरासी ॥ तरी तो मजपासीं सांगावा ॥ १७ ॥ तयाप्रति बोले खगपति ॥ बळें मातला हा सरितापति ॥ यानिमित्त आणीं

१ समुद्र. २ पक्षी. ३ नारद. ४ विजेसारखा. ५ समुद्राचें तोंड. ६ नारद. ७ गरुड. ८ चंद्र.

गौरीपति ॥ आणि अगस्ति आणावा ॥ १८ ॥ तों नारद गेला कैलासासी ॥ वार्ता कथिली महेशासी ॥ निश्चिंत काय बैसलासी ॥ गरुडें तुज पाचारिलें ॥ १९ ॥ संगें घेऊनि कुंभसुत[1] ॥ तुवां रणासी जावें त्वरित ॥ बरें ह्मणोनि उमाकांत ॥ कुंभोद्भवसह गणेंसीं चालिला ॥ १२० ॥ शिवासी सांगोनियां देखा ॥ नारद गेला सत्यलोका ॥ सर्व वृत्तांत सांगितला जनका ॥ उठा वांचवा समुद्रासी ॥ २१ ॥ ऐसें ऐकतां चतुरानन[2] ॥ वेगें वैकुंठासी करी गमन ॥ श्रीहरीस वृत्तांत सांगोन ॥ वेगें रणा आणिले विधिहरी ॥ २२ ॥ तंव गरुडें देखिला रमावर ॥ साष्टांग केला नमस्कार ॥ विनवीतसे जोडोनि कर ॥ ह्मणे साह्य करावें टिटवीचें ॥ २३ ॥ देवासी भीड गरुडाची ॥ वाणी बोलिला अभयाची ॥ मग कृपादृष्टि केली अमृताची ॥ खगकुळें सकळ जीवविलीं ॥ २४ ॥ तों इकडे खग कागकेत ॥ मत्स्यकुळातें संहारित ॥ कोट्यावधि मीनं[3] भक्षित ॥ परम क्रोधें वीर तो ॥ २५ ॥ चंद्र आणि जालंधर ॥ यांसीं भिडे विनतापुत्र ॥ विटंबिले दोघे वीर ॥ कृष्णबळें गरुडानें ॥ २६ ॥ एकासी घडलें गुरुस्त्रीगमन ॥ एकासी घडलें गौरीअभिलाषण ॥ तें पाप जावयाकारण ॥ केलें शासन खगेंद्रें ॥ २७ ॥ तों संगें घेवोनि अगस्ति ॥ रणासी आला उमापति ॥ तें देखोनि सरितापति ॥ भयभीत जाहला ॥ २८ ॥ तैंपासोनि जलचर ॥ पक्षहीन करी खगेश्वर ॥ तें चालतसे अद्यापि वैर ॥ खग जळचरां भक्षिती ॥ २९ ॥ मग समुद्र ब्रह्मयासी[4] गेला शरण ॥ ह्मणे निवारीं कीं माझें मरण ॥ मग विधीनें श्रीहरिचरण ॥ येवोनियां वंदिले ॥ १३० ॥ विधि सांगे श्रीहरीसी ॥ आतां रक्षावें समुद्रासी ॥ मग संतोषोनि हृषीकेशी ॥ गरुडसिंधु भेटविले ॥ ३१ ॥ मग गरुड ह्मणे समुद्रास ॥ एक स्वामी तुह्मां आह्मांस ॥ दर्दुरी[5] दिधलिया टिटवीस ॥ मग वैरभाव कासया ॥ ३२ ॥ अनाथ जाणोनि टिटवीतें ॥ तुवां गांजविलें भेकीहस्तें ॥ स्वामी समर्थ असतां मातें ॥ मम वंशजा कोण छळी ॥ ३३ ॥ भयें सागरें तेव्हां भेकी ॥ आणोनि दिधल्या अनेकी ॥ तयांत ती अपराधी भेकी विलोकी ॥ परी ती कांहीं दिसेना ॥ ३४ ॥ सिंधूसी बोले गरुड वचन ॥ निष्कपटें करीं समाधान ॥ अपराधी भेकी सोडोन ॥ वृथा कासया आणिल्या ह्या ॥ ३५ ॥ तो शोधिता झाला जळीं ॥ तंव ती भयें दडाली चिखलीं ॥ ती आणोनि तये वेळीं ॥ पक्षिणीसी समर्पिली ॥ ३६ ॥ तिणें चंचुपुटें विदारिली ॥ तंव तिचीं पिलीं असती निमालीं ॥ तीं काढोनि मृत्तिकेंत टाकिलीं ॥ तेव्हां पावली ती समाधान ॥ ३७ ॥ ऐसा पक्षिणीनें सूड ॥ घेतला असे कीं अवघड ॥ कोणाचा अपराध वाड ॥ करूं नये बुद्धिवंतें ॥ ३८ ॥ टिटवी पाहतां ती केवळ दीन ॥ तिजनिमित्त गरुडासी भांडण ॥ हरि हर ब्रह्मादि सुरगण ॥ आले साह्य करावया ॥ ३९ ॥ मी थोर हा धरूनि अभिमान ॥ बळें दीनांचें करितां छळण ॥ न चाले त्याचा अभिमान ॥ दीनरक्षक परमात्मा ॥ १४० ॥ हीन दीन साहे अपमान ॥ परी त्याचे मनीं दीर्घ अभिमान ॥ चरणें ताडितां रजःकण ॥ मस्तकीं त्याचेच

१ अगस्ति. २ चार मुखें आहेत ज्याला असा ( ब्रह्मदेव ). ३ मासे. ४ ब्रह्मदेवाला. ५ बेडकी.

बैसती ॥ ४१ ॥ मुळींच उठतां अभिमान ॥ अभिमानें होय बंधन ॥ मग नाना विघ्नें येऊन ॥ तयावरी कोसळती ॥ ४२ ॥ ह्मणोनि लहान थोरें अभिमान ॥ सर्वथा न करावा जाण ॥ सर्वांतर्यामी[1] भगवान ॥ भरोनियां राहिला ॥ ४३ ॥ नारद पावला समाधाना ॥ ह्मणे बरवी झाली काळक्रमणा ॥ मग वाजवीत ब्रह्मवीणा ॥ हरिनामातें उच्चारी ॥ ४४ ॥ आठवली[2] ती सांगितली गोष्टी ॥ जी पूर्वीं वर्तली असे सृष्टीं ॥ तूंही शोधून पाहें दृष्टीं ॥ कैसा भाव या गोष्टीचा ॥ ४५ ॥ सांगितल्या क्रोध न मानीं ॥ आपुल्या जाण तूं हितकारणीं ॥ ऐसी ऐकतां कपिवाणी ॥ सैन्यपाळ संतोषला ॥ ४६ ॥ मग हनुमंता घालीत लोटांगण ॥ ह्मणे तव वाक्य मज प्रमाण ॥ मी कृष्णार्जुनांसी आहें शरण ॥ देतों मालिनी सोडोनि ॥ ४७ ॥ मग श्यामकर्ण आणि मालिनी ॥ आणोनि उभीं केलीं तिनी ॥ मग राव बोले कर जोडोनि ॥ यावरी काय आज्ञा कपिराया ॥ ४८ ॥ हनुमंत ह्मणे घेऊनि यांतें ॥ जावोनि भेटावें कृष्णार्जुनांतें ॥ गज रथ अश्वें तयांतें ॥ वस्त्रालंकारें पूजावें ॥ ४९ ॥ बरवें ह्मणोनि नृपवर ॥ वस्त्रालंकार अति सुंदर ॥ गजाश्व रथ अपार ॥ घेतले तेव्हां पूजनातें ॥ १५० ॥ घेतले सुंदर रहंवर[3] ॥ अमर्याद उष्ट्रभार[4] ॥ नाना वस्तु अमोल फार ॥ घेवोनियां निघाला ॥ ५१ ॥ मालिनी बैसविली शिबिकासनांत[5] ॥ हर्ष झाला तिचे मनांत ॥ ऐसा सैन्यपाळ रामभक्त ॥ भेटीस चालिला स्वदळेंसीं ॥ ५२ ॥ लागले वाद्यांचे गजर ॥ पुढें चालिले चतुरंग भार ॥ दोन्ही श्यामकर्ण सुंदर ॥ मालिनीसहित निघाले ॥ ५३ ॥ मारुति आणि नरपति ॥ एके रथीं बैसले प्रीतीं ॥ तों सन्मुख देखिला श्रीपति ॥ मग रथींहूनि उतरले ॥ ५४ ॥ मग हनुमंतें सैन्यपाळ ॥ कृष्णपदीं घातला तात्काळ ॥ देवें केला तो शीतळ ॥ क्षेमालिंगन देवोनियां ॥ ५५ ॥ सैन्यपाळ ह्मणे यादवपति ॥ मी तों अपराधी निश्चितीं ॥ क्षमा करावी तरी वैकुंठपति ॥ मज दीनातें उद्धरावें ॥ ५६ ॥ जें योगियां दुर्लभ पद ॥ तें म्यां देखिलें जी विशद ॥ हें उपकारांचें वृंद[6] ॥ मारुतीनें मज केलें ॥ ५७ ॥ योगेश्वरांच्या अनंत कोटी ॥ कष्टतां स्वप्नीं तयांसी न भेटी ॥ त्या कृष्णाची सन्मुख भेटी ॥ पूर्व सुकृतें[7] जाहली ॥ ५८ ॥ मग संतोषला श्रीहरि ॥ ह्मणे राया स्तुति पुरे करीं ॥ तूं माझा भक्त निर्धारीं ॥ पार्थालागीं भेटें आतां ॥ ५९ ॥ मग पार्थ ह्मणे जी अनंता ॥ यासी मी न भेटें सर्वथा ॥ युद्धनिवाडा नसे तत्वतां ॥ केवीं यासी भेटावें ॥ १६० ॥ याजला मी जिंकीन ॥ मग घेईन श्यामकर्ण ॥ कैसें सोडावें धर्माचरण ॥ जें मज त्वां सांगीतलें ॥ ६१ ॥ मग पार्थासी बोले नारायण ॥ माझें वचन तेंचि धर्माचरण ॥ तें न करीं अप्रमाण ॥ स्वधर्माचरण तेणेंचि ॥ ६२ ॥ आतां सोडीं आग्रहगोष्टी ॥ सैन्यपाळा भेटावें किरीटी ॥ मग दोघां धरूनियां करसंपुटीं ॥ एकमेकांसी भेटविलें ॥ ६३ ॥ परस्परें करूनि नमन ॥ देते झाले आलिंगन ॥ मग केलें पूजन ॥ कृष्णपार्थांचें सैन्यपाळें ॥ ६४ ॥ सुवर्णवस्त्रें रत्नराशी ॥ अनेक दिधल्या पार्थासी ॥ मग आणोनि मालिनीसी ॥ दिधली

---

१ सर्वांच्या अंतःकरणांत वास करणारा. २ सुचलें त्याप्रमाणें. ३ रथ. ४ उंट. ५ पालखींत. ६ समुदाय. ७ पुण्याचे योगेंकरून.

करीं कृष्णाच्या ॥ ६५ ॥ देवें भानुकांत पाचारुनी ॥ तयातें दिधली मालिनी ॥ ती लागली जनकचरणीं ॥ येरें स्नेहें आलिंगिली
॥ ६६ ॥ सर्वेंचि लागली श्वशुरचरणा ॥ तेणें दिधलें आशीर्वचना ॥ सर्वही पावले समाधाना ॥ कृष्णप्रसादेंकरूनि ॥ ६७ ॥ सर्वांस
समान तो अनंत ॥ तेणें पाचारिला भानुकांत ॥ तैसाचि पाचारोनि चंद्रकांत ॥ सैन्यपाळासी भेटविले ॥ ६८ ॥ सकळ चित्तांचा
चालक ॥ समजावी सर्वां रमानायक ॥ तेणें कोणासी द्वेषपंक ॥ न लागेचि निर्धारें ॥ ६९ ॥ सकळ पंकातें हरी जीवन ॥ त्याचें
मूळ तो जगज्जीवन ॥ त्यामाजी बुडालें ज्याचें मन ॥ होय पंकक्षालन सहजचि ॥ १७० ॥ यापरी सकळांचें समाधान ॥ करूनि
केलें नृपपूजन ॥ सर्वांसी देवोनि वस्त्राभरण ॥ केला गौरव सर्वांचा ॥ ७१ ॥ मग श्रीकृष्ण बोले पार्थासी ॥ आतां संजोगावें
सैन्यासी ॥ पुढें सोडावें श्यामकर्णांसी ॥ धराप्रदक्षिणेलागुनी ॥ ७२ ॥ आज्ञा करावी दळभारा ॥ सैन्यपाळादि सर्व वीरां ॥ चंद्रहा-
सादि नृपवरां ॥ समागमें यावया ॥ ७३ ॥ मग पुढें सोडिले श्यामकर्ण ॥ मागें चालिले कृष्णार्जुन ॥ तयांमागें सर्व नृपगण ॥
दळभारेंसीं चालती ॥ ७४ ॥ आतां येथोनि श्यामकर्ण ॥ कवण देशीं करितील गमन ॥ तें मी पुढें सांगेन निरूपण ॥ जैमिनि
ह्मणे जनमेजया ॥ ७५ ॥ हें सैन्यपाळाचें आख्यान ॥ जे करितील श्रवण पठन ॥ त्यांचें होईल पापक्षालन ॥ अंतीं जातील शिव-
पदा ॥ ७६ ॥ ही अग्निपुराणींची कथा ॥ तुज सांगितली नृपनाथा ॥ पुढें चित्तीं करूनि एकाग्रता ॥ पूर्वजकथा ऐकावी ॥ ७७ ॥
कवण देशा जातील श्यामकर्ण ॥ तें मी तुह्मांसी सांगेन ॥ तेंचि ऐकावें सावधान ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ७८ ॥ इति श्रीधर्माश्व-
मेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ संपलें सैन्यपाळाख्यान अगाध ॥ सप्तसप्ततितमोध्याय गोड हा ॥ १७९ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनि-
कृते आश्वमेधिके सैन्यपाळाख्यानं नाम सप्तसप्ततितमोध्यायः ॥ ७७ ॥ अध्याय ॥ ७७ ॥ ओव्या ॥ १७९ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ सोमवंशीं कुरुकुळध्वजें ॥ जो अर्जुनात्मजसुततनुजें ॥ जो कुंजरपुराधीशराज ॥ प्रश्न करी जैमिनीतें ॥ १ ॥ ह्मणे व्यासकुलांबुधिसुधाकरा ॥ मोहांधकारपटलहरा ॥ वर्षोनि पूर्वजकथामृतसारा ॥ मच्छ्रवणचकोरां तृप्त करीं ॥ २ ॥ मुनि ह्मणे श्रोतृवनकल्पद्रुमा ॥ तुझी सादरता तीचि पौर्णिमा- ॥ माजी उगवोनि प्रश्नचंद्रमा ॥ मद्वचनचंद्रकांतातें द्रववी ॥ ३ ॥ तूं श्रोतयांमाजी श्रेष्ठ ॥ राजभारतवंशवरिष्ठ ॥ तरी कथेतें सावधचित्त ॥ पुढें परिसें विचक्षणा ॥ ४ ॥ निर्मळ करूनि कर्णपात्र ॥ भरीं पूर्वजकथामृत पवित्र ॥ तेणें होईल शीतळ गात्र ॥ जें त्रिविध तापें तापलें ॥ ५ ॥ ऐसें जिंकोनि सैन्यपाळा ॥ सोडविलें भानु-कांतकन्येला ॥ आनंद झाला सकळांला ॥ मग पुढें सोडिले श्यामकर्ण ॥ ६ ॥ पुढें चालती श्यामकर्ण ॥ मागें चालती कृष्णार्जुन ॥ त्यांमागें चालती नृपगण ॥ निजदळेंसीं आनंदें ॥ ७ ॥ त्वरें चालतां नृपमंडळी ॥ तेणें उडाली चरणधूळी ॥ आच्छादिला अंशु-माळी ॥ निबिड पडिला अंधकार ॥ ८ ॥ छत्रचामरांच्या श्रेणी ॥ त्यांची आकाशीं झाली दाटणी ॥ घर्षणें नाना रत्नें धरणीं ॥ पडती तेजस्वी विशाळ ॥ ९ ॥ अनेक वाद्यांचे गजर ॥ शब्द करिती चतुरंग भार ॥ तेणें पडों पाहे अंबर ॥ तळीं फणिवर डळमळी ॥ १० ॥ तों पुढें मार्ग देखिला दुस्तर ॥ तेणें श्रीकृष्ण झाला चिंतातुर ॥ कैसा चालेल सैन्यसागर ॥ या दुर्घट वनांतरीं ॥ ११ ॥ श्रीकृष्ण ह्मणे अर्जुनाप्रति ॥ माझी भ्रमित झाली मति ॥ पुढें न दिसे जावयाची गति ॥ होईल विघ्न मज वाटे ॥ १२ ॥ मग कृष्णासी ह्मणे फाल्गुन ॥ करितां तव नामस्मरण ॥ भस्म होय भ्रांतिवन ॥ तो तूं कैसा भ्रमलासी ॥ १३ ॥ बागुलभेणें काळ झडपे ॥ कीं अंधारचक्रीं रवि हारपे ॥ नातरी मशकभारें मेरु दडपे ॥ ऐसें वाटे मज स्वामी ॥ १४ ॥ कृष्ण ह्मणे मनोवेगें ॥ पुढें अश्व गेले अनुरागें ॥ सैन्य कैसें जाईल त्यांमागें ॥ दुस्तर मार्ग जाण पां ॥ १५ ॥ पुढें सिंहध्वजाचें नगर ॥ तो दैत्य असे कीं बळसागर ॥ त्याणें अश्व धरिल्या संहार ॥ करील यावरी सर्वांचा ॥ १६ ॥ तयासी बोले सुभद्राकांत ॥ तो कोणाचा कोण सांगें मात ॥ कोणाचे वरें मदोन्मत्त ॥ मजलागीं तें निवेदीं ॥ १७ ॥ कृष्ण ह्मणे ऐकें कथन समूळ ॥ तुज मी सांगतों विस्तर ॥ त्याचें जन्मकथानक सादर ॥ होऊनि ऐकें पार्थवीरा ॥ १८ ॥ सुमित्र नामें ऋषीश्वर ॥ होता विज्ञानक्षीरसागर ॥ सारासारविचार चतुर ॥ मूर्तिमंत असे त्यापाशीं ॥ १९ ॥ कीं तो निगमागमांचें वन ॥ कीं स्वधर्माचरणाचें सदन ॥ कीं विवेकवैरागर जाण ॥ कीं ज्ञानगंगेचा लोट तो ॥ २० ॥ कीं तो आत्मगंगातीर विस्तीर्ण ॥ निर्मळोदकेंकरूनि परिपूर्ण ॥ सत्यहृदय अगाध जाण ॥ सुशीळ तटें शोभत ॥ २१ ॥ सर्वभूतदयोर्मी उसळती ॥ सद्भावमत्स्य तळपती ॥ शांतिभावें कूर्म देती ॥ बुडिया तेथें स्वानंदें ॥ २२ ॥ स्वधर्मवृक्ष तीरीं शोभती ॥ शब्दार्थलता त्यांसी वेष्टिती ॥ भक्तिज्ञानफळपुष्पें लवती ॥ ते सेविती मुमुक्षुखग ॥ २३ ॥ ऐसें आत्मगं-

१ जनमेजय. २ जैमिनि. ३ सूर्य. ४ समूह. ५ अर्जुन. ६ प्रेमानें.

गातीर ॥ तें सेवूनि मुनीचें मन[1]मीन स्थिर ॥ तेथें करूनियां [2]पर्णागार ॥ तपश्चर्या मांडिली ॥ २४ ॥ तेथें करूनि अचळासन ॥ मनीं करीतसे भगवद्ध्यान ॥ जेणें दिसे नारायण ॥ जनीं वनीं एकरूप ॥ २५ ॥ तों उत्कंठ नामें धरणी[3]पति ॥ सवें घेऊनि सुता मेधावती ॥ सुमित्रमुनिदर्शनें विश्रांति ॥ घेईन ह्मणोनि चालिला ॥ २६ ॥ आधींच गंगातीर उत्तम ॥ त्यांत मुनीचा आश्रम ॥ तो देखतां सकळ भ्रम ॥ गेला पळोनि दिगंता ॥२७॥ नृपें करूनि मुनिवंदन ॥ अत्यंत पावला समाधान ॥ तेणें करूनियां संभाषण ॥ केला राजा सुखमय ॥ २८ ॥ वंदितां मेधावती मुनिचरण ॥ तेथें जडलें तयेचें मन ॥ ह्मणे मी करीन याचें सेवन ॥ करीन सार्थक जन्माचें ॥ २९ ॥ परी लज्जा धरूनि मानसीं ॥ मनोगत न सांगे जनकासी ॥ राजा परततां गृहासी ॥ वृत्तांत रमणीसी सांगत ॥ ३० ॥ तेथें येवोनि मेधावती ॥ मनोगत सांगे मातेप्रति ॥ मग ती रायाची युवती ॥ सांगे नृपाप्रति आनंदें ॥ ३१ ॥ ऐकतां राव पावला समाधान ॥ ह्मणे केवीं अंगीकारील मुनिभूषण ॥ मग मुनिआश्रमा जावोनि शुश्रूषा जाण ॥ राव नित्य करी त्या नेणतां ॥३२॥ ऐसें क्रमितां वर्षकाळ ॥ तों अकस्मात देखिला भूपाळ ॥ तयाप्रति बोले मुनि दयाळ ॥ किमर्थ सेवा करिसी नृपा ॥ ३३ ॥ मग नृप ह्मणे जी सुमित्रमुनि ॥ माझी मेधावती नंदि[4]नी ॥ ती विनटली स्वामिचरणीं ॥ तदर्थ सेवा ही माझी ॥ ३४ ॥ तरी नंदिनीचें करग्रहण ॥ करावें जी आपण ॥ यदर्थीं प्रसन्न होऊन ॥ अभयवचन मज द्यावें ॥ ३५ ॥ अवश्य ह्मणोनि मुनिभूषण ॥ ऐकतां नृप पावला समाधान ॥ मग पाहूनि उत्तम दिन ॥ कन्या समर्पण पैं केली ॥ ३६ ॥ सुमित्र पावला मेधावती ॥ परम संतोष पावला चित्तीं ॥ जी इच्छा असे या देहाप्रति ॥ तैसी सेवेसी अनुकूळ ॥ ३७ ॥ ऐसी करितां शुश्रूषा ॥ मदनें व्याप्त मुनियोषा ॥ अकस्मात विवेकमंजूषा ॥ भस्म झाली कामानळें ॥ ३८ ॥ कामें व्याप्त सर्वांग पूर्ण ॥ विसरली ती कार्याकारण ॥ संध्याकाळींच ऋतुदान ॥ मागती झाली पतीतें ॥ ३९ ॥ मुनि मनीं चमत्कारला ॥ ह्मणे हें काय आठवलें इला ॥ जाणोनियां संध्याकाळा ॥ केवीं मागे ऋतुदान ॥ ४० ॥ ही केवळ विवेकाची तं[5]टिनी ॥ तिसी आलें अविवेकपाणी ॥ उभय तटें भंगोनि ॥ पूर चालिला वेगानें ॥ ४१ ॥ पुण्यश्लोकाची ही नंदिनी ॥ मुनिवा[6]मांगवासिनी ॥ तये उपजली दुर्वाच्य करणी ॥ ऐसी अघटित कामव्यथा ॥ ४२ ॥ अति अतर्क्य हो कामलीळा ॥ कैसी ही मोहिली राजबाळा ॥ ज्यापासीं नसे साधनकळा ॥ त्यातें काम मारित ॥ ४३ ॥ तरी मदनाऐसा चांडाळ ॥ या त्रिभुवनीं नसे केवळ ॥ न पाहीच काळवेळ ॥ सकळां विटाळ करीतसे ॥ ४४ ॥ अकस्मात घालोनि धाडी ॥ थोरथोरांची पाडी मुरकुंडी ॥ तेथें मानवें तीं बापुडीं ॥ करी रांडोळी धैर्याची ॥ ४५ ॥ [7]महादेवमस्तकभूषण ॥ जो कां षोडशकलाप्रवीण ॥ तया लागतां कामबाण ॥ केलें गमन गुरुस्त्रियेशीं ॥ ४६ ॥ ब्रह्मकन्या देखोनि

१ मनोरूपी मासा. २ पानांची झोंपडी ( पर्णकुटी ). ३ राजा. ४ कन्या. ५ नदी. ६ ऋषीची स्त्री. ७ चंद्र.

गोरटी ॥ इंद्रासी उपजली कामराहाटी ॥ कपटें भोगितां ती नेहटीं ॥ झालीं भगें सर्वांगीं ॥ ४७ ॥ सृष्टिकर्ता चतुराननं ॥ चतुर्वेदांचें ज्यास पारायण ॥ तया लागतां कामबाण ॥ स्वकन्यागमन मांडिलें ॥ ४८ ॥ तपस्वी जो पिनाकपाणि ॥ तोही मोहिला देखतां मोहिनी ॥ निज थोरपणा विसरोनि ॥ धांवे पाठीसी निर्लज्ज ॥ ४९ ॥ कृष्णाची अवाच्य करणी ॥ भोगिली जालंधराची राणी ॥ संबंध पाहातां होय भगिनी ॥ लोळे वृंदावनीं निर्लज्ज ॥ ५० ॥ जो प्रतिसृष्टिकर्ता पूर्ण ॥ उर्वशीस भुलला गाधिनंदन ॥ शेवटीं होऊनियां श्वानं ॥ इंद्रसभेस तो गेला ॥ ५१ ॥ पुराणकर्त्याचा पिता ॥ धीवरकन्या झाला भोगिता ॥ शुष्क केली तपसरिता ॥ मग दुर्गंधा ती सुगंधा केली ॥ ५२ ॥ ज्ञानबळाचे गिरिवर ॥ ते कामबाणवज्रें झाले चूर ॥ तेथें अबला स्त्री सुंदर ॥ मोहिली आश्चर्य काय याचें ॥ ५३ ॥ जाति कुळ विद्या वय ॥ यांचा कांहीं न करी निर्णय ॥ एकदांच सुकृताचा क्षय ॥ करीत काम नेटका ॥ ५४ ॥ ऐकिली धनुर्धरांची ख्याति ॥ ते शरेंकरूनि द्विधा करिती ॥ परी या कामबाणाची स्थिति ॥ लागतां ऐक्य करी उभयतां ॥ ५५ ॥ मी झालों असें वयातीत ॥ अंग झालें शक्तिरहित ॥ आतां मज काय करील रतिकांत ॥ ऐसें कदापि न ह्मणावें ॥ ५६ ॥ जोंवरी होय शरीर भस्म ॥ तोंवरी छळी हा काम ॥ माझा प्राणांत चालेल नेम ॥ ऐसा पण न करावा ॥ ५७ ॥ ऐसिया कामें व्यापिली ॥ मुनीनें नाना परी समजाविली ॥ परी ती अविवेकें प्राशिली ॥ नायकेचि सर्वथा ॥ ५८ ॥ सुमित्रमुनि ह्मणे राजसे ॥ हा तों संध्याकाळ झाला असे ॥ निषेध धरिलासे शास्त्रवशें ॥ मन्वादिकीं रतिरंग ॥ ५९ ॥ परी अगाध कामज्वाळा ॥ तेणें तापली ती बाळा ॥ बाहु घातले गळां ॥ कामलोभें पतीच्या ॥ ६० ॥ मुनीनें भविष्य जाणोन ॥ तयेसी दिधलें ऋतुदान ॥ तेव्हांचि गर्भ राहून ॥ वाढतां झाले नवमास ॥ ६१ ॥ दशम मास झालिया प्राप्त ॥ मेधावती झाली प्रसूत ॥ असुरवेळायोगें सुत ॥ तिघे तामस जाहले ॥ ६२ ॥ ज्येष्ठ पुत्र वीरकेतु ॥ त्या धाकुटा गृध्रकेतु ॥ त्या धाकुटा धर्मसेतु ॥ सिंहध्वज जन्मला ॥ ६३ ॥ त्या सिंहध्वजें मांडिलें तप ॥ त्या तपें भय पावला सुराधिप ॥ त्या ज्वाळा येतां पुरासमीप ॥ इंद्र गेला सत्यलोका ॥ ६४ ॥ तेथें येतां तपज्वाळा ॥ ब्रह्मा वैकुंठा पावला ॥ तोही तपाग्नीनें पोळला ॥ मग तिघेही कैलासा धांवती ॥ ६५ ॥ तोही तप्त होतां पूर्ण ॥ तेथोनि निघाले चौघेजण ॥ तया द्यावयातें वरदान ॥ आले वेगें सिंहकेतूपासीं ॥ ६६ ॥ वर द्यावया चौघेजण ॥ उभे ठाकले कर जोडून ॥ परी तो न पाहे दृष्टि उघडोन ॥ ऐसा ध्यानस्थ बैसलासे ॥ ६७ ॥ दाहा सहस्र वर्षीं पूर्ण ॥ विसर्जिलें तेणें ध्यान ॥ पाहे दृष्टि जंव उघडोन ॥ तंव ते चौघे देव देखिले ॥ ६८ ॥ इंद्र ब्रह्मा हरि हर ॥ ह्मणती प्रसन्न झालों मागें वर ॥ मग त्यांतें पूजोनि सादर ॥ काय उत्तर बोलत ॥ ६९ ॥ जरी प्रसन्न झालां मजलागून ॥ तरी सुरासुर

१ ब्रह्मदेव. २ शंकर. ३ विश्वामित्र. ४ कुत्रा. ५ पराशर. ६ सत्यवती. ७ महापर्वत. ८ पुण्याचा. ९ मदन. १० इंद्र.

राक्षस गण ॥ वृद्ध हो अथवा तरुण ॥ त्यांपासोनि मरण नसो ॥ ७० ॥ ब्रह्मा विष्णु शिव [1]शचीरमण ॥ तुमचाही असेल मूळ-कारण ॥ त्यापासोनि न पावावें मरण ॥ हें वरदान मज द्यावें ॥ ७१ ॥ सुरासुर राक्षसवीर ॥ ते सर्व असावे माझे किंकर[2] ॥ बरवें ह्मणोनि हरि हर ॥ देवोनि वर ते गेले ॥ ७२ ॥ ऐसें पावतां वरदान ॥ सर्व जिंकिलें त्रिभुवन ॥ तो त्रिभुवनासी असे अजेय पूर्ण ॥ तो या नगरीं असे पार्था ॥ ७३ ॥ त्याणें धरितां आमुचे हय ॥ तरी सर्वांचा जाणावा झाला क्षय ॥ ह्मणोनियां वाटतें भय ॥ ऐसें श्रीकृष्ण बोलिला ॥ ७४ ॥ ऐसें ऐकतां सर्व भूप ॥ भयभीत झाले अमूप[3] ॥ जेवीं वातें कांपती दीप ॥ तैसे कांपों लागले ॥ ७५ ॥ मग बोले भगवान ॥ चला पुढें करूं गमन ॥ उदंड केलिया प्रयत्न ॥ होणार तें न चुकेचि ॥ ७६ ॥ ऐसें बोलतां यदुवंशदीप[4] ॥ घाबरे झाले सर्व भूप ॥ शीघ्र पातले पुरासमीप ॥ तों अश्व उभे महाद्वारीं ॥ ७७ ॥ नगरलोकांचे लक्ष बाळ ॥ बाहेरी खेळत होते खळ ॥ त्यांहीं देखतां अश्वयुगुळ[5] ॥ उत्तम ह्मणोनि धरियेले ॥ ७८ ॥ भाळीं कनकपत्र देखिलें ॥ तें सोडोनियां वाचिलें ॥ पत्रार्थानें विदित झालें ॥ अश्वराज हे धर्माचे ॥ ७९ ॥ प्रौढीचें जाणोनि लेखन ॥ बाळां चढला अभि-मान ॥ धरूनियां श्यामकर्ण ॥ नगरामाजी धाडिले ॥ ८० ॥ कैंचा धर्म कैंचा पार्थ ॥ कासयाचा आहे पुरुषार्थ ॥ आह्मी असुर-शिशु विख्यात ॥ मानवभयें न भिऊं ॥ ८१ ॥ देखतांचि ते दळभार ॥ धांवले प्रजांचे कुमर ॥ युद्धालागीं अति सत्वर ॥ करि-ते झाले तेधवां ॥ ८२ ॥ लागले वाद्यांचे गजर ॥ सिंहनादें गर्जती वीर ॥ सोडिते झाले अपार ॥ शरजाळ तेधवां ॥ ८३ ॥ पाषाणवृष्टि मुद्गल तोमर ॥ परिघ त्रिशूळ आणि शर ॥ वर्षों लागले पौरजभार ॥ पार्थसैन्यावरी ते ॥ ८४ ॥ परम दारुण युद्ध मांडलें ॥ नाना अस्त्रीं वीर खोंचिले ॥ अशुद्धपूर[6] वाहों लागले ॥ वीर आटले अपार ॥ ८५ ॥ मग तो अनुशाल्ववीर ॥ मारीत उठिला सत्वर ॥ तंव धांवले ते कुमर ॥ वेढिला वीर समस्तीं ॥ ८६ ॥ जेवीं चंदना वेष्टिजे विखारें[7] ॥ तेवीं तो दैत्य पौरजभारें ॥ विंधिती नाना शस्त्रभारें ॥ घाबिरा केला तेधवां ॥ ८७ ॥ मग गुर्णीं[8] लाविले बाण लक्ष ॥ सोडिता झाला वीर दक्ष ॥ अनु-शाल्वें वीरपक्ष ॥ पौरजांचा भंगिला ॥ ८८ ॥ सहस्रावधि ते वेळां ॥ पौरजभार मारिला ॥ उरल्यांस पळ सुटला ॥ नगरामाजी ते गेले ॥ ८९ ॥ तेथोनि काढिले अनामिक[9] ॥ संगें घेतलें वीरकटक ॥ ते येवोनि सोडिते झाले अनेक ॥ बाणजाळ तेधवां ॥ ९० ॥ मग अनुशाल्व ह्मणे मुख्य वीरा ॥ तूं कां रे फिरसी सैरावैरा ॥ आतां साहें माझिया शरां ॥ ह्मणोनि बाण वर्षतसे ॥ ९१ ॥ रथ अश्व आणि नर कुंजर ॥ मारीत चालिला दैत्यवीर ॥ तंव अंत्यजनायक थोर ॥ कोपाविष्ट जाहला ॥ ९२ ॥ तेणें अपार युद्ध केलें ॥ रणांगणीं असंख्य वीर मारिले ॥ अनुशाल्वासी त्रासिलें ॥ बाणघातेंकरूनियां ॥ ९३ ॥ मग अनुशाल्वें का-

१ इंद्र. २ सेवक. ३ अत्यंत. ४ श्रीकृष्ण. ५ घोड्यांची जोडी. ६ रक्ताचे लोट. ७ सर्पानें. ८ दोरीला. ९ महार.

ढिला बाण ॥ तो गुणीं लाविला अति दारुण ॥ सोडितां तेणें छेदून ॥ पाडिला तो एकीकडे ॥ ९४ ॥ मग अंत्यजें शरमार
केला ॥ पांडवदळीं हाहाकार झाला ॥ तंव अनुशाल्व कोपा चढला ॥ ह्मणे सांभाळीं रे आपणा ॥ ९५ ॥ तंव अंत्यज अनु-
शाल्वा बोलत ॥ तुवां केलें रे अनुचित ॥ मानवा जावोनि शरणागत ॥ येथें करिसी युद्धातें ॥ ९६ ॥ सर्वांचा हा धर्म पूर्ण ॥
आपले जातीस जावें शरण ॥ तेथें पावतां मरण ॥ तयांलागीं श्लाघ्यता ॥ ९७ ॥ तूं आपणा ह्मणविसी वीर ॥ तुझें आतां उड-
वितों शिर ॥ तुज कोण राखील वीर ॥ मजपासोनि यावरी ॥ ९८ ॥ ऐकतांच ऐसें वचन ॥ दैत्येंद्र झाला क्रोधायमान ॥ गुणीं
लावोनियां बाण ॥ तो आकर्ण ओढोनि सोडिला ॥ ९९ ॥ मग सवेंचि दुजा बाण ॥ सोडिला काळमंत्रें मंत्रून ॥ तेणें अंत्यजाचें
शिर छेदून ॥ आकाशपंथें उडविलें ॥ १०० ॥ रणीं पडतां तो अंत्यज ॥ सैन्य पळालें तें सहज ॥ दैत्यराज तेजःपुंज ॥ वीर-
श्रीनें शोभला ॥ १ ॥ संहारिले अंत्यजभार ॥ थोर झाला हाहाकार ॥ जे उरले अंत्यज समग्र ॥ ते पळोनि गेले नगरांत
॥ २ ॥ पुढिले प्रसंगीं जाण ॥ युद्ध होईल अति दारुण ॥ तें ऐकावें सावधान ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ३ ॥ ॥ इति श्रीधर्मा-
श्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ सिंहध्वजआख्यानअगाध ॥ अष्टसप्ततितमाध्याय गोड हा ॥ १०४ ॥ ॥ इति श्रीमहाभारते
आश्वमेधिके जैमिनिकृते सिंहध्वजाख्यानं नाम अष्टसप्ततितमोध्यायः ॥ ७८ ॥ ॥ अध्याय ॥ ७८ ॥ ओव्या ॥ १०४ ॥
॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ छ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

## अध्याय ७९.



श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे गा भारता ॥ पुढें कैसी वर्तली कथा ॥ चित्तीं करूनि एकाग्रता ॥ श्रवण करीं आदरें ॥१॥ रणीं पडिलिया अंत्यजपाळ ॥ ऐकोनि धांविन्नला तो तराळ ॥ संगें घेवोनि निजदळ ॥ नगराबाहेर निघाला ॥ २ ॥ तेथील लोक ग्रामवासी ॥ तयांची सेवा करावयासी ॥ ग्रामस्थीं वृत्ति दिधली ज्यासी ॥ तराळ त्यासी बोलिजे ॥ ३ ॥ ऐसा तो तराळपाळ ॥ सोडिता झाला बाणजाळ ॥ मर्दिता झाला पांडवदळ ॥ युद्ध तुंबळ मांडिलें ॥ ४ ॥ तयाचे शर येती दुधारी ॥ लागतां मध्येंचि विदारी ॥ एकाचीं केलीं कांडोरीं ॥ ऐसा मारित दळभार ॥ ५ ॥ तंव तो अनुशाल्व प्रबळ ॥ वर्षता झाला बाणजाळ ॥ तों समीप देखतां तराळ ॥ तयासी काय बोलतसे ॥६॥ ऐक रे तूं महावीरा ॥ कासया धांवसी सैरावरा ॥ साहें साहें माझ्या शरा ॥ ह्मणोनि संधान मांडिलें ॥ ७ ॥ आकर्ण ओढोनियां शर ॥ तेणें सोडिला तो अति सत्वर ॥ तेणें तयाचें उडविलें शिर ॥ एक क्षण न लागतां ॥ ८ ॥ मग दैत्यें सोडोनि अपार शर ॥ करी त्याचे दळाचा संहार ॥ घायाळ पळाले सत्वर ॥ नगरामाजी तेधवां ॥ ९ ॥ ऐसा ऐकोनि वीरआक्रोश ॥ वेगें उठावला ग्रामाधीश ॥ सवें घेऊनियां सैन्यास ॥ नगराबाहेर निघाला ॥ १० ॥ तेणें युद्ध मांडिलें अपार ॥ वीरांचा करीतसे संहार ॥ गजाश्व आणि रथांचा चूर ॥ शरसंघातें करीतसे ॥११॥ एक शरें नभीं उडविला ॥ एक बाणें द्विधा केला ॥ एक खड्गें उभाचि चिरिला ॥ ऐसे वीर पाडिले रणभूमीं ॥ १२ ॥ तें देखतां दैत्य आवेशला ॥ ह्मणे भला रे संग्राम केला ॥ जरी पतंग बळें मातला ॥ तरीं अग्निमाजी भस्म होय ॥ १३ ॥ अरे मूर्खा मशका ॥ काय न भिसी मज अंतका ॥ आतां जावें यमलोका ॥ उबगोनियां जीवासी ॥ १४ ॥ आतां सोडोनियां बाण ॥ तुझे काढीन रे पंचप्राण ॥ होवोनियां सावधान ॥ करीं भजन देवाचें ॥ १५ ॥ मग अपार सोडिले शर ॥ तेणें दाटलें अंबर ॥ अनुशाल्व महाप्रबळ वीर ॥ छेदिलें शिर तयाचें ॥ १६ ॥ अन्यजाती जरी जाला संपन्न ॥ तरी भोगावें भाग्यभूषण ॥ हा तो क्षात्रधर्म अति दारुण ॥ नाचरवे कोणें नृपवर्या ॥१७॥ तयाचें जें सर्व दळ ॥ तें भयें करीत कल्लोळ ॥ नगरीं पळाले घायाळ ॥ प्रधानासी सांगती ॥ १८ ॥ तयांसी पुसे तो प्रधान ॥ कोठें झालें रे समरांगण ॥ आले कितीक वीरगण ॥ तें कथन मजला सांगा रे ॥ १९ ॥ ऐसें ऐकतां वीर त्वरित ॥ प्रधानालागीं सांगत ॥ स्वामी होवोनि सावचित्त ॥ सर्व वृत्तांत ऐकावा ॥ २० ॥ राजपुत्रेंसीं पौरजबाळ ॥ बाहेरी खेळत होते खेळ ॥ तंव श्यामकर्णाचें युगुल ॥ महाद्वारीं देखिलें ॥ २१ ॥ तें देखोनि बाळ धांवले ॥ अश्व धरोनि उभे केले ॥ भाळपत्र जंव वाचिलें ॥ तंव यज्ञाश्व धर्मरायाचे ॥ २२ ॥ त्यांत अनुशाल्व नामें असुर ॥ तेणें युद्ध केलें घोरांदर ॥ पौरज आणि राजपुत्र ॥ सर्व दळेंसीं भंगिले ॥ २३ ॥ तें देखोनि अंत्यजनाथ ॥ रणा गेला तो धांवत ॥ संग्राम करितां अद्भुत ॥ रणांगणीं तो निमाला ॥ २४ ॥ तें देखतां धांवला

१ बाण. २ आकाशांत. ३ कंटाळून. ४ सैन्य. ५ जोडी.

तराळ ॥ संगें घेवोनि अमित दळ ॥ तेणें केलें युद्ध तुंबळ ॥ शेवटीं तोही निमाला ॥ २५ ॥ एकांग वीर तो दैत्यनाथ ॥ तेणें केला ऐसा घात ॥ आह्मी शेवटास होतों पाहात ॥ ह्मणोनि फावलें पळावया ॥ २६ ॥ पळतां पळतां लागले शर ॥ तेणें रक्तमय झालें शरीर ॥ तुह्मीं न करावा आतां उशीर ॥ जावोनि वधावें तयातें ॥ २७ ॥ ऐकतांच ऐसें वचन ॥ प्रधान झाला क्रोधायमान ॥ जेवीं घृतें शिंपितां खवळे हुं[१]ताशन ॥ त्याचपरी खवळला ॥ २८ ॥ घाव दिधला निशाणा ॥ सिद्ध केली सकळ सेना ॥ सवें घेवोनि कोटि वीरगणा ॥ रणांगणीं चालिला ॥ २९ ॥ तों सुकेत नामें सेनापति ॥ प्रधानासी कर जोडूनि करी विनंति ॥ आधीं मी जावोनि युद्धाप्रति ॥ मारोनि येतों तयातें ॥ ३० ॥ ऐसें बोलोनि सेनापति ॥ सवें बंधु घेतला रणपति ॥ शीघ्र पावला रणक्षि[२]तीं ॥ परम संतोष मानोनियां ॥ ३१ ॥ रणोत्साह होय वीरांसी ॥ आमंत्रणोत्साह ब्राह्मणांसी ॥ भ्रतारोत्साह पतिव्रतेसी ॥ तृणोत्साह चतु[३]ष्पदां ॥ ३२ ॥ ऐसे दोघे सुखावले ॥ नाना बाण वर्षों लागले ॥ सर्वही दळ भंगिलें ॥ मग पाचारिलें अनुशाल्वा ॥ ३३ ॥ फिरोनि पाहे असुरपति ॥ तों मागें सुकेत आणि रणपति ॥ नाना शस्त्रें वर्षती ॥ जेवीं धरे [४]जळधर वर्षे ॥ ३४ ॥ तंव सुकेत बोले अनुशाल्ववीरा ॥ आतां पाय न घालीं माघारा ॥ साहें साहें माझिया शरा ॥ घाबिरा कां झालासी ॥ ३५ ॥ तूं तंव अससी वीरश्रेष्ठ ॥ परी आतां पावसी मृत्युवाट ॥ पाहा एकाचि शरें नीट ॥ यमलोकासी धाडितों ॥ ३६ ॥ ऐकतां ऐसें त्यांचें उत्तर ॥ त्यांप्रति बोले दैत्येंद्र ॥ तुह्मीं काळाचें [५]अंवतिलें घर ॥ ह्मणोनि आलेति या ठाया ॥ ३७ ॥ दीपावरी जो पतंग आला ॥ तो कदापि नाहीं माघारा गेला ॥ तोचि समय येथें प्राप्त झाला ॥ तरी होईं आतां सावधान ॥ ३८ ॥ ऐसे तयाचे शब्द ऐकिले ॥ मग क्रोधें दोघेही थडाडिले ॥ अमित बाणांतें वर्षों लागले ॥ वीर पाडिले रणांगणीं ॥ ३९ ॥ बाणामागें बाण उदं[६]डं ॥ सोडिते झाले महाप्रचंड ॥ परी अनुशाल्व करूनि टाकी दुखंड ॥ जेवीं इक्षुदंड शस्त्रघातें ॥ ४० ॥ ऐसें एकमेकांतें मारिती ॥ एकमेकांतें तोडिती ॥ एकमेकांतें खोंचिती ॥ घेऊनि शस्त्रें परस्परें ॥ ४१ ॥ हे दोघे तो एकला ॥ परी तयांतें नसे भियाला ॥ गजद्वयें वेढितां शार्दू[७]ळाला ॥ तयातें भय न वाटे तेपरी ॥ ४२ ॥ दोघे झाले दोहींकडे ॥ शर मारिताती दे[८]हुडे ॥ करिती सैन्याचे रगडे ॥ परी तो नव्हेचि असावध ॥ ४३ ॥ जेवीं हरिभक्त विवेकी चतुर ॥ स्वार्थीं परमार्थीं सादर ॥ तैसाचि अनुशाल्व वीर ॥ दोघांलागीं भांडतसे ॥ ४४ ॥ मग रथाखालीं घालोनि उडी ॥ सेनापति धांवे तांतडी ॥ चर्म खड्ग घेवोनि गडाडी ॥ प्रळयकाळीं मेघ जैसा ॥ ४५ ॥ मग दैत्यें बाण सोडिला ॥ सेनापतीचा कंठ तोडिला ॥ शिर उडवूनि ते वेळां ॥ गगना धाडिलें रिपूचें ॥ ४६ ॥ दुजा सोडिला निर्वाणबाण ॥ तो रणपतीसी भेटला जाण ॥ काढिले तयाचे पंचप्राण ॥ दैत्येंद्रशरें तेधवां ॥ ४७ ॥ ऐसे ते दोघे रणीं पडिले ॥ घायाळ उरले ते पळोनि



१ अग्नि. २ समरांगणीं. ३ जनावरांना. ४ मेघ. ५ आमंत्रण केलें. ६ अनंत. ७ वाघाला. ८ समोरासमोर.

गेले ॥ नगरामाजी संचरले ॥ वार्ता सांगती प्रधाना ॥ ४८ ॥ ह्मणती दोघेही वीर निमाले ॥ उरले ते सर्व पळोनि गेले ॥ वीरें वीर रणीं आटिले ॥ काय पाहासी निर्वाण[1] ऊठ आतां ॥ ४९ ॥ ऐसें ऐकोनि तयांचें वचन ॥ वेगें उठावला तो प्रधान ॥ जाळावयालागीं शत्रुतृण[2] ॥ प्रळयानळ चालिला जेवीं ॥ ५० ॥ सेना घेवोनि असंख्यात ॥ रणासी आला प्रधान धांवत ॥ नाना वाद्यें हो वाजत ॥ छत्र ध्वज पताका शोभती ॥ ५१ ॥ संग्रामभूमीं उभा दैत्यनाथ ॥ बभ्रुवाहन आणि वृषकेत ॥ हे तयालागीं स्तवित ॥ ह्मणती महावीर गाढा तूं ॥ ५२ ॥ फिरोन पाहे दैत्यभूषण ॥ तों येतां देखिला सुमित्र प्रधान ॥ शर वर्षतसे महादारुण ॥ जेवीं मेघधारा पर्वतावरी ॥ ५३ ॥ परस्परें झाली समदृष्टी ॥ युद्ध माजलें घनदाटी ॥ नराश्वरथगजाचिया थाटी[3] ॥ भग्न होती अनेक ॥ ५४ ॥ अनुशाल्वासी बोले प्रधान ॥ तुज लागलें रे महादूषण ॥ तूं मानवा गेलासी शरण ॥ दैत्यकुळीं जन्मोनियां ॥ ५५ ॥ तें पातक झालें तुझे शरीरीं ॥ त्याचें प्रायश्चित्त आतांचि करीं ॥ माझिया शरतीर्थामाझारीं ॥ देह सोडीं आपुला ॥ ५६ ॥ तुज झाला संगतिदोष ॥ तो आतांचि हरीन निःशेष ॥ शिवचापासी झाला संगदोष ॥ ह्मणोनि प्रायश्चित्त रामहस्तें ॥ ५७ ॥ शिवें शिर छेदिलें विधीचें ॥ भस्म केलें मदनाचें ॥ पाप झालें तत्संगतीचें ॥ ह्मणोनि कष्टी शिवधनुर्ष्य[4] ॥ ५८ ॥ आणि भार्गवासी[5] घडला मातृवध ॥ क्षत्रियकुळें वधिलीं अगाध ॥ त्या संगतीचें पाप प्रसिद्ध ॥ झालें ह्मणोनि कष्टी तें ॥ ५९ ॥ शिवभार्गवसंगें रणपाप ॥ मज घडलें कीं अमूप ॥ तें तीर्थीं हरीन ह्मणोनि चाप[6] ॥ चित्तीं विवंचना करीतसे ॥ ६० ॥ त्या धनुष्यें पश्चात्तापें जाण ॥ सीतास्वयंवरातें लक्षून ॥ अनेक तीर्थें आलीं धांवून ॥ परी न येती धनुष्याचे मना ॥ ६१ ॥ तों अकस्मात तीर्थराज ॥ तेथें आला तो रघुराज ॥ तत्पाणितीर्थ पाहातां सहज ॥ ह्मणे मी पावन होईन ॥ ६२ ॥ मग तें शिवाचें शरासन ॥ रामतीर्थपाणी सेवून ॥ निष्पाप झालें होतां द्विखंडन ॥ तेवीं तूं होई मम शरें ॥ ६३ ॥ आपण ह्मणविसी श्रेष्ठ ॥ परी भाससी मज परम कनिष्ठ ॥ आतां तुज दाखवीन वाट ॥ यमलोकाची यावरी ॥ ६४ ॥ तोंवरीच विराजे खद्योत[7] ॥ जों उदेला नाहीं आदित्य[8] ॥ तोंवरीच प्रतिष्ठित असत्य ॥ जोंवरी सत्य नाहीं देखिलें ॥ ६५ ॥ तोंवरीच नक्षत्रांचें तेज ॥ जोंवरी उदय नाहीं द्विजराजें[9] ॥ तोंवरीच तूं तेजःपुंज ॥ जोंवरी मज नव्हतें देखिलें ॥ ६६ ॥ तंव दैत्येश ह्मणे वाजटा ॥ व्यर्थ कां करिसी चावटा ॥ तव सैन्य लाविलें बारा वाटां ॥ हें काय दृष्टीं न देखसी ॥ ६७ ॥ जो संग्रामासी आहे शूर ॥ तो काय वानी आपुला बडिवार ॥ अशक्ताच्या वल्गना फार ॥ व्यर्थ काय जाळाव्या ॥ ६८ ॥ ऐसें बोलोनि परस्परें ॥ मारिते झाले शरधारें ॥ छिन्नभिन्न शरीरें ॥ उभयतांचीं जाहलीं ॥ ६९ ॥ वसंत आलिया वनास ॥ रक्तपुष्पीं शोभती पळस ॥ तैसे ते दोघे वीरेश ॥ आरक्तमय शोभती ॥ ७० ॥ कोट्यवधि सोडिले बाण ॥ नभीं होतां तयांचें घर्षण ॥ तेथो-

१ शेवट, अंत. २ शत्रुरूपी गवत. ३ समूह. ४ पिनाक. ५ परशुरामाला. ६ धनुष्य. ७ काजवा. ८ सूर्य. ९ चंद्र.

निया वर्षला ज्वलन ॥ जाळीत इंधनसैन्यातें ॥ ७१ ॥ परस्परें लक्षोनि ॥ विंधिते झाले अनंत बाणीं ॥ अंबरामाजी झाली शर-
दाटणी ॥ तेणें दिनमणि लोपला ॥ ७२ ॥ मग अनुशाल्व क्रोधावला ॥ धांवोनि रथ मकरतोंडीं धरिला ॥ चारी वेळ गरगरां फिर-
विला ॥ मग आपटिला मेदिनीवरी ॥ ७३ ॥ तो सुमित्र प्रधान आगळा ॥ तेणें पडावा तों सांभाळिला ॥ दुजे रथावरी जंव
बैसला ॥ तंव तोही आपटिला तेच क्षणीं ॥ ७४ ॥ ऐसा जो जो सुमित्र घेत रथ ॥ तो तो आपटी दैत्यनाथ ॥ ऐसे रथांचें पाहातां
गणित ॥ सहस्र एक जाहलें ॥ ७५ ॥ ऐसा त्याचा पराक्रम ॥ देखोनियां प्रधानोत्तम ॥ ह्मणे हा वीर दारुण परम ॥ नाटोपेचि
मजलागीं ॥ ७६ ॥ ह्मणे भलें रे दैत्यनाथा ॥ दाविलेंसी आपुल्या पुरुषार्था ॥ माझाही पराक्रम आतां ॥ सावध होवोनि पाहें रे
॥ ७७ ॥ मग सुमित्र प्रधानें बाण सोडून ॥ अनुशाल्वासी दाविलें गगन ॥ तळीं येतांच सोडून मार्गणें ॥ पुनः नेत आकाशा ॥ ७८ ॥
ऐसें येतां जातां गणित ॥ झालें तें पांच शत ॥ दैत्येंद्र मनीं झाला विस्मित ॥ ह्मणे हा वीर असे पराक्रमी ॥ ७९ ॥ मग तयासी
बोले वाणी ॥ काय करिसी रे वल्गनी ॥ यावरी तव प्राणांची हानि ॥ झाली ऐसें समजावें ॥ ८० ॥ तुवां व्यर्थ सोडिलें कृष्णातें ॥
आतां तरी आठवीं तयातें ॥ योगी चिंतिती जयातें ॥ अंतसमयालागोनि ॥ ८१ ॥ ऐसें बोलोनि सोडिला बाण ॥ तो रुद्रमंत्रें
अभिमंत्रून ॥ गर्जतसे प्रळयविजेसमान ॥ तेजें दशदिशा उजळल्या ॥ ८२ ॥ तो शूळाकार निर्वाणबाण ॥ त्याचें न होय निवारण ॥
तेणें अनुशाल्वाचा प्राण ॥ क्षणमात्रें घेतला ॥ ८३ ॥ मग अपार शर सोडिले ॥ वीरें वीर त्रासिले ॥ रक्तप्रवाह वाहों लागले ॥
भय सुटलें पांडववीरां ॥ ८४ ॥ पांडवदळ ते वेळे ॥ भयें दश दिशां पळों लागलें ॥ तें देखोनि धांवणें केलें ॥ कृष्णपुत्रें तेधवां
॥ ८५ ॥ तो ह्मणे रे सुमित्रा वीरा ॥ आतां न फिरें रे माघारा ॥ मारोनियां दैत्येश्वरा ॥ कोठें जाशील पळोनि तूं ॥ ८६ ॥ मग
शर सोडिले विचित्र ॥ तेणें भेदला तो सुमित्र ॥ छिन्नभिन्न झालें गात्र ॥ रक्तेंकरून न्हाणिला ॥ ८७ ॥ सवेंचि तेव्हां कृष्णसुतें ॥
प्रधान विंधिला बाणशतें ॥ अश्व रथ आणि ध्वजातें ॥ छेदोनियां पाडिलें ॥ ८८ ॥ प्रधान बोले कृष्णसुता ॥ जेथें असतील रम्य
योषिता ॥ तेथें पराक्रम करितां ॥ तुजलागीं रे पाहिलें ॥ ८९ ॥ नारी आणि तापस ॥ तयांसी द्यावा तुवां त्रास ॥ जेथें ठाव असे
विवेकास ॥ तेथें अज्ञान पळे भयेंकरूनि ॥ ९० ॥ येथें न चाले तुझा प्रयास ॥ कां व्यर्थ पावसी नाश ॥ आतां तूं राखें आपणास ॥
बाण साहें माझे रे ॥ ९१ ॥ ऐसें ऐकतां हरिनंदन ॥ सक्रोध झाला यमासमान ॥ वेगें सोडिला दारुण बाण ॥ केला चूर्ण रथ तेणें
॥ ९२ ॥ तंव सुमित्रें घेतला दुजा रथ ॥ त्याचाही केला निःपात ॥ ऐसे छेदितां रथांचें गणित ॥ सात शतें अवधारा ॥ ९३ ॥
ऐसा देखोनियां संग्राम ॥ क्रोधावला प्रधानोत्तम ॥ मग करूनियां नेम ॥ निर्वाण शर सोडिला ॥ ९४ ॥ तो अति कठिण मार्गण ॥

१ अग्नि. २ आकाशांत. ३ सूर्य. ४ पराक्रमाला. ५ बाण. ६ प्रद्युम्नानें. ७ स्त्रिया. ८ मदन. ९ लढाई.

हृदयावरी बैसला येऊन ॥ तेणें कृष्णपुत्राचे पंचप्राण ॥ काढूनि नेले क्षणमात्रें ॥ ९५ ॥ ऐसें देखतां त्याचिया कर्मा ॥ वेगें वीर धांवला कृतवर्मा ॥ तेणें दाविलें क्षात्रधर्मा ॥ परी कांहींच त्यापुढें न चाले ॥ ९६॥ सुमित्र वीर अति दारुण ॥ सोडिला एक निर्वाणबाण ॥ तो लागतांचि कृतवर्मा जाण ॥ मूर्च्छागत पडिला धरणीसी ॥ ९७ ॥ तें देखोनि कर्णसुत ॥ वेगें धांवला वृषकेत ॥ मुखें तयातें काय बोलत ॥ भला वीरा स्थिर राहें ॥ ९८॥ तुवां करूनियां पैजा ॥ मारिलेंसी रे कृष्णात्मजा ॥ आतां बाण साहें माझा ॥ ह्मणोनि करीत संधान ॥ ९९ ॥ वृषकेतु वीर अति दारुण ॥ बाण वर्षतसे अति तीक्ष्ण ॥ तेणें कासावीस प्रधान ॥ झाला जाण तेधवां ॥ १०० ॥ मग प्रधानें काय केलें ॥ भैरवास्त्रातें योजिलें ॥ भैरवसैन्य मारूं लागलें ॥ त्रिशूळ डमरु घेऊनि ॥ १ ॥ कोट्यवधि भैरवगण ॥ युद्ध करिती अति दारुण ॥ तें देखतां कर्णनंदन ॥ काय करिता जाहला ॥ २ ॥ नृसिंहअस्त्रातें सोडून ॥ पळविले ते भैरवगण ॥ मग मारित चालिला दारुण ॥ आटिलें दळ तयाचें ॥ ३ ॥ मग ब्रह्मास्त्र सोडी प्रधान ॥ तेणें वधूं पाहे कर्णनंदन ॥ येरें नारायणास्त्र सोडून ॥ तया अस्त्रातें निवारिलें ॥ ४ ॥ तें ग्रासित चालिलें गगन ॥ तेजें प्रळयासमान ॥ त्याचे भयें पळों लागले सुरगण ॥ दश दिशा आंदोळल्या ॥ ५ ॥ त्याचें नसेचि निवारण ॥ झांकले प्रधानाचे नयन ॥ हृदयकमळीं आदळोन ॥ घेतला प्राण तयाचा ॥ ६ ॥ सुमित्र प्रधान रणीं पडिला ॥ हाहाकार दळामाजी जाहला ॥ सैन्यास कोणी नसे आवरायाला ॥ विजयी झाला वृषकेतु ॥ ७ ॥ नेणों कनकाचळ केवळ खचला ॥ कीं प्रतापकडा कोसळला ॥ किंवा प्रतापसागर आटिला ॥ कर्णात्मजें तेधवां ॥ ८ ॥ ऐसा सुमित्र पडिला रणीं ॥ मारिली सर्वही वाहिनी ॥ यावरी तो दैत्येंद्र रणीं ॥ सिंहकेत येईल ॥ ९ ॥ तेथें युद्ध होईल दारुण ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ तें ऐकावें सावधान ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ११० ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ सिंहध्वजआख्यान अगाध ॥ नवसप्ततितमोऽध्याय गोड हा ॥ १११ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते सिंहध्वजाख्यानं नाम नवसप्ततितमोऽध्यायः॥ ७९ ॥ ओव्या ॥ १११ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जनमेजय ह्मणे जैमिनि ॥ तूं वक्तयामाजी शिरोमणि ॥ अमृतमय कथा ऐकता श्रवणीं ॥ विश्रांति मनीं होतसे ॥ १ ॥ ऋषिवर ह्मणे भूपति ॥ ऐक पूर्वजकथाभागीरथी ॥ श्रवणें त्रिविध ताप हरती ॥ अंतर करिती अति शुद्ध ॥ ॥ २ ॥ व्यासस्वर्गींहून जन्मली ॥ सूतगंगाद्वारीं प्रगटली ॥ श्रोताभगीरथें आणिली ॥ निजपूर्वज तारावया ॥ ३ ॥ क्रोधकपिलें जाळिले ॥ विषयविषें सगर झाले ॥ ते ये गंगेनें उद्धरिले ॥ नाहीं आणिले जन्ममरणा ॥ ४ ॥ ओष्ठपुटें दोनी तटें ॥ मध्यें कथामृतजळ गोमटें ॥ प्रेमतरंग उठती नेटें ॥ आवर्त[1] तेथें असेचिना ॥ ५ ॥ ही अनंतवदना झाली ॥ अद्वयसागरा मिळाली ॥ उत्तममध्यमें उच्चारिली ॥ यापरी व्यापिली त्रिभुवनीं ॥ ६ ॥ ये नदींतील जलचर थोर ॥ ध्रुव प्रल्हाद विधिपुत्र ॥ येथील अनंत एक कर्णधार ॥ आंवली कृपादृष्टीनें ॥ ७ ॥ तीरीं स्वधर्मतरू शोभती ॥ भक्तिलतावेष्टित दिसती ॥ ज्ञानविज्ञानफळें लवती ॥ देखतां हरिती भवश्रम ॥ ८ ॥ त्यांवरी मुमुक्षु[2] नर विहंगमें[3] ॥ फळें सेवितां जाय भवभ्रम ॥ अखंड परम आनंद आराम ॥ होय सद्भावें सेवितां ॥ ९ ॥ हें ब्रह्मकथाविवरण ॥ ब्रह्मादिकां न करवे जाण ॥ ऐसें पूर्वजकथानुसंधान ॥ सावधान ऐकावें ॥ १० ॥ निमाला युद्धीं सुमित्र प्रधान ॥ तें सिंहकेता झालें श्रवण ॥ झाला क्रोधें संपन्न ॥ दिसे प्रळयाग्नीसारिखा ॥ ११ ॥ जैसा पदें ताडिला विखार[4] ॥ कीं घृतें शिंपिला वैश्वानरें[5] ॥ तैसा धांवला तो दैत्येश्वर ॥ सिंहध्वज प्रतापी ॥ १२ ॥ सारथियें आणिला रहंवरें[6] ॥ त्यास योजिले सिंह बत्तीस सहस्र ॥ छत्र ध्वज पताका विचित्र ॥ जयावरी शोभती ॥ १३ ॥ त्यावरी बैसला सिंहध्वज ॥ जैसा भानु[7] दिसे तेजःपुंज ॥ वेगें चालिला कपिध्वज ॥ जिंकावया निजबळें ॥ १४ ॥ शत अक्षौहिणी दळ बाहेरी ॥ निघालें तेव्हां शस्त्रधारी ॥ प्रळयकाळींचे विजूपरी ॥ सैन्य दिसे तेधवां ॥ १५ ॥ सिंहध्वज आला जाणोन ॥ कृष्णें केलें पलायन ॥ पार्थासी दिधलें टाकून ॥ अदृश्य झाला सत्वर ॥ १६ ॥ सर्वांची दृष्टि टाळून ॥ पर्वतदरींत दडला जाऊन ॥ तों इकडे युद्ध मांडलें दारुण ॥ अमर्याद वीर पडताती ॥ १७ ॥ बाणांधकार पडला क्षितीं ॥ कोणी कोणा नोळखती ॥ आपआपणा मारिती ॥ नामें पाचारिती एकमेकां ॥ १८ ॥ तों बभ्रुवाहन उठावला ॥ तेणें बाणांधकार निवारिला ॥ दैत्यसैन्य मारीत चालिला ॥ लाखोल्या घालित भूलिंगा ॥ १९ ॥ प्रळयांबुद[8] येऊनि अंबरीं[9] ॥ गर्जोनि वर्षे तोयधारीं ॥ तेवीं वृत्रारिनंदनसुत[10] शरीं ॥ दैत्यसेनेवरी वर्षतसे ॥ २० ॥ बाणें बाणांचें संघर्षण ॥ तेथोनि पडे तो कृशान[11] ॥ तेणें उभय सैन्यांचें दहन ॥ होतें झालें तेधवां ॥ २१ ॥ सिंहध्वज ह्मणे रे पार्थसुता ॥ तुज मी धाडितों मृत्युपंथा ॥ ह्मणोनि झाला बाण सोडिता ॥ परी तो पार्थसुतें तोडिला ॥ २२ ॥ धन्य वीर तो बभ्रुवाहन ॥ दैत्येंद्र त्रासिला बाणेंकरून ॥ तीन अक्षौहिणी दळ जाण ॥ यमालयातें धाडिलें ॥ २३ ॥ सोडो-

१ भोंवरा. २ मोक्षाची इच्छा करणारे. ३ पक्षी. ४ सर्प. ५ अग्नि. ६ रथ. ७ सूर्य. ८ प्रळयमेघ. ९ आकाशांत. १० बभ्रुवाहन. ११ अग्नि.

नियां सात शर ॥ हृदयीं ताडिला दैत्येश्वर ॥ धनुष्य तोडोनि सत्वर ॥ सारथीही मारिला ॥ २४ ॥ छत्रध्वजपताकांसहित ॥ सिंहांचाही केला निःपात ॥ दैत्य पाडिला मूर्च्छित ॥ मग सिंहनादें गर्जला ॥ २५ ॥ मग सावध होवोनि सिंहकेतन ॥ क्रोधें सोडिले सहस्र बाण ॥ तेणें घातें बभ्रुवाहन ॥ मूर्च्छित तेव्हां पाडिला ॥ २६ ॥ तें देखोनि वृषकेत ॥ तयावरी तो धांवत ॥ बाण सोडोनि असंख्यात ॥ संहार करीत दळाचा ॥ २७ ॥ दैत्यरथाचे सिंह जे उरले ॥ ते गजमस्तकें विदारूं लागले ॥ मुक्तें काढिती ते वेळे ॥ महागज विदारोनि ॥ २८ ॥ मग वृषकेत ते वेळां ॥ नृसिंहास्त्र सोडिता झाला ॥ तेणें मारिलें सिंहांला ॥ अवघे झाले नृसिंह ॥ २९ ॥ तंव सिंहध्वज चिंतावला ॥ ह्मणे हा वीर नव्हे काळ आला ॥ वय तंव दिसतसे वर्षें सोळा ॥ प्रतापें आगळा[1] सर्वांहूनि ॥ ३० ॥ याची करितां उपेक्षा ॥ हा मम दळाची करील रक्षा ॥ मजलागीं करील शिक्षा ॥ ऐसें दिसोन येतसे ॥ ३१ ॥ सिंहध्वज ह्मणे कर्णकुमरा ॥ तूं युद्धलाघव दाविसी रे खरा ॥ प्रधान माझा यममंदिरा ॥ पाठविला तुवांच रे ॥ ३२ ॥ मग सूर्यमुख सोडिला शर ॥ तेणें व्यापिलें अंबर ॥ गर्जत गेला सत्वर ॥ जेवीं प्रळयींची सौदामिनी[2] ॥ ३३ ॥ वारितां वारितां नावरे शर ॥ येवोनि भेदिलें जिव्हार ॥ मूर्च्छित पडिला कर्णकुमर ॥ रथाखालीं तेधवां ॥ ३४ ॥ मग चंद्रहासादिक वीर ॥ आणि सैन्यपाळ बळसागर ॥ येहीं युद्ध केलें अपार ॥ दैत्यसैन्य आटिलें ॥ ३५ ॥ मग रथीं उभा राहूनि सिंहध्वज ॥ पाहे तों न दिसे खगध्वज ॥ एकला देखिला कपिध्वज ॥ सर्वही नृप पृष्ठभागीं ॥ ३६ ॥ मग दैत्यराज चिंतावला ॥ ह्मणे अनंत कां न आला ॥ माझा मनोरथतरु भंगला ॥ वाटे माझ्या पूर्वपापें ॥ ३७ ॥ ह्मणे सुकृततरूसी पुष्प आलें ॥ तें पूर्वपापें करपलें ॥ कृष्णदर्शनावेगळें ॥ कैसें होईल सार्थक ॥ ३८ ॥ कृष्णदर्शनामृतघन[3] ॥ महद्भाग्यें आला वळोन ॥ तों सुटला पूर्वकर्मपवन ॥ तेणें वितळोन तो नेला ॥ ३९ ॥ पार्थालागीं एक क्षण ॥ न विसंबेचि जगज्जीवन ॥ तें अन्यथा आलें घडोन ॥ कां तो कृष्ण दिसेना ॥ ४० ॥ सेनाअं-[4]त्रपाट काढीन ॥ आणि नृपबुंथीही छेदीन ॥ मग दृश्य होईल नारायण ॥ पार्थवध केलिया ॥ ४१ ॥ मग आसुरी माया निर्मिली ॥ सर्वांवरी घातली भुली ॥ मायाजाळें सर्व भ्रमलीं ॥ शस्त्रें गळालीं हातींचीं ॥ ४२ ॥ जैसें गजें करितां मद्यपान ॥ मत्त होऊनि पडे जाण ॥ तैसें कार्याकार्याचें स्मरण ॥ उरलें नाहीं कोणासी ॥ ४३ ॥ त्या अवस्थेमाजी बाण ॥ मारोनियां सर्व केले गतप्राण ॥ त्यांमाजी सावध उरले दोघेजण ॥ पार्थात्मज आणि वृषकेत ॥ ४४ ॥ मोहांधकाररात्र झाली ॥ त्यांत सर्व जीवां झोंप लागली ॥ दोघे सावध ते वेळीं ॥ योगी हरिभक्त तैसे ते ॥ ४५ ॥ मग पार्थातें लक्षून ॥ मारिता झाला दैत्य बाण ॥ जेवीं प्रळयचपळेसमान ॥ तेवीं येऊनि अंगीं रुतती ॥ ४६ ॥ मग बभ्रुवाहन सावध झाला ॥ पाहे तों पार्थ बाणें मोहिला ॥ मग स-

---

१ विशेष. २ वीज. ३ श्रीकृष्णदर्शनरूप जें अमृत हाच कोणी मेघ. ४ सेनारूप मध्यें आड येणारा पडदा.

रोनि तमाळनीळा[1] ॥ गुण चढविला धनुष्यासी ॥ ४७ ॥ पार्थात्मज ह्मणे दैत्यनाथा ॥ हें कर्म केलें रे अन्यथा ॥ मोहनास्त्रें मो-
होनि आतां ॥ बाण वर्षणें हा अधर्म ॥ ४८ ॥ मग सोडिला एक शर ॥ ध्रुवमंडळा नेला दैत्येश्वर ॥ भूमंडळीं येतां सत्वर ॥
पुनः स्वर्ग दाविला ॥ ४९ ॥ रथासहित सिंहकेत ॥ सत्यलोकीं असे भ्रमत ॥ देखोनि त्याचा पुरुषार्थ ॥ दैत्यनाथ मानवला
॥ ५० ॥ तों सावध झाला वृषकेत ॥ तों बभ्रुवाहन असे झुंजत ॥ आसुरी मायेनें मोहित ॥ पार्थादिक जाहले ॥ ५१ ॥ गाढ-
निद्रामोहित ॥ देहभाना विसरत ॥ तेवीं पार्थादिक समस्त ॥ वीर झाले रणांगणीं ॥ ५२ ॥ कीं देवें दिधलें सोडून ॥ ह्मणो-
नि ही दशा पावले कठिण ॥ किंवा विरक्ति धरून ॥ देवें सर्व टाकिले ॥ ५३ ॥ नातरी विश्वव्यापक निजकिरण ॥ घेवोनि रवि
पावे अस्तमान ॥ तेवीं विसरले देहभान ॥ पार्थादिक सर्वही ॥ ५४ ॥ ईशमायेनें जग भ्रमित ॥ त्यामाजी योगी जैसे निर्भ्रम
फिरत ॥ तेवीं पार्थात्मज आणि वृषकेत ॥ दोघे फिरती रणांगणीं ॥ ५५ ॥ ते पूर्वीं होते मूर्च्छायमान ॥ ह्मणोनि न पावले मोहन ॥
पुनः त्यांवरी मायामोहन ॥ करूं विसरला दैत्यपति ॥ ५६ ॥ एकमेकांतें सांभाळिती ॥ दोघे मिळोनि दैत्यातें त्रासिती ॥ साठ
कोटी सेनागणती ॥ यमालया धाडिली ॥ ५७ ॥ वृषकेतें विंदान केलें ॥ सिंहध्वजातें उडविलें ॥ चारी दिशांसी भ्रमविलें ॥ येवों
नेदीच भूतळा ॥ ५८ ॥ ऐसा नभमंडळीं दैत्यनाथ ॥ भ्रमविला दिवस सात ॥ बभ्रुवाहनें केला घात ॥ सर्वही दैत्यसेनेचा ॥ ५९ ॥
तों मायांवी[2] दैत्यनाथ ॥ बळेंचि आला रणांत ॥ देखोनि दोघांचा पुरुषार्थ ॥ दैत्यनाथ संतोषला ॥ ६० ॥ ह्मणे अनंत युद्धें म्यां
केलीं ॥ परी ऐशापरी नाहीं देखिलीं ॥ दोघे वीर हे महा अतुलबळी ॥ नाटोपती मजलागीं ॥ ६१ ॥ मग संतोषोनि दैत्यनाथ ॥
तयां उभयतांसी बोलत ॥ तुह्मांसी मी प्रसन्न झालों यथार्थ ॥ पराक्रम अद्भुत देखोनि ॥ ६२ ॥ किरीट कुंडलें मनोहर ॥ विधि
हरिसमान सुंदर ॥ तुमचें शौर्य पाहोनि थोर ॥ आनंद झाला मानसीं ॥ ६३॥ माझी राज्यादि संपत्ति ॥ तुह्मांस देईन मी नि-
श्चितीं ॥ तुह्मी येवोनि मम गृहीं वस्ति ॥ करणें कीं चिरकाळ ॥ ६४ ॥ ऐसें ऐकतां दैत्यवचन ॥ सक्रोध झाला पार्थनंदन[3] ॥
आसुरी संपत्तीचें स्थान ॥ सर्वथा न घेई मन माझें ॥ ६५ ॥ मज कृष्णप्रसादें काय न्यूनता ॥ विशेष श्रीकृष्णयोग पुरता ॥
तेथें दैत्यसंपत्तीचा मी नव्हें भोक्ता ॥ अमृतापुढें तुच्छ कांजी ॥ ६६ ॥ तरी आतां करीं युद्धमात ॥ कां भ्यालासी रे मनांत ॥
जरी प्रसन्न झालासी त्वरित ॥ तरी युद्धचि देईं आह्मांतें ॥ ६७ ॥ ऐकोनियां ऐसें वचन ॥ दैत्य झाला क्रोधायमान ॥ मग करिता
झाला शरवर्षण ॥ प्रळयांबुंदासारिखें[4] ॥ ६८ ॥ मग दोघे झाले दोहींकडे ॥ शरमार करिते झाले गाढे ॥ पाडिती सैन्याचे हुडे ॥
वाहती ओहळ शोणितांचे[5] ॥ ६९ ॥ रथ अश्व पदाती वीर ॥ त्यांचा करिती संहार ॥ कबंधें[6] उठती अपार ॥ नादें अंबर गर्ज-

---

१ श्रीकृष्णाला. २ कपटी. ३ बभ्रुवाहन. ४ प्रळयकाळींच्या मेघाप्रमाणें. ५ रक्ताचे. ६ धडें.

विती ॥ ७० ॥ मग दैत्य बोले वृषकेता ॥ प्राण राखें आपुला आर्ता ॥ ह्मणोनि बाण सोडिला तत्वतां ॥ जेवीं सूर्य नभमंडळीं ॥ ७१ ॥ तो सायक त्याचे हृदयीं ॥ जावोनि बैसला ते समयीं ॥ मूर्च्छना घोर पावला पाहीं ॥ रथाखालीं पडियेला ॥ ७२ ॥ तंव बभ्रुवाहन धांवला ॥ वृषकेतु स्वरथावरी घातला ॥ मग संग्राम करूं सरसावला ॥ सिंहध्वजासीं निर्वाण ॥ ७३ ॥ बभ्रुवाहन वीर प्रबळ ॥ टाकिला मंत्रोनि त्रिशूळ ॥ तेणें दाविलें नभमंडळ ॥ रथासहित दैत्यासी ॥ ७४ ॥ अद्भुत त्रिशूळाचा वेग ॥ अष्टदिशा भ्रमण करवीत चांग ॥ महा शस्त्रें सोडोनि अभंग ॥ दैत्यसैन्या जाळीतसे ॥ ७५ ॥ गगनीं विबुधांच्या पंक्ती ॥ पाहोनि पार्थसुताची युद्धगति ॥ आश्चर्यातें पावती ॥ त्याची मुखें कीर्ति वर्णिती पैं ॥ ७६ ॥ ह्मणती सकळांमाजी हा वीर ॥ केवळ केसरीचें भासला निर्धार ॥ सत्तर अक्षौहिणी दळाचा संहार ॥ केला जेणें प्रतापें ॥ ७७ ॥ हा वयें दिसतो कीं बाळ ॥ परी या दैत्याचा झाला काळ ॥ ऐसें कोठें युद्धनवल ॥ आह्मीं नव्हतें देखिलें अद्यापी ॥ ७८ ॥ या सिंहध्वजाऐसा नसे दारुण ॥ ज्याचे भेणें पळाला नारायण ॥ त्यातें अष्टदिशांसी भ्रमण ॥ आठ दिवस करविलें ॥ ७९ ॥ धन्य धन्य याचें बळ ॥ धन्य पिता धन्य कुळ ॥ हा होय ईश्वरच केवळ ॥ ऐसें भासे आह्मांतें ॥ ८० ॥ पार्थात्मजें दाविली नवलकळा ॥ विद्युल्लतास्त्र सोडिलें ते वेळां ॥ आकाशीं दैत्य दग्धों लागला ॥ ठायीं ठायीं पोळला तो ॥ ८१ ॥ तें विद्युल्लतास्त्र अद्भुत ॥ तेणें दैत्यभार जाळिले तेथ ॥ जाळिला सिंहकेताचा रथ ॥ तंव तो कोसळला पृथ्वीवरी ॥ ८२ ॥ जर्जर झालीं सर्वही अंगें ॥ मग पार्थात्मजासी बोलत अनुरागें ॥ ह्मणे म्यां युद्धें केलीं अनेकें ॥ परी ऐशापरी नाहीं झालीं ॥ ८३ ॥ आतां होईं रे सावधान ॥ रणांगणीं घेतों तुझा प्राण ॥ मग विचारोनि सोडिला बाण ॥ तेजें गगन उजळलें ॥ ८४ ॥ तो हृदयीं बैसोनि जावा प्राण ॥ तों बभ्रुवाहनें सोडिला दिव्य बाण ॥ त्या बाणाचीं शत खंडें करून ॥ एकीकडे पाडिलीं ॥ ८५ ॥ तों सावध झाला कर्णनंदन ॥ पार्थात्मजा दिधलें आलिंगन ॥ राया त्या दोघांचें सौजन्य ॥ कोण वर्णील निजमुखें ॥ ८६ ॥ ऐसें पाहोनि युद्धकौतुक ॥ संतोषला दैत्यनायक ॥ ह्मणे हे दोघे दिसती बाळक ॥ परी माझे काळ कीं झाले ॥ ८७ ॥ वृषकेतूसी ह्मणे सिंहध्वज ॥ तुवां लाविली रे मज लाज ॥ आतां कोण राखील रे तुज ॥ रुद्रबाणापासोनि ॥ ८८ ॥ मग रुद्रमंत्रें मंत्रून ॥ वेगें सोडिला दिव्यबाण ॥ तेजें लोपला तो तपन ॥ गगन ग्रासित जातसे ॥ ८९ ॥ त्याचे वातें उडती वृक्ष ॥ पर्वत कोसळती लक्षांचे लक्ष ॥ ऐसें देखोनि वीर दक्ष ॥ बभ्रुवाहन काय करी ॥ ९० ॥ एकादश रुद्र स्थापोन ॥ पार्थात्मजें सोडिला बाण ॥ मध्येंचि तोडिला मार्गण ॥ तया सिंहध्वजाचा ॥ ९१ ॥ तें देखोनियां सुरवर ॥ हर्षें करिती जयजयकार ॥ वर्षती सुमनांचे संभार ॥ बभ्रुवाहनावरी तेधवां ॥ ९२ ॥ ह्मणती या दोघांचें बळ ॥ देखोनि झालों

१ बाण. २ देवांच्या. ३ सिंह. ४ प्रीतीनें. ५ वृषकेतु. ६ सूर्य.

शीतळ ॥ यांसी रक्षो गोपाळ ॥ अनंतकाळ सुख असो ॥ ९३ ॥ एका पाडितां मूर्च्छायमान ॥ तों दुजा होय सावधान ॥ यापरी परस्परें रक्षण ॥ दोघे करिती तेधवां ॥ ९४ ॥ दैत्य तयांवरी महारागें ॥ हस्त चावीत अनुरागें ॥ परी उपाय न चाले युद्धप्रसंगें ॥ विकळ सर्वांगें त्याचीं ॥ ९५ ॥ तथापि दैत्यासी वरदान प्रबळ ॥ सोडीत नाना अस्त्रजाळ ॥ त्या दोघांतें करी व्याकुळ ॥ वरदानबळेंकरूनियां ॥ ९६ ॥ श्रीकृष्णसंतोषकृपा दोघांसी ॥ कृष्णबलात्कारकृपा दैत्यासी ॥ ईश्वरकृपेच्या अंतरासी ॥ जाणती मानसीं विचक्षण ॥ ९७ ॥ ऐसे दोघे ते महावीर ॥ बाणघातें झाले जर्जर ॥ देह झाले रक्तांबर ॥ किंशुक जैसे फुलले ॥ ९८ ॥ ऐसा तिघांचा संग्राम ॥ अद्भुत झाला जी निरुपम ॥ परी न सोडिती संग्रामधाम ॥ बाणें दैत्य विकळ केला ॥ ९९ ॥ यावरी तिमिरारिनंदनसुताचें बाळ ॥ तें रणा येईल प्रांजळ ॥ तें कथानक अति रसाळ ॥ पुढें तुज सांगेन मी ॥ १०० ॥ पुढिले प्रसंगीं तें निरूपण ॥ गोड असे सुधेसमान ॥ तें ऐकावें सावधान ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १०१ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ सिंहध्वजआख्यान अगाध ॥ अशीतितमोध्याय गोड हा ॥ १०२ ॥ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते सिंहध्वजआख्यानं नाम अशीतितमोऽध्यायः ॥ ८० ॥ अध्याय ॥ ८० ॥ ओव्या ॥ १०२ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जनमेजयासी ह्मणे गुणनिधि[1] ॥ कथा ही अभिनव असे सिद्धि ॥ तुजऐसा त्रिशुद्धि[2] ॥ श्रोतारत्न मिळेना ॥ १ ॥ येरू ह्मणे ऐकतां तुमचा बोल ॥ जो क्षीरसागरापरीस खोल ॥ मज येती स्वानंदाचे डोल ॥ होती शीतळ सर्वांगें ॥ २ ॥ वृषकेतु सोळा वर्षांचा ॥ आह्मीं पुत्र ऐकिला त्याचा ॥ तरी अभिप्राय त्या कथेचा ॥ मजलागीं सांगावा ॥ ३ ॥ बाळ कैसा आला रणा ॥ कैसा मारिला जी दैत्यराणा ॥ अघटित वाटे माझिया मना ॥ करुणाघना मुनिराया ॥ ४ ॥ ऐकोनि जैमिनि ह्मणे भारता ॥ धन्य तूं मज मिळालासी श्रोता ॥ तुझी देखोनि सादरता ॥ हर्ष चित्ता होतसे ॥ ५ ॥ आतां ऐकें सावधान ॥ कृष्णलीला ती असे गहन ॥ परी तुज संशय झाला पूर्ण ॥ त्याचें निरसन करितों मी ॥ ६ ॥ श्रोत्याचे हृदयीं संशयझाड ॥ अविश्वासें वाढेल दृढ ॥ विकल्प डाहळ्या होत प्रचंड ॥ भ्रांतिपल्लव लसलसिती ॥ ७ ॥ अहंफळें जें सदा फळत ॥ ममताकुसुमीं जें पुष्पित ॥ ऐशियाचीं जे फळें भक्षित ॥ स्वसुख तयांतें असेना ॥ ८ ॥ ऐशिया वृक्षाचें छेदन ॥ ज्ञानखड्गें करीत जाण ॥ परी वक्ता न पुरवी प्रश्न ॥ त्याचे श्रवणीं व्यर्थ श्रोता ॥ ९ ॥ निःसंदेह नसतां आपण ॥ श्रोतयांचें काय करिती समाधान ॥ तरी वक्त्याचे हेचि पूर्ण गुण ॥ श्रोतयांचे संदेहें[3] हरावे ॥ १० ॥ असो तुज मात सांगतां बाळाची ॥ वस्ति झाली संशयाची ॥ परी अघटित घटना देवाची ॥ अतर्क्य शक्ति पैं आहे ॥ ११ ॥ जेणें गति हरिली वासवाची ॥ ऐसा तो बळी कीं दैत्य नमुची ॥ तेणें गति हरिली सर्वांची ॥ कैसेपरी जाण पां ॥ १२ ॥ जेथें ऐरावताचे भग्न दंत ॥ इंद्राचें कुलिशें[4] झालें कुंठित ॥ जेथें रुद्राचा परशु भंगत ॥ ऐसें वक्षःस्थळ हिरण्यकशिपूचें ॥ १३ ॥ रमाकुचकुड्मलभ्रमर ॥ जीं सुधांकराचीं[5] सहोदर ॥ त्या नखेंच दैत्यउदर ॥ कैसें जाण विदारिलें ॥ १४ ॥ तीन सहस्र भुजा दुंदुभीसी ॥ तीन शत मुखें असती ज्यासी ॥ ज्याणें मकरतोंडीं टाकिलें तिघांसी ॥ स्नानोदकें त्यास मृत्यु केला ॥ १५ ॥ जेणें त्रिभुवनास दिधला त्रास ॥ ऐसा विरोचन सुत प्रल्हादास ॥ त्या स्त्रीअभ्यंगें त्यासी नाश ॥ कैसा झाला सांग पां ॥ १६ ॥ अघटितघटना हरिशक्ति ॥ न कळे त्याची कोणास युक्ति ॥ तेथें दैत्य मारिला बाळाहातीं ॥ हें नवल काय असे ॥ १७ ॥ ऐसें ऐकोनियां ऋषिवचन ॥ निःसंदेह झालें नृपाचें मन ॥ ह्मणे झालें जी आतां समाधान ॥ पुढें कथा चालवावी ॥ १८ ॥ मुनि ह्मणे जी नृपति ॥ वृषकेतुभार्या भद्रावती ॥ तो जेव्हां निघाला युद्धाप्रति ॥ तेव्हां ती होती गर्भिणी ॥ १९ ॥ गर्भासी होतां नवमास ॥ दशम मासीं झाली प्रसूति तीस ॥ दश दिन लोटतां पुत्रास ॥ पुत्रोत्साह धर्म करी ॥ २० ॥ द्वारीं देवोनियां मंडप ॥ पाचारिले सर्व भूप ॥ आणिले मुनिकुळदीप ॥ लोक सर्व पाचारिले ॥ २१ ॥ पुत्रोत्साहालागून ॥ आले सर्व भूलोकींचे जन ॥ महद्भाग्यें धर्मसंपन्न ॥ उत्साह केला नानापरी ॥ २२ ॥ अठ्यायशीं सहस्र ऋषीश्वर ॥ शाहाण्णव कुळींचे

१ सकळ गुणांचा समूह असा जैमिनि. २ खरोखर. ३ संशय. ४ वज्र. ५ चंद्राचीं.

नृपवर ॥ पुत्रोत्साहासी सत्वर ॥ परिवारसहित ते आले ॥ २३ ॥ रंगमंडपीं नृत्यकार ॥ वेश्या नटवे[1] सूत्रधार ॥ नृत्यांगना त्या अपार ॥ गायक तेही तेथें आले ॥ २४ ॥ वंशावळीचा घडघडाट ॥ मेघांपरी गर्जती भाट[2] ॥ नाना वाद्यें सुभट ॥ वाजताती तेधवां ॥ २५ ॥ साठ गांव वर्तुळ स्थूळ ॥ नेणों तें केवळ रविमंडळ ॥ तेथें उतरले भूपाळ ॥ हस्तनापुरा सर्वही ॥ २६ ॥ धर्मनंदनें तितुक्यांसी ॥ भोजन दिधलें षड्रसेसीं ॥ तृप्त केलें सकळांसी ॥ दिनपंचक[3] स्वानंदें ॥ २७ ॥ यथायोग्य वस्त्रभूषण ॥ आधीं मुनिवरांतें देऊन ॥ मग अलंकार नाना जाण ॥ सकळांतेंही दिधले ॥ २८ ॥ ऐशिया उत्साहें धर्मराज ॥ बाळा नाम ठेवी धृततेज ॥ नेत्र देखोनि तेजःपुंज ॥ भविष्यार्थ जाणोनि ॥ २९ ॥ जे जे होते मागते जन ॥ ते संतोषविले धन देऊन ॥ वस्त्रालंकारभूषण ॥ पाहोनि गुण गौरविले ॥ ३० ॥ ऐसी उत्साहाची रचना ॥ पाहोनि सर्व गेले निजस्थाना ॥ संतोष झाला सकळ जनां ॥ भीम नकुल सहदेवांतें ॥ ३१ ॥ मग द्रौपदीनें काय केलें ॥ बाळ पाळण्यांत घातलें ॥ सुवर्णसूत्र कराब्जीं घेतलें ॥ हेंलरें[4] देती पैं झालीं ॥ ३२ ॥ स्नुषांसहें[5]वर्तमान कुंती ॥ अत्यंत संतोषली चित्तीं ॥ ह्मणे ही माझ्या कर्णाची संतति ॥ रक्षो श्रीपति ह्मणतसे ॥ ३३ ॥ सप्रेम करोनियां चित्त ॥ बाळकासी हालवित ॥ हृदयीं आठवोनि अनंत ॥ त्याचेंचि गीत गातसे ॥ ३४ ॥ जयजय अनादिसिद्ध देवा ॥ तुज नसे नाम रूप ठेवा ॥ तथापि भक्तरक्षणीं माधवा ॥ धरिले नाना अवतार ॥ ३५ ॥ गोकुळीं गौळियांमाझारी ॥ अवतरोनि श्रीहरि ॥ केलिया नाना कुं[6]सरी ॥ खेळ खेळसी पोरांसवें ॥ ३६ ॥ गोकुळांत जन्मोन ॥ बाळलीळा दाविली जाण ॥ हमामा हुंबरी घालोन ॥ पोरांसवें क्रीडलासी ॥ ३७ ॥ तुझी जी कां बाळलीला ॥ आठवितां घननीळा ॥ संतोष वाटे मजला ॥ दयाळु तूं बा श्रीकृष्णा ॥ ३८ ॥ नानापरींचीं करूनि चरित्रें ॥ नाना कौतुकें दाविलीं विचित्रें ॥ संतोषविलीं जननीचीं नेत्रें ॥ यादवराया तुवां कीं ॥ ३९ ॥ आजन्मापासोनि ॥ झालासी पांडवांचा ऋणी ॥ प्रेमभावेंकरूनि ॥ तुज चक्रपाणि न सोडूं ॥ ४० ॥ लाक्षागृहातें आह्मांसी ॥ तूं वांचविलें हृषीकेशी ॥ दीनबंधु सत्वर धांवसी ॥ संकट देखतां आमुचें ॥ ४१ ॥ सभेमाजी करितां उघडी ॥ मज पुरविलीं तुवां लुगडीं ॥ कृष्णा तूं अर्जुनाचा गडी ॥ बंधुराया सुजाणा ॥ ४२ ॥ कौरवार्णवसागरीं ॥ मी बुडतां काढिलें बाहेरी ॥ धांवलासी अति सत्वरी ॥ न सांवरत गोविंदा ॥ ४३ ॥ माझी लज्जारत्नपेटी ॥ सागरीं बुडतां उठाउठी ॥ काढिलीसी तुवां जगजेठी ॥ काय वर्णूं उपकारा ॥ ४४ ॥ मध्यरात्रीचे समयाला ॥ दुष्टें दुर्वास पाठविला ॥ सत्व राखिलें तुवां तमालनीळा ॥ तया प्रसंगीं धांवोनि ॥ ४५ ॥ तेथें माझें रूप घेऊन ॥ ऋषि केले संतुष्टमन ॥ नाना विघ्नें आलीं जीं दारुण ॥ तीं वारिलीं तुवां दयाळा ॥ ४६ ॥ जेव्हां जेव्हां पडिलें संकट ॥ तेव्हां तेव्हां धांवलासी वरिष्ठ ॥ निर्दा[7]ळिलें महा पापिष्ठ ॥ भक्तांलागीं रक्षोनि ॥ ४७ ॥ नाना योग साधितां ॥

१ वेषधारी. २ बंदिजन. ३ पांच दिवस. ४ झोंके. ५ सुनांसह. ६ कौतुकें. ७ नाहींसे केले.

नाना तपेंही करितां ॥ नयेसी त्यांचे ध्यानीं चिंतितां ॥ तो तूं राबसी आह्मां घरीं ॥ ४८ ॥ क्षीरसागराही टाकिलें ॥ वैकुंठवासा-
सही सोडिलें ॥ पांडवांघरीं वास्तव्य केलें ॥ येवोनियां श्रीहरि ॥ ४९ ॥ कौरवीं गांजिलें पांडवांसी ॥ मग त्यांतें मारिलें रणकोशीं ॥
तूं साह्य होवोनि यश देसी ॥ संकट पडतां अर्जुना ॥ ५० ॥ धर्मालागीं राज्यासन ॥ तुवां दिधलें कृपेंकरून ॥ भक्तरक्षका तुज-
वांचून ॥ कोणी सोयिरा नसे त्रैलोकीं ॥ ५१ ॥ तुझ्या उपकारांच्या राशी ॥ भेदोनि गेल्या आकाशीं ॥ नाना रूपें धरिलींशी ॥
भक्तांकारणें गोविंदा ॥ ५२ ॥ आणि अर्जुनाचा सारथि ॥ ऐसें बोलताती त्रिजगतीं ॥ स्वहस्तें हय जोडिसी रथीं ॥ उदकीं तयांतें
न्हाणोनि ॥ ५३ ॥ ऐसें नाना परी वेल्हाळा[1] ॥ श्रीकृष्णगीत गात द्रौपदी ते वेळां ॥ तें गीत गोड वाटलें त्या बाळा ॥ चित्त रंगलें
श्रीकृष्णीं ॥ ५४ ॥ देवाची हो अघटित लीला ॥ वाचा फुटली तया बाळा ॥ मग द्रौपदीस बोलता झाला ॥ तो सारथि मज
दाविजे ॥ ५५ ॥ जेणें पांडवां रक्षिलें ॥ जेणें कौरवांतें संहारिलें ॥ भक्तवत्सलपण साच केलें ॥ तो सारथि मज दाविजे ॥ ५६ ॥
ह्मणोनि बाळकें घेतला थाया[2] ॥ तयातें समजावी द्रुपदतनया[3] ॥ परी तो सर्वथा नये समजाया ॥ रुदन करीत आक्रोशें ॥ ५७ ॥
ज्या महद्भूत संचरलें अंगीं ॥ त्यासी पंचाक्षरी नसे जगीं ॥ भगवंत भेटीवांचून वेगीं ॥ उतारा त्यासी असेचिना ॥ ५८ ॥ धरिल्या
छंदातें न सोडी ॥ सारथि दावा ह्मणे घडीघडी ॥ शांतवितां द्रौपदी बापुडी ॥ हिंपुटी झाली तेधवां ॥ ५९ ॥ मग कंटाळूनि द्रुप-
दबाळी ॥ बाळा घेवोनि बाहेर आली ॥ दिधला धर्माचे करकमळीं ॥ ह्मणे यासी समजावा ॥ ६० ॥ रायें नानापरी समजाविला ॥
तरी ह्मणे दावीं सारथ्याला ॥ धर्म ह्मणे अरे बाळा ॥ तो देशांतरा गेला असे ॥ ६१ ॥ बाप भ्रमाचें विंदान ॥ सबाह्य असता
नारायण ॥ त्यासी दूर देशांचें कल्पन ॥ केलें कैसें पाहा हो ॥ ६२ ॥ नित्य धर्माचिये सदनीं ॥ प्रेमें असे चक्रपाणि ॥ तो ऐशीच
बोलिला वाणी ॥ मग इतरांचा पांड कोण ॥ ६३ ॥ नेत्रपातींसी दिधलें अंजन ॥ त्याचें सर्वथा नोहे दर्शन ॥ तेवीं सबाह्य असतां
नारायण ॥ न कळे जाण भ्रांतीनें ॥ ६४ ॥ हें त्या श्रीहरीचें चरित्र ॥ तुटलें दैत्यआयुष्यसूत्र ॥ ह्मणोनि छंद घेतला विचित्र ॥
रणांगणा जावयाचा ॥ ६५ ॥ अश्वशाळा कुंजरशाळा ॥ रथशाळा चित्रशाळा ॥ सर्वही दाविल्या तया बाळा ॥ परी तो कदा नायके
॥ ६६ ॥ नानापरी समजाविती ॥ परी तो दावा ह्मणे सारथि ॥ अलोलिक बाळकाची स्थिति ॥ देखोनि मानिती सकळ आश्चर्य
॥ ६७ ॥ मग धर्म ह्मणे भीमसेना ॥ ऐक माझिया वचना ॥ हें बाळ न्यावें कृष्णदर्शना ॥ जेथें असेल श्रीहरि ॥ ६८ ॥ जरी यासी
न होय कृष्णदर्शन ॥ तरी याचा जाईल प्राण ॥ ह्मणोनि अविलंबें[6] जाण ॥ वेगें जाईं आतांचि ॥ ६९ ॥ मग सारथियें रथ आणिला ॥
त्यावरी भीमसेन बैसला ॥ बाळ ओंसंगा घेतला ॥ केला नमस्कार धर्मासी ॥ ७० ॥ धर्मासी करूनियां नमन ॥ त्वरें चालिला

---

१ सुंदरी ( द्रौपदी ).   २ छंद.   ३ द्रौपदी.   ४ कष्टी.   ५ कथा.   ६ लवकर.   ७ मांडीवर.

भीमसेन ॥ तों घटोत्कचाचा नंदन ॥ मेघवर्ण विनवीत ॥ ७१ ॥ बाळ घेवोनि पितामहातें ॥ योग्य नव्हे एकटें जावया रणातें ॥ तरी समागमें घ्यावें मातें ॥ एकमेकां साह्यार्थ ॥ ७२ ॥ लीलालाघवी भगवान ॥ न कळे तयाचें महिमान ॥ सिंहध्वजाचा गर्व पूर्ण ॥ झाडावया चालिले ॥ ७३ ॥ सिंहध्वजें सर्वांतें ॥ मारिलें रणीं घालोनि मायेतें ॥ ह्मणोनि विंदान रमानाथें ॥ रचिलें जाणा अतर्क्य ॥ ७४ ॥ मग धर्म ह्मणे भीमासवें ॥ मेघवर्णा तुवां जावें ॥ परी मार्गीं सावध असावें ॥ बाळरक्षणालागोनि ॥ ७५ ॥ सावधानें बाळ न्यावें ॥ वेगें श्रीहरीसी भेटवावें ॥ आणि तेथोनि त्वरें फिरावें ॥ सर्व समाचार घेवोनि ॥ ७६ ॥ बरवें ह्मणोनि दोघे वीर ॥ तेथोनि चालिले सत्वर ॥ सवें घेतले बातमीदार ॥ वनोपवनें लंघितसे ॥ ७७ ॥ जे जे कोणी मार्गीं भेटती ॥ ते ते वृकोदरातें[1] पूजिती ॥ सर्व राजे स्तुति करिती ॥ कीर्ति वर्णिती भीमाची ॥ ७८ ॥ तंव देखिली कुसुमावती ॥ तेथें देखिली रणक्षिती ॥ पार्थादिक मृतप्राय देखती ॥ आश्चर्य करिती वीर ते ॥ ७९ ॥ कोणी दुखंड झाले असती ॥ कोणी घायें हुंबताती ॥ कोणी जीवनावीण चडफडती ॥ कोणी पडिले विकळत्वें ॥ ८० ॥ कोणाचे हस्त तुटले ॥ कोणी कटीपासोनि भंगले ॥ कोणी शिरावेगळे झाले ॥ ऐसे पाहाती दोघे वीर ॥ ८१ ॥ राक्षसासहित भीमसेन ॥ सिंहध्वजें देखिला दुरून ॥ भयभीत झालें मन ॥ ह्मणे बरवी गति दिसेना ॥ ८२ ॥ आधीं त्या दोघांनीं केला आकांत ॥ त्यांसी साह्य आले वीर समर्थ ॥ यावरी आतां माझा घात ॥ करितील कीं निर्धारें[2] ॥ ८३ ॥ ह्मणोनि बाण सोडिला अकस्मात ॥ तेणें आकाश व्यापिलें समस्त ॥ प्रळयमेघापरी गर्जत ॥ रुक्मपुंख[3] तयाचे ॥ ८४ ॥ भीमसेन पाहात होता ॥ तों बाण आला अवचितां ॥ हृदयामाजी सपिच्छ तत्वतां ॥ भरता झाला तेधवां ॥ ८५ ॥ तेणें भीम मूर्च्छित पडिला ॥ मग मेघवर्ण धांविन्नला ॥ राक्षसी मायेतें स्मरला ॥ तेणें भ्रमविला सिंहकेतु ॥ ८६ ॥ गिरिदरीऐसें मुख पसरिलें ॥ सारथियातें गिळिलें सगळें ॥ तें देखोनि दैत्यपाळें ॥ त्यावरी टाकिलें नृसिंहास्त्र ॥ ८७ ॥ नृसिंहयुक्त तो बाण ॥ तेणें पाडिला तो मेघवर्ण ॥ दोघे वीर पडिले ह्मणोन ॥ सिंहनादें गर्जतसे ॥ ८८ ॥ मूर्च्छना आली दोघांसी ॥ कोण आवरी तयांसी ॥ तों बाळ उसळला आकाशीं ॥ अकस्मात तेधवां ॥ ८९ ॥ बभ्रुवाहन वृषकेत ॥ त्या बाळकातें पाहात ॥ ह्मणती थोर मांडला अनर्थ ॥ दैत्य झाला बाळरूपी ॥ ९० ॥ एका दैत्यें पुरविला अंत ॥ तों दुजा बाळरूपी हा विख्यात ॥ आतां दोघांचा प्राणांत ॥ आला ऐसें बोलती ॥ ९१ ॥ एकमेकांतें विचारिती ॥ आतां कैशी करावी युक्ति ॥ सर्वथा प्राण न वांचती ॥ काय श्रीपति हें केलें ॥ ९२ ॥ पार्थसुत[4] ह्मणे एक करावें ॥ तुवां उरलें दळ मारावें ॥ म्यां दोघांसी संहारावें ॥ तरी वांचूं उभयतांनीं ॥ ९३ ॥ बरें ह्मणोनि कर्णनंदन ॥ दळ रगडीत चालिला दारुण ॥ मग बाळासी बोले पार्थनंदन ॥ ह्मणे बरवी माया जाणसी ॥ ९४ ॥ अरे अरे दैत्य-

१ भीमसेनाला. २ खरोखर. ३ सोन्याचे पिसारे. ४ बभ्रुवाहन.

नाथा ॥ तूं काय बाळ झालासी आतां ॥ निजबळें जिंकिलासी विधाता ॥ हरिहरइंद्रां त्रासिलें ॥९५॥ तूं त्रिभुवनासी अजिंक्य ॥ ह्मणविसी सकळ दैत्यांचा नायक ॥ आतां राखें आपुलें प्राणपंचक ॥ तुज मी निःशंक मारीन ॥ ९६ ॥ ऐसें बोलोनि तये वेळीं ॥ बाळावरी ब्रह्मशक्ति योजिली ॥ षोडशोपचारें पूजिली ॥ मग सोडिली बभ्रुवाहनें ॥ ९७ ॥ ती शक्ति प्रळयानळासमान ॥ निस्तेज झाला चंडकिरण ॥ भयें कांपलें त्रिभुवन ॥ धरामंडळ डळमळित ॥ ९८ ॥ देव करिती हाहाकार ॥ मेला मेला ह्मणती किशोर ॥ ती काळशक्ति केवळ उग्र ॥ बाळासमीप पातली ॥ ९९ ॥ ती शक्ति देखोनि बंबाळ ॥ भयें व्याकुळ झालें बाळ ॥ अंत पुरलासा भासलें केवळ ॥ झांकिले नेत्र तयानें ॥ १०० ॥ द्रौपदीनें जें कां गाइलें ॥ हालवितां जें उपदेशिलें ॥ तें रूप अंतरीं आठविलें ॥ भय सोडिलें मरणाचें ॥ १ ॥ पांडवां लाक्षागृहीं वांचविलें ॥ भीमाचें विष परिहारिलें ॥ जेणें द्रौपदीसी सांभाळिलें ॥ तो काय मातें उपेक्षील ॥२॥ जो पांडवांचा सारथि ॥ मीही त्यांचीच संतति ॥ तो मज उपेक्षील श्रीपति ॥ ऐसें न घडे सर्वथा ॥ ३ ॥ हरिस्मरणाचें महिमान ॥ कळिकाळही वंदिती चरण ॥ त्या शक्तीचें निरसन ॥ करावया कष्ट काय वाटती ॥४॥ ऐसें बाळ मनीं चिंतित ॥ तों नवल झालें अकस्मात ॥ वायुवेगें तृण उडत ॥ तें जावोनि जडत बाळहस्तीं ॥ ५ ॥ तें बाळें टाकितांचि तृण ॥ त्या तृणाचा देवें केला बाण ॥ तेणें त्या शक्तीचें खंडन ॥ क्षणमात्रें केलें पैं ॥ ६ ॥ ती शक्ति पाहे धृततेज ॥ तंव ती भस्म झाली समस्त ॥ मग संतोषोनि मनांत ॥ निर्भय झाला बाळ तो ॥ ७ ॥ मग गर्जोनि बोले तो कुमर ॥ मी तों सोमवंशी महावीर ॥ मज सबाह्य रक्षी रमावर ॥ जो पांडवांचा सारथि ॥ ८ ॥ ऐसें ऐकतां बाळवचन ॥ साशंक झाला बभ्रुवाहन ॥ मग स्तब्ध राहिला एक क्षण ॥ ह्मणे हें विंदान सर्व कृष्णाचें ॥ ९ ॥ यावरी कथानुसंधान ॥ पुढें वर्तलें जें गहन ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ होईल राया ते ऐकावें ॥ ११० ॥ बाळ दैत्यासीं करील निर्वाण ॥ ती कथा रसाळ पूर्ण ॥ ऐकावी एकाग्र करूनि मन ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ११ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ सिंहध्वजाख्यान अगाध ॥ एकाशीतितमाध्याय गोड हा ॥ ११२ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते सिंहध्वजाख्यानं नाम एकाशीतितमोऽध्यायः ॥८१॥ अध्याय ॥ ८१ ॥ ओव्या ॥११२॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ मुनीसी ह्मणे नृपनंदन ॥ सागा पुढें कथानुसंधान ॥ बाळें केलें दैत्यनिर्दलन ॥ कैशापरी मज सांगा ॥१॥ ऐकतां तुझी शुद्ध वाणी ॥ पातकांची होय धुणी ॥ घडे निजसुखाची खाणी ॥ भावें श्रवणीं ऐकतां ॥ २ ॥ जैमिनि ह्मणे गा भारता ॥ मी महाभाग्याचा पुरता ॥ ह्मणोनि तुजऐसा श्रोता ॥ अवचितां लाधलों ॥३॥ जरी पुण्य असेल गांठीं ॥ तरी उत्तम श्रोत्याची पडेल गांठी ॥ मग वक्त्याचे ओष्ठपुटीं ॥ शब्दरत्नें विकासती ॥ ४ ॥ श्रोता जोडलिया प्रवीण ॥ वाग्देवी उल्हासे पूर्ण ॥ पदोपदीं प्रेमार्थ गहन ॥ प्रसवे जाण अवधाना ॥ ५ ॥ श्रोता मिळतां अधम ॥ वाग्देवी संतापे परम ॥ होय अर्थाचें पतन ॥ श्रवणरस सर्व आटे ॥ ६ ॥ तान्ह्याचें स्तना मुख झगटे ॥ तेणें तात्काळ पान्हा फुटे ॥ तें निमालिया तेथेंचि आटे ॥ दुग्ध सर्व ज्यापरी ॥ ७ ॥ त्यापुढें करावें व्याख्यान ॥ तें वक्त्याचें मूढपण ॥ जेवीं माळभूमीस [१]कूपखनन ॥ कीं दरिद्रसेवन काय व्यर्थ ॥ ८ ॥ कीं अंधास दिधलें [२]दर्पण ॥ कीं [३]बधिरापुढें केलें गायन ॥ कीं रोगियासी मिष्टान्न ॥ देवोनि काय साफल्य ॥ ९ ॥ नातरी नपुंसकालागून ॥ पद्मिनी दिधली शृंगारून ॥ कीं प्रेता दिधलिया आलिंगन ॥ काय सुख तयांत ॥१०॥ कीं सुगंधतैलें [४]कुंजरा ॥ अभ्यंग केलें अवधारा ॥ कीं [५]महाफळ समर्पितां वानरा ॥ कीं चंपकमाळ [६]खरासी ॥ ११ ॥ असो ऐशिया अनुवादा ॥ जना भासोनि येत निंदा ॥ माझी तों अगाध संपदा ॥ तूं श्रोता मिळालासी विचक्षण ॥ १२ ॥ आतां होईं सावधान ॥ ऐकें पूर्वजकथानुसंधान ॥ बाळें करूनि कृष्णस्मरण ॥ केलें निर्दलन शक्तीचें ॥ १३ ॥ मी तों सोमवंशींचा वीर ॥ ऐसें ऐकतां उत्तर ॥ साशंक झाला पार्थपुत्र ॥ निवांत राहिला ते काळीं ॥१४॥ ह्मणे हा जरी असुर असता ॥ तरी सोमवंशाचें नाम न घेता ॥ पार्थसारथि नाठविता ॥ कदाकाळीं संकटीं ॥१५॥ ऐसा तर्क केला मानसीं ॥ उडोनि गेला बाळापाशीं ॥ आवडीनें पुसे त्यासी ॥ तूं कोण कोणाचा रे ॥ १६ ॥ येरू ह्मणे आकाशीं [७]आदित्य ॥ दानशूर तयाचा तनय ॥ तया पुत्र शौर्यवीर ॥ वृषकेतु नामें विख्यात ॥१७॥ तो तरी होय माझा पिता ॥ भद्रावती होय माझी माता ॥ धृततेज नाम तत्वतां ॥ धर्मरायें मज ठेविलें ॥ १८ ॥ ऐकतां पार्थात्मज संतोषला ॥ मनीं विचार करूं लागला ॥ हें भेटवावें पितयाला ॥ अविलंबें जाण पां ॥ १९ ॥ अत्युत्साहें बभ्रुवाहन ॥ कर्णात्मजा पाचारून ॥ सिंहध्वजातें मारून बाण ॥ मूर्च्छित केला समरांगणीं ॥२०॥ कर्णात्मजा बोले पार्थपुत्र ॥ हा तों बाळ नव्हे असुर ॥ परी अनर्थ झाला होता थोर ॥ तो निवारिला भगवंतें ॥ २१ ॥ म्यां [८]भावोनि दैत्यपति ॥ यावरी टाकिली ब्रह्मशक्ति ॥ येणें स्मरोनियां रमापति ॥ भस्म केली तृणबाणें ॥२२॥ ह्मणे मी सोमवंशींचा वीर ॥ ऐसें ऐकतां म्यां उत्तर ॥ मग धांवोनि गेलों सत्वर ॥ यासी वृत्तांत पूसिला ॥२३॥ तेणें पितामहापासून ॥ मज सांगितलें वर्तमान ॥ ऐसें ऐकतां कर्णनंदन ॥ परम संतोष पावला ॥२४॥ मग निर्भय झाले दोघेजण ॥ करीत चालिले बाणवर्षण ॥

१ विहीर खणणें. २ आरसा. ३ बहिऱ्यापुढें. ४ हत्तीला. ५ नारळ. ६ गाढवाला. ७ सूर्य. ८ समजून.

तों सावध झाला दैत्यभूषण ॥ कोपला काळ ज्यापरी ॥२५॥ दोघांसी दैत्य तो नाटोपे ॥ ज्याचे प्रतापें सूर्य लोपे ॥ त्रासिले वीर दोघे कोपें ॥ विकळ केले रणांगणीं ॥ २६ ॥ मग तो धांवला दैत्य भारी ॥ पसरली तेणें मुखदरी ॥ दोघां धरिलें दोहीं करीं ॥ मुखामाजी घालावें जंव ॥२७॥ तंव तें बाळें लक्षिलें समोर ॥ करोनि हरिनामोच्चार ॥ तों शर येवोनि सत्वर ॥ बाळाहातीं पडिला एक ॥२८॥ तोचि बाण दिधला टाकोन ॥ तेणें दैत्याचें हृदय भेदून ॥ गगनीं उडविला पूर्ण ॥ दैत्येश्वर तृणापरी ॥२९॥ अघटित हरीची गति ॥ अजिंक्य जो दैत्यपति ॥ तो उडविला बाळाहातीं ॥ गगनोदरीं भ्रमतसे ॥३०॥ सूत्रधारियाचें नवल ॥ पाहतां मानिती आश्चर्य सकळ ॥ मग जो चालवी भूगोळ ॥ तया नवल काय असे ॥ ३१ ॥ असो दैत्य वर्षतसे बाण ॥ जैसा प्रळयकाळींचा घन ॥ तैसें गगनींहूनि संधान ॥ दैत्यपति करीतसे ॥ ३२ ॥ सवेंचि उतरोनि खालता ॥ पाचारिलें बभ्रुवाहनवृषकेतां ॥ तेव्हां संग्राम झाला निर्गुता[1] ॥ न भूतो न भविष्यति[2] ॥ ३३ ॥ ईश्वरी मायेचें विंदान ॥ त्या बाळासी आलें स्फुरण ॥ भीमाचे रथावरी बैसोन ॥ चाप घेतलें तयानें ॥ ३४ ॥ बभ्रुवाहनवृषकेतूंतें ॥ बाळक विनवी अति विनैतें[3] ॥ ह्मणे तुह्मीं घ्यावें जी विश्रांतीतें ॥ या दैत्यातें मारितों मी ॥३५॥ मग भीमाचे रथीं होते बाण ॥ त्यांचें करूं लागला वर्षण ॥ ते केवळ प्रळयचपळेसमान ॥ तैसे शर सूटती ॥३६॥ शक्ति तोमर त्रिशूळ ॥ बाळहस्तें सुटती तीव्र ॥ एकाचे होती सहस्र ॥ कृपालाघवें कृष्णाच्या ॥ ३७॥ धैर्यमेरु तो खचला ॥ दैत्य परम घाबिरला ॥ आश्चर्य वाटलें जगत्रयाला ॥ देखोनि लाघव बाळाचें ॥ ३८ ॥ आकाशीं निर्जरांच्या[4] पंक्ती ॥ एकमेकांशीं बोलती ॥ पहा ईश्वराची लाघवरीति ॥ बाळहातें दैत्य त्रासिला ॥ ३९ ॥ जेणें जिंकिलें त्रिभुवन ॥ जेणें त्रिदश केले दीन ॥ त्या दैत्या बाळें मानिलें तृण ॥ धन्य लाघवी कृष्ण हा ॥ ४० ॥ बाळकानें युद्ध केलें ॥ हें कोणीं नाहीं ऐकिलें ॥ अथवा कोणीं नसे देखिलें ॥ तें घडविलें अघटित ॥४१॥ एक ह्मणती राहूं या गोष्टी ॥ बाळाचें युद्ध पाहावें दृष्टीं ॥ कधींही न झालें भूतसृष्टीं ॥ तें पाहतां दृष्टीं धन्य होऊं ॥ ४२॥ लोकांसी सांगावयाचें ॥ हेंचि एक नवल साचें ॥ धन्य जन्म यशाचें ॥ जेथें भगवंत वास करी ॥ ४३ ॥ बाळें स्मरिला वनमाळी ॥ हरिनामें देत आरोळी ॥ ह्मणे दैत्यासी ये काळीं ॥ मज हातोफळी[5] घे आतां ॥ ४४ ॥ दैत्य पश्चात्तापें तापला ॥ देवें माझ्या मनीं भ्रंश केला ॥ वरदानीं म्यां बाळ न गोंविला ॥ तुच्छ मानिला मतिभ्रंशें ॥ ४५ ॥ तरी बाळ नव्हे हा काळ ॥ वाटे मजलागीं मारील ॥ तथापि पुरुषें धैर्यबळ ॥ प्राणांतींही न सोडावें ॥ ४६ ॥ मग शस्त्रास्त्रांचें कौतुक ॥ दोघे दाविती निःशंक ॥ मी दैत्य हें बाळक ॥ लज्जा वाटे मज आतां ॥ ४७ ॥ बाळ ह्मणे सिंहध्वजा ॥ आतां आठवीं गरुडध्वजा ॥ देखोनियां मज धृततेजा ॥ पळोनि कोठें जाशी रे ॥ ४८ ॥ मी वृषकेताचा बाळ ॥ परी तुझा असें केवळ काळ ॥ आतां आठवीं गोपाळ ॥

१ लागलाच. २ कधीं झाला नाहीं व कधीं पुढें होणार नाहीं असा. ३ नम्रतेनें. ४ देवांच्या. ५ द्वंद्वयुद्ध.

हृदयकमळामाझारीं ॥ ४९ ॥ राया आतां सावधान ॥ मनीं आठवीं नारायण ॥ ऐसें त्याप्रति बोलोन ॥ गुणीं[1] बाण ऊाविला
॥५०॥ वस्त्रांचेळें[2] पुसोनि बाण ॥ अग्रीं केलें हरिनामलेखन ॥ मनीं चिंतिला जनार्दन ॥ धर्मचरण आठविले ॥ ५१ ॥ मग निजबळें
आकर्ण ओढोन ॥ बाळें सोडिला निर्वाण बाण ॥ तो व्यापीत चालिला गगन ॥ नेणों केवळ गभस्ति[3] ॥ ५२ ॥ प्रकाशें उजळल्या
दश दिशा ॥ भयें त्रासिलें असुरेशा ॥ कंप सुटला तया शेषा ॥ भूमितळ डळमळिलें ॥ ५३ ॥ भयें चकित देव पळती ॥ प्रळय-
काळ मांडला ह्मणती ॥ सर्वांचेही नेत्र झांकती ॥ भयें दडती भूमीसी ॥ ५४ ॥ बाण गर्जत जातसे ते वेळीं ॥ येवोनि बैसला कंठ-
नाळीं ॥ शिर उडालें आकाशपोकळीं ॥ मग भूमंडळीं येवोनि पडिलें ॥ ५५ ॥ प्रतापाचा सिंधु आटला ॥ धैर्याचा मेरु खचला ॥
कीं विक्रमद्रुम[4] उन्मळिला ॥ बाणप्रचंडवायूनें ॥ ५६ ॥ ऐसा सिंहध्वज तो पडिला ॥ संतोष झाला निर्जरमंडळा[5] ॥ बाळावरी पुष्प-
वर्षाव केला ॥ जयजयकार करोनि ॥५७॥ बभ्रुवाहन वृषकेतु धांवले॥ बाळकातें आलिंगिलें॥ मुखकमळ चुंबिलें ॥ जीवेंभावेंकरोनि
॥ ५८ ॥ तों दैत्यधडें नवल केलें ॥ करीं शस्त्र घेवोनि धांवलें ॥ शस्त्रघातें तिघांतें पाडिलें ॥ मूर्च्छागत तेधवां ॥ ५९ ॥ तों गिरि-
दरींतूनि श्रीकृष्ण ॥ दीर्घ श्वास टाकोन ॥ बाहेर येतसे धांवोन ॥ तों जयशब्द ऐकिला निराळीं[6] ॥ ६० ॥ तेथोनि निघाला भग-
वंत ॥ परी संशयभयें चकित ॥ कांहीं धांवत कांहीं चालत ॥ भीतभीत येतसे ॥ ६१ ॥ जो सर्वांघटीं व्यापक ॥ ज्याचा कळिका-
ळासी धाक ॥ तो भीतभीत रमानायक ॥ रणामाजी पातला ॥ ६२ ॥ देव रणांगण पाहों लागला ॥ तों सिंहध्वज मृत पडिला ॥
मग त्या संतोषें फुगला ॥ नाचों लागला रणामाजी ॥ ६३ ॥ देवें करुणामृतदृष्टींकरून ॥ उठविला बभ्रुवाहन ॥ तेणें मग समूळ
कथन ॥ बाळकाचें सांगितलें ॥ ६४ ॥ तैसाचि उठविला कर्णनंदन ॥ तेणें केलें कृष्णचरणवंदन ॥ अपार केलें स्तवन ॥ अनंत नामें
घेवोनि ॥ ६५ ॥ मग दयासागरें गोपाळें ॥ तया बाळातें उठविलें ॥ पोटासी धरूनि आलिंगिलें ॥ चुंबन केलें मुख त्याचें ॥ ६६ ॥
देवें केला जयजयकार ॥ वर्षती सुमनांचे[7] संभार ॥ दुंदुभी[8] वाजविल्या अपार ॥ सकळ सुर आनंदले ॥ ६७ ॥ मग देवें चिंतिला
सहस्रवदन ॥ तो चिंतितांचि आला धांवोन ॥ तयासी दिधलें आज्ञावचन ॥ सकळ नृप उठवावया ॥ ६८ ॥ मग सुहास्य बोले सह-
स्रफणी ॥ तुझी दृष्टि अमृताची जननी ॥ तथापि गौरव देशी आह्मांलागुनी ॥ आज्ञा प्रमाण स्वामीची ॥ ६९ ॥ मग शेषें अमृत
सिंचिलें ॥ सकळ नृपगण उठविले ॥ प्राणिमात्र जीवविले ॥ निद्रितापरी ऊठती ॥ ७० ॥ तों पार्थ उठिला झडकरी ॥ तेणें नमिला
श्रीहरि ॥ हंसध्वजादि सहपरिवारीं ॥ धांवताती हरिदर्शना ॥ ७१ ॥ उठिल्या सर्वही सेना ॥ छत्र ध्वज चामरें नाना ॥ घेऊनियां
यदुनंदना ॥ भेटीस चालिले सर्वही ॥ ७२ ॥ रणांगणीं देवोनि मंडप ॥ बैसला यदुकुळदीप ॥ क्षेमालिंगन देवोनि भूप ॥ सकळ

---

१ दोरीला. २ पदरानें. ३ सूर्य. ४ पराक्रमवृक्ष. ५ देवांना. ६ आकाशांत. ७ फुलांचे. ८ नगारे.

देवें सुखी केले ॥७३॥ भूप ह्मणती मेघश्यामा ॥ अप्रमेय तुझा महिमा ॥ या बाळाहातें कीं दैत्योत्तमा ॥ मारोनि आह्मां जीवविलें ॥ ७४ ॥ नृपें दाटलें सभास्थान ॥ मेघवर्णेंसीं आला भीमसेन ॥ देखतां दिधलें अभ्युत्थान[1] ॥ कृष्णादि सर्व नृपांनीं ॥ ७५ ॥ भीम धांवला वंदनासी ॥ तों देवें दिधलें क्षेम त्यासी ॥ तैसेंचि केलें मेघवर्णासी ॥ मग वार्ता भीमासी पुसत ॥७६॥ नामकरणादि समस्त ॥ भीमें सांगितला वृत्तांत ॥ ऐकोनियां देव हांसत ॥ भीमा कैसा पडिलासी ॥ ७७ ॥ भीम ह्मणे कृष्णा अवधारीं ॥ म्यां तों सेविली नसे गिरिदरी ॥ मूर्च्छित पडिलों समरीं ॥ नसे केली धर्महानि ॥ ७८ ॥ मग देव ह्मणे राहा उगले[2] ॥ या बाळें प्राण वांचविले ॥ सर्वही बाळा वर्णिते झाले ॥ धन्य धन्य ह्मणोनि ॥ ७९ ॥ मग देवें सकळांसी आज्ञापिलें ॥ दैत्यनगर लुटा वहिलें[3] ॥ संपत्ति हरा ये वेळे ॥ जी संचिलीसे अगण्य ॥ ८० ॥ मग दळेंसीं[4] सर्व लोटले ॥ नगर लुटिलें कीं सगळें ॥ परी द्रव्य तैसेंचि राहिलें ॥ न नेववे ह्मणोनियां ॥ ८१ ॥ सात दिवस अहोरात्र ॥ द्रव्य लुटितां न सरे स्वतंत्र ॥ सुवर्ण रत्नें अपार ॥ पर्वतप्राय पडियेलीं ॥ ८२ ॥ तो त्रिभुवनाचा अधिपति ॥ कोण त्याची वर्णील संपत्ति ॥ ऐसे अश्वमेध बहुत होती ॥ परी न सरे तें द्रव्य ॥ ८३ ॥ ऐकोनि नगरींची थोरी ॥ पहावया चालिला मुरारि ॥ संपत्ति पाहोनि अंतरीं ॥ विस्मय करी श्रीकृष्ण ॥ ८४ ॥ श्रीकृष्ण ह्मणे भीमासी ॥ घेवोनि द्रव्यरत्नराशी ॥ संगें घेवोनि बाळकासी ॥ तुह्मीं हस्तनापुरासी जाइंजे ॥ ८५ ॥ धर्मासी सांगावी क्षेमवार्ता ॥ कांहीं न करावी तुह्मीं चिंता ॥ तुझी कृपा आह्मांवरी असतां ॥ कळिकाळासी नाटोपूं ॥ ८६ ॥ संगें न्यावें अनुशाल्वासी ॥ न्याव्या सकळ रत्नराशी ॥ तो पाववोनि तुह्मांसी ॥ मागुती आह्मांपासीं येईल ॥ ८७ ॥ ऐसी कृष्णआज्ञा वंदोनि ॥ सत्वर निघाला गदापाणि ॥ बाळकासी संगें घेऊनि ॥ आणि सकळ दळेंसीं अनुशाल्व ॥ ८८ ॥ मग बभ्रुवाहन वृषकेतूसी ॥ आज्ञा करीत हृषीकेशी ॥ सोडा सत्वर श्यामकर्णांसी ॥ षोडशोपचारें पूजोनियां ॥ ८९ ॥ तंव नाना वाद्यें वाजों लागलीं ॥ श्यामकर्णीं पुढें चाल केली ॥ सकळ नृपावळी ती चालिली ॥ परमानंदेंकरोनियां ॥९०॥ ऐसें सिंहध्वजाचें आख्यान ॥ जे करितील सकळ श्रवण ॥ ते निष्पाप होऊन ॥ ब्रह्मसदना पावती ॥ ९१ ॥ हें पद्मपुराणींचें आख्यान ॥ तुज म्यां सांगितलें संपूर्ण ॥ व्यासप्रसादेंकरून ॥ श्रवण करविलें राजया ॥ ९२ ॥ येथोनि पुढें अवधारा ॥ अश्व जातील शोणितपुरा ॥ तेथें सन्मान करील यदुवीरा ॥ शिवभक्त बाणासुर ॥ ९३ ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अति गोड अमृतासमान ॥ तें ऐकावें सावधान ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ९४ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ येथें संपलें सिंहध्वजाख्यान अगाध ॥ द्व्यशीतितमाध्याय गोड हा ॥ ९५ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते सिंहध्वजाख्यानं नाम द्व्यशीतितमोऽध्यायः ॥ ८२ ॥ ॥ अध्याय ॥ ८२ ॥ ॥ ओव्या ॥ ९५ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

१ उठून उभें राहणें. २ उगाच. ३ सत्वर. ४ सैन्यासह.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ सत्यवतीनंदनप्रेमपात्रा ॥ वर्षोनि कथामृत पवित्रा ॥ शीतळ केलें माझिया गात्रा ॥ तथापि श्रोता तृप्त नव्हे ॥ १ ॥ पुढें सोडिले दोन्ही हय ॥ मग काय करी पंडुतनय ॥ ती कथा सांगोनि माझें हृदय ॥ शीतळ करीं सत्वरें ॥ २ ॥ जैमिनि ह्मणे नृपावतंसा ॥ सारासारविचारराजहंसा ॥ नित्य करीं शास्त्रप्रशंसा ॥ कंसारिचरण सेवोनि ॥ ३ ॥ सिंहध्वजातें निवटोन ॥ पुढें सोडिले श्यामकर्ण ॥ मागें चालिले कृष्णार्जुन ॥ सर्व रायांसमवेत ॥ ४ ॥ तीस अक्षौहिणी दळभार ॥ घेवोनि जातसे पार्थकुमर ॥ तितुकीच सेना कर्णकुमर ॥ घेऊनि जात त्याचे पाठीसी ॥ ५ ॥ तों पुढें लागलें पर्वतारोहण ॥ मार्ग देखिला परम कठिण ॥ वाम दक्षिण होतां पूर्ण ॥ होय पतन तत्काळीं ॥ ६ ॥ जेवीं स्वर्गगिरीतें वेंघतां ॥ तिळप्राय होतां चंचळता ॥ तों पतन होय तत्वतां ॥ जन्ममरणआवर्ती ॥ ७ ॥ पुढिलियां सांगे गदाधर ॥ सावध चाला मार्ग दुस्तर ॥ ऐसें ऐकतां सर्व वीर ॥ चरण टाकिती पाहोनि ॥ ८ ॥ ऐसा मार्ग अति दुस्तर ॥ प्रमाण योजनें चौदा सहस्र ॥ क्रमिते झाले दळभार ॥ कृष्णाश्रयेंकरूनि ॥ ९ ॥ प्रार्थासी ह्मणे कमळावर ॥ पुढें लागेल शोणितपुर ॥ तेथील राजा बाणासुर ॥ राज्य करीत प्रतापें ॥ १० ॥ पांच शत योजनें विस्तार ॥ परम रम्य शोणितपुर ॥ खंदक दिसे जेवीं सागर ॥ गगनचुंबित सप्त दुर्गें ॥ ११ ॥ अति उंच दुर्गप्राकार ॥ ज्यांजवळोनि जातसे भास्कर ॥ इंद्रभुवनासमान साचार ॥ गृहें अपार त्या स्थानीं ॥ १२ ॥ वनें उपवनें कासारें ॥ स्थळोस्थळीं दिसती मनोहरें ॥ कुमुदोत्पलें आणि कल्हारें ॥ शोभती भ्रमरीं सर्वदा ॥ १३ ॥ त्या नगरीची रचना ॥ काय वर्णूं पंडुनंदना ॥ तिचें प्रतिबिंब तें जाणा ॥ आमरावती इंद्राची ॥ १४ ॥ तो शंकराचा वरदपुत्र ॥ शिवभक्त परम पवित्र ॥ शिवनामाक्षरें मंडित वक्र ॥ शोभती श्रोत्र कीर्तनश्रवणीं ॥ १५ ॥ प्रतापाचा सूर्य केवळ ॥ गंभीर धैर्यबळसागर ॥ उदारपणें तो जलधर ॥ कुमर जाण तो बळीचा ॥ १६ ॥ त्याची उखा ती नंदिनी ॥ अनिरुद्धाची जी कामिनी ॥ जयेसी भोग झाला स्वप्नीं ॥ मग केलें पाणिग्रहण ॥ १७ ॥ जयेची सखी चित्ररेखा ॥ तिजऐशी नाहीं त्रिलोका ॥ जिणें स्वप्नपुरुष देखा ॥ द्वारकेहोनि नेला असे ॥ १८ ॥ तेथें अनिरुद्धा बंधन झालें ॥ तन्निमित्त जाणें घडलें ॥ दारुण युद्ध तेथें झालें ॥ मजशीं आणि दैत्यासीं ॥ १९ ॥ त्याचें साह्य करावया ॥ येणें झालें कैलासालया ॥ शिवा आणि मज धनंजया ॥ झाला दारुण संग्राम ॥ २० ॥ मज भीड घातली सदाशिवें ॥ ह्मणोनि तो राखिला जीवें ॥ चक्रें सहस्र भुजावन बरवें ॥ छेदोनियां पाडिलें ॥ २१ ॥ ऐसा प्रतापी तो बाणासुर ॥ होय अनिरुद्धाचा श्वशुर ॥ व्याही मदनाचा साचार ॥ धन्य सौजन्य तयाचें ॥ २२ ॥ तेणें धरितां हय वरिष्ठ ॥ तरी मज होईल संकट ॥ युद्ध करील उत्कृष्ट ॥ शरीरसंबंध न मानी तो ॥ २३ ॥ युद्ध करितां दारुण ॥ तो सर्वथा

१ घोडे. २ नृपश्रेष्ठा. ३ भोंवऱ्यांत. ४ श्रीकृष्ण. ५ चंद्रविकासी कमळें. ६ कमळें. ७ मुख. ८ शंकराला.

नेदीच श्यामकर्ण ॥ सुहृदसंबंधें मागावे आपण ॥ तरी स्वधर्मभ्रष्ट झालों कीं ॥ २४ ॥ ह्मणोनि उभयप्रकारें संकट ॥ पार्था प्राप्त झालें उद्भट ॥ ऐसा बोलत असतां स्पष्ट ॥ तों पुढें नगर देखिलें ॥ २५ ॥ अश्व नगरद्वारासी आले ॥ ते बाणासुरसैनिकें धरिलें ॥ ते पांडववीरीं अवलोकिले ॥ वेगें उठावले युद्धासी ॥ २६ ॥ दोन अक्षौहिणी पांडवदळ ॥ वेदं अक्षौहिणी दैत्यांचें बळ ॥ तेथें युद्ध झालें तुंबळ ॥ घटिका चारी दारुण ॥ २७ ॥ तों दैत्यसैन्य बळावलें ॥ पांडवसैन्यातें जिंकिलें ॥ वेगें अश्व नगरीं नेले ॥ ते दाखविले रायातें ॥ २८ ॥ बाणासुर ह्मणे हे अश्व कवणाचे ॥ दूत ह्मणती नकळे साचें ॥ तों देखिलें कमकपत्राचें ॥ लिखित भाळीं तयांच्या ॥ २९ ॥ नागपुराधीश धर्म प्रसिद्ध ॥ त्यासी झाला गोत्रवध ॥ त्यानिमित्त मांडिला अश्वमेध ॥ ह्मणोनि श्यामकर्ण सोडिले ॥ ३० ॥ जो प्रतापी असेल नृपति ॥ तेणें धरावें अश्वांप्रति ॥ युद्ध करूनियां सुभद्रापति ॥ त्यापासोनि सोडवील ॥ ३१ ॥ नाहीं तरी करूनि नमस्कार ॥ पार्थासी द्यावा करभार ॥ सवें घेवोनियां दळभार ॥ अश्वरक्षण करावें ॥ ३२ ॥ ऐसा वाचितां पुरुषार्थ ॥ मनीं संतोषला दैत्यनाथ ॥ ह्मणे पांडवांचा परम आप्त ॥ तो अत्यंत सुहृद आमुचा ॥ ३३ ॥ मनीं संतोषला बाणासुर ॥ ह्मणे सार्थक झालें साचार ॥ नरनारायणावतार ॥ घरीं येतील अनायासें ॥ ३४ ॥ परी संशयात्मक झाला बाण ॥ उभय पक्षीं ह्मणे संकट पूर्ण ॥ हें जाणोनि कुंभक प्रधान ॥ रायें पाचारिला जवळिकें ॥ ३५ ॥ बाण ह्मणे रे प्रधाना ॥ मन भरलें संशयकानना ॥ कैसी करावी विचक्षणा ॥ मजलागीं सांग रे ॥ ३६ ॥ हे तों धर्माचे श्यामकर्ण ॥ सेवकीं आणिले धरून ॥ तयांचा सहाय श्रीकृष्ण ॥ तो सुहृद होय आमुचा ॥ ३७ ॥ प्रद्युम्न तो आमुचा व्याही ॥ आणि अनिरुद्ध तो जांवई ॥ त्यासी कन्या दिधली पाहीं ॥ पोटींचें बाळ ती उखा ॥ ३८ ॥ युद्ध न करितां स्वधर्मभ्रष्ट ॥ केलिया होईल सौहृदतूट ॥ पक्षद्वयें मज संकट ॥ मांडिलें स्पष्ट ये काळीं ॥ ३९ ॥ यासी कैसी विचारणा ॥ ती मज सांगें रे प्रधाना ॥ ऐसें ऐकोनियां राजवचना ॥ प्रधान झाला बोलता ॥ ४० ॥ राया राजनीति आहे ऐसी ॥ कीं अंतर द्यावें सुहृदांसी ॥ परी न सोडावें स्वधर्मासी ॥ ऐसें बोलती मन्वादिक ॥ ४१ ॥ निर्गुण तरी करावा स्वधर्म ॥ हें शास्त्राचें मुख्य असे वर्म ॥ परी अन्य धर्म परम उत्तम ॥ सर्वथाही नाचरावा ॥ ४२ ॥ धर्मत्यागें नरकीं पतन ॥ होय ऐसें बोलती सर्व जन ॥ सोडोनि देतां सुहृदपण ॥ कोण नरकासी पैं गेला ॥ ४३ ॥ क्षात्रधर्मासी सुहृदपण ॥ सर्वथा न बोलिलें जाण ॥ ह्मणोनि युद्ध करावें दारुण ॥ शास्त्रमतें भासे ऐसें मज ॥ ४४ ॥ ऐसें ऐकतां प्रधानवचन ॥ परम क्रोधावला बाण ॥ वीरां दिधलें आज्ञावचन ॥ सैन्य सिद्ध करा ह्मणोनि ॥ ४५ ॥ मग घाव दिधला निशाणा ॥ सिद्ध केली सकळ सेना ॥ रणतुरें वाजती नाना ॥ छत्र ध्वज पताका शोभती ॥ ४६ ॥ ऐसें सैन्य चालिलें

१ चार. २ हस्तिनापुरपति. ३ खरोखर. ४ व्यवस्था. ५ आप्तांना.

प्रचंड ॥ आपण झाला रथारूढ ॥ करीं घेतलें कोदंड[1] ॥ नगराबाहेर निघाला ॥ ४७ ॥ तंव बाण ह्मणे कुंभक प्रधाना ॥ बाहेर आली सकळ सेना ॥ इची करोनियां गणना ॥ मजलागीं निवेदीं ॥ ४८ ॥ मग प्रधानें केलें गणित ॥ शतद्वय कोटी गज मदोन्मत्त ॥ अश्व मोजिले कोटिशत ॥ तदर्ध संख्या रथांची ॥ ४९ ॥ परी संख्या नसे पदातींची ॥ तीही सांगतों मुख्यमुख्यांची ॥ कोटी संख्या खड्गधरांची ॥ त्रिशूळधर तितुकेचि पैं ॥ ५० ॥ मुद्गल पट्टिश पाश तोमर ॥ गदा परिघ परशुधर ॥ कुंत यष्टिका परिकर ॥ कोटि कोटि संख्या सकळही ॥ ५१ ॥ साठ सहस्र वेत्रधर[2] ॥ लक्षसंख्या स्तुतिकार ॥ इतुका तो दळभार ॥ रणांगणा निघाला ॥ ५२ ॥ तों बाणें पांडवदळ देखिलें ॥ नेणों चार समुद्र एकवटले ॥ मन परम भय पावलें ॥ बाणासुराचें तेधवां ॥ ५३ ॥ ध्वज पताकांचेनि पल्लवें ॥ मेघडंबरांचेनि वैभवें ॥ अंबरें[3] आच्छादिलें आघवें ॥ निबिडें[4] छाया पडियेली ॥ ५४ ॥ नभीं आतपत्रांच्या[5] श्रेणी ॥ कळशीं नमिले शशिसूर्य दोन्ही ॥ कनकरज[6] पडती संघर्षणीं ॥ तेणें अवनि[7] पीत झाली ॥ ५५ ॥ अपार उठिले सैन्यरेणु ॥ तेणें झांकोळला भानु[8] ॥ शस्त्रसंघर्षणें पडे कृशानु[9] ॥ तो शांत होय गजमदानें ॥ ५६ ॥ गज धांवती जैसे पर्वत ॥ विमानापरी दिसती रथ ॥ मनोजवें[10] अश्व धांवत ॥ पदाती चालती काळापरी ॥ ५७ ॥ वीर सिंहनादें गर्जत ॥ आणि अश्वजाती हिंसत ॥ रथांचे घडघडाट शब्द होत ॥ तेणें कांपे धरादेवी ॥ ५८ ॥ ऐसें दळ तें दाटलें ॥ नेणों प्रळयमेघांचे पूर लोटले ॥ आत्मदळसंख्येतें निवेदिलें ॥ प्रधानें तेव्हां बळिसुता ॥ ५९ ॥ असो दोन्ही सैन्यांची मिळणी ॥ आतां व्हावी खणाखणी ॥ तों अकस्मात नारदमुनि ॥ तया स्थानीं पातला ॥ ६० ॥ करीं ब्रह्मवीणा वाजवित ॥ मुखीं हरिनाम उच्चारित ॥ ब्रह्मानंदें नाचत ॥ कृष्णाजवळी पातला ॥ ६१ ॥ कृष्णें देऊनि अभ्युत्थान ॥ बरवा केला सन्मान ॥ पार्थादिकीं त्यासी नमोन ॥ प्रेमें आसनीं बैसविला ॥ ६२ ॥ तों नारद बोले जगज्जीवना ॥ कां ही सिद्ध झाली रे सेना ॥ येरू ह्मणे मुनिभूषणा ॥ युद्ध करावया बाणासीं ॥ ६३ ॥ तुह्मी कलहप्रिय सृष्टीं ॥ असोनि पुसतां नवल गोष्टी ॥ तुमच्या कालक्रमणेसाठीं ॥ आह्मीं केला उद्योग ॥ ६४ ॥ मग बोले विधितनयें[11] ॥ ऐसा मी कृष्णा काय निर्दय ॥ सत्य मी आहें कलहप्रिय ॥ परी मी स्थळास्थळ जाणतों कीं ॥ ६५ ॥ मज समरांगणाची गोडी ॥ अत्यंत असे कृष्णा हीचि खोडी ॥ परी सुहृदपणातें तोडी ॥ त्या न गोडी युद्धांत ॥ ६६ ॥ जें कृष्णाचें मनोगत ॥ तेंचि नारद बोलत ॥ सर्वांतरीं श्रीअनंत ॥ व्यापक वदवी तोचि पैं ॥ ६७ ॥ कृष्णा तूं विवेकसागर ॥ येथें वर्षावें कृपामृतनीर ॥ परी तें आटलेंसें दिसे साचार ॥ ह्मणोनि निष्ठुर झालासी ॥ ६८ ॥ जें कृपामृतेंकरूनि सिंचिलें ॥ जें स्नेहबळें वाढविलें ॥ तें सुहृदपण जाळों आरंभिलें ॥ निर्दयानळें

१ धनुष्य. २ चोपदार. ३ आकाश. ४ दाट. ५ अबदागिरांच्या. ६ सोन्याचे कण. ७ पृथ्वी. ८ सूर्य. ९ अग्नि. १० मनोवेगानें. ११ नारद.

ये काळीं ॥ ६९ ॥ लागली सुहृदरत्नांची खाणी ॥ ती तूं बुडविशी क्रोधमृत्तिकेंकरूनि ॥ काय बोलावें चक्रपाणि ॥ अवाच्य करणी पैं तुझी ॥ ७० ॥ शंकरपुत्र बाणासुर ॥ अनिरुद्धाचा होय श्वशुर ॥ प्रद्युम्नाचा व्याही साचार ॥ तो काय वैरी मानिसी ॥ ७१ ॥ तुझिया संगाचें हेंचि फळ ॥ कीं संहारावें सुहृददळ ॥ आणि आपण ह्मणविशी दयाळ ॥ तुझे कळले खेळ सर्वही ॥ ७२ ॥ सुहृदांचें हेंचि थोरपण ॥ कीं करावें दुःखाचें हरण ॥ तें त्यागोनियां पीडन ॥ आरंभितां आतां काय बोलावें ॥ ७३ ॥ बाणासुर बळें संपन्न ॥ अनिवार तो सर्वांहून ॥ तुह्मांलागीं नाटोपे ह्मणोन ॥ म्यां पूर्वींच हें सुचविलें ॥ ७४ ॥ त्या बाणासुराचें अनिष्ट ॥ करितां होतील तुजला कष्ट ॥ हें मी सांगतों कीं स्पष्ट ॥ विवेकभ्रष्ट न होइंजे ॥ ७५ ॥ आपुल्या मनींच समजावें ॥ बाणासुरातें न झुंजावें ॥ मी तुझें हित सांगतों भावें ॥ तें ऐकावें गोविंदा ॥ ७६ ॥ आतां विवेकामृत न टाकावें ॥ क्रोधाक्षरजळ न सेवावें ॥ अविवेकें कांहीं न करावें ॥ जरी झाला प्राणांत ॥ ७७ ॥ तंव रमावदनांभोजमधुकर ॥ मंदस्मितवदन अति सुंदर ॥ मुनीस बोलतसे प्रत्युत्तर ॥ तें तूं ऐकें जनमेजया ॥ ७८ ॥ शिष्य मरतां अन्यायवाटे ॥ तें सद्गुरूसी दुःख मोठें ॥ मग तो धांवोनि नेटें ॥ लावीत वाटे विवेकाच्या ॥ ७९ ॥ तेवीं तूं आमचा गुरु होसी ॥ आह्मां लाविसी सन्मार्गासी ॥ तुझें वचन प्रमाण आह्मांसी ॥ जेवीं चातकासी घन[2]तोय ॥ ८० ॥ सुहृदपण न भंगून ॥ प्राप्त होती श्यामकर्ण ॥ ऐसें साधिलिया कार्य जाण ॥ मग युद्ध करणें कासयातें ॥ ८१ ॥ तरी स्वामी एक करावें ॥ बाणासुरातें बोधावें ॥ श्यामकर्णातें सोडवावें ॥ सौजन्य राखावें उभयतांचें ॥ ८२ ॥ हेंचि माझे मानसीं ॥ तेंचि मुने तूं बोलिलासी ॥ तरी शीघ्र जाईं बाणापाशीं ॥ बोध त्यासी करावया ॥ ८३ ॥ असो नारद तेथोनि निघाला ॥ बाणासुराचे दळीं पातला ॥ वीर कांपले ते वेळां ॥ ह्मणती कळलाव्या आला रे ॥ ८४ ॥ बाणें देवोनि सन्मान ॥ आसनीं बैसविला विधि[3]नंदन ॥ ह्मणे आगमन कोठून ॥ स्वामी झालें अवचितां ॥ ८५ ॥ नारद बोले बाणासी ॥ कां सिद्ध केलें रे दळासी ॥ येरू ह्मणे युद्ध करावयासी ॥ पांडवासीं स्वामिया ॥ ८६ ॥ ऐकोनियां बाणवचन ॥ हांसों लागला ब्रह्म[3]नंदन ॥ अद्यापी तुजला अज्ञान ॥ कां न सोडी सर्वथा ॥ ८७ ॥ तुझे ठायीं माझा [4]अनुराग ॥ तरी हित सांगतों मी [5]चांग ॥ परी त्वां न धरावा राग ॥ निष्ठुर वचन बोलतां ॥ ८८ ॥ तुझे साह्यालागीं आला होता [6]हर ॥ तो केला जेणें जर्जर ॥ सहस्र भुजांचा संहार ॥ जेणें केला क्षणमात्रें ॥ ८९ ॥ तेव्हां एकलाचि होता रमावर ॥ आतां असंख्य वीरभार ॥ त्यांचा पराक्रम थोर ॥ मज न वर्णवे स्वमतीनें ॥ ९० ॥ जेणें शंकरही जिंकिला ॥ जेणें शरें सेतु बांधिला ॥ हनुमंत स्वाधीन केला ॥ मग तो स्थापिला ध्वजाग्रीं ॥ ९१ ॥ जेणें केलें शर-

१ कृष्ण. २ पावसाचें पाणी. ३ नारद. ४ ममता. ५ उत्तम. ६ शंकर.

सोपान ॥ ऐरावत आणिला स्वर्गींहून ॥ मातेचें व्रत केलें पूर्ण ॥ आणि शचीवरही जिंकिला ॥ ९२ ॥ त्याचे पराक्रम बहुत ॥ ऐकले कीं सांप्रत ॥ राजे जिंकिले समस्त ॥ भूमीसी करितां प्रदक्षिणा ॥ ९३ ॥ जेणें जिंकिले सकळ नृपती ॥ चंद्रहासादि महामती ॥ तेही समागमें असती ॥ आज्ञा पाळिती तयाची ॥ ९४ ॥ जे जे राजे काळासमान ॥ ते ते मारिले जैसे मत्कुण[1] ॥ तरी आतां समरांगण ॥ न करावें सुजाणा ॥ ९५ ॥ दुंदुभीसारिखा दैत्यनाथ ॥ त्याचाही केला निःपात ॥ त्याचे पुत्र विख्यात ॥ संगें असती पार्थाच्या ॥ ९६ ॥ ह्मणशील माझा कृष्ण सोयरा ॥ परी पार्थ त्याचा प्राण खरा ॥ प्राणावरी आलिया सोयरा ॥ कोण ओळखी तयातें ॥ ९७ ॥ आतां तुवां एक करावें ॥ कृष्णार्जुनांसी भेटावें ॥ श्यामकर्णातें सोडावें ॥ कुळ वांचवावें या रीतीं ॥ ९८ ॥ ऐसा विचार ऐकिला ॥ तो असुरातें मानवला ॥ परी तत्पुत्रांचे मनासी न आला ॥ जेवीं रोगिया मिष्टान्न ॥ ९९ ॥ तयाचे पुत्र ते महाप्रबळ ॥ लवणासुर आणि दवणासुर ॥ दोघे झाले क्रोधातुर ॥ तिरस्कारिती बाणातें ॥ १०० ॥ ह्मणती न द्यावें अश्वांतें ॥ आणि न भेटावें तयांतें ॥ आह्मी करूं कीं युद्धातें ॥ सुहृदपणातें टाकोनि ॥ १ ॥ हिरण्यकशिपूचा सुत ॥ प्रल्हाद भक्त विख्यात ॥ त्याचा विरोचन सुत ॥ तत्पुत्र बळी जन्मला ॥ २ ॥ त्याणें केलें कीं नवल ॥ द्वारीं ठेविला देव द्वारपाळ ॥ रणीं दानीं तो सुशीळ ॥ नसे त्यासम त्रिलोकीं ॥ ३ ॥ ऐसा जो कां अतुलबळी ॥ त्याचा पुत्र तो तूं निर्बळी ॥ लोकांमाजी होईल रळी ॥ तरी युद्ध न सोडावें ॥ ४ ॥ धरूनियां सुहृदअनुराग[3] ॥ न करावा धर्माचा त्याग ॥ स्वधर्मत्यागें पाप अभंग ॥ होईल ऐसें नेणशी ॥ ५ ॥ तूं शिववरदी बाण प्रसिद्ध ॥ करिशील काळाचाही वध ॥ तो तूं ह्मणसी धर्मयुद्ध ॥ न करीं हें नवल कीं ॥ ६ ॥ मग त्यांसी बोले बाणासुर ॥ तुमचा बरवा रे विचार ॥ परी ते नरनारायणावतार ॥ साक्षात ईश्वर जाणा कीं ॥ ७ ॥ एक अग्नि एक समीर[4] ॥ मिळोनि जाळितील हें चराचर ॥ तैसे ते दोघे अवतार ॥ दुष्टनाशार्थ अवतरले ॥ ८ ॥ जरी युद्ध करावें दारुण ॥ तेणें उभयतांचा नाश पूर्ण ॥ शेवटीं तो जगन्मोहन ॥ जय देईल अर्जुना ॥ ९ ॥ ह्मणोनि तयास भेटावें ॥ श्यामकर्णातें सोडावें ॥ इतुक्यानें आनंद पावावें ॥ उभय दळीं सर्वांनीं ॥ ११० ॥ जरी तुह्मांसी असेल अनुमान ॥ तरी सैन्य पाहावें जाऊन ॥ चतुःसमुद्रापरी विस्तीर्ण ॥ तेथें प्रवेश नव्हे पवनाचा ॥ ११ ॥ ध्वजाग्रीं विराजे हनुमान ॥ मध्यें शोभे पृथानंदन ॥ पुढें सारथि शोभे यदुनंदन ॥ अनिर्वाच्य शोभा तिघांची ॥ १२ ॥ मग त्या पुत्रीं पाहिलें पार्थदळ ॥ तों व्याप्त केला भूगोळ सकळ ॥ तेणें अंतरीं उपजला भयानळ ॥ मानिती विचार जनकाचा ॥ १३ ॥ बाणासुर बोले पुत्रांतें ॥ देखिलें कीं पार्थदळातें ॥ आतां सोडिलें संशयातें ॥ किंवा नाहीं मज सांगा ॥ १४ ॥

१ इंद्र. २ ढेंकूण. ३ आप्तांवरील प्रेम. ४ वायु.

एक तों ते अतुलबळी ॥ आणे सुहृदसंबंधानें अति जवळी ॥ पोटींची कन्या असे त्यां दिधली ॥ असा सर्व विचार जाणितला ॥ १५ ॥ आतां बाणपुत्रांतें घेऊन ॥ भेटीस जाईल विधिनंदन ॥ दोघांचें सख्य करूनि पूर्ण ॥ आणील सदना बाणाच्या ॥ १६ ॥ प्रधान आणि दोघे तनय ॥ तैसाच बाण तो गुणालय ॥ सर्वीं केला निश्चय ॥ जावें भेटीस कृष्णाच्या ॥ १७ ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ अत्यंत आहे रसाळ जाण ॥ तें ऐकावें सावधान ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १८ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतर-कथानुवाद ॥ बाणासुराख्यान अगाध ॥ त्र्यशीतितमाध्याय गोडहा ॥ ११९ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके बाणासुराख्यानं नाम त्र्यशीतितमोध्यायः ॥ ८३ ॥ अध्याय ॥ ८३ ॥ ओव्या ॥ ११९ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ व्यासार्णवकथामृतोदक ॥ घेवोनि जैमिनि झाला बलाहक[1] ॥ सभांबरासी[2] येवोनि देख ॥ भाविकांवरी वर्षला ॥ १ ॥ तेथें जनमेजय तो चातक ॥ ऊर्ध्व करूनि पसरिलें मुख ॥ प्राशन करावया कथोदक ॥ सादर असे स्वानंदें ॥ २ ॥ तो मेघ वर्षोनि ओसरत ॥ हा कथोदक अखंड वर्षत ॥ तो चातक बिंदुद्वयानें होय तृप्त ॥ या चातका तृप्ति नव्हे ॥३॥ जैमिनि ह्मणे जनमेजया ॥ धीरवीरा गुणालया ॥ पूर्वजकथाजह्नुतनया ॥ आतां ऐकें सावधान ॥४॥ मग नारदासी ह्मणे बाणासुर ॥ आतां न करावा उशीर ॥ सवें घेवोनि दोघे कुमर ॥ प्रधानासमवेत घ्यावी भेटी ॥५॥ बरें ह्मणोनि द्रुहिणकुमर[3] ॥ एक अक्षौहिणी दळभार ॥ दोघे घेऊन बाणकुमर ॥ वेगेंकरूनि निघाला ॥ ६ ॥ शंख भेरी मृदंग वाजती ॥ दुंदुभिघोष गर्जती ॥ त्यांमाजी तुरांच्या ध्वनी होती ॥ कांहाळ[4] जेंगटें आणि शृंगें ॥७॥ नृत्यांगना त्या नाचती ॥ धाडी नटवे गायन करिती ॥ छत्र ध्वज पताका शोभती ॥ भाट गर्जती मेघाऐसे ॥८॥ ऐसा उत्साहें निघाला ॥ तों पुढें नारद धांवोनि गेला ॥ सर्व वृत्तांत सांगितला ॥ कृष्णार्जुनांसी संतोषें ॥९॥ ऐकोन कलिप्रियाचें[3] वचन ॥ मनीं पावले समाधान ॥ ह्मणती येणें निवारिलें मरण ॥ उपकार याचा थोर झाला ॥१०॥ पार्थासी बोले यदुनंदन ॥ रम्य करावें सभास्थान ॥ पाचारा सर्व नृपगण ॥ बाणपुत्रांस भेटावया ॥११॥ बरवें ह्मणोनि पृथानंदन ॥ रम्य केलें सभास्थान ॥ लोड तिवाशा गाद्या पूर्ण ॥ रम्य आस्तरणें पैं केलीं ॥ १२ ॥ कस्तूरी कर्पूर चंदनोदक ॥ चहूंकडे सिंचिलें सम्यक ॥ धूपें धूपवोनि सम्यक ॥ कुसुममाळा आणिल्या ॥१३॥ तों समीप पातले बाणकुमर ॥ त्यांसी सामोरे पाठविले वीर ॥ पार्थात्मज कर्णकुमर[5] ॥ अपार दळ देवोनि ॥ १४ ॥ तयांसी परस्परें झाली भेटी ॥ नारद सांगे खुणा गोष्टी ॥ येरयेरां देखोनियां दृष्टीं ॥ समाधान पावले ॥ १५ ॥ दोनी सरिता[6] मिळोनि जैशा ॥ सिंधूमाजी करिती प्रवेशा ॥ तेवीं दोनी सैन्यें जगदीशा ॥ भेटावया चालिलीं ॥१६॥ समीप देखोनि सभास्थान ॥ रथाखालीं उतरले तिघेजण ॥ पार्थादिक येवोन ॥ सन्मुख उभे राहिले ॥१७॥ तों बाणपुत्र कर जोडून ॥ कृष्णार्जुनांसी करिती नमन ॥ येरें देवोनियां आलिंगन ॥ केले सुखी तिघेही ॥१८॥ मग प्रद्युम्न आणि अनिरुद्ध ॥ परस्परें भेटती विशद ॥ नारदें करूनि नामाचा बोध ॥ सर्व नृपती भेटविले ॥१९॥ सभा घनवट दाटली ॥ मध्यें शोभला वनमाळी ॥ भोंवतीं शोभे नृपमंडळी ॥ सभामंडळी यंत्राकार ॥२०॥ मग रायाचा प्रधान ॥ उभा ठाकला कर जोडून ॥ दृष्टीं लक्षोनि कृष्णचरण ॥ स्तवन तेव्हां आरंभिलें ॥ २१ ॥ जयजया जी यदुकुलावतंसा ॥ योगिमानसराजहंसा ॥ जयजय भवरोगविध्वंसा ॥ निर्जितकंसा श्रीकृष्णा ॥ २२ ॥ भक्तदुरिततापहरणा ॥ जय विघ्नार्णवघटनंदना ॥ भक्तजन्ममरणशमना ॥ खगगमना यदुराया ॥ २३ ॥ रविसुतातटपुलिनविहारा[7] ॥ गौळीजनवधूचित्तचोरा ॥ सद्भावनंदकिशोरा ॥ भक्तियशोदासत्पुत्रा ॥२४॥ तूं संसारसागरींचें तारूं ॥ भक्तमनोरथकल्पतरु ॥ तूं कमलोद्भवाचा[8]

---

१ मेघ. २ सभारूपी आकाशास. ३ नारद. ४ झांज. ५ वृषकेतु. ६ नद्या. ७ यमुनानदीच्या तीरावरील वाळवंटांत क्रीडा करणाऱ्या. ८ ब्रह्मदेवाचा.

आदिगुरु ॥ व्यापकपणें स्वामिया ॥२५॥ तुझा होतां कृपाकटाक्ष ॥ समूळ उपडे कल्पनावृक्ष ॥ तुच्छ वाटे कल्पवृक्ष ॥ अकल्पित दाता तो नव्हे ॥२६॥ तव चरणाग्रीं भागीरथी ॥ तूं बैससी योगियांचे मनोरथीं ॥ तो तूं झालासी पांडवसारथि ॥ नेणवे भाग्य तयांचें ॥२७॥ त्या पांडवांचें संकटवन ॥ स्मरणमात्रें जाळिसी पूर्ण ॥ कृपेनें करिसी भक्तपालन ॥ करिसी निर्दलन दुष्टांचें ॥२८॥ वर्णितां भागला सहस्रवदन[1] ॥ स्तवितां श्रमला सहस्रनयन[2] ॥ तेजें लोपला सहस्रकिरण[3] ॥ ऐसें महिमान तुझें पैं ॥२९॥ त्या तुझें म्यां केलें स्तवन ॥ हें थोर माझें मूर्खपण ॥ भक्तीनें केलें हें धीटपण ॥ क्षमा संपूर्ण करावी ॥३०॥ ऐकोनियां त्याचें स्तवन ॥ प्रेमें संतोषला रमारमण ॥ जवळी बैसोनि प्रधान ॥ तो काय विज्ञप्ति करीतसे ॥ ३१ ॥ ह्मणे बळिसुताची वासना ॥ कीं परिवारेंसीं यावें सदना ॥ कृपाकटाक्षें पाहावें सुहृदजनां ॥ धन्य मजला करावें ॥३२॥ जे चरण दिधले जनकमाथां ॥ तेचि मज दावीं कृष्णनाथा ॥ चरणरजें मज कृतार्था ॥ पितयापरी करावें ॥३३॥ ऐसी दैत्यनाथाची वासना ॥ पूर्ण करावी कृपाघना ॥ तें ऐकोनि देवराणा ॥ बरें ह्मणोनि अनुवादे ॥३४॥ प्रधानासी ह्मणे कंसारि ॥ मज तो व्याही संसारीं ॥ जो मज प्रेमभावें पाचारी ॥ त्यासी मी सर्वथा नुपेक्षीं ॥३५॥ त्यावीण मज सोइरा ॥ कोणी नसे कीं दूसरा ॥ सुहृदजनाचिया मंदिरा ॥ अवश्य येणें मजलागीं ॥ ३६ ॥ मज वडील बंधूची नसे चाड[4] ॥ मज कामिनीची नसे भीड ॥ मज जीवित हें न वाटे गोड ॥ कार्यापुढें भक्तांच्या ॥३७॥ दोषी केलें बळरामासी ॥ तयासी धाडिलें तीर्थाटनासी ॥ म्यां रक्षिलें पाडवांसी ॥ नाना युक्ती करोनि ॥३८॥ भीष्में केला होता पण ॥ कीं कृष्णाहातीं शस्त्र धरवीन ॥ न धरवीं तरी गंगा-नंदन[6] ॥ हें नाम राहावीन येथोनि ॥३९॥ म्यांही केला होता पण ॥ कीं शस्त्र न धरीं ह्मणोन ॥ तेथें म्यां घेतलें लटिकेपण ॥ सत्य केलें भक्तासी ॥४०॥ जी क्षीरसागराची नंदिनी ॥ ती सेवेसी लाविली चरणीं ॥ परी खांदीं घेवोनि गौळणी ॥ कुंजवनांत क्रीडलों ॥४१॥ विधि माझे पोटींचें बाळ ॥ तें कर्मीं गोंविलें सर्वकाळ ॥ बळीचा होवोनि द्वारपाळ ॥ सुखें तेथें क्रीडलों ॥४२॥ अत्यंत प्रिय तें जीवित ॥ हेंही मज गोड न लागत ॥ भक्तांवांचोनि मज किंचित ॥ आवडे न अन्य सर्वथा ॥४३॥ ह्मणोनि पांडव माझे सोइरे ॥ ते माझे पंचप्राण खरे ॥ त्यांचे कामिनीसी मी न विसरें ॥ भाव जाणोन तयांचा ॥४४॥ जन्मापासोनि अविलंब ॥ त्यांकरीं सांपडलों सांग ॥ त्यांचे कार्या न लावीं विलंब ॥ सोडोनि कुटुंब धांवतसें ॥४५॥ मग सकळां आज्ञापी यदुनंदन ॥ तुह्मीं जावें जी नगरा पूर्ण[7] ॥ दानशूरपुत्राचें सदन ॥ करावें कृपेनें शोभित ॥४६॥ ऐसें बोलतां यदुपुंगव ॥ सर्व उभे ठाकले पार्थिव ॥ ह्मणती जिकडे जाईल हा जीव ॥ तिकडे गात्रें जातील ॥४७॥ सूर्याधारें सूर्यकिरण ॥ तापविती सकळ जन ॥ मग तो निजधामा करितां गमन ॥ सहजचि जाती त्यामागें ॥४८॥ देवा तुझा पंक्तिलाभ ॥ ब्रह्मादिकां जो दुर्लभ ॥ तो आह्मां झाला सुलभ ॥ या धर्माचे प्रसादें ॥४९॥ गोपाळांसमवेत भोजन ॥

१ शेष. २ हजार डोळे ज्याला आहेत असा ( इंद्र ). ३ सूर्य. ४ परवा. ५ स्त्रीची. ६ भीष्म. ७ आतांपर्यंत.

करितां पडे जें शेषान्न ॥ तयातें वांच्छित चतुरानन ॥ परी तें अप्राप्य सर्वार्थीं ॥५०॥ उच्छिष्ट न पावती ब्रह्मादिक ॥ त्या तुझे पंक्तिकर आह्मी देख ॥ ह्मणोनि आह्मांसी हरिख ॥ ज्यासी उपमा पैं नाहीं ॥५१॥ ऐसें सकळ नृपांचें उत्तर ॥ ऐकतां संतोषला श्रीवर ॥ पार्थासी ह्मणे हे बाणकुमर ॥ वस्त्राभरणीं गौरवावे ॥५२॥ बरवें ह्मणोनि सुभद्रारमण ॥ गंधमाल्यवस्त्राभरण ॥ रथाश्वगजांतें देऊन ॥ तिघेजण संतोषविले ॥५३॥ श्रीकृष्ण ह्मणे प्रधानासी ॥ तुह्मीं पुढें जावें वेगेंसीं ॥ मी येतों सकळ परिवारेंसीं ॥ ऐसें रायासी सांगावें ॥५४॥ बरवें ह्मणोनि तिघेजण ॥ शीघ्र चालिले तेथून ॥ कृष्णें तयांतें बोळवून ॥ सभास्थाना तो आला ॥५५॥ मग ते बळिनंदनातें भेटून ॥ प्रेमें सांगती कृष्णसन्मान ॥ ह्मणती जें सुख न पावे चतुरानन ॥ तें सुख आह्मी पावलों ॥५६॥ अनंत केल्या पुण्यराशी ॥ ह्मणोनि आलों तवोदरासी ॥ तव कृपेनें हृषीकेशी ॥ धणीभरी पाहिला ॥५७॥ पाहातां हरिपदनलिन ॥ धन्य झाले आमुचे नयन ॥ धन्य उखा भगिनी-रत्न ॥ जिणें कृष्णवदन पाहिलें ॥५८॥ ऐकोनि ऐसें पुत्रवचन ॥ अत्यंत तोषला तो बाण ॥ ह्मणे ओंवाळावें त्रिभुवन ॥ कृष्ण सोइऱ्याव रोनि ॥५९॥ संतोषें फुगला बाणासुर ॥ मग पुरोहिताप्रति बोले उत्तर ॥ तुह्मीं जावोनि सत्वर ॥ राणीलागीं सांगावें ॥६०॥ अनंत ब्रह्मां-डाधीश पाहीं ॥ तो कृष्ण आला तुमचा व्याही ॥ तो मानवेल ऐसीं कांहीं ॥ षड्रस अन्नें निर्मावीं ॥६१॥ मग सवेग जाऊनि पुरोहित ॥ राणियांसी श्रुत करित ॥ ऐकतां हर्ष झाला बहुत ॥ स्वमुखें पुसती वर्तमान ॥ ६२॥ पुरोहितासी बोलती युवती ॥ कोण कोण आले जी नरपती ॥ येरू ह्मणे कमळापति ॥ सुभद्रापति मित्र त्याचा ॥ ६३॥ प्रद्युम्न तुमचा व्याही ॥ तोही आला असे पाहीं ॥ अनिरुद्ध तुमचा जांवई ॥ तोही आला महावीर ॥६४॥ चंद्रहासादि पुण्यश्लोक ॥ राजे आले असती अनेक ॥ ऐसें ऐकतां झाला हरिख ॥ राणियांसी तेधवां ॥६५॥ मग पाकक्रिया केली बरवी ॥ जी देवादिकां नसे ठावी ॥ ज्याचे सुवासाची पदवी ॥ इच्छा उपजवी मलयानिळा ॥६६॥ त्या अन्नरसामाजी ॥ अमृत वाटे जेवीं कांजी ॥ ज्यांतें कमळापति नांवाजी ॥ ऐसीं अन्नें निर्मिलीं ॥६७॥ मग सांगोन पाठविलें रायासी ॥ पाचारावें कीं व्याह्यासी ॥ शीतळ झालिया अन्नासी ॥ रुचि उणी होईल ॥६८॥ ऐसें ऐकतां वचन ॥ पुरोहितें तें निवेदिलें येऊन ॥ तों नारद बोले वचन ॥ बाणासुरासी तेधवां ॥६९॥ तुह्मी सिद्ध करा जी सामग्रीतें ॥ क्षुधा न सोसे कृष्णातें ॥ विलंब जरी कराल येथें ॥ तरी व्याही चडफडतील क्षुधानळें ॥७०॥ बाण ह्मणे जी सिद्ध पाक ॥ आतां आणावा यदुनायक ॥ अविलंबें जावें सम्यक ॥ तुह्मीं आह्मीं उभयतां ॥७१॥ तों सिद्ध सैन्य केलें त्वरित ॥ नाना वाद्यें हो वाजत ॥ नृत्यांगना त्या नाचत ॥ मंगळतुरें अपार ॥७२॥ पुढें धांवती वेत्रधार ॥ मार्ग करिती अति सत्वर ॥ जेवीं जाय जाह्नवीचें नीर ॥ उभय तटें करूनि ॥७३॥ मध्यें चाले बाण पवित्र ॥ मस्तकीं शोभे आतपत्र ॥ दोहीं बाहीं चामरें विचित्र ॥ कनकदंडें विराजती ॥७४॥ ऐकतांचि वाद्यघोष ॥ गजबजिला हृषीकेश ॥ ह्मणे येतो कीं दैत्येश ॥ आमचे गमना-

१ आनंद. २ ब्रह्मदेव. ३ पोटभर. ४ अर्जुन. ५ नाचणाऱ्या स्त्रिया. ६ उदक. ७ बाजूंना.

लागोनि ॥७५॥ दोहीं भागीं गजांचे थाट ॥ तैसेचि असती रथ उद्भट ॥ अश्व धावती निकट ॥ मनोवेगें जयाचे ॥७६॥ तों पुढें धवांला विधिपुत्र ॥ तेणें जाणविलें सत्वर ॥ कीं भेटीस येतो बाणासुर ॥ उठा आतां त्वरेंसीं ॥७७॥ दुरोनि देखतां नारायण ॥ रथाखालीं उतरला बाण ॥ धांवोनियां कृष्णचरण ॥ धरिता झाला सद्भावें ॥७८॥ बळीचा पुत्र तो भक्तराज ॥ कृष्णमुख न्याहाळी तेजःपुंज ॥ ध्यान हृदयीं रेखिलें बीज ॥ जें कां सर्व विश्वाचें ॥७९॥ शंख चक्र गदा पद्म ॥ हस्तीं धरिलीं आयुधें उत्तम ॥ आपाद वैजयंती मनोरम ॥ पीतांबर कटीं शोभे ॥८०॥ पूर्णेंदुवदन मंदस्मित ॥ कर्णीं कुंडलें लखलखित ॥ शिरीं रत्नमुकुट शोभत ॥ भाळीं तिलक केशराचा ॥८१॥ शुकनासिक आकर्णनयन ॥ कुंदपुष्पासमान रदनें[3] ॥ विद्रुमांसमान[4] अधरें[5] जाण ॥ अवाच्य शोभा तयांची ॥८२॥ ऐसा श्रीकृष्ण देखिला ॥ बाण सर्वांगीं निवाला ॥ मग तो चतुर्भुजें आलिंगला ॥ क्षणें केला सुखमय ॥८३॥ आलिंगन दिधलें पार्थासी ॥ तोही तोषला मानसीं ॥ प्रद्युम्न आणि अनिरुद्धासी ॥ तयावरी भेटला ॥८४॥ बभ्रुवाहन वृषकेत ॥ चंद्रहास चंद्रकेत ॥ अनुशाल्व वीर विख्यात ॥ सैन्यपाळ हंसध्वज ॥८५॥ यौवनाश्व मयूरकेत वीरवर्मा ॥ नीळध्वज प्रवीर सुवेग कृतवर्मा ॥ सात्यकि आदि यादवोत्तमां ॥ भेटतसे बाणासुर ॥८६॥ पैल ते मेघडंबरातळीं ॥ ह्मणे कोण बैसले महाबळी ॥ तंव तयांतें बोले वनमाळी ॥ हे पुत्र दुंदुभीचे ॥८७॥ मग दुंदुभीचें आख्यान ॥ आद्यंत सांगे जगज्जीवन ॥ ऐकतां तोषला बाण ॥ ह्मणे देवा तूं लाघवी ॥८८॥ बाण ह्मणे हे भगिनीचे सुत ॥ आमचे होती कीं विख्यात ॥ मग त्यांसी भेटवी अनंत ॥ क्षेमालिंगनें जाहलीं ॥८९॥ यथानुक्रमें झाली भेटी ॥ आनंदली सकळ सृष्टी ॥ झाली सर्वसुखाची वृष्टी ॥ कोणी कष्टी असेना ॥९०॥ मग प्रार्थना करी दैत्यराणा ॥ शीघ्र चलावें जी सदना ॥ प्रेमें करावें भोजना ॥ तव पंक्तिलाभ मज द्यावा ॥९१॥ ऐकतां बोले जगज्जीवन ॥ मज तो नसे अनुमान ॥ परी रुसेल तो त्रिनयन ॥ कैसा गेलासी मजवीण ह्मणोनि ॥९२॥ शंकर आलियानंतर ॥ मी येईन सत्वर ॥ तोंवरी पार्थसहित वीर ॥ सर्वही सदना पाठवितों ॥ ९३ ॥ बरें ह्मणोनि बाणासुर ॥ घेऊनि चालिला सकळही वीर ॥ होत वाद्यांचा गजर ॥ तेणें अंबर दणाणिलें ॥९४॥ सर्वांसी आज्ञा दिधली ॥ मागें राहिला वनमाळी ॥ आतां येईल चंद्रमौळी ॥ ह्मणोनि वाट पाहातसे ॥९५॥ मनीं धरोनि स्वानंदगोडी ॥ नारद धांवला तांतडी ॥ न भरतां अर्धघडी ॥ कैलासभुवना पातला ॥ ९६ ॥ तेथोनि येईल गौरीश ॥ त्यासी घेवोनि हृषीकेश ॥ दोघेही नगरप्रवेश ॥ करितील आतां स्वानंदें ॥ ९७ ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ देवभक्तांचें भोजन ॥ होईल ती कथा करा श्रवण ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ९८ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ बाणासुरआख्यान अगाध ॥ चतुरशीतितमाध्याय गोड हा ॥ ९९ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते बाणासुराख्यानं नाम चतुरशीतितमोध्यायः ॥ ८४ ॥ ॥ अध्याय ॥ ८४ ॥ ॥ ओव्या ॥ ९९ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

१ समूह. २ नारद. ३ दांत. ४ पोंवळ्यांसारखे. ५ ओंठ.

# अध्याय ८५.



बाणासुर.
महादेव.
श्रीकृष्ण
बाणासुर.
महादेव.
श्रीकृष्ण.
अर्जुनादि.
बाणासुरस्त्रिया.
पार्वती.
श्रीकृष्ण.
महादेव
अर्जुन.
बाणासुर.
बाणासुर.
महादेव.
श्री कृष्ण.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जनमेजय ह्मणे ऋषिभूषा ॥ सत्यवतीसुतप्रेमांबुमंजूषा ॥ मज सांगें पूर्वजकथापीयूषा ॥ कृपा करोनि स्वामिया ॥ १ ॥ विज्ञानसरोवरींचा हंस ॥ जो घेई स्वानुभवकमलसुवास ॥ जैमिनि ह्मणे जनमेजयास ॥ ऐक कथा सावधान ॥ २ ॥ नारद कैलासासी गेला ॥ अंतरीं परम आनंदला ॥ रम्य स्थळ देखता झाला ॥ साक्षात जेथें ईश्वर ॥ ३ ॥ करोनि मुक्ताफळांचें चूर्ण ॥ सुधारसें कालवून ॥ तेणें शंकरस्थळ लेपून ॥ ऐसें शुभ्र रम्य दिसे ॥ ४ ॥ ज्याचे कांतीपुढें कर्पूर ॥ दिसे केवळ नीळ अंगार ॥ एक त्यासी उपमा सुंदर ॥ रामचंद्राचें यश राया ॥ ५ ॥ जेथें कामधेनूंचे चरती थाट ॥ जेथें पीयूषरसाचे वाहती पाट ॥ जेथें कल्पवृक्षवनें अचाट ॥ परी त्यातें कोणी न पुसेचि ॥ ६ ॥ जेथें सागरातुल्य सरोवरें ॥ सज्जनचित्तापरी स्वच्छ नीरें ॥ कुमुदोत्पलें कल्हारें ॥ वरी उन्मत्त भ्रमर डोलती ॥ ७ ॥ नाना वृक्षांचिया जाती ॥ त्यांवरी कोकिळा कूंजती ॥ नाना लता त्या लवती ॥ पुष्पभारेंकरोनियां ॥ ८ ॥ जेथील देखोनि परिमळ ॥ लाळ घोंटी मलयानिळ ॥ नाना श्वापदांचें मंडळ ॥ सुखरूप विचरे पैं ॥ ९ ॥ जरी कैलासा वर्णूं सविस्तर ॥ तरी ग्रंथा होईल पसर ॥ आणि वाट पाहतसे चक्रधर ॥ ह्मणोनि संक्षेप हा केला ॥ १० ॥ ऐसा कैलासा जाऊन ॥ नारद पावला सभास्थान ॥ भावें वंदिला उमारमण[1] ॥ वंदिलें गौरीपादांबुज ॥ ११ ॥ मग तयासी पुसे शूलपाणि ॥ कोठोनि आलेत नारदमुनि ॥ कीं मृत्युलोकालागूनि ॥ थोर आकांत वर्तला ॥ १२ ॥ मग बाणासुराचा वृत्तांत ॥ शिवासी कथिला समस्त ॥ श्यामकर्णानिमित्त भगवंत ॥ सिद्ध झाला युद्धासी ॥ १३ ॥ मग म्यां नानापरी हरि वारिला ॥ परम मनीं संतोषविला ॥ त्याचा दुराग्रह मोडिला ॥ मग बोधिला बाणासुर ॥ १४ ॥ उभयतांचें केलें समाधान ॥ भेटविले परस्परें आणोन ॥ उभयतांचा सन्मान ॥ यथायोग्यत्वें जाहला ॥ १५ ॥ पार्थादिक गेले बाणाचे नगरीं ॥ परी बाहेर राहिला श्रीहरि ॥ त्याचा निर्धार तुजवरी ॥ जडला असे कीं गिरिजेशा ॥ १६ ॥ तुझा वरदपुत्र तो बाण ॥ भक्तशिरोमणिनिधान ॥ तरी आपण तेथें येऊन ॥ पावन करावें निजदासा ॥ १७ ॥ परी न लावावा उशीर ॥ तुजवीण न जेवी चक्रधर ॥ सहपरिवारीं करीं आदर ॥ या वचनाचा पार्वतीशा ॥ १८ ॥ मग संतोषोनि शंकर ॥ नंदी पॅलाणिला[4] सत्वर ॥ संगें गण घेतले समग्र ॥ तों गौरी प्रार्थी शंकरातें ॥ १९ ॥ देवाधिदेवा पंचानना[5] ॥ मजही न्यावें त्या स्थाना ॥ मनीं अत्यंत वासना ॥ सदना जावया बाणाचे ॥ २० ॥ बरवें ह्मणोनि पिनाकपाणि ॥ पुढें बैसविली भवानी[6] ॥ वीरभद्रादि वीरगणीं ॥ वेष्टित चाले तेधवां ॥ २१ ॥ मार्गीं करूनियां त्वरा ॥ शंकर आला शोणितपुरा ॥ अपार देखिलें दळभारा ॥ पांडवसैन्य पसरलें ॥ २२ ॥ झालें शिवाचें आगमन ॥ हें बाणासुरा होतां श्रवण ॥ तो धांवला सांवरोन ॥ चरणीं मिठी घातली ॥ २३ ॥ मग शंकरासी दैत्यनाथ ॥ सांगतां झाला सर्व वृत्तांत ॥ तुमची वाट पाहे अनंत ॥

१ अमृताचे. २ शब्द करितात. ३ शंकर. ४ बोलाविला. ५ शंकर. ६ पार्वती.

भोजनाकारणें स्वामिया ॥ २४ ॥ मग संतोषोनि उमारमण ॥ बाणासुरातें आलिंगोन ॥ बाणें भवानीतें वंदोन ॥ वीरभद्रादि नमियेले ॥ २५ ॥ जे जे आले शिवगण ॥ त्यांत्यांप्रति नमित बाण ॥ मग उभय हस्त जोडून ॥ शिवस्तवन करीत ॥ २६ ॥ बाण ह्मणे शशिशेखरा ॥ पुढें पाठवोनि पार्थादि वीरां ॥ तुमची वाट पाहत शिबि[१]रा- ॥ माजी बैसला श्रीकृष्ण ॥ २७ ॥ तो मार्गप्रतीक्षा करीत ॥ बैसलासे कीं अनंत ॥ धन्य भाग्य माझें वरिष्ठ ॥ हरिहर आले घरासी ॥ २८ ॥ मी तुझ्या वरदेंकरून ॥ जिंकीन हें त्रिभुवन ॥ मग इतरांचा पाड कवण ॥ तूं संरक्षिता मज असतां ॥ २९ ॥ तों विदित झालें गोपाळा ॥ कीं कैलासाहूनि सांब आला ॥ मग संगें घेऊनि निजदळा ॥ भेटीस निघाला श्रीकृष्ण ॥ ३० ॥ नेत्रीं देखतां उमारमण ॥ श्रीहरीनें केलें नमन ॥ शिवें दिधलें आलिंगन ॥ अति प्रीतीनें तेधवां ॥ ३१ ॥ दीपांची ऐक्य होतांचि कळा ॥ द्वैत न दिसेचि कदा डोळां ॥ तेवीं देतां आलिंगनाला ॥ दोघे झाले तयापरी ॥ ३२ ॥ दोहीं नेत्रांचें एक देखणें ॥ दोहीं कर्णांचें एक ऐकणें ॥ दोहीं चरणांचें एक चालणें ॥ तेवीं तेही ऐक्यरूप ॥ ३३ ॥ तरी भक्त तारावयालागून ॥ एकें दोन रूपें घेतलीं जाण ॥ जो असेल ज्ञानसंपन्न ॥ तयालागीं दिसेल तें ॥ ३४ ॥ अति सभाग्य तो बाणासुर ॥ जयाचे सोयरे हरिहर ॥ तयाच्या पुण्याचा पार ॥ कोण जाणे राजेंद्रा ॥ ३५ ॥ बाण [२]करांबुजें जोडूनि ॥ दोघां करीतसे विनवणी ॥ शीघ्र चलावें कृपा करूनि ॥ प्रसाद द्यावा आपुला ॥ ३६ ॥ मग ते दोघे हरिहर ॥ आणि त्यांचा दळभार ॥ घेवोनि चालिला बाणासुर ॥ न वर्णवे भाग्य त्या दैत्याचें ॥ ३७ ॥ करितां साधनांच्या कोटी ॥ ज्यांची स्वप्नींही न पडे गांठी ॥ ते भोजन करावयासाठीं ॥ दैत्यगृहासी चालिले ॥ ३८ ॥ जाती कुळ विद्या धन ॥ येथें सर्वथा नसे प्रमाण ॥ जो भक्तिभावें असेल पूर्ण ॥ तयाचे सोयरे हरिहर ॥ ३९ ॥ नंदीवरी बैसला शंकर ॥ रथारूढ तो रमावर[३] ॥ अश्वारूढ झाला बाणासुर ॥ चालतसे पुढें भृत्यां[४]परी ॥ ४० ॥ झाला सर्व वाद्यांचा गजर ॥ तेणें दणाणिलें अंबर[५] ॥ छत्र ध्वज पताका चामर ॥ न कळे गणना तयांची ॥ ४१ ॥ होती रथांचे घडघडाट ॥ अश्व मनोवेगें धांवती नीट ॥ कुंजर[६] करिती किलकिलाट ॥ गर्जती भाट अनेक ॥ ४२ ॥ ऐसा परम महोत्साहें सोहळा ॥ धन्य धन्य जे पाहती डोळां ॥ निर्जरपंक्ती[७] दाटल्या ॥ विमानारूढ पाहावया ॥ ४३ ॥ पृथ्वी जिंकिली तो युद्धाचा ॥ वृत्तांत सांचला होता साचा ॥ तो कृष्णें सांगितला स्ववाचा ॥ शंकरालागीं समूळ ॥ ४४ ॥ मग शंकर ह्मणे रमेशा ॥ धर्मकाजीं याचा खेद कायसा ॥ धर्म रक्षावया सर्वेशा ॥ अवतार घेसी युगोयुगीं ॥४५॥ हरिहर पाहावयालागीं ॥ विझवावया संसारआगी ॥ शीतळ व्हावया स्वअंगीं ॥ वेगीं हाटकांगी[८] धांविन्नल्या ॥ ४६ ॥ वेंघल्या झाल्या उपराउपरी ॥ गवाक्षद्वारें उघडिती सत्वरी ॥ दृष्टीं देखतां श्रीहरि ॥ मनीं तन्मय जाहल्या ॥ ४७ ॥ न सांवरिती गलित



१ तंबूमध्यें. २ हस्तकमलें. ३ कृष्ण. ४ सेवकाप्रमाणें. ५ आकाश. ६ हत्ती. ७ देवांचे समूह. ८ सोन्याप्रमाणें गौर आहे कांति ज्यांची अशा स्त्रिया.

वसनें ॥ दुजे नेत्रीं न घालिती अंजनें ॥ बाळां न देतां स्तनपानें ॥ धांवताती कुलांगना ॥ ४८ ॥ भूषणें लेवोनि अस्ताव्यस्त ॥ टाकोनि संसारकार्य समस्त ॥ हरिहरदर्शनामृतें समस्त ॥ सेवोनि विसरल्या देहासी ॥ ४९ ॥ दर्शनें करावा नगरोद्धार ॥ ह्मणोनि चालती स्थिर स्थिर ॥ ऐसे दयाळू हरिहर ॥ बाणसदना पावले ॥ ५० ॥ देशोदेशींच्या सर्व रायांचीं दळें ॥ यादवपांडवांचींही सकळें ॥ त्यांमाजी शिवाचें मिळालें ॥ बाणासुराचेंही दाटलें तेथें ॥ ५१ ॥ ऐसे दळेंसीं हरिहर ॥ ते वर्णूं जरी सविस्तर ॥ तरी ग्रंथा होईल पसर ॥ आणि ते क्षुधातुर सर्वही ॥ ५२ ॥ राक्षस वानर दैत्यकुळें ॥ मानव भूतगण मिळाले ॥ बाणासुराचें भाग्य आगळें ॥ ह्मणोनि हा समारंभ त्याचे घरीं ॥ ५३ ॥ असो क्षुधापीडित सकळ जन ॥ इच्छिताती दिव्यान्न ॥ परम सन्मान करी बाण ॥ सकळांलागीं संतोषवी ॥ ५४ ॥ सभा समीप देखोन ॥ आपलीं वाहनें सोडून ॥ चालती हरिहर हात धरून ॥ बाणासुर पुढें मार्ग दावी ॥ ५५ ॥ नगर शृंगारिलें सकळ ॥ अखंड वाद्यध्वनि मंगळ ॥ घरोघरीं उत्साह ते वेळ ॥ करिती राजआज्ञेनें ॥ ५६ ॥ ध्वज पताका लाविती ॥ वस्त्रें भूषणेंयुक्त गज[1] मिरवती ॥ तया आनंदाची गति ॥ वर्णूं न शके विधाता[3] ॥ ५७ ॥ असो सभा देखोनि मानवले ॥ हरिहर सभांतरीं गेले ॥ मग बाणासुरें बैसविले ॥ दिव्यासनें घालोनि ॥ ५८ ॥ तों पार्थादि नृप समस्त ॥ नगरामाजी चालती मिरवत ॥ तों ऐकिला वृत्तांत ॥ कीं हरिहर सभेस पावले ॥ ५९ ॥ मग तयांसी झाली त्वरा ॥ शीघ्र आले ते सभांतरा ॥ दृष्टीं देखतां हरिहरां ॥ लोटांगणें घालिती ॥ ६० ॥ तों शिवें पार्थ धरिला पोटीं ॥ ह्मणे श्रमलासी बारे किरीटी ॥ येरू ह्मणे झाली चरणभेटी ॥ आतां कष्टासी ठाव न राहे ॥ ६१ ॥ मग चंद्रहासादि नृपती ॥ हरिहरांतें लोटांगणें घालिती ॥ मग उठोनि रमापति उमापति[4] ॥ सर्वांस देती आलिंगन ॥ ६२ ॥ रायांसी बोले उमाकांत ॥ धन्य धन्य तुमचें जीवित ॥ धर्मकार्जी ठेवोनि अर्थ ॥ त्यजिला स्वार्थ प्रपंचाचा ॥ ६३ ॥ तुह्मी युद्धविद्येचे सागर ॥ विमल पुण्याचे गिरिवर ॥ तुह्मांलागीं शार्ङ्गधर[5] ॥ रक्षित नाना संकटीं ॥ ६४ ॥ धन्य तुमचें महिमान ॥ सर्व घेऊन फिरतां भगवान ॥ मजलागोनियां जाण ॥ संगें हरि हा नेईना ॥ ६५ ॥ ऐसें बोलतां भवानीपति ॥ कर जोडोनि राजे विनविती ॥ उद्धार झाला आह्मां निगुती ॥ भक्तप्रिया तुज देखतां ॥ ६६ ॥ तों बाणसुराच्या स्त्रिया सकळ ॥ तिहीं पार्वतीस केला नमस्कार ॥ रम्य स्थानीं आदरें सुंदर ॥ सिंहासन मांडिलें ॥ ६७ ॥ तेथें भवानीसी[6] बैसवून ॥ हस्त जोडोनि करिती स्तवन ॥ सेवेतें सादर असोन ॥ पूजासंभार अर्पिती ॥ ६८ ॥ इकडे उभा ठाकोनि बाणासुर ॥ सर्वांसी विनवी जोडोनि कर ॥ अभ्यंग[7] करावें जी सत्वर ॥ होतो उशीर नैवेद्या ॥ ६९ ॥ ऐसें ऐकतां वैकुंठपीठ ॥ मस्तकींचा काढिला मुगुट ॥ तें देखोनि नीळकंठ ॥ तोही उठिला स्नानासी ॥ ७० ॥ रत्नजडित चौरंगासन ॥ तेथें बैसविले दोघे-

१ काजळ. २ हत्ती. ३ ब्रह्मदेव. ४ शिव. ५ श्रीकृष्ण. ६ पार्वतीला. ७ स्नान.

जण ॥ अर्जुनादि नृपगण ॥ तैसेचि बैसती अनुक्रमें ॥ ७१ ॥ तेथें आणिलें सुगंध तैल ॥ जयाचा येतां परिमळ ॥ लाळ घोंटी मलयानिल[1] ॥ वासहीन मी यापुढें ॥ ७२ ॥ ऐशियापरी तैलाभ्यंग ॥ सकळांचें झालें सांग ॥ पीतांबर नेसले सवेग ॥ केशरी टिळक लाविले ॥ ७३ ॥ रत्नजडित आसन ॥ त्यावरी बैसले नृपगण ॥ करूनियां चंदनलेपन ॥ पुष्पमाळा घातल्या ॥ ७४ ॥ मग रत्नखचित मांडिलीं ताटें ॥ तळीं चंद्रकांताचीं पीठें ॥ त्या स्थळीं चतुर नरश्रेष्ठें ॥ रंगमाळा घातल्या ॥ ७५ ॥ मग आणिलें दिव्यान्न ॥ ज्याचे सुवासें भरलें गगन ॥ संतुष्ट देखतां सकळांचें मन ॥ तेणें नयन निवाले ॥ ७६ ॥ बाणासुराच्या दिव्य ललना[2] ॥ वाढिताती अन्नें नाना ॥ जयांच्या अंगुष्ठाची तुलना ॥ देवांगना न पावती ॥ ७७ ॥ होती नेपुरांचे झणत्कार ॥ अंगीं शोभती अळंकार ॥ लज्जा पावला प्रभाकर ॥ कनकवस्त्रें देखोनि ॥ ७८ ॥ लज्जित झाला रतिपति[3] ॥ ऐसी ज्यांची स्वरूपस्थिति ॥ मग तो व्याही झाला निगुती ॥ बाणासुराचा त्याकरितां ॥ ७९ ॥ ज्यांचा देखतां लावण्यरंग ॥ होय धैर्यसेतूचा भंग ॥ परी नृप ते ब्रह्मचर्यें अभंग ॥ ज्यांचा काम अंकित[4] ॥ ८० ॥ ऐसियापरी त्या ललना ॥ वाढिताती दिव्यांगना ॥ नेणों त्यांचे पुण्याची गणना ॥ ज्या हरिहरांतें वाढिती ॥ ८१ ॥ त्याचिपरी भवानीतें ॥ ताट मांडिलें विचित्र तेथें ॥ सहस्र स्त्रिया गौरवातें ॥ तिष्ठती हात जोडोनि ॥ ८२ ॥ जे मुनिजनध्यानीं नातुडती[5] ॥ जे वेदवचनें न सांपडती ॥ ते ज्याचे घरीं परमान्नें सेविती ॥ त्याची पुण्यगति काय वर्णूं ॥ ८३ ॥ मग बाणासुर कर जोडून ॥ सकळांसी प्रार्थी तये क्षण ॥ मज केलें जी पावन ॥ सावकाश भोजन करावें ॥ ८४ ॥ मग भवानीसी बाणासुर ॥ प्रार्थित जोडोनि दोनी कर ॥ पार्थादिक नृपवर ॥ स्तवित तयांतें आवडीं ॥ ८५ ॥ तों चंद्रहास बाणातें बोलत ॥ जे स्वानंदरसें नित्य तृप्त ॥ ते स्वयें परमान्नें मागत ॥ त्यांतें प्रार्थना कां करितां ॥ ८६ ॥ ज्यांचें शेष[6] ब्रह्मा वांछित ॥ परी त्यातें प्राप्त न होय एक शित ॥ त्यांचें पंक्तीसी भोजन झालें प्राप्त ॥ धन्य जन्म आमुचें ॥ ८७ ॥ ऐशापरी झालें भोजन ॥ मग शोभविलें सभास्थान ॥ परिमळद्रव्यें सीं जाण ॥ तांबूल विडे दिधले ॥ ८८ ॥ मग सकळ सभास्थानीं बैसती ॥ तों कलापात्रें आणवी नृपति ॥ त्यांचिया गुणें रंजविला श्रीपति ॥ उमापतिसमवेत ॥ ८९ ॥ मग प्रधानासी आज्ञापी असुर ॥ वस्त्रें आणविलीं अमूल्य सुंदर ॥ आणिले अळंकारांचे भार ॥ ते ठेविले हरिहरांपासीं ॥ ९० ॥ मग नारद बोले बाणासी ॥ आधीं गौरवीं शंभुभवानींसी ॥ मग गौरवावें सकळांसी ॥ ऐसा धर्म विहित[7] ॥ ९१ ॥ शंकर ह्मणे नारायणा ॥ आधीं स्वीकारीं तूं वस्त्र-भूषणां ॥ येरू बोले त्रिनयना ॥ ऐसें कैसें घडेल ॥ ९२ ॥ आग्रह केला सदाशिवें ॥ मग पर्याय काढिला यादवें ॥ आधीं प्रद्युम्न अनिरुद्धां द्यावें ॥ मग गौरवावें सकळ रायां ॥ ९३ ॥ त्याहीमागें पार्थासी ॥ त्यानंतर कैलासवासी ॥ अवशिष्ट राहील जें आह्मांसी ॥

१ मलयपर्वतावरील वारा. २ बायका. ३ मदन. ४ स्वाधीन. ५ न येती. ६ उच्छिष्ट. ७ योग्य.

तें समर्पावें भक्तराया ॥ ९४ ॥ तें सकळां वाटलें बरवें ॥ तैसेंचि केलें दैत्यपुंगवें ॥ सर्व संतोषविले गौरवें ॥ मनोभावेंकरूनियां ॥ ९५ ॥ गजाश्व रथ दास दासी ॥ वस्त्रें रत्नें धनराशी ॥ बाणें समर्पिल्या शंभूसी ॥ भवानीसहित गणांतें ॥ ९६ ॥ त्याचपरी वैकुंठवासी ॥ तयासमान पार्थासी ॥ मग गौरविलें सकळांसी ॥ आनंद चित्तीं सर्वांच्या ॥ ९७ ॥ अमूल्य वस्त्राभरणें ॥ बाणालागीं दिधलीं नारायणें ॥ देखोनियां समाधानें ॥ इंद्र पावला अंतरीं ॥ ९८ ॥ बाण ह्मणे उखा आली पोटासी ॥ सोइरा झाला तेणें हृषीकेशी ॥ हेंचि प्रार्थी सदाशिवासी ॥ जन्मोजन्मीं मज द्यावें ॥ ९९ ॥ मग हरिहरें वरदान ॥ दिधलें बाणासुरालागून ॥ तेव्हां मग ते अश्व आणोन ॥ पार्थाकरीं दिधले ॥ १०० ॥ लवणासुर दवणासुर ॥ तयांसी आज्ञापी बाणासुर ॥ तुझी दाहा अक्षौहिणी घेऊनि दळभार ॥ पार्थासवें जाइंजे ॥ १ ॥ बाणनंदनांतें घेऊन ॥ वेगें निघाले कृष्णार्जुन ॥ भवानीसहित त्रिनयन ॥ जाता झाला कैलासा ॥ २ ॥ तयांलागीं बोळवून ॥ बाणासुर आला परतोन ॥ आनंदें चालिले नृपगण ॥ बाणाचें स्तवन करिताती ॥ ३ ॥ ऐसें बाणासुराचें आख्यान ॥ जे सद्भावें करितील श्रवण पठण ॥ त्यांच्या पापांचें होईल क्षालन ॥ अंतीं पावती शिवपदा ॥ ४ ॥ ही शक्तिपुराणींची कथा ॥ तुज म्यां सांगितली गा भारता ॥ ज्याचिया श्रवणें दुरिता ॥ ठाव नुरेच कदापी ॥ ५ ॥ पुढें फिरतां भूमंडळ ॥ किष्किंधेसी अश्व जातील ॥ त्यांतें वानर धरितील ॥ युद्ध तुंबळ होईल पैं ॥ ६ ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ रसाळ आहे अमृतासमान ॥ तें ऐकावें सावधान ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ७ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ येथें संपलें बाणासुराख्यान अगाध ॥ पंचाशीतितमाध्याय गोड हा ॥ १०८ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते बाणासुराख्यानं नाम पंचाशीतितमोऽध्यायः ॥ ८५ ॥ अध्याय ॥ ८५ ॥ ओव्या ॥ १०८ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

# अध्याय ८६.



श्रीगणेशाय नमः ॥  ॥ जैमिनि ह्मणे गुणनिधि ॥ पुढें कैसा चालिला कथाउदधि ॥ मन करोनि एकाग्रविधि ॥ सादर आतां ऐकावें ॥ १ ॥ मग ते दोघे श्यामकर्ण ॥ वनोपवनें लंघून ॥ दक्षिणेस करिते झाले गमन ॥ वायुवेगेंकरूनियां ॥ २ ॥ मार्गें चालिला दळभार ॥ तों अकस्मात देखिलें नगर ॥ त्याचा असे रम्य विस्तार ॥ विंशति योजनें आगळा ॥ ३ ॥ देखतांचि नगर थोर ॥ चंद्रहासासी बोले पार्थवीर ॥ कोणाचें हें असे नगर ॥ येथें राजा कोणता ॥ ४ ॥ पार्थासी बोले चंद्रहास ॥ येथें राजा वानरेश ॥ जे जिंकिती कळिकाळास ॥ ऐसे वानर ये स्थळीं ॥ ५ ॥ पूर्वी वानरेश सुग्रीव ॥ ज्याचा स्वामी श्रीराघव ॥ सागर लंघोनि दशग्रीव ॥ राघवें दळेंसीं निवटिला ॥ ६ ॥ अष्टादश पद्में वानर ॥ जयाचा असे परिवार ॥ जेणें वाळीऐसा सहोदर ॥ राघवहस्तें मारविला ॥ ७ ॥ शत योजनें बांधिला शिळीं सागर ॥ सीताशुद्धि केली सत्वर ॥ जेणें दशग्रीवाचा पुत्र ॥ अक्ष नामें आपटिला ॥ ८ ॥ जो सकळ चातुर्यरत्नाकर ॥ जो साक्षात रुद्रावतार ॥ अक्षय बळाचा सागर ॥ जेणें कंदर्प जिंकिला ॥ ९ ॥ ज्याचें नाम हनुमान ॥ तो तयाचा असे जी प्रधान ॥ सांप्रत रथध्वजाग्रीं बैसोन ॥ रक्षितसे जो तुह्मांतें ॥ १० ॥ सुग्रीवपुत्र द्विरद नामा ॥ जो वानरकुळामाजी चंद्रमा ॥ ज्याचे पराक्रमाची सीमा ॥ न वर्णवेचि आह्मांतें ॥ ११ ॥ बारा सहस्र कुंजेरांचें बळ ॥ ज्याचे अंगीं असे अढळ ॥ तैसेचि वानर प्रबळ ॥ आहेत सर्वदा ज्यापासीं ॥ १२ ॥ अष्टादश योजनें प्रमाण ॥ लंकादुर्ग परम कठिण ॥ तेथें जावोनि विदारण ॥ राक्षसांचें पैं केलें ॥ १३ ॥ त्याचा पुत्र हा द्विरद ॥ तो श्यामकर्ण धरितां प्रसिद्ध ॥ मग तेथें होईल घोर युद्ध ॥ प्राण जातील सकळांचे ॥ १४ ॥ तों अश्व गेले नगरांत ॥ जेथें राजस्थान विख्यात ॥ ते वानरीं धरिले त्वरित ॥ रायालागीं दाविती ॥ १५ ॥ श्यामकर्णातें पाहोन ॥ संतोषला सुग्रीवनंदन ॥ ह्मणे ब्रह्मदेवें चातुर्यवन ॥ याचियावरी ठेविलें ॥ १६ ॥ दूतांप्रति बोले कपीश्वर ॥ हे अश्व कवणाचे सुंदर ॥ तों भाळीं देखिलें दिव्य पत्र ॥ वाचिती वानर तयातें ॥ १७ ॥ गोत्रवध झाला ह्मणोन ॥ धर्मरायें सोडिले श्यामकर्ण ॥ सवें अर्जुन संरक्षण ॥ सकळ रायांसमवेत ॥ १८ ॥ मग दूतां आज्ञापी कपीश्वर ॥ नेवोनि बांधा रे हयवर ॥ यांनिमित्त कृष्णपांडववीर ॥ त्यांचें दर्शन होईल आह्मांतें ॥ १९ ॥ सकळ वानरांचें दळ ॥ सिद्ध करवीत कपिपाळ ॥ तों इकडे पार्थदळ ॥ पाहूं धांवलें अश्वांतें ॥ २० ॥ नगरद्वारीं येतां जाण ॥ त्या देखतां धांवले कपिगण ॥ पर्वतासमान दारुण ॥ महाबळिष्ठ वीर ते ॥ २१ ॥ रथ अश्व कुंजर नसती जाण ॥ नाहीं शस्त्रांचें प्रयोजन ॥ शरीरबळेंकरून ॥ भांडताती चपळत्वें ॥ २२ ॥ शैलें वृक्ष पाषाण ॥ नख मुख पुच्छ जाण ॥ हेंचि त्यांचें युद्धसाधन ॥ अन्य कासया तयांतें ॥ २३ ॥ लोटला प्रबळ कपिभार ॥ भांडती नर आणि वानर ॥ तें जाणोनि वानरेश्वर ॥ मुख्य सैन्येंसीं धांविन्नला ॥ २४ ॥ अष्टादशपद्में वानर वीर ॥

१ कथासमुद्र. २ वीस. ३ रावण. ४ काम. ५ हत्तींचें. ६ वानर. ७ पर्वत.

ज्याहीं सेविला श्रीरघुवीर ॥ ते धांवले महावीर ॥ संग्राम दारुण मांडिला ॥ २५ ॥ दोनी दळें मिळालीं ॥ युद्धाची हातोफळी मांडली ॥ पार्थसेना संहारिली ॥ कपिवीरीं तेधवां ॥ २६ ॥ शैल वृक्ष पाषाण ॥ टाकोनि रथाश्व करिती चूर्ण ॥ पुच्छें वीर बांधोन ॥ लक्षावधी आपटिती ॥ २७ ॥ एकाचे नेत्र फोडिले ॥ एकाचे दांत पाडिले ॥ एका पुच्छें बांधोनि उडविलें ॥ गगनामाजी तेधवां ॥ २८ ॥ एकाचीं वस्त्रें फेडिती ॥ ते नग्नचि तेव्हां पळती ॥ एकाचे कान तोडिती ॥ नखें मुखेंकरूनियां ॥ २९ ॥ एक धांवोनि पाडिती ॥ तयाचे मुखामाजी मुतती ॥ एक विष्ठा टाकिती ॥ वीरअंगासी विनोदें ॥ ३० ॥ एका पायीं धरोनि आपटिती ॥ धरूं जातां न सांपडती ॥ एका आकाशा धरून नेती ॥ तेथोनि आदळिती पृथ्वीवरी ॥ ३१ ॥ पुच्छीं बांधोनि गजरथ ॥ आकाशपोकळीं उडवित ॥ तळीं पडतां मुष्टिघात ॥ मारूनि घांसिती भूमीसी ॥ ३२ ॥ रामनामें भुभुःकार ॥ देवोनि भांडती वानर ॥ पांडवदळाचा संहार ॥ ऐशापरी मांडिला ॥ ३३ ॥ कोणी दांत विचकिती ॥ महावीरांतें भेडसाविती ॥ नखेंकरून पोट फोडिती ॥ एक मोडिती मध्येंचि ॥ ३४ ॥ वीर शस्त्रें घेऊन मारिती ॥ तरी ते बळेंकरून दुणावती ॥ मारिल्या सर्वथा न मरती ॥ हांका मारिती रामनामें ॥ ३५ ॥ एक अश्वस्कंधीं[1] बैसती ॥ त्यांतें शस्त्रेंकरून बुझविती ॥ ते रथ टाकोनियां पळती ॥ मग रथ मोडिती पुच्छघातें ॥ ३६ ॥ गजालागीं धरोनि पुच्छासी ॥ भोवंडोन उडविती आकाशीं ॥ अश्वातें धरोनियां पुच्छासी ॥ मारिती ते विनोदें ॥ ३७ ॥ वीर करिती शरसंधान ॥ ते चुकविती उडोन ॥ तेथोनि शिळा वृक्ष पाषाण ॥ टाकोनि मोडिती शस्त्रांतें ॥ ३८ ॥ कांहींसा श्रम झाला जाणोन ॥ मुखें करिती नामस्मरण ॥ तात्काळ होय श्रमहरण ॥ ऐसें महिमान नामाचें ॥ ३९ ॥ रामनामाचेनि बळें ॥ नाटोपती वानरकुळें ॥ त्यांहीं मर्दिलीं[2] पार्थाचीं दळें ॥ वृक्ष पाषाण वर्षोनियां ॥ ४० ॥ वानरदळ अमर्याद ॥ दाटलें सेवोनि वीरमद ॥ पार्थादि वीरांचा गर्व मंद ॥ करोनि सोडिला तेधवां ॥ ४१ ॥ एका रथावरी शतशत ॥ वानर पडती अकस्मात ॥ नखाग्रेंकरोनि रथ ॥ चूर्ण करिती क्षणमात्रें ॥ ४२ ॥ एक गजदेहावरी ॥ बैसती वानरांच्या हारी[3] ॥ कुंभस्थळ[4] विदारोनि भूमीवरी ॥ मुक्ताफळें टाकिती ॥ ४३ ॥ एकाएका अश्वावरी ॥ वानर बैसती पांच चारी ॥ ओढोनि नेती बाहेरी ॥ भक्षावया तयांतें ॥ ४४ ॥ एक एक वीरांच्या पाठी ॥ लागती वानरांच्या थाटी ॥ बैसोनि उत्तम किरीटीं[5] ॥ हांसोनि करिती मळमूत्र ॥ ४५ ॥ एकाचे पाडिती सर्व दशन[6] ॥ एकाचे छेदिती नासिका कर्ण ॥ एकाचें छेदिती वृषण ॥ मुखीं घालिती तयाचे ॥४६॥ जैसी पडतां टोळधाडी ॥ वनामाजी न दिसे काडी ॥ तैसी पडली वानरांची उडी ॥ काय बापुडीं करतील ॥ ४७ ॥ ऐसे मातले मर्कट ॥ पाडिती वीरांचे मुकुट ॥ त्यांचें करूनियां पीठ ॥ टाकिती त्यांचे मुखावरी ॥ ४८ ॥ ऐशा अगणित मर्कटचेष्टा ॥ काय सांगों तुज श्रेष्ठा ॥ अनाचारी कर्मभ्रष्टा ॥ आवडती अनाचार ॥ ४९ ॥



१ घोड्यांच्या खांद्यावर. २ मारिलीं. ३ पंक्ती. ४ गंडस्थळें. ५ मुकुटावर. ६ दांत.

पार्थादिक वीर भले भले ॥ उगेचि राहिले चाकटले ॥ कांहीं उपाय न चाले ॥ हरोनि नेलीं शस्त्रास्त्रें ॥ ५० ॥ कोण स्वामी कोण सेवक ॥ हा तों न कळेचि विवेक ॥ द्वंद्वयुद्धाचा परिपाक ॥ नसे ठाउक तयांतें ॥ ५१ ॥ लक्षानुलक्ष येती वानर दारुण ॥ अत्यंत त्यांचें चपळपण ॥ दुरोनि पुच्छ सोडोन ॥ अकस्मात आकर्षिती ॥ ५२ ॥ ऐसे मातले वानरवीर ॥ केला पार्थदळाचा संहार ॥ कार्याकार्याचा विचार ॥ कांहीं न सुचे कोणासी ॥ ५३ ॥ चंद्रहासासी ह्मणे पार्थ ॥ तुह्मीं सांगितलें तें यथार्थ ॥ काय करावें जी येथ ॥ युद्ध कोणासीं करावें ॥ ५४ ॥ आह्मांवरी रुसला नारायण ॥ ह्मणोनि येथें झालें आगमन ॥ वानरीं केला परम अपमान ॥ ऐसा कोणीं केला नसे ॥ ५५ ॥ जो जो करावा यांसी उपाय ॥ तो तो आह्मांसीच होतो अपाय ॥ आतां यासी करावें काय ॥ तो विचार मज सांगा ॥ ५६ ॥ मग चंद्रहास बोले उत्तर ॥ हे तों अनिवार असती वानर ॥ सर्वांचा करितील संहार ॥ यांसीं युद्ध न करावें ॥ ५७ ॥ ज्यांहीं दशानन[1] केला तृण ॥ तुच्छ मानिला कुंभकर्ण ॥ त्यांसीं मनुष्यांचा पाड कोण ॥ तुच्छपणें मानिती ॥ ५८ ॥ जरी जवळी असता वायुतनय[2] ॥ तरी तो करिता यांसी उपाय ॥ तो त्यांसी नीति-न्याय ॥ बरव्या प्रकारें बोधिता ॥ ५९ ॥ तो समीप नाहीं प्रस्तुत ॥ ह्मणोनि मांडला हा आकांत ॥ ऐसें ऐकतां परीक्षितिसुत ॥ पुसता झाला मुनीतें ॥ ६० ॥ सोडोनियां सुभद्रारमण ॥ कोठें गेला होता हनुमान ॥ पार्थध्वजाग्रींचें स्थान ॥ त्याणें किंनिमित्त सोडिलें ॥ ६१ ॥ जवळी असतां वनमाळी ॥ यांची उपेक्षा कां केली ॥ हें मज सांगावें ये वेळीं ॥ कृपा करोनि स्वामिया ॥ ६२ ॥ मग जैमिनि बोले वचन ॥ तुवां बरवा केला प्रश्न ॥ दळीं नव्हते दोघेही जण ॥ असतां ऐसें न होतें ॥ ६३ ॥ किष्किंधेपासोनि दश योजन ॥ एक रमणीय होतें उद्यान[3] ॥ पूर्वीं तेथें सीतारमण ॥ आश्रम करोनि राहिला ॥ ६४ ॥ तेथें सुग्रीवाचिये प्रीतीं ॥ रामें स्थापिली आत्ममूर्ति ॥ तिची विस्तारली कीर्ति ॥ भुवनत्रयीं राजया ॥ ६५ ॥ तयेचें घ्यावया दर्शन ॥ उत्कंठित हनुमान ॥ घेऊनि पार्थाचें आज्ञावचन ॥ कपिवीर निघाला ॥ ६६ ॥ तों त्यासी ह्मणे श्रीकृष्ण ॥ मीही घेतों रामदर्शन ॥ बरवें ह्मणोनि दोघेजण ॥ रामदर्शना चालिले ॥ ६७ ॥ देखतां श्रीरामचरण ॥ दोघीं घातलें लोटांगण ॥ अंतरीं पावले समाधान ॥ सादर मूर्ति न्याहाळितां[4] ॥ ६८ ॥ श्रीराममूर्तीतें निरखितां ॥ त्यांसी लागली समाधिअवस्था ॥ पार्थदळाची कथा वार्ता ॥ नाठवेचि तयांतें ॥ ६९ ॥ त्यानंतर येथें झालें समरांगण ॥ तेणें वीर झाले क्षीण ॥ मग कृष्णाचें चिंतन ॥ करीत पार्थ तेधवां ॥ ७० ॥ ह्मणे धांव धांव जगज्जीवना ॥ वेगें पाव वातनंदना ॥ ऐसे भक्तशब्द अंतःकरणा ॥ वेगें खडतरले[5] दोघांचे ॥ ७१ ॥ मग दोघेही गजबजिले ॥ रामचंद्रातें विनविलें ॥ तुमच्या दासें गांजिलें ॥ पार्थालागीं आमुच्या ॥ ७२ ॥ ह्मणती भक्त पावला दुःख ॥

---

१ रावण.  २ मारुति.  ३ बाग.  ४ पहातां.  ५ आदळले.

काय करावें समाधिसुख ॥ भक्तसाह्याचा हरिखं ॥ आणिक तैसा मज नाहीं ॥ ७३ ॥ म्यां भक्तकार्यालागून ॥ हा देह धरिला सगुण ॥ ऐसें असोन न करीं रक्षण ॥ तरी व्यर्थ मी भूभार ॥ ७४ ॥ भक्तकार्यापुढें पाहीं ॥ माझें जीवित व्यर्थ मानितोंही ॥ ऐसें बोलोन रामपायीं ॥ मस्तक ठेवोनि चालिले ॥ ७५ ॥ मनोवेगें धांवत येती ॥ संग्रामभूमीतें निरखिती ॥ अवघे मृतप्राय देखती ॥ कृष्ण स्मरती ते सावध ॥ ७६ ॥ पाहात पाहात वनमाळी ॥ वेगें आला पार्थाजवळी ॥ तों बुडाला चिंताकल्लोळीं ॥ देवें दर्शन देवोनि काढिला तो ॥ ७७ ॥ पार्थ ह्मणे कृष्णनाथा ॥ तव वियोगें झाली ही व्यथा ॥ आतां न वाटे मज चिंता ॥ कळिकाळ आलिया ॥ ७८ ॥ मुनि ह्मणे परीक्षितिसुता ॥ तव प्रश्न पुरविला कीं आतां ॥ हरिहरवियोगें व्यथा ॥ पावला कीं फाल्गुन ॥ ७९ ॥ जे हरिहरांतें विसरती ॥ तयांलागीं हीच गति ॥ जे त्यांतें न विसरती ॥ ते पावती सुखातें ॥ ८० ॥ पार्थ ह्मणे हनुमंता ॥ वानरीं केलें माझिया घाता ॥ आतां तूं आलासी चिंतितां ॥ जाणसी तैसें करावें ॥ ८१ ॥ हनुमंत ह्मणे पार्थासी ॥ संबंध न पडावा यांसीं ॥ हे वीर कळिकाळासी ॥ नावरती निश्चयें ॥ ८२ ॥ ज्यावरी क्रोध देवाचा ॥ त्यासीच संबंध पडे यांचा ॥ मज ठाउका वानरांचा ॥ स्वभाव कीं सर्वही ॥ ८३ ॥ मग कृष्ण ह्मणे मारुतीसी ॥ तूं सत्वर जाईं द्विरदापासीं ॥ बरवें बोधून तयासी ॥ वानरसैन्यासी आवरवीं ॥ ८४ ॥ जरी तो नायके तुझी नीति ॥ तरी मी कोपेन श्रीपति ॥ सकळ वानरसंपत्ति ॥ लया पाववीन क्षणार्धें ॥ ८५ ॥ तुह्मी साह्य झालां होतां श्रीरामा ॥ ह्मणोनि केला अपराध क्षमा ॥ जोंवरी क्रोध न आला पुरुषोत्तमा ॥ तोंवरी समानत्व करावें ॥ ८६ ॥ बरवें ह्मणोनि वातनंदन ॥ शीघ्र उडाला तेथून ॥ जेथें सुग्रीवनंदन ॥ तये स्थानीं उतरला ॥ ८७ ॥ नेत्रीं देखतां हनुमान ॥ सर्वही घालिती लोटांगण ॥ ह्मणती साह्या आला आह्मांकारण ॥ समाधान ते पावले ॥ ८८ ॥ वंदोनि मारुतीचे चरण ॥ दिधलें सप्रेम क्षेमालिंगन ॥ दिधलें तया तृणासन ॥ परम विनयें तेधवां ॥ ८९ ॥ मग बोले सुग्रीवनंदन ॥ तूं तों आमुचें पितृस्थान ॥ तुझे योगें सीतारमण ॥ जोडला कीं आह्मांतें ॥ ९० ॥ हनुमंत आला देखोन ॥ भोंवते मिळाले कपिगण ॥ जेवीं चुंबक लोहाकारण ॥ ओढीतसे स्वप्रभावें ॥ ९१ ॥ मस्तकीं पुच्छ गुंडाळे ॥ सभोंवते वानर मिळाले ॥ वानरीं कर्ण पसरिले ॥ हनुमानवाक्य ऐकावया ॥ ९२ ॥ द्विरदें पुसोनि क्षेमकल्याण ॥ ह्मणे साह्य आलेत मजलागून ॥ येरू करूनि हास्यवदन ॥ तयाप्रति अनुवादे ॥ ९३ ॥ आपुलिया जो कुळीं वाढे ॥ तोचि कुळघाता चढे ॥ जेवीं कुऱ्हाडींत लांकुडें ॥ निघतां छेदी निजकुळा ॥ ९४ ॥ नातरी वंशतरूचें वन ॥ परस्परें घडतां घर्षण ॥ तेथोनि पडे हुताशन ॥ स्ववंशातें दग्ध करी ॥ ९५ ॥ तेवीं तुह्मी माझे आप्त ॥ माझ्या सुग्रीवाचे गणगोत ॥ तुह्मी सुखरूप नांदावें येथ ॥ हेंचि सुख मजलागीं ॥ ९६ ॥

१ आनंद. २ जैमिनि. ३ श्रीकृष्ण व मारुति यांच्या वियोगानें. ४ अर्जुन. ५ या नांवाचा वानर ( सुग्रीव पुत्र). ६ मारुति. ७ वेळूचें. ८ अग्नि.

तरी तुह्मीं केलें विपरीत ॥ माझाचि मांडिला रे घात ॥ माझे स्वामीसीं असता झुंजत ॥ त्याणें सौजन्य राखिलें ॥ ९७ ॥ सुग्रीवात्मज ह्मणे हनुमंता ॥ तो स्वामी कोठें जी ताता ॥ कैसी झाली सख्यता ॥ मज काय हें ठाउक ॥ ९८ ॥ येरू ह्मणे जो स्वामी दाशरथि ॥ तो त्याचा झाला सारथि ॥ धरोनियां कृष्णमूर्ति ॥ सारथ्य करी पार्थाचें ॥ ९९ ॥ त्याचे क्रोधाग्नीच्या ज्वाळा ॥ क्षणें जाळितील ब्रह्मांडगोळा ॥ तेथें पतंगप्राय तुह्मांला ॥ अर्ध क्षण न लागे ॥ १०० ॥ ज्यां स्वामी केला राघव ॥ राज्यीं बैसविला सुग्रीव ॥ तोचि जाणा कृष्णदेव ॥ त्यासीं तुह्मी भांडतां ॥ १ ॥ तुवां पुसिलें सुग्रीवसुता ॥ पार्थ स्वामी कैसा ताता ॥ ती लाब असे कथा ॥ वर्तमान वार्ता ऐकावी ॥ २ ॥ अर्जुनें जिंकोनि माझा पण ॥ मज दिधलें ध्वजस्थान ॥ आणि त्यासीं पडतां निर्वाण[1] ॥ तेव्हां करावें युद्धासी ॥ ३ ॥ तरी पार्थाऐसा महावीर ॥ शोधितां नसे चराचर ॥ जेणें जिंकिला शंकर ॥ तोही झाला प्रसन्न ॥ ४ ॥ जेणें जिंकोनि सुरनाथ[2] ॥ बळें आणिला ऐरावत ॥ आरोग्य केला अग्नि त्वरित ॥ खांडववन देवोनियां ॥ ५ ॥ ऐसा ज्याचा पुरुषार्थ[3] ॥ तुह्मीं ऐकिला कीं सत्य ॥ तयासीं झुंजतां व्यर्थ ॥ आपुलें अहित चिंतोनि ॥ ६ ॥ पार्थक्रोधाग्नीचिये दीप्तीं ॥ सर्व वानरें भस्म होती ॥ ऐसा वीर भक्त सुभद्रापति ॥ प्राकृत दृष्टीं तुह्मी पाहातां ॥ ७ ॥ खावोनियां पाल्यासी ॥ कां ही मस्ती आली मर्कटांसी ॥ भांडतां माझिया स्वामीसीं ॥ व्यर्थ प्राणासी मुकाल ॥ ८ ॥ मी आप्तपणें सांगतों हित ॥ तुमचे रक्षणीं ठेवोनि चित्त ॥ माझ्या सुग्रीवाचें गोत ॥ सुखी राहो ह्मणोनियां ॥ ९ ॥ तुह्मी चिंतितां श्रीरामा ॥ ह्मणोनि अपराध केला क्षमा ॥ नाहीं तरी तुह्मां प्लवंगमां[4] ॥ मारितां काय उशीर ॥ ११० ॥ जोंवरी झाले नाहींत क्रोधायमान ॥ सोडिले नाहींत निर्वाण बाण ॥ तोंवरी जावोनि शरण ॥ आपुले प्राण रक्षावे ॥ ११ ॥ ऐसें बोलतां अंजनीसुत[5] ॥ सर्वही झाले भयभीत ॥ भयें थरथरां कांपत ॥ पार्थपराक्रम ऐकोनि ॥ १२ ॥ द्विरद ह्मणे हनुमंता ॥ तूंचि आमुचा रक्षिता ॥ जेणें कल्याण उभयतां ॥ तेंचि करावें तुवां कीं ॥ १३ ॥ हनुमंत ह्मणे एक करावें ॥ श्यामकर्णातें सोडावें ॥ कृष्णार्जुनांतें भेटावें ॥ तरीच तुमचें कल्याण ॥ १४ ॥ ऐसें ऐकतां वचन ॥ आणोनि दिधले श्यामकर्ण ॥ तयांसी ह्मणे वातनंदन ॥ येणें समाधान होईल ॥ १५ ॥ घेवोनियां श्यामकर्ण ॥ वस्त्रें रत्नें आणि धन ॥ त्यांसी करावीं अर्पण ॥ तेणें कल्याण तुमचें ॥ १६ ॥ बरवें ह्मणोनि सुग्रीवसुत ॥ वस्त्रें रत्नें धनें बहुत ॥ श्यामकर्ण घेवोनि त्वरित ॥ चालिले पार्था भेटावया ॥ १७ ॥ दुरोनि देखतां रमारमण ॥ वानर घालिती लोटांगण ॥ पुढें नेवोनि श्यामकर्ण ॥ वित्तही चरणीं अर्पिलें ॥ १८ ॥ कृष्णें उठोनि आपण ॥ वानरां दिधलें आलिंगन ॥ पार्थें क्षेम देऊन ॥ गौरविलें सर्वांसी ॥ १९ ॥ चंद्रहासादि वीर समस्त ॥ सकळां भेटला सुग्रीवसुत ॥ सर्व तयातें स्तवित ॥ महावीर पुरुषार्थी ॥ १२० ॥

१ संकट. २ इंद्र. ३ पराक्रम. ४ वानरांना. ५ मारुति.

मग संतोषोनि कृष्णार्जुनें ॥ कपि गौरविला वस्त्राभरणें ॥ ऐसें देखोनि सन्मानें ॥ स्वनगरातें बोळविला ॥ २१ ॥ मग कृष्णें करुणादृष्टीं ॥ रणीं केली अमृतवृष्टी ॥ तेथें वीरांच्या पडिल्या कोटी ॥ ते ते उठती सर्वही ॥ २२ ॥ ऐसा लीलाविग्रही भगवान ॥ त्याचें न कळे महिमान ॥ नानासंकटीं अर्जुन ॥ रक्षीतसे धांवोनियां ॥ २३ ॥ ऐसी ही स्कंदपुराणींची कथा ॥ तुज सांगितली पारीक्षिता ॥ पुढें चित्तीं करोनि एकाग्रता ॥ पूर्वजकथा ऐकावी ॥ २४ ॥ येथोनियां श्यामकर्ण ॥ जालंधरपुरा करितील गमन ॥ तेथें युद्ध होईल दारुण ॥ पाहातां नगर भय वाटे ॥ २५ ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ गोड आहे अमृताहून ॥ तें सावध करा श्रवण ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ २६ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ सुग्रीवपुत्राख्यान संपलें अगाध ॥ षडशीतितमाध्याय गोड हा ॥ १२७ ॥ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते सुग्रीवपुत्राख्यानं नाम षडशीतितमोध्यायः ॥ ८६ ॥ ॥ अध्याय ॥ ८६ ॥ ॥ ओव्या ॥ १२७ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे नृपवरा ॥ विवेकचातुर्यरत्नाकरा ॥ पूर्वजकथा कर्णद्वारा ॥ सावधान ऐकावी ॥१॥ किष्किंधे-
पासोनि कृष्णार्जुन ॥ पुढें सोडोनियां श्यामकर्ण ॥ लंघोनियां नाना वनोपवन ॥ उत्तरदिशे चालिले ॥ २ ॥ नाना नगरें हिंडती ॥
नाना देश पाहती ॥ ऐसे फिरत निश्चितीं ॥ आले हिमाद्रिपाठारा ॥३॥ पुढें मार्ग लागला दुर्गम ॥ नाना लता आणि द्रुम ॥ सहस्र
योजनें विस्तार परम ॥ उंच गांवें शत जो कां ॥४॥ तों पुढें दुस्तर घोर ॥ लागलें हिमगिरिपाठार ॥ तेथें मार्ग दुस्तर ॥ सैन्य जाता
कष्टलें ॥५॥ वेंघता तें पाठार ॥ कष्टले सकळही वीर ॥ तों पुढें देखिलें नगर ॥ जालंधराचें तेधवां ॥ ६ ॥ अत्यंत रम्य तें नगर ॥
छत्तीस गांवें सविस्तर ॥ जेवीं शोभे अमरपुर ॥ त्याहोनि हें आगळें ॥ ७ ॥ तेथें राजा चंद्रमौळी ॥ दैत्यवंशीं महाबळी ॥ ज्यासी
घ्यावया हातोफळी ॥ वीर कोणी असेना ॥ ८ ॥ ज्याचे पराक्रमेंकरून ॥ जर्जर झालें त्रिभुवन ॥ जैसा दुंदुभि प्रबळ जाण ॥ त्याचे
द्विगुणें वीर हा ॥९॥ त्यासी चेतवी नारदमुनि ॥ कां रे बैसलासी निश्चळपणीं ॥ तुज मारावया येतो चक्रपाणि ॥ सकळ सैन्यास-
हित ॥१०॥ सिद्ध करीं रे दळभार ॥ युद्धासी जाईं रे समोर ॥ पुढें पाठवोनि वीर ॥ श्यामकर्ण धरीं त्याचे ॥११॥ इतकें सांगोन त्यासी ॥
धांवत आला पार्थापासीं ॥ कां रे जातां मरायासी ॥ चंद्रमौळी पुढें असे ॥ १२ ॥ तो योद्धा कळिकाळाचा ॥ एकचि ग्रास करील
तुमचा ॥ मार्ग धरा हस्तनापुराचा ॥ जरी कल्याण पाहिजे ॥१३॥ ऐसें बोलतां मुनिवर ॥ चंद्रमौळीचे आले वीर ॥ त्यांणीं धरोनि नेले
अश्ववर ॥ दैत्यापासीं क्षणमात्रें ॥१४॥ ते देखोनियां श्यामकर्ण ॥ दैत्य पावला समाधान ॥ सेवकां दिधलें आज्ञावचन ॥ नेवोनि अश्व
बांधा रे ॥१५॥ तें देखोनि वृषकेत ॥ स्वसैन्येंसीं धांवत ॥ क्रोधें खवळला बहुत ॥ दुर्ग फोडित वज्रबाणें ॥१६॥ नाना रणतुरें वाजती ॥
पांडववीर उठावती ॥ ते अनेक शस्त्रें वर्षती ॥ भरिती बाणें नगर त्याचें ॥ १७ ॥ तों दैत्य धांवले दोन कोटी ॥ जे काळासी करणार
हिंपुटी ॥ मारिती ते अश्वथाटी ॥ करिती संहार पदातींचा ॥१८॥ देखोनि धांवला बभ्रुवाहन ॥ तो काळखंड वर्षे बाण ॥ दैत्यांचा
संहार संपूर्ण ॥ करीत चालिला सत्राणें ॥१९॥ पार्थात्मज योद्धा प्रबळ ॥ तेणें आटिलें दैत्याचें दळ ॥ पडिले प्रेतांचे ढिगाळ ॥ रक्त-
निम्नगा चालिल्या ॥२०॥ युद्ध केलें दारुण ॥ दैत्य मारिले कोटी दोन ॥ घायाळ पळाले तेथून ॥ चंद्रमौळीसी सांगावया ॥२१॥ ऐकतां
युद्धाची मात ॥ दैत्य स्वसैन्येंसीं धांवत ॥ भैरवास्त्रातें सोडित ॥ सबीज मंत्र जपोनि ॥२२॥ तेणें व्यापिलें पांडवसैन्य ॥ त्रिशूळें मारिती
येवोन ॥ तें चंडिकास्त्रें बभ्रुवाहन ॥ निवारिता जाहला ॥२३॥ तों दैत्य त्यावरी लोटला ॥ बभ्रुवाहन पाचारिला ॥ येरें बाणघातें उड-
विला ॥ गगनोदरीं तयातें ॥ २४ ॥ शतांचीं शतें वीर तेथें ॥ बभ्रुवाहनें लाविले मृत्युपंथें ॥ ऐसें देखोनि स्वमायेतें ॥ दैत्य स्मरे ते
वेळीं ॥ २५ ॥ ज्या ज्या वीरातें लक्षोन ॥ दैत्यनाथ सोडीत बाण ॥ त्याचे घेवोनियां पंचप्राण ॥ पाडी त्वरें धरेवरी ॥२६॥ मूर्छित
पडिला बभ्रुवाहन ॥ वृषकेतुही व्याकुळ पूर्ण ॥ दैत्य प्रबळ दारुण ॥ मारीत उठिला एकसरें ॥२७॥ दैत्यदळ दाटलें ॥ पांडववीर ते

माघारले ॥ सर्व राजे घाबरे झाले ॥ विसरले शस्त्रास्त्रांतें ॥२८॥ पार्थासी ह्मणे जनार्दन ॥ शीघ्र करीं रे शरसंधान ॥ येरें सोडिले कोटिबाण ॥ ते दैत्येशें वारिले ॥२९॥ दैत्य बोले कृष्णासी ॥ तूं कां रे व्यर्थ आलासी ॥ आतां प्राणांतें मुकसी ॥ सकळ वीरांसमवेत ॥३०॥ तुमचा पुरला अंत ॥ ह्मणोनि येणें झालें येथ ॥ आतां स्मरा रे कुळदैवत ॥ करितों घात सर्वांचा ॥३१॥ मी न मानीं इंद्रासी ॥ तो मी केवीं मोजीन नरासी ॥ आतां तुमच्या धांवण्यासी ॥ कोण येईल ये काळीं ॥३२॥ ऐकतां ऐसें वचन ॥ पार्थ कोपला अति दारुण ॥ टाकीतसे निर्वाण बाण ॥ त्यांचें निवारण तो करी ॥३३॥ जो जो उद्योग अस्त्रांचा ॥ तो तो निष्फळ करीत साचा ॥ मग पार्थें दैत्यदळाचा ॥ संहार मांडिला एकसरें ॥३४॥ परी तो दुर्धर वीर थोर ॥ तेणें पार्थासी केलें जर्जर ॥ सात दिवस युद्ध घोरांदर ॥ झालें तेव्हां उभयतांसीं ॥३५॥ मग हनुमंत बोले उत्तर ॥ करील सकळांचा संहार ॥ तुमचा पराक्रम थोर ॥ याचेपुढें न चाले ॥ ३६ ॥ दुंदुभीच्या दशगुण ॥ हा तों बलाढ्य दारुण ॥ याचा घ्यावया प्राण ॥ कोणी वीर नसे जन्मला ॥३७॥ अद्भुत बळ दैत्याचें ॥ सैन्य ग्रासिलें आमुचें ॥ महा विघ्न उदेलें साचें ॥ याचें निवारण कोण करी ॥ ३८ ॥ जैसा अंतींचा महाप्रळय ॥ तैसा याणें मांडिला क्षय ॥ ऐसें देखोनि देवकीतनय ॥ पार्थासी बोले भयभीत ॥३९॥ पार्था आपुलें विद्याबळ ॥ बाहेर काढीं रे सकळ ॥ अत्यंत शूर दैत्यपाळ ॥ हा तों काळ सर्वांचा ॥४०॥ मग सर्वव्यापक बाण ॥ सोडिता झाला अर्जुन ॥ तो त्याचें करी निवारण ॥ क्षणमात्र न लागतां ॥४१॥ जो जो अर्जुन करी उपाय ॥ तो तो वारी राक्षसराय ॥ ऐसा मांडिला तेथें प्रळय ॥ सर्वही झाले भयभीत ॥४२॥ प्रारब्ध नसतां अनुकूल ॥ उपाय करितां पुष्कळ ॥ ते सर्व होती निष्फळ ॥ तैसें झालें अर्जुना ॥ ४३ ॥ मग त्याणें दैत्यमाया दाविली ॥ एक ओष्ठ लाविला भूतळीं ॥ दुजा ओष्ठ गगनमंडळीं ॥ लावोनि ग्रासित पार्थसैन्या ॥४४॥ तों नारद गेला सूर्यापासीं ॥ तया सांगितलें वृत्तांतासी ॥ ह्मणे चंद्रशेखरें मारिलें वृषकेतूसी ॥ आणी पार्थसैन्यासी ग्रासिलें ॥४५॥ तुझ्या पुत्राचा नंदन ॥ त्यासी मारिलें जैसा मत्कुण ॥ तुजलागीं सांगतां न घेसी उसणें ॥ तरी मग आजा कासया ॥४६॥ जेणें अर्जुनाचा घात केला ॥ अवघा दळभार गिळिला ॥ आतां अश्वमेध राहिला ॥ तरी जाईं तूं युद्धासी ॥४७॥ ऐसें ऐकतां नारदवचन ॥ क्रोधावला चंडकिरण ॥ त्वरें झाला रथारोहण ॥ रणांगणा धांवला ॥४८॥ दुरोन हांक मारी तरणि ॥ नाभीं नाभीं रे गांडीवपाणि ॥ मी साह्य आलों तुजलागूनि ॥ आतां यातें संहारूं ॥४९॥ तों पुढें पाहे अंशुमाळी ॥ पार्थसैन्य ग्रासी चंद्रमौळी ॥ अर्जुन आणि वनमाळी ॥ रणीं मोह पावले ॥ ५० ॥ मग द्वादश कळा परिपूर्ण ॥ तपता झाला जी तपन ॥ कीं जाळावया त्रिभुवन ॥ शिवें नेत्र उघडिला ॥५१॥ सूर्य कोपला अति दारुण ॥ ह्मणे मी दैत्याचा घेईन प्राण ॥ हा पीडितो मजकारण ॥ ऐसा दारुण पुत्र हा ॥ ५२ ॥ मागें म्यां केला संग्राम ॥ परी नाटोपला दैत्याधम ॥ आतां यासी मारून माझा काम ॥ पूर्ण करीन एधवां ॥५३॥ बरवें केलें नारदमुनि ॥ मज त्वां पाचारिलें कीं रणीं ॥ मी हरि आणि गांडीवपाणि ॥ मिळोनि यातें संहारूं ॥५४॥ तों

दैत्येश्वर गडबडिला ॥ ह्मणे पतंग साह्य आणिला ॥ परी माझी प्रतापानलज्वाला ॥ भस्म करील तिघांतें ॥५५॥ मग त्यांवरी घातली उडी ॥ तळीं दडपिलीं तिघें बापुडीं ॥ वळली तिघांची मुरकुंडी ॥ परम झाले कासाविस ॥५६॥ ऐसी देखतां करणी ॥ वेगें पळाला दिनमणि ॥ पळतां पाहे फिरोनि ॥ मेले किंवा वांचले ॥५७॥ पार्थ आणि श्रीकृष्ण ॥ मूर्छित पाडिले दोघेजण ॥ नाहीं त्यांसी देहभान ॥ ऐसा दारुण दैत्य तो ॥ ५८ ॥ सूर्यें मनीं भाविलें देखा ॥ करूनि घेतलें नव्या दुःखा ॥ येणें जिंकिला अर्जुनासारिखा ॥ आतां मजला पीडील ॥५९॥ असाध्य रोग वाढतां प्रसिद्ध ॥ त्यालागीं गुण न दे दिव्यौषध ॥ तेवीं याचा करावया वध ॥ पराक्रम न चाले ॥६०॥ किंवा अनंत गुणराशी ॥ एक मोहिनी निजबळें नाशी ॥ तेवीं कृष्णादिक वीरांशीं ॥ दैत्याधमें पाडिलें ॥६१॥ ऐसें बोलोनि दिनकर ॥ आटोपिलें निजमंदिर ॥ रणीं मातला दैत्येश्वर ॥ पार्थसैन्य ग्रासितसे ॥ ६२ ॥ वीरें वीर पाडिले रणीं ॥ सशस्त्र उभा नसे कोणी ॥ जे सजीव होते प्राणी ॥ तेही प्रेतांत घुसले ॥६३॥ कृष्णादि वीर रणमंडळीं ॥ निर्जीव पडिले सकळी ॥ जयश्री घेवोनि चंद्रमौळी ॥ नगरामाजी प्रवेशला ॥ ६४ ॥ मग प्रहरानंतर गरुडध्वज ॥ रणीं सावध झाला सहज ॥ जावोनि उठविला कपिध्वज ॥ सकळ वीर त्याचपरी ॥ ६५ ॥ पार्थासी बोले यदुराय ॥ आतां काय करिसी रे उपाय ॥ कैसा मारावा दैत्यतनय ॥ तो विचार मज सांगें ॥ ६६ ॥ पार्थ बोले हृषीकेशी ॥ वेद निपजले तुझे श्वासीं ॥ तो तूं उपाय आह्मांसी ॥ पुससी हें कौतुक ॥ ६७ ॥ विज्ञानसागरींचा पोहणार ॥ तो भियाला देखोनि मृगनीर ॥ बहुत वाढलिया अंधार ॥ त्याची काय चिंता रवीतें ॥ ६८ ॥ अज्ञानाचा जो सागर ॥ त्यासी देवगुरु पुसे विचार ॥ जो काळ करितो विश्वसंहार ॥ तो काय धरील मशकभय ॥ ६९ ॥ तैसेंचि घडोन आलें साचार ॥ तूं मजला पुससी विचार ॥ इच्छामात्रें चराचर ॥ भस्म करिसी तोचि तूं ॥ ७० ॥ तुझी जी कां लीला ॥ ती नकळे विरंचीला ॥ तूं सकळ बुद्धीचा सोहळा ॥ तोचि तूं विचार पुससी ॥ ७१ ॥ ऐकोनियां पार्थमात ॥ संतोषला रमानाथ ॥ मग क्षणैक बैसोनि ध्यानस्थ ॥ दैत्यवध विचारी ॥ ७२ ॥ पराक्रमें हा न मरे स्पष्ट ॥ तरी यासी योजावें कपट ॥ जेणें पावे मृत्युवाट ॥ दैत्य अधम यावरी ॥ ७३ ॥ ऐसें चिंतोनि श्रीहरी ॥ द्विज झाला तो सत्वरी ॥ वंशकाठी घेऊन करीं ॥ चरणीं पादुका शोभती ॥७४॥ धोत्रें नेसला लखलखित ॥ करीं हेमझारी निर्मळ शोभत ॥ द्वादश टिळे मिरवत ॥ रुद्राक्षमाळा कंठीं घातल्या ॥७५॥ ऐसा धरोनियां वेष ॥ एकलाचि गेला जगन्निवास ॥ मारावया दैत्येश ॥ काळ चालिला द्विजरूपें ॥ ७६ ॥ वेगें करोनियां गमन ॥ द्विज पावला सभास्थान ॥ दैत्येशें देखोनियां ब्राह्मण ॥ केलें नमन सद्भावें ॥ ७७ ॥ द्विजें दिधलें आशीर्वचन ॥ राया येथोनि तुझें कल्याण ॥ तंव साशंक झालें त्याचें मन ॥ ह्मणे हा वचन काय हें बोले ॥ ७८ ॥ काय झालें कल्याण ह्मणत ॥ याचा काय करावा अर्थ ॥ ऐसें मन साशंकित ॥ मग तयातें पुसतसे ॥ ७९ ॥ तुमच्या प्रसादें कल्याण ॥ आतां झालें मजकारण ॥ तरी हें वदलां

काय आपण ॥ मजलागीं निवेदा ॥ ८० ॥ काय अभिप्राय या वचनाचा ॥ तो द्विजवरा सांगें साचा ॥ येरू ह्मणे ऐक रे मम वाचा ॥ तुजलागीं जी सांगतों ॥ ८१ ॥ माझें झालिया दर्शन ॥ कोणा न घडे पुनरागमन ॥ प्रपंचसुखातें संहारून ॥ निजध्यानीं लक्ष लावीं ॥ ८२ ॥ तें तुजला प्राप्त सुख ॥ ह्मणोनि वदलें माझें मुख ॥ ऐकतां दैत्य पावला हरिख ॥ तथास्तु ह्मणे आनंदें ॥ ८३ ॥ द्विजासी पुसे दैत्यभूषण ॥ कोण तुमचें निवासस्थान ॥ किंनिमित्त झालें आगमन ॥ तें कारण मज सांगा ॥ ८४ ॥ तों द्विज बोले तयासी ॥ मी तों असें द्वारकावासी ॥ कृष्णशर्मा नाम या देहासी ॥ पुत्रविवाह वांछिला ॥ ८५ ॥ करावया धनार्जन ॥ मी करीत होतों देशाटन ॥ तों अकस्मात झालें श्रवण ॥ कीं अश्वमेध करिती पांडव ॥ ८६ ॥ तों तुह्मीं त्यांचे धरिले श्यामकर्ण ॥ युद्ध केलें अति दारुण ॥ सकळांचे घेतले प्राण ॥ ऐसा दारुण वीर तूं ॥ ८७ ॥ आतां अश्वमेध राहिला ॥ माझा आशातरु भंगला ॥ ह्मणोनि आलों या स्थळा ॥ मागावया निजधन ॥ ८८ ॥ दैत्य ह्मणे द्विजभूषणा ॥ दर्शनें संतोष झाला मना ॥ आतां किती जी द्रव्यवासना ॥ मजलागीं ती सांगावी ॥ ८९ ॥ रायासी बोले तो ब्राह्मण ॥ माझें ऐका जी मंत्रपठन ॥ माझा पाहोनि विद्यागुण ॥ मग मज द्रव्य देइंजे ॥ ९० ॥ मग मारक केलें मंत्रपठन ॥ तेणें विपरीत फल जाण ॥ त्या अक्षता मंत्रोन ॥ टाकी-तसे दैत्यमस्तकीं ॥ ९१ ॥ परम लाघवी भगवान ॥ अक्षतीं योजिलें सुदर्शन ॥ तेणें हरोनि नेलें जीवन ॥ मुक्त केला दैत्येश ॥ ९२ ॥ ज्यांज्यांवरी भगवान ॥ करी अक्षतांचें प्रेरण ॥ ते ते गेले मरोन ॥ क्षणमात्र न लागतां ॥ ९३ ॥ ऐसें दैत्यांचें मंडळ ॥ संहारीत घननीळ ॥ विष्णुमाया दुर्घट केवळ ॥ दैत्य मोह पावती ॥ ९४ ॥ सभेमाजी दैत्यमंडळ ॥ तें सर्व निमालें तात्काळ ॥ तेथें जाहला कोलाहल ॥ मग काढिला पळ श्रीकृष्णें ॥ ९५ ॥ रणीं येवोनि जगज्जीवन ॥ सकळ सैन्य जीववोन ॥ ह्मणे नगर लुटा जाऊन ॥ म्यां तों मारिला चंद्रमौळी ॥ ९६ ॥ ऐसें ऐकतांचि कृष्णवचन ॥ सर्व पावले समाधान ॥ धांवले सकळ वीरगण ॥ नगर लुटावया तयाचें ॥ ९७ ॥ ऐशापरी चंद्रमौळी ॥ मारोनियां तो वनमाळी ॥ सकळ संपदा हरिली ॥ कुबेरापरी तयाची ॥ ९८ ॥ सकळ संपदा घेऊन ॥ राज्यीं स्थापिला त्याचा नंदन ॥ मग बरवे पूजोनि श्यामकर्ण ॥ पुढें सोडिले तेधवां ॥ ९९ ॥ हें ब्रह्मांडपुराणींचें कथन ॥ तुज म्यां सांगीतलें संपूर्ण ॥ पुढें हिमालयनगरीं श्यामकर्ण ॥ जातील कथन तें ऐका ॥ १०० ॥ तें अति गोड निरूपण ॥ श्रवण करा अमृतासमान ॥ भावें ऐकतां नासे जन्ममरण ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ १ ॥ इति श्रीधर्मा-श्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ चंद्रमौळिकथन संपलें अगाध ॥ सप्ताशीतितमाध्याय गोड हा ॥ १०२ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके चंद्रमौल्याख्यानं नाम सप्ताशीतितमोऽध्यायः ॥ ८७ ॥ अध्याय ॥ ८७ ॥ ओव्या ॥ १०२ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जनमेजय ह्मणे परीक्षितिकुमरा ॥ अश्व गेले हिमालयपुरा ॥ तेथें जी कथा वर्तली नृपवरा ॥ ती श्रवणीं परिसावी ॥ १ ॥ जालंधरपुरातें सोडून ॥ पुढें चालिले श्यामकर्ण ॥ हिमालयाचें देखिलें उद्यान ॥ तेथें उभे ठाकले ॥ २ ॥ तेथें हिमालयाचा नंदन ॥ मैनाकनामें बळसंपन्न ॥ तो पारधी खेळावयालागून ॥ आला होता वनातें ॥ ३ ॥ दश कोटि वीरगणित ॥ संगें होते विख्यात ॥ त्यांहीं श्यामकर्ण त्वरित ॥ धरोनि नेले क्षणमात्रें ॥ ४ ॥ आतां अश्वरक्षक येतील ॥ त्यांसीं युद्ध करूं तुंबळ ॥ ह्मणोनि सिद्ध केलें दळ सकळ ॥ वाट पाहती परदळाची ॥ ५ ॥ ते अश्व पाहोनि मैनाकें ॥ चित्तीं विस्मित कौतुकें ॥ ह्मणे अश्वरत्नें सुरेखें ॥ कवण रायाचीं आहेती ॥ ६ ॥ तों भाळीं कनकपत्र देखिलें ॥ तें धरेंद्रपुत्रें[२] वाचिलें ॥ अश्व धर्माचे ऐसें कळलें ॥ मग निंदित पत्रलिखितार्था ॥ ७ ॥ ह्मणे मजऐसा बळवंत ॥ कोण आहे ब्रह्मांडांत ॥ म्यां राजे जिंकिले समस्त ॥ देवेंद्र दैत्येंद्र जिंकिले ॥ ८ ॥ माझ्या प्रतापाची ज्वाळा ॥ लागतां कूर्मराज संतापला ॥ शीतळ करावया देहाला ॥ अद्यापि स्वीकारी उदकांतें ॥ ९ ॥ मम प्रतापें तापला शूकर ॥ तेणें पाताळाचा केला स्वीकार ॥ अद्यापि सर्वही शूकर ॥ बिळालागीं सेविती ॥ १० ॥ ज्या मज मैनाकापुढें जाण ॥ मशकप्राय हें त्रिभुवन ॥ तेथें ते कुंतीनंदन[३] ॥ सँर्षपप्राय मज वाटती ॥ ११ ॥ सुटलिया प्रळयानळ ॥ काय करील तें पतंगदळ ॥ खवळलिया महाकाळ ॥ वारील मशक केवीं त्यातें ॥ १२ ॥ प्रळयीचें मेघपडळ ॥ जरी वारील व्यजनानिळ[५] ॥ कनकाचळा अतसीफूल ॥ जरी पाडील निजघातें ॥ १३ ॥ तरीच हा श्वेतवाहन ॥ मजकडून नेईल श्यामकर्ण ॥ केव्हढा धर्मातें अभिमान ॥ लेखन केलें प्रौढीचें ॥ १४ ॥ जरी कृष्ण साह्य त्यासी ॥ तरी मी न भीत मानसीं ॥ मी जिंकोनि कृष्णपार्थांसी ॥ जिवंत धरा नेईन ॥ १५ ॥ आतां येतांच अश्वरक्षक ॥ त्यांचें मारा रे कटक[६] ॥ तरीच मैनाकाचे सेवक ॥ नाहीं तरी पशुसम तुह्मी ॥ १६ ॥ ऐसा धरोनि अभिमान ॥ उभा राहिला सिद्ध होऊन ॥ कृष्णार्जुनांतें लक्षून ॥ वाट पाहे तयांची ॥ १७ ॥ तों पार्थात्मज आणि वृषकेत ॥ दोघे धांवले काळवत ॥ अश्व कोठें कोठें ह्मणत ॥ सैन्य देखती पुढें दारुण ॥ १८ ॥ जी काळाचेनि भेदवेना ॥ ऐसी देखिली दुर्धर सेना ॥ तथापि त्या वीरपंचानना ॥ नाहीं भय संचरलें ॥ १९ ॥ सोडित चालिले बाणजाळ ॥ तेणें व्यापिलें नभमंडळ ॥ युद्ध केलें तुंबळ ॥ दोघांहीं शस्त्रास्त्रीं ॥ २० ॥ बाण सुटती सणसणा ॥ वीर पडती दणदणा ॥ शस्त्रें वाजती खणखणा ॥ अँशुद्धपूर लोटले ॥ २१ ॥ नाना सोडोनियां शर ॥ पाडिती रथाश्व कुंजर ॥ वीर पडिले अपार ॥ झाली लाखोली शिरांची ॥ २२ ॥ महादारुण ते झुंझार ॥ केला दळाचा संहार ॥ घालोनियां बाणजाळ घोर ॥ वीरें वीर आटिले ॥ २३ ॥ ऐसे वीरें वीर मारिले ॥ उरले ते पळोनि गेले ॥ जे घायाळ राहिले ॥ ते प्रेतें कवळिती ॥ २४ ॥ दळाचा झाला संहार ॥ मग लोटला शैलपुत्र ॥ सोडो-

---

१ बाग. २ हिमाचलाच्या पुत्रानें. ३ अर्जुनादि. ४ मोहोरीप्रमाणें. ५ पंख्याचा वारा. ६ सैन्य. ७ रक्ताचे पूर. ८ योद्धे. ९ मैनाक.

नियां अनेक शर ॥ बाणजाळें तोडिलीं ॥ २५ ॥ क्रोधें पेटला मैनाक ॥ संहारीतसे पार्थकटक ॥ नेमें मारीत वीरनायक ॥ सोडिला बाण व्यर्थ नव्हे ॥ २६ ॥ बाणेंकरूनियां मैनाकें ॥ पाडिलीं वीरांची कटकें ॥ मार्ग रोधिला सायकें ॥ पळों नेदीच कोणातें ॥ २७ ॥ ऐसें युद्ध केलें कौतुकें ॥ भूमी भरली रक्तपंकें ॥ त्यामाजी बुडती रथाचकें ॥ अश्व कर्णाग्रपर्यंत बुडती ॥ २८ ॥ धाकें गज पळों धांवती ॥ ते त्या पंकामाजी बुडती ॥ माहुत अंकुशें मारिती ॥ परी न चालवे त्यांचेनि ॥ २९ ॥ चालती रथांचे थाट ॥ तेणें मस्तकें होती पीठ ॥ वीरांचें पडिले मुगुट ॥ रत्नें तेथें विखुरती ॥ ३० ॥ बाण सुटती सणसणाट ॥ तेणें घर्षण होय उत्कृष्ट ॥ तेथोनि पडे हव्यवाट ॥ तो जाळित उभयदळां ॥ ३१ ॥ पार्थात्मज कर्णात्मज जाण ॥ जें जें करिती संधान ॥ तें तें टाकीत छेदोन ॥ महावीर तो शैलात्मज ॥ ३२ ॥ ऐसे अनंत शर सोडिले ॥ वीरें वीर पाडिले ॥ शरजाळीं खिळिलें ॥ पार्थात्मजा आणि वृषकेता ॥ ३३ ॥ मूर्छित पाडिले दोघेजण ॥ मारीत चालिला पांडवसैन्य ॥ रक्तनिम्नगा[2] भरोन ॥ लवणाब्धि पाहों धांवती ॥ ३४ ॥ जेवीं प्रळयकाळींचा वारा ॥ क्षणें उडवी मेघडंबरा ॥ तेवीं पार्थसैन्याचा केला मातेरा ॥ वीरें वीर आटिले ॥ ३५ ॥ कीं प्रळयकाळींचा अनळ ॥ तात्काळ जाळी तृणाचे अचळे[3] ॥ किंवा सर्पाचें कुळ ॥ एकला गरुड विध्वंसी ॥ ३६ ॥ चंद्रहासादि पार्थिव ॥ युद्ध करूं धांवले सर्व ॥ त्यांचें हरिलें बळवैभव ॥ शैास्त्रसंख्या सायकें ॥ ३७ ॥ तों कलहप्रिय नारदमुनि ॥ धांवत गेला हिमगिरि-सदनीं ॥ तयाप्रति बोले वाणी ॥ कां रे तूं निश्चिंत बैसलासी ॥ ३८ ॥ पार्थ आणि यदुनायक ॥ घेवोनि आले निजकटक ॥ त्यांसीं पुत्र तुझा मैनाक ॥ बरव्या परी झुंजला ॥ ३९ ॥ परी त्या दोहीं केला जर्जर ॥ तरी धांवें तूं अति सत्वर ॥ सोडवीं रे आपुला पुत्र ॥ युद्ध दारुण करीं कां ॥ ४० ॥ ऐकोनियां नारदवाणी ॥ क्रोधावला हिमवंत मनीं ॥ शतकोटी सैन्य घेऊनि ॥ रणांगणा धांवला ॥ ४१ ॥ तों इकडे हिमालयाचा नंदन ॥ युद्ध करीतसे दारुण ॥ सकळ पृथिवीचे नृपगण ॥ गतप्राण ते केले ॥ ४२ ॥ अर्जुन आणि मैनाक पूर्ण ॥ दोघे भिडती वीर दारुण ॥ घोर मांडिलें तेथें रण ॥ कबंधें नाचों लागलीं ॥ ४३ ॥ तों नारद येवोनि पार्थाजवळी ॥ ह्मणे काय लाविला रे रळी ॥ शतकोटी सैन्येंसीं महाबळी ॥ हिमाद्रि आला कीं धांवोनियां ॥ ४४ ॥ ऐकतां अर्जुन पावला भयातें ॥ ह्मणे श्रीकृष्णा रक्षीं येथें ॥ तुझिया अघटित लीलेतें ॥ नेणवेचि मजलागीं ॥ ४५ ॥ मग मारुतीस ह्मणे शेषशायी ॥ आतां तुवां करावी शिष्टाई ॥ युद्ध करितां पुढें पाहीं ॥ येईल जांवई पर्वताचा ॥ ४६ ॥ तुवां जावोनि हनुमंता ॥ हिमगिरि बोधावा आतां ॥ तो निवारील आपुल्या सुता ॥ संग्रामवार्ता न काढी ॥ ४७ ॥ त्याणें व्हावें आह्मांसी शरण ॥ आणोनि द्यावे श्यामकर्ण ॥ उभय-तांचें होय समाधान ॥ ऐसें कार्य साधावें ॥ ४८ ॥ बरवें ह्मणोनि पवनसुत ॥ अकस्मात उडाला त्वरित ॥ तों कपीस देखतां पर्वत ॥

१ अग्नि. २ रक्ताच्या नद्या. ३ पर्वत. ४ सहा. ५ पुत्र. ६ धडें. ७ श्रीकृष्ण. ८ महादेव. ९ मारुति.

नमस्कारीत आनंदें ॥ ४९ ॥ तयासी बोले हिमगिरि ॥ कां येणें झालें कपिकेसरी ॥ कृपा केली मजवरी ॥ भाग्योदय जाहला ॥ ५० ॥ तूं आलासी ज्यानिमित्त ॥ तें मज सांगें यथार्थ ॥ तेंचि आचरेन मी सत्य ॥ प्रतापिया कपीश्वरा ॥ ५१ ॥ सकलचातुर्यरत्नाकर ॥ काय बोलिला वातकुमर ॥ तें ऐकावें तुवां सादर ॥ ह्मणे जैमिनि जनमेजया ॥ ५२ ॥ पर्वता ऐक रे वहिलें ॥ तुझें भाग्य आगळें ॥ गौरीऐसें रत्न पोटा आलें ॥ तें दिधलें शिवासी ॥५३॥ ज्याचा जामात शंकर ॥ त्याच्या भाग्या नाहीं पार ॥ तरी ऐक माझें उत्तर ॥ तुझेंच हित बोलतों ॥५४॥ तुज असावें कल्याण ॥ हेंच इच्छितें माझें मन ॥ आपुला असेल जो स्वजन ॥ तो चिरकाळ नांदावा ॥ ५५ ॥ अनंत ब्रह्मांडांच्या कोटी ॥ नांदती जयाचे कृपादृष्टीं ॥ ऐसा श्रीकृष्ण जगजेठी ॥ तोचि सारथि पार्थाचा ॥५६॥ पार्थ मान्य पृथ्वीवरी ॥ जेणें जिंकिला त्रिपुरारि ॥ आणि जिंकोनि पर्वतारि ॥ ऐरावत आणिला ॥ ५७ ॥ माझा पराक्रम किंचित ॥ झाला असेल तुज विदित ॥ तरी मजसारिखा रामदूत ॥ जिंकोनि स्थापिला ध्वजाग्रीं ॥ ५८ ॥ ते साक्षात नरनारायण ॥ मी तों त्यांचा भृत्य जाण ॥ मीच ब्रह्मांड गिळीन संपूर्ण ॥ ते तों काय न करिती ॥ ५९ ॥ तरी त्या पार्थाचे श्यामकर्ण ॥ धरोनि भांडतो तव नंदन ॥ तरी तो पावेल कीं मरण ॥ आतां बरवें विचारीं ॥ ६० ॥ तूं शंकराचा श्वशुर ॥ मैनाक तुझा ज्येष्ठ कुमर ॥ त्यासंबंधें गदाधर ॥ उगाचि आहे अद्यापी ॥ ६१ ॥ सक्रोध होवोनि अर्जुन ॥ जोंवरी न सोडी निर्वाण बाण ॥ तोंवरी जावोनि शरण ॥ आत्ममरण निवारीं ॥ ६२ ॥ ऐसें हनुमंताचें उत्तर ॥ ऐकोनियां गिरिवर ॥ ह्मणे तूं सांगशील जो विचार ॥ तोचि करणें कपिराया ॥ ६३ ॥ येरू ह्मणे त्वां शरण जावें ॥ श्यामकर्णातें सोडावें ॥ वस्त्राभरणें वित्त द्यावें ॥ पार्थालागीं गौरवावें तुवां ॥ ६४ ॥ बरवें ह्मणोनि तो गिरि ॥ अत्यंत संतोषला अंतरीं ॥ भेटीस आला सहपरिवारीं ॥ श्यामकर्णातें घेवोनि ॥ ६५ ॥ दुरोनि देखतां नरनारायण ॥ पर्वतें घातलें लोटांगण ॥ दिधलें क्षेमालिंगन ॥ पार्थें आणि यादवेशें ॥ ६६ ॥ शरण आला आपुला जनक ॥ ऐसें जाणोनि मैनाक ॥ धांवोनि आला निःशंक ॥ करीत नमस्कार उभयतांसी ॥ ६७ ॥ देवोनि क्षेमालिंगन ॥ दोघे करिताती स्तवन ॥ भलें केलें समरांगण ॥ तव पुत्र महाप्रतापी ॥ ६८ ॥ मग चंद्रहासादि नृपगण ॥ निजकृपेनें उठवी नारायण ॥ भेटती सर्व येऊन ॥ पर्वतासी तेधवां ॥ ६९ ॥ नाना वस्त्रें भूषणें ॥ अनंत रत्नें अपार धनें ॥ पार्थासी समर्पिलीं तेणें ॥ दिधलें भोजन सकळिकां ॥ ७० ॥ चारी दिवस ठेवून ॥ गौरविले कृष्णार्जुन ॥ वस्त्राभरणें श्वेतवाहन ॥ देता झाला तयासी ॥ ७१ ॥ जनमेजया मुनि सांगत ॥ येथोनि युद्ध झालें समाप्त ॥ जवळी आला वर्षांत ॥ ह्मणोनि अश्व परतले ॥ ७२ ॥ अश्व जातील उत्तरसागरा ॥ तेथें भेटी होईल ऋषीश्वरां ॥ त्यांसी नेतील हस्तनापुरा ॥ यज्ञसमाप्तीकारणें ॥ ७३ ॥ हें कूर्मपुराणींचें आख्यान ॥ तुज म्यां सांगितलें संपूर्ण ॥ येथें संतुष्ट जग-

१ मारुति. २ सत्वर. ३ शंकर. ४ इंद्र. ५ चाकर. ६ कृष्ण. ७ अतकारक. ८ अर्जुन.

जीवन ॥ जो भक्तजनकैवारी ॥ ७४ ॥ अर्जुनाचा हरिला अभिमान ॥ इतर शूरांचा राखिला मान ॥ यश दिधलें पार्थालागून ॥ ऐसा जगदात्मा लाघवी ॥ ७५ ॥ रायासी बोले मुनिवर ॥ हा सर्व पुराणींचा सारोद्धार ॥ व्यासवचनामृतसागर ॥ तुज म्यां मंथोनि दाविला ॥ ७६ ॥ ऐकोनियां मुनिवचन ॥ राव पावला समाधान ॥ सर्वांगीं निवालों ह्मणोन ॥ लोटांगण घातलें ॥ ७७ ॥ द्विजें नृपातें उठवून ॥ प्रेमें दिधलें आलिंगन ॥ दोघे झाले सुखसंपन्न ॥ स्तविताती येरयेरां ॥ ७८ ॥ हें पवित्र भारताख्यान ॥ याचें करितां श्रवण ॥ कलिकल्मष जाय झडोन ॥ रमती जाण विष्णुलोकीं ॥ ७९ ॥ अनेक पुष्पांचा रससार ॥ जैसा घेतो तो मधुकर ॥ तैसा सर्व पुराणोद्धार ॥ काढोनि कथा कथिली म्यां ॥ ८० ॥ दुंदुभीपासोनि हिमालयापर्यंत ॥ जें म्यां चरित्र वर्णिलें येथ ॥ हें व्यासकृत पुराणोक्त ॥ मम कृत्य नव्हें कीं ॥ ८१ ॥ ह्मणोनि त्या ग्रंथाहोनि भिन्न ॥ म्यां हें केलें वर्णन ॥ सद्भावें कर जोडून ॥ श्रीधर विनवी श्रोतयां ॥ ८२ ॥ येथें जें असेल न्यून पूर्ण ॥ तें संतीं करावें संपूर्ण ॥ ह्मणोनि घातलें लोटांगण ॥ श्रीधरें सकळांलागूनि ॥ ८३ ॥ इति श्रीधर्माश्वमेध ॥ पुराणांतरकथानुवाद ॥ हिमगिरिसुतआख्यान संपलें अगाध ॥ अष्टाशीतितमाध्याय गोड हा ॥ ८४ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते हिमगिरिसुताख्यानं नाम अष्टाशीतितमोऽध्यायः ॥ ८८ ॥ अध्याय ॥ ८८ ॥ ॥ ओव्या ॥ ८४ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे पारीक्षिता[1] ॥ चित्तीं करूनि एकाग्रता ॥ ऐकें पूर्वजांची कथा ॥ जी तारक संसारीं ॥ १ ॥ हिमालयापासोन ॥ गौरव पावले कृष्णार्जुन ॥ चार दिवस तेथें राहून ॥ पुढें श्यामकर्ण सोडिले ॥ २ ॥ सकळ पृथ्वीचे नृपवर ॥ सवें निघाला हिमालयपुत्र ॥ सैन्य चालिलें जैसा समुद्र ॥ कीं मेघडंबर उभवलें ॥ ३ ॥ त्यामाजी पार्थ यदुनंदन[2] ॥ ध्वजस्तंभीं वायुनंदन[3] ॥ तो रथ दिसे शोभायमान ॥ हरिहरनर[4] एकासनीं ॥ ४ ॥ वाद्यें वाजती तुंबळ ॥ तेणें ध्वनित झालें नभमंडळ ॥ पदरेणूनें भास्करमंडळ[5] ॥ गगनोदरीं आच्छादिलें ॥ ५ ॥ पदाती पुढें चालती ॥ तयांमागें अश्वांच्या थाटी ॥ त्यांमागें गज नेहटी ॥ जेवीं पर्वत उंचावले ॥ ६ ॥ त्यांमागें रथांचे लोट ॥ घडघडताती अचाट ॥ ऐसें पार्थसैन्य उद्भट ॥ लंघीत चालिलें वनोपवनें ॥ ७ ॥ ऐसें करितां भ्रमण ॥ उत्तरसमुद्रा गेले श्यामकर्ण ॥ मग ते जळामाजी प्रवेशोन ॥ उतरोनि गेले परतीरा ॥ ८ ॥ तें अगाध सिंधुजीवन ॥ अश्व गेले उतरून ॥ पार्थादिक सकळ सैन्य ॥ तीरीं येवोनि थोकलें ॥ ९ ॥ मग बोले श्रीपति ॥ तुह्मांलागीं सांगतों युक्ति ॥ पांचांचे रथ उदकावरी चालती ॥ तेही कोण सांगतों ॥ १० ॥ हंसध्वज श्वेतवाहन[6] ॥ प्रद्युम्न आणि बभ्रुवाहन ॥ तैसाचि मयूरकेतन ॥ भुवनत्रयीं गमन जयांचें ॥ ११ ॥ ऐसें कृष्णें बोलून ॥ पांच रथी सवें घेऊन ॥ कृष्णें केलें पुढें गमन ॥ इतर तेथेंचि ठेविले ॥ १२ ॥ ज्याचें केलिया नामस्मरण ॥ होय संसाराब्धितरण ॥ तो संगें असतां नारायण ॥ आश्चर्य काय सागरतरणें ॥ १३ ॥ तों पुढें देखिलें थोर बेट ॥ तेथें गेले वीर श्रेष्ठ ॥ तेथें देखिला मुनिमुगुट[7] ॥ बकदाल्भ्य तपस्वी ॥ १४ ॥ वटपत्र धरिलें शिरीं ॥ तेणें सूर्यकिरण निवारी ॥ पर्णकुटी न करीच निर्धारीं ॥ शरीर मानी अशाश्वत ॥ १५ ॥ शतच्छिद्र लताजाळीं ॥ वेष्टिलासे जटामौळी ॥ खगें[8] गृहें केलीं असती निजमौळीं ॥ त्यांत तो वृद्ध तपस्वी ॥ १६ ॥ विमळ घालोनि पद्मासन ॥ ध्यानस्थ असे झांकोनि नयन ॥ ऐसिया ऋषीतें देखोन ॥ रथावरूनि उतरले ॥ १७ ॥ पांचांनीं केलें दंडवत ॥ जयजय शब्दें स्तवित ॥ ऐकतां नेत्र उघडित ॥ पाहावया तयांतें ॥ १८ ॥ पाहातां श्रीकृष्णचरण ॥ मुनीश्वर पावला समाधान ॥ आनंदें उत्फुल्लनयन ॥ होवोनियां बोलत ॥ १९ ॥ अति चंचळ पांचजण ॥ येथें त्यांणीं आणिला रमारमण ॥ यावरी येथें राहणें ॥ योग्य नव्हे आमुतें ॥ २० ॥ साधनें त्यजावे पांचजण ॥ मग स्वरूप पावावें चिद्घन ॥ येथें नवल झालें गहन ॥ पांचांनीं श्रीकृष्ण आणिला ॥ २१ ॥ जो त्रिभुवनांचा गोसांवी ॥ ज्याची गोडी घेती अनुभवी ॥ तो प्रत्यक्ष देखिलिया तनुगांवीं[9] ॥ राहाणें तें अयोग्य ॥ २२ ॥ ऐसें ऐकतां मुनिउत्तर ॥ विस्मित झाला पंडुकुमर ॥ पुनः करूनियां नमस्कार ॥ काय उत्तर बोलत ॥ २३ ॥ शिरीं धरिलें शुष्क पत्र ॥ कां न केलें जी मंदिर ॥ तुमचें भेदोनियां गात्र ॥ वृक्षलता वरी जाहल्या ॥ २४ ॥ त्या वृक्षावरी घरें ॥ अनंत केलीं कीं खेचरें ॥ स्त्रीपुत्र घेवोनि

१ जनमेजया. २ कृष्ण. ३ मारुति. ४ कृष्ण, शिव ( मारुति ) आणि अर्जुन. ५ सूर्यमंडळ. ६ अर्जुन. ७ मुनिश्रेष्ठ. ८ पक्ष्यांनीं. ९ देहांत.

आदरें ॥ सुखें क्रीडा करिताती ॥ २५ ॥ मागें पुढें शरीरीं ॥ वल्मीकें वाढलीं समग्रीं ॥ त्यांतून निघती विखारी ॥ ते स्कंधावरी कीं बैसती ॥ २६ ॥ ते सर्प फणा पसरोन ॥ स्वेच्छ करिती वायुभक्षण ॥ अंगासी मृग करिती कंडूनिरसन ॥ दृढ निष्ठा स्वामीची ॥ २७ ॥ ऐसें ऐकतां पार्थवचन ॥ बकदाल्भ्य करी हास्यवदन ॥ मग बोलतसे वचन ॥ ऐकें पुत्रा पंडूच्या ॥ २८ ॥ ऐक पार्था मम वचन॥ गृह न करावयाचें कारण ॥ स्त्रीयोगें अधःपतन ॥ सदैव जाण क्लेशभोग ॥ २९॥ सोडोनियां उत्तम साधन॥ अधर्माचें करावें संस्थापन ॥ क्लेशें मेळवावें धन ॥ तें वेंचून स्त्री करावी ॥ ३०॥ ती मिळालिया कर्कशा ॥ तरी येथेंचि भोगावी नरकदशा ॥ सांडोनि जातां अन्य देशा ॥ सोलींव दुःख भोगवी ॥ ३१ ॥ जरी स्त्री मिळाली चंडी[3] ॥ तरी ती मायबापांतें विखंडी ॥ बंधुजनांची आस तोडी ॥ कोणी घरा येऊं नेदी ॥ ३२ ॥ तथापि करावें पोषण ॥ करोनि नीचाचें सेवन ॥ सोडोनि स्वधर्माचरण ॥ द्रव्यार्जन करावें ॥ ३३ ॥ तिजनिमित्त करावें घर ॥ मग तिजला होती कन्यापुत्र ॥ तयांचा करावया लग्नविचार ॥ याच्या करावी देशोदेशीं ॥ ३४ ॥ क्लेशें मेळवावें धन ॥ तें वेंचितां जाय प्राण ॥ तथापि वेंचोन केलें लग्न ॥ मग तिचें गांजणें सोसावें ॥ ३५ ॥ न सोशितां ना अन्य गति ॥ तों अवचितां कन्यापुत्र मरती ॥ त्यांचे क्लेश सुभद्रापति ॥ मग काय वानावे ॥ ३६ ॥ त्यांचा करूं जातां शोक ॥ स्त्रीतें मरण आलें देख ॥ तिचें पोटीं धरितां दुःख ॥ कैचें घर तयासी ॥ ३७ ॥ तों अकस्मात भंग[5] झाला घरा ॥ ह्मणे हाही मोडला पसारा ॥ करितां शोक बापुडा खरा ॥ मरण पावे तांतडी ॥ ३८ ॥ मग दुजे जन्मीं जाणा ॥ दुजी करावी कीं अंगनां[6] ॥ अपार मेळवोनि धना ॥ तिचिया छंदें वर्तावें ॥ ३९ ॥ तेथेंही झाले कुमर ॥ त्यांसी वाढला मत्सर ॥ त्या दोघांची करकर ॥ वृद्धापकाळीं सोसावी ॥ ४० ॥ त्या पुत्रांच्या स्त्रिया कर्कशा ॥ त्यांणीं करावी दुर्दशा ॥ लौकिकामाजी तमाशा ॥ नित्य कलह माजवावा ॥ ४१ ॥ ऐसिया दुःखसंसारीं ॥ सुख नसे कीं तिळभरी ॥ अजगराचे अंगावरी ॥ कैसी येईल सुखनिद्रा ॥ ४२ ॥ काळसर्पाचे मुखीं ॥ हात घालितां कोण सुखी ॥ अथवा दंशितां कोटि वृश्चिकीं ॥ काय प्राणी सुखावेल ॥ ४३ ॥ उदर न भरे दुर्धर ॥ त्यानिमित्त हा वेव्हार ॥ तेथें कैंचा आत्मविचार ॥ सारासार पाहावया ॥ ४४ ॥ ऐसा जाणोनि निर्धार ॥ म्यां संपादिला नसे गृहाचार ॥ जळो जळो तो विचार ॥ तृष्णासागर अति वाढे ॥ ४५ ॥ माझी स्त्री हें माझें क्षेत्र ॥ माझें घर माझे पुत्र ॥ बंधु लेंकी दौहित्रें ॥ पशु जन हेही माझे ॥ ४६ ॥ हा काय अविद्याभास ॥ कोण देईल कन्या यास ॥ पुत्र पौत्र कैं होतील त्यास ॥ विवाह कैसा होईल पैं ॥ ४७ ॥ सदा करीत गृहचिंता ॥ मनीं नाठवी भगवंता ॥ मोहापायाची तों वार्ता ॥ नसे स्वप्नीं तयाचे ॥ ४८ ॥ ऐसा करोनि विचार ॥ न केली स्त्री आणि घर ॥ देह तो क्षणभंगुर ॥ याचा काय भरंवसा ॥ ४९ ॥ जळीं उठती

---

१ वारुळें. २ सर्प. ३ तापट स्वभावाची. ४ भिक्षा. ५ नाश. ६ स्त्री. ७ विंचवांनीं. ८ शेत. ९ मुलीचा मुलगा.

बुद्बुद[१] ॥ कीं चपळा झळके विशद ॥ जैळजपत्रीं[२] जलवृंद ॥ तैसें जाण अनित्य हें ॥ ५० ॥ ऐकोनियां मुनिवचन ॥ बोले त्यासी अर्जुन ॥ तुह्मांस वटपत्र धरोन ॥ दिवस झाले कितीक ॥ ५१ ॥ मुनि बोले तेव्हां वचन ॥ गेलें आयुष्य न गणवे जाण ॥ परी सांगतों अनुमान ॥ तेंचि ऐकें पंडुपुत्रा ॥ ५२ ॥ मार्कंडेयासारिखे ऋषी ॥ अनंत झाले परियेसीं ॥ लोमशादिक तापसी ॥ अपार झाले कित्येक ॥ ५३ ॥ ऐसें माझें आयुष्य जाण ॥ ह्मणोनि न करीं सदन ॥ काय सेवावें जन्ममरण ॥ तुमचे परी अर्जुना ॥५४॥ जेव्हां ब्रह्याचा अंतकाळ ॥ तेव्हां जलमय होतें चराचर ॥ तेव्हां वटवृक्ष विशाळ ॥ शाखापल्लवीं उद्भवे ॥ ५५ ॥ त्याचे पत्रावरी बाळक वसे ॥ तें क्षणें रडे आक्रोशें ॥ पादांगुळी मुखीं घालीतसे ॥ बाळलीलेंकरूनियां ॥ ५६ ॥ सुनासिक सुवदन ॥ सुस्मित आकर्ण नयन ॥ त्याचें होतां मज दर्शन ॥ मग मी सागरीं बुडी देतों ॥ ५७ ॥ तें बाळदर्शेंत अज्ञान ॥ विसरलें आत्मस्मरण ॥ तें न देखवे माझेन ॥ मग मी बुडी देतसें ॥ ५८ ॥ तुह्मी स्वदेश सोडोनि दूर ॥ येथें कां पातलेत समग्र ॥ हें तों असे जळ अपार ॥ पुढें कैसे तराल कीं ॥ ५९ ॥ हा कृष्ण वटपत्रीं जाण ॥ निजला तेव्हां झालें याचें दर्शन ॥ त्यावरी झालें पुनरागमन ॥ परी यासीं कांहीं न मागें मी ॥ ६० ॥ कृष्ण हा झाला तरुण ॥ लक्ष्मीवंत झाला पूर्ण ॥ आतां तुज काय मागूं दान ॥ धर्मद-र्शन करवीं मातें ॥ ६१ ॥ पुढें येईं रे जनार्दना ॥ मज देईं क्षेमालिंगना ॥ प्रेमें करवीं धर्मदर्शना ॥ हें काय मना योजिलेंसी ॥ ६२ ॥ ऐसें बोलोनि मुनि वचन ॥ भावें आलिंगिले कृष्णार्जुन ॥ तैसेचि ते चारीजण ॥ आलिंगिले मुनिवरें ॥ ६३ ॥ कृष्णा तुझें झालिया दर्शन ॥ मज नलगे स्त्री पुत्र धन ॥ परी काळ क्रमावयालागून ॥ वटपत्र शिरीं धरियेलें ॥ ६४ ॥ तुझे देखतां चरण ॥ सर्व मी पावलों स्त्री धन ॥ ऐसें ऐकतां वचन ॥ मग कृष्णें स्तवन मांडिलें ॥ ६५ ॥ कृष्ण ह्मणे मुनिवरास ॥ तूं साक्षात् पुराणपुरुष ॥ विंशतिसंख्या[४] मुखें ब्रह्यास ॥ तुवां देखिलें स्वामिया ॥ ६६ ॥ तूं आमचा सर्वोत्तम ॥ तूं आह्मांसी पूज्य उत्तम ॥ तव प्रसादेंकरूनि धर्म- ॥ याग सफळ हो स्वामी ॥ ६७ ॥ ऐकोनि बोले मुनिवर ॥ तुवां माझ्या ठायीं गर्वभार ॥ ठेविला परी हरि मी किंकर[५] ॥ न धरींच कीं गर्वातें ॥६८॥ पूर्वी मज ब्रह्यासीं ॥ बहुत झाली गर्वराशी ॥ ती तोडिली म्यां निःशेषीं ॥ तें कृष्णा तूतें ठाउकें कीं ॥ ६९ ॥ पार्था तुज तें नसे ठावें ॥ तरी ऐक रे स्वभावें ॥ चित्त देइंजे बरवें ॥ कथानक प्राचीन असे ॥ ७० ॥ ब्रह्मकल्पीं राहतों ह्मणोन ॥ मज झाला अभिमान ॥ तें चौविसा वर्षांचा चतुराननं[६] ॥ मजसी येऊन बोलिला ॥ ७१ ॥ राजहंसा-रूढ पूर्ण ॥ मज बोले कां करिसी अनुष्ठान ॥ मी ब्रह्मा तुज झालों प्रसन्न ॥ वर माग रे ये काळीं ॥ ७२ ॥ हस्तीं पुस्तक धरून ॥ मुखें करीत वेदपठण ॥ गर्वभार धरून ॥ मजलागीं बोलत ॥ ७३ ॥ ऐसें ऐकतां त्याचें वचन ॥ मीहि बोलिलों गर्व धरून ॥ तुझें

---

१ बुडबुडे. २ वीज. ३ कमळाच्या पानांत. ४ वीस. ५ सेवक. ६ ब्रह्मदेव.

येथें काय प्रयोजन ॥ येथोनि जाईं दुरात्मया ॥ ७४ ॥ तुजसारिखे चतुरानन ॥ म्या अनंत देखिले जाण ॥ तुवां प्रसन्न होऊन ॥ काय देणें मजलागीं ॥ ७५ ॥ ऐसें बोलतां गर्वोत्तर ॥ तों सुटला अद्भुत समीर[1] ॥ पृथ्वीपासोनि अंबर[2] ॥ व्यापोनियां चालिला ॥ ७६ ॥ भंग केला सकळ द्रुमांस[3] ॥ व्यापिलें पृथ्वी आकाश ॥ तेणें उडविलें जी दोघांस ॥ अन्य ब्रह्मांडामाझारीं ॥ ७७ ॥ जेवीं फोडोनि औदुंबरफळास ॥ मक्षिका त्यांत करिती प्रवेश ॥ तेवीं नेलें आह्मां दोघांस ॥ गर्वमोचन करावया ॥ ७८ ॥ तेवीं देव महातरुवर ॥ ब्रह्मांडफळें फळला थोर ॥ त्यामाजी प्रवेशलों साचार ॥ एका फळीं दोघेही ॥ ७९ ॥ पाहातां तें असे सुंदर ॥ त्यामाजी देखिलें चराचर ॥ आश्चर्य वाटलें थोर ॥ अभिनव रचना देखोनि ॥ ८० ॥ तेथें ब्रह्मा अष्टवदन[4] ॥ तो आह्मां पाचारी पूर्ण ॥ तुह्मीं कोठील बाळक सान ॥ काय कारण यावया ॥ ८१ ॥ त्यांसी बोले चतुरानन ॥ मी सत्यलोकवासी जाण ॥ मी ब्रह्मा विष्णुनंदन ॥ हा शिष्य माझा जाणिजे ॥ ८२ ॥ याचें बकदाल्भ्य अभिधान ॥ ऐसें ऐकतां अष्टवदन ॥ गर्वाचळारूढ होऊन ॥ काय वचन बोलिला ॥ ८३ ॥ मोठ्या शब्देंकरूनि हास्य ॥ काय बोलिला आह्मांस ॥ मी न जाणें गुरुशिष्यांस ॥ प्रतिष्ठा बोलतां मजपुढें ॥ ८४ ॥ तोंवरीच खद्योत[5] बळी ॥ जों उदेला नाहीं अंशुमाळी[6] ॥ तो उदेलिया प्रातःकाळीं ॥ एकही न दिसे शोधितां ॥ ८५ ॥ तुह्मी माझे शिष्य होऊन ॥ दोघे करा रे सेवन ॥ शौचार्थ मृत्तिका जीवन ॥ शिष्यपणें आणा रे ॥ ८६ ॥ ऐसें बोलतां उत्तर ॥ पुनः वात सुटला घोर ॥ तिघांसहि उडविलें सत्वर ॥ नभमंडळामाझारीं ॥ ८७ ॥ भ्रमत भ्रमत तिघेजण ॥ तिघे पावलों ब्रह्मसदन ॥ तेथील लोक संपूर्ण ॥ हांसती देखोनि आह्मांतें ॥ ८८ ॥ तुह्मी कृमी कोठील कोण ॥ हें सांगा रे अभिधान ॥ ऐकोनियां अष्टवदन ॥ बोलतसे तयांसी ॥ ८९ ॥ माझें विरंचि अभिधान ॥ आलों ब्रह्मलोकापासून ॥ ऐसें ऐकतां वचन ॥ आह्मां दाविती मूर्ख ह्मणती ॥ ९० ॥ आमचा ब्रह्मा षोडशवदन[7] ॥ तो ऐकतां हें वर्तमान ॥ तुह्मां करील ताडन ॥ विरंचि अभिधान न बोलावें ॥ ९१ ॥ तुह्मीं धरोनियां मौन ॥ ऐकावें तयाचें वचन ॥ ऐकोनि ऐसें संभाषण ॥ भय आह्मी पावलों ॥ ९२ ॥ तों आह्मां दाविला षोडशवदन ॥ तो देखतांचि झाला हास्यवदन ॥ ह्मणे हे जीव आले कोठून ॥ काय अभिधान ह्मणविती ॥ ९३ ॥ मी ब्रह्मा षोडशवदन ॥ तुमचें काय रे ब्रह्माभिधान ॥ तों पुनः वातें उडवोन ॥ चौघांसी नेलें तेधवां ॥ ९४ ॥ जेथें गर्व अभिधान ॥ तेथें सर्वदा भ्रमण ॥ न चुके त्याचें जन्ममरण ॥ केलिया जाण निजयुक्ती ॥ ९५ ॥ अधोवदन ऊर्ध्वचरण ॥ अंबरीं[8] भ्रमलों चौघेजण ॥ फिरतां फिरतां अन्य ॥ ब्रह्मलोक पावलों ॥ ९६ ॥ अद्भुत रचना त्या लोकींची ॥ बत्तीस वदनांचा तेथें विरंची ॥ तेथील लोक तों आमुची ॥ नामगोष्टीच न काढिती ॥ ९७ ॥ मग आह्मां चौघां देखोन ॥ करुणावंत तो द्वात्रिंशवदन ॥ आह्मां समीप पाचारून ॥ काय वचन

१ वायु. २ आकाश. ३ झाडांना. ४ आठ तोंडांचा ब्रह्मा. ५ काजवा. ६ सूर्य. ७ सोळा तोंडाचा ब्रह्मा. ८ आकाशांत.

बोलिला ॥ ९८ ॥ गर्वारूढ बोले उत्तर ॥ मी ब्रह्मा अत्यंत थोर ॥ मी हें पाळितों चराचर ॥ मजहूनि दुजा नसे ॥ ९९ ॥ ऐसें बोलतां तये वेळीं ॥ तों वारा सुटला महाबळी ॥ तेणें उडविलें तये वेळीं ॥ तृणकाडी जयापरी ॥१००॥ तेणें उडविलें पाचजणां ॥ भ्रमतचि चालिलों गगना ॥ तों पावलों ब्रह्मसदना ॥ तो चौसष्टी मुखांचा विरंची ॥ १ ॥ तेणेंही करितां गर्व दारुण ॥ मग साही उडालों तेथून ॥ तेथें शतांष्टविंशति मुखांचा देखोन ॥ परम लज्जा पावलों ॥ २ ॥ तेथोनि उडतां जाण ॥ त्याच्या द्विगुण देखिला पूर्ण ॥ ऐसा सहस्रमुखांचा देखोन ॥ तेणें मन निवालें ॥ ३ ॥ ज्यातें गर्व नाहीं तिलप्रमाण ॥ आह्मां नेलें पाचारून ॥ मंजुळ बोलिला वचन ॥ आह्मां सर्वांलागोनि ॥ ४ ॥ कोठोनि तुमचें आगमन ॥ सर्व तुह्मी मजसमान ॥ तुमचे कृपेंकरून ॥ येथें असों सुखरूप ॥ ५ ॥ तेणें केली आमची पूजा ॥ ऐसा तो सर्वेश्वर महाराजा ॥ मग आह्मीं प्रार्थिलें वोजा ॥ स्वस्थानीं आह्मां पाववावें ॥ ६ ॥ तो बोले गुणखाणी ॥ नेत्र झांका रे ये क्षणीं ॥ तों अकस्मात स्वस्थानीं ॥ आलों वेगें धनुर्धरा ॥ ७ ॥ अल्प विद्या अल्प धन ॥ यासी असे दुरभिमान ॥ ऐसा जो सर्व गुणीं संपन्न ॥ त्यासी अभिमान पैं नाहीं ॥ ८ ॥ अल्पोदककुंभभरित ॥ उचंबळोनि होय रिक्त ॥ सर्व गुणें जो भरित ॥ तो निःशब्द निरभिमानी ॥ ९ ॥ ह्मणोनि सोडिला अभिमान ॥ अंबुनिधींत केलें संस्थान ॥ देखतां श्रीकृष्णचरण ॥ अंतर्बाह्य निवालों ॥ ११० ॥ ऐसें बोलतां ऋषिभूषण ॥ तों अवचितां आले श्यामकर्ण ॥ सैन्याकडे गेले धांवोन ॥ देखोनि सर्व आनंदले ॥ ११ ॥ मग दिव्य शिंबिका आणोन ॥ त्यामाजी बैसविला ऋषिभूषण ॥ सर्वही चालिले तेथोन ॥ परमानंदेंकरूनि ॥ १२ ॥ मुनि ह्मणे नृपनाथा ॥ गर्व न धरावा तत्वतां ॥ गर्व केलिया आत्मघाता ॥ प्राणी जाण पावेल ॥ १३ ॥ ह्मणोनि जो पाळी गर्वश्वान ॥ तो जाणावा श्वपचासमान ॥ त्यासी न पाहे नारायण ॥ परम अपवित्र ह्मणोनियां ॥ १४ ॥ यालागीं अभिमाना त्यजावें ॥ भावें सज्जनांतें सेवावें ॥ सप्रेम हरीसी भजावें ॥ परमानंदेंकरोनि ॥ १५ ॥ आतां येथोनि श्यामकर्ण ॥ जयद्रथपुरा करितील गमन ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ सावधान परिसावें ॥ १६ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ११७ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके बकदाल्भ्याख्यानं नाम एकोननवतितमोऽध्यायः ॥ ८९ ॥ ॥ अध्याय ॥ ८९ ॥ ॥ ओव्या ॥ ११७ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

---

१ गवत. २ एकशें अठ्ठावीस. ३ दोनशें छपन्न मुखांचा. ४ अर्जुना. ५ रिकामा. ६ समुद्रांत. ७ पालखी. ८ गर्वरूपी कुत्रा. ९ चांडाळासारखा.



अध्याय ९०.
जयद्रथाचे दोन्ही पुत्र मरून पडले आहेत
दोन्ही श्यामकर्ण.
दुःशीला
श्रीकृष्ण
अर्जुन
दुःशीला
दोन पुत्र.
श्रीकृष्ण
अर्जुन.
राजे.
सैन्य.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ व्यासचरणारविंदमकरंद ॥ सेवित जो अति चतुर मिलिंद ॥ तो जैमिनि जनमेजयाप्रति स्वानंद ॥ काय बोलिला तें ऐका ॥ १ ॥ चक्रव्यूहभेदात्मजपुत्रा ॥ ऐक राजया पवित्रा ॥ तुझिया अवधानें मम वक्त्रा ॥ परम पवित्रता ती आली ॥ २ ॥ दोनी छिद्रें दिसती समान ॥ परी दोघाचा भिन्न भिन्न गुण ॥ अभिषेकपात्र सोडी जीवन ॥ घटिका जीवन घेई आंत ॥ ३ ॥ तूं तैसा मिळालासी श्रोता ॥ तुझिया सादरतेनें उल्हास चित्ता ॥ नवरसयुक्त हरिकथा ॥ सांगावया आनंद ॥ ४ ॥ श्रोता मिळतां मतिमंद ॥ वाग्वल्लीचा उपडे कंद ॥ कैंचा तयासी श्रवणानंद ॥ जरी वक्ता झाला व्यासदेव ॥ ५ ॥ प्रळयकाळींचा जलधर ॥ बळें वर्षतसे अपार ॥ परी पालथे घटामाजी नीर ॥ बिंदुमात्र नसेचि ॥६॥ षोडश वर्षांची तरुणी ॥ रंभेऐसी शृंगारूनि ॥ ती दिधली नपुंसकालागूनि ॥ तरी काय सार्थक तियेचें ॥७॥ कोकिळेहूनि मधुर स्वर ॥ ऐसे गाती किन्नर ॥ त्यांशी ऐकणार बधिर ॥ तरी काय सार्थक तयांचें ॥८॥ तेजें लपववी गभस्ति ॥ कोटिमदनलावण्याकृति ॥ ती जन्मांधापुढें ठेविली युवती ॥ तरी काय सार्थक तियेचें ॥ ९ ॥ आतां असो हा अनुवादा ॥ जना भासोनि येईल निंदा ॥ जोडा नाहीं माझिया आनंदा ॥ तूं धन्य श्रोता मिळालासी ॥१०॥ मग तो पार्थाचा प्रपौत्र ॥ मुनीप्रति बोले उत्तर ॥ ऐसा शब्दरत्नाकर ॥ मज अयोग्या समर्पिला ॥११॥ ऐसें शब्दरत्नभूषण ॥ मज कुरूपाशीं लेववोन ॥ अधिकार नसतां जाण ॥ केवीं शोभा पावेन मी ॥१२॥ कुरूप बाळ देखोनि ॥ प्रीति न पाविजे जननी ॥ जरी माता त्याचे अवगुण आठवील मनीं ॥ तरी तें कैसें वांचेल ॥१३॥ अति उदार असे बलाहक ॥ ज्यातें इच्छिती सकळ लोक ॥ तुच्छ मानील जरी चातक ॥ तरी वांचणें केवीं घडे ॥१४॥ पाहातां तो अमृतकर ॥ जो क्षीराब्धीचा पुत्र ॥ तो जरी तृप्त न करी चकोर ॥ तरी तेणें कैसें वांचावें ॥१५॥ तेवीं मी दीन मंद अपवित्र ॥ परी मातें केलें स्नेहपात्र ॥ ह्मणोनि शब्दरत्नें सर्व गात्र ॥ अनाथ जाणोनि गौरविलें ॥१६॥ ऐसा कैंचा मिळे वक्ता ॥ वचनें हरी संसारव्यथा ॥ तेथें मी अभाग्य श्रोता ॥ सर्व पुण्यें करितां श्रवण ॥१७॥ मी तुह्मांसी अनन्य शरण ॥ जीवें करितों ओंवाळण ॥ श्रीहरिकथारसपान ॥ करवा मजलागूनि ॥१८॥ जैमिनि ह्मणे परीक्षितिपुत्रा ॥ श्यामकर्ण गेले जयद्रथाचे नगरा ॥ त्याचे पुत्रीं दूतद्वारा ॥ वार्ता ऐकिली पार्थाची ॥१९॥ आत्मजनकांतक अर्जुन ॥ आला ऐसें ऐकतां वचन ॥ ते होवोनि कंपायमान ॥ धाकें प्राण सोडूं पाहाती ॥ २० ॥ ऐकतां मृगपतीची आरोळी ॥ धाकें कांपे कुंजरावळी ॥ नातरी सर्पदर्शनें मूषकमंडळी ॥ पडे अवनीं निस्तेज ॥२१॥ ऐसे त्याचे दोघे सुत ॥ ते पडिले निचेष्टित ॥ दुःशीला आली धांवत ॥ तंव तेथें कृष्णनाथ देखिला ॥२२॥ ती जयद्रथाची वनिता ॥ त्राहें त्राहें ह्मणे अनंता ॥ अर्जुनें मारिला माझा भर्ता ॥ आतां सुत ते निमाले ॥२३॥ तरी मी तुज आलें शरण ॥ ह्मणोनि करी साष्टांग नमन ॥ मग अर्जुन तयेसी उठवून ॥ करी वंदन आदरें ॥२४॥ तयेसी बोलों आदरिलें ॥ म्यां तव पुत्रांसी काय केलें ॥ तेहीं भयें प्राण सोडिले ॥ माझा अपराध काय त्यांत ॥२५॥ मार्तंडउदय झालिया जाण ॥ सहज अंधकार

जाय पळोन ॥ तरी अपराधी कवण ॥ मजलागीं हें सांगावें ॥२६॥ सभेमाजी येतां व्युत्पन्न ॥ तरी मूर्खमुखीं पडे सहज मौन ॥ तें काय पंडितासी दूषण ॥ तेवीं न्याय हा झाला ॥२७॥ मजपासोनि अन्याय घडला ॥ तरी अपराध पाहिजे क्षमा केला ॥ रथाश्व गज देतों तुजला ॥ घे तूं भगिनी लक्षसंख्या ॥२८॥ तुझे वैरियां जिंकोन ॥ राज्य तुझें तुज देईन ॥ ऐसें ऐकतां अर्जुनवचन ॥ अत्यंत रुदन ती करी ॥२९॥ मग कृष्णासी केला नमस्कार ॥ तयासी बोले क्लेशोत्तर ॥ तूं क्लेश होतां रमावर ॥ राहिलासी हृदयीं सर्वांच्या ॥३०॥ द्रौपदीनें करितां स्मरण ॥ तिचें केलें दुःखहरण ॥ तैसेचि जाण सर्व जन ॥ स्मरतां पावसी तयांतें ॥३१॥ तो आजि देखिला पुरुषोत्तम ॥ कृतार्थ झाला माझा जन्म ॥ तरी पुरवीं माझा काम ॥ ऐकें वचन एवढें ॥३२॥ देवा पतिहीन मी झालें पूर्ण ॥ आतां पुत्रही गेले मरोन ॥ मज भगिनी ह्मणे अर्जुन ॥ तरी नेई कां यज्ञासी ॥३३॥ पति पुत्र झाले शांत ॥ उंचावले दुःखपर्वत ॥ हा बंधु निष्कपटार्थ ॥ न्यावयासी लज्जा पावतो कीं ॥३४॥ मज गजाश्वांचें नाहीं प्रयोजन ॥ ह्मणोनि कृष्णाचे धरिले चरण ॥ नेत्रोदकें क्षालन ॥ करिती झाली तेधवां ॥३५॥ ऐसें दुःख देखोन ॥ मनीं द्रवला तो नारायण ॥ तिचें केलें समाधान ॥ मायाजाळें पीडिली ती ॥३६॥ उठवोनि पार्थभगिनी ॥ तिचे गृहा चालिला मोक्षदानी ॥ पार्थासहित ते क्षणीं ॥ जाती त्वरें तेधवां ॥३७॥ सत्वर पावला सभास्थान ॥ मृत देखिले तिचे नंदन ॥ तयांसी उठवी हस्त स्पर्शोन ॥ ह्मणे कां रे तुह्मी निजेलां ॥३८॥ अमृतहस्त लावितां देव ॥ तात्काळ झाले ते सजीव ॥ दोघे उभे ठाकले केशव ॥ स्तुति करोनि वंदिला ॥३९॥ तैसाचि नमिला मातुळ ॥ पार्था संतोष झाला ते वेळ ॥ मांडीवरी दोघे बाळ ॥ भगिनीचे बैसविले ॥४०॥ कृष्णें सजीव केलें त्यांतें ॥ ऐकोनि आश्चर्य नव्हे संतांतें ॥ भ्रूसंकेतमात्रें या विश्वातें ॥ सृजोनि पाळी संसारीं ॥४१॥ तें देखोनि कृष्णमहिमान ॥ सर्वीं वंदिला भगवान ॥ नाना वाद्यें गजर पूर्ण ॥ परम उत्साह मांडिला ॥४२॥ मग दुःशीलेप्रति वचन ॥ काय बोले श्वेतवाहन ॥ संवत्सर झालिया पूर्ण ॥ आह्मी जाऊं नगरासी ॥४३॥ तुज आतां दिधलें आमंत्रण ॥ तुवां गजपुरासी करावें गमन ॥ पुत्रांसहवर्तमान ॥ यज्ञोत्साह पाहावा ॥४४॥ ऐकोनियां पार्थबोली ॥ दुःशीला मनीं आनंदली ॥ मग गौरवें आदर करिती झाली ॥ कृष्णा आणि अर्जुना ॥४५॥ तुमचे प्रसादेंकरून ॥ प्राप्त झाले मज हे नंदन ॥ आतां पाहाणें धर्मनंदन ॥ जेणें घेतली यज्ञदीक्षा ॥४६॥ आमचे तुह्मी पांच बंधु ॥ समर्थ असतीं कृपासिंधु ॥ तुह्मांसी साह्य गोविंदु ॥ मग उणें काय मजलागीं ॥४७॥ असो तेथोनि निघाले कृष्णार्जुन ॥ पुढें सोडिले श्यामकर्ण ॥ सकळ रायांसहित जाण ॥ चालती ते आनंदें ॥४८॥ भगिनीसी अपार द्रव्य देऊन ॥ तेथें सैन्य ठेविलें रक्षण ॥ मग दुःशीला स्वपुत्रांतें घेऊन ॥ हस्तनापुरा ती गेली ॥४९॥ वर्ष झालें संपूर्ण ॥ आतां गजपुरा जातील श्यामकर्ण ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ सावधान ऐकावें ॥५०॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ५१ ॥ ॥ इति श्रीमहाभारते आश्वमेधिके जैमिनिकृते दुःशीलाकथाकथनं नाम नवतितमोऽध्यायः ॥ ९० ॥ ॥ अध्याय ॥ ९० ॥ ॥ ओव्या ॥ ५१ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे पारीक्षिता[1] ॥ पुण्यरूपें ऐकें कथा ॥ जी घेतां श्रवणपंथा ॥ भवरोगव्यथा परिहारी ॥ १ ॥
संवत्सरांत जाणोन ॥ देवकीपुत्र जगज्जीवन ॥ रम्यवती भ्रमता श्यामकर्ण ॥ स्वयें धरिले स्वलीळें ॥ २ ॥ मग पार्थाप्रति बोले
वचन ॥ सकळ राजे सवें घेऊन ॥ महद्भाग्यें पृथ्वीपलाटन ॥ करूनि आले हे अश्व ॥ ३ ॥ चिरकाळ धर्मनंदन ॥ नियमीं
बैसला संपूर्ण ॥ वर्षपर्यंत संरक्षण ॥ अश्वांचें करावया तुज पाठविलें ॥ ४ ॥ तरी आजि हे नृपगण ॥ सावकाश करोत धर्मदर्शन ॥
हस्तनापुरा जावोन ॥ पाहातील धर्मात्मा[5] ॥ ५ ॥ दोन्ही श्यामकर्ण पुढें करून ॥ नाना वाद्यें वाजवून ॥ नृत्यांगनांसहित जाण ॥
मृदंगादि मधुर ध्वनी ॥ ६ ॥ अनिरुद्ध प्रद्युम्न ॥ वृषकेतु बभ्रुवाहन ॥ नीलध्वज मयूरकेतन ॥ सात्यकी आणि कृतवर्मा ॥ ७ ॥
अनुशाल्व हंसध्वज ॥ यौवनाश्व चंद्रध्वज ॥ अन्य राजे समस्त सतेज ॥ सेनापति आदिकरूनि ॥ ८ ॥ मुकुट कुंडलें मुक्ताहार ॥
हस्तकंकणें मनोहर ॥ चरणीं बिरुदांचे तोडर ॥ कंठीं माळा पुष्पांच्या ॥ ९ ॥ छत्रचामरांची करावी शोभा ॥ नाना रत्नांची
तेजप्रभा ॥ देखतां लज्जा ये रतिवल्लभा[2] ॥ ऐसा सुवेष करावा ॥ १० ॥ रात्रीं करावें पुरप्रवेशन ॥ तैलदीप सुगंध लावून ॥ बंदि-
जन[3] करिती स्तवन ॥ नगरीं ऐसें प्रवेशावें ॥ ११ ॥ ध्यावया धर्मदर्शन ॥ मी एकला करितों गमन ॥ ऐसें बोलोनि यदुनंदन ॥
नागपुरा[4] चालिला ॥ १२ ॥ जेथें असे युधिष्ठिर ॥ सभोंवता ऋषींचा परिवार ॥ यागमंडपीं अनिवार ॥ शोभतसे स्वानंदें ॥ १३ ॥
देवकीआदि सर्व वनिता ॥ जेथें असती पतिव्रता ॥ जेथें मंगळकार्यसरिता ॥ वाहतसे प्रतिदिनीं ॥ १४ ॥ ऐसें प्रवेशोनि सदन ॥
कृष्णें घेतलें धर्मदर्शन ॥ सद्भावें धर्म उठोन ॥ प्रीतिवंदन तो करी ॥ १५ ॥ मग दोनी हस्त जोडून ॥ सन्मुख बैसला मधुसूदन ॥
ह्मणे सन्निध आला श्वेतवाहन ॥ सकळ रायांसहित ॥ १६ ॥ पुढें असती श्यामकर्ण ॥ मागें सकळ भूपगण ॥ सकळ पृथ्वी
जिंकोन ॥ पार्थवीर पातला ॥ १७ ॥ यौवनाश्व नीलध्वज ॥ महा बलाढ्य हंसध्वज ॥ त्याचा पुत्र तो वीरध्वज ॥ सुधन्वा नामें
विख्यात ॥ १८ ॥ बहु प्रयत्नें सुधन्वा ॥ पार्थें मारिला पार्थिवा ॥ तैसाच सुरथ धरणीधवा ॥ अत्यंत कुशळें मारिला ॥ १९ ॥ पार्थ
गेला जी मणिपुरा ॥ तेथें युद्ध झालें निजपुत्रा ॥ तेणें छेदिलें पार्थशिरा ॥ केला चुरा सकळांचा ॥ २० ॥ मग उलूपीनें आणविला
मणि ॥ तेणें उठविला पार्थतरणि ॥ सुतादि सकळ श्रेणी[6] ॥ उठविल्या वीरांच्या ॥ २१ ॥ सवें घेऊन बभ्रुवाहन ॥ पार्थ पावला
पुरप्रवेशन[7] ॥ तेथोनि मयूरकेतन ॥ त्याचें नगर दाविलें ॥ २२ ॥ ताम्रध्वजें युद्ध केलें ॥ तेणें सर्वांतें जिंकिलें ॥ मग नानापरी
मयूरध्वजा छळिलें ॥ शरीर कर्वतिलें तयाचें ॥ २३ ॥ तेणेंही मांडिला होता यज्ञ ॥ मग त्याचा घेतला श्यामकर्ण ॥ मयूरध्वजासी
घेऊन ॥ पुढें अश्व सोडिले ॥ २४ ॥ पुढें जातां वीर पार्थ ॥ तों प्राप्त झालें पुर सारस्वत ॥ वीरवर्म्यासीं युद्ध तेथ ॥ दारुण झालें

१ जनमेजया. २ मदनाला. ३ भाट. ४ हस्तनापुराला. ५ राजा (धर्मा). ६ समुदाय. ७ नगरांत गमन.

पार्थिवा ॥ २५ ॥ तयासी जिंकोनि सत्वर ॥ मग पार्थ पावला कुंतळापुर ॥ जो सकळ शूरांचा वर ॥ तो चंद्रहासही जिंकिला ॥ २६ ॥ तेथोनि अश्व सोडितां जाण ॥ गेले उत्तरसमुद्रालागून ॥ तेथें दुंदुभि दैत्य दारुण ॥ तीनशें मुखें तयासी ॥ २७ ॥ तीन सहस्र बाहू त्यासी ॥ तेणें मारिलें सर्वांसी ॥ मग म्यां कपटें तयासी ॥ यमलोकासी धाडिलें ॥ २८ ॥ त्याचे पुत्र दोघे सर्वे घेऊन ॥ सकळ संपदा हरून ॥ वाटे जातां वीररत्न ॥ सैन्यपाळ भेटला ॥ २९ ॥ तेथें शरण आले भानुकांत ॥ आणि राजा चंद्रकांत ॥ युद्ध झालें अद्भुत ॥ मग सैन्यपाळ शरण आला ॥ ३० ॥ पुढें सिंहध्वज दैत्य दारुण ॥ तेथें झालें समरांगण ॥ वृषकेतुनंदनें जावोन ॥ त्याचा प्राण घेतला ॥ ३१ ॥ तेथोनि शोणितपुरीं ॥ अश्व गेले झडकरी ॥ तेथें गौरव केला बाणासुरीं ॥ बहुत सुख दिधलें ॥ ३२ ॥ मग घेऊनि त्याचे नंदन ॥ पुढें केलें अश्वीं प्रयाण ॥ किष्किंधेसी जातां वानरगण ॥ उठावले सकळही ॥ ३३ ॥ सुग्रीवपुत्र द्विरदनामा ॥ तेणें केली युद्धाची सीमा ॥ मग हनुमंतें सख्यप्रेमा ॥ केला तेथें धर्मराया ॥ ३४ ॥ पुढें हेमाद्रीचे पाठारीं ॥ जालंदराचिये नगरीं ॥ चंद्रचूड दैत्याची चोरी ॥ न वर्णवे माझेनि ॥ ३५ ॥ राजा चंद्रचूड तो दारुण ॥ तेणें मारिलें सकळ सैन्य ॥ मग म्यां विप्रवेष धरून ॥ तयालागीं मारिलें ॥ ३६ ॥ तेथोनियां अश्व चालिले ॥ ते मैनाकें कानेंनीं धरिले ॥ युद्ध तुंबळ माजलें ॥ तया हेमाद्रिपुत्रासीं ॥ ३७ ॥ तेथें सीताशोकहरण[3] जावोन ॥ सख्य केलें उभयतांलागून ॥ तेथोनि उत्तरसमुद्रीं गमन ॥ अश्वीं केलें धर्मराया ॥ ३८ ॥ त्या समुद्रांत अश्व तरोन ॥ गेले राया न लगतां क्षण ॥ तेथें बकदाल्भ्य तपस्वी पूर्ण ॥ वटपत्रछाये बैसला ॥ ३९ ॥ तो अति समर्थ तपस्वी जाण ॥ त्याचें ध्यावया दर्शन ॥ पांच रथेंसीं केलें गमन ॥ धर्मात्मया ते स्थळीं ॥ ४० ॥ तया मुनीतें घेऊन ॥ आणि अपार आणिलें सैन्य ॥ सकळ संपदा पावोन ॥ पार्थ वीर पातला ॥ ४१ ॥ पृथ्वीचा तो लहान पसर ॥ परी तव प्रताप आगळा थोर ॥ न माय ह्मणोनि पाताळ ॥ तेणें सेविलें जावोनि ॥ ४२ ॥ यापरी सर्व कल्याण ॥ पावोनि आला अर्जुन ॥ आतां येईल धांवोन ॥ स्वामिचरण वंदावया ॥ ४३ ॥ मग भीमासी ह्मणे मधुसूदन ॥ ऊठ भीमा देईं आलिंगन ॥ मग प्रेमें वायुनंदन ॥ आलिंगित श्रीकृष्णा ॥ ४४ ॥ धर्मा मजवरी तुझी दया ॥ तैसीच करावी सर्व रायां ॥ ऐसें बोलतां ते समया ॥ धर्मराज बोलतसे ॥ ४५ ॥ ह्मणे कृष्णा सर्व करणें ॥ त्वांचि केलें हें मी जाणें ॥ मग नकुळ सहदेवांकारणें ॥ कृष्ण भेटे तेधवां ॥ ४६ ॥ कुंतीस देवोनि आलिंगन ॥ सकळ वंदी मातृगण ॥ सर्वांसी देवोनि आलिंगन ॥ हर्षित झाला कृष्ण तो ॥ ४७ ॥ द्रौपदी आणि सुभद्रा ॥ नमस्कारिती दयासमुद्रा ॥ नेत्रीं देखोनि यादवेंद्रा ॥ हर्षें झाल्या दोंदिल ॥ ४८ ॥ गांधारी आणि धृतराष्ट्र ॥ कृष्णप्राणप्रिय विदुर ॥ तयांसी पाहोनि दामोदर ॥ क्षेमालिंगनें तोषवी ॥ ४९ ॥ धर्म ह्मणे इंदिरापति ॥ सकळ-

१ राजा (धर्मा). २ अरण्यामध्यें. ३ मारुति. ४ श्रीकृष्ण. ५ भीमसेन.

गुणसरितापति ॥ तव प्रसादें सुभद्रापति ॥ विजयश्रीतें पावला ॥ ५० ॥ आह्मी काष्ठपुतळे निर्धारीं ॥ तूं सर्वांचा सूत्रधारी ॥ लाघवें नाचविशी परोपरी ॥ तैसेचि आह्मी नाचतों ॥ ५१ ॥ कृष्ण ह्मणे कुरुकुळदीपा ॥ शांतिसुखमय धर्मरूपा ॥ मज शक्तिदायक तव कृपा ॥ येथें संदेह असेना ॥ ५२ ॥ तव योगें माझी ख्याति ॥ झाली ऐसें सकळ जाणती ॥ तुझा मी ह्मणोनि मानती ॥ नाहीं तरी मातें कोण पुसे ॥ ५३ ॥ मग भीमासी करीं धरून ॥ कृष्णें केलें गृहप्रवेशन ॥ तों सकळां झालें श्रवण ॥ देव आले ह्मणोनि ॥ ५४ ॥ रुक्मिणी आणि सत्यभामा ॥ लक्ष्मणा जांबवती उत्तमा ॥ सर्वा वंदिती पुरुषोत्तमा ॥ कृष्णदर्शनीं लालसा ॥ ५५ ॥ तंव सत्यभामा येवोन ॥ वल्लभाप्रति बोले वचन ॥ अर्जुनें पाळिला श्यामकर्ण ॥ तुह्मांसहित निजबळें ॥ ५६ ॥ ऐसे फिरतां देशांतरीं ॥ दुज्या मिळविल्या काय नारी ॥ जैसी प्रेमळा सुंदरी ॥ पार्थें वरिली वाटेंत ॥ ५७ ॥ ऐकोनि तयेचें वचन ॥ हास्यमुख मधुसूदन ॥ समीप होता भीमसेन ॥ तयालागीं बोलिला ॥ ५८ ॥ या सत्यभामेचें वचन ॥ तुझे मनासी आलें कीं पूर्ण ॥ नेत्रकटाक्ष लावून ॥ वक्र भाषण करितसे ॥ ५९ ॥ बहुपुत्री मी अनंत ॥ झालों असें किं निश्चित ॥ धर्मनगरीं राहतों येथ ॥ वृद्धें मिळालीं सर्व येथें ॥ ६० ॥ येथें माझी सर्व प्रतिष्ठा ॥ ती ही येवोनि करी चेष्टा ॥ बाळपणींच्या गोष्टी स्पष्टा ॥ इणें काय बोलाव्या ॥ ६१ ॥ जें बाळपणीं केलें कर्म ॥ तें वृद्धत्वीं काय उत्तम ॥ ऐसें जाणोनि माझें वर्म ॥ वारंवार काढिते ही ॥ ६२ ॥ तों तेथें आला युधिष्ठिर ॥ देखतां उठिला रमावर ॥ राजा कृष्णाप्रति बोले उत्तर ॥ यज्ञोत्साह करीं आतां ॥ ६३ ॥ मग बोले जगज्जीवन ॥ तुह्मी यज्ञमंडपीं घाला आसन ॥ आह्मी सर्व मिळोन ॥ यज्ञकार्य संपादूं ॥ ६४ ॥ मी धृतराष्ट्र विदुर ॥ समागमें ऋषीश्वर ॥ कुंतीआदि मातृपरिवार ॥ नर नारी सर्वही ॥ ६५ ॥ सकळ जनांतें घेऊन ॥ शीघ्र करितों मी गमन ॥ जेथें असे सुभद्रारमण ॥ भूपचक्रासमवेत ॥ ६६ ॥ कुंतीआदि सर्व माता ॥ रुक्मिणीआदि सर्व वनिता ॥ शीघ्र नेतों नृपनाथा ॥ मुनिवर पूजावया ॥ ६७ ॥ मग सवें घेतल्या कुमारी ॥ गजावरी बैसल्या हारी ॥ दूर्वाक्षता दिधल्या करीं ॥ पार्थावरी वर्षावया ॥ ६८ ॥ नगरामाजी त्या अनेका ॥ लोकीं उभविल्या ध्वज पताका ॥ चंदनोदकाच्या सिंचका ॥ मार्गधूळीतें शमविलें ॥ ६९ ॥ कुंती देवकी आणि रोहिणी ॥ रुक्मिणी आणि सर्व कामिनी ॥ प्रत्येक शोभती गजारोहणीं ॥ शिबिकेमाजी बैसल्या ॥ ७० ॥ पुढें वाजती मंगळतुरें ॥ वरी उडविती धवल चामरें ॥ पुढें मार्ग करिती वेत्रधार त्वरें ॥ अश्वावरी बैसोनियां ॥ ७१ ॥ नृत्य करिती नृत्यांगना ॥ हावभाव दाविती नाना ॥ नर्तनें रंजविती जगज्जीवना ॥ भाट बंदिजन गर्जती ॥ ७२ ॥ ऐशियापरी तो श्रीहरि ॥ जनांसमवेत निघाला बाहेरी ॥ अनेक वाद्यांचिया गजरीं ॥ नाद अंबरीं ऊठती ॥ ७३ ॥ मार्गें जातां होय दाटणी ॥ मुक्ताहार पडती तुटोनि ॥ गजाश्वपदीं ते

१ लांकडाचीं बाहुलीं. २ प्रीति. ३ धर्म. ४ अर्जुन. ५ पालखीमध्यें. ६ पांढरीं.

चूर्ण होऊनि ॥ करिती मेदिनी मुक्तामय ॥ ७४ ॥ केशर कस्तूरी कर्पूर चंदन ॥ हरिद्रा कुंकुम पुष्पें तैलपूर्ण ॥ संघट्टणें होय याचें पतन ॥ तेणें मार्ग अति सुगंध ॥ ७५ ॥ ऐसिया उत्साहें सकळ जन ॥ नगराबाहेर आले पूर्ण ॥ अर्ध चंद्राकार सेना रचोन ॥ मार्ग पाहाती पार्थाचा ॥ ७६ ॥ पुढें करोनियां ब्राह्मण ॥ सदीपपात्र मुनिवधूगण ॥ पुढें होतसे गणिकानर्तन ॥ दिव्य गायनासमवेत ॥ ७७ ॥ ऐसा करितां उत्साव ॥ उभा ठाकला देवराय ॥ विमानीं सुरसमुदाय ॥ कौतुक पाहातां निवाला ॥ ७८ ॥ पुढें सकळ जनांसीं अर्जुन ॥ करील नगरप्रवेशन ॥ तें पुढिले अध्यायीं कथन ॥ सावधान ऐकावें ॥ ७९ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ८० ॥ इति श्रीमन्महाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके श्रीकृष्णहस्तनापुरगमनधर्मादिसमागमपार्थसंमुखगमनादिवृत्तकथनं नाम एकनवतितमोऽध्यायः ॥ ९१ ॥ ॥ अध्याय ॥ ९१ ॥ ॥ ओव्या ॥ ८० ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥



अध्याय ९२.
अर्जुनादि सर्व सेनेसह धर्म दर्शनास जात आहेत.
बकदाल्भ्य ऋषि.
श्रीकृष्ण, भीम वगैरे ग्रामवासी आनंदानें सामोरे जातात.
६४ दंपती गंगोदक आणण्यास जातात.
नारद.
सत्यभामा.
कृ
श्यामकर्णास स्नान घालतात.
धर्मराज व द्रौपदी श्यामकर्णाची पूजा करितात.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे गा भारता ॥ आतां ऐकें तूं यज्ञकथा ॥ जी ऐकतां सकळ दुरिता ॥ सुटे पळ अनायासें ॥ १ ॥ सकळ भूपांसमवेत ॥ वेगें आला तेथें पार्थ ॥ जेथें होता कृष्णनाथ ॥ तेथें येवोनि थोकला ॥ २ ॥ सम्मुख देखतां गोपाळा ॥ पार्थ रथाखालीं उतरला ॥ चरणीं माथा ठेविला ॥ बद्धांजलि उभा पुढें राहे ॥ ३ ॥ अपार दाटलें पार्थसैन्य ॥ तें कृष्णसैन्यासी झालें लीन ॥ जेवीं नदीचे ओघ संपूर्ण ॥ समुद्रामाजी सांठवती ॥ ४ ॥ धर्मरायाचें वैभव ॥ सर्वांस दिसलें अभिनव ॥ सैन्यरूपें रमाधव ॥ जिकडे तिकडे व्यापला ॥ ५ ॥ नर नारी अश्व गज ॥ त्यांमाजी प्रवेशला अधोक्षज ॥ विशेष केले तेजःपुंज ॥ जे जिंकिती मदनातें ॥ ६ ॥ सर्वही व्यापिलें पद्मनाभें ॥ उणें आणिलें सूर्यप्रभे ॥ राजे तटस्थ राहोनि उभे ॥ धर्मसंपदा वानिती ॥ ७ ॥ ह्मणती धर्माऐसा नृपवर ॥ दुजा नाहीं कीं निर्धार ॥ त्रिभुवनामाजी याची संपदा थोर ॥ ब्रह्मांड भरोनि उरलीसे ॥ ८ ॥ पार्थापाठीं जावोनि ॥ सर्व पाहिली मेदिनी[३] ॥ परी हें सैन्य कोटि अक्षौहिणी ॥ कीं सहस्र कोटि नेणवे ॥ ९ ॥ नाना देशींचें वैभव ॥ देखता हर्षला होता जीव ॥ तें येथें देखोनि तुच्छ सर्व ॥ त्रिभुवन आह्मां वाटलें ॥ १० ॥ देखतां धर्माची संपदा ॥ पळोनि गेली कीं आपदा ॥ आपले संपत्तीची निंदा ॥ करूं लागले सर्वही ॥ ११ ॥ तोंवरीच थोर सरोवर ॥ जों देखिला नाहीं रत्नाकर[४] ॥ तो दृष्टीं पडतां साचार ॥ मग त्याविण थोर न वाटे ॥ १२ ॥ तोंवरीच स्वरूपाभिमान ॥ कुरूप वागवी संपूर्ण ॥ जों देखिला नसे दर्पण[५] ॥ देखिल्याविण तो न जाय ॥ १३ ॥ ऐरावतासमान कुंजर ॥ उच्चैःश्रव्यासमान हयवर ॥ रतिपतीस जिंकिती नारी नर ॥ येथें कोणी कुरूप दिसेना ॥ १४ ॥ सेनेचा तों न लागे पार ॥ सकळ संपत्तीचा सागर ॥ सकळ विद्याप्रवीण चतुर ॥ आधि व्याधि तों नसेचि ॥ १५ ॥ जेथें चांडाळादिरूप नारायण ॥ रूपें दिसती सुंदर पूर्ण ॥ त्या जनांचें वर्णन ॥ कोण पामर करील ॥ १६ ॥ पुढें उभे भीमादि वीर ॥ दिसती प्रतापतेजें दिनकर ॥ ज्यांचे पराक्रमें कांपे चराचर ॥ परी शीतळ करिती देखतां ॥ १७ ॥ अङ्घ्रायशीं सहस्र ऋषिवृंदें ॥ नांदती तेथें स्वानंदें ॥ आतां पाहों धर्मपादारविंदें[६] ॥ अंगुलिपत्रें जीं शोभलीं ॥ १८ ॥ होमधूम्रें गगन ॥ संपूर्ण झालें कृष्णवर्ण ॥ मंगळतुरांच्या ध्वनीनें जाण ॥ दाही दिशा कोंदल्या ॥ १९ ॥ सकळ धर्मरायाची सेना ॥ रत्नभूषणें भरलीं नाना ॥ जेथील दैवत साक्षात वैकुंठराणा ॥ तेथें अपूर्व काय हें ॥ २० ॥ सकळ नृप झाले पदाती ॥ हरिसम्मुख धांवती ॥ सकळांपुढें श्यामकर्ण चालती ॥ त्यांचे मागें बकदाल्भ्य ॥ २१ ॥ जे जे आले महाजन ॥ त्यांसी पार्थ देत क्षेमालिंगन ॥ धृतराष्ट्राचे चरण ॥ वंदोनि क्षेमें दीधलीं ॥ २२ ॥ कुंती आणि गांधारी ॥ देवकी रोहिणी सुंदरी ॥ त्यांतें पाहाती वीरकेसरी ॥ जे जे आले पृथ्वीश ॥ २३ ॥ भीम धृतराष्ट्र विदुर ॥ त्यांप्रति पार्थ बोले उत्तर ॥ पाहावे सर्व नृपवर ॥ आले दर्शना स्वामींच्या ॥ २४ ॥ हा चंद्रहास

१ पापाला. २ कृष्ण. ३ पृथ्वी. ४ समुद्र. ५ आरसा. ६ धर्मराजाचीं चरणकमलें.

विषयापति ॥ बाळपणापासोनि कृष्णभक्ति ॥ याची त्रिभुवनीं अद्भुत कीर्ति ॥ भक्तिवैराग्यसंपन्न ॥ २५ ॥ हा वीरवर्मा जी नृपति ॥ केवळ प्रतापाचा गभस्ति[1] ॥ खद्योतप्रायें[2] वीर दिसती ॥ युद्ध करितां यासीं सर्व ॥ २६ ॥ जो रिपुकुळकाननदावानळ[3] ॥ अद्भुत प्रतापरवि केवळ ॥ जेणें जिंकिला ब्रह्मांडगोळ ॥ तो हा वीर ताम्रकेतु ॥ २७ ॥ जाणोनि द्विजाचा निर्धार ॥ जेणें कर्वतिलें शरीर ॥ अगाध सत्वसागर ॥ तो हा मयूरध्वज वंदीतसे ॥ २८ ॥ ज्याचा प्रतापदिनकरकिरण[4] ॥ तेणें लोपले शत्रुगण ॥ सकळ सर्पकुळें जिंकोन ॥ संजीवकमणि आणिला ॥ २९ ॥ माझें शिर छेदिलें ॥ वृषकेतूसीही वधिलें ॥ पुनः आह्मां जीवविलें ॥ तो हा बभ्रुवाहन मम पुत्र ॥ ३० ॥ संग्रामीं बलाढ्य अद्भुत ॥ नामें सुधन्वा आणि सुरथ ॥ ज्यांहीं स्वशिरें कैलासनाथ ॥ रुंडमाळेनें शोभविला ॥ ३१ ॥ त्यांचा पिता हा हंसध्वज ॥ तेणें तोषविला गरुडध्वज ॥ प्रतापतेजें तेजःपुंज ॥ रिपुपंकदलनीं दिनमणि[5] ॥ ३२ ॥ ज्याचा प्रताप अद्भुत ॥ ज्याचा अग्नि जामात ॥ जेणें सैन्य जाळिलें समस्त ॥ तो हा नीलध्वज स्वामिया ॥ ३३ ॥ जेणें दिधला श्यामकर्ण ॥ तो हा यौवनाश्व करितो नमन ॥ जेणें सर्वांसी केलें तृण[6] ॥ तो हा अनुशाल्व वंदितो ॥ ३४ ॥ जेणें स्वप्रतापेंकरून ॥ युद्धीं तोषविले नृपगण ॥ तो हा वंदितो तुमचे चरण ॥ कर्णनंदन वृषकेतु ॥ ३५ ॥ हा सैन्यपाळ राजेंद्र ॥ पृथ्वीमाजी प्रतिइंद्र ॥ हे दुंदुभीचे कुमर ॥ वंदिताती तुह्मांतें ॥ ३६ ॥ चंद्रकांत भानुकांत ॥ पाहा राजे हे विख्यात ॥ एवं सर्वांचीं नामें घेवोनि पार्थ ॥ निवेदित वृद्धांलागीं ॥ ३७ ॥ क्षेमालिंगनें सुखी केले ॥ मग कुंतीचे पाय वंदिले ॥ तिणें नेत्रोदकें स्नान घातलें ॥ पार्थालागीं स्नेहभरें ॥ ३८ ॥ तंव तो कर्णनंदन ॥ धांवोनि कुंतीचे धरी चरण ॥ तिणें हृदयीं धरून ॥ मुख त्याचें चुंबिलें ॥ ३९ ॥ अंकावरी बैसविला ॥ तों बभ्रुवाहन धांवला ॥ त्यातेंही पोटासीं धरिला ॥ कुरवाळिला मुखचंद्र ॥ ४० ॥ ऐसीं झालीं सकळांचीं दर्शनें ॥ झालीं क्षेमालिंगनें ॥ परस्परें देवोनि वस्त्राभरणें ॥ नगरामाजी प्रवेशले ॥ ४१ ॥ त्यानंतर धर्मदर्शन ॥ करिती सकळ नृपगण ॥ यथायोग्य सन्मान ॥ धर्में दिधला सर्वांतें ॥ ४२ ॥ त्यानंतर धर्म दीक्षित ॥ संगें ऋषी घेवोनि समस्त ॥ यागक्षेत्र करावया यथोक्त ॥ द्रौपदीसहित चालिला ॥ ४३ ॥ सर्वें घेऊनि वृषभांसी ॥ घेवोनि औषधी बीजांसी ॥ पेरूं लागला दिव्य भूमीसी ॥ यज्ञसाधना उपयोग ॥ ४४ ॥ देवकी यशोदा आणि कुंती ॥ कर्पूरचंदनांतें शिंपिती ॥ मंत्रपठन विप्र करिती ॥ सपत्नीक होवोनियां ॥ ४५ ॥ ऐसें करूनि क्षेत्राकर्षण[6] ॥ मग केलें इष्टिकाचयन ॥ चतुर्वेदी व्यासादिक ब्राह्मण ॥ बकदाल्भ्य वसिष्ठ ॥ ४६ ॥ भूमिका साधिली समाकार ॥ त्यावरी मंडप केला सविस्तर ॥ अष्ट द्वारें अति सुंदर ॥ वेदोक्तमंत्रें तो केला ॥ ४७ ॥ लाविल्या पताकांच्या ओळी ॥ माजी अष्ट कुंडें तीं केलीं ॥ सूत्रेंकरूनि बांधिलीं ॥ यूप[7] रोंविले समंत्र ॥ ४८ ॥ खदिर वृक्षांचे शास्त्रसंख्याक ॥ पळसांचे ऋषिसंख्याक ॥

१ सूर्य. २ काजव्याप्रमाणें. ३ शत्रुकुलरूप अरण्यास अग्नि. ४ सामर्थ्यरूप सूर्याचा किरण. ५ गवत. ६ शेत नांगरणें. ७ यज्ञामध्यें ज्यांला यज्ञपशु बांधितात ते खांब.

ऐसियापरी सम्यक ॥ यज्ञक्रिया अवलंबिली ॥ ४९ ॥ तेथें केलें वेदिकात्रय ॥ शत शत स्रुकस्रुवांचा केला संचय ॥ यज्ञपात्रांचाही समुदाय ॥ यागमंडपीं स्थापिला ॥ ५० ॥ आचार्य केला वेदव्यास ॥ ब्रह्मत्व दिधलें बकदाल्भ्यास ॥ मग पाहोनि द्विजलक्षणांस ॥ ऋत्विज अपार पैं केले ॥ ५१ ॥ त्यां ऋत्विजांचीं नामें[1] ॥ तुह्मांसी सांगतों अनुक्रमें ॥ वसिष्ठ वामदेव गौतम ॥ अत्रि आणि पराशर ॥ ५२ ॥ जमदग्नि कहोळ भरद्वाज ॥ भागुरि रैभ्य सुमंत सुतेज ॥ कौंडिण्य जातूकर्ण्य सहज ॥ गालव लोमश सौभरी ॥ ५३ ॥ इत्यादिक ऋषिगण ॥ यांसी ऋत्विज केले पूर्ण ॥ द्वारीं करावया रक्षण ॥ केलें रक्षोहण मंत्रींचें ॥ ५४ ॥ त्या द्वारपाळांचें अभिधान ॥ सांगतों मी तुह्मांकारण ॥ विश्वामित्र धौम्य जाण ॥ पुलह आणि उपमन्यु ॥५५॥ मधुच्छंद वायुभक्ष ॥ विभांडक सुशिक्ष ॥ हे द्वारपाळ अति दक्ष ॥ जाणोनि धर्म संस्थापी ॥ ५६ ॥ दीक्षितपणें शोभायमान ॥ करीं केलें शृंग धारण ॥ ऐसिया धर्माप्रति वचन ॥ काय बोले वेदव्यास ॥ ५७ ॥ आतां चौसष्टी दांपत्यें ॥ गंगेसी पाठवावीं यथोक्तें ॥ त्यांचिया उदकें अश्वातें ॥ समंत्र स्नान करींका ॥ ५८ ॥ अनुसूयेसहित अत्रि वरिष्ठ ॥ अरुंधतीसहित वसिष्ठ ॥ रुक्मिणीसहित वैकुंठपीठ ॥ सुभद्रेसहित अर्जुन ॥ ५९ ॥ रतिसहित प्रद्युम्न ॥ उखेसहित अनिरुद्ध जाण ॥ सुकांतिसहित भीमसेन ॥ भद्रावतीसहित वृषकेतु ॥ ६० ॥ कुमुद्वतीसीं मयूरध्वज ॥ सुनंदेसीं तो नीलध्वज ॥ निर्मलेसहित हंसध्वज ॥ यौवनाश्व प्रभावतीसीं ॥ ६१ ॥ विषयेसहित चंद्रहास ॥ धम्मिलेसीं अनुशाल्व वीरेश ॥ इत्यादि चौसष्ट दांपत्यांस ॥ जाह्नवीजळास पाठवावें ॥ ६२ ॥ ऐसीं व्यासाज्ञेनें दापत्यें ॥ गंगेस चालिलीं त्वरितें ॥ वस्त्रपल्लवीं ग्रंथीतें ॥ बाधिताती तेधवा ॥ ६३ ॥ विप्र करिती वेदघोष ॥ कुमारी करिती लाजावर्षे[2] ॥ मुक्तें टाकिती सावकाश ॥ नृत्यागना नृत्य करिती ॥ ६४ ॥ कृष्णरुक्मिणींसी वस्त्रग्रंथि ॥ स्वकरें बांधी अरुंधती ॥ तों देवर्षि[3] पातला शीघ्रगती ॥ जो कां गुरु व्यासादिकां ॥ ६५ ॥ कलहप्रिय तो नारद ॥ करावयासी विनोद ॥ भामागृहा जावोनि प्रसिद्ध ॥ काय बोले तयेतें ॥ ६६ ॥ यज्ञीं मिळाले ऋषीश्वर ॥ सकळ मिळाले धरणीधर[4] ॥ तेथें रुक्मिणीरमावर ॥ हें दोघांचें दांपत्य शोभलें ॥ ६७ ॥ पुढें चालिला वैकुंठपीठ ॥ मागें रुक्मिणी जातसे स्पष्ट ॥ नेसोनियां कनकपट ॥ पल्लवीं ग्रंथी दीधल्या ॥ ६८ ॥ दोघांवरी धरिलें छत्र ॥ वरी चामरें वारिती विचित्र ॥ धूप जाळिती पवित्र ॥ नाना वाद्यें वाजती ॥ ६९ ॥ हा असा राजसन्मान ॥ रुक्मिणीसी देतो नारायण ॥ ती पट्टस्त्री[5] मुख्य जाण ॥ इतर त्या व्यर्थ सर्व ॥ ७० ॥ ती कामदेवाची जननी ॥ सकळ स्त्रियांमाजी शिरोमणि ॥ ह्मणोनियां चक्रपाणि ॥ यागीं तीतें सन्मानी ॥ ७१ ॥ जो सकळांमाजी दिधला मान ॥ तोचि जाणावा सन्मान ॥ एकांतीं दिधला मान ॥ तो तृणासमान मानावा ॥ ७२ ॥ ऐसा सन्मान देखोनि ॥ संशय आला माझे मनीं ॥ तो सांगावया तुजलागूनि ॥ वेगेंकरूनि

१ नांवें. २ लाह्यांचा वर्षाव. ३ नारद. ४ राजे. ५ पट्टराणी.

विषयापति ॥ बाळपणापासोनि कृष्णभक्ति ॥ याची त्रिभुवनीं अद्भुत कीर्ति ॥ भक्तिवैराग्यसंपन्न ॥२५॥ हा वीरवर्मा जी नृपति ॥ केवळ प्रतापाचा गभस्ति[1] ॥ खद्योतप्रायें[2] वीर दिसती ॥ युद्ध करितां यासीं सर्व ॥ २६ ॥ जो रिपुकुळकाननदावानळ[3] ॥ अद्भुत प्रतापरवि केवळ ॥ जेणें जिंकिला ब्रह्मांडगोळ ॥ तो हा वीर ताम्रकेतु ॥ २७ ॥ जाणोनि द्विजाचा निर्धार ॥ जेणें कर्वतिलें शरीर ॥ अगाध सत्वसागर ॥ तो हा मयूरध्वज वंदीतसे ॥ २८ ॥ ज्याचा प्रतापदिनकरकिरण[4] ॥ तेणें लोपले शत्रुगण ॥ सकळ सर्पकुळें जिंकोन ॥ संजीवकमणि आणिला ॥ २९ ॥ माझें शिर छेदिलें ॥ वृषकेतूसीही वधिलें ॥ पुनः आह्मां जीवविलें ॥ तो हा बभ्रुवाहन मम पुत्र ॥ ३० ॥ संग्रामीं बलाढ्य अद्भुत ॥ नामें सुधन्वा आणि सुरथ ॥ ज्यांहीं स्वशिरें कैलासनाथ ॥ रुंडमाळेनें शोभविला ॥ ३१ ॥ त्यांचा पिता हा हंसध्वज ॥ तेणें तोषविला गरुडध्वज ॥ प्रतापतेजें तेजःपुंज ॥ रिपुपंकदलनीं दिनमणि ॥ ३२ ॥ ज्याचा प्रताप अद्भुत ॥ ज्याचा अग्नि जामात ॥ जेणें सैन्य जाळिलें समस्त ॥ तो हा नीलध्वज स्वामिया ॥ ३३ ॥ जेणें दिधला श्यामकर्ण ॥ तो हा यौवनाश्व करितो नमन ॥ जेणें सर्वांसी केलें तृण[5] ॥ तो हा अनुशाल्व वंदितो ॥ ३४ ॥ जेणें स्वप्रतापें-करून ॥ युद्धीं तोषविले नृपगण ॥ तो हा वंदितो तुमचे चरण ॥ कर्णनंदन वृषकेतु ॥ ३५ ॥ हा सैन्यपाळ राजेंद्र ॥ पृथ्वीमाजी प्रतिइंद्र ॥ हे दुंदुभीचे कुमर ॥ वंदिताती तुह्मांतें ॥ ३६ ॥ चंद्रकांत भानुकांत ॥ पाहा राजे हे विख्यात ॥ एवं सर्वांचीं नामें घेवोनि पार्थ ॥ निवेदित वृद्धांलागीं ॥ ३७ ॥ क्षेमालिंगनें सुखी केले ॥ मग कुंतीचे पाय वंदिले ॥ तिणें नेत्रोदकें स्नान घातलें ॥ पार्था-लागीं स्नेहभरें ॥ ३८ ॥ तंव तो कर्णनंदन ॥ धांवोनि कुंतीचे धरी चरण ॥ तिणें हृदयीं धरून ॥ मुख त्याचें चुंबिलें ॥ ३९ ॥ अंकावरी बैसविला ॥ तों बभ्रुवाहन धांवला ॥ त्यातेंही पोटासीं धरिला ॥ कुरवाळिला मुखचंद्र ॥ ४० ॥ ऐसीं झालीं सकळांचीं दर्शनें ॥ झालीं क्षेमालिंगनें ॥ परस्परें देवोनि वस्त्राभरणें ॥ नगरामाजी प्रवेशले ॥ ४१ ॥ त्यानंतर धर्मदर्शन ॥ करिती सकळ नृप-गण ॥ यथायोग्य सन्मान ॥ धर्में दिधला सर्वांतें ॥ ४२ ॥ त्यानंतर धर्म दीक्षित ॥ संगें ऋषी घेवोनि समस्त ॥ यागक्षेत्र करावया यथोक्त ॥ द्रौपदीसहित चालिला ॥ ४३ ॥ सवें घेऊनि वृषभांसी ॥ घेवोनि औषधी बीजांसी ॥ पेरूं लागला दिव्य भूमीसी ॥ यज्ञसाधना उपयोग ॥ ४४ ॥ देवकी यशोदा आणि कुंती ॥ कर्पूरचंदनांतें शिंपिती ॥ मंत्रपठन विप्र करिती ॥ सपत्नीक होवोनियां ॥ ४५ ॥ ऐसें करूनि क्षेत्राकर्षण[6] ॥ मग केलें इष्टिकाचयन ॥ चतुर्वेदी व्यासादिक ब्राह्मण ॥ बकदाल्भ्य वसिष्ठ ॥ ४६ ॥ भूमिका साधिली समाकार ॥ त्यावरी मंडप केला सविस्तर ॥ अष्ट द्वारें अति सुंदर ॥ वेदोक्तमंत्रें तो केला ॥ ४७ ॥ लाविल्या पताकांच्या ओळी ॥ माजी अष्ट कुंडें तीं केलीं ॥ सूत्रेंकरूनि बांधिलीं ॥ यूप[7] रोंविले समंत्र ॥ ४८ ॥ खदिर वृक्षांचे शास्त्रसंख्याक ॥ पळसांचे ऋषिसंख्याक ॥

१ सूर्य. २ काजव्याप्रमाणें. ३ शत्रुकुलरूप अरण्यास अग्नि. ४ सामर्थ्यरूप सूर्याचा किरण. ५ गवत. ६ शेत नांगरणें. ७ यज्ञामध्यें ज्यांला यज्ञपशु बांधितात ते खांब.

ऐसियापरी सम्यक ॥ यज्ञक्रिया अवलंबिली ॥ ४९ ॥ तेथें केलें वेदिकात्रय ॥ शत शत स्रुक्स्रुवांचा केला संचय ॥ यज्ञपात्रांचाही समुदाय ॥ यागमंडपीं स्थापिला ॥ ५० ॥ आचार्य केला वेदव्यास ॥ ब्रह्मत्व दिधलें बकदाल्भ्यास ॥ मग पाहोनि द्विजलक्षणांस ॥ ऋत्विज अपार पैं केले ॥ ५१ ॥ त्यां ऋत्विजांचीं नामें ॥ तुह्मांसी सांगतों अनुक्रमें ॥ वसिष्ठ वामदेव गौतम ॥ अत्रि आणि पराशर ॥ ५२ ॥ जमदग्नि कहोळ भरद्वाज ॥ भागुरि रैभ्य सुमंत सुतेज ॥ कौंडिण्य जातूकर्ण्य सहज ॥ गालव लोमश सौभरी ॥ ५३ ॥ इत्यादिक ऋषिगण ॥ यांसी ऋत्विज केले पूर्ण ॥ द्वारीं करावया रक्षण ॥ केलें रक्षोहण मंत्रींचें ॥ ५४ ॥ त्या द्वारपाळांचें अभिधान ॥ सांगतों मी तुह्मांकारण ॥ विश्वामित्र धौम्य जाण ॥ पुलह आणि उपमन्यु ॥ ५५ ॥ मधुच्छंद वायुभक्ष ॥ विभांडक सुशिक्ष ॥ हे द्वारपाळ अति दक्ष ॥ जाणोनि धर्म संस्थापी ॥ ५६ ॥ दीक्षितपणें शोभायमान ॥ करीं केलें शृंगधारण ॥ ऐसिया धर्माप्रति वचन ॥ काय बोले वेदव्यास ॥ ५७ ॥ आतां चौसष्टी दांपत्यें ॥ गंगेसी पाठवावीं यथोक्तें ॥ त्यांचिया उदकें अश्वातें ॥ समंत्र स्नान करींका ॥ ५८ ॥ अनुसूयेसहित अत्रि वरिष्ठ ॥ अरुंधतीसहित वसिष्ठ ॥ रुक्मिणीसहित वैकुंठपीठ ॥ सुभद्रेसहित अर्जुन ॥ ५९ ॥ रतिसहित प्रद्युम्न ॥ उखेसहित अनिरुद्ध जाण ॥ सुकांतिसहित भीमसेन ॥ भद्रावतीसहित वृषकेतु ॥ ६० ॥ कुमुद्वतीसीं मयूरध्वज ॥ सुनंदेसीं तो नीलध्वज ॥ निर्मलेसहित हंसध्वज ॥ यौवनाश्व प्रभावतीसीं ॥ ६१ ॥ विषयेसहित चंद्रहास ॥ धम्मिलेसीं अनुशाल्व वीरेश ॥ इत्यादि चौसष्ट दांपत्यांस ॥ जाह्नवीजळास पाठवावें ॥ ६२ ॥ ऐसीं व्यासाज्ञेनें दांपत्यें ॥ गंगेस चालिलीं त्वरितें ॥ वस्त्रपल्लवीं ग्रंथींतें ॥ बांधिताती तेधवां ॥ ६३ ॥ विप्र करिती वेदघोष ॥ कुमारी करिती लाजावर्ष[2] ॥ मुक्तें टाकिती सावकाश ॥ नृत्यांगना नृत्य करिती ॥ ६४ ॥ कृष्णरुक्मिणींसी वस्त्रग्रंथि ॥ स्वकरें बांधी अरुंधती ॥ तों देवर्षि[3] पातला शीघ्रगती ॥ जो कां गुरु व्यासादिकां ॥ ६५ ॥ कलहप्रिय तो नारद ॥ करावयासी विनोद ॥ भामागृहा जावोनि प्रसिद्ध ॥ काय बोले तयेतें ॥ ६६ ॥ यज्ञीं मिळाले ऋषीश्वर ॥ सकळ मिळाले धरणीधर[4] ॥ तेथें रुक्मिणीरमावर ॥ हें दोघांचें दांपत्य शोभलें ॥ ६७ ॥ पुढें चालिला वैकुंठपीठ ॥ मागें रुक्मिणी जातसे स्पष्ट ॥ नेसोनियां कनकपट ॥ पल्लवीं ग्रंथी दीधल्या ॥ ६८ ॥ दोघांवरी धरिलें छत्र ॥ वरी चामरें वारिती विचित्र ॥ धूप जाळिती पवित्र ॥ नाना वाद्यें वाजती ॥ ६९ ॥ हा असा राजसन्मान ॥ रुक्मिणीसी देतो नारायण ॥ ती पट्टस्त्री[5] मुख्य जाण ॥ इतर त्या व्यर्थ सर्व ॥ ७० ॥ ती कामदेवाची जननी ॥ सकळ स्त्रियांमाजी शिरोमणि ॥ ह्मणोनियां चक्रपाणि ॥ यागीं तीतें सन्मानी ॥ ७१ ॥ जो सकळांमाजी दिधला मान ॥ तोचि जाणावा सन्मान ॥ एकांतीं दिधला मान ॥ तो तृणासमान मानावा ॥ ७२ ॥ ऐसा सन्मान देखोनि ॥ संशय आला माझे मनीं ॥ तो सांगावया तुजलागूनि ॥ वेगें[1]करूनि

१ नांवें. २ लाह्यांचा वर्षाव. ३ नारद. ४ राजे. ५ पट्टराणी.

पातलों ॥ ७३ ॥ सपत्नीमान्यता ऐकोनि ॥ तूं कां बैसलीस निश्चल मनीं ॥ ऐसें वचन ऐकोनि ॥ हास्य करित सत्यभामा ॥ ७४ ॥ मग भामा ह्मणे नारदमुनि ॥ श्रेष्ठही बोलती अनृत वाणी ॥ अंतर्गृहीं चक्रपाणि ॥ निजलेत कीं स्वानंदें ॥ ७५ ॥ येरू ह्मणे प्रत्यक्ष देखिलें ॥ म्यां नाहीं लटिकें बोलिलें ॥ तरी मज दावीं तो ये वेळे ॥ तेव्हां फिटेल संशय ॥ ७६ ॥ तो लीला-विग्रही भगवान ॥ भ्रमरमंचकीं केलें शयन ॥ निद्रार्णवीं निमग्न ॥ घोरतां देखिला नारदें ॥ ७७ ॥ नारद ह्मणे हा कपटी ॥ यासीं न चाले कांहीं गोष्टी ॥ आतांचि देखिला अरुंधतीनें गांठी ॥ बांधिली यातें रुक्मिणीतें ॥ ७८ ॥ तों जी जी ह्मणोनि नारदमुनि ॥ बाहेर आला चक्रपाणि ॥ ह्मणे कळ लावितां येवोनि ॥ ही काय करणी अवलंबिली ॥ ७९ ॥ येरू ह्मणे जी चक्रपाणि ॥ तुझी अकळ दिसे करणी ॥ केली माझे शब्दाची हानि ॥ विश्वास सर्वही बुडविला ॥ ८० ॥ आतां तुझ्या सर्व कामिनी ॥ लटकें बोलतो नारद मुनि ॥ ऐशा बोलतील नितंबिनी ॥ बरें तुह्मांसी कल्याण असो ॥ ८१ ॥ मग तेथोनि निघाला त्वरित ॥ जांबवतीच्या गृहा जात ॥ तयेलागीं बोलत ॥ तूं कां निश्चित बैसलीस ॥ ८२ ॥ रुक्मिणी आणि श्रीकृष्ण ॥ दांपत्य गेलें उदकाकारण ॥ कळलें तुमचें शाहाणपण ॥ तुजला न मानी श्रीहरि ॥ ८३ ॥ त्याची तीच काय प्रिय जाया ॥ तूं कां नव्हसी आवडती प्रिया ॥ तरी क्रोधेंकरूनि यदुराया ॥ न बोलसी कांहींच तूं ॥ ८४ ॥ मग जांबवती मुनीतें बोलत ॥ मम गृहीं निरंतर कृष्णनाथ ॥ सोडोनि जातां निभ्रांत ॥ मग प्राण कोण राखील हा ॥ ८५ ॥ जातो साधूचे संगभा ॥ निशिदिनीं फिरतो परमात्मा ॥ परी आह्मांलागीं तो जगदात्मा ॥ क्षण एक न विसंबे ॥ ८६ ॥ तों अंतर्गृहीं पाहे नारद ॥ तों तेथें निजलासे गोविंद ॥ ह्मणे हा नाटोपे जगदानंद ॥ स्वामी माझा दयांबुधि ॥ ८७ ॥ तेथेंही झाली अनृत वाणी ॥ मग तेथोनि चालिला नारदमुनि ॥ आणिका गृहातें जाऊनि ॥ ह्मणे करणें विनोद ॥ ८८ ॥ दों ठायीं मज लटिकें ॥ केलें कीं या रमानायकें ॥ आतां पाहीन घरें आणिकें ॥ ह्मणोनि त्वरें चालिला ॥ ८९ ॥ ऐसीं सोळा सहस्र घरें फिरला ॥ तों सर्वांठायीं ईश्वर देखिला ॥ सर्वव्यापक ऐसा ओळखिला ॥ दर्शनें मानिला संतोष ॥ ९० ॥ ऐसें पाहोनि लवलाहें ॥ गंगातीरीं गेला विरिंचितनय ॥ तों तेथें उदक भरिताहे ॥ रुक्मिणीसहित श्रीहरि ॥ ९१ ॥ नारदें देखिलें श्रीहरीला ॥ चराचरीं जो व्यापिला ॥ त्याची पाहोनि अनंत लीला ॥ आनंदला नारदमुनि ॥ ९२ ॥ अनंत ब्रह्मां-डांचा गोसांवी ॥ अघटित कळा दावी ॥ त्यातें मानव न भजे भावीं ॥ तो दुरात्मा ओळखावा ॥ ९३ ॥ तेथोनि नारद निघाला ॥ यागमंडपातें पातला ॥ नारद देखतां मुनींचा मेळा ॥ उठोनि उभा राहिला तो ॥ ९४ ॥ परम सन्मानेंकरूनि ॥ सकळीं नमिला नारदमुनि ॥ मुख्यासन देवोनि ॥ यज्ञमंडपीं बैसविला ॥ ९५ ॥ षोडशोपचारें पूजन ॥ धर्में केलें स्वहस्तेंकरून ॥ वस्त्रभूषणें देऊन ॥



१ खोटें. २ स्वीकारली. ३ भरंवसा. ४ स्त्रिया. ५ दयेचा सागर. ६ रागाच्या नेटानें. ७ नारद.

नारदमुनि गौरविला ॥ ९६ ॥ असो वसिष्ठादि सकळ दांपत्यें ॥ गेलीं होतीं गंगोदकातें ॥ व्यासदेवें मंत्रून तेथें ॥ उदक कलशा
भरविलें ॥ ९७ ॥ जळदेवता पूजिल्या समस्त ॥ सुवर्णकलशीं भरिलें अमृतोदक ॥ सपुष्प घट प्रत्येक ॥ शिरीं घेती अंगना
॥ ९८ ॥ तैसेचि सुवर्णकलश ॥ रुक्मिणीआदिकरून स्त्रियांस ॥ देतां बोलिली अरुंधती तयेस ॥ ह्मणें ऐक हो रुक्मिणी ॥ ९९ ॥
पुष्पभारेंकरून ॥ तुझें मस्तक भारावे जाण ॥ ती तूं सुवर्णकलश घेऊन ॥ कैसी जाशील धर्मालया ॥ १०० ॥ तें वचन ऐकोनि ॥
हास्य करीत रुक्मिणी ॥ तों सुभद्रा बोले तये क्षणीं ॥ अरुंधतीकारणें ॥ १ ॥ ह्मणे अनंत ब्रह्मांडवृंदें ॥ रोमरंध्रीं वसविलीं गोविंदें ॥
सकळ सुरांचींही वृंदें ॥ स्वशरीरीं जयाचे ॥ २ ॥ पहा पर्वत गोवर्धन ॥ नखाग्रीं धरिला सप्त दिन ॥ ऐसा कृष्ण जो त्यातें रुक्मिण ॥
हृदयावरी धरितसे ॥ ३ ॥ तयेसी ही कलशाची व्यथा ॥ होईल ह्मणोनि काय पुसतां ॥ ऐसें वाक्य ऐकतां ॥ सकळजणें हांसती ॥ ४ ॥
ऐसें ऐकतां सुभद्रावचन ॥ प्रत्युत्तर देतसे रुक्मिण ॥ माझा स्वामी ज्यांचे मनीं पूर्ण ॥ आवडे त्यांनीं धरावा ॥ ५ ॥ स्त्री बाळ वृद्ध
तरुण ॥ पशु पक्षी लता द्रुम ॥ सर्वांचे हृदयीं आराम ॥ पावतो कीं सर्वदा ॥ ६ ॥ ऐशा गोष्टी करीत नाना ॥ चालिल्या भूपांच्या
अंगना ॥ सत्वर पावल्या यज्ञस्थाना ॥ शिरीं कलश घेऊनि ॥ ७ ॥ शंख मृदंग पांवे भेरी ॥ दुंदुभि काहाळ रणमोहरी ॥ मंगळतुरें
नानापरी ॥ वाजताती अपार ॥ ८ ॥ ऐसें गंगेचें जीवन ॥ तुरंगासी करविलें प्राशन ॥ उरलियाचें घातलें स्नान ॥ द्रौपदीनें निज-
करीं ॥ ९ ॥ मग बांधोनियां श्यामकर्ण ॥ सपत्नीक धर्में केलें पूजन ॥ विप्र करिती मंत्रपठन ॥ नाना मंत्रादि विधानें ॥ ११० ॥
यावरी होईल अश्वहनन ॥ त्याचें विप्र करितील हवन ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ सावधान परिसावें ॥ ११ ॥ इति श्रीजैमिनि-
अश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ११२ ॥ ॥ इति श्रीमन्महाभारते
आश्वमेधिके जैमिनिकृते अश्वमेधदांपत्ययोजनाश्वस्नानवर्णनं नाम द्विनवतितमोऽध्यायः ॥ ९२ ॥ ॥ अध्याय ॥ ९२ ॥ ॥ ओव्या ॥ ११२ ॥


अध्याय ९३.
श्यामकर्ण वीर.
भीम.
इंद्र
व्यास
श्रीकृष्ण.
यज्ञ
धर्म द्रौ.
देवविमानांत बसून
राजे, ऋषि व स्त्रिया
गंगास्नानास जातात

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे नृपवरा ॥ आतां ऐकावें यज्ञप्रकारा ॥ पूजोनियां हयवरा ॥ मग काय करी धर्मराज ॥ १ ॥ प्रवर्तला धर्मयज्ञ ॥ मंत्रोक्त नृप करी स्नान ॥ भीमार्जुनादि कृष्ण ॥ यज्ञकर्मीं प्रवृत्त ॥ २ ॥ कृष्णें कर्म स्वीकारिलें ॥ मुनींचे चरण क्षाळूं आदरिले ॥ यथास्थानीं बैसविले ॥ आणि उच्छिष्टें काढावीं ॥ ३ ॥ कर्म स्वीकारित अर्जुन ॥ ब्राह्मणांचें करावें पूजन ॥ भीमें इच्छित आणोन ॥ पुरवावें तयांतें ॥ ४ ॥ गंध माल्यें वस्त्राभरण ॥ विप्रांसी करावें समर्पण ॥ पुष्पमाळा कंठीं घालून ॥ कर्पूरविडे पैं द्यावे ॥ ५ ॥ सुवर्णपीठीं विप्र बैसवून ॥ करावें त्यांचें सुस्तवन ॥ स्वादु अन्नें द्यावें भोजन ॥ हें नकुळ स्वीकारी ॥ ६ ॥ रमा साक्षात रुक्मिणी ॥ गौरी तीच द्रुपदनंदिनी ॥ दोघी वाढिती सर्वांलागुनी ॥ काय न्यून अन्नातें ॥ ७ ॥ नाना रत्नें सुवर्णांबरें[1] ॥ भूषणें पट्ट दुकूलें अपारें ॥ द्विजांसी समर्पिलीं युधिष्ठिरें ॥ आसनें धोत्रें पात्रें तीं ॥ ८ ॥ गजाश्व रथ गोदानें ॥ तुळापुरुषादि महादानें ॥ दानखंडीं बोलिलीं गहनें ॥ तीं तीं दिधलीं सर्वही ॥ ९ ॥ गृहदानें भूमिदानें ॥ छत्रें चामरें व्यजनें[3] ॥ दास दासी अपार धनें ॥ जन्मवरी न सरती ॥ १० ॥ जी जी वस्तु जया प्रिय ॥ ती ती समर्पित धर्मतनय[2] ॥ सकळ याचकांचा मनोदय ॥ तृप्त करीत त्या यज्ञीं ॥ ११ ॥ मग युधिष्ठिरें यागाजवळीं ॥ तो अश्व आणिला तात्काळीं ॥ तयासी बोले ऋषिमंडळी ॥ पशुत्वें[4] करीं या यज्ञीं ॥ १२ ॥ तुज प्राप्त होईल स्वर्गलोक ॥ ऐसें बोलतां निःशंक ॥ अश्वें हालविलें ग्रीवामस्तक ॥ परमानंदेंकरूनि ॥ १३ ॥ केशवासम्मुख झाला नीट ॥ बोलोन स्फुरवी दोनी ओष्ठ ॥ तें नकुळें जाणीतलें स्पष्ट ॥ अव्यंग्य अश्व हृदयींचें ॥ १४ ॥ तुरंगमभाव नकुळ ॥ धर्मरायासी निवेदी तात्काळ ॥ अश्व हा बोलतो प्रांजळ ॥ मी त्या पदासी नव जावें ॥ १५ ॥ यज्ञीं अश्व पावती जे मरण ॥ त्यांसी प्राप्त सत्य स्वर्गभुवन ॥ ऐसें श्रुतीचें वचन ॥ परी त्या स्वर्गाचा मी नोहें ॥ १६ ॥ जो यज्ञभोक्ता श्रीकृष्ण ॥ तो या यागीं करितो कर्माचरण ॥ त्या यागींचा मी श्यामकर्ण ॥ तुच्छ मानितों स्वर्गातें ॥ १७ ॥ जे अनीश्वर याग केवळ ॥ तेथें अश्वीं चिंतावें स्वर्गफळ ॥ कृष्णहृदयांबुज केवळ ॥ मी तों तेथें प्रवेशेन ॥ १८ ॥ ऐसा याचा अभिप्राय ॥ मजलागीं सांगतो हा हय ॥ ऐसें बोलतां माद्रीतनय ॥ जयजयकार ऋषी करिती ॥ १९ ॥ सर्व पावले समाधान ॥ यूपीं[5] योजिला श्यामकर्ण ॥ सकळ राजे येऊन ॥ तटस्थ तेथें विलोकिती ॥ २० ॥ तंव धौम्य बोले भीमाप्रति ॥ तूं तीक्ष्ण शस्त्र घेईं हातीं ॥ अश्वपरीक्षा करीं निश्चितीं ॥ शुद्धपणाची याचिया ॥ २१ ॥ मग धौम्यें धरिला त्याचा कर्ण ॥ त्याचें केलें निष्पीडण ॥ तों दुग्धधारा तेथोन ॥ स्रवों लागल्या तेधवां ॥ २२ ॥ सकळ झाले जी विस्मित ॥ अश्वांगीं नसेचि शोणित[6] ॥ भीमातें ह्मणे धौम्य पुरोहित ॥ अश्वशिर छेदीं आतां ॥ २३ ॥ या अश्वच्छेदनेंकरून ॥ हा पुराणपुरुष नारायण ॥ संतृप्त होईल पूर्ण ॥ तेंचि तुवां करावें ॥ २४ ॥ लागल्या

---

१ जरीचीं वस्त्रें. २ धर्मानें. ३ पंखे. ४ यज्ञामध्यें हवन करण्याचा पशु हो. ५ यज्ञांत पशु बांधण्याच्या खांबाला. ६ रक्त.

वाजंत्रांच्या ध्वनी ॥ तेणें प्रतिशब्द उठिला गगनीं ॥ भीमें स्मरोनि चक्रपाणि ॥ अश्वमस्तक छेदिलें ॥ २५ ॥ ऊर्ध्व उडालें अश्वशिर ॥ तेणें भेदिलें रविमंडळ ॥ सेविलें सूर्यांतर केवळ ॥ तेजोरूप तें झालें ॥ २६ ॥ ऐसा शुद्धाश्व देखोन ॥ आनंदले सकळ ब्राह्मण ॥ दुग्धधारा लोटल्या संपूर्ण ॥ शरीरांतून तयाचे ॥ २७ ॥ ऋषी ह्मणती धर्मयाग ॥ पूर्वीं झाले अनेक ॥ परी शुद्धत्वाचा विभाग ॥ कोठें न देखों यापरी ॥२८॥ तरी हा तुझा योग्य याग ॥ घडला कीं यथासांग ॥ जेथें इंदिरेसहित श्रीरंग ॥ कार्य करी कुटुंबेंसीं ॥ २९ ॥ ऐसें बोलतां सकळ द्विज ॥ तों अश्वमुखांतून निघालें तेज ॥ तेणें उघडोन कृष्णमुखांबुज ॥ अंतरंगीं प्रवेशलें ॥ ३० ॥ मग अश्वधड पडिलें धरणीं ॥ तों कर्पूरपुंज झाला तत्क्षणीं ॥ मुनि सकळ नृपचूडामणी ॥ आश्चर्य करूं लागले ॥ ३१ ॥ ह्मणती नाना याग केले ॥ नेत्रीं अनंत देखिले ॥ परी या यागासी तुळे ॥ ऐसा याग न देखिला ॥ ३२ ॥ जी योगेश्वरा नसे गति ॥ ती गति पावला अश्वपति ॥ कृष्णमुखीं झाली वस्ती ॥ त्या अश्वातें काय वर्णूं ॥ ३३ ॥ जेहीं केले होते याग ॥ त्यांचा झाला गर्वभंग ॥ ज्याच्या यागीं कार्यकर्ता श्रीरंग ॥ आणि भोक्ताही आपण ॥ ३४ ॥ नेणवे भाग्य पांडवांचें ॥ ब्रह्मादिकां अलभ्य साचें ॥ धन्य भाग्य आमुचें ॥ झालें येथें आगमन ॥ ३५ ॥ सर्व राजे आश्चर्य करिती ॥ ह्मणती अभिनव यागगति ॥ ऋषिगण आनंदती ॥ ह्मणती पावन झालों आह्मी ॥ ३६ ॥ अश्वशरीर झालें कर्पूर ॥ कीं क्षीराब्धि आटोनि केला गोळ ॥ सुवास सुटला अपार ॥ तेणें दिशा कोंदल्या ॥ ३७ ॥ घेवोनि कर्पूराचीं अवदानें ॥ यज्ञीं होमिजेलीं ब्राह्मणें ॥ तृप्ति केली यज्ञनारायणें ॥ सपत्नीक कृष्णेसीं ॥ ३८ ॥ व्यास देत अवदान ॥ स्रुवा घेवोनि आपण ॥ इंद्राप्रति बोलिला वचन ॥ तेंचि ऐकें जनमेजया ॥ ३९ ॥ इंद्रा तूं घेईं रे अवदान ॥ समर्पितो धर्मनंदन ॥ येथोनि दुर्लभ हे यज्ञ ॥ कलियुगीं न होती ॥ ४० ॥ प्राप्त झालिया कलियुग ॥ विशेषें बुडतील हे याग ॥ तैं तुह्मां आहुतिविभाग ॥ कोठूनि प्राप्त समजावें ॥ ४१ ॥ ऐकतां शक्र मूर्तिमंत ॥ तेथें आलासे धांवत ॥ आदरें व्यासातें बोलत ॥ मज पावली आहुती ॥४२॥ संपूर्ण झाली कीं तृप्ति ॥ ऐसी नव्हे पुढें स्थिति ॥ ऐकतां ऐसी वचनोक्ति ॥ सर्व झाले विस्मित ॥ ४३ ॥ ऐसीं यथाक्रमें व्यासनारायणें ॥ देवांसी दिधलीं अवदानें ॥ तेणें देव संतुष्टमनें ॥ झाले तृप्त सर्वही ॥४४॥ चराचर तृप्त संपूर्ण ॥ ऐसें झालें धर्महवन ॥ होमधूम्रें पावन ॥ त्रैलोक्य झालें जनमेजया ॥४५॥ पृथ्वी झाली पावन ॥ संतुष्टला धर्मनंदन ॥ तेव्हां युधिष्ठिरासी आलिंगन ॥ कृष्णें दिधलें निजप्रेमें ॥ ४६ ॥ संतुष्ट यज्ञनारायण ॥ धर्माप्रति बोले वचन ॥ राया तुझ्या भाग्येंकरून ॥ यज्ञसमाप्ति पैं झाली ॥ ४७ ॥ आतां आह्मांसहवर्तमान ॥ राया करीं अवभृथस्नान ॥ धर्में कृष्णचरण वंदून ॥ ह्मणे प्रसाद हा तुझा ॥ ४८ ॥ तूं भक्तरक्षक भगवान ॥ संकटीं रक्षिलें संपूर्ण ॥ भवसिंधूचें जीवन ॥ शोषक तूं जगदा-



१ कापुराची रास. २ अपूर्व. ३ यज्ञाच्या शेवटीं जें स्नान करितात तें.

त्मया ॥ ४९ ॥ अनंत तूं यज्ञसंपन्न ॥ दुःखदरिद्रदाहक होऊन ॥ ऐसें कृष्णाचें स्तवन ॥ धर्में केलें अपार ॥ ५० ॥ मग सपत्नीक ऋषिगण ॥ तैसाचि सपत्नीक नारायण ॥ धर्मरायासहवर्तमान ॥ अवभृथस्नाना चालिले ॥ ५१ ॥ सपत्नीक सहोदर ॥ पुढें चालिले नृपभार ॥ नाना वाद्यांचा गजर ॥ तेणें अंबर[1] कोंदलें ॥ ५२ ॥ ऐसा उत्साह देखोनि ॥ सर्व देव उतरले मेदिनीं[2] ॥ ह्मणती पवित्र आह्मी येथोनि ॥ धर्मस्नानांबुस्पर्शें[3] ॥ ५३ ॥ स्नानांबूचा संयोग ॥ जरी होईल यथासांग ॥ तरी पातकांचा भंग ॥ होईल कीं आमुचे ॥ ५४ ॥ कृष्णासहित धर्मनंदन ॥ सकळीं केलें अवभृथस्नान ॥ मंडपीं केलें सोमपान ॥ सकळ ऋषींसमवेत ॥ ५५ ॥ सकळीं भक्षिला पुरोडाश[4] ॥ स्वयें स्वीकारी हृषीकेश ॥ सकळ रायांसी शेष ॥ दिधलें व्यासें स्वहस्तीं ॥ ५६ ॥ तेथें झाला जयजयकार ॥ वाद्यें वाजती तुंबळ ॥ गीत प्रबंध गायक नर ॥ स्तविती सुरवर धर्मातें ॥ ५७ ॥ देवकीआदि स्त्रिया जाण ॥ करिती धर्मातें नीराजन ॥ नृत्यांगना नाचती पूर्ण ॥ सुगंधद्रव्यें उधळिती ॥ ५८ ॥ स्नुषांसहित कुंती ॥ आनंदली शुद्धमति ॥ मग केली पूर्णाहुती ॥ यागसमाप्ति पैं केली ॥ ५९ ॥ कृष्णें पूजिला यजमान ॥ अपार दिधलें धनदान ॥ सांग केलें व्यासपूजन ॥ पृथ्वीदान त्या दिधलें ॥ ६० ॥ घेवोनि पृथ्वीचें मोल ॥ व्यासें दिधलें भूमंडळ ॥ विप्र मिळाले जे सकळ ॥ त्यांसी आजन्म[5] न सरे ऐसें धन दिधलें ॥ ६१ ॥ बकदाल्भ्याचें केलें पूजन ॥ रत्नाभिषेक करून ॥ शत पद्म दिधलें धन ॥ तेणें तात्काळ तें लुटविलें ॥ ६२ ॥ एक रथ एक वारण ॥ दाहा अश्व तेजःसंपन्न ॥ लक्षभार सुवर्ण ॥ शत गोदानें त्यावरी ॥ ६३ ॥ मौक्तिकांचे दोनी प्रस्थ[6] ॥ शत सेवक विख्यात ॥ ऐसी दक्षिणा नृपनाथ ॥ देत एकएकातें ॥ ६४ ॥ वस्त्रें भूषणें रत्नें ॥ अमित दिधलीं सर्वांकारणें ॥ नको नको ह्मणिजे ब्राह्मणें ॥ न नेववे आमचेनि ॥ ६५ ॥ सर्वांलागीं दक्षिणा ॥ दिधली त्याची नव्हे गणना ॥ मनइच्छा दानें नाना ॥ करीतसे धर्मराज ॥ ६६ ॥ मग केलें कृष्णपूजन ॥ केलें चरणक्षालन ॥ अर्घ्यपाद्यादि करून ॥ वस्त्राभरणें अमूल्य ॥ ६७ ॥ अंगीं चर्चोनि दिव्य चंदन ॥ कंठीं पुष्पमाळा घालोन ॥ धूपदीपादि समर्पोन ॥ नैवेद्य बरवा दाविला ॥ ६८ ॥ सकर्पूर तांबूल ॥ सुवर्णदक्षिणा सोज्वळ ॥ नीराजनें करोनि निर्मळ ॥ प्रदक्षिणात्रय केल्या ॥ ६९ ॥ पुष्पांजलि वाहोनि चरणीं ॥ साष्टांग नमिला चक्रपाणि ॥ कृष्णास विनवी कर जोडोनि ॥ धर्मराज तेधवां ॥ ७० ॥ तव पुण्यें याग सकळ ॥ संपूर्ण झाला जी सोज्वळ ॥ किरीटकुंडलें तेजाळ ॥ कृष्णासी धर्में समर्पिलीं ॥ ७१ ॥ रथाश्व गज दास दासी ॥ वस्त्राभरणें मुक्ताराशी ॥ सर्व संपदा कृष्णासी ॥ धर्मरायें समर्पिली ॥ ७२ ॥ घेवोनियां दिव्य जळ ॥ सकळ यज्ञाचें जें कां फळ ॥ तें कृष्णहस्तीं समर्पिलें तात्काळ ॥ चरणीं भाळ[8] ठेविलें ॥ ७३ ॥ ऐसा पूजोनि रमारमण[7] ॥ मग रायांचें आरंभिलें पूजन ॥ सहस्र गज तुरंगम जाण ॥ तीन सहस्र एकएका ॥ ७४ ॥ पुरुषांचे सर्व अलंकार ॥

---

१ आकाश. २ पृथ्वीवर. ३ धर्मराजाच्या यज्ञांतील स्नानासंबंधीं पाण्याच्या स्पर्शानें. ४ होमद्रव्याचा शेष. ५ जन्मभर. ६ शेर. ७ कृष्ण. ८ मस्तक. ९ श्रीकृष्ण.

कोटि सुवर्णाचे संभार ॥ रथ आणि पायदळ समग्र ॥ रत्नें वस्त्रेंसहित पैं ॥ ७५ ॥ ऐसिया प्रकारें नृपती ॥ धर्में पूजिले संतोष-चित्तीं ॥ त्याचे शतगुण संपत्ति ॥ यादवांतें समर्पिली ॥ ७६ ॥ ऐसे यादव आणि नृपगण ॥ धर्में पूजिले संपूर्ण ॥ मग स्त्रियांचें आरंभिलें पूजन ॥ निज आवडींकरूनि ॥ ७७ ॥ अनुसूया आणि अरुंधती ॥ इत्यादिक ऋषियुवती ॥ देवोनि अलंकार संपत्ति ॥ वस्त्रें आणि द्रव्यराशी पैं ॥ ७८ ॥ देवकी यशोदा रोहिणी ॥ तयांतें पूजित याज्ञसेनी ॥ बरव्या गौरविल्या वस्त्राभरणीं ॥ सकळ अंगना नृपांच्या ॥ ७९ ॥ दिधलीं सौभाग्यद्रव्यें सुगंधें ॥ सकळ स्त्रियांतें आनंदें ॥ सोळा सहस्र कामिनींचीं वृंदें ॥ कृष्णांगना पूजिल्या ॥ ८० ॥ रुमिणीआदिकरून ॥ स्नुषा आबाल वृद्ध सेवकजन ॥ रत्नसुवर्णमौक्तिकेंसीं संपूर्ण ॥ वस्त्राभरणें दिधलीं ॥ ८१ ॥ मुक्ताफळांचिया राशी ॥ वांटीतसे सेवकांसी ॥ वचनें गौरविलें सकळांसी ॥ पावन आह्मांसी केलें जी ॥ ८२ ॥ त्यावरी निजमातेचें पूजन ॥ धृतराष्ट्र गांधारीआदिकरून ॥ करीतसे धर्मनंदन ॥ भीमादिक बंधूंचें ॥ ८३ ॥ त्यावरी कृष्णाचें उत्तरपूजन ॥ करिता झाला धर्मनंदन ॥ जें झालें सुकृत संपूर्ण ॥ तें कृष्णकरीं अर्पिलें ॥ ८४ ॥ लागला वाद्यांचा गजर ॥ पुष्पवर्षाव करीत इंद्र ॥ नारद व्यासादि ऋषिवर ॥ आशीर्वादें गर्जती ॥ ८५ ॥ केलें बंदिशाळामोचन ॥ कृष्णदर्शना आणिले जन ॥ त्यांसी इच्छित दिधलें पूर्ण ॥ घरोघरीं आनंद ॥ ८६ ॥ हस्तनापुरामाझारी ॥ उरला नाहीं कोणी दरिद्री ॥ सकळ संपदा घरोघरीं ॥ आनंद करिती निशिदिनीं ॥ ८७ ॥ श्रीकृष्णप्रसादेंकरून ॥ अश्वमेध झाला संपूर्ण ॥ येणें संतुष्ट हो जगज्जीवन ॥ ऐसें धर्म बोलिला ॥ ८८ ॥ ऐसें दिव्य यज्ञप्रकरण ॥ याचें करील जो पारायण ॥ त्याचें तुटेल भवबंधन ॥ सत्य सत्य त्रिवाचा ॥ ८९ ॥ आतां पुढें भोजना-ख्यान ॥ जें धर्मरायें केलें दिव्यान्न ॥ तें पुढिले प्रसंगीं निरूपण ॥ यथामति सांगिजेल ॥ ९० ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधर श्रोतयां ॥ ९१ ॥ इति श्रीमहाभारते जैमिनिकृते आश्व-मेधिके अश्वहननावभृथस्नानादिप्रकारकथनं नाम त्रिनवतितमोऽध्यायः ॥९३॥ अध्याय ॥९३॥ ॥ ओव्या ॥९१॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे कुरुनायका[1] ॥ ऐकें पूर्वजकथा सुखदायका ॥ जेणें नाश होय भवशोका[2] ॥ परमपदातें पाववी ॥ १ ॥ पार्थें अश्वमेध संपादिला ॥ सर्व वित्ताचा[3] व्यय[4] केला ॥ अत्यंत शोभें शोभला ॥ नेणों वैश्रवण[5] भूतळीं ॥ २ ॥ ऐसा धर्मयाग तो सोज्वळ ॥ तेथें अन्नाचे निर्मिले शैल[6] ॥ दधि आज्याचे[7] केवळ ॥ सागर केले यज्ञार्थ ॥ ३ ॥ दधि दुग्ध मधु शर्करा ॥ आज्याच्या तों नद्याचि भरिल्या ॥ भक्षा भक्षा याचि बोल्या ॥ दुजे विचारा न पुसती ॥ ४ ॥ सावकाश करावीं भोजनें ॥ हेंचि अहोरात्र बोलणें ॥ निर्मिलीं नाना पक्वान्नें ॥ त्यांचा सुवास सुटला ॥ ५ ॥ ऐसा निष्पाप झाला तो पार्थ ॥ मनीं मानिला कृतार्थ ॥ सकळ भूपतींसमवेत ॥ कैसा शोभला त्या यज्ञीं ॥ ६ ॥ जेवीं नक्षत्रमंडळीं ॥ शोभे चंद्र शरत्काळीं[8] ॥ तैसा धर्मराज ते काळीं ॥ परम शोभा पावला ॥ ७ ॥ दरिद्र दुःखी कृपण ॥ क्षुधित व्याधिस्थ[9] नसे कोणी ॥ धर्मयज्ञीं सुख पूर्ण ॥ सकळांलागीं जाहलें ॥ ८ ॥ बंधुसहित वीर पार्थ ॥ मानिता झाला कृतार्थ ॥ अश्वमेध केला समाप्त ॥ कृष्णकृपेंकरूनि ॥ ९ ॥ गोत्रवधाचा पापपंक[10] ॥ हृदयीं होता तो निःशंक ॥ सांग होतां यज्ञनायक ॥ सर्वही तो निमाला ॥ १० ॥ कृष्णप्रसादें कुंतीसुत ॥ झाला सर्व आधिविरहित ॥ झाला संपूर्ण मनोरथ ॥ यज्ञानंदें डोलतसे ॥ ११ ॥ मग श्रीकृष्णआज्ञेप्रमाणें ॥ प्रेमळा वरिली श्वेत-वाहनें ॥ व्यासादि मुनींच्या वचनें ॥ विवाह केला विधियुक्त ॥ १२ ॥ आणखी आल्या त्या युवती ॥ तयांतें देखोनि श्रीपति ॥ आज्ञा केली यादवांप्रति ॥ विवाहाकारणें तेधवां ॥ १३ ॥ प्रेमळा पावोनि अर्जुनाप्रति ॥ परम हर्ष पावली चित्तीं ॥ नानापरी भोग संपत्ति ॥ भोगिती झाली आनंदें ॥ १४ ॥ झाला संतोषी बभ्रुवाहन ॥ पित्यानें केला अतिसन्मान ॥ धर्म भीमें प्रीतींकरून ॥ तयालागीं गौरविलें ॥ १५ ॥ मग गंतव्यकाम[11] ऋषिगण ॥ कृष्णाप्रति बोलती वचन ॥ तपोवनीं करितों अनुष्ठान ॥ तव प्राप्ती-लागोनि ॥ १६ ॥ जो परात्पर पुंडरीकाक्ष ॥ सकळ जनांचा कल्पवृक्ष ॥ तो तूं धर्मयज्ञीं प्रत्यक्ष ॥ आह्मी देखिला धणीभरी ॥ १७ ॥ आतां स्वामी ऐसें करावें ॥ या जन्ममरणातें चुकवावें ॥ आणि मानसीं असों द्यावें ॥ स्मरण आमचें स्वामिया ॥ १८ ॥ कृष्ण बोले त्यांसी वचन ॥ तुह्मी तोडितां ईश्वराचें बंधन ॥ त्या तुह्मांसी भवबंधन[12] ॥ सर्वथा जाणावें न बाधी ॥ १९ ॥ तथापि ऐकावें माझें वचन ॥ तुह्मीं करावें स्वधर्माचरण ॥ नित्य करावें हरिस्मरण ॥ मनोमंदिरीं स्वानंदें ॥ २० ॥ सर्वांभूतीं करावी कृपा ॥ सर्वत्र पाहावें माझिया स्वरूपा ॥ ऐसा मार्ग धरूनियां सोपा ॥ जन्ममरणखेपा हरील ॥ २१ ॥ भूतदया धरावी ॥ स्वध-र्मवनें पाळावीं ॥ नियमाचळें राखावीं ॥ मनोजयातें आवरोनि ॥ २२ ॥ स्वरूपमंदिरातें जागावें ॥ सद्भक्तसभेमाजी वागावें ॥ माझे कीर्तनीं रंगावें ॥ भाविक जन देखोनि ॥ २३ ॥ ऐसें श्रीकृष्णवचनामृत ॥ सेवोनि ब्राह्मण झाले तृप्त ॥ मग भूपति

१ जनमेजया. २ संसारदुःखा. ३ द्रव्याचा. ४ खर्च. ५ कुबेर. ६ पर्वत. ७ तुपाचे. ८ शरदृतूंत. ९ रोगी. १० पापरूप चिखल. ११ जाऊं इच्छिणारे. १२ संसारबंधन.

उठोनि समस्त ॥ प्रार्थना करिती कृष्णाची ॥ २४ ॥ स्वामी आमचा मनोभृंग ॥ न सोडूं तुमचें चरणाब्जयुग ॥ ऐसा वर द्यावा अभंग ॥ आणिक कांहीं न मागों ॥ २५ ॥ मग नृपांसी बोले मधुसूदन ॥ तुह्मी करावें स्वधर्माचरण ॥ पुत्रापरी प्रजा रक्षोन ॥ विप्रपालन करावें ॥ २६ ॥ माझें करावें मनीं स्मरण ॥ नित्य करावें कथामृतपान ॥ तेणें तुमचें जन्ममरण ॥ अंतें पावेल समूळ ॥ २७ ॥ ऐसें ऐकोनि अमृतवचन ॥ राजे पावले समाधान ॥ मग सर्व उठोनि वंदन ॥ करिते झाले श्रीकृष्णा ॥ २८ ॥ धर्में सर्वांतें राहावोन ॥ यज्ञांतींचें दिव्यभोजन ॥ देता झाला दिव्यान्न ॥ भीमाहातें अवघियां ॥ २९ ॥ नृपाज्ञेनें भीमसेन ॥ सर्वांसी देता झाला भोजन ॥ ऐसें ऐकोनि मुनिवचन ॥ जनमेजय प्रश्न करी ॥ ३० ॥ स्त्री बाळ मुनि भूपांलागून ॥ कैसें दिधलें दिव्य भोजन ॥ तें विशद कृपा करून ॥ सकळ सांगा मज स्वामी ॥ ३१ ॥ तुमच्या मुखींचें वचनामृत ॥ मज मधुर लागतसे अत्यंत ॥ प्राशन करितां श्रवण तृप्त ॥ सर्वथा नव्हती स्वामिया ॥ ३२ ॥ जैमिनि ह्मणे नृपनाथा ॥ सावधान ऐकें भोजनकथा ॥ श्रवणमात्रें संसारव्यथा ॥ पळोनि जाय दिगंतरा ॥ ३३ ॥ नवरत्नखचित तो मंडप ॥ कनकबद्ध भूमिस्वरूप ॥ रत्नखचित आसनें अमूप ॥ चंदनगर्भें मढियेलीं ॥ ३४ ॥ सभोंवत्या मांडिल्या दीपमाळा ॥ तळीं घातल्या रंगमाळा ॥ नाना चंदनधूपीं धूपिला ॥ मंडपीं अवघा परिमळ ॥ ३५ ॥ रत्नखचित मांडिलीं ताटें ॥ अति विस्तृतीं चोखटें ॥ त्यांसभोंवत्या मांडिल्या नेहटें ॥ चौसष्टी वाट्या प्रतिपात्रीं ॥ ३६ ॥ सुगंधजळपात्रें क्षालन ॥ करूनि पुढें मांडिलीं जाण ॥ प्रतिपात्रीं सुजल भरून ॥ रत्नकमंडलू ठेविले ॥ ३७ ॥ प्रतिपात्रीं रत्नदीप ॥ ठेविता झाला कुळदीप ॥ तें देखतां निवाले सकळ भूप ॥ भोजन शोभा तेथींचि ॥ ३८ ॥ देखोनि तेथींचि शोभा ॥ नृपनयनांसी निघाल्या जिभा ॥ तेथें पुरंदरनगरशोभा ॥ पर्णकुटीसम भासे ॥ ३९ ॥ धर्मसभेची रचना ॥ त्रिभुवनीं अनुपम जाणा ॥ ती देखतां नृपनयनां ॥ दोंदें निघालीं हर्षाचीं ॥ ४० ॥ भीम वाढीतसे अन्न ॥ परामर्श करीतसे मधुसूदन ॥ भाळीं तिलक रेखून ॥ अंगीं सुगंधें चर्चिला ॥ ४१ ॥ सुपुष्पांचिया माळा ॥ अर्जुन घाली सकळांचे गळां ॥ ज्यांच्या देखोनि परिमळा ॥ मलयानिल लज्जित ॥ ४२ ॥ देखोनि अन्नाचा परिमळ ॥ रोगें घेतलें देशांतर ॥ मन झालें निश्चळ ॥ अन्नीं दृष्टी लागतां ॥ ४३ ॥ अन्नरुचीचे कौतुकें ॥ त्यापुढें अमृत वाटे फिकें ॥ सुरांसहित शचीनायकें ॥ लाळ घोंटिजे त्या स्वादा ॥ ४४ ॥ सविस्तर जरी वर्णूं अन्न ॥ तरी ग्रंथ होईल विस्तीर्ण ॥ यालागीं प्रत्येक जाण ॥ यथामति वर्णितों ॥ ४५ ॥ हातीं कनकपात्र घेऊन ॥ त्यामाजी अन्न दडपोन ॥ वाढीतसे भीमसेन ॥ नेणों भूलिंगें निघालीं ॥ ४६ ॥ चंद्रबिंबासमान ॥ चंद्रकळा षोडश चिरोन ॥ ऐसें देखोनि शुभ्र ओदन ॥ विप्रनयन निवाले ॥ ४७ ॥ भोंवतीं पायसांची हारी ॥ तेणें रत्नवाटी भरिली ॥

१ चरणकमलांची जोडी. २ नाश. ३ कान. ४ सोन्यानें मढवलेला. ५ पुष्कळ. ६ अमरावतीची. ७ इंद्रानें. ८ भात. ९ खिरींची.

रुचि देती गोड भारी ॥ अति अपूर्व भक्षावया ॥ ४८ ॥ त्या भातावरी वाढिलें वैरान्न ॥ नेणों तगट ओतिलें सुवर्ण ॥ पीतवर्ण तें सुगंधेंकरून ॥ तोषवीत सर्वांतें ॥ ४९ ॥ चक्राकार वर्तुळ ॥ चंद्रबिंबापरी धवळ ॥ ऐसिया पोळियांचे कवळ ॥ मृदुत्व केवळ त्यांच्या ठायीं ॥ ५० ॥ अति दीर्घ वर्तुळ जाण ॥ साकरमांडे अमृतासमान ॥ तप्त क्षीरामाजी घालितां पूर्ण ॥ होती लीन त्यामाजी ॥ ५१ ॥ अनारसे फेणिया गुरवळिया ॥ सांडिया पुरिया घारिया ॥ दुग्धें शर्करें घोळिलिया ॥ ऐसीं वाढिलीं पक्वान्नें ॥ ५२ ॥ स्नेहकढईमाजी दिव्य झाले ॥ अनुताप वैराग्यें पचले ॥ मग अनुरागदशेतें आले ॥ ऐसे वडे ते नवविध ॥ ५३ ॥ एक कथिकेमाजी भिजविले ॥ एक दह्यामाजी मेळविले ॥ एक दुग्धेंचि कालविले ॥ एक भिजविले चिंचरसें ॥ ५४ ॥ नानापरी भिजवोनि वैटक ॥ ग्रास घेती द्विजें नरनायक ॥ लवण मरीच हिंगु सम्यक ॥ भिन्न भिन्न ते केले ॥ ५५ ॥ सगर्भ शुभ्र खाजा करंज्या ॥ पूर्णगर्भ तेलवरिया ॥ घृतशर्करायुक्त लुचया ॥ मुखीं घालितां अति गोड ॥ ५६ ॥ मधुवर्ण सुवासित ॥ रत्नवाटियेमाजी घालित ॥ जें भोजनीं प्रधान ह्मणवित ॥ त्या आज्यातें सादर सेविती ॥ ५७ ॥ सांडगे पापड कोशिंबरी ॥ सभोंवत्या त्यांचिया हारी ॥ लवण शाका परोपरी ॥ नाना शिकरणी वाढिल्या ॥ ५८ ॥ सांद्र तक्राची कथिका ॥ कढोनि झाली रसिका ॥ जीचा घेतां फुरका ॥ रुचि आणी मुखातें ॥ ५९ ॥ लाडू मोदक अपार ॥ शोभताती वर्तुळ ॥ देखोनियां मुनिवर ॥ पोटासी हात चोळिती ॥ ६० ॥ द्राक्ष फणस आम्रफळें ॥ सोलींव वाढिलीं रंभाफळें ॥ नानापरींचीं रसाळें ॥ पुढें वाढिलीं अपार ॥ ६१ ॥ शुभ्र साय दधि दुग्ध ॥ नवनीताचे गोळे विशद ॥ आनंदें जेवी भूपवृंद ॥ द्विजवरही सावधानें ॥ ६२ ॥ रत्नखचित चौरंग ॥ त्यांवरी बैसले भूप अव्यंग ॥ सुस्वादें जेविती अभंग ॥ गोडी तया अन्नाची ॥ ६३ ॥ शाका सेवकपंक्ती शोभत ॥ त्यामाजी प्रधान असे घृत ॥ भातावरी कथिका सत्य ॥ तेंचि स्नान तयाचें ॥ ६४ ॥ ऐसा स्नानें तो शृंगारिला ॥ वरता तो भात मागितला ॥ तेणें जठराग्नि तृप्त केला ॥ न चाले तयांचें यापुढें ॥ ६५ ॥ ऐसे जेवितां सकळिक ॥ तेथें वर्तलें एक कौतुक ॥ जे अरण्यवासी लोक ॥ ते दिव्यान्न स्वप्नीं न जाणती ॥ ६६ ॥ कंदमूळें भक्षिती ॥ त्यांसी झाली दिव्यान्नभेटी ॥ ते भांबावले हातवटी ॥ कोणतें कसें भक्षावें ॥ ६७ ॥ शुभ्र देखोनि ओदन ॥ शाकासमाज पाहोन ॥ ह्मणती साक्षात हा उमारमण ॥ यासी वंदन करावें ॥ ६८ ॥ हें केवळ परब्रह्म ॥ यासी भक्षावयाचें काय प्रेम ॥ ह्मणोनि ध्यान धरूनि परम ॥ शिवस्मरण करीत बैसले ॥ ६९ ॥ कित्येक जेविती शाकांची ओळी ॥ कित्येक ध्यानस्थ बैसलीं ॥ कित्येक बोलती काय हें वर्तुळीं ॥ म्यां वनस्थें न देखिलीं ॥ ७० ॥ दुजा शाहाणा जो ह्मणवित ॥ तो तयासी सांगत ॥ हें चंद्रबिंब निश्चित ॥ पडतां

१ वरण. २ शुभ्र. ३ वडे. ४ ब्राह्मण. ५ मुख्य. ६ आंबे. ७ केळीं. ८ लोण्याचे. ९ तूप. १० भात. ११ शंकर.

छिद्रित जाहलें ॥ ७१ ॥ ऐसें झालें द्विजनायकां ॥ तों भीमें वाढिल्या फेणिका ॥ तों किल्येकां झाली शंका ॥ ह्मणे मी खगातें केवीं भक्षूं ॥ ७२ ॥ दिव्य मोदक पाहोन ॥ उलूक मानिती द्विजजन ॥ ह्मणती औदुंबरफळ भक्षून ॥ आश्रमीं येवोनि राहाती जे ॥ ७३ ॥ तेचि आह्मांलागून ॥ येथें प्राप्त झाले जाण ॥ अदृष्टहीन झाले जे जन ॥ त्यांसी उत्तम न सांपडे ॥ ७४ ॥ मोकळा देखोनि ओदनें ॥ ह्मणती कुंदपुष्पें आणिलीं चुरोन ॥ दुजा बोले अनृतभाषण ॥ ह्या तो कळ्या मालतीच्या ॥ ७५ ॥ एक वटकातें देखोन ॥ ह्मणे हा कंद वर्तुळ पूर्ण ॥ दुजा बोले कळलें शाहाणपण ॥ हें तूं नोळखसी रथचक्र ॥ ७६ ॥ कूटस्थीं नाना भ्रांति ॥ होतां अज्ञानप्रवृत्ति ॥ तेवीं अन्नांच्या नाना विकृती ॥ देखतां ऋषी भ्रांत झाले ॥ ७७ ॥ ऐसियापरी द्विजगण ॥ भुलले तेव्हां अन्न देखोन ॥ तें पाहोन भीमसेन ॥ मार्ग लावीत भोजनाचा ॥ ७८ ॥ घृत शर्करा दधि दुग्ध ॥ एके ठायीं करिती विशद ॥ त्यांवरी दुजा करी क्रोध ॥ ह्मणे कथिका उत्तम ॥ ७९ ॥ द्राक्षारसें भक्षिती भात ॥ क्षिप्रा तक्रेंसीं कालवित ॥ कथिकेसीं रंभाफळें भक्षित ॥ सँलचा भक्षिती आम्रफळें ॥ ८० ॥ अपूप मांड्याचें चूर्ण ॥ मिळवोनि भक्षिती ब्राह्मण ॥ ऐसें करिती भोजन ॥ विप्र दिव्य अरण्यवासी ॥ ८१ ॥ त्यावरी सकळ ब्राह्मण ॥ भीमें संतृप्त केले पूर्ण ॥ संतोषोनि नृपगण ॥ मग हस्त मुख क्षाळिती ॥ ८२ ॥ ऐसे तृप्त झाले सकळ ॥ सर्वांनीं घेतले तांबूल ॥ सर्वांवरी घातला परिमळ ॥ भीमसेनें स्वहस्तें ॥ ८३ ॥ सर्व बैसले सभासद ॥ मिरवलें ऋषींचें वृंद ॥ त्यामाजी शोभे गोविंद ॥ ऐसी सभा घनवटली ॥ ८४ ॥ तों दोघे विप्र जाण ॥ भांडत पावले सभास्थान ॥ दोघे ह्मणती धर्मनंदन ॥ वाद आमचा निवडीं ॥ ८५ ॥ तों धर्म बोले वचन ॥ येथें बकदाल्भ्य तपोधन ॥ तेथें कासयाचें वादकथन ॥ निवडावया संकट ॥ ८६ ॥ तंव एक ह्मणे येणें दिधलें शेत ॥ तें मी पिकवोनि असें भक्षित ॥ नांगरितां धन लागलें अकस्मात ॥ त्यातें ह्मणतो नेघें हा ॥ ८७ ॥ म्यां तों धान्य भक्षावें ॥ त्या धनातें कासया न्यावें ॥ तरी तें धन तुवांचि घ्यावें ॥ ह्मणोनि पीडितो मजला हा ॥ ८८ ॥ मग युधिष्ठिर बोले दुजयासी ॥ तुवां सांगावें वृत्तांतासी ॥ दुजा ह्मणे सावकाशीं ॥ ऐकावें तुवां राजया ॥ ८९ ॥ तें क्षेत्र मीं दिधलें यासी दान ॥ तेथें जें होईल उत्पन्न ॥ तें याचेंच कीं संपूर्ण ॥ तें घ्यावें कासया म्यां ॥ ९० ॥ ऐसे दोघे भांडती ॥ तें देखोनि सर्व आश्चर्य पावती ॥ नृप दोघांतें समजाविती ॥ परी नायकती कदा ते ॥ ९१ ॥ मग दोघांसी बोले श्रीकृष्ण ॥ तुह्मीं येथें ठेवोनि जावें धन ॥ काळांतरीं तुह्मां आमंत्रण ॥ करोनि हा वाद निवडूं ॥ ९२ ॥ ऐसें ऐकतां वचन ॥ दोघे पावले समाधान ॥ नृपालयीं ठेवोनि धन ॥ दोघे गेले स्वगृहा ॥ ९३ ॥ धर्म ह्मणे कृष्णासी ॥ आतां कां वाद न निवडिसी ॥ भूप बैसले महाऋषी ॥ कळों येईल

१ पक्ष्यातें. २ घुबड. ३ दैवहीन. ४ भात. ५ खीर. ६ केळीं. ७ सालीसकट. ८ समूह.

आह्मांतें ॥ ९४ ॥ मग कृष्ण ह्मणे धर्मासी ॥ स्वस्थ बैसलों सभेसी ॥ येथें वादकथा कासयासी ॥ ह्मणोनि तयां वारिलें ॥ ९५ ॥ ते दोघे सत्वाब्धि केवळ ॥ कोणाचा नायकती बोल ॥ उगाचि मांडेल कल्लोळ ॥ ह्मणोनि काळांतरीं टाकिलें ॥ ९६ ॥ ह्मण-सील कां काळावरी टाकिलें ॥ तरी तें ऐक वहिलें ॥ तीन मासीं आरंभिलें ॥ येथोनियां कलियुग ॥ ९७ ॥ तेंचि द्रव्य तयांतें ॥ वांटून देशील आपुल्या मतें ॥ कीं लोभ उपजेल तूतें ॥ भूमिस्थ धन रायाचें ह्मणोनि ॥ ९८ ॥ विप्र होतील कर्मभ्रष्ट ॥ श्रुति स्मृति लोपतील स्पष्ट ॥ राजे अधर्मी कनिष्ठ ॥ प्रजापीडन करतील ॥ ९९ ॥ अधर्मी रत सकळ लोक ॥ करतील पातकें अनेक ॥ धर्म द्वेषितील निंदक ॥ मनीं मत्सर वाढेल ॥ १०० ॥ नित्य खेळतील द्यूत ॥ मद्यपानें[1] मदोन्मत्त ॥ सर्व होतील व्यसनासक्त ॥ घात चिंतितील परस्परें ॥ १ ॥ देवपितृकार्य वर्जून ॥ साधुनिंदा करितील जाण ॥ निरपराधें भांडण ॥ करि-तील परस्परें ॥ २ ॥ अन्यायें मेळवितील धन ॥ तें ब्राह्मणां देतील दान ॥ स्वयें भक्षितील मिष्टान्न ॥ न घालितील द्विजांतें ॥ ३ ॥ राजे करितील प्रजालुंठन[2] ॥ सर्वथा न करितील पालन ॥ तस्करांचेपरी[3] वर्त्तोन ॥ द्रव्य हरतील सर्वांचें ॥ ४ ॥ विप्र करितील वेदविक्रय ॥ पित्यातें न मानितील तनय[4] ॥ अवघा होईल अन्याय ॥ कन्याविक्रय करितील ॥ ५ ॥ मातेसी पुत्र दवडोनि देतील ॥ प्राणापरी स्त्री संरक्षितील ॥ बंधुबंधु भांडतील ॥ पितापुत्र त्याचिपरी ॥ ६ ॥ स्त्रिया दुष्ट होतील ॥ व्यभि-चारीं प्रवर्ततील ॥ भोगविक्रय होईल ॥ गर्भपाता प्रवर्तती ॥ ७ ॥ विष घालोनि निःशेष ॥ बंधुवर्गांचा करितील नाश ॥ वर्णावर्ण व्यभिचारास ॥ काहीं भेद न मानिती ॥ ८ ॥ वेश्या करितील द्रव्यतुळा ॥ कपटें करितील सकळा ॥ वस्तु करितील अमंगळ गोळा ॥ धनलोभेंकरूनि ॥ ९ ॥ शूद्र सांगतील धर्माचरण ॥ निःशंक कथितील ब्रह्मज्ञान ॥ आपलें करवितील सेवन ॥ विप्रहस्तेंकरूनियां ॥ ११० ॥ विप्र करितील नीचसेवन ॥ नीचासी करितील वंदन ॥ सोडितील स्वधर्माचरण ॥ पापें उदर भरि-तील ॥ ११ ॥ सर्व होईल वर्णसंकर ॥ सर्वत्र होईल व्यभिचार ॥ ऐसा अधर्म अपार ॥ कोण वर्णील निजमुखें ॥ १२ ॥ विप्र मेळ-वोनि धन ॥ वेश्येसी करितील अर्पण ॥ घृतादिक विक्रय जाण ॥ करितील दुर्व्यसनें ॥ १३ ॥ जीर्ण वस्त्र देतील मातेसी ॥ उत्तम देतील स्त्रियेसी ॥ पट्टकूलें देतील वेश्येसी ॥ सेवा करितील तयेची ॥ १४ ॥ धत्तूरादि कुसुमजाती ॥ निर्गंधलें म्लान होती ॥ तीं शिवातें समर्पिती ॥ भक्ति दावितील जनांतें ॥ १५ ॥ चंपकमालादि सुमनें ॥ केशरकस्तूरी चंदनें ॥ हीं वेश्येसी समर्पिणें ॥ कृतार्थपणें होईल ॥ १६ ॥ ऐसा युगधर्म दुस्तर ॥ कोण वर्णील सविस्तर ॥ संक्षेपानें उत्तर ॥ तुज सांगीतलें हें धर्मा ॥ १७ ॥ असो ऐसा अश्वमेध पूर्ण ॥ जाणोनि धर्म आनंदघन ॥ सकळांसी पुसे कुंतीनंदन ॥ बरवा घडला कीं अश्वमेध ॥ १८ ॥

---

१ दारू पिण्यानें. २ प्रजेला छळून द्रव्य लुटणें. ३ चोरांसारखे. ४ मुलगे.

अर्जुनें केलें जें युद्ध ॥ ऐसें कोणीं न केलें प्रसिद्ध ॥ धर्महृदय अति शुद्ध ॥ परी तेथेंही गर्व संचरला ॥ १९ ॥ ऐकोनि ऐसें बकदाल्भ्य मुनि ॥ धर्माप्रति बोलिला वाणी ॥ राया अहंकार न धरावा मनीं ॥ कृष्णचरण पावतां ॥ १२० ॥ धर्मैं अहंकार केला मनीं ॥ हें जाणवलें चक्रपाणि ॥ सावध करावें यालागूनि ॥ अहंकार हरावा ॥ २१ ॥ ह्मणोनि केलें विंदान ॥ तें पुढें आहे नकुळाख्यान ॥ तें सुरस निरूपण ॥ सावधान परिसावें ॥ २२ ॥ इति श्रीजैमिनिअश्वमेध ॥ श्रीकृष्णलीलामृत अगाध ॥ भावें ऐकतां होय चित्त शुद्ध ॥ ह्मणे श्रीधरश्रोतयां ॥ १२३ ॥ ॥ इति श्रीमन्माहाभारते जैमिनिकृते आश्वमेधिके भोजनविधिकथनं नाम चतुर्नवतितमोऽध्यायः ॥ ९४ ॥ ॥ अध्याय ॥ ९४ ॥ ॥ ओव्या ॥ १२३ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥


अध्याय ९५.
धर्मराज.
मुंगूस राजास कांहीं सांगत आहे
देव पुष्प वृष्टि करितात.
ब्राह्मण सकुटुंब विमानांत बसून जात आहे.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जैमिनि ह्मणे पारीक्षितां ॥ ऐकें पूर्वजाची कथा ॥ चित्तीं करूनि एकाग्रता ॥ सावधान परिसावें ॥ १ ॥ सर्वां
यज्ञ झालियानंतर ॥ परमाश्चर्य वर्तलें साचार ॥ संतोषोनि धर्मकुमर ॥ सुखी केले ब्राह्मण ॥ २ ॥ दीन अनाथ कृपण ॥ सर्वां
दिधलें भोजन ॥ तृप्त झाले विश्वंजन ॥ हा शब्द सर्वत्र प्रगटला ॥ ३ ॥ देव करिती जयजयकार ॥ झाला वाद्यांचा गजर ॥ पुष्प-
वर्षाव वारंवार ॥ होतसे धर्ममस्तकीं ॥ ४ ॥ ऐसा उत्साह झाला थोर ॥ तों धर्ममनीं उठला अहंकार ॥ माझे यज्ञीं चराचर ॥ तृप्त
झालें संपूर्ण ॥ ५ ॥ जेथें उपजला अहंकार ॥ तेथें स्वात्मसुखाचा होय संहार ॥ ऐसें जाणोनि रमावर ॥ करी लाघव तेधवां ॥ ६ ॥
तों सभेमाजी रचिलें बीळ ॥ तेथोनि निघाला एक नकुळ ॥ सुवर्णवर्ण तो सोज्वळ ॥ गर्जोनियां बोलत ॥ ७ ॥ त्याचें ऐकतां
वचन ॥ चकित झाले सर्व जन ॥ तो संतापेंकरून ॥ मनुष्यवाणी बोलत ॥ ८ ॥ धर्मराया अभिमानेंकरून ॥ वृथाचि केला ह्मणसी
यज्ञ ॥ सक्तुप्रस्थ दानासमान ॥ नव्हे याग सर्वथा ॥ ९ ॥ कुरुक्षेत्रवासी एक ब्राह्मण ॥ त्याचें सांगतों ऐक कथन ॥ त्याणें केलें
सक्तुप्रदान ॥ त्यातुल्य हा याग नव्हे ॥ १० ॥ ऐसें ऐकतां त्याचें वचन ॥ आश्चर्य पावले सकळ जन ॥ मुनिवर नृपगण ॥ तटस्थ
झाले ऐकोनि ॥ ११ ॥ सर्व होवोनि विस्मित ॥ नकुळाप्रति बोलती मात ॥ ह्मणती कोठील तूं अकस्मात ॥ आलासी रे या यज्ञीं
॥ १२ ॥ कासयाचें तुज ज्ञान ॥ कां बोलसी आह्मां न गणून ॥ या सभेंत येवोन ॥ यज्ञनिंदा करितोसी ॥ १३ ॥ जे निगमागमीं
निपुण ॥ ऐसे मिळाले येथें ब्राह्मण ॥ त्यांहीं याग केला संपूर्ण ॥ न पडलें न्यून अणुमात्र ॥ १४ ॥ जैसें असे यागविधान ॥ तैसेंचि
केलें संपूर्ण ॥ जे पूंजार्ह ब्राह्मण ॥ केलें पूजन तयांचें ॥ १५ ॥ मंत्रपूर्वक हवन ॥ निर्मत्सरपणें सर्व दान ॥ संतुष्ट केले द्विजजन ॥
वस्त्राभरणेंकरूनि ॥ १६ ॥ धर्मयुद्धीं जिंकिले नृपवर ॥ श्राद्धीं तृप्त केले पितर ॥ वस्त्रान्नदानें समग्र ॥ तृप्ति केली सर्वांची ॥ १७ ॥
दांपत्यांचें केलें पूजन ॥ प्रजांसी दिधलें भोजन ॥ तृप्त केले देवगण ॥ रक्षिले राजे शरणागत ॥ १८ ॥ येथें पडिलें काय न्यून ॥ तें
बोलें प्रगट वचन ॥ या सर्व सभेंत येऊन ॥ उगाचि वल्गना कां करिसी ॥ १९ ॥ दिससी तूं ज्ञानदीप ॥ भासलें आह्मां दिव्यरूप ॥
या सभेमाजी विश्वरूप ॥ जगदात्मा बैसलासे ॥ २० ॥ ऐसें नृपांचें वचन ॥ नकुळें श्रवणीं ऐकोन ॥ करोनियां हास्यवदन ॥ काय
वचन अनुवादे ॥ २१ ॥ नकुळ बोले रायांलागुनी ॥ काय मी बोलिलों असत्य वाणी ॥ तुह्मी जाणा अंतःकरणीं ॥ मी गर्वें न
बोलिलों ॥ २२ ॥ जें मी बोलिलों वचन ॥ तें सर्वीं केलें कीं श्रवण ॥ हा याग सक्तुप्रदानासमान ॥ सर्वथा नव्हे जाणावा ॥ २३ ॥
सक्तुप्रदानाचें आख्यान ॥ तुह्मां सांगतों मी पावन ॥ सर्वही करा श्रवण ॥ सावधान मानसें ॥ २४ ॥ तो कुरुक्षेत्रीं द्विजवर ॥ धर्म-
प्रदानीं तत्पर ॥ धर्मकृषीनें निरंतर ॥ पोषीतसे सर्व कुटुंबा ॥ २५ ॥ जो कृषिच्छिद्रीं पडे धान्यकण ॥ करी कपोतापरी त्याचें ग्रहण ॥

१ जनमेजया. २ सर्व लोक. ३ मुंगूस. ४ वेदविद्वंत. ५ पूजेला योग्य, सत्पात्र.

ऐसा धान्यसंग्रह करून ॥ करी पोषण देहाचें ॥ २६ ॥ त्याचे विभाग पाच करित ॥ एक अतिथीस समर्पित ॥ चारी विभाग भक्षित ॥ स्वकुटुंबेंसीं आपण ॥ २७ ॥ तों दुर्भिक्ष¹ पडलें काळेंकरून ॥ धान्याचा न मिळे एक कण ॥ तंव ते करिती उपोषण ॥ परी सत्व न टाकिती ॥ २८ ॥ न सोडिती नित्यनेम ॥ स्नानसंध्यादिक जें कर्म ॥ सांग करित स्वधर्म ॥ स्त्री पुत्र स्नुषा² सर्वही ॥२९॥ आधींच शरीरें कृश ॥ त्यावरी पडिले उपवास ॥ अस्थिमात्र उरल्या देहास ॥ रक्तमांस असेना ॥ ३० ॥ ऐसे क्रमितां दिवस ॥ तो सुभिक्ष³ पावला देश ॥ तों सक्तुप्रस्थ⁴ मिळाले तयास ॥ याचकवृत्तींकरूनि ॥ ३१ ॥ चौघीं केलें त्यांचें कंडन ॥ कांडितले ते सुंदर पूर्ण ॥ तें शिजवोनि अन्न ॥ मार्गे लक्षिती अतिथीचा ॥ ३२ ॥ तों अकस्मात आला ब्राह्मण ॥ तो देखतां पावलीं समाधान ॥ करूनि अभ्युत्थान वंदन ॥ त्याचें स्तवन आरंभिलें ॥ ३३ ॥ ह्मणे मी धन्य झालों जी स्वामी ॥ मज सनाथ केलें तुह्मीं ॥ कृपा करूनि ममाश्रमीं ॥ भोजनविधि सारावा ॥ ३४ ॥ तेंचि धन्य मंदिर ॥ जेथें तुह्मांऐसे येती द्विजवर ॥ तुमचे चरणक्षालनाचें नीरें ॥ पडतां आह्मी पवित्र होतों ॥ ३५ ॥ गृहस्थाचा धर्म पूर्ण ॥ अतिथि आलिया करावें वंदन ॥ तयासी सन्मानें आसन ॥ द्यावें प्रीतींकरोनि ॥ ३६ ॥ तें नसे तरी भूमी आसन ॥ प्राशनालागीं द्यावें जीवन⁵ ॥ आणि करावें मधुर भाषण ॥ यासी तों न लागे धन कांहीं ॥ ३७ ॥ आजि धन्य केलें स्वामी मज ॥ माझे उद्धरिले पूर्वज ॥ आजि मजवरी अधोक्षज⁶ ॥ दयाळु झाला वाटतें ॥ ३८ ॥ ऐसें करूनि त्याचें स्तवन ॥ तयाचें केलें चरणक्षालन ॥ विध्युक्त करूनि पूजन ॥ अतिथिविभाग समर्पिला ॥३९॥ तो तेणें विभाग भक्षिला ॥ परी तो अतृप्त देखिला ॥ ब्राह्मण मनीं चिंतावला ॥ अतृप्त तो जाणोनि ॥ ४० ॥ ह्मणे भक्षोनि आत्मविभाग ॥ अतृप्त झाला अंतरंग ॥ मग त्यातें आपला विभाग ॥ देता झाला आनंदें ॥ ४१ ॥ त्याची अति कृश दारा⁷ ॥ बोलतां कांपे थरथरां ॥ उपोषणें नेत्र फिरती गरगरां ॥ ऐसी ती तेव्हां बोलतसे ॥ ४२ ॥ हें भक्षावें जी धर्मज्ञा ॥ माझ्या विभागाची द्यावी आज्ञा ॥ शक्ति असतां सर्वमान्या ॥ कां हो चिंता करितां ॥ ४३ ॥ माझ्या विभागें त्वरित ॥ अतिथि करावा कीं तृप्त ॥ येणेंकरूनि माझें चित्त ॥ परमानंद पावेल ॥ ४४ ॥ ऐकोनि स्त्रियेचें उत्तर ॥ तयेसी विप्र बोले मधुर ॥ तेंचि ऐकावें सादर ॥ जैमिनि ह्मणे जनमेजया ॥ ४५ ॥ कीटक पतंग मृगादिकरूनि ॥ बरवें बोलती स्त्रियेलागोनि ॥ धर्मध्वजा मनीं इच्छोनि ॥ आधीं पोषिती तयेतें ॥ ४६ ॥ स्त्रीआधीन धर्म ॥ स्त्रीआधीन व्रतादि नेम ॥ स्त्रीलोभें लोक उत्तम ॥ प्राप्त होतो निर्धारें⁸ ॥ ४७ ॥ स्त्रीआधीन कुलसंपत्ति ॥ स्त्रीआधीन पितृतिथि ॥ स्त्रीयोगें आश्रम संतति ॥ प्राप्त होय निर्धारें ॥ ४८ ॥ जयासी प्रसन्न गोपाळ ॥ त्यासी स्त्री ती अनुकूळ ॥ तिच्या अनुकूलत्वें सकळ ॥ होय संसार प्राणियाचा ॥ ४९ ॥ तरी माझें घेवोनि आज्ञावचन ॥ स्वभागाचें करीं भक्षण ॥

१ दुष्काळ. २ सून. ३ सुकाळ. ४ एकशेर यव. ५ पाणी. ६ श्रीकृष्ण. ७ स्त्री, बायको. ८ खरोखर.

त्यामध्यें तुज दूषण ॥ अल्पही नसे पतिव्रते ॥ ५० ॥ जो कृपा न करी भार्येवरी ॥ तो अधम कीं संसारीं ॥ भार्येएवढा मित्र संसारीं ॥ दुजा नसे अकृत्रिम ॥ ५१ ॥ जेवीं शरीरासवें असे छाया ॥ तेवीं ती सधर्मिणी जाया ॥ निजांगसेवनीं निववी कार्या[2] ॥ कामशरें तापलिया ॥ ५२ ॥ ऐसें ऐकोनि वचन ॥ कांता करीत मृदु भाषण ॥ सहजधर्म स्त्रियेलागून ॥ स्वामीस संकटीं न पाडावें ॥ ५३ ॥ पतीहून अन्य दैवत ॥ स्त्रियेसी नसे कीं निश्चित ॥ धर्मार्थ काम मोक्ष प्राप्त ॥ पति प्रसन्न जाहलिया ॥ ५४ ॥ स्त्रियेचा नेम हाचि बरवा ॥ मनोभावें करावी पतीची सेवा ॥ त्याचा काम पुरवावा ॥ अन्नदानेंकरूनि ॥ ५५ ॥ स्त्रियांचा धर्म तोचि पति ॥ पतिसंगानें सद्गति ॥ पतिसंगें स्वर्गप्राप्ति ॥ देव वंदिती तयेतें ॥ ५६ ॥ कायावाचामनेंकरून ॥ जी स्त्री पतीसी शरण ॥ ती [3]त्रिलोकीं संपन्न ॥ पूजनार्ह जाणावी ॥ ५७ ॥ स्वामीवांचोनि भोजन ॥ कधींच न केलें नेमवचन ॥ ऐसें माझें व्रत पूर्ण ॥ केवीं भंगूं स्वामिया ॥ ५८ ॥ जी पतिवं[4]चका केवळ ॥ ती नरकीं पचेल सर्वकाळ ॥ त्याचि योगें वडवाघुळ ॥ होवोनि विष्ठा भक्षील ॥ ५९ ॥ ऐसें ऐकतां वचन ॥ स्त्रीचा विभाग देवोन ॥ ब्राह्मणें तो करूनि भक्षण ॥ पुढें बैसला अतृप्त ॥ ६० ॥ तें देखोनि चिंताक्रांत ॥ झाला पिता देखोनि सुतें ॥ काय वचन बोलत ॥ सावधान ऐकावें ॥ ६१ ॥ कां करितां चिंता आपण ॥ माझा विभाग देवोन ॥ विप्र करावा तृप्त पूर्ण ॥ करावें पूजन भोजनोत्तरीं ॥ ६२ ॥ गृहापासोन अतिथि ॥ अतृप्त गेलिया निश्चितीं ॥ ते व्यर्थ संसारीं वांचती ॥ शून्य गृह त्यांचें जाणावें ॥ ६३ ॥ जे करूनि आत्मपीडन ॥ विष्णुप्रीत्यर्थ देती दान ॥ ते स्वर्गीं जातां संपूर्ण ॥ देव तयांतें वंदिती ॥ ६४ ॥ काय जाळावें त्याचें वित्त ॥ अन्यायें संपादिलें अगणित ॥ ज्या गृहापासोनि अतृप्त ॥ अतिथि गेला विष्णुरूपी ॥ ६५ ॥ अतिथि विमुख झालिया जाण ॥ आपलें पाप तयासी देऊन ॥ त्याचें सकळ पुण्य घेऊन ॥ तो जातो कीं निर्धारें ॥ ६६ ॥ कुटुंबाचें झालें पीडन ॥ परी निर्मत्सर ज्याचें मन ॥ जो अतिथीस समर्पी अन्न ॥ सद्गति तो पावे ॥ ६७ ॥ ऐकोनियां पुत्रवचन ॥ पिता पावला समाधान ॥ मग त्याप्रति मधुर भाषण ॥ करिता झाला तेधवां ॥ ६८ ॥ तूं बाळ परी शत वर्षांचा ॥ ऐसा ज्ञानी भाससी साचा ॥ सर्व [6]काम पुरला मनींचा ॥ वाग्विलास ऐकतां ॥ ६९ ॥ बाळासी क्षुधेचें पीडन ॥ अत्यंत होतसे दारुण ॥ ह्मणोनि आपला भाग पूर्ण ॥ करीं भक्षण ययाचें ॥ ७० ॥ सद्गति सत्पुत्रें प्राप्ति ॥ ऐसी बोले शास्त्ररीति ॥ ह्मणोनियां निश्चिती ॥ मी मानितों पावन ॥ ७१ ॥ ज्यासी इच्छा परलोकींची ॥ त्याणें रक्षावी तनु[7] पुत्राची ॥ ऐसी वाणी मन्वादिकांची ॥ ऐकिली कीं सुपुत्रा ॥ ७२ ॥ म्यां केलें अनुष्ठान ॥ बरवा सेविला हुताशन[8] ॥ तुजसारिखा झाला नंदन[5] ॥ आतां भय नाहीं मरणाचें ॥ ७३ ॥ जे अत्यंत पाप करिती ॥ मृत्युभय मनीं मानिती ॥ पुण्यवंत ते मृत्यूतें इच्छिती ॥ जैसा गृहस्थ अति-

१ स्त्री. २ शरीर. ३ स्वर्ग, मृत्यु व पाताळ या तीन लोकीं. ४ नवऱ्याला ठकविणारी. ५ पुत्र. ६ इच्छा. ७ देह, शरीर. ८ अग्नि.

